

# मोरोपंत

## चरित्र आणि काव्यविवेचन.

संपादक

लक्ष्मण रामचंद्र पांगारकर बी. ए.

पुणें पेठ शनवार.

प्रकाशक

हिंद एजन्सी, बुकसेलर्स आणि पब्लिशर्स

माधवबाग मुंबई नंबर ४.

कार्तिक शके १८३०, नोव्हेंबर इ. स. १९०८.

किंमत २ रुपये.

मुद्रक

रावजी श्रीधर गोंधळेकर, 'जगद्धितेच्छु' छापखान्याचे मालक पुणें.

॥ श्रीरामप्रसन्न ॥

## मंगलाचरण.



श्रीरामा ! नाम तुझें माझ्या वदनांत सर्वदा राहो ।
साहो मन भोगातें[1] गृहचिंतेतें न हें कधीं वाहो ॥ १ ॥
तूं माय बाप, बंधु, प्राणप्रिय मित्र, सोयरा, रामा ! ।
जडजीवा नाम तुझें परिपाळी बाळका जसा आमां[2] ॥ २ ॥
तुज हात जोडितो जो[3] त्याचे अपराध घालिसी पोटीं ।
साधु कवी बहु गाती श्रीरघुवीरा ! तुझीं यशें मोटीं ॥ ३ ॥
सीताकांता ! वीरा ! धीरा ! मज पाव राघवा ! देवा ! ।
दे वास पदीं चित्तां[4] नित्य प्रेमें तुझी घडो सेवा ॥ ४ ॥
संतांचा संग घडो, कीर्ति तुझी सर्वदा पडो कानीं, ।
आवडी फार धरावी श्रीरामा ! तव गुणांचिया गानीं ॥ ५ ॥
नमितां श्रीरामा ! त्वां तत्काळ दिली बिभीषणा लंका[5] ।
यास्तव मी अपराधी आलों शरण त्यजूनियां शंका ॥ ६ ॥
चरणरजेंचि अहल्या उद्धरिली त्वां असें मला कळलें ।
म्हणुनि विनवितों रामा ! निर्मळ हें मन करीं अघें[6] मळलें ॥ ७ ॥
सुग्रीवाची चिंता हरिली मारूनियां [7]बळी वाळी ।

१ दुःखसुखादि भोगानेंच साहावयाचें मनास वळण लागो. सुखदुःखें पूर्व कर्मांचीं फळें असल्यामुळें भोगल्याशिवाय कोणालाही सुटत नाहींत. २ मातृस्तन. ३ भगवंताला सर्वभावें शरण येणें 'इतुकेंचि हें स्वहितकृत जीवाकडे' आहे. ४ तुझ्या पादकमलीं माझा चित्तभ्रमर रंगो. ५ तूं भक्तांना 'स्वसाम्य' देतोस. ६ पापानें मळलेलें हें मन निर्मळ कर. ७ बळवंत असा वाळी.

शरणांगतासि जैसा पाळिसि तैसा न बापही पाळी ॥ ८ ॥
देवाचा विप्राचा त्वां श्वानाचाहि वारिला ताप ।
लीलेनेंचि उडविला पायांच्या धूळिच्या कणें शाप ॥ ९ ॥
त्वां बाळक विप्राचें रामा ! करुणा करूनि तारावें ।
वारावें विघ्न विभो ! निजनामें सर्व पाप सारावें ॥ १० ॥
त्वां बाळक विप्राचें रामा ! करुणा करूनि वांचविलें ।
शुचिहि कळत्र त्यजिलें, यश-तारायासि विश्व-सांचविलें॥ ११ ॥
सर्व अयोध्यावासी प्राणी त्वां राघवा ! सुखी केले ।
नेले उत्तमलोकीं खळ राक्षसही रणांत जे मेले ॥ १२ ॥
तूं सागर करुणेचा रामा ! तुजलाचि दुःख सांगावें ।
तुज सोडुनि इतरांला दीनें पसरोनि तोंड कां गावें ? ॥ १३ ॥
श्रीरघुनाथा ! जपतो श्रीशंकरही सदा तुजें नाम ।
बा ! तूंचि लहानाचें थोराचें सर्व पुरविसी काम ॥ १४ ॥
मुक्त अजामिळ जाला नामें, तरली तसीच ते गणिका, ।
रामा ! मज फार नको नामसुधेची तुझ्या पुरे कणिका! ॥ १५ ॥
नाम मुखाला येतें परि निववीना मनासि अद्यापी ! ।
विषयातें वांच्छितसे, अमृत प्राशूनि कोण मद्या पी ? ॥ १६ ॥
कां गुण न करी ? न कळे ! नामें तों सर्व दुःख उडवावें ।
प्रभु पाहतां पदांनीं दुष्टें दीनासि काय तुडवावें ? १७ ॥
अपराधशतहि घडतां दीनीं न कधींहि नाम [5]रागेलें ।
रामा ! धन्य न करितां त्यजुनि न कोणाहि पामरा गेलें ॥ १८ ॥
माझें सत्व पहातें श्रीरामा ! नाम हें तुझें काय ।
परम सदय तें दीना लावील कसें ह्मणावया ' हाय ' ! ॥ १९ ॥
रामा ! तव नामाचें तें तेज क्षीण कलियुगीं झालें ।
हें तों न घडे, गातां यास सुखें दासवृंद[6] बहु धालें ! ॥ २० ॥
करुनि प्रसाद कुतुकें न कळों दिधला सुदामदेवास ।
करिसि तसें बहुधा या भक्तमयूरा पदींच दे वास ॥ २१ ॥
रामा ! मेघःशामा ! [7]कामारातिप्रिया ! रमाधामा ! ।
बा ! माय जसी आमा या माझ्या दे मुखीं सदा नामा[8] ॥ २२ ॥

१ उत्तरकांडांत ही कथा आहे. २ स्त्री, सीता शुद्ध होती तरी. ३ प्रसिद्ध पाठाहून हा पाठ भिन्न पण बरोबर आहे. ४ "नसेचि शरणागतीं घडलि सत्य अद्यापि ती । रुचे विषय, ज्या मिळे अमृत ते न मद्या पिती "—केकावलि ४१. ५ रागावलें. ६ भक्तजन. ७ शंकरप्रिया ! ८ हें पंतकृत रामस्तोत्र मला नुकतेंच नाशीक येथें जुन्या बाडांत सांपडलें. हें पंचवटीच्या रामापुढें बसून त्यांनीं रचिलें.

# प्रस्तावना.



## पंतांचें भक्तमंडळ.

**रसिक, कवि, परम सज्जन, भगवद्भक्त, प्रसन्न होतील।**
**न गमेल या परिस हित, जो तो वदनांत अमृत ओतील ॥ १ ॥**

**—महाभारत.**

१ विषयप्रवेश. २ हरिदासमंडळ. ३ आर्यानुयायी कविमंडळ. ४ भक्तमंजरीमालाकार. ५ परशुरामपंत तात्या गोडबोले व दादोबा पांडुरंग. ६ पंतदूषक. ७ विष्णुशास्त्री चिपळोणकर. ८ बाळकृष्ण मल्हार हंस. ९ वामन रावजी ओक. १० प्रस्तुत चरित्रकार.

१ श्रीरामभक्त कविवर्य मोरोपंत पराडकर ( शके १६५१–शके १७१६) यांच्या कवितेचीं प्रसिद्धि त्यांच्या जिवंतपणींच महाराष्ट्रभर झाली होती व यांच्या आर्या त्यांच्यासमोर कीर्तनप्रसंगीं हरिदास ह्मणत असत. बाबा पाध्ये यांनीं ह्मटल्याप्रमाणें पंतांच्या आर्यांना वावरायला हें भरतखंडही आज पुरेनासें झालें आहे. पंतांच्या आयुर्मर्यादेंतच ठिकठिकाणचे ' रसिक सज्जन शुद्धें अचंचळ मनें ' त्यांच्या कवितावधूकडे पहावयाला लागले होते. ' ओवी ज्ञानेशाची किंवा आर्या मयूरपंताची ' हा सर्वसंमत झालेला अभिप्राय रामबडवे यांनीं पंतांस पंढरपुराहून पाठविलेल्या एका आर्याबद्ध पत्रांत ग्रथित केला होता. पंत असतांनाच पंतांच्या आर्येवांचून कीर्तनाला रंग भरेनासा झाला होता. महाराष्ट्रांत आपल्या आर्येचा होत असलेला जयजयकार पंतांनीं पाहिला. पंत शके १७१६ मध्यें वैकुंठवासी झाले तेव्हां त्यांच्या आर्येनें ब्रह्मावर्तापर्यंत सर्व मुलखावर आपला अंमल बसविला होता ! शके १७२० सालीं ब्रह्मावर्तास एका रसिकानें पंतांच्या सप्तशतीच्या आर्या लिहून घेतल्या; त्यांच्या अखेरीस त्यानें ह्मटलें आहे:—

**श्रीमन्मयूर सत्कवि याच्या जरि कवि नवीन समतेला।**
**आणाल तरि ह्मणा मग बुध हो ! हय्यंगवीनसम तेला ॥ १ ॥**

---

१ सदर ग्रंथ मला नाशीकचे पंतभक्त व शीघ्रकवि कै० बळवंत खंडूजी पारख यांजकडून मिळाला.

पंत विद्यमान असतांना त्यांच्या कवितेचा जो जयजयकार झाला तो तसाच आजवर सारखा होत आला आहे हें ह्या प्रस्तावनेंत मुख्यत: दाखवावयाचें आहे. पंत वैकुंठवासी झाल्यापासून गेल्या ११४ वर्षांत पंतांच्या कवितेचा पुरस्कार कोणीं कोणीं केला, त्यांच्या कवितेवर दूषणें कोणीं आणलीं व त्यांचें खंडन कोणीं कसें केलें,आर्येचें अनुकरण करणारे कवि कोण झाले, हरिदासांनीं व नवीन पद्धतीच्या विद्वानांनीं तिचा सत्कार कसकसा केला व त्यांच्या भक्तांचे उद्योग कसकसे होत आले हें सर्व संक्षेपानें ह्या प्रस्तावनेंत सांगावयाचें आहे. ही प्रस्तावना ह्मणजे आर्याभक्तांचें एक जंगी संमेलनच होय असें वाचकांस वाटल्याशिवाय राहणार नाहीं! ह्या संमेलनांत बहुधा सर्व आर्यापंडितांस आमंत्रण केलें आहे, तथापि कोणी चुकून राहिले असल्यास त्यांनीं क्षमा करावी अशी त्यांस सविनय विनंति आहे. जुने रसिक आणि नवे रसिक, इंग्रजी जाणणारे व इंग्रजी न जाणणारे, हरिदास व पदवीधर ह्या सर्वांचा समभावानें यांत आदर केला जाईल. पंतभक्त व पंतदूषक या उभयतांचाही येथें सत्कार होणार आहे. पंतांचें चरित्र नऊ प्रकरणांत सांगितलें आहे, पंतकवितेचें चरित्र त्यापुढील १२ प्रकरणांत सांगितलें आहे व पंतभक्तांचें अल्प चरित्र ह्या प्रस्तावनेंत सांगावयाचें आहे. पंतांच्या पश्चात् पंतांच्या कवितेचा महाराष्ट्रीयांनीं कसा बोज राखला हें ह्या प्रस्तावनेवरून वाचकांस कळणार आहे.

२ पंतांच्या कवितेचा जयजयकार करणाऱ्यांमध्यें **हरिदासमंडळास** अग्रपूजेचा मान दिला पाहिजे. पंतांनीं आपली कवितावधू भगवंतास समर्पण केल्यावर ( केका ३३ ) ती सहजच हरिदासांच्या मातृस्थानीं आली! हरिदासांनीं आईप्रमाणें तिचें भक्तिपूर्वक संगोपन केलें व तिनेंही स्वरसानें त्यांचें पोषण केलें. हरिदासांनीं पंतांच्या कवितेचा प्रसार केला, व तिच्या जयजयकारांत आनंद मानला. पंतांची कविता हरिदासांनाही कामधेनूप्रमाणें सुफलदायक झाली. गेल्या १००।१२५ वर्षांत महाराष्ट्रांत जे नामांकित हरिदास झाले त्यांपैकीं बहुतेकांना पंतकवितेनें मोहून टाकलें होतें. हरिदासांनीं पंतकवितेचा सप्रेम पुरस्कार केला नसता तर तिची एवढी मानमान्यता झाली असती कां नाहीं याची वानवाच आहे. पंतांचे शिष्यतुल्य स्नेही रामजोशी, मैराळबोवा, विठोबा ताहराबादकर वगैरेनीं पंतांच्या समक्ष कीर्तनांत त्यांच्या

आर्या ह्मणण्याचा प्रघात पाडला होता. पंतांचे समकालीन सत्पुरुष प्रसिद्ध **तुकाविप्र** हेही कीर्तनसमयीं पंतांच्या आर्या मोठ्या आवडीनें ह्मणत असत. तुकाविप्र यांनीं १०।५ हजार अभंग केले असून वारकरी मंडळांत यांची मोठी मान्यता होती. पंतांचे मित्र रामबडवे यांनीं 'भगवत्तनु हरिकथा करि आर्यांनीं अलंकृतीयुक्त' असें ह्मटलें आहे. हरिकथारूपी भगवंताच्या देहावर पंतांनीं आपल्या आर्यांचे अलंकार चढवून त्याची शोभा वाढविली असें रामबडव्यांचें ह्मणणें आहे. तो आणखी ह्मणतोः—

**सुस्वरकंठें रसिकें आर्या गातां मयूरबाबाची ।**
**वेधी सुजनमनातें, न तशी धुन ऐकतां रबाबाची ॥ १ ॥**

रबाब नामक एक तंतुवाद्य आहे. त्याची धून ह्मणजे विशेष प्रकारच्या रागध्वनीचा किंचिदंश, जसें 'हा शुद्ध सारंग नव्हे, यांत किंचित् मल्हाराची धून मारते.' रबाबाची धून सुजनमन वेधीत नाहीं इतकी पंतांची आर्या कीर्तनसमयीं हरिदास सुस्वर कंठानें गाऊं लागले ह्मणजे ती वेधते. पुण्यास **वामनबोवा बुंडे इंदापूरकर** यांनीं पंतसहवासजन्य आर्याप्रेमामुळें शके १७३२-१७५० या अठरा वर्षांत पंतांच्या आर्यांवर शेंकडों कीर्तनें करून पुणेकरांस त्यांची गोडी लाविली. याच सुमारास **नागेशकवि** यांचींही पुण्यास फार सरस कीर्तनें होत. यांनीं पंतांच्या आर्यांवर सारीं कीर्तनें करावींत. हे शीघ्रकविही होते. यांनीं शके १७४३ सालीं 'नंदिकेश्वरचरित' ह्मणून एक आर्याबद्ध काव्य केलें. **बजाबा हरिदास** यांनीं पंतांची आर्या वऱ्हाडांत नेली. हे चांगले व्युत्पन्न असून यांना रसवन्ती अनुकूळ होती. **सागरचे हरिदासबोवा, नाशीकचे त्र्यंबकबोवा व गोविंदबोवा** यांनीं पंतांच्या आर्या इंदूर ग्वाल्हेर इकडे पसरल्या. फलटणास **आत्मारामबोवा फलटणकर** ह्मणून एक सत्पुरुष पंतांचे मित्र होते. पंत बारामतीहून कोल्हापुरास जातां येतां त्यांच्या घरीं आठ आठ दिवस उतरत असत. पंतांचें व त्यांचें परस्परप्रेम अतिशय होतें. ते कीर्तनांत पंतांच्या आर्या सहज उलगडून दाखवीत व वारंवार प्रेमानें 'वाहवा रे मोरोबा ! धन्य त्याची माय त्यालाच व्यायली !' असे उद्गार काढीत. यांचे नातु नारायणबोवा फलटणकर हे गवई प्रसिद्ध होऊन गेले. फलटणकरांनीं कृष्णातीरला पंतांच्या आर्या पसरल्या. **रहिमतपूरकरबोवा व पन्हाळकरबोवा** हे दोन हरिदास फारच नामांकित होऊन गेले. पन्हाळकरांचें वक्तृत्व तर असामान्य कोटींतलें होतें. मालाकारांनीं

९२ व्या अंकांत एका टीपेंत यांच्या चित्तमोहकत्वाची अशी गोष्ट सांगितली आहे कीं, " अकरा वर्षांपूर्वी पुण्यांत नातूंच्या एका घराला रात्रीं आग लागली होती त्याच वेळेस जवळच पन्हाळकर गोसावी यांचें कीर्तन चालू असून त्यांनीं जोशीबोवांची 'छेकापन्हुती' त्या समयास काढली होती. बोवांची ह्मणण्याची रीत जोशीबोवांच्या अस्सल धाटणीची मोठी चटकदार असल्यामुळें मंडळी इतकी गर्क होऊन गेली होती कीं, सगळें कीर्तन आटोपून विडा खिरापत होऊन खुशालपणें लोक जों बाहेर येतात तों आगीचा डोंब त्यांच्या दृष्टीस पडला!' पन्हाळकर बोवांचीं रसभरित कीर्तनें ऐकलेले लोक अजून हयात आहेत. यांचें संस्कृत व मराठी काव्यांचें पाठांतर लोकोत्तर होतें. मंगलाचरण होतांना यांना मंडळींनीं आज आख्यान अमुक लावायचें ह्मणून सुचवावें ! गोपाळराव देशमुखांच्या वाड्यांत न्या. रानडेप्रभृति विद्वान् कीर्तनास बसले असतांना एक दिवस यांनीं मंगलाचरणापासून अखेरच्या वरप्रसादापर्यंत सारें कीर्तन लावण्यांत केलें ! दुसऱ्या दिवशीं आर्यांत, तिसरे दिवशीं श्लोकांत व चवथे दिवशीं अभंगांत !! असले पट्टीचे विद्वान अलीकडे डोळ्यांनीं पाहायला सुद्धां मिळत नाहींत! अर्धवटांचा सुळसुळाट मात्र फार झाला आहे. इतके विद्वान असून पन्हाळकर बोवा फार निरिच्छ होते. पुत्र वारल्यावर हे विरक्त झाले. हे सुनेला बरोबर घेऊन कीर्तनें करीत देशभर हिंडत. 'बुका लावूं नये भाळां । माळ घालूं नये गळां ' या तुकोक्तीप्रमाणें त्यांचें आचरण असे. हे कीर्तनाबद्दल कांहीं एक वेत नसत, मधुकरी मागून पोट भरावें व भगवत्प्रेमानें निरिच्छपणानें कीर्तन करावें हा यांचा व्यवसाय होता! पंतांच्या आर्या यांच्यापुढें जणूं नाचत ! पंतांच्या आर्या लावतांना समानार्थक स्थळें हे फार मार्मिकतेनें दाखवीत व अमुक कल्पना पंतांना अमुक ठिकाणाहून सुचली हें नेमकें दाखवीत ! 'आर्या मुक्तामाला दावीन' (नामरसायन १०९) ही माळ आणि लक्ष्मी यांच्या सवतीमत्सराची आर्या चालली कीं यांनीं ' पर्युष्टया तव विभो वनमालयेयं । संस्पर्धिनी भगवती प्रतिपत्निवत् श्रीः' हा श्लोक ( भागवत-११-६-१२ ) काढलाच ! एकदां रहिमतपूरकर बोवांच्या कीर्तनसमयीं पन्हाळकर बोवा हजर होते. बोवांनीं दुःशासनवधाचें आख्यान लावलें होतें. बोवांनीं:—

**धांवति अन्योन्यावरि ते दोघे आठवूनि अपकार ।**
**जाणों ते मदमत्त क्रोधोद्धत दंपतीच अपकार ॥ १ ॥**

ही प्रसिद्ध आर्या ह्मटली मात्र तों पन्हाळकर बोवांनीं

**अधुना मधुकरपतिना गिलितोप्यपकारदंपती येन ।**
**त्रातः स पालयेत्त्वां विकाररहितो विनायको लक्ष्म्याः ॥ १ ॥**

हा संस्कृत श्लोक त्यांना आठवून दिला! 'मकरपतिना गिलितः दंती ( गजेंद्रः ) येन त्रातःस लक्ष्मीनायकः त्वां पालयतु' हा सदर श्लोकाचा सारांश आहे! श्रोता वक्ता हे समानाधिकारी असले ह्मणजे वक्तृत्वाचा रंग कांहीं निराळा खुलतो. असो. पंतांचे बारामतीचे शिष्य **पांडुरंगबुवा ओतुरकर** यांनीं व यांचे शिष्य सखारामस्वामी यांनीं पंतांची कविता बडोद्यास फैलावली. सखारामस्वामींचे शिष्य **गुजाजी चाकणकर** हे मला बडोद्यास भेटले होते. यांनीं पंतांच्या कांहीं आर्यांचे परंपराप्राप्त असे सुंदर अर्थ करून दाखविले. त्यांपैकीं एकच आर्या मासल्याकरितां सांगतों. भीमानें कीचकास मारल्या वेळची ही आर्या आहे:—

**दावी दुरूनि नरकग्रामाची भीम कीचका वेस ।**
**कलिमाजि लघुत्वप्रद शक्तीस नसेचि नीच कावेस ॥**
**—विराटपर्व १-५३**

" भीमानें दुरून कीचकाला नरकग्रामाची वेस दाखविली. भीम कृष्णभक्त असून त्यानें कीचकाला मोक्षपदास न नेतां नरकग्रामाकडे पाठविलें ही गोष्ट वस्तुतः भीमाला लघुत्वप्रद ह्मणजे कमीपणा आणणारी आहे. तथापि नीचांच्या संसर्गानें सज्जनांनाही लघुत्व पत्करावें लागतें! नीच ह्मणजे शाक्त जसें मद्यप्राशनादि करून शक्तीस ह्मणजे देवीस कमीपणा आणतात, किंवा भगवीं वस्त्रें पांघरून कृष्णकर्मे करणारे दांभिक लोक जसे कावेस ह्म० गेरूस कमीपणा आणतात त्यांतलाच हा प्रकार होय."

**काशिनाथबोवा मसूरकर** यांचीं कीर्तनें मीं पुण्यास महिनाभर ऐकलीं आहेत. यांची आर्या लावण्याची पद्धत फार नामी आहे. यांनीं एका आर्येचा कसा उत्तम अर्थ लावून दिला हें पुढें ( पृ. ३९४-५ ) सांगितलेंच आहे. खुद्द पंतांच्या घरांत पंतांचा पुत्र रामकृष्णपंत व नातु काशिनाथ बावा हे चांगले व्युत्पन्न आर्यापंडित होऊन गेले. पंतांचा पुतण्या बाळाजीपंत व नातसून सरस्वतीबाई ह्या आर्या फार उत्तम लावीत, पंतांच्या नातवाचे नातु बळवंतराव उर्फ मोरोपंत ( मयत शके १८२१ ) यांजपर्यंत पंतांच्या आर्या लावण्याची जुनी पद्धत माहीत होती. आतां लोकांत भगवद्भक्तिरसज्ञता

कमी झाल्यामुळें जुन्या परंपरेचे हरिदास दिसत नाहींत व पंतांच्या घरांतही तें जुनें वळण राहिलें नाहीं, तथापि १००।१२५ वर्षें हरिदासांनीं पंतांच्या आर्येचा जयजयकार मोठ्या उल्हासानें केला याबद्दल ते महाराष्ट्राच्या चिरस्तुतीस पात्र आहेत. वारकरी संप्रदायांतले निरूपणी हरिदास वगळले तर सामान्यतः असें ह्मणतां येईल की, पंतांच्या आर्येवांचून कीर्तन रंगालाच येत नाहीं. उपरिनिर्दिष्ट हरिदासांचे व एकंदर हरिदासमंडळाचे पुन्हां आभार मानून मी त्यांची रजा घेतों.

३ आतां आर्यावृत्तांत काव्यें करणारे पंतांचे जे अनुयायी झाले त्यांजकडे वळूं.

**चिंतामणि जोशीः**—या कवीनें आपल्या बाळपणीं वृद्धावस्थेंत आलेल्या पंतांस पाहिलें होतें. याची प्रसिद्धि ' सूर्यवंशीं उत्तानपाद राजा ' चें लेंकरूं जें ध्रुव त्याचें चरित्र यानें दिंडीवृत्तांत गाइलें आहे ह्मणून विशेष आहे. हें गाणें बायकांच्या ह्मणण्यांत आहे. चिंतामणीनें पंतांचें आर्यावृत्तांत अनुकरण करून सीतास्वयंवर, व गोपिचंदाख्यान हीं आख्यानें रचिलीं आहेत. हा कवि चांगला रसिक होता. गोपिचंदाख्यानांत यानें पंतांविषयीं आपला पूज्यभाव प्रकट केला आहेः—

**भावें ध्यातों प्राकृतकाव्याचार्या मयूरकविराया ।**
**अप्रतिभा जेंवि घना निजतापततीं मयूरक विराया ॥ १ ॥**
**' श्रुतिसम मत्कृति भारत न कळे अज्ञान-गर्तं नव्यास '।**
**यास्तव मयूरकपटें अवतरला भुवि सुकीर्तनव्यास ॥ २ ॥**
**प्रस्यार्येस रस नघा आणी घटनाहि करुनि चमकाची ।**
**मणिची तसि त्या कविची सरि इतरीं नाहिं करु नियम काचीं ३**

या कवीच्या गणपतिस्तवमावर ११०० आर्या के० बापूसाहेब कुरुंदवाडकरांजवळ होत्या, पण त्या अद्याप प्रसिद्ध झाल्या नाहींत. व मला मिळाल्याही नाहींत.

**धुंडिराज** व त्याचा पुत्र **मोरेश्वर** हे उभयतां पंतांच्या आर्येचे मोठे भोक्ते होते. मोरेश्वरकवीचा काव्यसंग्रह पुणेंप्रांतीं आहे, पण तो अद्याप हस्तगत

---

१ जेंवि अप्रतिभा ( आच्छादिली आहे सूर्यप्रभा ज्यानें ) अशा घना ( मेघास ) मयूरक ( मोर ) निजतापततीं ( आपली दुःखपरंपरा ) विराया ( नष्ट होण्यासाठीं ) ध्यातो. २ अज्ञानाचे खंदक असे जे अर्वाचीन लोक. ३ जशी मणिची सरी ( बरोबरी ) काचीं न, तशी पंतांची इतरीं न.

झाला नाहीं. धुंडिराजानें ' प्रल्हादचरित्र ' ( आर्या ५३ ) व मोरेश्वरानें चंद्रावळिआख्यान ( आर्या १०१ ) रचिलें आहे. धुंडिराजाचें प्रल्हादचरित्र पंतांच्या तोलाचेंच आहे. हें काव्य पंतांच्या नांवावर छापतें तर त्यांनाही भूषणदायक झालें असतें, पण इतक्या सुंदर काव्याचें व त्यांतल्या सर्वतोमुखी झालेल्या दोन अप्रातिम आर्यांचें जनकत्व पंतांकडे नसून एका अप्रसिद्ध लघुकविकडे जात आहे ! सामान्य कवींच्या सामान्य काव्यांतही एखादें पद्य असें बहारीचें येऊन जातें कीं तसलें एकच पद्य त्या कवीची कीर्ति अजरामर करण्यास पुरेसें होतें. गिरिधर कवीची कोणासही माहिती नाहीं व त्याचीं पांच पन्नास पदें छापलीं आहेत तींहि चटकदार नाहींत, तथापि ' भक्तीं आकळिला, दयाघन भक्तीं आकळिला ' हें अत्यंत लोकप्रिय पद एका शुभक्षणीं त्या कवीच्या मुखांतून चटकन बाहेर पडून गेलें ! रामबडवे हा ' सुश्लोक वामनाचा ' या सर्वमान्य आर्येचा कर्ता आहे ! ' श्रीएकनाथसदनीं माधवजी सर्व काम हें करितो ' ह्या आबालवृद्धांच्या मुखीं झालेल्या आर्येचा उत्पादक पंतांचा पुतण्या बाळाजीपंत हा आहे ! तर या न्यायानें आर्यारत्नहारांतील दोन उंची मौक्तिकें धुंडिराजाच्या मुखशुक्तिकेंतून जगास मिळालीं आहेत याबद्दल फारसा विस्मय बाळगायला नको आहे. असो, प्रल्हादाचा छळ कसा याबद्दल धुंडिराज ह्मणतो:--

**केलें कूपनिपातन, कंटकभूमीवरून लोळविला, ।**
**परि तो स्वस्थ असे हें पाहुनि वैश्वानरांत घोळविला ॥ १ ॥**
**न मरे यास्तव नेला पर्वतशिखरासि लोटिला खोलीं ।**
**तरि तो निर्भयचित्तें वाहे नारायणासि लाखोली ! ॥ २ ॥**

हिरण्यकशिपूनें प्रल्हादाला ' तुझा देव कोठें आहे ? ' ह्मणून विचारलें तेव्हां तो ह्मणाला:--

**भूजलतेजसमीरख-रविशशिकाष्ठादिकीं असे भरला ।**
**स्थिरचर व्यापुनि अवघा तो परमात्मा दशांगुळें उरला ॥ ३ ॥**

१ ' न मरे यास्तव नेला, ' व ' भूजलतेजसमीरख ' ह्या दोन लोकप्रसिद्ध आर्यांचें जनकत्व ' धुंडिराजाकडे आहे. ह्या चांगल्या आर्या पंतांच्या नांवावर खपत आहेत! आर्या दिसली कीं, पंतांच्या नांवावर दडपून द्यावी असा पंतांच्या लौकिकामुळें किलेकांचा स्वभाव पडून गेला आहे. वरीलसारख्या उत्तम आर्या जशा पंतांच्या गळ्यांत उगीच बांधण्यांत आल्या आहेत, त्याप्रमाणें ' महारिण घरांत शिरतां महारिण

यानंतरचा प्रकार सर्वश्रुतच आहे:—

**कडकड शब्द उडाला, गडगड गगनांत खांब जो चिरला।**
**प्रकटे सिंहनराकृति देव तदा तो विलोकुनी विरला ॥ ४ ॥**
**काढी अंतरमाळा काळिज फोडूनि शोधिला काय।**
**कीं या पोटीं दुसरा भक्तसुमणि गुप्त राहिला काय ! ! ॥ ५ ॥**

शेवटच्या आर्येतील उत्प्रेक्षा तर अत्युत्कृष्ट आहे. मोरेश्वराचें चंद्रावळिआख्यान साधारणांतलें आहे. चिंतामणि व धुंडिराज यांचा समकालीन **विठ्ठल केरीकर** यानें शुकरंभासंवाद, कबीरकथा व वामनचरित्र या तीन प्रकरणांवर दोनशें आर्या रचिल्या आहेत. पंतांचीं ठरीव यमकें, पंतांची काव्यरचनेची घाटणी व त्यांची भाषाप्रौढी हे गुण ह्या रसिकाच्या काव्यांत दृष्टोत्पत्तीस येतात. पंतांच्या आर्या गोवेंप्रांतापर्यंत जाऊन पोंचल्याचें हें एक प्रमाण होय. हा कवि गोव्याकडील रहिवासी असून सारस्वत होता. याची आर्या पंतांच्या आर्येची बरोबरी करिते. वामनाचा बलीच्या राजदरबारीं प्रवेश झाला तेव्हां:—

**नयनीं फुटल्या रसना, त्यांतें गमला सुधासुरसभेला !**
**तो ब्रह्मवर्चसें बटु रुचला राया ! बुधा ! सुरसभेला ॥ १ ॥**
**दंडकमंडलु हातीं, मौंजी मध्यासि शोभली बरवी।**
**सर्वांसि जो स्वतेजें प्रत्युत्थानादि तत्क्षणीं करवी ॥ २ ॥**

या प्रसंगाच्या पंतांच्या दोन आर्या ( पृ० ३९९ पहा ) यांच्यांशीं ताडून पाहिल्या ह्मणजे शिष्यानें गुरूचें अनुकरण कसें बरोबर चालविलें होतें तें समजतें. पंतांच्या आर्यांनीं गोवें प्रांतावरही मोहिम केलेली यावरून दिसते.

रत्नागिरी जिल्ह्यांत **परशुराम बच्याजी ढवळे** नामक एक दत्तोपासक होते. त्यांनीं गुरुचरित्रावर सुमारें चार हजार आर्या लिहून तो ग्रंथ आपल्या मुलाबरोबर नरसोबाच्या वाडीस पाठविला. तो ग्रंथ अद्याप तेथेंच आहे. हा अलीकडे काव्यसंग्रहांत छापला आहे. हा ग्रंथ त्यानें पंतांच्या अनुकरणेच्छेनें प्रेरित

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

महारासमोर महाराच्या' असल्या कित्येक दरिद्री आर्याही पंतांच्या नांवावर विकत असतात! पुढीलसारख्या सदोष पण कांहींशा सरस आर्याही पंतांच्या नांवावर मोडल्या जातात:—

**श्रीहरिकीर्ति-अनादर करितो, धरितो मनांत पंचदशी।**
**त्याच्या ज्ञानाग्नीनें न जळे एकहि पटप्रपंचदशी! ॥ १ ॥**
**यतिनें न वागवावा स्वल्पहि चित्तांत मोड कामाचा।**
**सुरतीं घातक जैसा युवदंपत्यांस मोडका माचा ॥ २ ॥**

होऊनच लिहिला आहे. पंतांची कविता वाचतां वाचतां आर्यावृत्तांत श्रीगुरुचरित्र लिहावें अशी त्यास स्फूर्ति झाली, किंबहुना पंतांची अखेरची इच्छा श्रीगुरुचरित्र लिहिण्याची होती, पण आयुर्दाय संपल्यामुळें ती अपूर्ण राहिली ह्मणून श्रीदत्तात्रेंने मी प्रस्तुत ग्रंथ लिहिला असेंच त्यानें ह्मटलें आहे. श्रीगुरूनें त्यास स्वप्नदृष्टांत दिला कीं:—

**" भारत भागवतादि श्रीरामायण अनेक आर्यांनीं ।**
**मोरेश्वरकवि वदला, पहावया योग्य सर्व आर्यांनीं ॥ १ ॥**
**मच्चरितासि वदावें तों आयुर्दाय पूर्ण तो सरला ।**
**आर्या कवितासरितापूर पुढें मग तसाचि वोसरला ! ॥ २ ॥**
**तरि आर्याघन वर्षुनि भरि तूं रे मच्चरित्र-गंगाला ।**
**देइल वहावुनियां श्रुतिमात्रें सर्व अघतरंगाला ॥ ३ ॥ "**

परशुराम कवीनें प्रसाद बराच साधला आहे, तरी याच्या आर्यांत अशुद्धें बरींच आहेत. हा कवि व्युत्पन्न नव्हता, पण भाविक होता. पिंगलाचार्यानें अनेक वृत्तें प्रकट केलीं, पण कवि ह्मणतो. " परि आर्यारस जो कां तोष बहुत फार मानसा देतो. " प्रस्तुत ग्रंथ शके १७८१ मध्यें नरसोबाच्या वाडीस येऊन दाखल झाला तेव्हां तत्पूर्वी केव्हांतरी लिहिला गेला असावा! शके १७९५ मध्यें नाशीकचे पंतभक्त प्रसिद्ध **गणेशशास्त्री लेले** यांनीं 'श्रीशिवाजीचरित्र ' नामक एक काव्य केलें त्यांत ते ह्मणतात:—

**जे श्रीभारतपंचलक्षणमहाकाव्यग्रहीं चांगले**
**व्यासानंतर सत्प्रमेयरचनाचातुर्य ज्यां लाभलें ।**
**ज्यांनीं देशगिरेंत ईश्वरकथा केल्या महत्संगमीं**
**ते मुक्तेशमयूरवामन कवी त्यांच्या पदाब्जां नमीं ॥ १ ॥**

गणेशशास्त्री पंतकवितेला फार प्रिय मानीत. लेले शास्त्र्यांनीं मालेच्या ७० व्या अंकांत ह्मटलें कीं, 'मोरोपंत मोठे मार्मिक, अत्यंत रसिक आणि संस्कृत भाषेंत गाढ व्युत्पन्न असून छंद व व्याकरण यांच्या नियमास बिनचूक धरून चालणारे होते. " शास्त्रीबोवांनीं रघुवंशावरही आर्या केल्या आहेत. यांचे चिरंजीव **लक्ष्मणशास्त्री लेले** हेही रसिक कवि आहेत व त्यांचीं पंतांच्या कवितेविषयीं मोठी आवड आहे. शके १७९८ सालीं बुंदेलखंडांत झांशी प्रांतांत गुलसराई या गांवीं गंगाधर नारायण **खानवलकर** यांनीं आर्यावृत्तांत २५ अध्यायांचें ' रामदासचरित्र ' वर्णिलें त्यांतील आहे. आर्या साधारणच आहेत. याची लेखी प्रत मीं पाहिली आहे. खानवलकर ह्मणतात:—

**बारामतीनिवासी मोरोपंत प्रसिद्ध ! आर्यांला ।**
**निर्मुनि यश मेळविलें, नमितों भावें तयाहि आर्यांला ॥ १ ॥**

या ग्रंथांतील आर्या साधारणच आहेत, पण लेखक भाविक आहे. **श्रीमंत बापूसाहेब कुरुंदवाडकर** हे फार व्युत्पन्न रसिक होते. पंतांच्या कवितेवर यांची मोठी भक्ति होती. यांनीं शके १७९९ मध्यें गणेशपुराणार्या म्हणून ११०० आर्यांचा सुरस ग्रंथ लिहिला आहे त्याच्या उपसंहारांत ते म्हणतात:–

**केविं नवा कवि आर्यापद्धति पंता न जे मयूराला ! ।**
**दाविल गायक कैसा ठावी नच तान जे मयूराला ? ॥ १ ॥**
**पंतोच्छिष्टचि सारें उपमा यमकें सुवेष सुरसत्व ! ।**
**लिहिलें ग्रंथीं परि म्यां स्तविला श्रीमद्गणेश सुरसत्व ॥ २ ॥**

सरदारमंडळांत जन्मून विद्वन्मंडळांत शोभण्यासारखा बापूसाहेबांसारखा दुसरा कोणी श्रीमंत कवि मराठींत आढळत नाहीं. पंतांच्याच तोलाचे पंडित, रसिक व रामभक्त सुप्रसिद्ध **विठोबा अण्णा कऱ्हाडकर** दप्तरदार (शके १७३५–१७९५) यांची माहिती कोणास नाहीं असें नाहीं. 'उत्तम जन्मा येउनि रामा गेलों मीं वायां,' 'हरि हा आनंदाचा कंद' इत्यादि उत्कृष्ट पदांवरून व 'सुश्लोकलाघवादि' सुश्लिष्ट पद्यरचनेवरून यांची महाराष्ट्रास चांगली ओळख आहे. पंतांची कविता हे मिटक्या देऊन वाचीत असत. ते म्हणतात:-

**आर्याछंदें जोडुनि रामायणभारतादि आयकवी ।**
**नायकवीर कवींचा ऐसा होईल अन्य काय कवी ? ॥ १ ॥**
**आर्यार्पितमहानंदः सर्वलोककृतादरः ।**
**विराजते मयूरेशः कलाधरशिरोमणिः ॥ २ ॥**
**अतिचित्रकलापाढ्यः सदारामपरस्थितिः ।**
**कारिकाजनिकानंदो मयूरेशो विराजते ॥ ३ ॥**
**इह मुख्यकलोपेतः को भवेत्कविनायकः ।**
**इति मीमांस्यमाने तु मयूरेशः स्मरत्यलम् ॥ ४ ॥**

पंततुल्य योग्यतेच्या सद्रसिक कवीचा हा अभिप्राय बहुमोलाचा आहे. **केकावलीच्या धर्तीवर गोविंदराव कानिटकर** यांनीं पृथ्वीवृत्तांतल्या १२१ श्लोकांवर नवीन विचार ग्रथित करून 'संमोहलहरी' नामक एक मनोहर काव्य केलें आहे. त्यांत पंतांच्या 'भक्तिरसप्रचुर शुचिप्रतिभायुक्त प्रासादिक काव्यांपासून आपणास स्फूर्ति झाल्याचें' जाहीर करून कानिटकर म्हणतात:–

**भवाब्धितुनि पार जो परमभक्त झाला कवि ।**

**मनोज्ञकवितासुता तुज समर्पुनी तोषवी ।**
**मयूरसम माझिया गृहिं न जन्मली बालिका**
**तुझें हृदय न द्रवे ह्मणूनि कीं जगन्नायका ! ॥ १०७ ॥**

४ मोरोपंतांचे ग्रामस्थ व समकालीन श्रीसिद्धनाथ रामदासी या नांवाचे एक सत्पुरुष होते. यांचा जन्म शके १६८७ मध्यें झाला. हे बारामतीस जन्मापासून होते. पंतांच्या प्रयाणसमयीं यांचें वय अवघें ३० वर्षांचें होतें. यांचा शिष्य **राजाराम प्रासादी** यानें शके १७९६ मध्यें भक्तमंजरीमाला नांवाचा महिपतीच्या धर्तीवर १०९ अध्यायांचा एक १३००० ओव्यांचा विस्तृत ग्रंथ रचिला. महिपतीनंतरच्या शंभर वर्षांत महाराष्ट्रांत जे कवि व संत झाले त्यांचीं चरित्रें यांत दिलीं असल्यामुळें पंतांचे समकालीन साधु व कवि यांची बरीच माहिती या ग्रंथांत सांपडते. हा ग्रंथ मला धुळ्याचे मित्र रा० शंकरराव देव यांच्या घरीं पाहण्यास मिळाला. यांत पंतांचे मित्र बाबा पाध्ये, विठोबादादा चातुर्मासे यांचीं चरित्रें असून खुद्द पंतचरित्रावर ८३ व्या अध्यायांत ८६ यांच्या ओव्या दिल्या आहेत ! मालाकारांपूर्वी महाराष्ट्राचें पंतांबद्दल काय मत होतें तें या प्रकरणावरून चांगलें समजतें. 'श्रीगुरु मोरोपंडित । गणपतीचा अवतार सत्य ' असेंच लोकमत पहिल्यापासून आहे. भक्तमंजरीमाला हा ग्रंथ बारामतीस पंतांच्या मृत्यूनंतर ४० वर्षांनीं पंतांच्या सहवासांत कांहीं वर्षे तरी घालविलेल्या सिद्धनाथांच्या समोर, त्यांच्याच माहितीवरून, राजाराम प्रासादी यानें रचिला असल्यामुळें या ग्रंथांत प्रकट झालेला अभिप्राय पंतांच्या वेळेपासून इंग्रजीसंसर्गाची मंडळी उत्पन्न होण्याच्या पूर्वीच्या जुन्या परंपरेंतला आहे हें उघडच होतें. सिद्धनाथांच्या बाळपणीं पंतांचें व त्यांचे साक्षात्संघट्टण पुष्कळ होतें. ' भूअंतर्गत बैसती विवरीं । संगती बरी परस्परें ' असें राजाराम प्रासादी ह्मणतात. हा पंतांवरचा अध्याय रजारामप्रासादीनें लिहिला तेव्हां सिद्धनाथ जवळच बसले होते. किंबहुना सिद्धनाथांचेंच हृद्गत राजाराम-प्रासादींच्या मुखानें प्रकट झालें आहे. भक्तमंजरीमालाकार ह्मणतातः—

**श्रीगणपतीचा जो कां अंश । आर्याछंद कवनविशेष ।**
**करूनि तारिलें दीनजनांस । बोध चंडांशु प्रकटला ॥ १ ॥**
**भारत भागवत रामायण । व्यासकूटें सकळ शोधून ।**
**आर्यासेतु बांधून । जीव तारणें भवाब्धीवरी ॥ २ ॥**
**मग तेथें काय उशीर । सरस्वती बैसली जिव्हेवर ।**
**आर्या केल्या अपार । ग्रंथ समग्र धुंडाळिले ॥ ३ ॥**

**सन्माळे'च्या करितां जार्या । प्रेम दाटलें पंढरिराया ।**
**प्रसन्न झाले भक्तराया । कवळिती काया पंतांची ॥ ४ ॥**
**आर्याछंद देखून । व्यासादिक तुकिती मान ।**
**मग इतराचा पाड कवण । वंद्य पूर्ण जगद्वंद्या ॥ ५ ॥**
**केकावली पदें अभंग । श्रवण केलिया श्रीपांडुरंग ।**
**करुणारस तेथें चांग । पाहिला आंगें सनकादिकें ॥ ६ ॥**
**पंडित आणि भजनशीळ । काव्यकर्ता संत निर्मळ ।**
**विद्वज्जनांचे अर्थ सकळ । पूर्वी प्रांजळ साधु तो ॥ ७ ॥**

५ मोरोपंत वैकुंठवासी झाल्यावर पांचच वर्षांनीं महाराष्ट्रभाषेचा एक महापंडित जन्मास आला. **परशुरामपंत तात्या गोडबोले** ( शके १७२१–शके १७९६ ) हे रसिक तात्या या नांवानें प्रसिद्ध आहेत. तात्यांना मोरोपंतादि मराठी कवींचे ग्रंथ वाचण्याची गोडी त्यांचे वडील बंधु दाजीबा यांजपासून लागली. तात्यांनीं अव्वल इंग्रजींत मराठीचा पुरस्कार केल्यामुळें मराठी भाषा वाढीस लागली. ' तात्यांनीं मराठी कवितेचाच जन्मभर व्यासंग केला होता व यांनीं तिच्याप्रीत्यर्थ जे श्रम केले ते जर केले नसते, तर मराठी कवितेचें ज्ञान आमच्या लोकांस आज कितपत असतें याची शंका आहे ' असें निबंधमालाकारांनीं ( अंक ९ ) ह्मटलें आहे. मराठी कविता वाचणें, ऐकणें, लिहिणें, लोकांस सांगणें, व छापणें हाच तात्यांचा नित्यक्रम होता. तात्यांनीं ' वृत्तदर्पणा ' च्या योगानें वृत्तांची माहिती मराठी वाचकांस करून दिली, व शाकुंतल, मृच्छकटिक, वेणीसंहार, उत्तररामचरित, नागानंद व पार्वतीपरिणय ह्या संस्कृत नाटकांचीं अति सुबोध, सरळ व शुद्ध मराठी भाषेंत भाषांतरें करून संस्कृत नाटकांची मराठी वाचकांस गोडी लावून दिली. हीं नाटकें गेल्या पंचवीस वर्षांत संगीत नाटकांनीं जरी मागें पाडलीं आहेत तरी रसिकतेच्या व भाषासौष्ठवाच्या दृष्टीनें अर्वाचीन नाटकें तात्यांच्या ग्रंथांची तादृश बरोबरी करूं शकणार नाहींत. छापण्याची कला नुक्तीच उदय पावत होती तोंच रसिक तात्यांनीं महाराष्ट्रकाव्यार्णवाचें आलोडन करून त्यांतून सुरस पद्यरत्नें मार्मिकपणानें वेंचून काढलीं व तीं नवनीतरूपानें शके १७७६ (इ. स. १८५४) सालीं महाराष्ट्रवाचकांपुढें ठेवलीं. तात्यांच्या जिवंतपणींच नवनीताच्या आठ आवृत्त्या निघाल्या. नवनीतानें सामान्य वाचकांस मराठी काव्याची गोडी लावली. नवनीतांत पंतांच्या काव्यांतील उतारेच अधिक आहेत. तात्यांची पंतांच्या कवितेवर अत्यंत भक्ति होती व

कृष्णशास्त्री चिपळोणकरांसारख्यांच्याही शंकेचें निरसन त्यांच्या घरीं होत असे. अर्वाचीन विद्वान् पंतांच्या कवितेला नांवें ठेवीत, पण तात्यांना त्याबद्दल फार विषाद वाटून त्यांचा रागही येई. ' प्राकृत कवितेंत मोरोपंताच्या कवितेसारखी कविता नाहीं' असें तात्यांनीं नवनीतांत लिहिलें आहे. 'रात्रींतून, दिवसांतून जो वेळ रिकामा सांपडे तो बहुधा मोरोपंतांचें काव्य वाचण्यांतच वरील पंडिताचा जात असे असें सांगतात ' ( निबंधमाला अंक ५८ ). पंतांची कविता छापून काढण्याचा विचार मुंबईचे माधव चंद्रोबा डुकले यांनीं तात्यांच्या साह्यानें ठरविला व शके १७८४ मध्यें ' सर्वसंग्रह ' नामक मासिक पुस्तक सुरू केलें. ह्या मासिकास प्रथम कांहीं वर्षें सरकारचा आश्रय होता, पण तो तुटल्यावर मासिक बंद झालें! माधव चंद्रोबाचें ह्या कामीं फार नुकसान झालें तथापि पंतांची बहुतेक कविता प्रथम छापून प्रसिद्ध करण्याचें श्रेय माधव चंद्रोबा व रसिक तात्या यांसच दिलें पाहिजे. शके १७६९ सालीं मद्रासचे कावेल्ली रामस्वामी यांनीं संस्कृत, तेलंगी, द्राविड व प्राकृत कवींच्या चरित्रांवर एक इंग्रजींत ग्रंथ लिहिला, तो पाहून जनार्दन रामचंद्रजी यांनीं मराठी कवि त्यांत घालून ' कविचरित्र ' नामक मराठी ग्रंथ शके १७८२ मध्यें लिहिला. त्यांत मोरोपंतांवर दोन पानें मजकूर आहे. त्यांत लिहिलें आहे कीं " पूर्वी अशी चाल होती कीं कारकून असला तरी त्यानें काव्याभ्यास करून भागवत लागे इतकी व्युत्पत्ति शिकावी; या सांप्रदायाप्रमाणें मोरोपंतानें काव्यें, नाटकें, व पुराणें इत्यादि संपादिलीं होतीं. मोरोपंताची कविता पुष्कळ असून त्याची वाणी शुद्ध, प्रौढ, सरळ आणि स्थळविशेषीं फारच रसाळ आहे. " सर्वसंग्रह मासिकाचा उदय होतांच पंतांच्या कवितेकडे पुष्कळांचें लक्ष वेधलें. शके १७८५ सालीं गीर्वाणभाषापंडित, शोधक व ' वेदार्थयत्नकर्ते रा. ब. शंकर पांडुरंग पंडित यांनीं पंतांचा अत्यंत क्लिष्ट ग्रंथ कृष्णाविजय ' टीकाचिन्हांकादिकांनीं सुबोध करून ' प्रसिद्ध केला. या नंतर दोनच वर्षांनीं ह्म० शके १७८७ सालीं रा. ब. दादोबा पांडुरंग यांनीं केकावलीवर ' यशोदा पांडुरंगी' नांवाची विस्तृत व सरस टीका करून ती छापली. ह्या ग्रंथानें बरेंच काम केलें. ज्ञानप्रसारक, इंदुप्रकाश इत्यादिकांनीं 'यशोदा पांडुरंगी'वर 'कुलपी गोळ्यांचा भडिमार करून तिच्या कर्त्याच्या पदरांत प्रमादबाहुल्याचें

---

१ गीता व पंचदशी यावर उत्तम पदें करणारे बाबा गर्दे यांचे चुलते जगोपंत हे जबरे आर्यापंडित होते; त्यांजपाशीं पंडित शिकले.

गाठोडें बांधलें.' 'यशोदा पांडुरंगी'टीकेंत पुष्कळ दोष आहेत, अर्थाची ओढाताण केली आहे, तथापि ह्या ग्रंथानें तेव्हां मोठी चळवळ उडवून दिली. पंतांच्या अत्युत्कृष्ट काव्यांकडे ह्या ग्रंथामुळें महाराष्ट्रवाचकांचें लक्ष वेधलें. मालाकारांना पंतांच्या कवितेची गोडी यशोदा पांडुरंगीनेंच लाविली. मालाकारांनीं ५२ व्या अंकांत स्पष्ट कबूल केलें आहे कीं 'रावबहादुरांच्या आवृत्तींत पुष्कळ प्रमाद आहेत हें खरें, तथापि त्यांच्या सारख्या विख्यात विद्वानानें आमच्या कवीच्या अत्यंत रमणीय कृतीचा पुरस्कार करून 'यशोदा पांडुरंगी' सारख्या महाराष्ट्टीकेचा अपूर्व प्रकार प्रथम सुरू केला याबद्दल सर्व रसिकांनीं व महाराष्ट्र भाषेच्या हितचिंतकांनीं त्यांचे आभार मानणें अवश्य होय; वरील टीकेचें नांव आह्मांस तर अत्यंत प्रिय आहे. आमच्या वाचकांस येथें सांगण्यास फारशी हरकत दिसत नाहीं कीं मयूरकवीचा अपूर्व टाहो आमच्या कानीं समग्र पडण्यास सदरील टीकाग्रंथच कारण झाला; आणि तेव्हांपासून आमचें प्रेम पंतांच्या कवितेवर जें स्थिरता पावलें तें उत्तरोत्तर तेथेंच दृढतर होत गेलें.'' दादोबा पांडुरंगांची टीका प्रसिद्ध झाल्यावर जी अनुकूळ प्रतिकूळ टीका सुरू झाली त्यांत परशुरामपंत तात्या पडले नाहींत; त्यांचा स्वभाव सरळ व प्रेमळ होता. यशोदा पांडुरंगी व तिच्यावर झालेली चर्चा पाहून तात्यांनीं वादविवादाच्या भानगडींत न पडतां आपला सरळ 'केकादर्श' प्रसिद्ध केला!

६ तात्यांच्या केकादर्शावर अभिप्राय देतांना शके १७८९ मध्यें **माधवराव रानडे** यांनीं केकावलीला 'कृत्रिम' काव्यांत ढकलून 'खऱ्या भगवद्भक्तीचा विध्वंसक असा जो अद्वैतपंथ' त्याचें अनुकरण करून पंतांनीं देवाशीं फाजील सलगी केली व बहुतेक एतद्देशीय कवींप्रमाणें अनेकार्थसंभवत्व हा गुण मानून तो साधण्यासाठीं खटाटोप केला अशा प्रकारचे आरोप पंतांवर लादले! न्या. रानड्यांनीं आमच्या कविनायकाच्या ह्या अत्युत्कृष्ट काव्यरूप स्तोत्राकडे प्रार्थनासमाजाच्या चष्म्यानें पाहिल्यामुळें त्यांना मूर्तिपूजक, सगुणोपासक व अद्वैतमतानुयायी अशा सत्कवीच्या ह्या कृतीचा आस्वाद यथायोग्य घेतां आला नाहीं. न्या. रानड्यांच्या अभिप्रायाचा पाठिंबा मिळाल्यामुळें कीं काय कोण जाणें, पंतदूषकांना मोठें स्फुरण चढलें व सर्वांनीं मिळून पंतांच्या कीर्तिमंदिराचा विध्वंस करण्यास प्रारंभ केला! शके १७९० मध्यें जन्मास आलेल्या 'विविधज्ञानविस्तारा'मध्यें पहिल्याच वर्षाच्या चवथ्या

व पांचव्या अंकांत पंतांच्या कवितेवर चारपांच भयंकर आक्षेप आणले गेले. " त्यानें जी कविता केली ती सर्व स्वतःचे कीर्तीसाठी केली, परमेश्वराचें गुणवर्णन करण्यासाठीं रचली नाहीं......त्यानें बाबूजी नायकावर ३१४ च आर्या केल्या त्या तर कोणीही साधारण मनुष्य देखील करूं शकला असता, याचें कारण पंतांच्या हृदयांत कृतज्ञता देखील फारच थोडी होती......त्याला रसिक देखील ह्मणवत नाहीं. कांहीं तरी लिहावें, मात्रा आणि यमक साधलें ह्मणजे झालें, किंबहुना मात्रा, यमक, अपरिचित शब्द यांतच काय तो रस असें त्याला वाटत असे......त्याच्या सारख्या गर्वोक्ति दुसऱ्या कोणत्याही कवीच्या तोंडून निघाल्या नसतील......" वर निघालेल्या मतांचें प्राबल्य फार माजत चाललें. कृत्रिम काव्यें रचून पंतांनीं आपल्या बुद्धीचा व आयुष्याचा अपव्यय केला असा डा० विल्सन यांनीं शेरा ठोकून दिला ! कृष्णशास्त्री चिपळोणकर मोठे विद्वान्, रसिक व स्वतः कवि खरे, पण पंतांच्या कवितेची गोष्ट निघाली कीं नाक मुरडून बिचाऱ्या कवीला त्यांनीं ४१२ शिव्या हांसडाव्यात ( निबंधमाला अं. ७२ ) परशुराम-पंत व कृष्णशास्त्री सारखे पंडित, पण एकाला पंतांच्या कांहीं तरी आर्या प्रत्यहीं वाचल्याशिवाय चैन पडूं नये, व दुसऱ्याला पंतांचें नांव निघालें कीं अवाच्य शिव्या देण्याची बुद्धि व्हावी हा योगायोगच ह्मणायचा! पंतांनीं केवळ संस्कृत ग्रंथांचीं भाषांतरें केलीं, त्यांच्या काव्यांत स्वतंत्रता कांहीं नाहीं; यमकानुप्रासमय व संस्कृतशब्दप्रचुर कृत्रिम काव्यें रचून त्यांनीं लोकाभिरुचीला वाईट वळण लावलें; ईश्वरभक्ति, कृतज्ञता, रसिकता, वगैरे गुण अल्पांशानें सुद्धां त्यांच्या ठिकाणीं नव्हते; वगैरे आक्षेप पंतांच्या कवितेवर होऊन त्यांच्या सत्कीर्तिरवीस खग्रास ग्रहण लागण्याचा सुमारास दिसूं

---

१ मालाकारांनीं पंतदूषकांना यथास्थित लोळविले, पण त्यांत त्यांचे दोस्त माधवराव कुंटे कसे सुटले कोण जाणें ! कुंटे हे जाडे विद्वान्, उत्तम लेखक व वक्ते होते. पंतदूषकांच्या काव्यविषयक नवीन विचारांना दृश्य स्वरूप देण्याकरितां व पंतपंडितांहून निराळ्या प्रकारची कवितां रचून दाखविण्याकरितां त्यांनीं शके १७९१ सालीं 'राजा शिवाजी ' हें 'महाकाव्य' रचण्यास सुरुवात केली! ह्या मराठी काव्याला ह्या हठकवीनें २८ पृष्ठांची इंग्रजी प्रस्तावना जोडून तिच्यांत पंतपंडितांना Degenerate Marathi Poets अशी शिवी हांसडून त्यांजवर व मराठी भाषेचा ऱ्हास करणाऱ्या ह्या कवींचें प्रस्थ माजविणारांवर पुष्कळच तोंडसुख घेतलें आहे!! पंतपंडितांचा सूड घेण्याकरितां आपल्या 'महाकाव्यांत गीर्वाण शब्दांचा प्रवेश होऊं न देण्याची व

लागला. ह्याप्रमाणें शके १७८४-९१ ह्या सात वर्षांत पंतांच्या कवितेकडे अनुकूळप्रतिकूळ बुद्धीनें पाहणाऱ्यांच्या चळवळींमुळें पंतांची कविता लोकांच्या पुढें ज्यास्तच आली. शके १७८४ मध्यें सर्वसंग्रहांत पंतांची कविता छापून प्रसिद्ध होऊं लागली, ८५ सालीं पंडितांचा 'कृष्णविजय' प्रसिद्ध झाला, ८७ सालीं यशोदापांडुरंगी छापून निघाली, ८८ सालीं तात्यांचा केकादर्श प्रकट झाला, ८९ सालीं न्या. रानड्यांची व ९० मध्यें विविधज्ञानविस्ताराची प्रतिकूळ टीका बाहेर आली व ९१ सालीं कुंट्यांचें राजा शिवाजी 'महाकाव्य' निर्माण झालें! ही सर्व धामधूम सात वर्षांत झाली. रसिक तात्या, पंडित व दादोबा पांडुरंग यांनीं पंतांच्या कवितेची सप्रेम सेवा केली व न्या. रानडे, विस्तारकर्ते, कृष्णशास्त्री, डा. विलसन, कुंटे वगैरेंनीं तिचा बराच छळ केला. मयूरकवितावधूची ही अवस्था पाहून

**आर्येला मानियले बहु पाहुनि सज्जनीं चमत्कृतिला।**
**खळचि न मानिति तैसे बहु दूषणसज्ज नीच मत्कृतिला ॥ १ ॥**

ह्या पंतांच्या उक्तीचें सज्जनांस स्मरण झाल्याशिवाय राहिलें नाहीं.

७ पंतदूषकांचा यथेच्छ समाचार घेण्यास परमेश्वरी योजनेनें एका बड्या दूषकाच्याच पोटीं एक बालक जन्मास आलें होतें! महाराष्ट्रभाषेचे कैवारी व परमदेशभक्त विष्णु कृष्ण चिपळोणकर ( शके १७७२-१८०४ ) यांचें वय दादोबा पांडुरंगांचा टीकाग्रंथ प्रसिद्ध झाला तेव्हां अवघें १५ वर्षांचें होतें. सर्वसंग्रहांत प्रसिद्ध झालेली पंतांची कविता व पंतकवितेवरचे अनुकूळ व प्रतिकूळ लेख वाचून शास्त्रीबोवांनीं वादविवादाच्या आखाड्यांत उडी घातली. शास्त्रीबोवांच्या ग्रंथकर्तृत्वाचें अत्यंत मधुर फळ म्हणजे निबंधमालेंतला 'मोरोपंतांची कविता' हा निबंध शके १७९९-

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

तीं शूद्रातिशूद्रांना कळेल इतकी सोपी' करण्याची कुंट्यांनीं प्रतिज्ञा केली व त्याप्रमाणें त्यांनीं आपलें महाकाव्य अगदीं ओंवळें करून ठेवलें! दुर्दैवाची गोष्ट ही कीं त्या महाकाव्याकडे जाणतेही पाहत नाहींत व शूद्रातिशूद्रही पाहत नाहींत. महाराष्ट्रशारदेच्या अंगावर पंतपंडितांनीं घातलेलीं महावस्त्रेंच सर्व रसिकांनीं कायम ठेविलीं असून 'जरी एक पक्षीहि खालचा दिसेना। जरी एक मुंगीहि वरती शिरेना;' 'तसा थोर हईमहादेव झाला। चढे त्वेष तो सर्व दिन् दिन् उडाला' ही कुंट्यांनीं घातलेलीं रकटीं दूर भिरकावून दिलीं आहेत! शारदाबाईलाही पंतपंडितांच्या यमकपुष्पमाळा कुंट्यांच्या कवड्यांच्या माळेपेक्षां ज्यास्त प्रिय वाटत आहेत!

१८०२ ह्मणजे सप्टेंबर १८७७-मार्च १८८० ह्या पर्वणीवर महाराष्ट्रवाचकांस चाखावयास मिळालें. हा निबंध लिहिण्याचा शास्त्रीबोवांचा हेतु असा होता:—" मोरोपंताचा वृत्तांत किंवा त्याच्या काव्याचें समग्र परीक्षण हें यांत यावयाचें नसून फक्त त्यांच्या कवित्वाविषयीं विचार करावयाचा ह्मणजे कवि ही संज्ञा त्यास लागेल कीं नाहीं, लागेल तर त्याचे ठायीं कोणकोणते सद्गुण दृष्टीस पडतात वगैरे संबंधानेंच मुख्यत: विवेचन करावयाचें आहे." शास्त्रीबोवा आणखी ह्मणतात "सदर विषय 'मोरोपंत' अशा रूपानें न घेतां 'मोरोपंताची कविता' अशा रूपानें घेतला आहे याचें कारण उघडच आहे कीं, पहिलें सदर घेतलें असतां कवीचा वृत्तांत व त्याच्या सर्व ग्रंथांचें गुणदोष विवेचन हें करणें भाग पडतें. मराठी कवींचा वृत्तांत अद्याप त्यांच्या त्यांच्या जागीं थोडाबहुत मिळण्याचा संभव आहे, पण हें काम चौकस व युक्तिवान् मनुष्याचें असल्यामुळें केव्हां सिद्ध होईल हें सांगवत नाहीं. महाराष्ट्रकवि, महाराष्ट्रदेशाचा इतिहास अशासारखे विषय अत्यंत महत्वाचे असल्यामुळें ते हातीं घेणारानें त्यांचें मनन दीर्घकाळ करून व त्यांजवर पुष्कळ शोध करून यथावकाश विचारपूर्वक त्यांजवर ग्रंथरचना केली पाहिजे." पंतांची कविता भाषांतररूप होती कीं नाहीं, पंतांना कवि ह्मणतां येईल कीं नाहीं, कवित्वाचें लक्षण काय, पंतांच्या कवितेवर कोणते आक्षेप आणण्यांत येतात, त्यांचें निराकरण कोणत्या प्रकारें होतें, पंतांच्या कवितेंत असलेले यमकानुप्रास कवित्वास बाधक आहेत कीं काय, यमकाचा प्रघात प्रथम कोणीं पाडला, पंत पंडित होते कां अव्युत्पन्न होते, इत्यादि मुद्यांवर साधक बाधक प्रमाणें देऊन शास्त्रीबोवांनीं स्वतंत्रबुद्धीनें जोरदार व चित्तवेधक भाषेंत चर्चा केली आहे. शास्त्रीबोवांचा निबंध मुख्यत: खंडणात्मक आहे तरी त्यांनीं सामान्य वाचकांस कवितेविषयीं पुष्कळ माहिती देऊन मराठी कवितेविषयीं त्यांच्यांत अभिमान व आवड उत्पन्न केली आहे. डॉ. विलसन व रा. ब. रानडे यांनीं पंतकवितेवर आणलेल्या आक्षेपांच्या शास्त्रीबोवांनीं आपल्या तेजस्वी भाषेंत स्वाभिमानानें प्रेरित होऊन नुसत्या चिंधड्या उडविल्या आहेत! शास्त्रीबोवांच्या वाणींत विलक्षण स्फूर्तिदायकता आहे. त्यांच्या निबंधामुळें तीन फायदे झाले. एक तर, पंतांच्या कवितेवर तुटून पडणाऱ्यांचीं तोंडें बंद पडून स्वदेशी ग्रंथकारांवर वेडगळपणाची टीका करणारांचा मार्ग रोधून गेला. मालाकारांची टीका इतकी स्पष्ट, निर्भिडपणाची व चरचरीत आहे कीं

तेव्हांपासून पंतांच्या कवितेविरुद्ध उघडपणें तरी ' ब्र ' काढायला कोणी धजला नाहीं ! दुसरें, स्वकीय वाङ्मयाविषयीं लोकांच्या मनांत आदर व आस्था उत्पन्न झाली. तिसरें, या निबंधानंतर खुद्द निबंधमालेंत जो पत्रव्यवहार झाला तो फारच मनोरंजक व बोधप्रद झाला. शास्त्रीबोवांच्या निबंधा: पंतभक्तांचीं अंतःकरणें एकवटलीं, व पंतांबद्दल प्रेमोद्गार काढायची किंव. आपली माहिती लोकांपुढें ठेवण्याची त्यांना बुद्धि झाली. **जनार्दन बाळाजी मोडक, वामनरावजी ओक, केशवराव कानेटकर, बापूसाहेब कुरुंदवाडकर, परब, लेलेशास्त्री,** वगैरे पंतभक्तांनीं शास्त्रीबोवांना प्रोत्साहन देण्याकरितां, त्यांच्या मतांचें समर्थन किंवा खंडण करण्याकरितां किंवा आपली स्वतंत्र माहिती देण्याकरितां, जीं पत्रें लिहिलीं व त्यामुळें कवितावाचकांची संख्या वाढून मराठी कवितेबद्दल मोकळेपणानें चर्चा

कुंट्यांनीं ' राजा शिवाजी ' हें काव्य रचल्यापासून कवितेच्या नव्या नव्या शाखा स्थापण्याची खुळेपणाची हांव कित्येक अर्वाचीन कवींत दिसून येत आहे ! शिवाय शास्त्रीबोवांच्या वेळच्या जुन्या विद्वानांत अद्यापही कृष्णशास्त्र्यांसारखा पंतांच्या नांवाबरोबर वांकडें तोंड करणारा एखादा अरसिक आढळतो ! केसरींत पंतांच्या कवितेंवर माझे ७।८ लेख प्रसिद्ध झाल्यावर शाळाखात्यांत जन्म घातलेल्या व ग्रंथप्रसिद्धीमुळें प्रसिद्धीस आलेल्या एक रावसाहेबांनीं मला एकदा हटकलें, " कां पांगारकर ! तुह्मी मोरोपंताला महाराष्ट्रकविमुकुटमणि ह्मणून ह्मणायला लागलांत कां ? अहो ! मोरोपंतांत कां कवित्व आहे, कां प्रसाद आहे, कां कल्पनाचातुर्य आहे, कां आहे तरी काय ? अहो ! तुह्मी लोकांची अभिरुचि बिघडून टाकायला कारण होत आहांत ! मागें परशुरामपंत तात्या व विष्णुशास्त्री हे मोरोपंताला डोक्यावर घेऊन नाचले होते आणि आतां तुह्मी तिसरे वेडेपीर निघालांत ! मोरोपंत ह्मणजे नुस्तीं यमकें जुळविणारा अरसिक मनुष्य ! " यावर पंतांच्या कवितेंत प्रसाद, कवित्व, कल्पनाचातुर्य इत्यादि गुण त्यांच्या मंत्ररामायण, महाभारत, सीतारामायण, भक्तभूषण, मंत्रभागवत, संशयरत्नावल्यादि स्फुटप्रकरणें इत्यादि काव्यांत शेंकडों ठिकाणीं कसें उतरलें आहे हें मीं त्यांस सांगितलें, व ' आपण पंतांची कविता, निदान वरील काव्यें तरी, समग्र वाचलीं आहेत काय?' असा रावसाहेबांस प्रश्न केला. त्यावर ते गुरगुरले:— "काव्येतिहाससंग्रह छापत असतांना पंताच्या कांहीं आर्या मीं इतस्ततः चाळल्या होत्या, पण मला त्याची कविता आवडत नाहीं, मी वाचली नाहीं व वाचणारही नाहीं ! " तर मग " पंतांच्या कवितेवर अभिप्राय द्यायचा अधिकार आपणांस पोंचत नाहीं " असें रावसाहेबांस सांगून मीं त्यांची रजा घेतली ! !

करण्याचा प्रघात पडला तो शास्त्रीबोवांचा निबंध प्रसिद्ध झाला नसता तर खात्रीनें पडला नसता. तेजस्वी लेखकांची किंवा वक्त्यांची वाणी दुसऱ्यांच्या अंतःकरणांत खळबळ उत्पन्न करून त्यांना कार्यप्रवण करीत असते. शास्त्रीबोवांच्या लेखणींत अशी तेजस्विता होती. पंतांच्या कवितेवर मालेचे सहा अंक निघाल्यावर रा. मोडक यांनीं ( अंक ९१ ) " महाराष्ट्रकविशिखामणीचे काव्यदूषक दुर्जनांच्या मुखावर चपेटिका मारण्यास संधी सांपडावी ह्मणोन त्याचे काव्यावर निबंध लिहिण्यास प्रारंभ केल्याबद्दल " मालाकारांचें अभिनंदन करून भारतांतलीं मोठमोठीं आख्यानें पंतांनीं समयविशेषीं एकदोन आर्यांत कशीं आटपलीं आहेत हें उदाहरणांसह स्पष्ट करून दाखविलें आहे. वामनरावजी ओक यांनीं ( अंक ९२ ) मालाकारांचा गौरव करून मंत्ररामायणाच्या उत्तरकांडांत पंतांनीं रामरक्षेचे श्लोक कसे खुबीनें साधले आहेत हें दाखविलें आहे. " जगद्विख्यात व लौकिकवान् कविवर्य मोरोपंत यांची माहिती मिळत नाहीं " ह्मणून खेद दर्शवून पंतांचे ग्रंथ चाळींत असतां काशिनाथ पांडुरंग परब यांस पंतांच्या काव्यांत स्वत.विषयीं व स्वतःच्या कवितेविषयीं जे उद्गार आढळले, ते त्यांनीं पुढील एका अंकांत दिले आहेत. यानंतर मालाकारांनीं प्रतिपक्षाचें खंडण करितांना जे ' धडाकून ठोकून दिलेले सिद्धांत ' चुकीचे वाटले, त्याबद्दल अंक ६१ पासून ७६ पर्यंत ओक व कानिटकर यांनीं शास्त्रीबोवांच्याच भाषेंत त्यांच्यावर खूप चरचरीत टीका केली आहे. ओकांनीं तर शास्त्रीबोवांचा खूपच पिच्छा पुरविला. त्यांचें एक पत्र ६१।६२ या दुहेरी अंकांत छापलेलें २९ पृष्ठें लांब आहे, व दुसरें ६७ । ६८ । ६९ या तीन अंकांत लिहिलेलें पत्र तर ३६ पृष्ठांचें आहे! वादाचा मुख्य विषय यमकरचनेबद्दलचा ५७ व्या अंकांतला तिसरा प्यारिग्राफ होय. शास्त्रीबोवा व ओक पुढें पुढें फारच वर्दळीवर आले आहेत. ' मन मानेल तसा अभिप्राय झोंकून देणें अत्यंत साहसात्मक, गर्हणीय व अनुचित होय,' असा शेवटीं वामनरावजींनीं मालाकारांवर टपका ठेवला आहे. कानेटकर यांनीं ' मोठा चित्तवेधक, निबंध इंग्रजी भाषेंतील सरणीस अनुसरून स्वतंत्र, प्रौढ, आवेशयुक्त व रसभरित भाषेंत लिहिल्याबद्दल' मालाकारांचें गौरव करून रा. कानेटकर यांनीं ( अंक ६२ ) त्यांच्या निबंधांतले कित्येक विरोध दाखविले आहेत. मालाकारांनीं पंतांच्या भाषाशुद्धीची फार तारीफ केली होती, त्यावर ओक व कानेटकर

यानीं पंतांच्या कवितेंतले कित्येक दोष दाखवून दिले होते, त्यांपैकीं कित्येक दोषांचें खंडण बापूसाहेब कुरुंदवाडकर यांनीं ( अंक ६९ ) परस्पर केलें आहे. शास्त्रीबोवांनीं पंतांच्या कांहीं आर्या सदोष ठरविल्या होत्या त्यांचें निर्दोषत्व गणेशशास्त्री लेल्यांनीं ( अंक ७० ) फार मार्मिकपणानें सिद्ध करून दाखविलें आहे. नागपूरकर ' वेताळा ' नें पंतांच्या आर्येच्या लोकप्रियतेवर ( अंक ७१ ) एक गोड पत्र लिहिलें आहे. वामनरावजींचीं दोन पत्रें अंक ७४।७५।७६ मध्यें छापलीं आहेत. हे वादाचे मुद्दे व त्यांवरचे खंडणपर लेख जिज्ञासूंनीं मालेच्या मूळ अंकांतच वाचावेत. मालाकार व ओक दोघेही खरे पंतभक्त, रसिक, व सत्यान्वेषी होते, तथापि त्यांनीं वादविवादाच्या भरांत एकमेकांवर खूप कडाखे उडविले आहेत! मालाकारांनीं पंतदूषकांचीं तोंडें बंद केलीं, आणि पंतभक्तांची टीका आपणावर ओढून घेतली ! त्यांनीं पूर्वीचे रानडेप्रभृतींनीं काढलेले आक्षेप खोडून काढले, पण यमकाचा प्रघात कोणीं पाडला, पंत पंडित होते कीं नव्हते, इत्यादि मुद्यांवर अपक्क स्थितींत बनलेले ' कांहीं खोटे व कांहीं संशयित सिद्धांत धडकावून ठोकून दिले ' यामुळें ते स्वतः टीकाकारांचा विषय होऊन बसले ! सर्वांनीं मिळून पंतकवितेची चर्चा चालविली व त्यामुळें पंतांचा कीर्तिसुगंध अधिकच दरवळला ही गोष्ट निर्विवाद आहे. शास्त्रीबोवांनीं स्वतंत्र निबंध लिहिला व इतर पंतभक्तांना खडबडून जागे करून त्यांच्याकडून चर्चा सुरू केली, यामुळें पंतांच्या कवितेचा प्रसार करण्याचें मुख्य श्रेय त्यांस दिलेंच पाहिजे.

८ शास्त्रीबोवांनीं ' मुक्तमाले ' च्या आर्या सार्थ छापल्या व आणखी कांहीं प्रकरणें छापणार तों शके १८०१ मध्यें रा. मोडक व रा. साने यांनीं **' काव्येतिहाससंग्रह '** सुरू केला. मोडकांनीं सर्वसंग्रहांतील बरीच कविता पुन्हां छापली व कांहीं नवीं प्रकरणेंही शोधून छापलीं. त्यांनीं १०।१२ पृष्ठांत पंतांच्या कांहीं आख्यायिका व वंशवृक्ष छापला. याच सुमारास इंदूरचे **बाळकृष्ण मल्हार हंस**, वकील, यांचे मराठी संतकवींवरचे ग्रंथ बाहेर पडूं लागले. यांनीं ' देवमामलेदारा ' वर ' यशवंतस्तोत्र ' व गंगेवर ' भागीरथीस्तोत्र ' अशीं दोन सरस स्तोत्रें अनुक्रमें शके १७९२ व १७९५ मध्यें रचिलीं होतीं. मालाकारांचा पंतांच्या कवितेवर निबंध चालला होता, तेव्हां डॉ० जॉन्सनच्या कविचरित्रमालेप्रमाणें मराठी संतकवींवर सुरस निबंध लिहिण्यांत हेही गुंतले होते. यांनीं शके १७९९–१८०६ पर्यंतच्या सात वर्षांत

सहा संतकवींवर सहा निबंध लिहिले. त्यांपैकीं रामदास, ज्ञानेश्वर व एकनाथ यांजवरचे निबंध अद्याप अप्रकाशित राहिले असून मोरोपंत, वामन व तुकाराम यांजवरील तीन निबंध मात्र छापून निघाले आहेत. शके १८०२ मध्यें तुकारामावरील, शके १८०४ मोरोपंतावरील व शके १८०६ मध्यें वामनावरील असे तीन निबंध छापून निघाले. हंसांचे तीनही निबंध अत्यंत मार्मिकपणानें, सहृदयतेनें व सद्भावानें लिहिले आहेत. हंसांची भाषा प्रगल्भ व प्रेमळ आहे, विचारसरणी चित्तवेधक व उदात्त आहे व टीकापद्धती बाळबोध व शुद्धभावाची आहे. यांच्या निबंधापासून वाचकांच्या मनांत सात्विकप्रेम व रसिकता उत्पन्न होते. यांचे लेख भेदक व कठोर नसून सात्विक व प्रेमळ आहेत. यांच्या मोरोपंतांवरील १९६ पानांच्या निबंधांत मोडक, ओक, मालाकार वगैरेंच्या लेखांतील सर्व माहितीचा योग्य उपयोग केला गेला असून हंसांच्या सात्विक वृत्तीची त्यांत भर पडल्यामुळें निबंध फार रसाळ झाला आहे. मालाकारांचें कर्तृत्व, लोकप्रियता व त्यांचे लेखणींतला झणझणीतपणा हे गुण हंसांच्या ठिकाणीं नसल्यामुळें त्यांचा निबंध सरस असूनही माग पडला आहे. उत्तम ग्रंथकार होण्यास प्राचीन वाङ्मयाचा निरंतर अभ्यास, सतत मनन व तदाकार वृत्ति हे गुण पाहिजेत. हे गुण संपादून हंसांनीं आपले निबंध लिहिले आहेत. वामनरावजी ओकांनींही काव्यसंग्रहांत पंतकवितेवर टीपा देऊन वारंवार त्यांतून अवतरणें घेतलीं आहेत. "मोरोपंतांच्या कवित्वबुद्धिरूप सूक्ष्मज्योतीस संस्कृताध्ययनकर्पूरादि साहित्य प्राप्त झालें, त्यांतच वामन पंडितांचें कवित्व हें अनुकूल साहित्य होय....पंतांचें व्यवहारज्ञान, बहुश्रुतता, विद्वत्ता, कुशाग्रबुद्धि व प्रतिभा हीं इतकीं उत्तम जागृत होतीं कीं, त्यांचें काव्य वाचीत असतां स्थलोस्थलीं त्यांची प्रतीति येते....वामनापेक्षां पंतांची कविता संस्कारशुद्धि, अर्थव्यक्ति व गांभीर्य इत्यादि अनेक गुणांनीं श्रेष्ठ आहे....पंतांचीं लहान लहान काव्यें इतकीं मधुर व मनोहर आहेत कीं तीं वाचीत असतां अंतःकरण प्रेमानें सद्गदित होऊन जातें....केवळ परमार्थसाधनाकडेच लक्ष ठेवून पंतांनें काव्य रचिलें आहे यामुळें निर्विषयत्वेंकरून त्याची अंतःकरणभूमिका पवित्र झालेली आहे....मोरोपंतांची संक्षेपानें वर्णन करण्याची शैली आहे, तरी त्यांचीं वर्णनें सुरस, अवीट, थोड्या शब्दांत पुष्कळ अर्थ दाखविणारीं, चमत्कारिक पदरचना आणि अर्थ यांनीं युक्त व व्याकरणशुद्ध अशीं आ-

हेत;" इत्यादि प्रकारांनीं हंसांनीं पंतांच्या कवितेवरचें आपलें प्रेम व्यक्त केलें आहे. हंसांनीं पंतदूषकांचा समाचार युक्तीनें पण सौम्य शब्दांनीं घेतला आहे व 'पंत पंडित नव्हते' इत्यादि मालाकारांच्या सिद्धांतांचेंही सुरेख खंडण केलें आहे. मालाकार व हंस यांचे निबंध ताडून पाहण्यासारखे आहेत. मालाकारांच्या वाणींत प्रतिभा व ओज ज्यास्त आहे, हंसांच्या वाणींत प्रेम व रसिकता अधिक आहे. मालाकारांची वाणी दिपवणारी आहे, हंसांची वाणी आपल्या सिद्धांतांचें सत्यत्व मनाला पटवीत शुद्धानंद देणारी आहे. मालाकार व हंस दोघेही विद्वान् व रसिक पंतभक्त होते, पण मालाकारांचें मुख्य बळ प्रतिपक्षखंडणांत व्यक्त झालें आहे व हंसांचें बळ पंतकविताकमलाची माधुरी यथार्थत्वें व्यक्त करण्यांत उघड झालें आहे.मालाकारांची वाणी वाचकांस मोहून टाकते, हंसांच्या सिद्धांतांचें खरेपण त्यांस भुलवितें. मालाकार व हंस हे दोघेही पंतकवितादेवीचे लाडके पुत्र होत यांत संशय नाहीं. असो. शके १७८४ मध्यें सर्वसंग्रहाचा उदय झाल्यापासून शके १८०४ मध्यें हंसांचा निबंध प्रसिद्ध होईपर्यंतच्या वीस वर्षांच्या काळांत पंतकवितेचा जयजयकारच झाला. पंतदूषकांनींही पंतकवितेची पर्यायानें सेवाच केली असें मी समजतों. रानड्यासारख्यांच्या टीकेला न भिणारे विष्णुशास्त्री जसे निर्भिड स्पष्टवक्ते निघाले, तसे विष्णुशास्त्र्यांच्या लोकप्रियतेलाही न भितां आपलें मत स्पष्टपणें प्रकट करणारे वामनराव ओक व हंस यांसारखेही मार्मिक पुढें आले हे उत्तम झालें. पंतभक्त व पंतदूषक या सर्वांनीं मिळून पंतकवितेच्या प्रतिद्धीस साह्यच केलें, यांत कोणींही दुष्टभावानें कांहीं लिहिलें नाहीं. जो ज्या मताच्या प्रवाहांत सांपडला त्यास तेंच मत थोर झालें. भाषा सौम्य अगर कठोर लिहिणें, मत अनुकूल अगर विरुद्ध असणें या गोष्टी गौण आहेत, ह्मणून पंतभक्त व पंतदूषक या सर्वांना पंतभक्त समजून शिष्यभावानें मीं त्या सर्वांसच सप्रेम वंदन करितों.

---

१ कोणीही मनुष्य निसर्गतः दुष्ट नाहीं व ह्मणून बिलकूल उपेक्ष्य नाहीं. प्रत्येकाचीं मतें परिस्थित्यनुरूप बनत असतात,यास्तव जो आपणास दुष्ट किंवा नीच वाटतो त्याची परिस्थिति बदलण्यास आपण झटलें पाहिजे. हंस व मालाकार यांचे निबंध प्रसिद्ध झाल्यावर विविधज्ञानविस्तारानें आपल्या बहुतेक चुका पदरांत घेतल्या. विस्तारांतले दोन्ही वेळचे लेखक मराठीभक्त प्रसिद्ध गुंजीकर हे होते असें समजतें. न्या. रानडे यांनींही शके १८१२ पासून पुढील १० वर्षांत महिपति, एकनाथ, रामदास, तुकाराम इत्यादि संतांचे ग्रंथ मोठ्या भक्तिभावानें वाचले व त्यांवर मुंबईत सुरस व्याख्यानें दिलीं.

९ शके १८११ सालीं मुंबईस बाबाजी अनंत तेंडुलकर यांनीं '**मयूर-कवि**' नामक एक मासिकपुस्तक सुरू केलें. तें कित्येक वर्षें चाललें व त्यांत पंतांचे भारतादि ग्रंथ पुन्हां समग्र छापून निघाले. शके १८१२ सालीं जावजी दादाजी यांनीं आपल्या 'निर्णयसागर' छापखान्यांत '**काव्यसंग्रह**' नामक मासिक पुस्तक सुरू केलें तें अद्याप आपलें काम करीत आहे. याचे पहिले सहा अंक मोडक यांनीं काढले व पुढील ७६ अंक **वामनरावजी ओक** यांनीं भरपूर टीपा देऊन प्रसिद्ध केले. ओकांनीं पंतांशिवाय इतर पुष्कळ मराठी कवींचे ग्रंथ अत्यंत आस्थेनें, प्रेमानें व मार्मिकपणानें शोधून प्रसिद्ध केले व मराठी भाषेची अनुपम सेवा केली आहे. माधव चंद्रोबा व परशुरामपंत तात्या या जोडीप्रमाणेंच जावजी दादाजी व वामनराव ओक यांचीही जोडी मराठी भाषेच्या सुदैवानें महाराष्ट्रास मिळाली. ओकांनीं पंतकवितेवर 'अर्थ-निर्णायक व अवांतर माहितीच्या विस्तृत टीपा' दिल्या आहेत. कांहीं टीपा अतिशय, कांहीं निरर्थक व कांहीं पुनरावृत्त झाल्या आहेत, तथापि ओ-कांची कामगिरी एवढी सत्कारार्ह आहे कीं तिच्या पुढें हे दोष कांहींच नाहींत. पंतांच्या कवितेवर टीपा देण्याच्या कामीं वामनरावजींना ज्या त्यांच्या मित्राचें अत्यंत साह्य झालें त्या **हरि माधव पंडित** ह्या नागपूरकर पंतभक्ताचा उ-ल्लेख करणें अवश्य आहे. ओक व पंडित यांच्या पत्रव्यवहारांत व खाजगी बैठकींत नित्य पंतांच्या आर्यांचा खल होत असे. ओकांच्या कामगिरींत पंडितांचें काम इतकें बेमालूम सांधून गेलें आहे कीं ओक व पंडित यांच्या टीपा पृथक्त्वानें दाखवितां येणें अशक्य आहे! यांचा कांहीं वाद 'शालापत्रकांत' ही प्रसिद्ध झाला होता. 'एक वाचक' ह्मणून वामनरावांनीं कांहीं शंका विचाराव्या व 'दुसरा वाचक' ह्मणून पंडितांनीं त्यांचें निरसन करावें असा क्रम कांहीं दिवस चालू होता! ओक व पंडित यांचा पत्रव्यवहार प्रयत्न करूनही मला मिळाला नाहीं याबद्दल खेद वाटतो. ओकांनीं आपला एक शिष्यही तयार केला. वर्ध्याचे **श्रीधर विष्णु परांजपे** यांनीं शके १८१९ मध्यें काव्यसंग्रहांतूनच अतिविस्तृत टीपा देऊन पंतांची 'केकावलि' प्रसिद्ध केली. या टीपा विस्तृत मार्मिक व प्रेमळ आहेत. वामनरावजींच्या पश्चात् 'काव्यसंग्रहाचें' काम कांहीं वर्षें **नारायणराव केळकर** यांनीं फार उत्साहानें व काळजीपूर्वक केलें, व हल्लीं **बाळकृष्ण अनंत भिडे** हे काव्यसंग्रह चालवीत आहेत.

१० ह्याप्रमाणें पंतांच्या कवितेचे जे भोक्ते हरिदासमंडळींत, अर्वाचीन कवींत,

व अलीकडच्या विद्वानांत होऊन गेले त्यांच्याबद्दल सनवार व संगतवार हकीकत दिली आहे. याशिवाय पंतभक्त कोणी झाले नाहींत असें नाहीं. पुणें शहरांत ४० वर्षांपूर्वी तुळशीबागेंत एक काशीकर शास्त्री पंतभागवत पुढें ठेवून त्यावर पुराण सांगत असत. मीं कोल्हापूराकडे गेलों होतों तेव्हां बावडें येथें एक सोनार पंतभारताचीं १८ पर्वें बिनचूक पाठ म्हणत असे असें मला प्रो. विजापूरकर यांनीं सांगितलें होतें! मुंबईचे तऱ्हेवाईक पंडित रा. रा. भागवत यांनीं एक 'मोरोपंती आखाडा' स्थापन केला होता व तेथें दर रविवारीं कांहीं लोक जमून पंतांच्या आर्यांचा खल करीत असत! याप्रमाणें खेड्यांतून व शहरांतून पंतभक्त पुष्कळ झाले आहेत. सर्वांचा नामोल्लेख तर्पणपद्धतीनें करितां येणें शक्य नाहीं. ज्यांचा उल्लेख केला आहे त्यांचे मनःपूर्वक आभार मानून व ज्यांचा उल्लेख केला गेला नाहीं त्यांची क्षमा मागून मीं आतां ओघानेंच प्राप्त झालेल्या प्रस्तुत चरित्राकडे वळतों. स्वतःबद्दल किंवा स्वतःच्या उद्योगाबद्दल स्वतःच लिहिणें प्रशस्त नाहीं, तथापि आपल्या वाचकांशीं मोकळेपणानें बोलण्यांत कांहीं बिघडतें असें मला वाटत नाहीं. मला ग्रंथवाचनाची गोडी बाळपणापासूनच होती, पण विद्यार्थीदशेंत निबंधमालेनें माझी वाचनप्रीति वाढविली व ग्रंथकर्तृत्वाची महत्वाकांक्षा इंग्रजी सातवी यत्ता पास होण्यापूर्वीच प्रदीप्त केली! कॉलेजचा अभ्यास पुरा होण्यापूर्वी मी इतिहास, काव्य, साहित्य, चरित्रें वगैरेवर बरेच ग्रंथ अशा दृष्टीनें वाचले, त्या सर्वांत मला चरित्रवाचनाची गोडी फार लागली. थोर मनुष्य कसकसा तयार होत जातो; आपत्तींतून व अनेक अडचणींतून पार पडून तो लौकिकाला व यशाला कसा चढतो; साधु, कवि, योद्धा, मुत्सद्दी, ग्रंथकार हे आपलें शील कसें बनवतात व रावाचे रंक अगर दगडाचे देव कसे होतात हें बारकाईनें पाहण्यांत मोठें आत्मशिक्षण आहे व याच कारणासाठीं चरित्रग्रंथवाचनाइतकें बोधप्रद व आनंददायक वाचन दुसऱ्या कोणत्याच ग्रंथाचें नाहीं असें माझ्या मनानें पक्कें घेतलें. माझ्या विद्यार्थीपणांतल्या दारिद्र्यादि अनेक अडचणींतून पार पाडण्याचें सामर्थ्य डॉ. जान्सनच्या बास्वेलकृत चरित्रानें मला प्रथम दिलें. पाश्चात्य देशांत लोक शेक्सपीअरसारख्या थोर पुरुषाचे ग्रंथ मोठ्या शोधकबुद्धीनें वाचतात; त्याच्या ग्रंथांची, त्यांतील प्रत्येक पद्याची, फार काय पण प्रत्येक शब्दाची बारीक छान करितात; त्याच्या ग्रंथांतील निरनिराळ्या तऱ्हेचे मु-

दर वेंचे काढून लोकांस त्यांची गोडी लावतात; त्याचें चरित्र, त्याचे इष्टमित्र, त्याचे आचारविचार, त्याचें स्वभाववर्णन, त्याच्या ग्रंथांचा अनुक्रम, त्यावरून व्यक्त होणारे त्याच्या वृत्तींतले फेरफार, त्याच्या काळची, सामाजिक स्थिति व त्याच्या जिवंतपणीं आणि पश्चात् त्याच्या विचारांचे समाजावर झालेले परिणाम; समकालीन थोर पुरुषांचा व त्याचा अन्योन्य संबंध; राष्ट्रीय प्रगतीच्या इतिहासांत कवि ह्मणून, साधु ह्मणून, तत्ववेत्ता ह्मणून, राष्ट्राचा नेता व शिक्षक ह्मणून, त्याला थोर पुरुषांच्या मालिकेंत कोणतें स्थान द्यावें:—या या विषयांचा ऊहापोह करितात. हे प्रकार आमच्याकडे बहुधा अश्रुतपूर्व आहेत. अशा तऱ्हेचे चरित्रग्रंथ मराठींत निघाले पाहिजेत व आपल्या मायभाषेंत गद्य ग्रंथांची भासणारी उणीव भरून निघाली पाहिजे असें इंग्रजींतले उत्तमोत्तम ग्रंथ वाचतांना मला नेहमीं वाटे! गेल्या पन्नास वर्षांचा काल मराठी गद्याची भूमि तयार करण्यांत गेला आहे, मराठी गद्याचें ऐश्वर्य अद्याप वाढावयाचें आहे. मराठी भाषेच्या उन्नत्यर्थ झटणारे कांहीं सुसंस्कृत बुद्धीचे तरुण तयार झाले पाहिजेत. चरित्रें, इतिहास, प्रवासवृत्तें, टीकात्मक ग्रंथ, शास्त्रीय ग्रंथ, वरिष्ठ दर्ज्याचीं नाटकें व कादंबऱ्या, अनेक प्रकारचे कोश व व्याकरणें इत्यादि प्रकार मराठींत येण्यास आणखी शेंपन्नास वर्षें तरी लागतील. युरोपांत थोर पुरुषाच्या पश्चात् त्याच्याविषयीं इत्थंभूत माहिती मिळवून सर्व हकीकत सनवार सुसंगतरीतीनें प्रसिद्ध करणारे लेखक जसे तयार होतात, तसे ते आमच्याकडे झाले पाहिजेत. आमच्या राष्ट्रांतले थोर पुरुष मुख्यतः आमचे संतकवि होत. कवि हे राष्ट्राचे आत्मे होत. अनेक उज्वळ कल्पना राष्ट्रांत उत्पन्न करणें, राष्ट्रांतील संस्था व पूर्वपरंपरा यांविषयीं व आपल्या पूर्वजांविषयीं सदभिमान जागृत ठेवणें, धार्मिक, सामाजिक व नैतिक घडामोडींचीं चित्रें—लोकांपुढें उदात्त भावना जागृत राहील अशा तऱ्हेनें—ठेवणें हें महत्कार्य महाकवि बोभाट्यावांचून करितात; ह्मणून कविचरित्रांकडे आपलें लक्ष आपण वळवावें व महाराष्ट्र संतकवींची सेवा करण्यांत व ती करितां करितां आपली व समाजाची उन्नत्ति करण्यास झटावें असे माझे विचार युनिव्हर्सिटीच्या अभ्यासक्रमांतून सुटण्यापूर्वी ठरून गेले. गरीब पण भाविक कुळांत माझा जन्म शके १७९४ आषाढ वद्य ११ बुधवार, या दिवशीं झाला. मी म्याट्रिक १८ व्या वर्षी झालों. विद्याभ्यास पुण्यासच झाला. अनंतर

ग्रंथ वाचण्याच्या व्यसनामुळें कॉलेजांतून माझी लवकर सुटका झाली नाही. शके १८२० सालीं 'मराठी भाषेचा अभ्यास' नामक मराठी वाङ्मयाचा इतिहासाचा ५० पृष्ठांचा निबंध ग्रंथमालेंतून मीं प्रसिद्ध केला. बी. ए. झाल्यावर लागलेंच श० शके १८२१ सालीं कांहीं पूर्वपुण्यानें श्रीक्षेत्र पंढरीस राहण्याचा माझा योग आला. पंढरीस पंतांचे धाकटे पुत्र रामकृष्णपंत यांचा वंश आहे. रामकृष्णपंतांचे पणतू बळवंतराव उर्फ मोरोपंडित हे नुक्तेच वारले होते. त्यांची भार्या श्रीमती तानूबाई या आपल्या मुलांसह तेथें राहतात व त्यांच्याजवळ पंतांच्या कवितेचा सर्व संग्रह आहे असें मला कळल्यामुळें मी त्यांजजवळ पंतांच्या हस्तलिखित पोथ्या पाहण्यास मागितल्या. प्रथम प्रथम बरेच अडथळे आले. बाबा पाध्ये यांची वृद्ध सून राधाबाई उर्फ आक्का पाध्ये यांनीं पंतपाध्यांच्या पुष्कळ गोष्टी मला तोंडी सांगितल्या. आक्का फार कर्मनिष्ठ, भाविक, सदाचरणी, स्वाभिमानी व करारी असत. त्यांनीं मजवर फार प्रेम केलें. त्यांच्या सांगण्यावरून तानूबाई यांनीं पंतांची कविता मला दाखविण्यास सुरुवात केली व अखेरपर्यंत या माउलीनें निष्कपटपणानें मला पंतांच्या सर्व हस्तलिखित पोथ्या पाहूं दिल्या. तानूबाईनीं जो मनाचा थोरपणा, आस्था व प्रेम दाखविलें याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहे. पंढरीस माझा वास सहा वर्षें झाला. पंढरीस पंतांचे मित्र विठोबादादा चातुर्मासे यांच्या वंशांतले पांचवे पुरुष बाळकृष्ण बावा यांनींही आपल्या घरचीं दप्तरें मला दाखविलीं व त्या दप्तरांतच पंतांच्या हातचीं ४०।५० पत्रें अकल्पित सांपडलीं! पंत, पाध्ये व चातुर्मासे बोवा यांच्या घरच्या दप्तरांत व यांच्या वंशजांकडून तोंडीं अगर लेखी जी जी माहिती मला मिळाली त्याबद्दल मी त्या घराण्यांचा सदैव ऋणी राहीन. पंढरीस गेल्यावर सहा महिन्यांत पंतांच्या चरित्राची मीं जुळवाजुळव करूं लागलों, व त्यासाठीं पुढील ४।५ वर्षांत ठिकठिकाणीं हिंडलों. पंतांच्या गुरूंची माहिती मला कोल्हापूर व पन्हाळगड येथें मिळाली. पंतांच्या मूळ गांवची माहिती मिळविण्यासाठीं मीं आपल्या कांहीं राजापूरकर मित्रांबरोबर सौंदळास गेलों होतों. खुद्द बारामतीस एक आठवडा राहिलों होतों. माळेगांवीं अमरसिंह जाधवांच्या नातवाची भेट घेतली. पंतांचे मित्र बाळंभट काजळे यांच्या वंशजांच्या शोधासाठीं नगर, नेवासें व प्रवरासंगम येथें जाऊन आलों. पंतांची वंशावळ तपासण्यासाठीं नाशकास व भोकपंडितांचा पत्रव्यवहार मिळविण्यासाठीं नागपुरास गेलों. पंतांच्या चरि-

त्राची माहिती मिळविण्यासाठीं महाराष्ट्रभर हिंडलों. गेल्या दहा वर्षांत मी पंढरपूर, पुणें व मुंबई या शहरांशिवाय नागपूर, उमरावती, आकोला, धुळें, वर्धा, नाशीक, इगतपुरी, सोलापूर, सातारा, कोल्हापूर, पन्हाळगड, राजापूर, देवगड, सौंदळ, बारामती, माळेगांव, पैठण, विजापूर, अक्कलकोट, सज्जनगड, इत्यादि शेंदीडशें गांवीं हिंडलों व बहुतेक ठिकाणीं मोरोपंत व इतर महाराष्ट्र संत यांच्यावर पुष्कळ व्याख्यानें दिलीं व पुराणें सांगितलीं! गेल्या दहा वर्षांत 'तनुनिर्वाहापुरता संग धरून' कायेनें, वाचेनें व मनानें महाराष्ट्र संतांची व मुख्यतः मोरोपंतांची जी सेवा केली ती श्रीरामचरणीं समर्पण आहे. पंढरीस पंतांची माहिती लागतांच मी 'केसरी' पत्रांतून लेख प्रसिद्ध करण्यास सुरुवात केली. केसरींत मीं शके १८२२।२३।२४ सालीं पंतांच्या कवितेबद्दल सुमारें २० व इतर कवींवर १० असे एकंदर ३० लेख प्रसिद्ध केले! पंतांचा वंश, पंतांचा विद्याभ्यासंग, पंत व कोल्हापूरचे राजगुरु, पंतांचे गुरु पन्हाळगडकर पाध्ये, पंतांचे मित्र व आप्त बाबा पाध्ये ( लेख ३ ), पंतांची विठोबादादांस चाळीस पत्रें, मोरोपंती रामायणें ( लेख २ ), बडवे कवि आणि पंत, पंतांच्या काव्यांची संगति, पंतांची निधनतिथि इत्यादि मथळ्यांवरील माझीं पत्रें केसरींत प्रसिद्ध झाल्यांपासून व गांवोगांवचीं व्याख्यानें ऐकून गेल्या दहा वर्षांत महाराष्ट्राच्या पंतभक्तीचा पारा पुन्हां वर चढला व अखिल महाराष्ट्राच्या पंतभक्तीचें पूर्ण फळ ह्मणजे प्रस्तुत चरित्रग्रंथ होय! केसरीकार लोकमान्य टिळक यांनीं माझ्या पत्रांला प्रसिद्धी दिल्यामुळें पंतांचीं काव्यें व विविध प्रकारची माहिती मजकडे येऊं लागली. एक तप पंतांच्या व ज्ञानेश्वर, रामदास, वामन, एकनाथ, तुकाराम, मुक्तेश्वर इत्यादि संतकवींच्या दिव्य संगतींत गेले व पंतकालीन संतकवींची दाट ओळख झाली. मराठी वाङ्मयसागरांतलें मोरोपंत हें एक दिव्य रत्न आहे, व त्याला शोधण्यासाठीं मला ह्या सागराच्या तळाशीं स्वेच्छेनें विहार करण्याची अपूर्व संधि ह्या जन्मीं मिळाली ही मोठ्या भाग्याची गोष्ट होय. संतकवींच्या उक्तींशीं खेळायची बुद्धीला

---

१ सदर पत्रें केसरींत येऊं लागतांच पंतचरित्राबद्दल कित्येकांकडून उत्तेजक पत्रें आलीं. केसरींतील पत्रांत सर्वच माहिती नवी प्रसिद्ध झाली. प्रो. श्रीधरपंत परांजपे यांनीं शके १८२४ सालीं केकावलीची दुसरी आवृत्ति प्रसिद्ध केली तिला जें 'मोरोपंतांचें चरित्र' जोडलें आहे तें सर्व वरील पत्रें एकत्र करूनच जोडलें आहे.

व प्रेमसागरांत निरंतर डुबायची अंतःकरणाला चटक झाल्यामुळें सांसारिक आपत्तींचीही विशेष मातब्बरी वाटत नाहीं. 'घडीनें घडी सार्थकाची करायचा' उत्तम मार्ग ह्मणजे संतकथा व संतचरित्रें यांत अवस्थात्रयांत अखंड रममाण होऊन राहणें हाच होय असा माझ्या मनाचा निश्चय झाला आहे. संत आणि भगवंत दोन नाहींत, व भगवंत जीवांच्या कल्याणासाठीं संतांच्याच मुखांतून आपलें हृद्गत बोलत असतात. वाचक हो! आत्मप्रशंसेबद्दल मला क्षमा करा, पण तुमच्यापाशीं मन मोकळें करून मोठ्या उल्हासानें सांगतों कीं पंतचरित्र लिहिण्यास प्रारंभ केला तेव्हांचा मीं आज नाहीं! माझ्या अंतःस्वरूपांत ह्या पवित्र व्यासंगानें थोडासा पालट केला आहे. पंढरीचा वास, सच्चरितामृतपान, सद्दर्शन, तीर्थयात्राप्रसंग व नामामृताची जिव्हेला लागत असलेली चटक ह्या गोष्टींमुळें आंतून ज्या दिव्य आनंदाच्या उकळ्या वारंवार फुटतात त्यामुळेंच माझ्या परिश्रमाचें सार्थक झालें असें मला वाटतें. '**निबंधमालेचें स्वरूप आणि कार्य**' व '**महाभारताचे मराठी अवतार**' हे मी शक१८२६ मध्यें 'सरस्वतिमंदिरांत' प्रसिद्ध केलेले निबंध आणि गेल्या तीन वर्षांतलि '**भक्तिमार्गप्रदीप**' '**रामदासीबोवा**,' **मुमुक्षूचे उद्गार**' इत्यादि लहान लहान पुस्तकें महाराष्ट्रानें ज्या प्रेमानें स्वीकारलीं आहेत, त्याच प्रेमानें माझा प्रस्तुत ग्रंथ महाराष्ट्र स्वीकारील अशी मला उमेद आहे. पंतांची मीं पूर्वी केलेली सेवा ह्मणजे शके १८२७ मध्यें प्रसिद्ध केलेला '**मोरोपंती वेंचे**' हा ग्रंथ होय. ह्या ग्रंथांत पंतांच्या कवितेंतून निवडक वेंचे काढून ईश्वरविषयक कविता, कविता आणि कवि, उपदेशपर कविता, वर्णनपर कविता, कथानकपर कविता, चर्चा रामायण, व विविधविषयपर कविता अशा सात भागांत ते दिले आहेत व त्याला काव्यशास्त्रावर एक ३९ पृष्ठांची स्वतंत्र प्रस्तावना जोडली आहे. कवितेची महती, कवितेचें लक्षण, उत्कृष्ट कवीला लागणारे गुण, काव्याचे वर्णनीय विषय, काव्यरचनेचे हेतु इतक्या मुद्यांचें त्या प्रस्तावनेंत विवेचन करून जगांतील महाकवींत पंतांना कोणतें स्थान मिळेल याचा ऊहापोह केला आहे. वाचकांनीं ती प्रस्तावना अगोदर वाचावी आणि नंतर ह्या ग्रंथांतील काव्यविवेचनाचीं ११ प्रकरणें वाचावीं अशी माझी त्यांस प्रार्थना आहे. असो. प्रस्तावनाही बरीच लांबली आहे. पंत केवळ कवि होते ही कल्पना जाऊन पंत वरच्या दर्जाचे उपासक व भक्त होते ही

कल्पना दृढ झाल्यावर प्रस्तुत चरित्र लिहावयास घेतलें आहे. यांतील कांहीं प्रकरणें ४।५ वर्षांपूर्वी लिहिलीं होतीं व कांहीं तर एकाच टाकानें लिहिलीं गेलीं आहेत. प्रस्तुत चरित्रग्रंथ भगवंतांस मान्य होईल असें ज्ञानेश्वरमहाराजांच्या:-

**ते ही प्राणापरौते । आवडती हे निरुते ।**
**जे भक्तचरित्रातें । प्रशंसिती ॥ २२७ ॥**

—**ज्ञानेश्वरी, अ॰ १२**

ह्या वचनावरून निभ्रांत वाटतें. ज्यांनीं प्रेमपूर्वक गौरव करून माझ्या व्यवसायाला प्रथम प्रोत्साहन दिलें ते श्रीधरपंत जिन्सीवाल्यांसारखे सज्जन हा ग्रंथ पुरा झालेला पाहण्यास राहिले नाहींत ह्याबद्दल अत्यंत खेद प्रकट करून मी श्रीपांडुरंगास विनवितों कीं:—

**महाकवि मयूर मूर्त हरिधामसोपान हो**
**असा कलियुगीं रमाधवदयैघ सोपा न हो ।**
**प्रपंचपरमार्थ साधुनि कथासुधापान हो**
**करी करवि त्या कधिं पितृवनाप्ति बापा ! न हो ॥ १ ॥**

पुणें. ‘ मुमुक्षु ’ कचेरी
गुरुवार, कार्तिक वद्य ११ शके १८३०

साधुसंतांचा दासानुदास,
ल. रा. पांगारकर.

# ठळक गोष्टींची शकावलि.

शके १६१७ वामन पंडित यांची कृष्णातीरीं पांडववाडीस समाधी.

शके १६१८ अवचितसुत काशी ( पृ. १५८ पहा. ) यांच्या ' द्रौपदीस्वयंवर ' ग्रंथाची समाप्ती.

शके १८२० अमृतरायांचा बीड परगण्यांत व शिवदिन केसरींचा पैठणास जन्म.

शके १६२४ ब्रह्मकमंडलु ( कन्हा ) नदीतीरीं द्वादशमती ( बारामती ) नगरींत श्रीधरस्वामींच्या 'शिवलीलामृत' ग्रंथाची शिवालयांत परिसमाप्ती. (पंतांचा 'ब्रह्मोत्तरखंड' पहा, पृ. १९९-२००)

शके १६३० बाबूजी नाईक बारामतकर जोशी यांस शाहू राजाकडून मराठा राज्याची पोतदारी मिळाल्यामुळें त्यांचें सातान्यास आगमन.

शके १६३४ श्रीधरस्वामींचा 'पांडव प्रताप' संपूर्ण झाला.

शके १६३५ पंतांचे वडील रामाजीपंत पराडकर कोंकण सोडून पन्हाळगडावर आले. श्रीसमर्थशिष्य उद्धवस्वामी टाकळीस समाधिस्थ झाले.

शके १६३६ सोहिरोबा आंबिये यांचा सांवतवाडी प्रांतीं जन्म; कल्याणस्वामींची डोमगावीं समाधी व श्रीधरकृत जैमिनी अश्वमेधाची परिसमाप्ति.

शके १६३७ महिपतिबावांचा ताहराबादेस जन्म.

शके १६४० गंगाधरस्वामींनीं 'श्रीसमर्थचरित्र' स्वमुखानें सांगितलें. याच सालीं माघ कृष्ण ११ बुधवार रोजीं प्रल्हादबोवा बडवे यांची पंढरीस समाधी.

शके १६४२ ब्रह्मेंद्रस्वामी कोंकण सोडून घाटावर आले. बाजीराव पेशवाईचें पद पावले.

शके १६४६ आनंदतनय कवीचें प्रयाण, समर्थशिष्य अनंतकवि यांच्या 'सुलोचनास्वयंवर' काव्याची समाप्ति.

शके १६५० श्रीधरस्वामींची पंढरपुरास चंद्रभागेच्या तीरीं समाधी.

शके १६५१ पन्हाळगडावर मोरोपंत पराडकर यांचा जन्म. ( पृ• ४ )

शके १६६२ कृष्णदयार्णव पैठणास ( मार्ग० शु० ५ ) समाधिस्थ झाले. ( शके १६४९ मध्यें यांनीं हरिवरदा टीकेस प्रारंभ केला होता व त्याचा पूर्वार्ध शके १६५६ श्रावण वद्य ८ स संपला होता. ) बाजीराव पेशवे वारल्यामुळें बाबूजी नाईक बारामतकरांनीं पेशवाईची खटपट केली पण ते अपेशी झाले व नानासाहेब पेशवाईचें पद पावले. वसईचा वीर चिमाजीआप्पा याचा मृत्यु. रामाजीपंत पराडकर नाइकांच्या आश्रयास गेले व मोरोपंत पन्हाळगडीं केशव व गणेश पाध्ये यांजपाशीं संस्कृत शिकूं लागले.

शके १६६४ बाबूजी नाइकांची माळव्यावरची यशस्वी स्वारी.

शके १६६५ बारामती महाल राजपत्रानें शाहुमहाराजांनीं बाबूजी नाईक यांस दिला; नाईक बारामतीस राहण्यास आले.

शके १६६७ अनंतफंदीचा संगमनेरीं जन्म, ब्रह्मेंद्रस्वामींची समाधी व थोरल्या माधवरावांचा जन्म.

शके १६६८ कर्नाटकचा सुभा सहा वर्षे करून त्यांत नानासाहेब पेशव्यांच्या कुटिलपणामुळें बाबूजी नाईकांनीं सोमल खाल्ला, पण त्यांतून ते वांचलें ( पृ० ५६–५९ )

शके १६६९ मध्वमुनीश्वर व रमावल्लभदास हे संतकवि मृत्यु पावले.

शके १६७४ बाबूजी नाईक यांस राजाराम महाराजांकडून १८ लक्षांचा व ५९॥ महालांचा सरंजाम मिळाला व मोरोपंत नाईकांच्या आश्रयार्थ बारामतीस आले. ( पृ० ५९।६० )

शके १६७५ चैत्र शु. ६ अमृतराय पैठणास समाधिस्थ झाले.

शके १६७६ मोरोपंतांस पहिला मुलगा ' रघुनाथ ' हा झाला. वऱ्हाडी संत देवनाथमहाराज यांचा जन्म,

शके १६७४–८३ या नऊ वर्षांत मोरोपंतांनीं संस्कृत काव्यनाटकें, साहित्य व छंदशास्त्र यांचें अध्ययन झपाट्यानें केलें. ह्या नऊ वर्षांत त्यांनीं १०।२५ संस्कृत ग्रंथ स्वहस्तानें लिहून घेतले ( पृ०२८).

शके १६७५ –१६८० पंतांनीं पुराणांतील कथा घेऊन ब्रह्मोत्तरखंड, कुशलवचरित, मदालसाख्यान, हरिश्चंद्राख्यान, देवीमाहात्म्य इत्यादि भाषांतररूप व सतींचीं गाणीं हीं स्वतंत्र काव्यें रचून

शेवटीं प्ऱ्हादविजय हें काव्य पौष शुद्ध ८ शके १६८० रोजीं समाप्त केलें ( प्रकरण बारावें पहा. पृ० १९३-२३३ )

शके १६७९ बाबूजी नाईक प्रतिनिधिपदाची खटपट करून फसले; व अनंतपाध्ये यांचा वृत्त्युच्छेद झाल्यामुळें ते कोंकण सोडून पंढरीस राहण्यास गेले.

शके १६८२ मोरोपंतांस दुसरा पुत्र ' रामकृष्ण ' हा झाला व पंत चतुर्मासांत पंढरीस जाऊन आले.

शके १६७१-८० सांवतवाडीकडील संत सोहिरोबा आंबिये यांनीं अक्षबोध, ( १६७१ ), महदनुभवेश्वरी ( १६७२ ), पूर्णाक्षरी (१६७३ ) अद्वयानंद ( १६७५ ) व सिद्धांतसंहिता ( १६७८ ) हे पांच वेदांतपर ग्रंथ रचून शेंकडों पदें केलीं.

शके १६८३-९३ निरंजन माधव योगी यांनीं ह्या कालांत स्वतंत्र ग्रंथरचना केली. त्यांनीं वृत्तमुक्तावली ( १६८३ ), वृत्तवनमालादेवीस्तोत्र (१६८९ ) व वृत्तावतंस (१६९३ ) हे तीन स्वतंत्र ग्रंथ छंदःशास्त्रावर केले व याशिवाय सांप्रदायपरिमळ नामक आत्मचरित्रपर ग्रंथ ( १६८५ ), ज्ञानेश्वरविजय ( १६८७ ); सुभद्राचंपू व रामकर्णामृत ( १६९० ) इत्यादि कित्येक स्वतंत्र प्रकरणें केलीं. ह्या दहा वर्षांत त्यांनीं पांच हजार कविता केली.

शके १६७९-१६९६ महिपतिबोवा ताहाराबादकर ह्यांचा ग्रंथरचनाकाल. भक्तविजय ( १६८४ ), कथासारामृत ( १६८७ ), संतलीलामृत ( १६८९ ), भक्तलीलामृत ( १६९६ ) इत्यादि यांचे ग्रंथ तयार झाले.

शके १६८७ भक्तमंजरीमालाकारांचे गुरु सिद्धनाथ बारामतीस जन्मले.

शके १६८९ बाबूजी नाईक यांचा सोलापुरचा किल्ला पेशव्यांनीं घेतल्यामुळें नाईक बिथरले. त्यांचा व पेशव्यांचा समेट झाल्यावर ते पंढरीहून बारामतीस गेले. माधवराव पेशवे बारामतीस नाइकांचे ४ दिवस पाहुणे होते.

शके १६९० गोपाळकवि नेवासेकर याच्या ओवीबद्ध प्रचंड भारताची समाप्ति; तुकाविप्राचें प्रयाण; व प्रभाकर दातार शाहीर याचा जन्म.

शके १६९५ माघ शुद्ध १५ राघोबा दादांची कन्या दुर्गाबाई ही बाबूजी नाईक यांचे मध्यम पुत्र पांडुरंगराव नाईक यांस दिली. लग्नसमारंभ कडाक्यानें पुण्यास झाला. पंतांचा हा महिना नाइकांबरोबर पुण्यासच गेला असावा.

शके १६९६ उद्धवसुतकृत ' रामदासचरित्र ' तयार झालें. माघ वद्य १३ रोजीं शिवदिनकेसरी हे पैठणास शांत झाले.

शके १६८०–१६९२ या १२ वर्षांत पंतांचें ( मंत्ररामायण प्रकरण १२ ) कृष्णविजय ( प्रकरण १३ ) भीष्मभक्तिभाग्य, व संशयरत्नावलि, साधुसत्कार, आर्याकेकावलि, नामसुधाचषक, रामनामार्या, आर्यामुक्तामाला इत्यादि स्फुट प्रकरणें व देव, संत व तीर्थक्षेत्रें यांवरचीं बहुतक स्तोत्रें रचून झालीं. ( प्रकरण १४ ) एथपर्यंत बहुतेक काव्यें पंतांनीं शके १६९६ मध्यें वारलेल्या अनंत पाध्यास दाखविलीं होतीं ( नामरसायन १०४–१११ )

शके १६९३–१७०३ महाभारतरचनाकाल. स्वर्गारोहणपर्वाबरोबर गीता-

---

१ पंतांनीं विठोबादादांस लिहिलेल्या पत्रांतून भारतीपर्वाचा वारंवार उल्लेख केलेला आहे:—" मी श्रीभारत आदिपर्व यांतील अथलेशग्रथनव्य संगें मनास लावलें आहे " ह्या पंतांच्या उद्गारावरून पंतांनीं भारतास आदिपर्वापासूनच प्रारंभ केला हें निश्चित आहे व यावरून पंतांनीं प्रथम कर्णपर्व केलें ही काव्येतिहाससंग्रहकर्ते मोडक यांनीं दिलेली आख्यायिका खोटी ठरते. पंतांनीं एका पत्रांत दादामहाराजांस लिहिलें आहे कीं, " वनपर्वसमाप्ति पर्वें चार व विराटपर्व पत्रें ३२ साद्यंत पाठविलें आहे. न्यून तें पूर्ण करून आरंभिलें श्रीमदुद्योगपर्व संजयानपर्यंत झालें हें पुढें चाले असें श्रीचरणापाशीं स्मरणपूर्वक प्रार्थून आशीःपत्रें सनाथ करावें. प्रतिनिधीचें वृत्त विदित आहेच. भगवंतराव दिवंगत झाले, पुढें कसें होतें पहावें. " पंत संतांच्या प्रेमाशीर्वादाविषयीं किती सतृष्ण असत व राजकारण समजून घेण्याकडे त्यांचें किती लक्ष असे हें वरील उताऱ्यावरून दिसतेंच, पण भगवंतराव प्रतिनिधि वारल्याचा त्यांत जो ताजा उल्लेख आहे त्यावरून इतकें निश्चित ठरतें कीं–चैत्र वद्य १ शके १६९८, गुरुवार रोजीं विटे येथें भगवंतराव वारले. त्या वेळपर्यंत ह्मणजे–शके १६९८ च्या पूर्णिमेपर्यंत पंतांचें महाभारत उद्योगपर्वापर्यंत आलें होतें! दुसऱ्या एका पत्रांत पंत लिहितात: " द्रोणपर्वप्रारंभापासून श्रीमद्गुरुपुत्र सदाशिवोपाध्याय कऱ्हाडीं रहातात त्यांजवळ आहे. उत्तरार्ध नवें लिहिलें तें येथें आहे. कर्णपर्व आपणाजवळ अर्धें आहे असें लिहिलें. पुढील देव दया क-

र्पा पूर्वार्ध, ज्ञानदेवकीर्तन व अमृतपान हीं काव्यें दादाजींकडे पाठविल्याच्या उल्लेखावरून भारतसमाप्तिकालीं पंतांनीं संतप्रकरणें ( प्रकरण सोळावें ) व भागवती प्रकरणें यांस आरंभ केला होता असें दिसतें.

शके १७०३–१७०७ पंतांचीं भागवती प्रकरणें व मंत्रभागवत हीं रचून झालीं व कार्तिक वद्य ७ बुधवारीं मंत्रभागवत पूर्ण झाल्याचा उल्लेख एका पत्रांत आहे. ही तीथ शके १७०७ मधली दिसतें.

शके १७०१ आळंदीस जयरामनामक स्वामींनीं दासबोधाच्या धर्तीवर जयबोध नामक १८ हजार ओव्यांचा ग्रंथ लिहून संपविला.

शके १७०२ बाबूजी नाईक वारले. यांनीं पंतांस शके १६९९ मध्यें ‘ घरवाडा बक्षीस दिला. ’

शके १७०७–१० पांडुरंगराव नाईक यांच्या सांगण्यावरून व नाइकांच्या मुलांत विभक्तपणाचे तंटे चालले असतांना पंतांनीं घाईघाईनें हरिवंश लिहिला व रामायणें लिहिण्यास प्रारंभ केला.

शके १७१० कार्तिकांत पंत काशीयात्रेस निघाले. त्यांचे पुत्र रामकृष्णपंत यांस जगतापराव निंबाळकर व नरसिंगराव यांनीं अनुक्रमें ३० व ६० बिघे जमीन ‘ पंत सत्पुरुष आहेत हें जाणोन ’ इनाम दिली.

शके १७११ वैशाखांत पंत गयेस गेले होते. आषाढांत काशीस होते, तेथें बराच मुक्काम केला. काशीयात्रेंत पंतांनीं काशी, गंगा इत्यादिकांवरचीं स्तोत्रें ( प्रकरण आठवें पृ० १६९–१७२ ) काशी व गया येथें अनुक्रमें गंगावकीली व विष्णुपदवकीली ह्या

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

रील सांपडेल असें अभय दिलें त्यावरून निश्चिंत जालों. शांतिपर्व भीष्माकडे कृष्ण गेले आहेत, पर्व समाप्त झाल्यावर पाठवीन ” कर्णपर्व गहाळ झालें होतें कीं काय ? द्रोणपर्व कठिण झाल्यामुळें त्यांनीं मागून नवें लिहिलें अशी एक आख्यायिका आहे. सदर पत्रावर ‘ आषाढ वद्य ९ रविवासर’ अशी मिती आहे. आषाढ वद्य ९ स रविवार शके १७०३ मध्यें पडतो, यावरून शके १७०३ मध्यें शांतिपर्वपर्यंत मजल आली होती असें दिसतें.

वाकिल्या व गंगा, काशी, प्रयाग, तीर्थ, शिव इत्यादि नाममंत्र साधून कित्येक रामायणें याप्रमाणें पुष्कळ कविता केली. सोहिरोबा आंबिये यांचा कैलासवास.

शके १७१५ वैशाखांत पंत काशीयात्रा करून परत बारामतीस आले. याच सालीं महिपतीबोवा वैकुंठवासी झाले व पंतमित्र बाबा पाध्ये यांचा ' धर्मसिंधु ' ग्रंथ पंढरीस तयार झाला.

शके १७०७-१७१३ या काळांत पंतांचीं बहुतेक रामायणें प्रकट झालीं.

शके १७१३ पंतांचे मित्र विठोबादादा चातुर्मासे यांचा वैकुंठवास.

शके १७१५ हनुमंतस्वामींनीं श्रीसमर्थ रामदासस्वामी यांची बखर सांगितली.

शके १७१५ पंतांची केकावलि, रामगीति इत्यादि शेवटचीं काव्यें निर्माण झालीं.

शके १७१६ चैत्र शुद्ध १५ मंगळवारीं सूर्योदयीं श्रीरामभक्त हनुमंत यांच्या जन्मोत्सवप्रसंगीं रामभक्त मोरोपंत हे रामरूप झाले.

शके १७१६ चैत्र-शके १७१७ आश्विन; मोरोपंत, अहल्याबाई, महादजी शिंदे, हरिपंत फडके व सवाई माधवराव हे एकामागें एक गेले व महाराष्ट्राची वाग्मिता, पुण्याई, पराक्रम, मुत्सद्दीपण व भाग्य यांचा कांहीं काल अस्त झाला !

---

## मोरोपंतांचें चरित्र आणि काव्यविवेचन.

# अनुक्रमणिका.







प्रत्येक प्रकरणाच्या प्रारंभीं त्या त्या प्रकरणांत येणाऱ्या विषयांचा अनुक्रम सविस्तर दिलाच आहे तो वाचकांनीं अगोदर पाहून मग समग्र प्रकरण वाचावें.

# विशेष महत्वाचे विषय.



## पूर्वार्ध.



---

## उत्तरार्ध.

कुशलवचरित २०३–२०५. सतींचीं गाणीं २०७–२१४. मदालसा-चरित २१४–२१८. हरिश्चंद्राख्यान २१९–२२६. प्रल्हादविजय व पंतांचा सद्ग्रंथरचनेचा निश्चय २२९–२३३. मंत्ररामायण व त्यांतील विप्रलंभशृंगाराचीं व वीररसाचीं अत्युत्कृष्ट उदाहरणें २३५–२४६. त्यांतील दोष २४८–२४९. पंतांच्या कवितेवरचे आक्षेप व त्यांस पंतांचें उत्तर २४९–२५१. 'अभय दिधलें आहे. वाहे शुचि प्रतिभा झरा, २५७. रुक्मिणीविवाहाची प्रेमळ कथा २६२–२६४. विनोदहास्यप्रचुर सुभद्रार्जुनविवाहकथा २६५–२६७. पंतांची धर्मश्रद्धा व ती जागृत राहण्याचीं कारणें:–सत्परिस्थिति, सत्कुलजता व सदभ्यास २७०–२७२. गणेश, व्यंकटेश, देवी व दत्त यांवरचीं स्तोत्रें २७३–२७५. अत्यंत प्रेमळ स्तोत्रें २७७. संशयरत्नावलि, आर्याकेकावलि, नामार्या, नामरसायन, सन्मनोरथराजि, इत्यादि द्वारा स्तोत्रें व त्यांतील भगवंत व भगवन्नाम यांवरच्या अति प्रेमळ व अप्रतिम आर्या २७८–२९४, मोरोपंती भारत २९८–२९९. भारतगौरव व भारताचे मराठी अवतार ३००–३०२. पंतभारताची लोकप्रियता, पंतभारताचा विशेष, पंतांची संक्षपविस्तारकुशलता व मूळ प्रत ३०२–३११. मराठी कविता व मुख्यतः मोरोपंती कविता स्वतंत्र कीं भाषांतररूप? ३११–३१६. पहिल्या पांच पर्वांतील निवडक प्रसंग व आर्या ३१६–३२२. विदुला व गौतमाबाई आणि वीररसाचा उत्कर्ष ३२५–३३२. धर्म, कृष्ण आणि भीष्म ३३५–३४०. वीररसाचीं उदाहरणें ३४१–३४५. कर्ण व शल्य ३४६–३४७. करुणरसाचें उदाहरण ३४८. भारती कथेचें मर्म ३४९–३५०. संत आणि पंत ३५२–३५४. संतवर्णनपर प्रकरणें ३५५–३५७. पंढरपूर व पुंडलीक ३५८–३६०. सत्संग ३६१. सन्मणिमाला ३६२–३६४. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास व महिपति यांवरील पंतांच्या आर्या ३६९–३७१. पंतांची तुकाराम व रामदास यांशीं तुलना कां होत नाहीं? ३७१–३७५. मोरोपंत व वामन पंडित यांची तुलना; सादृश्य व वैसादृश्य ३७६–३८१. मोरोपंत आणि मुक्तेश्वर ३८१–३८४. भागवती प्रकरणें ३८५. भीष्मभक्तिभाग्य ३८६–३९२. कलिगौरव ३९४. ध्रुवाची गोड कथा ३९५–३९७. वामन व बळी यांची बहारीची कथा ३९८–४०१. अंबरीष व दुर्वास यांची कथा व भक्ताची योग्यता ४०२–

# प्रकाशकांचे दोन शब्द.

महाराष्ट्रीय वाचकांपुढें प्रकाशक या नात्यानें येण्याचा आमचा हा पहिलाच प्रयत्न आहे. दे० ल० रा० पांगारकर बी. ए. संपादक 'मुमुक्षु' यांनीं महाराष्ट्रकवि मोरोपंत यांच्या चरित्राचीं साधनें जुळविण्यांत व माहिती मिळविण्यांत आपल्या आयुष्याचीं जवळ जवळ दहा वर्षे घालविलीं आहेत. या ग्रंथांत चरित्रात्मक व काव्यविवेचनात्मक असे दोन मुख्य भाग असून यांत एकंदर वीस प्रकरणें आहेत. या वीस प्रकरणांत पंतांच्या चरित्राची, पंतांच्या काळच्या समाजस्थितीची व पंतांच्या कवितेची भरपूर माहिती असून पंतांच्या कवितेंतील उत्कृष्ट वेंचे विषयप्रतिपादनार्थ मधून मधून घेतलेले आहेत.

चरित्र फारच मोठें असल्यानें व प्लेग सारख्या जबरदस्त विघ्नांनीं व हा आमचा पहिलाच प्रयत्न असल्यामुळें महाराष्ट्रीय वाचकवर्गाच्या हातांत हा ग्रंथ जितक्या लवकर पडावयास पाहिजे होता तितक्या लवकर तो पडला नाहीं तरी आम्हीं शक्य ती खटपट करून थोड्या बहुत उशिरानें कां होईना आज आमच्या महाराष्ट्रीय वाचक वर्गापुढें शक्य तितक्या अल्प किंमतींत हा ग्रंथ सादर करीत आहों. ग्रंथाच्या महत्त्वाकडे लक्ष देऊन महाराष्ट्रीय वाचकवर्ग यास उदार आश्रय देईल, अशी आम्हांस पूर्ण उमेद आहे.

या कामीं रा० रा० केशव रावजी गोंधळेकर जगद्धितेच्छु प्रेसचे मालक यांनीं उदार अंतःकरणानें हा ग्रंथ छापून देण्याचें कबूल करून व छपाईचें काम मुबक करून दिल्यामुळें व आमचे परम स्नेही रा० रा० बापू साहेब कोठवळे वांई व रा० रा० चिं० वा० ब्रह्मे यांजकडून आम्हांस योग्य वेळीं मदत मिळाल्याबद्दल आम्हीं त्यांचे फार फार आभारी आहों.

या ग्रंथाच्या तीन हजार प्रती काढावयाच्या ठरले असतां आम्हांस लोकाश्रय पूर्वी न मिळाल्यामुळें फक्त दोन हजारच प्रती काढिल्या आहेत. तरी महाराष्ट्रीय वाचक वर्गाचा या ग्रंथास पूर्ण आश्रय मिळो व लवकरच आम्हास या अमोल्य ग्रंथाची दुसरी आवृत्ति काढण्याचा सुयोग येवो अशी त्या जगन्नियंत्या प्रभूजवळ प्रार्थना करून आपली रजा घेतों.

माधवबाग
मुंबई नं. ४

व्यवस्थापक,
हिंद एजन्सी.

# प्रकरण पहिलें.



## कुलवृत्तांत आणि जन्म.



**शुद्ध बीजापोटीं । फळें रसाळ गोमटीं ॥ १ ॥**

—श्रीतुकाराम.

१ सौंदळचे पराडकर. २ राष्ट्रीय जागृति व तिचा कोंकणांत प्रसार; भट, भानु, जोशी, पटवर्धन, पराडकर व पाध्ये. ३ रामाजीपंतांचें पन्हाळगडीं आगमन, त्यांचा विवाह, त्यांचीं अपत्यें, मोरोपंतांचा जन्म. ४ मोरोपंतांची पितृभक्ति व कुलाभिमान. ५ पन्हाळगडचा इतिहास. ६ पन्हाळगडची रमणीयता. ७ सौंदळ गांवाचा त्याग.

१ श्रीरामभक्त महाकवि **मोरोपंत** यांचा जन्म पराडकरांच्या कुळांत झाला. **पराडकर** हे कऱ्हाडे ब्राह्मण. यांचें गोत्र जामदग्न्य. यांचा कुळस्वामी सोलापूर जिल्ह्यांत सोनारी ह्मणून एक क्षेत्र आहे तेथील **भैरवदेव** हा होय. सोनारीस भैरवनाथाच्या यात्रेप्रीत्यर्थ दरसाल चैत्रकृष्णपक्षांत मोठी यात्रा भरते. मुक्तेश्वराचा कुलस्वामीही हाच भैरव सुवर्णपुरीचा राजा होय. हें स्थान जागृत असल्यामुळें महाराष्ट्रांतल्या पुष्कळ ब्राह्मण व मराठे घराण्यांचा कुळस्वामी हा भैरवनाथ आहे. पराडकरांचें मूळ राहण्याचें ठिकाण **सौंदळ**, प्रांत राजापूर, जिल्हा रत्नागिरी हें होय. या गांवीं मोरोपंतांचे आठ दहा तरी पूर्वज राहत होते. पराडकरांचे मूळपुरुष **सोनोपंत**. त्यापासून सातवे पुरुष **रामाजीपंत**. रामाजीपंतांस पुत्र दोन—एक **कृष्णाजीपंत** व दुसरे **नरसिंहपंत**. नरसिंहपंतांची संतती सातारा व वऱ्हाड या प्रांतांत विस्तारली. कृष्णाजीपंतांस पुत्र दोन—एक **रामाजीपंत** उर्फ **बापूजीपंत** व दुसरे **मेघश्यामपंत**. रामाजीपंत हेच कविवर्य मोरोपंतांचे जनक होत. या सौंदळच्या पराडकर मंडळीकडे डांगीपतकीचें वतन कित्येक पिढ्यांपासून चालत आलें

होतें. डांगे ह्मणजे जमिनीवरील जकात घेणारे अधिकारी, व पतकी ह्मणजे समुद्रावरील जकात घेणारे अधिकारी. पराडकरांकडे दोन्ही अधिकार चालत असत. सौंदळ हा गांव राजापूरच्या पूर्वेस चार पांच कोसांवर आहे. राजापूर हें कोंकणांतलें अत्यंत प्रसिद्ध बंदर असून पूर्वी आफ्रिका, झांझिबार, अरबस्थान वगैरे देशांतून आरबी जहाजें किराणा माल घेऊन राजापूर बंदराला लागत व देशावरचा आणि कोंकणांतला माल घेऊन परत आपल्या देशीं जात. राजापूर प्रांताच्या पूर्वेस सह्याद्रीची रांग असून घाटमाथा उतरल्याबरोबर कोल्हापूर प्रांताचीच हद्द लागते. देशावरून राजापुराकडे येतांना आणि राजापुराहून देशावर जातांना वाटेंत सौंदळ लागतें. तेव्हां राजापुराहून कोल्हापुरास जाणारायेणारांस अणस्कुराघाटांतून जावें यावें लागे. या घाटांतून बैलगाडी सुद्धां न्यायची सोय नसे. घोडीं जात येत, व गोणींचे बैल घेऊन लमाण वगैरे लोक मालाची नेआण करीत. राजापुराहून कोल्हापुराकडे जाणारांना सौंदळास पहिला मुक्काम करावा लागे. सौंदळ हें वस्तुतः खेडेगांवच होतें. सौंदळकरांना बाजारपेठ ह्मणजे राजापुरचीच होती. राजापुरास फ्रेंच, इंग्रज व डच यांच्या वसाहती होत्या. राजापुरचा व्यापार, राजापुरची गंगा, राजापुरची उन्हेरी यांमुळें राजापूर गांव मोठ्या योग्यतेस चढलें होतें. सौंदळ व राजापूर यांचें हरघडी दळणवळण होतें. तथापि सौंदळला खेडेगांवापेक्षां ज्यास्त किंमत नव्हती. सौंदळचें हवापाणी आरोग्यकारक होतें. या खेडेगांवांत पराडकरांच्या कित्येक पिढ्या होऊन गेल्या. अशा या खेडेगांवांत जन्मलेल्या रामाजीपंत पराडकरांच्या पोटीं महाराष्ट्र कविशिरोरत्न जन्मास येईल असें त्या वेळीं कोणाच्या ध्यानीं मनीं तरी आलें असेल काय? तथापि मोरोपंतांच्या जन्मस्थानाचा मान मात्र सौंदळला मिळायचा नव्हता, तो पन्हाळगडला मिळायचा होता. असो, सौंदळचे पराडकर पन्हाळगडावर केव्हां व कां गेले हें पाहूं.

२ शिवाजी महाराजांचा अवतार हिंदुत्वाच्या संरक्षणार्थ झाला. त्यांनी परदेशी व परधर्मी यवनांना पादाक्रांत केलें. महाराष्ट्रीयांना स्वराज्य मिळवून दिलें, स्वधर्म व स्वभाषा यांचा प्रतिपाळ केला व महाराष्ट्रांत स्वाभिमानाची प्रचंड ज्योत पेटविली. शिवाजीराजांचे पुत्र संभाजी व राजाराम यांच्या कारकीर्दीत मराठ्यांची मर्दुमकी कसाला लागली. परमेश्वराची पूर्ण कृपा झाल्यामुळें संतमहंत, कवि व शाहीर, वीर व मुत्सद्दी यांचा महाराष्ट्रावर

एकसारखा पाऊस पडत होता. स्वधर्म, स्वदेश व स्वभाषा यांच्या उत्कर्षार्थ झटणाऱ्या कर्त्या, बुद्धिवंत व उत्साही पुरुषांची परंपरा चालली होती. एकनाथ, रामदास, तुकाराम, वामनपंडित, शिवाजी महाराज, तानाजी मालुसरे, बाजी प्रभु, मोरोपंत पिंगळे, दादोजी कोंडदेव, बाळाजी आवजी, प्रल्हाद निराजी, रामचंद्र निळकंठ, धनाजी जाधव, संताजी घोरपडे, खंडो बल्लाळ, बहिरजी नाईक, श्रींधरस्वामी वगैरे नररत्नें महाराष्ट्रांत अल्पावधींतच निर्माण झालीं! आपलेपणाचा अभिमान सर्वांच्या अंगांत खेळत होता. महाराष्ट्रभर परमार्थबुद्धि उडूं लागली होती, कर्तत्वशक्ति उसळूं लागली होती, उत्साह व वीरश्री एकत्र नांदू लागले होते, देवभक्ति व देशभक्ति यांचें ऐक्य झालें होतें, व ' महाराष्ट्रानें सर्व राष्ट्रांचे राजे ' होण्याची प्रचंड महत्वाकांक्षा बाळगली होती. महाराष्ट्र जीवंतपणाचे सर्व चाळे करूं लागला होता. भक्तिबळ, युक्तिबळ व शक्तिबळ हीं तीनही बळें महाराष्ट्रांत एकवटल्यामुळें महाराष्ट्र भरतखंडाचें चक्रवर्तित्व संपादण्यास लागल्याचा सर्व जाणत्यांस भास होऊं लागला होता. याप्रमाणें देशावर कर्त्या पुरुषांनीं जे पराक्रम केले, त्यांचे प्रतिध्वनि कोंकणांतल्या गिरिगव्हरांतून दुमदुमूं लागले. देशावर ईशदयेनें जी कर्तृत्वाची लाट उसळली तिचा धक्का सह्यपर्वताच्या द्वारें साऱ्या कोंकणपट्टीस बसला व दहा वीस वर्षांतच कोंकणांत वीर्यवती प्रजा निपजली. भट, भानु, जोशी, पटवर्धन, पराडकर व पाध्ये ह्या सहा घराण्यांतले जे पुरुष इ० स० १७००-१७१५ या पंधरा वर्षांत देशावर आले त्यांनीं किंवा त्यांच्या मुलांनीं आपल्या कर्तृत्वशक्तीची प्रभा सर्वत्र पाडली. देशावरच्या वीरपरंपरेंत वीर मिसळले, मुत्सद्यांत मुत्सद्दी घुसले, कवींत कवि प्रविष्ट झाले, व देशाला कोंकणचा पाठिंबा मिळून महाराष्ट्राची कीर्ति विस्तार पावली. बाळाजी विश्वनाथ भटानें पेशवाईची प्राणप्रतिष्ठा केली. भानूंत नाना फडणिसानें मुत्सद्देगिरी गाजविली. जोशांत बाबूजी नाईक बारामतीकर कोट्याधीश झाले. पटवर्धन मंडळांत दहा वीस वीरांनीं आपल्या समशेरींचें पाणी जगाला दाखविलें. पराडकरांत मोरोपंतांनीं महाराष्ट्र भाषेला अभियुक्त भाषेची योग्यता आणून दिली व पाध्ये मंडळींत काशिनाथ बाबा पाध्ये यांनीं ' धर्मसिंधु ' उत्पन्न केला ! भट, भानु, जोशी व पटवर्धन हे लक्ष्मीची उपासना करण्याकरितां शाहू महाराजांच्या राज्यारोहणाच्या समयास साताऱ्यावर उतरले व पराडकर

आणि पाध्ये हे सरस्वतीच्या उपासनेसाठीं पन्हाळगडावर चढले. कोणी बाहुबलानें गाजले, कोणी बुद्धिबळानें गाजले; पण हे सर्व जण कर्तृत्वाचें तेज जगाला दाखवून नांव कमावून गेले यांत शंका नाहीं. पेशवाई मिळ- विणें [illegible] गाजले [illegible] श्रम [illegible] व स्वधर्म [illegible] [illegible] पडले. भटभानूंनीं अर्थ व काम हे पुरुषार्थ साधण्यासाठीं जिवापाड श्रम केले. पंतपाध्यांनीं धर्म व मोक्ष यांच्या प्राप्ती[illegible] आयास केले. कोणताही पुरुषार्थ साधण्याचा प्रयत्न करणारा पुरुष कर्तृत्वाचाच असतो, व अलौकिक कर्त्या पुरुषांपैकीं मोरो बापूजी पराडकर हे एक असल्यामुळें त्यांचें चरित्र गाण्यासाठीं हा ग्रंथ लिहिण्याचा उपक्रम मी करीत आहें.

३. मोरोपंतांचे वडील रामाजीपंत उर्फ बापूजीपंत पराडकर हे सौंदळास राहत, व पाध्यांचा मोठा भरणा गोळवलीस असे. पाध्यांच्या घराण्याची विशेष माहिती पुढें येईल. पाध्यांचें घराणें विद्वत्तेविषयीं प्रसिद्ध असे. या पाध्यांपैकीं केशव पाध्ये व गणेश पाध्ये हे बंधु व रामाजीपंत पराडकर असे तिघे शके १६३५ च्या ( इ. स. १७१३ च्या ) सुमारास रत्नागिरी जिल्हा सोडून अणुस्कुरा घाटानें कोल्हापुरास आले व तेथून कोल्हापूरची राजधानी जो पन्हाळगड त्यावर कायमचें राहण्यास गेले. कोल्हापुरास किर्लोस्करांचें घराणें होतें, त्यांपैकीं एका मुलीशीं रामाजीपंताचा विवाह शके १६४० ( इ. स. १७१८ ) च्या सुमारास झाला. त्या मुलीचें नांव लक्ष्मी असें ठेविलें. रामाजीपंताला गडावर मुजुमदारीची लहानशी असामी मिळाली. गडावर गेल्यानंतर पराडकर व पाध्ये यांनीं केवळीं घरें शेजारीशेजारीं बांधलीं. पाध्यांनीं विद्यार्थ्यांस संस्कृत विद्या पढविण्यास प्रारंभ केला. रामाजीपंतांस तीन मुलगे व एक कन्या अशीं चार अपत्यें झालीं. वडील पुत्राचें नांव सोनोपंत असें ठेवलें. हें नांव कुळस्वामीच्या नांवावरून ठेवलेलें उघडच दिसतें. सोनोपंतांच्या पाठीवर एक कन्या ‘ आका ’ झाली. नंतर मोरोपंत झाले व शेवटीं आबा झाले. सोनोपंत, आका, मोरेश्वर व आबा हीं चार अपत्यें रामाजीपंतांना पन्हाळगडावरच झालीं. मोरोपंतांनीं आपल्या हातांनीं पूर्ववयांत लिहिलेल्या एका ग्रंथाच्या शेवटीं ‘ सोनोपंतानुजनेरिदं पुस्तकम् ’ असें लिहिलें आहे. ‘ गोवर्धनाचार्य सप्तशतीदीपन ’ नामक स्वलिखित ग्रंथाच्या शेवटीं त्यांनीं पुढील श्लोक लिहिला आहे:—

**लक्ष्मीरामात्मजनुषा स्वर्णदेवानुजन्मना ।**
**मयूरेश्वरपंतेन लिखितं द्रुतमादरात् ॥ १ ॥**

पंतांचे आईबाप सदाचरणी होते. ते गाणपत्य होते. श्रीगणपतीच्याप्रसा- [illegible] त्यांच्या प्रेमानें 'मयूर' [illegible] अशी ला- कांची समजूत आहे. शके १७५६ मध्ये रचलेल्या भक्तमंजरीमालेंत मोरोबा- विषयीं राजाराम प्रासादी ह्मणतात:--

**चतुर्थीचें उभयतां व्रत । माता पिता अनुष्ठित ।**
**जन्मांतरींचें थोर सुकृत । आले गणनाथ उदरासीं ॥ १ ॥**
**ते श्रीगुरु मोरोपंडित । गणपतीचा अवतार सत्य ।**
**जगदुद्धार करावया कृत्य । जाहले अपत्य द्विजाचें ॥ २ ॥**

शके १६५१ ( इ. स. १७२९ ) या वर्षी सौम्यनामसंवत्सरीं स्वकुलास व स्वजातीसच काय, पण अखिल महाराष्ट्रास ललामभूत होणाऱ्या सत्पुत्र- रत्नास लक्ष्मीबाईनें जन्म दिला. धन्य तिचा कुसवा कीं ज्यापासून असलें मौक्तिक जगतास मिळालें.

रामाजीपंत व लक्ष्मीबाई यांजविषयीं आपणांस विशेष माहिती नाहीं, तथापि असलें दिव्य रत्न प्रसविणारी कुक्षि परम शुद्धच असली पाहिजे. कर्ण हा सूतपुत्र राधेय नसून क्षत्रिय वीर्याचा आहे असें त्याच्या पराक्रमावरूनच दिसतें, असें सांगतांना पंतांनींच ह्मटलें आहे ( कर्णपर्व अ० २२–३९ ) कीं सामान्य नद्यांतही शिंपा पुष्कळ असतात पण त्या मोतीं प्रसवत नाहींत, तर मौक्तिकें हीं सिंधुशुक्तिगर्भीच उपज- तात ! पृथ्वीच्या पोटीं सुधाकर निपजेल काय ? हरिणी व्याघ्राला प्रस- वेल काय ? कधींही नाहीं. त्याप्रमाणेंच मोरोपंतासारखें सद्रत्न प्रसविणारीं मातापितरें हीं सत्वसंशुद्धच असलीं पाहिजेत यांत तिळमात्र संशय नाहीं. स्वतः पंतांना आपल्या शुद्धकुळाचा व मातापितरांचा मोठा अभिमान वा- टत असे. जागोजाग आपल्या ग्रंथांत ते आपणांस 'रामात्मज,' 'रामनं- दन,' 'रामसुत,' वगैरे विशेषणें लावतात. कोठें 'लक्ष्मी- तनुज' 'लक्ष्मीचें तोक,' 'लक्ष्मीकुक्षिभव' अशा पदांनीं आपल्या जन- नीविषयीं आपला प्रेमादर व्यक्त करितात, व कोठें तर 'लक्ष्मीरामतनुज,'

रामलक्ष्मीतनुसंभव, ' याप्रमाणें उभयतांविषयीं आपला पूज्यभाव प्रकट करितात. याप्रमाणें पंतांनीं आपल्या काव्यांत व हस्तलिखित पोथ्यांत जागोजाग आपल्या पितरांविषयीं प्रेमोल्लेख केले आहेत. एका पोथीच्या शेवटीं त्यांनीं स्वतांस ' रामात्मलब्धसज्जन्म ' असें विशेषण लाविलें आहे. बाराव्या श्लोककेकेंत त्यांनीं ' पटुत्व सकलेंद्रियीं, मनुजता, सुवंशीं जनीं ' ह्मणजे इंद्रियपाटव, मनुष्यपण व उत्तम कुळांत जन्म दिल्याबद्दल ईश्वराचे उपकार मानले आहेत. त्यांनीं भारतादि ग्रंथांत कुलाभिमान, कुलधर्म, कुलाचार यांची पुष्कळ ठिकाणीं महती गायिली आहे. पंतांना आपल्या पितरांविषयीं फारच आदर वाटत असे. ' नरजन्मपर्व दुर्लभ ' आहे असा मनाचा निश्चय झाल्यामुळें मोरोबांनीं सारा जन्म भगवंताचीं सगुण चरित्रें गाण्यांत व देहाचें सार्थक करण्यांत घालविला; तर श्रेष्ठ, पवित्र व कुलीन असून ब्राह्मणकुलांत जन्म देणाऱ्या आपल्या मातापितरांविषयीं त्यांच्या सारखा सत्कुलजपुत्र अखंड उपकारबुद्धि कां बरें वाहणार नाहीं ? कृष्णविजयांत ( अ० ४५ ):—

**सकळार्थदकृतिकायप्रद पितरांची फिटेल उपकृति काय ? ॥ ११ ॥**

असा सुरस पद्यार्थ त्यांनींच घातला आहे. ' सकळार्थ ह्मणजे धर्म, अर्थ, काम व मोक्ष, हे चारी पुरुषार्थ साधून देणारा नरदेह ज्यांच्यापासून मिळतो त्यांचे उपकार कधीं तरी फिटतील काय ? ' असो. अशी भावना नित्य बाळगणाऱ्या सत्पुत्राचीं मातापितरें परम पवित्र होतीं यांत कांहीं शंका नाहीं.

५. मोरोपंतांचा जन्म पन्हाळगडावर झाला. त्यांचें बाळपण तेथेंच गेलें व गुरुगृहीं राहून अभ्यास करायचा काळही तेथेंच गेला. त्यांनीं आपल्या आयुष्याचीं पहिलीं २३।२४ वर्षे पन्हाळगडावर काढलीं. पंतांच्या चरित्राशीं इतका निकट संबंध ज्या गडाचा होता त्याचें येथें थोडेंसें वर्णन देणें अयोग्य होणार नाहीं. सह्याद्रीपर्वताशीं काटकोन करून जी डोंगराची रांग कोल्हापूर प्रांतांत आली आहे त्यांतील एका सुळक्याच्या मस्तकावर पन्हाळगड आहे. हा कोल्हापुरापासून बारा मैलांवर कोल्हापूरच्या वायव्य दिशेस आहे. हा समुद्राच्या सपाटीपासून २७७२ फूट उंच आहे व कोल्हापुरच्या पृष्ठभागापासून ७०० फूट आहे. याचा घेर साडेचार मैलांचा आहे. शिलाहार

घराण्यांतला अत्यंत बलाढ्य राजा दुसरा भोज ( इ. स. ११००-११३१ ) यानें दक्षिण महाराष्ट्रांत बावडा, सातारा, विशाळगड, वगैरे १५ किल्ले बांधले त्यांत हा बांधला. यावरचें सृष्टिसौंदर्य फार चित्तहारी असल्यामुळें त्यानें इ. स. १११३ मध्यें पन्हाळगडच आपल्या राजधानीचें ठिकाण केलें. इ. स. १४८९ पर्यंत हा हिंदूराजांचे ताब्यांत होता, व त्यानंतर तो विजापूरकरांच्या ताब्यांत गेला. अदिलशाही बादशहांनीं त्यावर तटबंदी केली, मोठमोठे दरवाजे बांधले, व त्याची मजबुती व शोभा वाढविली. इ. स. १६५९ मध्यें अफजुलखानाच्या वधानंतर हा किल्ला शिवाजी महाराजांनीं घेतला, पण पुढल्याच वर्षी शिद्दीजोहारानें त्याला वेढा घातला व शिवरायाला चार महिने आंत कोंडून टाकलें. शिवराय तेथून निसटले, पण किल्ला पुन्हां यवनांच्या ताब्यांत गेला. शिवरायानें तो इ. स. १६७३ मध्यें पुन्हां परत घेतला व तो अखेरपर्यंत त्यांजकडेच राहिला. याच गडावर संभाजीला शिवरायानें सक्त पहाऱ्यांत ठेवलें होतें. मध्यंतरीं तो एक वेळ अवरंगझेब बादशहाच्या हातीं पडला होता, पण रामचंद्रपंत अमात्य यांनीं तो मोंगलांपासून इ. स. १७०१ मध्यें लढून घेतला. चार वर्षांनीं ताराबाईनें त्यावर कायमची वस्ती केली व इ. स. १७०८ मध्यें चार महिने जरी तो शाहूच्या हातांत पडला होता तरी पुढील सालीं इ. स. १७०९ सालीं तो ताराबाईनें परत घेतला व त्यानंतर तो कोल्हापूरकरांच्या ताब्यांतून कधींही गेला नाहीं. ताराबाईनें आपली कायमची वस्ती पन्हाळगडावर केल्यामुळें व कोल्हापूर दरबारचें तो मुख्य ठिकाण झाल्यामुळें यानंतर पन्हाळगडची वस्ती वाढली, बाजार वाढला, शिबंदी वाढल्यामुळें व अनेक कचेऱ्या व फड गडावरच कायम झाल्यामुळें शिवाजी महाराजांच्या वेळीं जसें रायगडचें ऐश्वर्य वाढलें होतें तसेंच यानंतर पन्हाळगडचें वाढलें. गडाखालीं पेठा वसल्या व मराठ्यांच्या स्वातंत्र्यसौख्याचें दुसरें निशाण पन्हाळगडावर फडकूं लागलें. इ.स.१७०९ पासून इ. स. १७८२ पर्यंत कोल्हापूरकरांचें दरबार पन्हाळगडावर भरत होतें, त्यानंतर तें तेथून हाललें व कोल्हापुरास गेलें. पन्हाळगडाला ताराबाईनें राजधानी बनवल्यापासून मोहरानें लवलेल्या आम्रवृक्षाकडे आम्रासवपानासाठीं ज्याप्रमाणें भ्रमरांच्या झुंडीच्या झुंडी लोटाव्यात त्याप्रमाणें देशावरील व कोंकणांतील शेंकडों गुणी लोक दैव काढण्यासाठीं पन्हाळगडावर लोटले. पराडकर व पाध्येही अशाच वेळीं आपल्या गुणांचा प्रकाश पाडण्यासाठीं

किंवा नशिबाची परीक्षा पाहण्यासाठीं कोंकणांतलीं आपलीं वृत्तीचीं गांवें सोडून पन्हाळगडावर आले.

६. पन्हाळगडचा देखावा अत्यंत रमणीय आहे. तेथील हवा इतकी आरोग्यकारक आहे व पाणी इतकें स्वच्छ व पाचक आहे कीं, महामारीप्रभृति रोग तेथें कधींही उत्पन्न होत नाहींत व उत्पन्न झाले तरी जीव धरीत नाहींत ! जागजागीं कडे तुटलेले मोठमोठे खडक व खडकांत खोदलेल्या गुहा व लेणीं आहेत. त्यावरून असें वाटतें कीं प्राचीनकाळीं मोठमोठे योगी व संतमहंत यांनीं हें स्थान तपाचरणासाठीं व भगवदाराधनेसाठीं आपलेंसें केलें असावें. गडावर लहानमोठे तलाव व 'निर्झरोदकाचे सैरावैरा धांवणारे पाट' पुष्कळ आहेत. त्या सर्वांत उत्कृष्ट असलेल्या झऱ्याचें नांव 'नागझरी' आहे. नागझरीजवळच एका डोंगराच्या पोटांत खोदलेली एक अतिरम्य गुहा आहे, तिला पराशर ऋषींची गुहा असें ह्मणतात. इ. स. १७३० मध्यें रचलेल्या 'करवीरपुराणांत' या गडाला 'पन्नगालय' असें नांव दिलेलें आढळतें. या गडावर पराशरमुनींची गुहा असल्यामुळें याला पराशरक्षेत्र असेंही ह्मणतात. पराशर हे महाभारतकार भगवान् व्यासांचे जनक होय. या 'पन्नगालया' वर पूर्वी सर्प फार होते व त्यांजपासून मनुष्यांना फार पीडा होत असे, ह्मणून पराशरमुनीनें तेथील सर्पांस मनुष्यहितार्थ निर्विष करून टाकलें; तेव्हांपासून गडावरील मनुष्यांस सर्पबाधा होत नाहीं असें ह्मणतात. असो. हें पन्नगालय ह्मणजे पन्हाळगड ऊर्फ पराशरक्षेत्र प्राचीनकालापासून अतिप्रसिद्ध आहे. हें तपस्व्यांचें व वीरांचें क्षेत्र आहे. गडावर नानाप्रकारचे वृक्ष आहेत; गर्द झाडी आहे; कापींचीं, वेलदोड्याचीं, नागचाफ्याचीं पुष्कळ झाडें असून वसंतांत वर राहणें फारच आनंदकारक आहे. मुसलमानांनीं बांधलेल्या दगडी इमारती, तलाव व विहिरी, त्याचप्रमाणें हिंदूंचीं देवळें गडावर बरींच आहेत. वर कोल्हापूरच्या महाराजांचा एक प्रेक्षणीय राजवाडा आहे. गडावर गंगा, यमुना व सरस्वती या नांवांचीं दगडी कोठारें आहेत, तीं फार भव्य असून त्यांतलें सर्वांत मोठें 'गंगाकोठी' नांवाचें कोठार तर ३५ फूट उंच व १०००० चौरस फूट आहे. गडावर पावसाळ्यांत पाऊस अति असतो, हिंवाळ्यांत थंडीही अतिशय पडते. उन्हाळ्यांत मात्र गडावर राहणें फारच सुखावह होतें. गडावरून 'सभोंवारचा देखावा अत्यंत रमणीय दिसतो. असें निस-

गरमणीय स्थान मोरोपंतांसारख्या निसर्गकवीस पूर्व वयांत राहण्यास मिळालें हें उत्तम झालें.

७. रामाजीपंत पन्हाळगडावर येऊन राहिले. तेथें त्यांचा संसार गरीबीनेंच चालला होता, पण तो थोडासा थाटल्यावर त्यांनीं आपले धाकटे बंधु मेघश्यामपंत यांसही गडावर बोलावून घेतलें. यानंतर पराडकरांचा सौंदळशीं संबंध बहुतेक कायमचा तुटल्यासारखा झाला. मेघश्यामपंत व त्यांचे दोन पुत्र हे रामचंद्रपंत अमात्य बावडेकर यांच्या आश्रयास गेले. रामाजीपंतांची पन्हाळगडावर पंचवीस वर्षें वस्ती झाली. त्यानंतर ते बारामतीस गेले. पण तो कथाभाग पुढें सांगण्यांत येईल. पराडकरमंडळी कोंकण कायमचें सोडून देशावर आली एवढी गोष्ट खरी. यानंतर मोरोपंत पांच चार वेळ आपलें वतनी उत्पन्न आणण्यास कोंकणांत गेले होते. पण त्यांचा सौंदळशीं संबंध तुटला तो कायमचाच तुटला. पंत आपल्या मुलामुलींच्या लग्नप्रसंगीं आपले कुलोपाध्याय वरेकर भटजी यांस बारामतीस अगत्यपूर्वक बोलावून आणीत असत. सध्यां सौंदळला एकच ब्राह्मणाचें घर आहे आणि तें या भटजींच्या वंशजांचेंच होय. पराडकरांचें मूळचें राहतें घर भालेकरघाडींत शंकराच्या देवळानजीक होतें. तेथें सध्यां भातखाचरें आहेत. तथापि तेथें अद्याप पराडकरांच्या राहत्या घराचा चौथरा दाखवितात. तेथल्या नऊ मानकऱ्यांपैकीं पराडकर हे एक असल्यामुळें अद्याप होळीच्या वेळीं एक व दिवाळींत एक असे दोन नारळ दरसाल त्यांच्या मार्फत ठेवण्यांत येतात. पराडकरांच्या पडत्या घराला तिकडे कोणी हात लावीत नाहींत, कारण तिकडे अशी समजूत आहे कीं अशा घरबंद्यास हात लावल्यास देवाचा कोप होतो. असो. पराडकरांचें मूळ गांव सौंदळ हें याप्रमाणें सुटलें. ते पन्हाळगडावर तरी ३९ वर्षेंच राहिले होते. तेंही गांव त्यांचें नंतर सुटलें व रामाजीपंत, मोरोपंत व त्यांची सारी मंडळी इ. स. १७९२ च्या सुमारास बारामतीस राहण्यास गेली. पराडकर पन्नास साठ वर्षें बारामतीस राहिले, व नंतर मोरोपंतांचे चिरंजीव बारामती सोडून पंढरीस राहण्यास गेले. त्यांचे वंशज आज तागाईत पंढरपुरासच राहत आहेत. मोरोपंतांच्या पूर्वजांचें गांव सौंदळ, त्यांचें विद्याभ्यासाचें गांव पन्हाळगड, त्यांच्या कर्तृत्वाचें गांव बारामती, व त्यांच्या वंशजांचें गांव पंढरपूर! मोरोपंतांनीं विद्या कमावली पन्हाळगडावर, व तिचें सार्थक केलें बारामतीस! त्यांची सर्व काव्यरचना

बारामतीस झाल्यामुळें व त्यांच्या आर्या जगांत प्रसार पावण्याकरितां बारामतीहूनच सुटल्यामुळें त्यांना मोरोपंत बारामतीकर असें ह्मणूं लागले. असो. या प्रकारांचें विस्तृत वर्णन पुढें यथाप्रसंग येणारच आहे. अगोदर मोरोपंतांचा विद्याभ्यास ज्या गुरूंच्या हाताखालीं झाला त्यांच्या विषयीं पुढील प्रकरणांत विचार करूं.



# प्रकरण दुसरें.



## मोरोपंतांचे गुरु.



**ज्ञानामृतें भरूनि तो स्वस्थाना, जेंवि मेघ जलधीनें।**
**पाठविला निववाया जग त्या गुरुनें दयाविमलधीनें ॥ २५ ॥**

—आदिपर्व अ० २

१ पाध्यांचें पन्हाळगडावर आगमन. २ पंतांचे चौघे गुरु. ३ वडील रामाजीपंत व विद्यागुरु हरि. ४ पाध्यांबद्दल पन्हाळगडीं शोध. ५ पंतांच्या अध्ययनास प्रारंभ, त्यांचा बाळपणचा स्वभाव, व त्यांचे सहाध्यायी. ६ पंतांचे गुरु केशव पाध्ये व गणेश पाध्ये. ७ पंतांची गुरुभक्ति. ८ पराशर क्षेत्र. ९ पाव आण्याची चूक व मोरोपंतांचें बारामतीस गमन.

१ मोरोपंतांचे वडील रामाजीपंत पराडकर हे ज्या वेळीं कोंकणांतून पन्हाळगडावर आले, त्याच सुमारास केशव पाध्ये व गणेश पाध्ये हे पाध्ये बंधूही आले. पाध्यांचें घराणें रत्नागिरी जिल्ह्यांत शें दोनशें वर्षे विद्वत्तेविषयीं गाजलें होतें. पाध्यांचें मूळ गांव गोळवली. केशव पाध्ये व गणेश पाध्ये हे उभयबंधु धर्मशास्त्र, काव्य, मीमांसाशास्त्र व न्यायशास्त्र यांत पारंगत होते. हे पन्हाळगडावर आल्यानंतर यांची विद्वत्तेविषयीं चोहोंकडे चांगली ख्याति झाली. पन्हाळगड हें राजधानीचें शहर बनल्यामुळें यांच्या विद्वत्तेची तेथें चहा होऊं लागली व कोल्हापूरच्या राज्यांतले पुष्कळ विद्यार्थी यांच्याजवळ विद्याभ्यासार्थ येऊन राहिले. पण यांचीं नावें आज आपल्या कानांवर पडायचें कारण यांचे शिष्य मोरोपंत हेच होत. केशव पाध्ये व गणेश पाध्ये यांनीं बन्हाळगडावर पन्नास वर्षांत शेंकडों विद्यार्थी तयार केले; पण 'एकश्चंद्रस्तमो हन्ति नच तारागणोऽपि चं' या न्यायानें पंतांसारखा त्यांचा एकच शिष्य त्यांच्या श्रमाचें चीज करून त्यांची कीर्ति भूतलावर पसरण्यास कारण झाला. 'तिहीं लोकीं सत्कीर्तीचा झेंडा फडकविणारा' असा शिष्य मिळणें ही तरी मोठ्या भाग्याची गोष्ट आहे!

२ पंतांनीं गंगावकिलींत " गुरु माझे श्रीराम, श्रीमत्केशव, गणेश, हरि, चवघे " याप्रमाणें आपल्या चौघां गुरूंचा उल्लेख केला आहे; व संस्कृत मंत्ररामायणांत ' श्रीकेशवं श्रीगणेशं वंदे विद्यागुरुं हरिम ' याप्रमाणें केशव, गणेश व हरि या तिघांना नमन केलें आहे. या दोन्ही उल्लेखांवरून पंतांना राम, केशव, गणेश व हरि याप्रमाणें चार गुरु होते असें स्पष्ट दिसतें. हे कोण असावेत तें पाहूं.

३ ' राम ' हे पंतांचे वडील रामाजीपंत होत; ' विद्यागुरु हरि ' हे पंतांचे मौंजीबंधन करणार त्यांचे सौंदळचे कुलोपाध्याय हरभट बरेकर होत; केशव आणि गणेश हे पाध्येबंधु होत. हरिभटजी बरेकर यांना राज्याभिषेक शक ४९ ह्म. श. १६४५ मध्यें, पंतांच्या जन्मापूर्वी सहाच वर्षें वतनाची एक सनद मिळाली, तिचा उपभोग त्यांचे वंशज अद्याप घेत आहेत. पंतांना आपल्या मातापितरांविषयीं परमादर वाटत होता, हें पहिल्या प्रकरणांत सांगितलेंच आहे. बृहद्दशमांत ( अ. ८० ) त्यांनीं म्हटल्याप्रमाणें 'गुरु आद्य पिता, दुसरा विद्याप्रद' असाच क्रम घेतला पाहिजे. म्हणून पंतांनीं प्रथम गुरुस्थान आपल्या जनकास दिलें हें योग्यच केलें. आतां राहिले दोन गुरु, केशव पाध्ये व गणेश पाध्ये, यांच्याविषयीं अमळ विचार करूं.

४ गणेश पाध्ये यांचे वंशज पन्हाळगडीं राहत असल्यामुळें त्यांजकडे पंतांची व त्यांच्या गुरूंची कांहीं विश्वसनीय माहिती मिळेल अशा समजुतीनें ७ वर्षांपूर्वी मी तिकडे गेलों होतों, पण तेथें कांहीं विशेष माहिती मिळाली नाहीं. पन्नास वर्षांमागें पन्हाळगडावर मोठें बंड झालें तेव्हां गडावरचीं बहुतेक घरें लुटलीं गेलीं व फार जाळपोळ झाली; त्यांत पाध्यांच्या घरचीं दप्तरें अग्न्यर्पण झालीं एवढी मात्र माहिती लागली ! या दप्तरांत पंतांनीं पूर्ववयांत अभ्यासिलेल्या व स्वतः लिहिलेल्या कांहीं पोथ्या होत्या व त्यांतच पंतांचीं शें दोनशें पत्रें होतीं ! गडावर पंतांची इत्थंभूत माहिती व त्यांच्या पुष्कळ आख्यायिका सांगणारा एक ९० वर्षांचा वृद्ध गृहस्थ शके १८०२ च्या सुमारास वारला असें तेथें मला पुष्कळ जणांनीं सांगितलें. ह्या गृहस्थानें बाळपणीं पंतांस पाहिलें होतें, पंत व त्यांचे गुरु यांच्या आख्यायिकांचा त्याजजवळ मोठा भरणा होता, व पंतांच्या कवितेचा त्याला मनस्वी छंद होता. पंतांच्या चरित्राची कल्पना माझ्या पूर्वीं एखाद्या मयूरभक्तास आली असती तर किती बहार झाली असती ! परशुरामपंत तात्या जर पन्हाळगडावर जाते,

तर त्यांना पंतांना पाहिलेले दहा पांच इसम भेटले असते, पाध्यांच्या घरचीं दप्तरें पाहायला सांपडलीं असतीं व पंतांचा व त्यांच्या गुरूंचा सारा पत्रव्यवहार मिळाला असता ! निदान विष्णुशास्त्र्यांना पन्हाळगडावर जायची बुद्धि झाली असती तरी त्यांच्यासारख्या चौकस व रसिक पंडितानें पूर्वोक्त वृद्धांपासून पंतविषयक पुष्कळशा आख्यायिका लिहून घेतल्या असत्या ! पण तसा योगायोग नव्हता ! पंतांच्या चरित्राची कल्पनाच पंतांच्या पश्चात् शंभर वर्षांनीं उद्भवली व त्यामुळें पंत व पाध्ये यांचीं घरें, त्यांच्या पोथ्यापत्रें व आख्यायिका यांना हुडकणाऱ्या त्यांच्या प्रस्तुत चरित्रकारास शके १८२२ च्या वसंतांत पन्हाळगडावरच्या पडक्या इमारती, जीर्ण झालेलीं व अव्यवस्थित असलेलीं दहा पांच दप्तरें व परंपरेनें कांहीं गोष्टी सांगणारे गैर माहितगार तरुण यांच्यावरच सारी भिस्त देऊन पंतांच्या पूर्वचरित्राची माहिती गडावरच्या वृक्षपाषाणांना विचारीत आठ दिवस सारखें हिंडावें लागलें ! पंत व पाध्ये यांच्या घरांमध्यें तीनच हातांचें अंतर आहे. पाध्यांच्या घरांत पाध्यांचे वंशज राहतात. पंतांचें घर मात्र नाहींसें झालें, व त्याच जागेवर सांप्रत एक जीर्ण धर्मशाळा उभारलेली असून मी गडावर गेलों तेव्हां त्या धर्मशाळेंत एक पोलिस पार्टी उतरलेली पाहिली ! दीडशें वर्षांपूर्वीचें पंतांचें गडावरचें चरित्र मला कोणी सांगेल काय ह्मणून मी उत्सुकतेनें सारा गड पालथा घातला; पण फारसा उपयोग झाला नाहीं !

५. पन्हाळगडावर पंत व पाध्ये यांच्या घराच्या वळचणी एकमेकीला लागलेल्या असल्यामुळें मोरोबाच्या जन्मापासून केशव व गणेश पाध्ये यांच्या पूज्यमूर्ति त्याच्या डोळ्यांपुढें नेहमीं वावरत असत. रामाजीपंतानें मोरूला रूपावळी, समासचक्र, शिकविलें; रामरक्षा, विष्णुसहस्रनाम, वगैरे स्तोत्रें त्याजकडून पाठ करवून घेतलीं व साधारण लिहिणेंवाचणें शिकविलें. पाध्यांच्या घरीं संथा घ्यायला व पठणाला पुष्कळ मोठमोठे विद्यार्थी जमत, व मोरोबाही ही मौज लांबून पाहत असे. मोरोबाला बारावें सरून तेरावें वर्ष लागलें असतां एक दिवस पुढील प्रकार घडला. मोरोबाला पाध्यांकडे द्वादशीचा ब्राह्मण ह्मणून जेवायला बोलाविलें होतें. मोरोबाला एकटें हिंडण्याचा, पोथीचें जें पान दिसेल तें वाचण्याचा, खडूनें कांहीं तरी भिंतीवर खरडण्याचा, व आपल्या मनाशींच गुणगुणण्याचा नाद असे. पानें वाढायला अवकाश आहे असें

पाहून लंगोटी नेसलेले मोरोबा उड्या मारीत मारीत मागच्या दारीं गेले व तात्काळ स्वतः रचलेला एक वेडावांकडा श्लोक त्यांनीं भिंतीवर लिहून ठेवला ! दोन चार दिवसांनीं केशवपाध्यांच्या दृष्टीस तो श्लोक अकस्मात् पडला. पाध्यांच्या घरीं त्यांचीं मुलें होतींच. त्यांनीं चौकशी केली तों त्यांस समजलें कीं हा श्लोक मोरूनें लिहिला आहे. तो श्लोक सध्यां उपलब्ध नाहीं, पण त्याचा परिणाम एवढा झाला कीं, केशवपाध्यांनीं रामाजीपंताला बोलावून आणलें व सांगितलें कीं, "तुमचा मोरू बुद्धिवान् दिसतो, त्याला उद्यांपासून आमच्याकडे पढायाला पाठवीत जा !" याप्रमाणें बाराव्या वर्षी मोरोबाला त्याची तरतरी पाहून त्याच्या गुरूनें विद्याभ्यासास मागून घेतलें! मोरोबानें लवकरच आपल्या विनयादि गुणांनीं आपल्या गुरूचें प्रेम संपादिलें. मोरोबा निसर्गविद्यार्थी होता. श्रमसातत्य, विनयमधुर स्वभाव, मितभाषण, आज्ञाधारकत्व, ग्राहकत्व, प्रेमळपणा, व विद्येची आवड या गुणांमुळें तो आपल्या गुरूचा फार आवडता झाला. उत्तम भूमींत उत्तम बीज पडल्यावर त्याचें उत्तम पीक कां येणार नाहीं? केशव गणेश पाध्यांसारखे गुरु व मोरोबासारखा विद्यार्थी यांचा संयोग झाल्यावर गुरुशिष्यांमध्यें विद्याप्रेम व विद्यानंद यांची लूट होऊं लागली. मोरोबाची गुरूंच्या ठिकाणीं दृढश्रद्धा व चिरप्रेम जडलें. पंतांना कधीं केशव पाध्ये पाठ देत व कधीं गणेश पाध्ये देत. पहिलीं पांच चार वर्षें त्यांना रघुकिरातादि पंच महाकाव्यें केशव पाध्यांनींच समजावून दिलीं; व पुढें काव्यप्रकाश, रसगंगाधर वगैरे साहित्यशास्त्रांचे ग्रंथ गणेश पाध्यांनीं शिकविले. पंत दोघांनाही गुरुभावानेंच पूज्य मानीत. केशव व गणेश पाध्ये यांचे चिरंजीवही पंतांबरोबरच संथा घेत. त्यांतही केशव पाध्यांचे जेष्ठ चिरंजीव सदाशिव पाध्ये यांचा व पंतांचा अत्यंत स्नेह जमला. असें सांगतात कीं, सदाशिव पाध्ये व मोरोपंत यांनीं अहर्निश एकत्र असावें, एकत्र निजावें, एकत्र उठावें, एकत्र स्नानसंध्यादि नित्यकर्मे करावींत, गडावर एकत्र मौजेनें फिरावें, संस्कृत सुभाषितांचा अर्थ एकमेकांस सांगून परस्पर एकत्र विद्यानंदाची गोडी घ्यावी. पंतांचे वडील बंधु सोनोपंत हे अंमळ एकलकोंडे होते, त्यांचा कनिष्ट बंधु आबा हा फार लहान होता. हे तिघे बंधू, केशव पाध्ये यांचे चार पुत्र, गणेश पाध्यांचे पुत्र गोपाळ व यांशिवाय पाध्यांच्या जवळ विद्याभ्यासार्थ येऊन राहिलेले कोल्हापूरचे व इतर ठिकाणचे कित्येक विद्यार्थी हे सर्व

पन्हाळगडावर मोठ्या आनंदानें काळक्रमणा करीत असत. मोरोबांचा स्वभाव शांत, सस्वस्थ, व मनमिळाऊ असल्यामुळें ते सर्वांस हवेहवेसे झाले होते. मोरोपंतांस फारसें बोलणें नको होतें. उगीच भाराभर बोलणें, खोडकरपणानें दुसऱ्यांच्या कुचाळ्या करणें, मर्मभेदी टीका करून दुसऱ्यांच्या अंतःकरणांस पीडा देणें, हे राजसी दोष त्यांच्याठायीं नव्हते. ते अमळ विनोदी होते, पण त्यांचा विनोद नेहमीं सभ्यपणाचाच असे. विद्याव्यासंगी रसिक व सज्जन यांच्याशीं त्यांचा विशेष स्नेह जमे, तथापि त्यांचें कोणाशींहीं वांकडें नसे. त्यांच्या तोंडून कठोर शब्द सहसा निघत नसे. अश्लीलपणाचा त्यांना मनापासून तिटकारा असे. ज्यांचें त्यांच्याशीं स्वभाव, रुचि व रसिकत्व यामुळें साधर्म्य असे, त्यांचा स्नेह त्यांनीं आमरण कायम ठेवला. मोरोपंत साठी उलटून गेल्यावर काशीयात्रेस गेले, तेव्हां त्यांनीं पन्हाळगडावर आपल्या बाळगड्यांबद्दल मुद्दां गंगेपाशीं वकिली केली! विशीपूर्वीच्या मित्रांचें साठीनंतर स्मरण कायम ठेवणारे कोमळ व प्रेमळ मनाचे सज्जन पंतांसारखे अत्यंत विरळ असतात! गंगावकिलींतली पुढील आर्या पहाः—

**मम बाळमित्र सर्वहि गंगे। तूं अच्युतप्रमुख तारीं।**
**वारी संसारभ्रम, सारीं प्राचीन पातकें सारीं ॥ ९७ ॥**

गंगावकिलींत पंतांनीं 'मद्गुरुपुत्र सदाशिव, यज्ञेश्वर यांसि भेट दे, यश तें' ( ७८ ) याप्रमाणें आपल्या गुरुपुत्रांचें प्रेमपूर्वक स्मरण केलें असून त्यांचें परममित्र " वरशील, सहाध्यायी, साधु सदाशिव तयासि तूं गंगे! '—दर्शन दे. " याप्रमाणें त्यांनीं गंगेची प्रेमभरानें प्रार्थना केली आहे. पंतांच्या प्रेमळ स्वभावामुळें ते आपल्या गुरूंना, सहाध्यायांना, व गडावरच्या सर्व लोकांना फार प्रिय झाले. पण पंतांचें पन्हाळगडावर चिरकाल वास्तव्य होण्याचा योग नव्हता. केशव गणेश पाध्यांपाशीं पंतांनीं बारा वर्षें अध्ययन केलें. तेवीस चोवीस वर्षांचें वय झाल्यावर बारामतकरांच्या पुण्याईनें पंतांना बारामतीस ओढून नेलें व तिकडे गेल्यावर पंतांच्या प्रौढ झालेल्या बुद्धिवैभवाची प्रभा पडूं लागून थोडक्याच काळांत तिनें काशीरामेश्वरपर्यंत साऱ्या भरतखंडांचें आक्रमण केलें. तो प्रकार कसा झाला याचें वर्णन पुढें यथाकाळ येईलच. पंतांनीं ज्या गुरूंपाशीं बारा वर्षें अध्ययन केलें त्यांच्याविषयीं आतां चार शब्द लिहितों.

६ केशव पाध्ये व त्यांचे धाकटे बंधु गणेश पाध्ये हे दोघेही जाडे पंडित होते. न्याय, व्याकरण, साहित्य, धर्मशास्त्र व वेदांत यांचें अध्ययन व अध्यापन करण्यांत त्यांचा सारा काळ गेला. केशव पाध्ये वृद्ध व अशक्त झाल्यावर अध्यापनाचा सारा भार गणेश पाध्यांवरच पडला, पण गणेश पाध्यांनीं आपल्या घराण्याची अध्यापनाबद्दलची कीर्ति वाढविली. गणेश काका ९२ वर्षांचे झाल्यावर आटोपले! तोंपर्यंत त्यांचें पवित्र काम सारखें चाललें होतें. शेंकडों विद्यार्थी त्यांच्या जवळून पढून गेले, गणेश काकांचा लौकिक कोल्हापूर प्रांतीं अद्यापही ऐकूं येतो. या पाध्ये बंधूंनीं ५०।६० वर्षांत हजार पांचशें शिष्य तयार केले असतील, पण त्या सर्वांत त्यांच्या श्रमाचें सार्थक करणारा मोरोपंतासारखा दुसरा शिष्य झाला नाहीं. मोरोपंतांची कविता व कीर्ति ऐकून त्यांना पुढें धन्यत्व वाटलें असेल! पंतांच्या गुरूविषयीं मीं कांहीं गोष्टी पन्हाळगडावर ऐकल्या व त्यांच्या हातच्या कांहीं पोथ्या पाहिल्या. गणेश काका एकदा कऱ्हाडास पंतप्रतिनिधींच्या भेटीसाठीं गेले असतां प्रतिनिधींनीं त्यांचा योग्य सन्मान केला, त्यांचें कर्ज वारून त्यांस तेथेंच राहण्यास एक वाडा दिला, कांहीं जमीन इनाम दिली, व आपल्या संन्निध राहून आपणांस पुराण सांगण्याविषयीं त्यांस विनंती केली. त्याप्रमाणें गणेश काका कांहीं वर्षें कऱ्हाडास राहिले. गणेश काका ' मोठे कर्मनिष्ट ब्राह्मण होते. त्यांचा स्वभाव थोडा तापट होता; त्यांस अन्याय व धर्मलंडपणा बिलकूल खपत नसे. त्यांच्या ठिकाणीं निर्लोभीपणा व निस्पृहता हे गुण उत्तम प्रकारचे होते. त्यांचा आचार फार शुद्ध होता, वागणी निर्मळ होती, चित्तांत कपट नव्हतें, अंगांत विद्वत्तेचें व शुद्ध वर्तनाचें बळ होतें, त्यामुळें त्यांच्या स्वभावांतला कडकपणा त्यांना उलट शोभा देत असे. त्यांचा दरारा भारी होता. ते पुराण सांगत असत. पण सांगण्यांत जसा लेचेपेचेपणा नव्हता, तशी यजमानाचीही आपल्यावर मात्रा न चालूं देण्याइतकी तेजस्विता त्यांच्या ठिकाणीं होती! ते दरसाल नवरात्रांत प्रत्यहीं सप्तशती स्वहस्तानें लिहून सत्पात्र ब्राह्मणास दान करीत. कऱ्हाडास एकदां सरकार वाड्यांतून एक सकेशा बाहेर पडतांना त्यांनीं पाहिली, तों त्यांस फार संताप आला; व ते कृष्णास्नान करून ग्रामत्याग करून जाऊं लागले! प्रतिनिधींनीं नम्रपणानें विनंती केली; तेव्हां ते बोलले, 'आपण ब्राह्मण असून धर्मबाह्य आचरण आपले नगरांत होतें, इतःपर येथें राहणें नाहीं!' लागलेंच त्या स्त्रीचें केशवपन झालें!

कांहीं वर्षे कऱ्हाडास राहिल्यास पन्हाळगडीं केशव पाध्यांची प्रकृति बिघडली ह्मणून ते गडावर गेले, व तेथेंच राहिले. पन्हाळगडावर कोल्हापूरचे राजे दुसरे संभाजी महाराज ( शके १६२२–३४ ) व तिसरे शिवाजी महाराज (शके १६३४–१६८२) यांच्या कारकीर्दीत ताराबाईची सून जिजाबाई साहेब हिचें फार प्राबल्य होतें. ही बाई मोठी तामसी व जाज्वल्य प्रकृतीची होती. ही महाकाली देवीला मनुष्यांचे बळी देत असे, असें इंग्रजी ग्रंथांत हिचें वर्णन दिलें आहे! जिजाबाईला गणेशकाका पुराण सांगत असत. एकदां जिजाबाई पुराण श्रवण करितां करितां मध्येंच राज्यकारभाराच्या गोष्टीबद्दल कारभाऱ्याशीं बोलूं लागल्या. हें पाहतांच गणेश पाध्ये अंमळ उग्र झाले, व त्यांनीं पोथी बांधली आणि घरीं पाठविली! कारभारी गेल्यावर ते जिजाबाईस ह्मणाले, 'तुह्मीं एका वेळीं अनेक कामें करितां, आह्मीं उद्यांपासून तुमच्या वाड्यांत पाऊल टाकणार नाहीं!' जिजाबाईनीं क्षमा मागितली व दुसऱ्या दिवसापासून पुराणश्रवण चाललें असतांना कोणीं मध्यें बोलतां कामा नये असा हुकूम फर्माविला! गणेशकाकांची निःस्पृहता व निर्भयता आणि जिजाबाईची धार्मिकता व गुणग्राहकता हे उभयतांचे गुण वाखाणण्यासारखे आहेत. खरी विद्वत्ता व आचारशुद्धता अंगीं बाणल्याशिवाय अशी निस्पृहता येत नाहीं, व अस्सल प्रतीची गुणग्राहकता व स्वधर्मप्रीति ही जातिवंताशिवाय अन्यत्र पाहण्यास सांपडत नाहीं. पंतांचे गुरु अशा योग्यतेचे होते. केशव व गणेश पाध्ये यांस प्रतिनिधींकडून व कोल्हापूरच्या महाराजांकडून ज्या जमीनी मिळाल्या त्यांच्या मूळ सनदा मीं पाहिलेल्या आहेत. त्या येथें देण्यांत कांहीं फायदा नाहीं. आपल्या मुलांबाळांत पुढें तंटे होऊं नयेत ह्मणून उभयबंधूंनीं सामोपचारानें व गोडीनें शके १६८१ सालीं विभक्तिपत्र केलें, त्यांत 'तुह्मीं आह्मीं संपादिलीं इनाम गांवें व जमिनी' यांच्या त्यांनीं वांटण्या केल्या. सध्यां केशव पाध्यांचे वंशज कोल्हापूर, कऱ्हाड, काळुंद्रे वगैरे ठिकाणीं आहेत व गणेशकाकांचे वंशज पन्हाळगडावर आहेत.

७ पन्हाळगडावर पाध्यांच्या दप्तरांत केशव व गणेश यांच्या हातच्या कांहीं पोथ्या चुकून राहिल्या आहेत. 'देवीमाहात्म्य' गणेश पाध्यांच्या हातचें आहे. 'स्मृत्यर्थसार' हा ग्रंथ केशव पाध्यांच्या हातचा आहे. या दुसऱ्या ग्रंथाच्या शेवटीं पुढील श्लोक लिहिला आहे:—

**शके लोकाद्रि भूपाल १६७३ संमितेब्दे प्रजापती ॥**
**स्मृत्यर्थसारमलिखत्केशवो रामजन्मनि ॥ ॥**

हा श्लोक, या पोथीचें हस्ताक्षर, व ' रामजन्मनि हें पद या तीन गोष्टी पाहतांच माझ्या मनावर प्रकाशाचा एक किरण पडला व त्यावरून दोन गोष्टी सिद्ध झाल्या ! ही पोथी केशव पाध्ये यांच्या हातची होती, तथापि तिचें अक्षर व पंतांचें हस्ताक्षर यांत इतकें विलक्षण साम्य आढळलें कीं मी ही पोथी एरवी पंतांच्या हातचीच समजलों असतों ! पण अलिखत् केशवः ' या पदावरही अविश्वास बसेना ! तेव्हां माझ्या मतानें असा निष्कर्ष ठरला कीं केशव पाध्यांच्या अक्षराचें वळण पंतांना लागलें ! केशव पाध्यांनीं बाळबोध व मोडी लिहिणें पंतांस शिकविलें ! ' रामजन्मनि ' एवढ्याच पदावरून कांहीं निष्कर्ष काढतां येणें शक्य नाहीं, तथापि मीं गडावर गेल्यापासून पंतांचे गुरु रामोपासक होते असें ऐकिलें होतें. तेव्हां त्याचा या पदाशीं कांहींसा मेळ बसविला तर असें कांहींसें अनुमान करितां येणें शक्य वाटलें कीं, पंतांना रामोपासनेची गोडी ही त्यांच्या या गुरूपासूनच लागली असावी ! हीं दोन्हीं अनुमानेंच आहेत, यांना अन्य प्रसंगाचें पाठबळ नसतें तर हीं केवळ टाकाऊच ठरलीं असतीं ! केशव पाध्ये व गणेश पाध्ये यांचा व पंतांचा नित्यसहवास होता. तेव्हांचे गुरु व तेव्हांचे शिष्य यांचा अन्योन्यसंबंध सध्याहून फारच निराळ्या प्रकारचा होता. आतांचे जे गुरु आंग्लविद्याविभूषित आहेत त्यांच्या घरीं स्नानसंध्या, ब्रह्मकर्म, हव्यकव्य, रामकृष्णजयंत्यादि उत्साह, वगैरे प्रकार शिष्याला बहुधा पाहायला सांपडतच नाहींत. पंतांचा काळ निराळा होता. पंतांचे गुरु मोठे कर्मनिष्ठ, कडकडीत सोवळे, मोठे न्यायनिष्ठुर, परम श्रद्धावंत, अत्यंत निस्पृह, व शुद्ध संस्कारवंत होते. तेव्हां हिंदु राज्याचा जागता अंमल होता, हिंदुत्वाचे शुद्ध संस्कार साऱ्या राष्ट्राच्या अंगीं बाणलेले होते, स्वधर्मनिष्ठा जागरूक होती, स्वसमाजतिरस्कृतीचा अमंगल, वाणेरा, व प्राणनाशक वारा हिंदुस्थानांत वाहूं लागला नव्हता, निषिद्ध पदार्थ सेवन करणारा ब्राह्मण लाखांत एक मिळण्याची मुष्कील होती, विहिताचार पाळणें नित्यकर्म व कर्तव्यच वाटत होतें. असा तो काळ होता. अशा पवित्र काळांतले ते गुरुशिष्य होते. पंतांनीं पांडुरंग स्तोत्रांत ह्मटल्याप्रमाणें ' पापोहं पापकर्मेतिच सततमहं स्नानकाले ब्रवीमि ' येथपासून त्यांच्या शुद्धाचाराला प्रारंभ होत होता. पंतांना हें सारें

वळण त्यांच्या गुरूपासून लागलें होतें. रूपावळी समासचक्रापासून कौमुदी व काव्यालंकारांच्या ग्रंथांपर्यंत पंतांना बारा वर्षांच्या काळांत केशव व गणेश पाध्ये यांनीं नेलें. हें त्यांच्या बुद्धीचें शिक्षण झालें. पंतांना गुरूपासून बुद्धीचें शिक्षण मिळालेंच, पण सदाचाराचें व भगवद्भक्तीचें जें उत्कृष्ट शिक्षण मिळालें त्यासाठीं कांहीं नियमित पुस्तकें व नियमित वेळा ठरलेल्या नव्हत्या ! गुरूंच्या नित्याचाराचें सश्रद्ध अवलोकन हेंच त्यांचें धर्मनीतिशिक्षण होतें. पाध्यांनीं पंतांना काव्य, अलंकार, व्याकरण या विषयांवर दहा वीस ग्रंथ शिकविले असतील, पण तें कांहीं खरें शिक्षण नव्हे. पंतांच्या मनांत आपल्या गुरूंविषयीं जी निरंतर पूज्यबुद्धि राहिली ती कांहीं त्यांनीं दहा वीस ग्रंथ शिकविले ह्मणून राहिली नाहीं. शिक्षणाचें खरें कार्य ह्मणजे पुण्यसंस्कार उत्पन्न करणें हें होय. पंतांच्या विचारांना, आचारांना, कर्तृत्वाला, व आयुष्याला त्यांच्या गुरूंनीं ग्रंथद्वारें व स्वतःच्या आचरणानें जें उदात्त वळण लावलें तेंच खरें शिक्षण होय. धार्मिक, नैतिक व मानसिक सद्विचारांचा शिष्याच्या मनांत उदय करणें हें गुरूचें कर्तव्य आहे, व तें पाध्यांनीं बजावलें. गुरु कांहीं बुद्धि वाढवीत नाहीं, नवें कांहीं देत नाहीं. जें असेल तेंच दाखवितो व असलेल्या शक्तींचा विकास करितो. शिष्याला शुद्ध संस्कारवंत करण्याचें काम केशव–गणेश पाध्ये यांनीं केलें. याचा प्रत्यक्ष पुरावा पंतांचें चरित्र हाच होय ! पंतांची भूमिका पन्हाळगडावर तयार झाली. बारामतीस गेल्यावर ९ वर्षांनीं ह्मणजे शके १६८० मध्यें रचलेल्या प्रल्हादविजय ग्रंथांत पंतांनीं ह्मटलें आहेः–

**हरिध्यानासक्त प्रकृतिविषयाप्राप्तविकृती**
**कृती लक्ष्मीरामाकृतिभव मयूरेश सुकृती ।**

२८ वें वर्ष पुरें होण्यापूर्वीं पंतांच्याच कबूलीप्रमाणें ते हरिध्यानासक्त झाले होते, व विषयांविषयीं त्यांच्या ठायीं विरक्ति उत्पन्न झाली होती. हें कार्य कांहीं पंत बारामतीस गेल्यास चार दोन वर्षांत घडून आलें नाहीं. पन्हाळगडावर असतांनाच त्यांना अशा प्रकारचें शिक्षण मिळालें होतें कीं, तिशी उलटण्यापूर्वींच त्यांच्या ठिकाणीं ईश्वरनिष्ठा व विषयवैराग्य उत्पन्न झालें! राजाराम प्रासादी यांनीं ह्मटल्याप्रमाणें मोरोबा बाळपणापासूनच ‘मूस वोतली भक्तीची । वैराग्याची खाणी ते’ या कोटींतले होते. हें पूर्व पुण्याचें फळ तर

खरेंच, पण जन्मादारभ्य घडलेल्या गुरुसहवासाचें व गुरुशुश्रूषेचें फळ होय. 'मंत्ररामायणा' च्या प्रारंभींच पुढील आर्या आहेः–

**श्रीमद्गणेश गुरुपदनखशशिकांतिच्छटा जयन्तुतराम् ।**
**प्रतिभारत्नं लब्धं यासु मयेदं नमस्तमोघ्नीषु ॥ १ ॥**

या श्लोकांत विघ्नहर्त्या गणेशाचें नमन करून अर्थांतरानें पंत सुचवितात: "माझे गुरु गणेश पाध्ये यांची चरणसेवा करितां करितां चित्तांतलें सर्व तम दूर करणाऱ्या अशा त्यांच्या नखशशिकांतिसमूहांत मला प्रतिभारत्न सांपडलें !" गणेश पाध्यांच्या कृपाप्रसादानें माझी बुद्धि प्रतिभासंपन्न झाली असें 'अल्पाक्षर पण बव्हर्थ' भाषण करूं जाणणाऱ्या मोरोपंतांचा हा उद्गार फारच मननीय आहे. महाभारत ग्रंथ रचून झाल्यावर त्याच्या उपसंहारांत पंत ह्मणतातः—

**श्रीमदुपोध्यायोत्तम कविवर केशवगणेशपादरजां ।**
**धरुनि शिरीं हें सयश लिहिलें पीताति साधु सादर ज्या ॥१३४॥**

पंतांचा स्वगुरुविषयीं पूर्ण प्रेमादर होताच, पण 'माझ्या सद्गुरुवंशीं झाले आहेत व पुढें होतील' (विष्णुपदवंकिर्ती ४९) त्या सर्वांविषयीं त्यांनीं तोच शुद्ध भाव आमरण कायम ठेविला. पंतांनीं या दोघांशिवाय मोक्षगुरु कोणी केले होते कीं नाहीं याचा मला पत्ता लागला नाहीं. त्यांनीं स्वतः याचा कोठेंही उल्लेख केला नाहीं. श्रीरामचंद्र हेच त्यांचे परमगुरु होते असें मानलें तर 'श्रीगुरुराया! शुद्ध ब्रह्मचि तूं नर न दिससि जरि नरसा' (मुक्तांजली. ७६) या आर्यार्धाचा मेळ बसत नाहीं. कदाचित् त्यांचे वडील रामाजीपंत यांनाच त्यांनीं मोक्षगुरु केलें असेल. पंतांचें गुरुस्तुतिमुक्तांजलि, हें परम रमणीय काव्य गुरुभक्तिपूर्ण आहे. त्यांत त्यांनीं माय, बाप, वाल्मिकी, व्यास, शुक, या सर्व 'गुरुमूर्तींना' वंदन केलें आहे. या काव्यांत त्यांनीं, 'श्रीगुरुराया! द्यावें ज्ञान भजाया, जना न सांगाया !' असें श्रीगुरुपाशीं मागितलें आहे. 'श्रीगुरुराया! दे तें मर्यादेतें न शील जें मोडी' अशी त्यांची विज्ञप्ति केली आहे. विश्वमूर्ति व परब्रह्म श्रीराम हाच पंतांचा सद्गुरु असावा, व त्यांनीं आपल्या ' श्रीराम, श्रीमत्केशव गणेश हरि ' या चारही गुरूंच्या ठिकाणीं समबुद्धिच ठेवली असावी. कोणत्याही अर्थानें घ्या, पण पुढील आर्यांत अर्थगौरव फार आहे एवढें खरें:—

**श्रीगुरु हा चतुरानन चतुरासि नव्या नव्याचि सृष्टींत ।**
**किति न चमत्कृति दावी ? प्रकटाया प्रेमबाष्प दृष्टींत ! ॥ २५ ॥**
**श्रीगुरुनाथा ! माथा लववुनि हा दास बोलतो कांहीं ।**
**बोलावेचि शिकविलें, हृदयविनोदार्थ, बोल तोकांहीं ॥ ८० ॥**

८ पन्हाळगडावर पंतांचा हा गुरुसहवासाचा व विद्याभ्यासाचा काळ मोठा आनंदांत गेला असावा. मी पन्हाळगडावर पंतांच्या पूर्ववयाची माहिती मिळविण्याकरितां ८।४ दिवस हिंडलों. अगदीं थोडकीशी माहिती मिळाली तिच्या आधारें हें प्रकरण लिहिलें आहे. तथापि एके सायंकाळीं गडावर पराशर मुनींची पवित्र चिचोळी गुहा आहे, त्या गुहेंत सरपटत सरपटत आंत गेलों तों माझ्या मनांत एकदम आलें कीं, मोरोबा मित्रवर्य सदोबाला घेऊन या रम्य ठिकाणीं शेंकडों वेळां आले असतील ! या ठिकाणीं त्यांनीं पुष्कळदां काव्यें किंवा भारतपर्वें वाचलीं असतील. काव्यरचनेची स्फूर्ति त्यांना याचे गुहेंत झाली असेल ! पराशरक्षेत्रीं पराशरमुनींनेंच आपला पुत्र जे भगवान् व्यास त्यांच्या भारताला मराठी वेष देण्याची त्यांना प्रेरणा केली असल. पंतांच्या चित्तवृत्तींचा राहिलेला सारा मळ या पवित्र स्थळीं जळून गेला असेल. ' अभय दिधलें आहे, वाहे शुचि प्रतिभा झरा!' याचा स्फूर्तिदायक अनुभव याच एकांतरमणीय स्थळीं पंतांना प्रथम आला असेल ! सदाशिवपाध्यांनीं व पंतांनीं काव्यसौंदर्याचा, सृष्टिसौंदर्याचा, भगवत्कथासौंदर्याचा हृदयाल्हादकर अनुभव याच ठिकाणीं कितीक वेळां घेतला असेल ! पंतांना पन्हाळगडावर पराशरगुहाच अत्यंत प्रिय वाटली असावी, याचें एक प्रमाण असें दिसतें कीं, पंतांच्या वेळीं या गडाला लौकिकभाषेंत पन्हाळगड ह्मणत, पंडितभाषेंत पन्नगालय ह्मणत, पण पंतांनीं चार दोन ठिकाणीं त्याचा उल्लेख ' पराशरक्षेत्र ' याच पदानें केला आहे ! पराशरगुहा व या गडावरची निसर्गशोभा यामुळें पंतांच्या मनांत कवित्वशक्तीचा उदय झाला असेल असें मानण्यास कांहीं हरकत नाहीं. पंतांनीं याप्रमाणें गुरुसंगतींत राहून विद्याभ्यासाचीं बारा वर्षे पन्हाळगडावर काढलीं, पण त्यांच्या संगतीचा कायमचा लाभ बारामतकरांना होणार होता. तो योग येणेंप्रमाणें घडून आला.

---

१ पराशर ऋषीचे गुहेंत । वास्तव्य केलें मोरोपंडित ।
प्रत्यक्ष दर्शन दिधलें तयातें । व्यासपित्यानें ॥ १ ॥
—भक्तमंजरीमाला.

९ मोरोबाच्या शिक्षणाचा बोजा त्यांच्या वयाच्या १२ व्या वर्षी पाध्यांनीं आपल्या अंगावर घेतल्यानंतर लवकरच बापूजीपंतांस पन्हाळगड सोडावें लागलें. आपल्या मोतद्दारास कांहीं क्षुल्लक अपराधाबद्दल त्यांनी पैसा तापवून डाग दिला, तेव्हां 'राजानें करावयास योग्य ती शिक्षा तुह्मीं केलीत याबद्दल जिजाबाईसाहेब आहेत कर्दनकाळ, रागावल्यावर तुह्मांस फार जड जाईल' असा मित्रांनीं सल्ला दिल्यामुळें त्यांनीं तेथून पाय काढला, व कोंकणपरिचयाचे बाबूराव जोशी बारामतकर यांस भेटण्यास ते बारामतीस गेले. बाबूजी नाईक हे लक्षाधीश सावकार होते, पेशव्यांचे व्याही असून पेशवाईसाठीं खटपट करणारे चळवळे गृहस्थ होते. त्यांनीं बापूजीपंतांस आपल्या जवळ ठेवून घेतलें व कोठीची सर्व व्यवस्था त्यांजकडे सोंपवली. याप्रमाणें बापूजीपंत बारामतीस व मोरोबा पन्हाळगडास असा क्रम ११।१२ वर्षे चालला. मोरोबा वयस्कर झाले, धाकटे बंधु त्यांजवरच अवलंबून होते. उदरनिर्वाहाची पंचाईत पडूं लागली, तेव्हां मोरोबांनीं आपल्या विसाव्या वर्षी फडावर कारकुनीची नोकरी पत्करली. ही नोकरी त्यांनीं तीन वर्षे केली. त्यानंतर तेथेंच प्रसिद्ध पाव आण्याची चूक घडून आली! मोरोबा पन्हाळगडीं फडावर कारकुनाचें काम करीत असतांना एकदां हिशेब करितांना त्यांना पाव आण्याची चूक लागली. उलटसुलट हिशेब केला तरी कांहीं केल्या चूक सांपडेना. मग मोरोबांनीं हिशेबाचे कागदपत्र आपल्या खोलींत नेले व समई तेवत ठेवून चूक हुडकून काढण्यासाठीं ते रात्रभर जागत बसले. तीन घटका रात्र उलटून गेल्यावर त्यांना अकस्मात चूक सांपडली व ती सांपडतांच त्यांना जो आनंद झाला त्या आनंदाच्या भरांत त्यांनीं टाळी पिटली! मोरोबा खोलींत दिवा ठेवून रात्रभर जागून काय करितो हें पाहण्याच्या उद्देशानें त्यांचे वरिष्ठ दाराआडून सारा चमत्कार पहात होते. मोरोबाची लागलेली तंद्री पाहून व त्यांची आनंदाची टाळी ऐकून त्या सद्गृहस्थास मोठें कौतुक वाटलें व तो खोलींत येऊन प्रेमानें ह्मणाला, "मोरोबा! अरे पाव आण्याची चूक शोधून काढण्यासाठीं जर तूं चित्ताची एवढी एकाग्रता केलीस व ती सांपडतांच आनंदोत्सवानें टाळ्या पिटूं लागलास, तर ह्या

१ ही गोष्ट बारामतीस नाइकांचे घरीं घडली असेंही कोणी ह्मणतात. हीच गोष्ट नाथांच्याही चरित्रांत दिली आहे. कारकुनीच्या पेशांत पडलेल्या दोघांही सद्भक्तांच्या चरित्रांत एकच गोष्ट घडून येणें अशक्य नाहीं!

संसाराची जी मोठी चूक प्रत्येकाच्या हातून घडत आहे ती शोधून काढण्यासाठीं जर तूं चित्ताची अशीच एकाग्रता केलीस व भगवंताची आराधना करून चूक शोधून काढलीस तर तुला केवढा आनंद होईल व तुझ्या जन्माचें केवढें तरी सार्थक होईल!" हा सद्भावानें एका सज्जनानें केलेला उपदेश मोरोबाच्या मनावर ठसला, व त्यांच्या सात्विक मनावर त्याचा कायमचा परिणाम झाला! पित्याची भेट होऊन बारा वर्षें होत आलीं; लवकर भेट घेतली नाहीं तर शास्त्रपद्धतीनें शंकराच्या देवळांत ती घेण्याचा प्रसंग येणार हें जाणून मोरोबा पितृदर्शनास जाण्यास निघाले. पंतांनीं वयाच्या २१ व्या वर्षीं ह्म० शके १६७२ मध्यें 'प्रमोदेब्दे पाराशरस्थले' एकोणीस सर्गांचा रघुवंश स्वहस्तानें लिहून घेतला. त्याच्या शेवटीं 'श्रीमत्पंडितमंडलमंडनस्य श्रीकेशवसूरेश्चरणरतस्य रामसूनोरिदं पुस्तकम्,' असें त्यांनींच लिहिलें आहे. शके १६७४ मध्यें नैषधोदय, अनर्घ्यराघव व मुरारिनाटक हे ग्रंथ त्यांनींच पाराशरक्षेत्रीं 'स्वकृते स्वगृहे' लिहिलेले आहेत. यानंतर पुढल्या वर्षीं ह्मणजे शके १६७५ सालीं ते बापास भेटण्याकरितां पन्हाळगड सोडून बारामतीस गेले. या चोविस वर्षांच्या तरुणाच्या रूपानें आपल्या गांवांत एक अमूल्य रत्न आलें आहे याची बारामतीस तेव्हां कोणासही कल्पना आली नसेल! पंत बापास भेटण्याच्या निमित्तानें बारामतीस गेले. व पुन्हां गुरुदर्शनार्थ जरी ते दहा पांच वेळां पन्हाळगडावर आले होते तरी पन्हाळगड त्यांचा कायमचा सुटला. बारामतकरांनीं असलें रत्न आपल्या हातून जाऊं दिलें नाहीं, पण तो कथाभाग 'बाबूजी नाईक बारामतकरां' च्या प्रकरणांत सांगण्यांत येईल. मोरोबाचें पन्हाळगडाहून उच्चाटण झालें व ते बारामतकर झाले एवढी गोष्ट खरी.

---

# प्रकरण तिसरें.

## पंतांचें शिक्षण आणि विद्याव्यासंग.

**यः पठति, लिखति, पश्यति, परिपृच्छति, पण्डितानुपासयति ।**
**तस्य दिवाकरकिरणैर्नलिनीदलमिव विकास्यते बुद्धिः ॥ १ ॥**

—सुभाषित.

१ विषयप्रवेश. २ पंतांच्या विद्वत्तेबद्दल मालाकारांचें मत. ३ त्याचें खंडण. प्रमाण पहिलें:—पंतांच्या हातचे काव्यनाटकादि संस्कृत ग्रंथ. ४ त्यांची सनवार व नांववार यादी. ५ पंतांचें ग्रंथसंग्रहकारित्व. ६ प्रमाण दुसरें:—बावा पाध्यांची महाकाव्यें रचण्याची पंतास सूचना. ७ प्रमाण तिसरें:—समानार्थक स्थळें. ८ रामायण, भारत, व भागवत यांचा अभ्यास. ९ प्राकृत कवींचा अभ्यास १० वैद्यकीचा अभ्यास व पंतांचें बहुरंगी शिक्षण. ११ पंतांचें पांडित्य. १२ पंतांच्या काव्यांत दर्पोक्ति कां नाहींत ?

मोरोपंतांचें शिक्षण कोणत्या प्रकारचें होतें, ते साधारण पुराणिका-इतपतच व्युत्पन्न होते किंवा महापंडित होते, त्यांनीं शास्त्राध्ययन केलें होतें कां 'रघुकिरातादि पंचमहाकाव्यांशीं मुद्दां अपरिचित' राहून रूपावळी समासचक्रावरून त्यांनीं उड्डाण केलें तों एकदम काव्यरचनेसच हात घातला, याविषयीं नाणावलेल्या पंडितांमध्यें आज ३०।४० वर्षें बराच वाद माजला आहे. पंतांचीं समग्र काव्यें काळजीपूर्वक न वाचल्यामुळें, व योग्य ते शोध न केल्यामुळें पंतांच्या कवितेसंबंधींच काय पण त्यांच्या शिक्षणासंबंधीं कांहीं विद्वानांनीं विलक्षण अनुमानें काढलीं आहेत, त्यांचा निरास याच ग्रंथांत यथाकाल व यथास्थल होणार आहे. त्या सर्व अनुमानांत पंतांच्या आर्येचे भोक्ते व भक्त जे कै. विष्णुशास्त्री चिपळोणकर यांनीं पंतांच्या शिक्षणाबद्दल काढलेले तर्क जितके निराधार आहेत ति-

तर्के निराधार तर्क दुसरे क्वचितच सांपडतील. पंतांच्या वेळेपासून पंतांच्या अगाध पांडित्याबद्दल लोकांच्या ज्या समजुती होत्या त्या चुकीच्या होत्या असें मांगण्यांत मालाकारांनींच घोड्याएवढी चूक केली आहे.

२ निबंधमालेच्या ४७ व्या अंकांत मराठी कवींच्या विद्वत्तेविषयीं चर्चा करीत असतां 'मराठी कवींपैकीं कितीकांच्या अंगीं विद्वत्ता वसत होती,' 'महाराष्ट्र कवींचें व पंडितजनांचें कितपत सख्य असे', अशा वाक्यार्थांत त्यांच्या विद्वत्तेविषयीं आपला संशय दर्शवून मालाकारांनीं ठांसून खालील विधान केलें आहे. "अगदीं अव्वलपासून तों अखेरपर्यंत कोणत्याही मराठी कवीस रघुकिरातादि पंडितमान्य काव्यांची बिलकूल ओळख होतीशी सुद्धां दिसत नाहीं. नामदेव, तुकाराम यांची गोष्ट तर बोलायलाच नको, पण पंडित मंडळींत बरेच मोडण्यासारखे जे वामन, मोरोपंत, रामजोशी वगैरे त्यांच्या ग्रंथांतही कालिदासादिकांचा मागमूसही नजरेस येत नाहीं." असा धडाकून सिद्धांत ठोकून देण्यापूर्वी मालाकारांनीं किती ग्रंथ वाचले पाहिजे होते, त्या वेळीं किती उपलब्ध होते, व सरसास सान्या मराठी कवींच्या संबंधानें असें विधान करणें किती अविचाराचें होतें, हें कै. वामनराव ओक यांनीं मालेल्याच ६१।६२ अंकांत एका विस्तृत पत्रांत चांगल्या प्रकारें दाखवून दिलें आहे. तरी विठ्ठल बीडकर या कवीच्या 'कांहीं श्रीहनुमंतनाटककथा कांहीं रघूवंशिची' या चरणाशिवाय दुसरे स्वमतपुष्ट्यर्थ कांहीं आधार रा. ओकांनीं दाखविले नाहींत. पंतांच्या संबंधानें त्यांनीं खालील उद्गार काढले आहेत. "तुमचें प्रेम पंतांच्या कवितेवर बसून त्या प्रेमाच्या भरांत पंतांनीं रघुकिरातादि पंच महाकाव्यें पाहिल्याशिवाय व संस्कृत काव्यपद्धतीची बिलकूल ओळख नसतांही काव्यरचना केली अशी त्यांची तुह्मी थोरवी गाइली आहे ती तरी यथार्थ मानणें आतां बरोबर दिसत नाहीं." या वादांत रा. ओकांचें ह्मणणें बरोबर होतें, तरी स्वमतपुष्ट्यर्थ कांहीं आधार न देतां केवळ व्यक्तिविषयक कठोर टीकेंत ते शिरले ह्मणून मालाकारांना त्यांस कांहीं तरी उपहासपर उत्तर देऊन आपल्या स्वैरगति पण मोहक लेखणीच्या जोरावर साफ उडवून देतां आलें! रा. केशवराव कानेटकर यांनींही रा. ओकांप्रमाणेंच मालाकारांवर आक्षेप काढले होते. या उभयतांना मालाकारांनीं दिलेलीं उत्तरें योग्य नाहींत, तरी त्या उत्तरांत या वादाचा निकाल होण्यासारख्या दोन गोष्टी त्यांनींच सुचविल्या आहेत. (१) "वामन, मोरोपंत वगैरे मंडळींचा

४

संस्कृत कवींपैकीं कितीकांशीं व कितीसा परिचय होता, हें आतां समजणें अशक्यच आहे." मालाकारांना जी गोष्ट १८८० मध्यें अशक्यच वाटली ती १९०० मध्यें साध्य झाली, हें पुढें येणाऱ्या पंतलिखित संस्कृत काव्यांच्या यादीवरून स्पष्ट होणार आहेच. मालाकारांनीं पुण्यांत बसून व ओक व कानेटकर यांनीं नागपूर व वाई येथें बसून हा जो शुष्क वाद केला तो यांपैकीं एकानें जरी पंढरपुरास एक खेप टाकली असती तरी तेव्हांच मिटला असता! आजपर्यंत जितकी मराठी कविता छापून प्रसिद्ध झाली आहे तिच्या पंचवीसपट अद्याप छापावयाची राहिली आहे; भुयारें, कसरी व वाण्याचीं दुकानें यांच्या तडाक्यांतून सुटून ती सारी प्रसिद्ध होण्याला आणखी पंचवीस वर्षे तरी पाहिजेत; तेव्हां कोठें 'अव्वलपासून अखेरपर्यंत मराठी कवींचे ग्रंथ' वाचावयाला सांपडतील! हा सारा मराठी ग्रंथार्णव तरून जाण्याला आणखी कित्येक वर्षे जायचीं असल्यामुळें मालाकारांचें सर्व मराठी कवींविषयीं जें मत आहे तें खोडून टाकण्याच्या नादांत मीं आज पडत नाहीं, बाकी तें साफ चुकीचें आहे असें सिद्ध करून देण्यास आजही हवा तितका पुरावा आहे. तथापि प्रस्तुत प्रसंगीं फक्त मोरोपंतांपुरतांच त्याचा मी विचार करणार आहें. दुसरी गोष्ट मालाकारांनीं रा. ओकांशीं वाद करितांना सुचविली आहे ती ही:—( २ ) "पंचमहाकाव्यांशीं किंवा नाटकांशीं मोरोपंताचा परिचय होता असें ज्यावरून अनुमान काढतां येईल असें स्थळ त्याच्या ग्रंथांत आढळत नाहीं." रा. ओकांनीं अशीं समानार्थक स्थळें जर दाखवून दिलीं असतीं तर मालाकार आपलें मन फिरविण्यास तयार होते. पण रा. ओकांनीं तसें केलें नाहीं, यामुळें त्यांचेंच मत आजवर निराबाध राहिलें. आतां ( १ ) मोरोपंतांचा बहुतेक सर्व संस्कृत कवींशीं चांगला परिचय होता व [ २ ] त्यांच्या काव्यांतून समानार्थक स्थळें आढळतात, या दोन गोष्टी सिद्ध करून दाखविल्या कीं, या वादाचा कायमचा निकाल लागणार आहे. आधीं पहिल्या मुद्याचा विचार करूं.

३ मोरोपंतांचीं सर्व काव्यें नीट काळजीपूर्वक वाचलीं असतां संस्कृत काव्यांचें वळण त्यांच्या कवितेला अर्थ, व्याकरण, अलंकार, इत्यादि सर्व प्रकारांत कसें पूर्णपणें लागलेलें आहे हें कोणासही कळून येणार आहे. त्यांचें संस्कृतभाषानैपुण्य त्यांच्या मंत्ररामायण, मुक्तामाला, हरिसंबोधनस्तोत्र वगैरे संस्कृत काव्यांवरूनच स्पष्ट दिसतें. पण पंतांचा संस्कृत कवींशीं

उत्कृष्ट परिचय होता हें सिद्ध करणें अलीकडे अगदीं सुलभ झालें आहे. पंढरीस पंतांच्या वंशजांजवळ पंतांनीं संग्रहित केलेल्या व स्वहस्तांनीं लिहून घेतलेल्या संस्कृत ग्रंथांचीं जीं दप्तरें आहेत तीं चाळलीं असतां कोणाचीही याबद्दल खात्री होणार आहे. हीं दप्तरें मीं प्रथम इ.स.१९००च्या जुलै महिन्यांत पाहिलीं. त्यांत पंतांनीं स्वतः आपल्या हातांनीं लिहून घेतलेले ४० संस्कृत ग्रंथ आहेत! त्यांच्या शेवटीं स्वकृत एक एक दोन दोन श्लोकही त्यांनीं घातले आहेत. त्या श्लोकांत क्वचित ग्रामनिर्देश आहे; बहुधा संवत्सर, मास, व तिथी यांचा निर्देश आहे; व सर्व ठिकाणीं गुरु, पिता यांचा, व स्वतःचाही नामनिर्देश पंतांनीं केला आहे. क्वचित आई, भाऊ यांचाही नामनिर्देश आहे. कांहीं ठिकाणीं शकसंवत्सराचीं नांवें दिलीं आहेत, कांहीं ठिकाणीं ' अंकानां वामतो गतिः ' हा नियम लावून शक काढावा लागतो, व याप्रमाणें या सर्व ग्रंथांची एक शकवार जंत्री तयार केली ह्मणजे पंतांच्या शिक्षणाची बरोबर कल्पना बांधतां येते. हे चाळीस ग्रंथ पंतांनीं भराभर लिहून घेतलें आहेत तरी ते सर्व सुवाच्य व शुद्ध आहेत. पंत फार बारीक अक्षर लिहीत. अनुस्वाराबद्दल सामान्यतः वर्तुळ काढीत. त्यांच्या अक्षराला फारच नामी वळण आहे. त्यांच्या बाळबोध व मोडी दोन्ही प्रकारच्या अक्षरांचे नमुने या पुस्तकांत दिले आहेत. अस्तु.

४ वर सांगितलेल्या पंतलिखित सर्व संस्कृत ग्रंथांचें संगतवार टिपण पुढें देतोंः—

| ग्रंथाचें नांव. | ग्रंथलेखनकाल शक. | संवत्सराचें नांव. |
|---|---|---|
| १ रघुवंश | शक १६७२ (इ. स. १७५०) | प्रमोद, मार्ग. कृ. १४ |
| २ नैषधोदय | शक १६७४ | अंगिरा ( चतुर्मास ) |
| ३ अनर्घ्यराघव | | |
| ४ अनर्घ्यराघवटीका | | |
| ५ मुरारिनाटक | | |
| ६ विष्णुभक्तिकल्पलता | १६७६ | भाव, कार्तिक व. ७ सोम. |
| ७ वाणीभूषण | १६७८ | धाता, |
| ८ प्रबोधचंद्रोदय नाटक | १६८० | बहुधान्य, भाद्रपद शु. ८ ( बारामत्याम ) |

| | | |
|---|---|---|
| ९ रसमंजरी<br>१० रसतरंगिणी<br>११ राघवपांडवीय<br>१२ पंचदशी | १६८२ | विक्रम,<br>( वैशाख–भाद्रपद ) |
| १३ षट्पदीची टीका<br>'विद्वच्चित्तप्रसादिनी;<br>१४ कुवलयानंद. | १६८३ | वृष, वैशाख शु. १०<br>[ वारामत्याम् ]<br>आषाढ कृष्ण ६ भौम.<br>[ पर्वतांश्वरसन्निधौ. ] |
| १५ विक्रमोर्वशीय. | १६८७ | पार्थिव, मार्गशीर्ष[illegible] |
| १६ पार्वतीपरिणय.<br>१७ काव्यप्रकाश. | १६८९ | सर्वजित्,<br>माघ शु. ४<br>आषाढ व० ४. |
| १८ मालविकाग्निमित्र. | १७०० | विलंबी,<br>आषाढ कृ. ५. |
| १९ अपरोक्षानुभूति. | १७०३ | प्लव,<br>रामसमर्नी. |

खालील ग्रंथ पंतांनीं स्वतः लिहिले आहेत पण त्यांवर शकसंवत्सर नस-
ल्यामुळे त्यांचा लेखनकाल ठरवितां येत नाहींत.

| | |
|---|---|
| २० रामकृष्णकाव्य. | २१ भगवन्नामकौमुदीटीका. |
| २२ वेदांतसारतत्वदीपिका. | २३ अधिकरणरत्नमाला. |
| २४ विद्वन्मोदतरंगिणी. | २५ रसमंजरीटीका. |
| २६ हनूमन्नाटक. | २७ अभिज्ञान शाकुंतल. |
| २८ मत्स्यनीति. | २९ जैमिनीकृत कुशलवोपाख्यान. |
| ३० नागानंद नाटक. | ३१ बृहदारण्यकभाष्य. |
| ३२ विश्वप्रकाश कोश. | ३३ राजमार्तंडाभिधाना पातञ्जलयोगशास्त्रवृत्तिः |
| ३४ चंपूभारत. | ३५ विवेकसिंधुभाष्य. |
| ३६ मुहूर्तमार्तंड. | ३७ पुरुषसूक्तव्याख्यान. |

३८ सप्तशतीदीपन. ३९ सूर्यशतक.
४० जगन्नाथपंडितकृत अश्वधाटी. ४१ रतिमन्मथनाटक.
४२ नरहरिकृत समश्लोकी ( मराठी ) पंतलिखित. ( शके १६९५. )

याशिवाय खालील ग्रंथ पंतांनीं दुसऱ्याकडून पण स्वतःसाठीं लिहून घेतले आहेत.

| | | |
|---|---|---|
| ४३ भामिनीविलास. | १६८२ | विक्रम, |
| ४४ ज्ञानेश्वरी ( मराठी ) | १६८४ | चित्रभानु, |
| ४५ भट्टीकाव्य. | १६९० | सर्वधारी, |
| ४६ कुमारसंभव. | १६९८ | दुर्मुख, |
| ४७ छायाभिधा रसमीमांसाव्याख्या. | १७११ | सौम्य, |
| ४८ वसंततिलको भाणः | १७१२ | विरोध, |
| ४९ नेमिनिर्वाण. | | |

५ शके १६८२ या एकाच सालीं पंतांनीं चार ग्रंथ लिहून घेतले आहेत. रसमंजरी व रसतरंगिणी हे वैशाखांत, राघवपांडवीय अधिकांत, व पंचदशी भाद्रपद शुक्लांत लिहून घेतली आहे. राघवपांडवीयाचे अखेरीसः—

**बाणसुबंधू वासवदत्ताकादंबरीकारौ ।**
**जयतो जयन्तु सुतरां कविराजः सर्वकविशिरोरत्नम् ॥ १ ॥**

अशी आर्या आहे. यावरून बाणसुबंधूंचे ग्रंथही पंतांनीं याच सालीं वाचले असावेत असें वाटतें. राघवपांडवीय पराशरक्षेत्रांत ह्म० पन्हाळगडावर 'समाप्त' झालें व पंचदशी 'बारामतींत' समाप्त झाली असें ह्मटलें आहे; यावरून पंत मध्यें पन्हाळगडीं गुरुदर्शनास गेले होते असें वाटतें. यावर्षीं इतके पुष्कळ ग्रंथ पंतांनीं वाचले हें लक्षांत ठेवलें पाहिजे. याच्या पूर्वींच दोन वर्षें त्यांनीं बारामतींत 'प्रबोधचंद्रोदय' लिहिलें होतें. व त्याच सालीं ह्म० १६८० मध्यें 'प्रल्हाद-विजयकाव्य' पंतांनीं रचून 'भगवज्जनदिव्यकथाश्रवणकथन' करण्याचा आपला संकल्प त्यांनीं जगजाहीर केला होता. रसमंजरीचे अखेरीस पंतांनीं खालील गोड श्लोक लिहिला आहेः—

**श्रीमद्रामसुतो गणेशचरणांभोजद्विरेफायितो**
**लक्ष्मीकुक्षिभवोऽतिसत्कविसखः प्राज्ञो मयूरेश्वरः ।**

**स प्रीत्या व्यलिखद्रसज्ञजनताकर्णावतंसायिता-**
**मत्यच्छां रसमंजरीं निजमुदेऽब्दे विक्रमे माधवे ॥ १ ॥**

कुवलयानंदाच्या अखेरीस:—

**मयूरेश्वरपंतेन ग्रंथसंग्रहकारिणा ।**
**स्वयं कुवलयानंदो लिखितोऽखिलतोषकृत् ॥ १ ॥**

असा श्लोक आहे. यांत पंतांनीं स्वतःस 'ग्रंथसंग्रहकारी' ह्मणून ह्मटलें आहे तें मार्मिक वाचकांनीं मनन करण्यासारखें आहे. वरील यादींतले सर्व ग्रंथ पंतांनीं भराभर व शुद्ध व सुवाच्य अक्षरांनीं लिहिले आहेत, हें ग्रंथ लिहिण्याच्या तऱ्हेवरून व अंतिम श्लोकांतल्या 'द्रुतं लिखितम' 'अतिद्रुतं' 'झटिति' 'आदरात्' या शब्दांवरून स्पष्ट होतें. तसेंच पंत स्वतःस 'सतां प्रियेण', 'मयूरेश्वरेण', 'प्राज्ञ', 'सत्कविसख', असलीं विशेषणें लावतात, यावरून स्वतःविषयींचा भरंवसा त्यांस केवढा होता हें उघड दिसतें. बारामतीस आपल्या श्रीमंत यजमानाच्या घरीं रामायणादि मोठमोठे ग्रंथ पंतांस वाचावयास मिळत होते; पण स्वतः आस्थेनें त्यांनीं वर दिलेले ग्रंथ लांबलांबून आणवून लिहून घेतले. खरें विद्यार्थीपण पंतांत होतें. विद्येची खरी अभिरुचि उत्पन्न झाल्यामुळें परगांवाहून मोठाले ग्रंथ आणवून स्वतः पाठीचा कणा वांकेतों रात्रंदिवस जागून त्यांनीं ते लिहून घेतले. त्या वेळीं ग्रंथ संपादन करून ते लिहून घेणें किती खर्चाचें, श्रमाचें, व आस्थेचें काम होतें याची अलीकडील लोकांस कल्पनाही होणार नाहीं. कांहीं लोक आपले ग्रंथ दुसऱ्यास देण्यास किती नाखुष असत हें समर्थांच्या:—

**आपण वाचीना कधीं । कोणास वाचाया नेदी ॥**
**पुस्तक बांधोनि ठेवि बंदीं । तो एक मूर्ख ॥ १ ॥**

या दासबोधांतल्या मूर्खांच्या लक्षणांतल्या एका ओंवीवरून उघड दिसतें. कित्येक लबाड व मूर्ख लोक मागून नेलेले ग्रंथ ज्याचे त्यास परत देण्याचे कामीं तेव्हांही सध्यांप्रमाणेंच कुचराई किंवा दिरंगाई करीत असत, हेंही एक कारण पुस्तक 'बंदीं' बांधून ठेवणारांच्या तर्फेनें पुढें आणतां येण्यासारखें आहे! सांप्रत एवढा शिक्षणाचा प्रसार झाला असूनही व छापील पुस्तकांच्या हव्या तितक्या आवृत्त्या स्वल्प किंमतींत वाटेल तेथें मिळण्यासारख्या असूनही, असे कित्येक खप्पी आहेत कीं, दुसऱ्याचें पुस्तक वेळेवर परत करण्या-

चें त्यांना भान राहत नाहीं, इतकेंच काय पण सार्वजनिक संग्रहालयांतूनही पुस्तकें मागवून तीं संभावितपणानें ते खुशाल दडपून ठेवतात, किंवा त्यांतील महत्वांचीं पृष्टें, फोटो, किंवा नकाशे फाडून घेऊन नंतर गुपचिप् तीं परत करितात! हा असत्याचा किंवा संभावित ठकबाजीचाच एक प्रकार आहे! पोथ्या लिहून घेण्याचे श्रम व आनंद ज्यांना माहीत नाहींत, त्यांना खुशाल पोथ्यांचे ढीग उकिरड्यांवर, चंद्रभागेच्या डोहांत, किंवा होळींत नेऊन टाकतांना मीं पाहिलें आहे! पूर्वजांनीं महत्प्रयासानें लिहून संग्रहित केलेले ग्रंथ वाचण्याचें तर दूरच राहो, पण जतन करण्याचेंही शहाणपण ज्यांचे अंगीं नाहीं, असे 'मर्यापोटीं शनैश्वर' जन्मलेले दिवटे आजकालही पुष्कळ ठिकाणीं आढळतात. पुष्कळ जुन्या पोथ्यांच्या मलपृष्टावर आढळणारे पुढील दोन श्लोक पंतांनींही कांहीं ग्रंथांच्या मलपृष्टावर लिहिले आहेत. तैल, जल व शिथिलबंधन यांपासून आपलें रक्षण करण्याची एका श्लोकांत ग्रंथानें मनुष्याची विनवणी केली आहे; व 'कंबर, पाठ, व दृष्टि यांना अति कष्टवून मीं लिहिलेल्या ग्रंथाचें योग्य परिपालन करा' अशी दुसऱ्या श्लोकांत लेखकानें ज्यांच्या हातीं ग्रंथ पडेल त्यांची विनंती केली आहे. ते श्लोक असे आहेतः—

**'तैलाद्रक्षेज्जलाद्रक्षेद्रक्षेच्छिथिलबंधनात् ।**
**मूर्खहस्ते न दातव्यम्'—एवं वदति पुस्तकम् ॥ १ ॥**
**भग्नपृष्ठकटिग्रीव ऊर्ध्वदृष्टि रधोमुखि ।**
**कष्टेन लिखितं ग्रंथं यत्नेन परिपालयेत् ॥ २ ॥**

विषयानंदाहून विद्यानंदाची पायरी फार वरची आहे. अंतरात्म्याची शुद्धता व बुद्धीचा विकास झाल्याशिवाय मूर्त व पार्थिव सुखांना तुच्छ लेखण्याची बुद्धि होत नाहीं. मूर्ताकडून अमूर्ताकडे दृष्टि वळली कीं, एक पायरी वरची लागली. विद्यानंदाची खरी गोडी लागल्याशिवाय पाठ, मान व कंबर यांना क्लेश देऊन ग्रंथ लिहून घेण्याची खटपट कोणी करणार नाहीं. क्षुद्र सुखांत क्षुद्र जीवच रमायचे. 'ग्रंथसामुग्री करी। तो सत्वगुण' असें समर्थांनीं

---

१ पंतांनीं एका ग्रंथाच्या मलपृष्ठावर पुढील सरस श्लोक लिहिला आहेः—

**नानार्थानां सुवृत्तानां सरासानां विलोकनात् ।**
**श्लोकानां साधुलोकानां मुदं याति मनोऽतुलाम् ॥ १ ॥**

ह्मटलें आहे तें खरें आहे. ग्रंथसंग्रह करण्याच्या नित्यछंदामुळें पंतांच्या सत्वगुणाचाही बुद्धीबरोबरच विकास होऊं लागला. दहा बारा वर्षांच्या ग्रंथसंग्रहकारित्वामुळें त्यांच्या अंगचा आळस झडला, उद्योगप्रियता वाढली, तुच्छ विषयसुखांपासून मन परावृत्त झालें व पंतांनीं २९ व्या वर्षी रचलेल्या प्रल्हादविजय ग्रंथांत ह्मटल्याप्रमाणें त्यांची 'हरिध्यानासक्ति' बळावली. असो. ग्रंथ जवळ असणें हें तेव्हां श्रीमंतांशिवाय किंवा आस्थेवाईक विद्यार्थ्यांशिवाय इतरांस फारसें सुलभ नव्हतें. तेव्हां ग्रंथसंग्रह ही एक संपत्ति मानली जात होती. पंतांची ग्रंथसंग्रह करण्याची आवड व जलद लिहिण्याची तऱ्हा यांची द्योतक अशी एक आख्यायिका मीं कोल्हापूरप्रांतीं ऐकिली ती येथें सांगतों. आपल्या ग्रंथाम आपला वियोग क्षणभरही न होऊं देणारा एक गृहस्थ कोल्हापुरास होता. त्याजपाशीं 'भारतचंपू' असल्याचें पंतांस कळलें. तो गृहस्थ आपला ग्रंथ कोणासही देत नसे व पंतांस तर तो ग्रंथ वाचण्याची अनिवार इच्छा उत्पन्न झाली. तेव्हां पंतांनीं खालील मजेची युक्ति काढली. आपला एक स्नेही बरोबर घेऊन पंत त्याच्या घरीं गेले व आपल्याबरोबर त्यांनीं लिहिण्याचें सर्व सामान घेतलें. तो स्नेही ओटीवर त्या गृहस्थाजवळ बसून ग्रंथ अमळ सावकाश वाचूं लागला. पंत जवळच्या खोलींत कागद, दौत, लेखणी घेऊन बसले होते. तो गृहस्थ संकेताप्रमाणें स्पष्ट व सावकाश वाची व पंत आंतून ऐकून भराभर लिहून घेत. याप्रमाणें पहाटेपर्यंत त्या गृहस्थाचें वाचन चाललें असतांना पंतांनीं तो सारा ग्रंथ अतिद्रुत लिहून घेतला व दुसऱ्या दिवशीं सकाळीं आपला 'भारतचंपू' मालकापुढें टेवला! त्यास पंतांची आस्था, जलद लिहिण्याची तऱ्हा, व चातुर्य पाहून मोठें कौतुक वाटलें!! खऱ्या विद्यार्थ्यास आवश्यक असे अलौकिक गुण पंतांत होते. ते कोल्हापुराहून, पंढरीहून, साताऱ्याहून, वाईहून, फार काय पण काशीहूनही, ग्रंथ आणवीत. कांहीं वाचून परत करीत, व कांहींच्या नकला करून घेत. त्यांच्या इष्टमित्रांचीं त्यांस आलेलीं पत्रें मला सांपडलीं आहेत, त्यांवरूनही ही गोष्ट उघड होते. त्यांचे गुरुबंधु व स्नेही सदाशिव पाध्ये यांचीं कऱ्हाडाहून कांहीं पत्रें त्यांस आलेलीं सांपडलीं आहेत. "रघुवंशटीका पाठवा ह्मणोन लिहिलें... प्रबोधचंद्रोदय आणला होता तो सटिप्पण पाठविला आहे, येथें मालतीमाधवाची टीका मिळाली आहे;" "आह्मांपाशीं नैषधाचें पुस्तक दिलें तें पंढरपुरीं श्रीबाबास देण्याचें स्मरण न जाहलें;" "विष्णुसहस्रनाम व

गीता अवकाशानें लिहून पाठवूं. मुकूट सारा नाहीं. प्रती फार अशुद्ध... उद्योगपर्व व राघवानंद पावलें. हनुमन्नाटक टीका मुद्रां संपादिलें आहे. सेतु प्राकृत कालिदासकृत त्याजवर टीका पांच सर्ग पर्यंत मिळाली आहे. अवलोकनच्छा अमल्याम कळवावें;" 'रत्नावलिच्छाया व नागानंद तुमचीं राहिलीं आहेत तींही सत्वर पाठवून देतों;"—अशा प्रकारचीं वाक्यें त्यांच्या पत्रांत आहेत. पंतांचे आप्त गंगाधरभट पराडकर यांनीं आपल्या पत्रांतून 'दशकुमारचरित,' 'भोजनकुतुहल,' 'भीष्मपर्व,' वगैरे ग्रंथ पाठविल्याचा उल्लेख केला आहे. गदाधरींचे प्रख्यात टीकाकार कृष्णंभट आर्डे यांजपाशीं काशीक्षेत्रीं विठ्ठल पाध्ये व पंतांचे भाचे आत्माराम विद्याभ्यासार्थ राहिले होते. आत्माराम काशीहून एका पत्रांत पंतांस लिहितो—"आपल्या लिहिल्यापैकीं वेदमूर्ति. श्रीकृष्णंभटजी आर्डे यांजकडून विद्धशालभंजिका हें पुस्तक मिळालें. भटजींहीं हें पुस्तक आपले घरचें लिहिलेलें होतें तें आपला निरोप पावतांच दिलें आणि आज्ञा केली जे 'हें पुस्तक राजश्री मोरोपंतांस प्रविष्ट करून द्यावें.' शालिवाहनाचार्याची टीका भटजींचे पुस्तकावरून प्रति करून पाठविली आहे. आपण वीरराघव व उदात्तराघव लिहिलें त्यास भटजींस पत्र दाखविलें त्यांचे शोधांत तों नाहींत. उदारचरित या नामेंकरून नाटक आहे. भटजींनीं आश्वासन दिलें. मेळवून देतील. आणखीही कांहीं आपली भक्ति ज्या पुस्तकांविषयीं असेल तें लिहोन पाठविणें. शोध करून देऊं, ऐसें कृष्णंभटजींनीं सांगितलें. आपलें स्तोत्र बहुत केलें"...वगैरे. इतकेच उतारे पुरेत. या उताऱ्यांवरून पंत संस्कृत ग्रंथ काळजीनें संपादन करीत, कृष्णंभटासारख्या पंडितांस अज्ञात अशा ग्रंथांचाही शोध पंतांस असे, व त्यांनीं 'स्तोत्र' करण्यासारखे अमोल गुण पंतांत होते हें दिसतें. याप्रमाणें परगांवाहून लहान मोठे अनेक विषयांवरचे अनेक ग्रंथ आणवून ते वाचणें, लिहून घेणें, अनेक सटिप्पण ग्रंथांचा शोध करून व करवून ते संपादन करणें, आपले ग्रंथ दुसऱ्यांस लिहावयास देणें व इतकें करून स्वतंत्र ग्रंथ करण्याचा व्यवसाय अखंड चालविणें यांतच पंतांनीं पुष्कळ वर्षे घालविलीं; तेव्हां त्यांनीं आपणास '**ग्रंथसंग्रहकारी**' व '**विद्यार्थी**' म्हणणें सर्वथैव योग्य नाहीं असें कोण म्हणेल? पंतांना वडील मानणाऱ्या बाबापाध्यांसारख्या आप्तांना लिहितांना, किंवा भैराळ चातुर्मासे यासारख्या शिष्यतुल्य अल्प-

१ ही एक अमरकोशाची टीका आहे. २ मिळविलें.

वयस्कांना पत्रें लिहितांना सुद्धां पंत नेहमीं 'विद्यार्थी मयूर' ह्मणून लिहितात; व हें ५०।६० वर्षांच्या वयांत ! प्रख्यात मोक्षमुल्लर भट्टही आपल्याला मरेपावेतों विद्यार्थी ह्मणवीत असे. पंतांची गुरुभक्ति; त्यांची शालीनता; त्यांचें विस्तृत ग्रंथावलोकन; त्यांचें लेखनपटुत्व; त्यांचा जबरा व्यासंग; त्यांची ग्रंथसंग्रह करण्याची आवड; संस्कृत, प्राकृत, मराठी, हिंदुस्थानी या भाषांतले बहुतेक सारे ग्रंथ वाचून भाषाशुद्धि, मार्दव, अर्थगौरव, व्यापकता, वगैरे गुणांत सर्व मराठी काव्यांपेक्षां सरस असा पाऊणलाख ग्रंथ प्रसविणारी त्यांची अचाट बुद्धि; या सर्व गुणांचा विचार केला ह्मणजे या '**ग्रंथसंग्रहकारी**' '**विद्यार्थी मयूरा**' ची परम धन्यता वाटते.

६ पंतांनीं लिहून घेतलेल्या किंवा वाचलेल्या ग्रंथांचाच विचार केला ह्मणजे असें दिसतें कीं त्यांनीं सप्तशती, व सेतुबंधासारखे प्राकृत ग्रंथ; अमर, विश्व, वगैरे कोश; नैषधरघुकुमारादि महाकाव्यें; काव्यप्रकाश, रसमंजर्यादि साहित्यशास्त्रांवरचे ग्रंथ; वाणीभूषण, पिंगलकृत छंदःशास्त्र, वगैरे छंदःशास्त्रावरचे ग्रंथ, व शाकुंतल, हनुमन्नाटक व मुरारिनाटकादि नाटकग्रंथ; राघवपांडवीय–रामकृष्णकाव्य इ. चित्रकाव्यें; मत्स्यनीति, विष्णुपुराणादि, पुराणग्रंथ; व इतर कांहीं वेदांतपर व व्याकरणशास्त्रपर ग्रंथही वाचले होते. पंढरपुरीं प्रसिद्ध वैय्याकरणी विठ्ठलोपाध्याय हे पंतांपेक्षां वयानें पुष्कळ लहान असतांही ते शिष्यांस व्याकरण पढवूं लागले कीं, पंत कधीं कधीं जवळ बसत, व पाठ संपल्यावर त्यांस शंका विचारीत. पंतांची संस्कृतभाषानैपुण्याबद्दलही पुष्कळ ख्याति झाली होती. मोरोपंतांचे आप्त व स्नेही काशिनाथबाबा पाध्ये पंतांस एका पत्रांत लिहितात. "आह्मां सर्व सुहृज्जनांस इच्छा झाली ऐशीजे. आजपासून प्राकृत काव्याची लेखनी ठेवावीच ( पण ) संस्कृत दहा सहस्रपर्यंत काव्य आपलें व्हावें. दों दों सहस्रांत एकेक काव्य ऐशीं पंचकाव्यें आपलींच असावीं. रघुवंशादि पंच काव्यांच्या जातीनेंच सर्गादि रचना धरून करावी. शोधन टीकादि आपल्या पुण्यप्रतापें कोणीही करील. ही विनंती चित्तीं ठेवावी." अनेक वर्षांच्या दृढपरिचयानें मोरोपंतांच्या संस्कृतज्ञानाचें व काव्यशक्तीचें ज्यांस पूर्ण ज्ञान झालें होतें, अशा बाबा पाध्यासारख्या जाड्या पंडितानें आपल्या व पंतांच्या 'सर्व सुहृज्जनांच्या' वतीनें 'रघुवंशादि पंच महाकव्यांच्या धर्तीवर स्वतंत्र पांच काव्यें उठविण्याची मोरोपंतास सूचना केली, यावरून यापुढें तरी 'रघुकिरातादि पंडित

मान्य काव्यांची मोरोपंतांस बिलकूल ओळख होतीशी सुद्धां दिसत नाहीं.' हें मालाकारांचें विधान कोणासही मान्य होणार नाहीं असें वाटतें.

७ येथवर पंढरपुरीं असलेल्या पंतलिखित संस्कृत काव्यादि ग्रंथांच्या यादीवरून, त्यांच्या मित्रांच्या पत्रव्यवहारावरून व बाबा पाध्ये यांच्या पत्रावरून इतकें सिद्ध केलें कीं, पंतांचा रघुकिरातादि काव्यनाटकांशीं चांगलाच परिचय होता व जरी वीस वर्षांपूर्वी मालाकारांना तो 'परिचय कितीसा होता हें समजणें अशक्यच' वाटलें होतें, तरी तें आज नुस्तें शक्यच नाहीं, तर अगदीं स्पष्ट झालें आहे. येथवर दिलेल्या पुराव्यावरूनच पंतांचा रघुकिरातादिकांशीं व नाटकांशीं चांगलाच परिचय होता हें सिद्ध झालें आहे. आतां अंतःप्रमाणावरूनही समानार्थक स्थळें काढून दिलीं कीं 'पंचमहाकाव्यांशीं किंवा नाटकांशीं मोरोपंतांचा परिचय होता असें ज्यावरून अनुमान काढतां येईल असें स्थळ त्यांच्या ग्रंथांत आढळत नाहीं.' याही मालाकारांच्या विधानाची असत्यता वाचकांस अधिक स्पष्टपणें कळून मुख्य मुद्याचा कायमचा निकाल लागेल. स्थलसंकोचास्तव दिग्दर्शनापुरतीं मात्र **समानार्थक स्थळें** दाखवूं ह्मणजे झालें:—

( १ ) **दिशः प्रसेदुर्मरुतो ववुः सुखाः प्रदक्षिणार्चिर्हविरग्निराददे ।**

—रघुवंश. सर्ग ३–१३

**शोभे प्रदक्षिणार्चिःस्वधेश होता सती प्रसूता हे ।**
**झाल्या विमला काष्ठा, शीतल सौरभ सदागती वाहे ॥ १ ॥**

—कुशलवचरित. अ. २

( २ ) **सुजन्मनस्तस्य निजेन तेजसा-निशीथदीपाः सहसा हतत्विषो-**

रघु. स. ३–१४

**ब्रह्मन्भवत्प्रसादें सीता व्याली किशोरयुगुळाला ।**
**त्यांच्या तेजःप्रसरें दीपाचा सर्व गर्वहि पळाला ॥ २ ॥**

–कुश. अ. २

( ३ ) **उष्णत्वमग्न्यातपसंप्रयोगात् शैत्यं हि यत्सा प्रकृति र्जलस्य ॥५४॥**

रघु. सर्ग.५

**सकोप दिसती गुरु क्षणभरींच, जें तापलें ।**
**जल ज्वलनसंगमें, त्याजि न शैत्य तें आपलें ॥ ८८ ॥**

—केकावली.

(४) **आकृतिविशेषेषु आदरःपदं करोति।**

—अभिज्ञान शाकुंतल.

**'जेथें आकृति तेथें वसति सुगुण' ह्मणति कवि वृथा काय?॥ ३४॥**

—अश्वमेधपर्व. ६

**प्रकृतिमनोहर तेथें वद न धरी कोण आदरा जीव ॥ ६७॥**

—मंत्रभागवत. स्कं. ११

(५) **निधानगर्भामिव सागरांबरां शमीमिवाभ्यंतरलीनपावकाम्।**
**नदीमिवांतःसलिलां सरस्वतीं नृपःससत्त्वां महिषीममन्यत॥ ९.॥**

—रघुवंश. सर्ग ३—

**चिंतामणि पेटीला कीं जेविं निधानगर्भ सुक्षितिला।**
**कीं अमृतरस कुपीला बहुगौरव दे तिचाच कुक्षि तिला॥११२॥**

—आदिपर्व, अ. ९

(६) भवभूतीच्या उत्तररामचरितांतील पुढील दोन मनोहर कल्पना पंतांनीं कशा उचलल्या आहेत तें पहा:—

(अ) **नैसर्गिकी सुरभिणः कुसुमस्य सिद्धा।**
**मूर्ध्नि स्थितिर्न चरणैरवताडनानि॥**

**प्रेक्षकमन बहु चरणें चुरितां वंद्या फुलासि कळकळतें॥ ६१॥**

—आदिपर्व. अ. ३६

(आ) **अविदितगतयामा रात्रिरेव व्यरंसीत्।**
**त्या दीनबंधुची ती चिंता न सरे, परंतु रजनि सरे॥ ८७॥**

—उद्योगपर्व अ. ७

(७) **'न वयःप्रमाण तेजस्विजनीं' ह्मणति कवी न तें लटिकें॥७१॥**

—विराटपर्व अ. ६

या आर्यार्धानला पंतांचा उद्दिष्ट कवि ह्मणजे 'तेजसां न हि वयः समीक्ष्यते' (रघु. ११) असा उद्गार काढणारा कालिदासच होय.

(८) प्रो. श्रीधरपंत परांजपे यांनीं केकावलीच्या टीपेंत केका १०।१७ १८ व २१ गंगालहरींतल्या कित्येक श्लोकांवरून कशा सुचल्या असाव्यात हें चांगल्या तऱ्हेनें सिद्ध करून दिलें आहे.

(९) **पंतांनीं 'मंत्ररामायण' केलें तें 'हनूमन्नाटकाची' बरोबरी करण्यासारखं आहे असें त्यांनाच वाटत होतें, 'वाटे स्वमंत्ररामायण निजनाटक**

तुळींच तोलावें' या त्यांच्याच 'नामरसायनांत 'ल्या आर्यार्धावरून स्पष्ट होतें. पंतांचें मंत्ररामायण व हनूमन्नाटक यांत पुष्कळच साम्य आहे, तथापि पुढील कैकेयीभरतसंवादात्मक श्लोक पंतांनीं मराठींत कसा उतरला आहे हें त्यांच्या अप्रसिद्ध 'त्रुटित' रामायणांतल्या उताऱ्यावरून लक्षांत येईल.

**मातस्तातःक्वयातः?-सुरपतिभवनं; हा! कुतः?-पुत्रशोकात्!**
**कोसौ पुत्रश्चतुर्णां?-त्वमवरजतया यस्य जातःकिमस्य?-।**
**प्राप्तोसौ काननान्तं, किमिति? नृपगिरा; किं तथासौ बभाषे?-**
**मद्वाग्बद्धः फलं ते किमिह?-तव धराधीशता!-'हा! हतोस्मि'॥३१॥**

—हनूमन्नाटक अंक ३.

याचें पंतकृत सुरस भाषांतर.

**वंदूनि मातेसि तेव्हां ह्मणे, 'आज**
**गेला असे सांग कोठें महाराज?'**
**'स्वर्गासि गेला कुमारा! तुजा तात'**
**अंब! अकस्मात जाला कसा घात?' ॥ १ ॥**

**'हा! पुत्रशोकेंचि मेला सुता! राय'**
**'तो कोणता हें मला सांग हो माय'।**
**'बंधू नमस्कार सारे करा ज्यास'**
**'जालें तया काय? तो मान्य राजास' ॥ २ ॥**

**'स्त्रीबंधु घेऊनि गेला अरण्यास'**
**'कां मानलें हें जनाच्या शरण्यास?'।**
**'वत्सा! तुझी तातवाणीच तन्मूळ'**
**'ऐसें कसें बोलिला भूपशार्दूळ?' ॥ ३ ॥**

**'बोले असें भूप मद्वाग्गुणाबद्ध**
**'कैंची फलप्राप्ति? कां पीडिला वृद्ध?'।**
**'व्हावें तुला राज्य तो साधिला काम'**
**'हा पापिणी! काय केलेंसि? हा राम!' ॥ ४ ॥**

**(१० ) धातूंत जसें हाटेक नाटक वर सर्व सुप्रबंधांत।**
**तें अरसिकांत संप्रति निष्फळसें मुकुर जेंवि अंधांत॥ ५९ ॥**

—रामरीति.

---

**१ सुवर्ण. २ आरसा.**

नाटकाला नाक मुरडण्याऱ्या अरसिक पंडितांवर कोरडा ओढून पंतांनीं या ठिकाणीं आपलें नाटकग्रंथावरचें प्रेम व्यक्त केलें आहे. पंतांच्या वेळीं मराठींत नाटकग्रंथ नव्हते, व सरस नाटकग्रंथ जींत आहेत अशी संस्कृताशिवाय अन्य भाषा पंतांस येत असल्याचें बिलकूल प्रमाण नाहीं, ह्मणून वरील आर्येंत संस्कृत नाटकांचाच पंतांनीं गौरव केला आहे असें मानणें प्राप्त आहे.

( ११ ) रघूच्या नवव्या सर्गाच्या धाटणीवर त्याच वृत्तांत पंतांनीं पांडुरंगस्तोत्र ( संस्कृत ) व विठ्ठलभक्तस्तुति (मराठी) हीं स्तोत्रें रचलीं आहेत:-

**(र०)-न कृपणा प्रभवत्यपि वासवे न वितथा परिहासकथास्वपि ।**
**नच सपत्नजनेष्वपि तेन वागपरुषापरुषाक्षरमीरिता ॥ ८५ ॥**

**(वि०)-निजजना अमृतें बहु तर्पिती । स्व अनवे अनवेंकर अर्पिती ।**
**सतत पूर्ण मुकुंदयशोरसें । न वदना वद ना ह्मणती असें ॥ १ ॥**

[ १२ ] याशिवाय ' स्वतोक पितरा रुचे जरिहा कर्दमीं रांगले, ' [ केका ८९ ] या चरणाशीं ' धन्यास्तदंगरजसा मलिनीभवन्ति ' [ शाकुन्तल अं. ६ ] या कालिदासोक्तीचें किती तरी साम्य आहे ! ' स्नेह तुह्मांसि भिववितो ' [ उद्योगपर्व अ० ५ ] हें ' अतिस्नेहः पापशंकी ' [ अ. शाकुन्तल ] याचेंच रूपांतर आहे. ' तर्क खरा चित्त साधुचें करितें ' [कर्णपर्व अ.५०] हें वाक्य ' सतां हि संदेहपदेषु वस्तुषु प्रमाणमन्तःकरणप्रवृत्तयः ' [अ. शाकुन्तल अं. १ ] याचेंच भाषांतर आहे. ' भुवनीं पसरत असतां यश सहजाचि जेंवि वारिवरि तेल ' [कर्ण. २०] ही केवळ ' तैलस्य बिंदुरिव वारिणि दुर्निवारं ' [ प्रसन्नराघव ] या जयदेवोक्तीची छाया आहे. ' शोधिति दहनांत वीर हेमातें ' [ उद्योग. अ० ९ ] ही कल्पना ' हेम्नः संलक्ष्यते ह्यग्नौ विशुद्धिः श्यामिकापि वा ' [ रघु० सर्ग० १ ] या कालिदासवचनाचीच पुनरुक्ति आहे. याप्रमाणें शेंकडों समानार्थक स्थळें रघुकिरातादि बहुतेक सर्व संस्कृत काव्यनाटकादि ग्रंथांतून काढून दाखवितां येतील. या दिशेनें संस्कृत नाटकें, काव्यें व महाकाव्यें, मोरोपंती काव्यांबरोबरच कोणीं वाचूं लागला, तर पंतांना संस्कृत काव्यपद्धतीची किती उत्कृष्ट ओळख होती हें त्यास स्पष्ट दिसेल. संस्कृतांतले बहुतेक सारे दृष्टांत, साऱ्या उपमा, सारे अलंकार, सारीं वृत्तें, सारे कविसंकेत, सारे भाषणप्रकार, साऱ्या वर्णनपद्धती, सारे रस, पंतांनीं आपलेसे केले होते; व ह्मणूनच संस्कृतज्ञांना ही डोलवायला लावण्याचें सामर्थ्य त्यांच्या काव्यांत आलें. साहित्यशास्त्रावर आणि

छंदःशास्त्रावर मराठींत ग्रंथ लिहिण्याचें कोणीं मनांत आणील तर त्याला एकटी पंतकविता हवी तेवढी सामुग्री पुरवील ! कालिदास, माघ, भारवि, बाण, सुबंधु, दंडी, जगन्नाथपंडित, मम्मट, वगैरे सर्व प्रसिद्ध ग्रंथकारांशीं पंतांचा उत्कृष्ट परिचय होता, किंबहुना त्यांच्याशीं उत्कृष्ट परिचय झाल्यामुळेंच प्राकृतांत काव्यरचना करण्याची त्यांना प्रथम बुद्धि झाली असें ह्मटलें तरी चालेल.

८ पंतांच्या शिक्षणांतलें दुसरें प्रधान अंग ह्मणजे रामायण, भारत व भागवत हे तीन बृहद्ग्रंथ होत. या तीन ग्रंथांवर पंतांनीं पुष्कळ वेळां पुराणें सांगितलीं होतीं, व रामायण आणि भागवत हे ग्रंथ तर पंतांना मुखोद्गत झाले होते. काव्यनाटकादिकांच्या अध्ययनामुळें पंतांना चातुर्य, कल्पकता, भाषाप्रभुत्व, वगैरे गुण प्राप्त झाले; व या तीन ग्रंथांच्या अध्ययनामुळें त्यांच्या विचारांना प्रौढता येऊन हिंदुसमाजशास्त्राचें रहस्य त्यांना बरोबर समजलें. पंतांनीं या ग्रंथांवर मराठींत लहान मोठे अनेक ग्रंथ केले आहेत. तेव्हां या मूळ ग्रंथांचें त्यांचें अध्ययन कसें होतें हे वेगळें सांगण्याची जरूर नाहीं. मोरोपंतच काय, पण भरतखंडांतल्या प्राचीन व अर्वाचीन कवींत असा कोण कवि आहे कीं, ज्याला यांपैकीं एका तरी ग्रंथापासून प्रेरणा झाली नाहीं? रामायण, भारत, व भागवत हे तीन ग्रंथ भरतभूमीवरचे प्रचंड वृक्ष आहेत, व यच्चावत् भारतीय कवि या वृक्षांच्या आश्रयानें राहून कूजन करणारे पक्षी आहेत; किंवा हे तीन महासागर आहेत व यांच्या जलावर पुष्ट होणारे अन्य कवि असंख्य जीवसृष्टीवर जीवनामृताचा वर्षाव करणारे मेघ आहेत ! रामायणासारखें मनोहर, उदात्त, व पवित्र काव्य; भारतासारखा सर्वांगसुंदर इतिहास; व भागवतासारखा भक्तिरसपूर्ण धर्मग्रंथ या साऱ्या त्रिभुवनांत सांपडणार नाहीं. हे तीन ग्रंथ ह्मणजे सारा ब्रह्मांडपसारा आटोपणारी परमात्म्याची त्रिपादभूमिच होय! या तीन दिव्य ग्रंथांची जोड भरतखंडाला परमेश्वरानें करून दिली हा आह्मां भारतीयांवर त्या दयाघनाचा केवढा अनुग्रह होय ! वाल्मीकिव्यासशुकही भारतीयांची परमपूज्य त्रयी होय. पंतांनीं या त्रयीविषयीं आपला पूज्यभाव अनेक ठिकाणीं व्यक्त केला आहे. जग हेंच कोणी अपत्य व त्याला अमृत पाजणाऱ्या माता ह्मणजे या मुनींच्या कृति (काव्यें) होत असें पंतांनीं मंत्रभागवतांत ( स्कंध १० ) ह्मटलें आहे. कविसमूहांत हाच वाल्मीकि कविनृप होय

असें पंतांनीं बृहद्दशमांत (अ० ८१) ह्मटलें आहे. पंतांच्याच मार्मिक शब्दांनीं या तीन ग्रंथांची योग्यता काय आहे ती पाहूं:—

( १ ) रामायण:—

**वाल्मीकिविप्रोत्तम काव्यपद्म । श्रीरामलीला मकरंदसद्म ।**
**तेथें मयूरेश्वर भृंग झाला । सेवावया नित्यसुखें रसाला ॥**

—मंत्ररामायण, उपसंहार.

( २ ) भारत:—

**सर्वश्रुति सर्वस्मृति । जीं जीं शास्त्रें पुराणें असती ।**
**त्या सकळांतें महामती । भारतामाजीं सांठवी ॥ १ ॥**
**शब्दब्रह्मसागर मथिला । अमृतें इतिहासकलश भरिला ।**
**साधुशिष्यांच्या हातीं दिधला । जाड्यरोगार्ता पाजावया ॥ २ ॥**

दुर्वासभिक्षा.

( ३ ) भागवत:—

**मोहहि नसतां गावी जीवन्मुक्तींहि संहिता वा हे ।**
**श्रीहरिच्या अत्यद्भुत महिमा ऐसाचि सद्गुणीं आहे ॥**

—मंत्रभागवत.

पंतांनीं व्यासवाल्मीकिशुकांबद्दल शेंपन्नास तरी आर्या केल्या असतील त्यांपैकींच रामरीतींतील व्यासांबद्दलची पुढील एकच आर्या पहा:—

**व्यासा ! वा साक्षात् तूं नारायण जडजनांसि ताराया ।**
**अवतरलासि दयार्णव बोधें अज्ञान सर्व साराया ॥ ८५ ॥**

व्यासवाल्मीकिशुकांविषयीं पंतांचा आदरभाव जसा हृदयस्फोट होऊन बाहेर पडला आहे तसा तो कालिदासादिकांविषयीं कोठेंही बाहेर पडला नाहीं. ज्यांच्या काव्यांवरून पंतांनीं संस्कृतभाषेचा अभ्यास प्रथम केला त्यांच्याविषयीं पंतांनीं असा मूकभाव कां धरिला हें सांगतां येणें फारसें कठिण नाहीं. पंत मुख्यत: भगवद्भक्त होते व गौणत्वानें कवि होते. आधीं भक्त, नंतर कवि नाटकें, कादंबऱ्या, लिहिणारांविषयीं त्यांचा कितीही आदरभाव असला, तरी संतांविषयीं त्यांच्या ठायीं जो प्रेमा होता तो खऱ्या जिव्हाळ्याचा होता. त्यांना जनमनोरंजनासाठीं किंवा कीर्तिसाठीं काव्यें लिहावयाचीं नव्हतीं. भगवत्प्रसाद जोडण्यासाठीं स्वचित्तशुद्धिसाधक ह्मणून त्यांनीं काव्य रचण्याचा प्रचंड उद्योग केला. कालिदासादिकांपेक्षां व्यासादिकांचें त्यांनीं जें प्रेम बाळगिलें तें एवढ्याचसाठीं होय.

तथापि पंतांच्या विद्याव्यासंगाला शुद्ध भक्तिमार्गाचें वळण लावायला आमचे प्राकृत कवि कारण झाले. प्राकृत काव्यांचा व मुख्यतः मराठी काव्यांचा अभ्यास पंतांनीं फार आस्थेनें केला होता. यासंबंधानें विशेष चर्चा पुढें 'संतप्रकरणांचा' विचार करितांना करीन. पंतांचीं ज्ञानेश्वरादिकांचीं स्तवनें, सन्मणिमाला, रामगीति, वगैरे प्रकरणें पाहिलीं ह्मणजे पंतांनीं ज्ञानेश्वरांपासून रामजोशांपर्यंत सर्व मराठी संतांची व कवींची कविता अत्यंत काळजीपूर्वक वाचली होती असें स्पष्ट दिसतें. पंतांनीं मुक्तेश्वर, वामन, विठ्ठल, आनंदतनय, वगैरेंवर जे मार्मिक व यथार्थ अभिप्राय दिले आहेत ते पाहून व दासोपंत, कृष्णदयार्णव, वगैरेंचे दुस्तर ग्रंथसागर तरून जाण्यांत जी चिकाटी दाखविली ती पाहून पंतांची धन्यता वाटते. गेल्या पन्नास पाऊणशें वर्षांत मराठी भाषेचे अभिमानी ह्मणून पुष्कळ पंडित पुढें आले आहेत, पण पंतांच्या वेळीं छापण्याची किंवा दळणवळणाची बिलकूल सोय नसूनही पंतांनीं बहुतेक भाग महाराष्ट्रकाव्यार्णव उल्लंघिला होता! पंतांच्या पश्चात् पंतांच्या योग्यतेचा मराठी भाषेचा पंडित कोणीही झाला नाहीं असें मला वाटतें! पंतांचें मराठी भाषेचें अध्ययन किती जबर होतें हें त्यांच्या कवितेवरून कोणासही दिसणार आहे. पूर्व मराठी कवींच्या किती तरी कल्पना व रचनापद्धती पंतांनीं उचलल्या आहेत. आनंदतनयवामनादिकांनीं प्रचारांत आणलेल्या यमकादिशब्दचमत्कारांची तर पंतानीं शिकस्त करून सोडली आहे. मराठींतल्या मराठींत समानार्थक स्थळें दाखविणें जरूर नाहीं, तथापि पूर्वकालीन मराठी कवींचे ग्रंथ पंतांनीं किती बारकाईनें पाहिले होते हें स्पष्ट करून दाखविण्यासाठीं पांच चारच उतारे देतोः—

(१) ना तरी इक्षुदंडु। पाळितया गोडु।
गाळितया कडु। नोहेचि जेविं॥ २००॥

ज्ञानेश्वरी अ. १२

छळकासि कवि न शापिति, देते जड कनक काय हो गाळी?।
पाळी जो त्यासि मधुर इक्षु तसा त्याहि अदय जो गाळी॥ ३१॥

—सभापर्व अ. ७

(२) जेविं दुधालागीं मांजर। संधी पहावया सादर।
तेवीं सेवावया कथासार। निरंतर उल्लास॥ १२३५॥

—एकनाथी भागवत.

त्यां कीर्तना टपावें मार्जारें सर्वदा जसें दुग्धा ॥ ३८ ॥

—सन्मनोरथराजि.

( ३ ) पडतां जड भारी। दासें आठवावा हरी ॥ १ ॥

—तुकाराम.

जा त्यासि शरण, चरणस्मरणचि रणमरणसंकटीं तारी।
मारी तोचि खळांतें, दासासि पडों न देचि जडभारी ॥ १२ ॥

—द्रोणपर्व अ. २४

( ४ ) 'तुझा अतर्क्य महिमा न कळे अनंता'।

वामन, ब्रह्मस्तुति.

अतर्क्य महिमा तुझा गुणहि फार बा हे विधी

-केकावली.

( ५ ) 'कीर्तनासि जन हो तुह्मि जागा' या प्रसिद्ध वामनी श्लोकांतल्या जागा शब्दाचे चारही अर्थ पंतांनीं पुढील आर्येत आणले आहेत:—

जा, गा महानगुणा, दिधलें तुज जीवदान जा जा गा।
जागा दाउनि केल्या हरि, वांचाया नसे गजा जागा ॥ ४१ ॥

—कर्णपर्व अ. ३१.

संस्कृत व प्राकृत कवींच्या ग्रंथांतून पुष्कळ चांगल्या कल्पना पंतांनीं उचलल्या आहेत. यावरून त्यांच्या बुद्धिमत्तेस किंवा काव्यशक्तीस कमीपणा येतो असें कोणीही समजूं नये. सर्व देशांत सर्व काळीं असाच प्रकार घडतो. पूर्वकालीन ग्रंथकारांचे ग्रंथ नीट पाहिल्याशिवाय बहुधा कोणीही चांगला ग्रंथकार ग्रंथरचना करावयास धजत नाहीं. ज्ञानेश्वरी, नाथभागवत, तुकोबांचा गाथा, वगैरे ग्रंथ पाहिले ह्मणजे पूर्वकालीन ग्रंथकारांचा उत्तरकालीन ग्रंथकारांवर केवढा परिणाम होतो तें कळून येणार आहे. कालिदास व भवभूति, इंग्रजी कवि मिल्टन व ग्रे, शेक्सपीअर व त्याच्या आधींचे ग्रंथकार, यांचा अन्योन्य संबंध असाच अर्थसादृश्यांवरून व कल्पनासादृश्यांवरून दाखविण्याचा विद्वानांचा प्रघात आहे. प्रत्येक ग्रंथकार पूर्वग्रंथांचें 'ऋण' शिरावर घेतो. चांगला ग्रंथकार पूर्वींची सरस कल्पना घेऊन अधिक खुलवून दाखवितो. एकच उदाहरण घेऊन ही गोष्ट सिद्ध करून दाखवूं ह्मणजे झालें.

( १ ) अर्जुन मोहानें कवळलेला पाहून ज्ञानोबा ह्मणतात:—

जैसा भ्रमर भेदी कोडें। भलतैसें काष्ठ कोरडें।

**परि कळिकेमाजि सांपडे। कोंवळिये ॥ २०१ ॥**
**तेथ उत्तीर्ण होईल प्राणें। परी तें कमळदळ चिरूं नेणे।**
**तैसें कठिण कोंवळेपणें। स्नेह देखा ॥ २०२ ॥**

(२) नाथांनीं हा भ्रमराचा दृष्टांत असाच घेऊन शिवाय त्यांच्या गृहस्थी बाण्याला शोभण्यासारखा पदरचा एक दृष्टांत घातला आहे:—

**जो शुष्क काष्ट स्वयें कोरी। तो कोंवळ्या कमळामाझारी।**
**भ्रमर गुंतला प्रीतीवरी। केसर माझारी कुचंबों नेदी ॥ १ ॥**
**बाळ पालवी घाली पिळा। तेणें बाप राहे थोकला।**
**तरी काय तो निर्बळ जाहला। ना तो स्नेहें भुलला ढळेना ॥ २ ॥**

(३) हे दोन्ही दृष्टांत घेऊन तुकोबांनीं पुढील अभंग केला आहे.

**नाहीं काष्टाचा गुमान। गोवी भ्रमरा सुमन ॥ १ ॥**
**प्रेम प्रीतीचें बांधलें। तें न सुटे कांहीं केलें ॥ २ ॥**
**पद्रीं घाली पिळा। बाप निर्बळ सारी बाळा ॥ ३ ॥**
**तुका ह्मणे भावें। भेणें देवें आकारावें ॥ ४ ॥**

कोणीहा ग्रंथकार झाला तरी कांहीं स्वयंभू आकाशांतून एकदम खालीं पडत नाहीं. त्याला पूर्वग्रंथांचा दृढाभ्यास करावा लागतोच, व नित्य पठनानें त्यांतील कल्पना सहजच आपल्याशा होऊन जातात. 'उष्ट्या पत्रावळी गोळा करून कवित्वाची कळा दाखविणारे चोरकवि' तेव्हांच उघडे पडतात! त्यांच्यांत जातीचें कवित्व नसल्यानें आपल्या गोधडीला ते शालजोडीचीं ठिगळें लावतात, पण अशानें त्यांचें दारिद्र्य कांहीं झांकलें जात नाहीं! उलट

**साधूंत खळ, जसा कीं काचमणी परमशुद्ध मोत्यांत।**

या न्यायानें त्यांची फजिती मात्र होते! श्रेष्ठ कवि प्राक्कालीन कविवचनें नित्य चिंतनानें आपलीशीं करून टाकतात. मुक्तेश्वरानें तर या बाबतींत मोठाच डौल मारिला आहे! तो ह्मणतो कीं, 'जिणें कवींच्या मुखींचीं उच्छिष्ट शितें ग्यां दुर्बळानें वेंचिलीं' व 'तीं सेवूनियां पावलों तृप्ति। तेणें उद्गारली स्फूर्ति!' ह्मणजे पूर्वकालीन कवींचे ग्रंथ मीं अत्यंत आस्थेनें वारंवार पाहिले व ते पाहतां पाहतां कवित्वाला अवश्य अशा प्रसादादि गुणांची मजजवळ सिद्धता झाली व मलाही काव्यरचनेची स्फूर्ति झाली! आणि हाच खरा मार्ग आहे. पंतांनाही प्राचीन व अर्वाचीन संस्कृत व मराठी कवींचे ग्रंथ नित्य अवलोकन करितां करिता आनंदाचे ढेंकर आले, व त्याबरोबर सरस्व-

ती त्यांच्या जिव्हाग्रावर बसली व कवित्वाचा प्रवाह सुरू झाला. हा प्रवाह प्रारंभीं अर्थातच लहान होता. पुराण ग्रंथांतलीं निवडक प्रकरणें घेऊन त्यांना मराठी पोषाख चढविण्याचा प्रयत्न करून तो साधतो असें वाटल्यावर मग त्यांनीं मोठमोठ्या काव्यांस हात घातला. पंतांनीं मुकुंदराज, ज्ञानेश्वर, एकनाथ, रामदास, वामन, श्रीधर, नामदेव, तुकाराम, मुक्तेश्वर, महिपती, आनंदतनय, विठ्ठलकवि, कृष्णदयार्णव, रंगनाथ, वगैरेंची कविता अत्यादरपूर्वक पण सूक्ष्मदृष्टीनें वाचलेली होती. ज्ञानेश्वरी, नाथभागवत व भावार्थरामायण, दासबोध, यथार्थदीपिका व समश्लोकी, विठ्ठलाचीं चित्रकाव्यें, महिपतींचीं भक्तचरित्रें, तुकोबांचे अभंग, उद्धवचिद्घनाचे ग्रंथ, श्रीधराचे हरिविजयादि पुराणग्रंथ, मुक्तेश्वरी भारत, हे ग्रंथ पंतांनीं विशेष बारकाईनें वाचले होते, असें त्या त्या ग्रंथांवर त्यांनीं दिलेल्या मार्मिक अभिप्रायांवरून स्पष्ट होतें. याशिवाय मिराबाईचीं पदें, तुळशीदासाचें रामायण, कबीराचे दोहरे, नरसिंहमेहत्याचे केदार, वगैरे कविताही त्यांनीं निःसंशय पाहिली होती. हिंदुस्थानी कविता वाचण्याचा पंतांचा छंद होता असें दिसतें. दोहावृत्त, सूरावृत्त, हीं वृत्तें मराठींत नव्हतीं, पण पंतांनीं ह्या वृत्तांत रामायणें रचून हीं मराठींत आणलीं आहेत! पंतांनीं हिंदुस्थानी भाषेप्रमाणें ग्वाल्हेरी भाषेचीही स्तुति केली आहे, ती बहुधा 'जिम सर्व सत्कवि प्राशी' अशा नाभाजींच्या 'भक्तमाले'च्या वाचनानंतरच केली असावी(महद्विज्ञापना.९७).तात्पर्य, पंतांनीं संस्कृत व प्राकृत उभय भाषांतले बहुतेक नामांकित ग्रंथ वाचले होते. त्यांनीं मधुकरवृत्ति ठेवून 'वर्तो सर्वत्र मधुप रम' या न्यायानें सर्व लहान मोठ्या, बऱ्या वाईट, नव्या जुन्या, ग्रंथांना वाचून टाकण्याचा सपाटा चालविला होता. त्यांचें सर्व चांगल्या ग्रंथांवर फारच प्रेम असे. रामगीतींत ते ह्मणतात:—

**श्रीरामा ! बहु गोडचि मजला जैसे सुकाळल्या सर्व. ।**
**कोठें मिळतें ? कैंची शक्ति ? धरिन मी मनांत कां गर्व ? ॥ ७० ॥**

महाराष्ट्रांतील वतनदारांना आपल्या वतनाचा पराकाष्ठेचा लोभ असतो. ते प्रसंगीं सर्वस्व गमावतात पण वतन राखतात. वतनदारांना जसा आपल्या वृत्तीचा सोस असतो, तसा, पंत ह्मणतात, मला सुरस ग्रंथांचा सोस आहे:—

**थोरांहीं स्तविले कवि, तन्निंदा तिळहि सोसवत नाहीं ।**
**मज सुरस ग्रंथांहीं, वृत्तिपरा जेंवि सोस वतनांहीं ॥ ६१ ॥**

'रामरीती'तच ते आणखी ह्मणतात:—

**सद्व्यसनीं वेंचावें आयुष्य, नसेचि भरंवसा याचा ।**
**झालों जीर्ण तरि मनीं आहे रसिकांत भर वसायाचा ! ॥६७॥**

१० पंतांनीं धर्मशास्त्रही थोडेंबहुत पाहिलेंसें दिसतें. बाबापाध्ये प्रसिद्ध धर्मसिंधुकार, हे त्यांचे स्याही, गुरुपुत्र व स्नेही होते. त्यांचा धर्मसिंधु, व मनुस्मृति आणि इतर ग्रंथही पंतांनीं पाहिले होते.' हरिवंश' हा ग्रंथ पंतांच्या उत्तर वयांतला आहे. त्यांत खालील आर्या आहेत:—

**परि पितृकरीं न दिधला त्यां पिंड कुशावरींच कीं कांहीं ।**
**बौधायनादि सूत्रीं विधि, वत्सा ! अन्य देखिला नाहीं ॥ अ २-७**
**कन्यादानीं करि जो विघ्न, असुनि आयु तो वचे नरकीं ।**
**वदले मन्वादि स्मृतिकार, महापातकी पचे नरकीं ॥ अ. २२-१०४**

चंद्रप्रकाश हा सूर्यप्रकाशाच्या परावर्तनापासून झाला आहे ही ज्योतिषशास्त्रांतली गोष्ट पंतांना माहीत होती. छंदोरामायण ( सर्ग १४ ) रामास मखरक्षणास्तव विश्वामित्राचे स्वाधीन करितांना दशरथ रामास ह्मणतो:—

**आत्मतेज मुनि हा तुजमाजीं । ठेवुनी मथिल राक्षसराजी ।**
**चंद्रमंडळि जसा स्वकरांशीं । स्थापुनी रवि निशातम नाशी ॥११॥**

पंतांना वैद्यकीही चांगली अवगत असावीसें वाटतें. मोरोपंतांच्या वैद्यकीवर कांहीं आर्या आहेत असें कोल्हापुर प्रांतीं मीं तीन वर्षांपूर्वीं प्रथम ऐकिलें. त्यांच्या शोधांत असतां वे० बाळशास्त्री हुपरीकर यांचेजवळ त्यांचे वडील अण्णाभट यांचें वैद्यकावरचें एक बाड पाहिलें त्यांतः—' हेमाडपंतांच्या ग्रंथावर मोरोपंत यांनीं वैद्यकांत आर्या १३१३ केल्या होत्या' असें एक वाक्य आढळलें. यानंतर नाशीक, सांवतवाडी, वगैरे शहरीं कांहीं सुगावा लागल्यामुळें मीं बरीच चौकशी केली, पण खात्रीलायक माहिती लागली नाहीं. खुद्द अण्णाभटांच्या बाडांत वैद्यकीवरच्या पंतांच्या ३०।३९ आर्या दिलेल्या मीं पाहिल्या, पण त्या पंतांच्या आहेत असें मला वाटत नाहीं. तथापि नमुन्याकरितां त्यांतील १२ आर्या देतो:—

**जीर्णज्वरासि वटिका चिंचवटी घे समान ती कुटकी ।**
**कवडी खर्च न करितां जाइल बापा ! न वाजतां चुटकी ॥ १ ॥**
**स्तनमान काळपुळि ते उत्तम कंदाचि उपाय हाचि वदा ।**
**मधुमिश्रित गुंज मिती घ्यावा परिपूर्ण दीन ते चवदा ॥ २ ॥**

गारगोटीहून रा. रामभाऊ आळतेकर यांनीं एका पत्रांत मला कळविलें कीं, 'नाशीकच्या कोणा गृहस्थास जीर्णज्वराचा आजार असून त्यानें अनेक औषधें घेतलीं, पण गुण आला नाहीं. त्यानें पंतांच्या आर्येतल्या औषधानें गुण आल्यामुळें त्यानें त्या आर्या संपादन केल्या. त्या १५०० आहेत. पंतांनीं या आर्या प्रथम रचिल्या असें ऐकिवांत आहे. या आर्यांतलीं औषधें रामबाण आहेत. मीं त्यांचा अनुभव घेतला आहे.' रा. आळतेकरांनीं मजकडे पंतांच्या ह्मणून पाठविलेल्या आर्यांपैकीं २।३ खालीं देतों:—

**नवसागर भाजुनियां सेवी तक्रांत पावलीभार ।**
**मुनिदिन किंवा त्र्यदिन होइल मुळिहूनि नारुसंहार ॥ १ ॥**

**चौधारी शुष्क स्नेहीं दारूचा धूर सप्तकें दोन ।**
**दिधल्या सूज कशीही जाइल तेव्हांचि रुष्ट होऊन ॥ २ ॥**

पंतांच्या कवितेंत कोठें कोठें वैद्यकींचे दृष्टांत मात्र आले आहेत. 'कष्ट झाला धर्मा बहु हिक्कार्तासि लशुनसा मान्य', (द्रोण० अ० २१) यांत उचकीवर लसुण योजावा ह्मणून सांगितलें आहे: 'यदुश यक्षगणा दे बळ जेंवि विषूचिकागदा पाणी.' (हरिवंश. अ० ९) यांत मोडशी किंवा पटकी पाण्यानें बळावते असें ह्मटलें होतें. पंतांच्या वैद्यकीवरच्या संपूर्ण आर्या सांपडल्यास वैद्यशास्त्रावर मोठा उपकार होणार आहे. पंतांना वैद्यकी चांगली अवगत होती हेंही निश्चित दिसतें. बाबा पाध्यांचा एक जवळचा आप्त महारोगानें ग्रासला होता. त्यासंबंधाचा त्यांचा व पंतांचा पत्रव्यवहार पाध्यांच्या घरीं मला सांपडला त्यावरून ही गोष्ट सिद्ध होते. बाबा पाध्ये पंतांस लिहितात: "... याच्या शरीरीं भावना उत्पन्न आहे. याची चिकित्सा हा काळपर्यंत केली. यास काय रक्तपित्त ऐसें नाम किंवा कुष्टभेद याचा आपण सूर्यारुणीं शोध केला असेल अथवा वैद्यकांत पाहिलें असेल त्याप्रमाणें आपल्या विचारें जो अर्थ ठरला असेल त्याप्रमाणें लिहावें. तदनुसार विधि करूं." या पत्रास पंतांनीं स्वहस्तें जबाब लिहिला त्यांत ते ह्मणतात: "औषध गोळ्या चवदा पाठविल्या आहेत. अलवण गोधूमान्न, प्राज्य आज्य, पांढरा भोपळा, कदाचित् स्वल्प ओदन, पथ्य करावें. गडबडों नये. दाह बहु झाल्यास घृतप्राशन करावें. वीट वमन होतें पण धीर धरावा, अन्न चार पांच वेळ भक्षावें. स्नान करूं नये. वैद्य गंगातीरीं पाटील शूद्र असतो तो यावयाचा नाहीं. या औषधें

बहुतांस आरोग्य होतें. कोणा फकिराचा उपदेश आहे. मनःसांत्वन करावें. अच्युतानंत हा मंत्र ह्मणोन गोळी गिळायास सांगावें. दासीस औषध दिलें तें तुह्मीं देखिलेंच, तैसेंच होईल." पंतांना स्वतः वैद्यकी समजत असे, व चांगले वैद्य, हकीम, व मांत्रिक यांशीं त्यांचा संबंध असे. पंतांचें शिक्षण असें बहुरंगी होतें. त्यांनीं गयेहून आपल्या भावास एक पत्र लिहिलें, त्यांत गयेचे बाजारभाव लिहिले आहेत! दाळ, तांदूळ, गहूं, तूप, मीठ, यांचे गयेस काय भाव होते हे सर्व लिहिले आहेत व शेवटीं असेंही एक महत्वाचें वाक्य घातलें आहे कीं, "इकडे राजकी वर्तमान कांहीं विशेष नाहीं, स्वस्थ आहे असें ऐकण्यांत आहे; तिकडील राजकी वर्तमान सविस्तर लिहिणें." पंतांनीं एका पत्रांत भगवंतराव प्रतिनिधींची मृत्युवार्ता कळवून पुढें राजकीय प्रकरणांत काय काय उलाढाली होतात याबद्दल मोठी चिंता व्यक्त केली आहे. या सर्व गोष्टींवरून पंतांचें शिक्षण किती बहुरंगी होतें हें स्पष्ट होतें. ते निरंतर ग्रंथवाचनांत व काव्यरचनेंत तर निमग्न असतच, पण त्यांची अवलोकनशक्ति व जिज्ञासा जबर असल्यामुळें त्यांचे कान व डोळे हे नेहमीं उघडे असत! पूर्वींच्या गृहस्थाला साधारण रोगांची परीक्षा व औषधांची माहेती असे. कुटुंबवत्सल मनुष्याला उठल्या सुटल्या वैद्याच्या तोंडाकडे पाहावें लागत नसे. संध्यांचें शिक्षण एकांगी असून त्याचा व्यवहाराला फारसा उपयोग नाहीं अशी ओरड आहे ती उगीच नाहीं. शिक्षणाचें खरें कार्य अनेक बाबींत स्वाधीनत्व आणण्याचें आहे. एका तत्ववेत्त्यानें ह्मटल्याप्रमाणें 'ज्याला स्वतःचा शिक्षक, स्वतःचा वकील व स्वतःचा वैद्य होतां येतें तोच सुशिक्षित मनुष्य होय.' पंतांना वैद्यकी, धर्मशास्त्र व सामान्य व्यवहार यांचें उत्कृष्ट ज्ञान होतें. ते चौकस, चौरस व चतुरस्र होते. त्यांनीं राजकारणांत फारसें मन घातलें नाहीं, तथापि त्यांना राजकारणें चांगलीं समजत होतीं. यांचें बहुरंगी शिक्षण त्यांना प्रपंच व परमार्थ दोन्ही उत्तम प्रकारें साधण्यास उपयोगीं पडलें, व अशा व्यापक शिक्षणामुळेंच त्यांच्या कवितेलाही सर्वदेशीयत्व आलें व ती सर्वांच्या आदरास पात्र झाली.

११ याप्रमाणें पंताचें शिक्षण तीन प्रकारचें होतें. वाल्मीकिव्यासशुकादि प्राचीन संत, कालिदासभवभूत्यादि मध्यकालीन कवि व ज्ञानेश्वर तुकारामादि अर्वाचीन संत यांच्या त्रिविध वाक्प्रवाहाचा त्रिवेणी संगम मोरोपंतांत उघड झालेला आहे. पंताचें वाचन फारच व्यापक होतें, मालाकारांनीं 'मो-

रोपंताची व्युत्पत्ति केवळ पौराणिक पद्धतीची होती,' तो केवळ पुराणिक होता,' 'मोरोपंत पंडित नव्हता' असें ठिकठिकाणीं लिहिलें आहे; त्याचें वैय्यर्थ्यही आतां वाचकांच्या ध्यानांत आलें असेल. पंताच्या शिक्षणाची मालाकारांना बरोबर कल्पना झाली नव्हती, मोरोपंत महापंडित होते हा सार्वत्रिक समज त्यांना मान्य नव्हता. काव्यनाटकादि ग्रंथ; साहित्यशास्त्र व छंदःशास्त्र; धर्मशास्त्र, व्याकरण, वैद्यक, व वेदांत यावरील कांहीं ग्रंथ; रामायणभारतभागवतादि महाग्रंथ; ज्ञानेश्वरापासून महीपतीपर्यंत मराठी साधुकवींचे व तुळसीदासकबीरादि हिंदुस्थानी संतांचे ग्रंथ, ज्यानें अनेकशः अवलोकन केले, लिहून घेतले, त्यांवर पुराणें व कीर्तनें केलीं आणि या सर्वग्रंथरसपुष्ट अशा आपल्या अलोट बुद्धिसामर्थ्यावर पाउणलाख स्वतंत्र कविता केली, त्या महापंडितास जर पंडित ह्मणावयाचें नाहीं तर मग पंडित ह्मणायचें तरी कोणास!

१२ रामजोश्याप्रमाणें त्यांनीं आपणास 'कविराज' किंवा जगन्नाथ पंडिताप्रमाणें 'कविराजराजितिलक' ह्मटलें नाहीं; व केकावलीतल्या 'परंतु बहु मंद मी, 'न विचारिलें बुधजनांसि म्यां उद्धतें,' 'महाजन भयासि मी मानितों,' असल्या पदांवरून 'आपल्या अंगीं पंडितत्व वसत नसल्यामुळें आपलें काव्य पंडितांच्या दोषांस पात्र होईल' असाही त्यांनीं धाक बाळगला; यावरून पंत पंडित नव्हते, तर सामान्य पुराणिकाइतपतच व्युत्पन्न होते असेंही मालाकारांनीं एक अनुमान काढलें आहे! येथें तर मालाकार फारच वसरले आहेत! रामजोशी किंवा जगन्नाथपंडित यांपेक्षां मोरोपंतांची कोटी निराळी होती हें त्यांच्या लक्ष्यांत आलें नाहीं. 'कविराय चमकला हीर लोकजाहीर इतर शाहीर काजवे सारे' असें ह्मणणारे रामजोशी व 'वाचामाचार्यताया: पदमनुभवितुं कोऽस्ति धन्यो मदन्यः' असें गरजणारे जगन्नाथराय हे जसे पांडित्यमदमालिनमत्त झाले होते, तशी पंतांची स्थिति

---

टीप:—पंतांचें वाचन अत्यंत विस्तृत आणि व्यापक होतें. 'नेमिनिर्वाण' हा जैन ग्रंथ पंतांनीं स्वहस्तानें लिहून घेतला आहे! 'अश्वघोषकृत बुद्धचरित्रही पंतांच्या वाचण्यांत आलें होतें! या दुसऱ्या ग्रंथांतल्या 'हसद्भिर्यत्कृतं कर्म क्रोशद्भिरनुभूयते' या चरणाचें 'हांसत कर्म करावें, भोगावें रडत तेंचि परिणामीं' असें पंतांनीं उत्कृष्ट भाषांतर केलेलें प्रसिद्धच आहे.

नव्हती. ते विनयाची केवळ मूर्ति होते. ते आपणास 'रसिकजनकिंकर,' 'कविकिंकर' 'लघुकवि,' फार तर 'सत्कविसख' असें ह्मणत. आंगठाच्या कोंदणाप्रमाणें त्यांच्या जाड्या पांडित्यास त्यांची शालीनता फार खुलवीत असे. पांडित्याचा उन्माद जसा वरील दोन कवींस बाधला तसा तो भगवद्भक्त व साधुवृत्ति अशा मोरोपंतांस बाधला नाहीं. मोरोपंत केवळ कवि होते अशा समजुतीवर मालाकारांनीं वरील चूक केली आहे. कडकडीत उपासनेच्या बळावर तयार होत जाणारी पंतांची भूमिका त्यांच्या ध्यानांत आली नाहीं. वरील दोन कवि पांडित्यमदानें तर झाले होते, व पंत दयामृतघनाची स्वोद्धाराविषयीं याचना करणारे मुमुक्षु होते, हा भेद लक्षांत ठेवल्यास पंतांनीं कवित्वाचा दर्प धरिला नाहीं, याचें कोणासही आश्चर्य वाटणार नाहीं! ज्ञानेश्वरांनीं गीतेवर टीका करण्यापूर्वी आपणास 'मतिमंद' ह्मटलें, मशकाची व टिटवीची उपमा घेतली, गीतातत्व कवळण्याचें आपल्या बुद्धीचें असामर्थ्य व्यक्त केलें, ह्मणून त्यांच्या बुद्धिवैभवाची जशी शंका बाळगावयास नको, त्याप्रमाणें पंतांनीं आपणांस पंडित ह्मणून घेतलें नाहीं ह्मणून त्यांच्याही पांडित्याची आपणास शंका घ्यायला नको आहे!

आपल्या काव्यशक्तीचा व सुमनस्कतेचा त्यांस अभिमान नव्हता असें नाहीं, पण तो मर्यादित होता, व त्यांनीं अन्याधिक्षेपपूर्वक दर्पोक्ति तर कोठेंही काढली नाहीं. संतसेवा, नामस्मरण व भगवद्गुणानुवाद यांच्या आश्रयानें स्वोद्धार करणें हेंच पंतांनीं आपली इतिकर्तव्यता रोखून ठेविली होती:—

**गुण पुससिल तरि पढला शास्त्रांसि न मंद हा न वेदांस ।**
**येतें नामचि सर्वश्रेष्ठ ह्मणुनि ज्यास मानवे दास ॥ २९ ॥**
**मज भागवतांचा कीं नामाचा भरंवसा न इतरांचा ।**
**बा! अकलंका! लंकानाथा! बाळांसि जेविं पितरांचा ॥३१॥**

महद्विज्ञापना.

**नलगे व्याकरणाची न्यायाची घटपटादि खटपट ती ।**
**वैकुंठ पेठ मोठी नावावरि हीन दीन झटपटती ॥ १ ॥**

'पंडित' शब्दाची पंतांनीं केलेली व्याख्याही निराळी आहे:—

**गलिताहंकृति जाणे बंधामोक्षासि, अनुभवीं पढला ।**
**तो पंडित! इतर नव्हे, जरि पुष्कळ सर्व शास्त्रही पढला! ॥४००॥**

मंत्रभागवत. स्कंध ११.

असो. पंतांचा विद्याव्यासंग जबर होता, पण त्याच्या मुळाशीं आत्मोद्धाराची तळमळ होती. केशव व गणेश पाध्ये यांचा प्रत्यक्ष संबंध सुटल्यानंतर बारामतींत त्यांनीं विद्यार्जन स्वतःच केलें. खऱ्या पंडिताप्रमाणें त्यांचें सर्व ज्ञान स्वार्जित दिसतें. त्यांचें वाचन सतत चाललें होतें, लांबलांबून ग्रंथ आणवून त्यांची लेखनक्रिया सारखी चालली होती, पुराण सांगणें व कथा-कीर्तन करणें, हाही त्यांचा उद्योग जन्मभर चालला होता. त्यांची लेखनक्रिया त्यांना ग्रंथरचनेच्या कामीं पुष्कळ उपयोगी पडली. लेखनक्रियेनें आयासावांचून सहज पाठांतर होतें. अध्ययन चांगलें परिपक्क होऊन मुरतें; किंबहुना पंताचें लेखन एवढें जबर असल्यामुळेंच शब्दांचा भरणा, म्हणी, अलंकार, कविसंकेत, लोकोक्ति, व्यवहारांतले शब्द, वगैरेंची त्यांना कधीं वाण पडली नाहीं. लेखन, वाचन व उच्चार हीं शिक्षणाचीं तीन प्रधान अंगें आहेत. या तीनही अंगांनीं मोरोपंत परिपूर्ण होते. याप्रमाणें पंताच्या शिक्षणाचें व विद्याव्यासंगाचें स्वरूप थोडक्यांत दाखविलें आहे.

---

# प्रकरण चवथें.



## मोरोपंतांचे यजमान.



बाबूजीनाईक जोशी बारामतीकर.

( इ० स० १७५३—इ० स० १७८० )

व

त्यांचे पुत्र पांडुरंगराव नाईक.

( इ०स० १७८०—इ० स० १७९४ )



**जिवाचे उदार शोभती पाईक । मिरवती नाईक मुगुटमणी ॥ १ ॥**
**आपुलिया सत्ता स्वामीचे वैभव । भोगिती गौरव सकळ सुख ॥२॥**

—श्रीतुकाराम.

१ विषय प्रवेश. २ नाईकांच्या चरित्राचीं साधनें. ३ सदाशिव नाईक सराफ. ४ बाबूजी नाईक आणि बाजीराव. ५ बाबूजीस पेशवाई देण्याचा बूट ( इ. स. १७४१ ) ६ बाबूजी नाइकांची बारामतीस स्थापना (इ. स. १७४३). ७ कर्नाटकची सुभेदारी नानासाहेब पेशव्याच्या कुटिलनीतीमुळें बाबूजी नाइकास मिळूनही पचत नाहीं ( इ. स. १७४६ ). ८ बाबूजी नाइकास १८ लक्षांचे महाल मिळतात. जहागीरदारी व मयूरकविसंग यांचा त्यांस एकदमच लाभ होतो ( इ. स. १७५३ ). ९ नाइकांची प्रतिनिधिपदाची मसलत फसते ( इ. स. १७५७ ). १० माधवरावांच्या कारकीर्दींत बाबूजीनाइकांची शिष्टाई. ११ बाबूजीनाईक आणि माधवराव यांचा सोलापूरच्या किल्ल्याबद्दल लढा ( इ. स. १७६४ ). १२ बाबूजीनाईक व राघोबादादा. बाबूजी नाइकांचा मृत्यु ( इ. स. १७८० ) व त्यांचा स्वभाव. १३ बाबूजी नाइकांचे ३ पुत्र विभक्त होतात व कनिष्ठ पुत्र पांडुरंगराय यांच्या प्रेमामुळें पंत त्यांचाच आश्रय धरितात. १४ मोरोपंत व बाबूजी नाईक यांच्या पहिल्या मुलाखतीचें **वर्णन ( इ. स. १७५३ ). १५ मोरोबा पुराणिक. १६ बाबूजी नाईक व**

पांडुरंगराव नाईक यांविषयीं पंतांचे प्रेमोद्गार. पंतांची स्वामिनिष्ठा व बाजीराव पेशव्याचा पंतांच्या कवितेवर बहिष्कार. १७ पंतांच्या पुराणाचा एक प्रसंग. १८ बारामती मोरोपंत व आर्या यांचें साहचर्य व प्रेम. १९ नाइकांच्या घराण्याची वाताहात.

१ बाबूजी नाईक बारामतीकर हे अठराव्या शतकांत महाराष्ट्रांत गाजलेल्या कर्त्या पुरुषांपैकीं एक असल्यामुळें मराठ्यांच्या इतिहासांत त्यांचें नांव अनेक प्रसंगीं निघतें, तथापि त्यांची कीर्ति मुख्यत: मोरोपंतांचे आश्रयदाते ह्मणून चिरकाल टिकणारी आहे. मोरोपंतांचा विद्याव्यासंग सतत चालून त्यांच्या हातून मराठी भाषेची सेवा बिनबोभाट चाळीस वर्षें झाली, याचें बरेंचसें श्रेय बाबूजी नाइकाच्या गुणग्राहकतेस व उदारपणास दिलें पाहिजे. नाइकांनीं उदारमनानें पंतांचा प्रपंचभार हलका केला, ह्मणून त्यांना स्वस्थपणानें पाऊणलाख मराठी कविता रचतां आली असें ह्मणण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं. बहुतेक मराठी कवि वतनदार व साधुवृत्तीचे असल्यामुळें त्यांना उदरनिर्वाहासाठीं दुसऱ्या कोणावरही अवलंबून रहावें लागत नसे. पण पंतांच्या वडिलांनीं त्यांचें पूर्वार्जित उत्पन्नाचें गांव सोडल्यामुळें त्यांना देशावर निर्वाहासाठीं उद्योग पाहणें भाग पडलें. ते गृहस्थाश्रमी व कुटुंबवत्सल होते. त्यांच्या मागें कुटुंबाचा मोठा परिवार असे. त्या परिवाराच्या निर्वाहासाठीं त्यांना कोणातरी यजमानाची सेवा करणेंच होतें. कांहीं पूर्वापरसंबंधानें नाइकांची व त्यांची संगति जडली व ही अंतीं उभयतांनाहि भूषणावह व महाराष्ट्राला हितकर झाली.

२ ज्यांच्या संगतींत पंतांनीं आपलें बहुतेक आयुष्य घालविलें, व ज्यांच्या सुखदु:खांवर पंतांचें सुखदु:ख बऱ्याच अंशीं अवलंबून होतें, त्या नाइकांची संक्षिप्त हकीकत या प्रकरणांत देण्याचें मीं योजिलें आहे. 'बारामतीकरांच्या घराण्याची संक्षिप्त हकीकत' ह्मणून इंग्रजींत छापलेलें एक १०।२० पानांचें लहानसें पुस्तक नाइकांचे वंशज रा. रा. गणपतराव बावडेकर, वकील पुणें, यांजकडून मला मिळालें आहे; त्यांत नाइकांबद्दल फारच थोडी माहिती आहे, तथापि त्यांत सनदा, राजपत्रें व वगैरेंचे उतारे बरेच आहेत. या पुस्तकाशिवाय आजवर प्रसिद्ध झालेल्या बखरी, व पारसनीस, राजवाडे, खरे, इत्यादिकांनीं प्रसिद्ध केलेले ऐतिहासिक कागदपत्र; पंढरपुरास व बारामतीस मिळालेली हरतऱ्हेची माहिती; आजवर प्रचलित

सिद्धेश्वरराव
मृ. इ. स. १८८०

गंगाध

गोविंदराव

सदाशिवराव

पांडुरंगराव उर्फ
बाबाजी (मृ. इ. स. [illegible])
दुर्गाबाई (गघेबादाद
पंताभ्यांची कन्या)

बळवंतराव

कमळाबाई
उर्फ आबाई

गणपतराव
(उर्फ) बाबुराव दत्तक

सदाशिवराव

नारायण

रघुनाथ

गोविंदराव

सदाशिवराव

नारायणराव
परशुरामभाऊ पटवर्धन यांच्या
मुलीची मुलगी

असलेल्या आख्यायिका, व पंतांचे नाइकांविषयींचे उद्गार,—या सर्वांच्या साह्यानें प्रस्तुत प्रकरण मी लिहिणार आहें. बाबूजी नाइकांचें स्वतंत्र चरित्र कोठेंही लिहिलेलें नाहीं, ह्मणून वरील सामुग्रीच्या आधारानें तें सजविण्याचा प्रयत्न केला आहे. या माहितीचा नाइकांच्या चरित्राची यथार्थ कल्पना होण्यास बराच उपयोग होईल असा मला भरंवसा वाटतो.

३ रत्नागिरी जिल्ह्यांत केळशी ( ता. दापोली ) ह्मणून एक खेडें आहे तेथें केसोबा नाईक जोशी हे गृहस्थ राहत होते. त्यांचा पुत्र सदाशिव नाईक यानें सराफीचा धंदा चालवून फार पैसा मिळविला. यानें पुष्कळ वर्षें काशीस घातलीं. याचीं काशीस जमीनजुमला व गांवें आहेत. काशीस 'नाईकजीचा महल्ला' ह्मणून यांनीं वसविलेली एक पेठ आहे. यांचा वाडा दुर्गाघाटावर आहे. हा गृहस्थ मोठा श्रीमान असून याच्या पेढ्या ठिकठिकाणीं होत्या. इ. स. १७०७ मध्यें शाहू महाराजांची सुटका झाली व ते मराठ्यांची गादी आपली आपणास मिळावी ह्मणून खटपट करूं लागले, तेव्हां सदाशिव नाईक यांची संपत्ति व इभ्रत पाहून त्यांनीं त्यांस बरोबर दक्षिणेंत आणलें; व त्यांजकडून वेळेवर जी द्रव्याची मदत मिळाली तिचा मोबदला ह्मणून त्यांनीं मराठी राज्याची पोतदारी त्यांस दिली. राज्यांतल्या खऱ्या खोट्या नाण्यांची पारख सदाशिव नाइकांनीं करावी व त्याबद्दल एकंदर उत्पन्नाचा शतांश त्यांस द्यावा असें छत्रपतीनें ठरविलें; व हवेली तालुक्यांत त्यास कांहीं इनाम जमिनी दिल्या. त्या अद्याप त्यांचे वंशजांकडे चालत आहेत. एका जुन्या कागदांत बाबूजीस 'काशीकर सावकार' ह्मणून स्पष्ट ह्मटलें आहे. केळशी गांवींही नाइकांचें उत्पन्न अद्याप चालत आहे.

४ सदाशिव नाइकांच्या पश्चात् पोतदारी व इनामें बाबूजी नाइकाकडे आलीं. बाबूजी हा सदाशिवाचा वडील पुत्र असून आबाजी हा त्यांचा धाकटा पुत्र होता. बाबूजी घराण्याचा कुलदीपक निघाला, त्यानें नाइकांचें घराणें उदयास आणलें. नाइकांच्या घराण्याचें शाहूकडचें वजन व त्यांचें ऐश्वर्य पाहून बाळाजी विश्वनाथ यांनीं पेशवे झाल्यावर आपली कन्या भिऊबाई आबाजी नाइकास दिली. भिऊबाईनें पुण्यास अमृतेश्वराचें[1] सुंदर देऊळ बांधून आपल्या धार्मिकबुद्धीचें व नाइकाच्या वैभवाचें एक स्मारक मागें ठेवलें आहे. नाईकांनीं पुण्याच्या शनवार पेठेची वसाहत केली, तेव्हां

१ पुणें शहरचें वर्णन, पृष्ठ १७.

भिऊबाईच्या लुगडेंचोळीसाठीं बाजीराव पेशव्यानें त्या पेठेचें उत्पन्न तिला लावून दिलें होतें. याप्रमाणें नाईक व पेशवे यांच्या घराण्याचा आप्तसंबंध जुळला, पण तो उभयपक्षीं सुखावह झाला नाहीं. नाईक व पेशवे यांच्यांत संपत्ति व सत्ता याचा अनुक्रमें वास असल्यामुळें चिरवैर उद्भवलें. पेशवाईची 'प्राणप्रतिष्ठा झाल्याबरोबर तिच्या उत्तरकार्याचे मंत्र ह्मणावयास लागणाऱ्या ' पुरुषांत प्रो० भानूंनीं बाबूजी नाईकाची गणना केली आहे. बाजीरावास युद्धासाटीं व फौजेच्या पगारासाठीं वारंवार कर्ज उपसावें लागे. बाजीरावामागें कर्जाचा ससेमिरा कसा लागला होता हें त्यानें ब्रह्मेंद्रस्वामींस लिहिलेल्या करुणपर पत्रांवरून उघड होत आहे. बाजीरावाचे मुख्य सावकार दोन, एक अनगळ व दुसरे नाईक. बाबूजी व बाजीराव यांचें मेहुण्याचें नातें जडल्यावर अल्पकाळच त्यांचा स्नेहसंबंध टिकला. बाबूजी नाईक पैशाचा पुरवठा आपल्या मेहुण्यास मोठ्या उत्साहानें करीत. इ.स. १७३३ मध्यें महंमदखान बंगषावर बाजीरावानें स्वारी केली तेव्हां त्याच्यासाठीं " बाबूजी नाइकानें पायीं पैजारा चढवून रुपये कर्ज मेळविलें ". पण नेहमीं लढाईच्या कामांत गुंतल्यामुळें बाजीरावाला आपल्या सावकारांचें देणें वेळेवर देतां येत नसे, यामुळें व अर्थसंबंध प्रायः स्नेहसंबंधास तोडणारा असल्यामुळें अखेर बाजीराव व बाबूजी यांचें वांकडें आलें. नाईकांच्या तगाद्यामुळें बाजीरावास फार त्रास झाला, व त्याला त्यांच्या कर्जांत मरावें लागलें. शिंदे, गायकवाड, रघोजी भोंसले, प्रतिनिधी, वगैरेंचा स्नेह बाबूजीनें जोडला होता, व त्यांचें परस्पर देणेंघेणेंही होत असे, किंबहुना त्या काळच्या बहुतेक शूर व कर्त्या पुरुषांकडे बाबूजीचें येणें असे. सावकारांचा धंदा असा आहे कीं सावकारानें गरजूला वेळेवर पैसे द्यावे, ते त्याजकडून आले नाहींत ह्मणजे त्याला तगादा लावावा व त्यानंतर त्याजांतून ऋणकोच्या शिव्या खाव्यात! आपण उल्हासानें पाई पैजारा चढवून दिलेले पैसे बाजीराव मुलुखगिऱ्या करून फेडील अशी नाइकाला आशा होती; पण ती सफळ होतांशी दिसेना तेव्हां उभयतांच्या मनांत परस्परांविषयीं द्वेष माजला व त्याचीं कडू फळें कर्जाच्या वेदनेंत बाजीराव मेल्यावर त्याच्या मुलांस भोगावीं लागलीं!

---

२ नाना आणि महादजी; पृष्ठ ९. ३ ब्रह्मेंद्रस्वामींचें चरित्र व पत्रव्यवहार, लेखांक ३०, ३१ व ३२. ४ मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें १७५०–१७६१, लेखांक १९५.

बाजीरावाची ज्यावर अढळ निष्ठा होती व जो बाजीरावावर पुत्रवत प्रेम करी त्या ब्रह्मेंद्र स्वामीनें बाबूजी नाइकास शिष्यप्रेमाधीन होऊन रागानें सड-कून शिव्या दिल्या आहेत: " बाबूजी नाईक केवळ पंचमहापातकी आहे. जातीचा सराफ, अपेशी आहे, आमची त्याची गोडी नाहीं" असें त्यानें फत्तेसिंग भोंसल्यास लिहिलें आहे व त्याची मैत्री तोडून टाकण्याविषयीं आग्रहानें त्यास सांगितलें आहे!

९ बाजीराव इ.स.१७४०मध्यें वारला.तेव्हां पेशवाईचें पद बाळाजी बाजीरा-वास न देतां बाबूजी नाइकास द्यावें असा रघोजी भोंसल्यानें घाट काढला. पण रघूजी भोंसले व दमाजी गाइकवाड यांच्या हलगर्जीपणामुळें, प्रतिनिधींच्या ताटस्थ्यामुळें, चिमाजी आप्पानें आपलें हस्तक शाहूराजाच्या सभोंवार पेरून ठेवल्यामुळें, व बाजीरावाच्या नावलौकिकामुळें, पेशवाईचें पद अखेर बाळाजी बाजीरावासच मिळालें. हा डाव फसला असें पहातांच बाबूजी नाइकानें बाळाजीमागें देण्याची निकड लाविली, पण या जाचांतून त्यास महादाजीपंत पुरंदर यांनीं आपलें वजन खर्ची घालून सोडविलें.

६ इ. स. १७४२ मध्यें बाबूजी नाईक व दमाजीपंत गाइकवाड यांनीं माळव्यावर स्वारी करून मुबलक पैसा मिळविला. ही स्वारी यशस्वी झाल्या-मुळें सुप्रसन्न होऊन शाहू महाराजांनीं इ. स. १७४३ मध्यें बाबूजी नाइ-कास बारामती महालाची जहागीर दिली. या वेळीं शाहूराजानें काढलेल्या राजपत्रांत लिहिलें आहे, " फत्तेसिंग भोंसले व शंभुसिंग जाधवराव यांच्या ताब्यांत असलेल्या सांगवी, गुंजवडी, मालेगांव, कटफळ, गोजाबवी, व कन्हेरी या सहा गांवांशिवाय सब बारामतीमहाल ह्मणजे—या महालाच्या पेठ, दुतर्फा बाबती, चौथ, सहोत्रा, जकात, कुलबाब व कुलकानु—बाबूराव सदाशिव यांस देण्यांत आला आहे. या महालावर त्यांनीं पूर्ण अंमल चा-लवावा, कसबा बारामती येथें त्यांनीं आपला वाडा बांधावा, व महाल ताब्यांत घेऊन त्याप्रमाणे सरकारांत कळवावें. १९ जमादिलावल आरबी शक ११४४." हें राजपत्र पुण्याच्या दप्तरांत अद्याप पाहण्यास मिळतें.

---

५. ब्रह्मेंद्रस्वामी, चरित्र व पत्रव्यवहार; लेखांक ३००. ६ ग्रांट डफचा इतिहास, पृष्ठें २५४-२५६. ७ एलफिनस्टनचा इतिहास, पृष्ठें ६३८—३९. ८ ग्रांट डफ, पृ० २५५–२५६. ९ बारामतकरांच्या घराण्याचा संक्षिप्त इतिहास, परिशिष्ट पहिलें.

बाबूजी नाईक याप्रमाणें शाहूराजाच्या आज्ञेप्रमाणें बारामतीस आले. बारामती पुण्यापासून ३९ कोसांवर आहे. या काळपर्यंत ते सातान्यास रहात होते, बारामतीस आल्यावर त्यांनीं प्रथम वाडा बांधण्यास सुरुवात केली. बारामती यापूर्वी लहानशा कसब्याचें गांव होतें, पण नाइकांची स्वारी तेथें आल्याबरोबर त्याला एकदम राजधानीची शोभा आली. बारामतीजवळून कन्हा नदी वाहत आहे. तिच्या पश्चिमतीरावर जुनी बारामती वसलेली आहे, वपूर्वतीरावर नाइकांनीं आपला वाडा बांधण्यास सुरुवात केली. पुण्यांतील पेशव्यांच्या वाड्याच्या तोलाचा हा वाडा नाइकांनीं बांधिला व त्याच्या शेजारींच आपल्या उपास्य-देवतेचें श्रीसिद्धेश्वराचें भव्य मंदिर बांधिलें. वाड्याच्या सभोंवार हां हां ह्मणतां गांव वसलें. नाइकांचे शेंकडों आश्रित गोळा झाले. हत्तीखाना, घोड्यांची पागा, वगैरे तयार झाले. उपाध्ये, शास्त्री, दिवाणजी, वगैरेंना नाइकांनीं घरें बांधून दिलीं, व कसबा बारामतीला एकदम राजधानीची शोभा प्राप्त झाली. सिद्धेश्वराच्या देवालयावरील रमणीय चित्रें, व घांट वगैरेंवरून बाबूजी नाइकांच्या रसिकतेची चांगली साक्ष पटते.

७ पेशवाईची खटपट फसल्यानंतर रघूजी भोंसल्याच्या मदतीनें बाबूजी नाइकानें कर्नाटकची सुभेदारी मिळविण्याचा उद्योग चालविला. बाबूजीचें शाहुमहाराजांच्या राण्यांकडे चांगलें वळण होतें; खुद्द शाहूचें नाइकांवर मोठें प्रेम होतें; व भोंसले, प्रतिनिधि, गाइकवाड, वगैरेंशीं बाबूजीनें स्नेह जोडला होता. कर्नाटकची सुभेदारी बाबूजी नाइकाला मिळूं द्यायची नाहीं, व मिळालीच तर पचूं द्यायची नाहीं असा विचार बाळाजी-बाजीराव व भाऊसाहेब पेशवे यांनीं आपापसांत ठरविला व हरप्रयत्नानें नाइकांची नाचक्की करण्याचा त्यांनीं विडा उचलला! बाळाजी बाजीरावाच्या मनांत कर्नाटकची सुभेदारी भाऊसाहेबाकडे द्यावयाची होती. पण शाहूच्या मर्जीविरुद्ध उघडपणें वागण्याइतकें धैर्य यावेळीं त्याच्यांत आलें नव्हतें, ह्मणून त्यानें वाममार्गाचा अवलंब करून नाइकांस नामोहरम केलें. कर्नाटकचा सुभा नाइकांस मिळाला. कृष्णा व तुंगभद्रा या दोन नद्यांमधलि मुलखाची चौथाई व सरदेशमुखी वसूल करण्याचा मक्ता बाबूजीनें सात लाखांस घेतला. हा प्रांत सावनूरकर नबाबाच्या ताब्यांत होता, व या प्रांतांतील किनूर, नवलगुंद, शिरहट्टी वगैरे ठिकाणचे देसाई पुंड होऊन मराठ्यांची सत्ता जुमानी-

नासे झाले होते. त्यांना ताळ्यावर आणून चौथाई वसूल करण्याचें काम फार बिकट होतें. हा सुभा शाहूमहाराजांच्या खास उत्पन्नापैकीं होता. आपल्या इच्छेविरुद्ध कर्नाटकचा सुभा बाबूजीस मिळाला, हें पाहून नानासाहेब तुम्ना चरफडत होता. त्याचे सल्लागार, "कर्नाटक यांचे वरास जाऊं देणें उचित नाहीं, यास्तव जरूर पाय धरून ओढावे" असा त्यास सल्ला देत. नाइकास सुभा देऊन शाहूराजानें सन्मानानें निरोप दिला. नाइकांच्या हालचालीवर पाळत ठेवणारे भाऊसाहेब नानासाहेबास लिहितातेः– "राजश्री बाबूजी नाइक यास राजश्री स्वामींनीं कर्नाटकचा मामला मुकासा सांगून गौरव केला. आबाजी नाइक स्वामींच्या दर्शनास गेले होते, त्यास स्वामींनीं निरोप दिला. वस्त्रें १ मंदील, १ महमुदीचा झगा, १ पदक हत्तीचा मजुरा दिला. बहुमान करून आबूराव हा किताब दिला." बाबूजी नाइक कर्नाटक प्रांतीं जातात तोंच त्यांचे पाय धरून ओढण्याकरितां भाऊसाहेबांची रवानगी नानासाहेबांनीं करून दिली. खुद्द नानासाहेब रामचंद्रबावांस लिहितातः "बाबूजी नाइक यांणीं कर्नाटक प्रांतीं न जावें, गेले तरी धुडावून काढावें. या करितां चिरंजीव (सदाशीव चिमणाजी) याची रवानगी कर्नाटक प्रांतीं केली." भाऊसाहेबास बाबूजी नाइकांच्या पाठोपाठ पाठवून त्याला मदत म्हणून नानासाहेबांनीं रामचंद्र गणेशास पाठविलें व त्यानें नाइकांच्या गोटावर हल्ला केला! कसा तो पहाः–"बाबूराव सदाशीव न पुसत गेले, त्यांचे मागें राजश्री रामचंद्र गणेश फौज घेऊन गेले. धारूरच्या वाटेनें नाइक गेले. नाइकांचे पागेची घोडीं, व जामदारखाना वगैरेची मोजदाद करून गोटांत आणून ठेवले म्हणोन लिहिलें तें कळलें—ऐसियास बाबूजी नाइक यांची घोडीं, पागा, हत्ती, दोन जामदारखाने, वगैरे मोजदाद केले; ते आणावयास हुजूर राऊत पाठविले असत. याजबरोबर पाठवून देणें...नाना जोशी यांचे घरीं बाबूरायाची वस्तभाव आली आहे. त्यावरून त्यांचे घरीं गाडदीयांची चौकी बसविली आहे!" याप्रमाणें पेशव्यांनीं नाइकांची घोडीं वस्तभाव वगैरे लुटवून आणली! पण एवढेंच करून ते राहिले नाहींत. त्यांनीं कर्नाटकांतील संस्थानिकास व सावनूरच्या नबाबास आंतून फूस देऊन

१ काव्येतिहास संग्रह. पत्रें यादी वगैरे ले. ८२. २ सदर ले. ७९. ३ सदर ले. ७७. ४ सदर ले, १०४. ५ काव्येतिहास संग्रह. पत्रें यादी वगैरे ले० ६७।६८।७७।७८ व ऐतिहासिक लेखसंग्रह. पृष्ठ १.

नाइकाला पूर्ण तोंडघशीं पाडलें. पेशव्यांच्या चिथावणीवरून संस्थानिक बाबूजी नाइकास चौथ सरदेशमुखी देईनात. त्यांना जिंकून जरबेंत आणण्यासाठीं नाइकांस फौज वाढवावी लागली, यामुळें नाईकांच्या डोक्यावर कर्ज वाढलें. नाईक पेंचांत आले, बाकी थकत चालली, पेशव्यांच्या कौटिल्यामुळें सुभा गळ्यांत आला! चिटणीस लिहितात: "कर्नाटकचा सुभा बाबूजी नाईक यांजकडे होता, तेथें पेंचांत कर्ज झालें, नीट अंमल येत नाहीं तो मक्ता ठरवून ज्याजती रसद ठरावून सनदा द्याव्या ह्मणोन तो सुभा सदाशीव चिमणाजी यांनीं आपणांकडे करून घेतला." चुरसीला पेटून पेशव्यांनीं मक्ताही वाढविला. "नाईक सात लक्ष देत होते तो चढ करून" घेतला. याप्रमाणें पेशव्यांनीं बाबूजी नाइकांचा पिच्छा पुरवून त्यांस घरीं बसविलें. चिटणीस यांनीं हीच हकीकत विस्तारानें दुसऱ्या एका बखरींत सांगितली आहे. ते ह्मणतात: "नाईक कर्नाटक प्रांतीं गेले, तेथें संस्थानीयांसीं कटकट वाढून लढाई पडली. शिबंदी ठेवणें आली. लढाईंत मोड झाला. लुटले गेले. शिबंदीचा पेंच अंगावर आला. त्यांची धरणीं बसली. निघून सातारा आले." हा तीव्र अपमान सहन न होऊन नाइकांनीं 'सोमल घेऊन विषप्रलय केला' होता, पण शाहूनें आपला हात लावून दूध पाठविल्यावर विष उतरलें. ही सर्व हकीकत कागदपत्रांवरूनच सिद्ध झाल्यामुळें तिच्या खरेपणाविषयीं तिळमात्र शंका राहत नाहीं. नानासाहेब पेशव्याची ही वर्तणूक सर्वथा निंद्य असून त्याच्या कारस्थानीपणाच्या कीर्तीला काळिमा आणणारी आहे. बाबूजी नाईक यानंतर फारच बिथरले. वरील गोष्ट इ. स. १७४६ मध्यें घडली. यानंतर दोन वर्षांनीं नानासाहेब जयाजी शिद्यास एका पत्रांत लिहितात: "बाबू नाईक यांचें कर्नाटक काढून आह्मीं घेतलें, ते याजमुळें कष्टी. लटकें फटकें बोलून आशेस लावून दोन वर्षे आह्मीं वोढिले. परंतु ते या उप्पर जाणार!" जानोजीराव निंबाळकर, दाभाडे, प्रतिनिधी, भोसले, गाईकवाड, हे ताराबाई पक्षास जाऊन मिळतात, ह्मणून त्यांच्या नांवानें खडे फोडणारा नानासाहेब सर्वांसीं याप्रमाणें कपटानें वागून 'लटकें फटकें बोलून' पुन्हां 'सोबत्यांचा भरंवसा नाहीं' ह्मणून त्यांच्याच नांवानें ओ-

१ धाकटे रामराजे यांची बखर. पृष्ठ ५. २ सदर पृष्ठ ७. ३ शाहूमहाराजांची बखर. पृष्ठ ८४. ४ काव्येतिहास संग्रह. पत्रें यादी वगैरे ले. १७४.

रडतो हें आश्चर्य नव्हे काय ? याप्रमाणें कुटिलनीतीनें वागून राष्ट्रांत केवळ स्वार्थासाठीं भयंकर फूट पाडणारा, इंग्रजांच्या साह्यानें कान्होजी आंग्र्याचें आरमार बुडवून इंग्रजांस कोंकणपट्टी मोकळी करून देणारा, व खुद्द आपल्या स्वामींशीं द्रोह करणारा नानासाहेब हा मराठेशाहीच्या भव्यप्रासादाला आग लावणाऱ्या पुरुषांचा अग्रणी नव्हे काय ? राजवाड्यांसारख्या इतिहासशास्त्र्यांनीं आपल्या डोळ्यांवरचा इतिहासविकृति करणारा मलिन चष्मा एकीकडे ठेवून शांतचित्तानें व खऱ्या महाराष्ट्रीय दृष्टीनें याचा विचार करावा.

८ असो. 'बाबूजी नाइकानें भीकच मागावी' ही भाऊसाहेबाच्या कारभाऱ्याची सदिच्छा पूर्ण होणें संभवनीय नव्हतें. शाहूमहाराजांच्या मृत्यूनंतर ( इ. स० १७४८ ) बाबूजी नाईक ताराबाईच्या पक्षांत शिरले. नानासाहेब इ. स. १७५२मध्यें एका पत्रांत लिहितात. " बाबूजी नाईक सातारियास जाऊन आईसाहेबांचे विचारांत मिळाले. आमचा अपकर्ष इच्छितात. उपद्व्याप करितात. आमच्या सरकाराकडे येऊन बुद्धिभेद करून त्यास सातारियास न्यावें या विचारास आले होते. परंतु सरदार गेले नाहींत. नाइकांचेविशीं आमचे चित्तांत तों कांहीं नव्हतें ! त्यांहीं होऊन गडबड मांडली आहे. आपले कर्मानुरूप फळ पावतील. " नाईकांचीं कर्मे या वेळीं काय होतीं तें माहीत नाहीं; पण एकदम त्यांच्या नशीबानें उचल खाल्ली, एवढें खरें. त्यांना वर्ष सहामहिन्यांतच मोठी जहागीर मिळून त्यांची इभ्रत मोठी वाढली. ता. ५सफर आरबा वर्ष ११५३ ( इ. स. १७५२।५३) रोजीं राजाराम महाराजांनीं संतुष्ट होऊन बाबूजी नाइकास हुजूर मामल्याचे कमाविसदार केलें व १८ लक्ष सालिना उत्पन्नाचे ५९॥ महाल त्यांचेकडे तोडून दिले! बाबूजी नाइकास १८ लक्षांचा सरंजाम मिळून ते जहागीरदार झाले व

---

१ सदर. ले. ४२८:-" शाहूमहाराज यांचा जीवात्मा आहे तों बाह्यात्कारी त्यांचे सेवक !" हे खुद्द नानासाहेबाच्या तोंडचें वाक्य ! मोरोपंत ही '**नामार्या**' प्रकरणांत पर्याय सुचवून ह्मणतातः—

**त्रिभुवनराज्य प्रभुचें प्रतिनिधिनें त्वां स्वहस्तगत केलें ।**
**भोळ्या दिगंबराचें आक्रमिलें वतन, जळ जैसें तैलें ॥ १०२ ॥**

२ काव्येतिहाससंग्रह. पत्रें यादी वगैरे. ले० १७४. ३ मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें, (१७५०-१७६१) लेख११. ४ काव्येतिहास संग्रह पत्रें यादी वगैरे. ले० ५ बारामतकरांच्या घराण्याचा इतिहास.परिशिष्ट दुसरें.

शिवाय त्यास 'फत्तेसिंग भोसल्याची बाबत व भागानगरच्या चौथसरदेशमुखीचा हक्क' मिळाले. याशिवाय सरकार परांड्याचा ९ तर्फाचा व १२ गांवांचा सरंजाम मिळाला. याप्रमाणें बारामतीकरांचें ऐश्वर्य एकदम वाढलें. 'कमाविशीबद्दल दरसाल १ लक्ष ३७ हजार रुपये, चौथसरदेशमुखीबद्दल १ लाख व बाबतीबद्दल ३६ हजार रुपये महाराजांस बाबूजी नाईक यांणीं द्यावे, सरंजामासाठीं फौजफांटा जास्त ठेवावा, अढळ राजनिष्ठेनें महाराजांची सेवाचाकरी करावी' असें राजपत्रांत लिहिलें आहे. सरंजामी व कमाविशी यांची वस्त्रें बाबूजी नाइकांकडे आलीं त्यांत "बाबूजी नायकासाठीं १ तिवट केसरी पटणी, १ हजारी कुसुंबी शेला, १ बुट्टीदार महंमुदी झगा, १ किनखापी इजार, १ पटका, १ मोत्यांचा तुरा, १ कुडक्यांची जोडी, १ हिरकणीचे पदक, व १ हत्ती" इतक्या जिनसा आल्या. याशिवाय आबाजी नाईक, बाबूजींचे ज्येष्ठ चिरंजीव कृष्णराव, त्यांचे दिवाण वगैरेसाठींही कांहीं शेले, माणिकें मोतीं वगैरे आलीं. नाइकांचें ऐश्वर्य याप्रमाणें इ. स. १७५३ सालीं शिगेस चढलें, नाइकांचें भाग्य उदयास आलें. पण राजाराममहाराजांनीं बाबूजी नाइकांकडे जे हिरे, मोतीं, व रत्नें पाठविलीं, त्याहून अत्यंत मोठ्या किमतीचें एक रत्न याच सालीं परमेश्वरानें संतुष्ट होऊन बाबूजी नाइकांकडे पाठवून दिलें! त्या रत्नामुळें बाबूजी नाइकांचें यश मराठ्यांच्या इतिहासांत व वाङ्मयांत चिरंतन होऊन राहिलें. आपल्या वयाच्या २४ व्या वर्षीं मोरोपंत पराडकर पन्हाळगडावरून बारामतीस आले! इ. स. १७५२।५३ मध्यें बाबूजी नाइकांस जहागीर मिळाली व मोरोपंतांच्या संगतीचाही लाभ झाला. लक्ष्मी व सरस्वती या दोघींही आपलें चिरकालीन वैर विसरून बारामतीस अन्योन्यप्रमानें एकत्र जमल्या. पंत व जहागीर यांचा बाबूजी नाइकांस एकदमच लाभ झाला एवढें खरें. पंत दोन महिने अगोदर आले असते तर त्यांचें आगमन नाइकांस शुभशंसि झालेंच पंत दोन महिने मागाहून आले असते तरी त्यांचें आगमन शुभप्रसंगींच झालें. कसेंही असो, मोरोपंतांचें बारामतीस येणें शुभप्रद झालें एवढें खरें. नाईक व पंत यांच्या संबंधीं गोष्टी सांगण्यापूर्वी नाइकांचें चरित्र संपवून घेवूं.

९ बाबूजी नाईक मोठे महत्वाकांक्षी पुरुष होते. पेशवाईची खटपट फसली, कर्नाटकची सुभेदारी गळ्यांत आली, तरी त्यांना राजसत्ता हातीं

८ बारामतकरांच्या घराण्याचा इतिहास, परिशिष्ट तिसरें.

येण्यासाठीं फिरून एकवार प्रयत्न करण्याचें सोडलें नाहीं. ताराबाईच्या मार्फत प्रतिनिधिपद आपणांस मिळावें ह्मणून त्यांनीं उद्योग चालविला, पण त्याही कामांत त्यांस अपेश घेऊनच माघारीं यावें लागलें! ताराबाईनें बाबूजी नाइकांस प्रतिनिधीचें पद दिलें. बाबूजी नाईक सातान्यास हजार स्वारांनिशीं प्रतिनिधीच्या वाड्यांत उतरले, पण जगजीवनराव पंडित प्रतिनिधि यांनीं त्यांस तांदुळवाडी नजीक "मानवर लढाई दिली. नाइकांस जखमा लागल्या. शिपाइगिरी बहुत केली. परंतु मोड झाला. आठ चार दिवस जखमा बांधून नाईक मशारनिल्हे आपलें करणें सिद्धीस जावयाचें नाहीं ऐसें समजून बारामतीस निघून गेले." बाबूजीमागूनच आबाजी नाइकांचीही फजीती झाली:–"राजश्री आबाजी नाइक सातान्याहून हजार दीड हजार फौजेनिशीं किणी (किन्हई) घ्यावयास गेले होते. त्यांजवर यमाजी शिवदेव यांणीं जाऊन छापा घातला. एक हत्ती व ४०।५० घोडे पाडाव करून घेतले. आबाजी नाईक पळोन सातान्यास गेले." यानंतर बाबूजी नाइकांनीं फारशी खटपट केली नाहीं. प्रतिनिधिपदाची खटपट त्यांनीं इ. स. १७५७ मध्यें केली. यानंतर बाबूजी नाइक हे बारामतीस स्वस्थ राहिले.

१० पानपतच्या रणसंग्रामांत बाबूजी नाईक गेले नव्हते. अखेरची पराभवाची बातमी आल्यावर नानासाहेब अवशिष्ट राहिलेले सरदार घेऊन हिंदुस्थानावर मोहिम करण्यास निघाले, तेव्हां बाबूजी नाईक त्यांच्या बरोबर गेले होते. नानासाहेबांच्या पश्चात् माधवराव पेशवाईच्या पदावर आरूढ झाले. पेशव्यांना नाइकांचें कर्ज होतेंच. त्यांनीं ' सवोत्रानें पाटणकरांपासून कर्ज ४० हजार रुपये घेऊन ते बाबूराव सदाशिव यांस दिले. " (इ. स. १७६१ ). दोन वर्षांनीं बाबूजी नाइकांनीं निजामच्या राज्यावर मोहीम करून गोदावरीच्या पलीकडे मोगलाला रेटीत नेलें. याही खेपेस त्यास पुष्कळ द्रव्य मिळालें, तेव्हां परत येतांना त्यांनीं टोंक्यास मुक्काम केला. बाबूजी नाईक मोठे रसिक व सृष्टिसौंदर्याचे भोक्ते होते. त्यांनीं टोंक्यास निरामय व एकांत स्थान पाहून गोदातीरावर श्रीसिद्धेश्वराचें भव्य देवालय बांधिलें, गंगेला सुंदर घाट बांधिले, व वाडाही बांधूनठेवला. इ. स. १७६३

१ चिटणीसकृत थाकटे रामराज. पृष्ठ १६।१७. २ ऐतिहासिक लेखसंग्रह, ले० ५. ३ भाऊसाहेबांची बखर. पृष्ठ १३४. ४ काव्येतिहास संग्रह. पत्रें यादी वगैरे लेख ३८. ५ ऐतिहासिक लेखसंग्रह. ले० १५०।१५३।१८५

मध्यें गोपाळराव पटवर्धनाचें पेशव्यांशीं बिनसलें. या काळीं पुण्याच्या कारस्थानांत फारच गुंतागुंत झाली होती. माधवराव व राघोबा यांचे दोन तट झाले होते. बाकीची मंडळी कोण केव्हां कोणच्या बाजूचा असे याचा नेमच नसे. 'एकाशीं एक स्नेही स्वल्पांतच होतात, बिघडतात, मागुती एक होतात, हेंच एक अपूर्व![१] अशी स्थिति सर्वच सरदारांची झाली होती. गोपाळराव पटवर्धन निजामास घेऊन पुणें लुटण्याकरितां आला, व पेशव्यांनीं मिरजेला वेढा घातला![२] या प्रसंगीं उभयपक्षांचा समेट करून एकोपा करण्याचे कामीं नाइकांनींच पुढारीपण घेतलें होतें. गोपाळरावास परत मराठी गोटांत आणण्याचा खटाटोप बाबूजी नाईकांनीं केला. ते गोपाळरावास लिहितात. "काळ एकरूप कोणाचाही राहत नाहीं. धैर्य सोडूं नये."[३] गोपाळराव ता. २१ सप्टेंबर १७६३ रोजीं एका पत्रांत लिहितातः "रा. नाइकांचें मानस तह झाल्यावर आपण यागी होऊन घरास जावें ऐसें आहे. परंतु त्यांचे स्वाधीन स्थळें बहुत आहेत. थोडा बहुत सरंजामही आहे."[४] नाइकांच्या मध्यस्तीनें गोपाळराव परत मराठ्यांकडे आले. निजाम व पेशवे, माधवराव व राघोबा, पेशवे व पटवर्धन, अशा त्या वेळीं मराठ्यांत अनेक फळ्या, दुफळ्या, त्रिफळ्या झाल्या होत्या! राघोबादादावर मारेकरी घालण्याचा रामचंद्रराव जाधव (निजामाच्या पक्षांतला मराठा सरदार) याचा दुष्ट बेत होता, पण "बाबूजी नाईक व आबाजी पुरंदरे यांणीं जाधवाच्या फौजेवर हल्ला करून तिची दाणादाण केली. व त्यास कैद करून दौलताबादच्या किल्ल्यांत अडकवून ठेविलें"[५] या प्रसंगीं बाबूजी नाइकाची खास फौज पांच हजारपर्यंत होती. चुलत्या पुतण्यांचे भांडणांत माधवरावांच्या मंडळींनीं नाईक यांस ममतेंत आणलें[६] माधवरावाच्या पक्षांतले बाबूराव फडणीस व त्यांचे पुत्र मोरोबा व त्रिंबकराव मामा पेठे हे राघोबाच्या भीतीनें पळून बारामतीस गेले. नाइकांनीं त्यांस पाठीशीं घातलें. त्यांस नेण्यास राघोबाचे राऊत आले, तेव्हां आबाजी नाईक यांणीं त्या त्रिवर्गाशीं करार केला: "राउतांनीं जबरदस्ती केली तरी बारामतीचा वाडा झुंजवूं. इतकें असून धीर न धरवे तेव्हां त्रिवर्गांनीं मरावें." तेव्हां बाबूजी नाईक यांणीं मध्यस्ती करून त्रिवर्गाच्या

१ सदर ले० २९९. २ ऐतिहासिक लेखसंग्रह. ले० १४६. ३ सदर. ले० ३६९. ४ सदर पृष्ट २८३. ५ सदर ले०४३-४८. ६ सदर ले० ६८. ७ ऐतिहासिक लेखसंग्रह. ले. १०३.

अपूस धक्का न लावण्याचें रावोबापासून वचन घेऊन त्यांस भेटविलें. बाबूजीनाईक याप्रमाणें सर्वपक्षीयांत सारखेच वजनदार असल्यामुळें मध्यस्तीनें काम करून समेट करवीत होते. पण त्यांच्याच कामांत तिसऱ्यास मध्यस्ती करण्याचा प्रसंग पुढें आला.

११ येथपर्यंत म्ह० इ. स. १७६४ पर्यंत बाबूजी नाइकांचें मन माधवरावाविषयीं कलुषित झालें नव्हतें. राघोबादादांकडे त्यांचा ओढा होता हें खरें, पण ते निष्पक्षपातानें वागत होते. इ. स. १७६४ मध्यें राघोबादादास घरीं बसवून माधवरावानें कारभार जातीनें पाहण्याचा विचार केला. सोलापूरचा किल्ला बाबूजी नाइकांकडे होता, तो त्याजकडून घ्यावा असा माधवरावाचा विचार होता, पण तो किल्ला देण्यास बाबूजी नाइक तयार होईनात. त्यावेळीं उभयतांचें जुंपलें. नाइकांचीं मुलेंमाणसें चीजवस्त जप्त करून मंगळवेढ्यांत पेशव्यांनीं नेऊन टेविलीं ! शेवटीं बाबूजी नाइकांचे साडू गोविंद शिवराम खाजगीवाले यांच्या मध्यस्तीनें वाद मिटून किल्ला जानेवारी इ. स. १७६७ मध्यें पेशव्यांस मिळाला. "एकलक्ष पंचायशीं हजारांची जहागीर जातीची व पागा मिळून नाइकांनीं घ्यावी. २५० पागा चाकरीस पाठवावी...वस्तभाव व मुलें माणसें त्यांच्या हवालीं करावीं. अतःपर लढा नाहीं. निखालस दोन्हींकडून झालें आहे." यानंतर "किल्ला बाबूजी नाइकांची समजाविशी होऊन हस्तगत झाला. ते क्षेत्रास (पंढरीस) आले. कुटुंब मुद्धां बारामतीस गेलें." यानंतर बाबूजीनाईक राजकारणांत प्रत्यक्ष फारसे पडले नाहींत. ते योगी होऊनच राहिले. त्यांचें येणें जाणें पेशव्यांकडे नेहमीं असे. एकदां माधवराव पेशवे त्यांचा पाहुणचार खात चार दिवस बारामतीस त्यांचे वाड्यांत राहिले होते. माधवरावांच्या कारकीर्दींत नाइकांचें उत्पन्न पुष्कळच खालावलें. इ. स. १७७१।७२ सालीं त्यांच्याकडे पांच महाल, दोन किल्ले व दहा गांव राहिले होते. माधवरावांच्या मृत्युसमयीं बाबूजी नाईक थेउरास सन्निध होते (ता. ६ नोवेंबर इ. स. १७७२).

१२ नारायणरावास यानंतर दोंड महिन्यांनीं (ता. १६ डिसेंबर) पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं. राघोबादादाची मुलगी दुर्गाबाई ही 'बाबूजी नाइ-

१ सदर. ले० ६४४. २ ले० ६४९. ३ पेशव्यांची बखर. पृष्ट ७५. ४ बारामतकरांच्या घराण्यांचा सं० इ. परिशिष्ट चवथें.

कांचा मुलगा पांडुरंगराव वर नेमस्त केला होता ' त्यास पौष शु० १९ ( ता. ७ फेब्रुआरी १७७३ ) रोजीं दिली. लग्नसमारंभ पुण्यास मोठ्या थाटाचा झाला. मोरोबा पटवर्धन लिहितात " नारायणराव खासाच आमंत्रणास ९०।७९ घरांस पायउतारा गेले होते. " या लग्नाचें वर्णन पुण्याच्या दप्तरीं असलेल्या कागदपत्रीं सांपडतें. परशुरामभाऊ पटवर्धनाची कन्या ही बाबूची नाइकाच्या चवथ्या पुत्रास दिली होती; व तो मुलगा लग्न झाल्यावर १९ च दिवसांनीं वारला. याच मुलीचा पुनर्विवाह करण्याचें परशुरामभाऊच्या मनांत होतें असें सुधारक ह्मणतात. राघोबादादांचे ग्र्याही झाल्यावर नाइकास फौजेच्या खर्चाकरितां नक्त पैसा मिळे तो यापुढें लाख रुपयांचा सरंजामच मिळाला. पुढें लवकरच नारायणरावांचा वध झाला. राघोबादादांनीं बाबूजी नाइकास पुण्यास भेटीस बोलावलें,, पण ते आले नाहींत. दोन चार बोलावणीं गेल्यावर ते एकदाचे आले, तेव्हां राघोबादादा पेशवे त्यांच्यावर खूप रागावले. पण बाबूजी नाईक स्पष्ट म्हणाले "होय माझी चूक झाली खरी ! तुमच्या घरीं मोठाच समारंभ व्हावयाचा होता, त्याला मी तत्काळ यावयाला पाहिजे होतों ! दादासाहेब काय हें कर्म केलेंत !! " आपल्या राष्ट्रांत त्यावेळीं असे बाणेदार स्पष्टवक्ते पुरुष होते हें पाहून कोणास हर्ष होणार नाहीं ? रामशास्त्र्यांचें निस्पृहपणाचें उत्तर तर प्रसिद्धच आहे. त्यांनीं राघोबास देहांतप्रायश्चित्तच घ्यायला सांगितलें. नारोजीनाईक, भवानराव प्रतिनिधी, मालोजी घोरपडे, यांनीही राघोबादादाचा भरदरबारांत निषेध केला. सवाईमाधवरावांचा जन्म पुरंदरीं झाला. गंगाबाईच्या प्रसूती समयीं राघोबाच्या पक्षाकडील साक्ष ह्मणून " सौ० दुर्गाबाई इला बारामतीहून आणवून गंगाबाई यांजजवळ ठेविली. " इ. स. १७७६ सालीं एक तोतया उत्पन्न झाला व तो 'मीच भाऊसाहेब पेशवे ' ह्मणून सांगूं लागला ! पण तो भाऊसाहेब नाहीं अशी खात्री करून घेण्यासाठीं बाबूजी नाईक यास पुण्यास बोलावून नेलें होतें. यानंतर दोन वर्षांनीं ह्म. इ. स. १७८० च्या सुमारास बाबूजी नाईक कैलासवासी झाले. बाबूजी नाईक शूर व कारस्थानी होते हें इतिहासच सांगतो. ते मोठे रसिक व कनवाळू होते. ते महत्वाकांक्षी

१ ऐतिहासिक लेख संग्रह. ले० १२४६. २ ऐतिहासिक लेखसंग्रह पृष्ट २००४. ३ पेशव्यांची बखर पृष्ट. ८९; नारायणराव पेशव्याची बखर. पृ० १९. ४ सदर पृष्ट ९४.

होते, पण त्यांना पुष्कळ वेळां अपेशच येत गेलें. **ते निश्चयी, धैर्यवंत, अभिमानी, समतोलपणा राखून परस्परऐक्य करण्यास मनापासून झटणारे, निर्भीड व गुणज्ञ** होते. हे त्यांचे गुण वाखाणण्या सारखे आहेत. मोरोपंत बारामतीस आल्यानंतर ते २५।३० वर्षे हयात होते. पंतांचा व त्यांचा सहवास २७ वर्षे होता. त्यांच्या पश्चात मोरोपंतांचा सांभाळ पांडुरंगराव नाईक यांनीं केला.

१३ बाबूजी नाईक बारामतकर यांस दोन बायका होत्या. एक लक्ष्मीबाई ऊर्फ ताईबाई, व दुसरी कमळाबाई ऊर्फ आबई. लक्ष्मीबाईस पुत्र दोन, कृष्णराय व नीलकंठराय. कमळाबाईस पुत्र एक पांडुरंगराय. आबाजी नाईक यांस पुत्र नव्हता ह्मणून त्यांनीं नीलकंठराय यास दत्तक घेतलें. बाबूजी नाईक जिवंत असतांना मुद्दां त्यांचे त्यांचे जेष्टपुत्र कृष्णराव यांच्याशीं पटत नसे. कृष्णराव व पांडुरंगराव यांच्यामध्यें तर जन्मभर उभा दावा होता. यामुळें बाबूजी नाइकांच्या पश्चात् कृष्णराव बाबूराव, पांडुरंगराव बाबूराव व नीलकंठराव आबाजी यांच्यांत तीन वांटण्या झाल्या. वांटण्या झाल्या तेव्हां मुद्दां इनाम गांवें व जहागिरी मिळून नाइकांचें सालिना तीन लक्षांचें उत्पन्न होतें. यांच्या विभक्तिपत्रांत प्रत्येकाकडे कोणतीं गांवें वांटणीस गेलीं त्यांचा तपशील दिला आहे. पण आपणांस त्याच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं. इंदापुर तालुक्यांतलें बावडें गांव कृष्णरावांकडे गेलें, व ते तेथें राहूं लागल्यामुळें त्यास व त्यांच्या वंशजांस बावडेकर ह्मणूं लागले. पांडुरंगराय बारामतीसच राहिले. निळकंठराव मेडद येथें राहण्यास गेले ह्मणून त्यांस व त्यांच्या वंशजांस मेडदकर ह्मणूं लागले. याप्रमाणें बारामतीचें ऐश्वर्य बाबूजी नाइकांच्या मरणानंतर पुष्कळच कमी झालें. पंतांचा प्रेमा पहिल्यापासून पांडुरंगरायांकडे असल्यामुळें व पांडुरंगरायांचीही त्यांच्या ठिकाणीं दृढभक्ति असल्यामुळें पंत पांडुरंगरायांनाच चिकटून राहिलें. याप्रमाणें इ. स. १७५३-१७८० पर्यंत पंतांचे यजमान बाबूजी नाईक हे होते, व इ. स. १७८०-१७९४ पर्यंत पांडुरंगराय नाईक हे होते. पंतांच्या पश्चात् पंधरा वर्षांनीं

---

१ पंतांच्या गंगाबकीलांत आर्या ७८१९ मध्यें कृष्णराय, पांडुरंगराय व नीलकंठराय हे तिघेही बाबूजी नाइकांचे 'नंदन' (पुत्र) होते असें ह्मटलें आहे. विभक्तिपत्रांत नीलकंठराय हे आबाजी नाइकांचे पुत्र ह्मणूनच कायद्याप्रमाणें धरिलें आहे.

नाइकांच्या घराण्याची वाताहत झाली, पण तो प्रकार सांगण्यापूर्वी मोरोपंत बारामतीस आल्यापासून चाळीस वर्षे त्यांनीं ज्या बारामतकरांच्या आश्रयानें काढलीं, त्यांचा व पंतांचा संबंध कसकसा वाढत गेला व पंतांच्या ठिकाणीं आपल्या आश्रयदात्यांविषयीं केवढी कृतज्ञता वसत होती हें पाहूं.

१४ मोरोपंत कृतविद्य होऊन काव्यशक्तीचा त्यांच्या बुद्धींत अरुणोदय होतांच ते बारामतीस आले हे मागें एकदां सांगितलेंच आहे. ते बारामतीस आले तेव्हां चांगले मुजाण होते. ते गडावरून बारामतीस आले तों सरस्वतीच्या ऐवजीं त्यांना लक्ष्मीबाईचें दर्शन झालें ! रामाजीपंत कोठवळ्याच्या कामावर होते. मोरोबा त्यांचे चिरंजीव, तेव्हां नाइकांच्या पंक्तीला जे आश्रित जेवायला बसत, त्यांत पन्नासावा नंबर रामाजीपंतांचा असे व ५१ वा नंबर नंतर मोरोबांचा लागला ! पांच सहा महिने गेले तरी यजमानांचें व मोरोबाचें साक्षात्संभाषण कधींही झालें नाहीं. थोर लोकांपुढें लुडबुडण्याइतकें लघुत्व त्यांच्या बुद्धींत नव्हतें. ते मितभाषणी, मुशील, शांत, व एकांतप्रिय असत. असें सांगतात, कीं नाइकांच्या मुलींमुलांसाठीं मोरोबांनीं सीतागीत, सावित्रीगीत व रुक्मिणीगीत हीं तीन गीतें तयार केलीं. हीं त्या मुलींनीं पाठ केलीं व त्या झोंपाळ्यावर बसून तीं नित्य ह्मणत असत. एके प्रसंगीं मुलींच्या तोंडून हीं गीतें बाबूजी नाइकांच्या सहज कानांवर पडलीं. तीं त्यांना फार उत्तम वाटलीं. चौकशी करितां त्यांस असें कळलें कीं, आपल्या कोठवळ्याच्या मुलानें हीं तयार केलीं आहेत ! बाबूजी नाईक जरी व्युत्पन्न नव्हते, तरी विद्वत्समागम त्यांस घडत असल्यामुळें व त्यांची स्वधर्मनिष्ठा जागरूक असल्यामुळें त्यांच्या ठिकाणीं गुणज्ञता व रसिकता चांगल्या प्रकारची होती. मोरोबा हा व्युत्पन्न पंडित आहे हें त्यांच्या लक्षांत येतांच त्यांनीं मोरोबास आपल्या समोर बोलावून आणलें. त्याची त्यांनीं चांगली विचारपूस केली व रुद्राची पोथी त्याजपुढें ठेवून त्याचा अर्थ सांगण्यास सांगितलें, 'टीका पाहिल्याशिवाय अशा ग्रंथाचा अर्थ एकाएकीं सांगतां येणार नाहीं ' असें मोरोपंतांनी उत्तर दिलें; त्यानंतर शिवकवचाची पोथी त्यांच्यापुढें आणून ठेविली. मोरोबांनीं संस्कृत श्लोक वाचावा, त्याची फोड करून सांगावी व लागलेंच त्याचें मराठींत श्लोकबद्ध भाषांतर रचून तें ह्मणून दाखवावें.—याप्रमाणें त्यांनीं साऱ्या शिवकवचाचा अर्थ सांगितला ! बाबूजी नाईक त्यांवर फारच संतुष्ट झाले, व मोरोबा केवळ व्युत्प-

नच नाहीं, तर कविही आहे असें त्यांस कळून आलें. त्यांच्या ठिकाणीं मोरोबावि-षयीं आदर उत्पन्न झाला. त्या दिवशीं रात्रीं भोजनप्रसंगीं मोरोबाला ९१ व्या नंबरावरून उठवून आपल्या शेजारीं दुसऱ्या नंबराच्या पाटावर जेवावयास बोलाविलें. पण 'मी येथेंच बरा आहें' असें ह्मणून मोरोबा आपल्या जागेवरून उठेनात. दोनतीनदां आग्रह केला तरी तोच प्रकार. नाइकांचे कारभारी दाजीबा हे फार चाणाक्ष होते. मोरोबाच्या हट्टवादीपणाचें कारण त्यांच्या लक्षांत येतांच त्यांनीं दुसऱ्या पाटावर रामाजीपंतांस नेऊन बसविलें व मग तिसऱ्या पाटावर मोरोबा जाऊन बसले. वडिलांचें अतिक्रमण होऊं नये, गुरुमर्यादाभंग होऊं नये ह्मणून थोर व कुलीन पुरुष असेंच जपत असतात. गुरुजनांना अगोदर मान मिळाल्याशिवाय आपण हांवरेपणानें तो घेऊं नये, ही कुलजनीति आहे. सत्पुत्र पित्याला उन्नतपदाला नेण्यासाठीं झटतात व त्याच्या उन्नतीबरोबर आपली उन्नतिही करून घेतात, हें योग्यच आहे. यानंतर यजमानाच्या संतोषार्थ या 'नवीन कवीनें' ब्रह्मोत्तर खंडाच्या आर्या केल्या. शिवलीलामृत याप्रमाणें आर्याबद्ध झालेलें पाहून शिवभक्त बाबूजीनाइकांस फार आनंद झाला व त्यांनीं मोरोपंतास सालिना पांचशें रुपये देऊन पुराण सांगण्यास ठेवलें. मोरोपंत बारामतकरांचे पुराणिक झाले.

१५ बाबूजी नाईक बारामतीस सर्वकाळ नसत. ते आठ महिने स्वारीशिकारीस जात व चतुर्मास बारामतीस असत. 'श्रीमंत गृहीं पर्जन्यकाळीं असतात तेव्हां हरिवंशादि ग्रंथांवर माझें पुराण वाड्यांत चालतें,' असें पंतांनीं एका पत्रांत लिहिलें आहे. 'ब्रह्मोत्तरखंड श्रीमंत लिहिणार ह्मणून ठेविलें आहे,' 'हरिवंशाची पोथी सरकारांत प्रत करावयास आरंभ केला आहे,' अशीं वाक्यें पंतांच्या पत्रांतून आढळतात, त्यावरून बाबूजी नाइकांस स्वतः पुराणकथांचें चांगलेंच व्यसन होतें असें दिसतें. पुराणकथनाचें काम मोरोबाच्या आवडीचेंच होतें. नित्य सायंकाळीं घटका दोन घटका पुराण सांगावें, बाकीचा सारा वेळ हरिभजनांत, सद्ग्रंथलेखनांत, व सद्ग्रंथवाचनांत घालवावा असा पंतांचा नित्यक्रम सुरू झाला. 'विनाश्रया न शोभन्ते पण्डिता वनिता लताः' ह्मणून ह्मटलें आहे तें कांहीं खोटें नाहीं. नाइकांचा आश्रय कायम झाल्यामुळें मोरोबाच्या मागची रोजची 'तेलमिठाची' दगदग चुकली व त्यास कांहींशी स्थिरता प्राप्त झाली. 'तनुनिर्वाह-

पुरता संग' धरून सद्ग्रंथवाचनलेखनादिकांच्या द्वारें भगवत्सेवेंत काळ सा-रावयाचा त्यांचा निश्चय होताच, व ' सत्यसंकल्पाचा दाता नारायण । सर्व करी पूर्ण मनोरथ ' हा सिद्धांत खरा असल्यामुळें त्यांच्या मनोदयारूप सर्व घडून आलें. पंतांनीं लोभ जिंकला, मोठाल्या इस्टेटी करायची हांव धरली नाहीं, व ' ब्राह्मणस्य हि देहोयं क्षुद्रकामाय नेष्यते, ' हें श्रीव्यासांचें वचन हृदयीं दृढ धरून स्वपरजनांचें पारत्रिक कल्याण करण्याचा मार्ग त्यांनीं स्वीकारिला, ही मोठ्या आनंदाची गोष्ट होय. पंत पुराणही सांगत व कीर्तनही करीत. तथापि ' पुराणिक ' ह्मणूनच त्यांची बारामतीस प्रसिद्धी असे. पंतांच्या पुराणप्रसंगीं प्रेमळ श्रोत्यांच्या नेत्रांतून प्रेमाश्रूंचे पाट वाहत असत. रामायण, महाभारत, हरिवंश व मुख्यतः भागवत यांवर पंतांचीं पुराणें नाइकांच्या वाड्यांत होत. गांवांतले बहुतेक सभ्य, रसिक व भक्तिमान पुरुष बाबूजी नाइकांप्रमाणेंच पंतांच्या पुराणावर फारच लुब्ध होऊन गेले होते.

१६ पंतांच्या मनांत आपल्या यजमानाविषयीं निर्मळ प्रेम होतें, व त्यांच्या घराण्यांतील मनुष्यांविषयीं त्यांना कळकळ वाटत होती. एका संस्कृत पोथीच्या शेवटीं त्यांनीं ' यजमानस्य कल्याणमस्तु ' अशीं अक्षरें लिहिलीं आहेत! बाबूजी नाईक व त्यांचे कनिष्ठ पुत्र पांडुरंगराव हे दोघेही रसिक होते. पंतांच्या गुणांमुळें ते त्यांच्या ठिकाणीं निरतिशय प्रेम करीत, पंतांच्या आर्या पाहून त्यांना अभिमान व आनंद वाटे. बाबूजी नाईक युद्धकर्मांत व राजकारणांत निपुण असल्यामुळें त्यांना पंतांचें भारत विशेषच आवडलें, व पंतांनींही भारतांतच दोन ठिकाणीं त्यांच्याविषयीं प्रेमोद्गार काढले आहेत. कर्णपर्वाच्या उपसंहारांत पंत ह्मणतातः—

**श्रीमत्सदाशिवात्मज बाबूजीनायक प्रभु ज्ञानी ॥**
**धन्य ह्मणावें ज्याला गुरु[१]गुणश्रवणतृप्त सुज्ञांनीं ॥ १ ॥**

**दाता, वक्ता, योद्धा, तेजस्वी, मानधन, असामान्य, ॥**
**अतुळें पितृप्रसादें[२] मंडित देवव्रता असा मान्य ॥ २ ॥**

**या साधुसंगमुदिरें मुदितें[३] श्रीरामसुत मयूर कृती ॥**
**नरनारायणविजयें[४] ग्रंथ करी व्हावया सुखी सुकृती ॥ ३ ॥**

---

१ भीष्मासारखा. २ मेघामुळें. ३ आनंदित. ४ महाभारत.

महाभारताच्या उपसंहारांत पंत पुन्हां ह्मणतातः—

> जो धीरवीरहीरे श्रीसिद्धेश्वरमहादयापात्र ॥
> श्रीमान् बाबूराय प्रभु ज्याचें शोभलें यशें गात्र ॥ ४ ॥
>
> भीष्मद्रोणसम गुणें शांडिल्यसुगोत्रपद्मरवि दे हा ॥
> आश्रय, शंकर जसा उपमन्युमना, मयूरकविदेहा ॥ ५ ॥

पंतांचा महाभारत ग्रंथ संपला तेव्हां बारामतकरांच्या जहागिरीची सर्व व्यवस्था पांडुरंगरायच पाहत होते, व बाबूजी नाइक फार वृद्ध झाले होते; ह्मणून पंतांनीं या मन्त्रांत युवराजाबद्दल तेथेंच ह्मटलें आहेः—

> शीलजितामरचंदन तन्नंदन पांडुरंगरायहि तें ॥
> यश मिरवितो, प्रजांची करि दशरथसा न राम काय हितें?॥६

बाबूजी नाइकांनीं इ. स. १७७७ सालीं 'मोरोपंत पुराणीक' यांस बारामतीस एक घर बक्षीस दिलें. "बारामती येथें सरकारचा वाडा घर तुह्मांस नेमून दिलें आहे. येथें तुह्मी नांदतच आहांत. त्यास तुह्मीं बहुतां दिवसांचे पदरचे, त्यावरून तुह्मांवर कृपाळु होऊन घरवाडा दक्षिणोत्तर लांबी हात ७३ चतुःसीमा...इमलेमुद्दां तुह्मांस बक्षीस दिला आहे. तेथें तुह्मीं व तुमचे पुत्रपौत्र वंशपरंपरेनें सुखरूप नांदणें." सवाइ माधवरावाचें लग्न इ. स. १७८२ मध्यें कडाक्यानें झालें. त्याप्रसंगीं पुण्यांत 'अक्षत पेशव्यांचे आप्त पांडुरंगराव नाइक यांणीं फिरविली व त्यांचे तूप वाढणारे शाहणे बारामतीहून आणून रुप्याच्या तोटांच्या कासंड्यांनीं तूप वाढलें. पांडुरंगराय हेही बापाप्रमाणेंच उदार व गुणज्ञ होते. त्यांच्या सूचनेवरून पंतांनीं हरिवंश लिहिला. पांडुरंगरायांनीं वारंवार प्रेमानें सुचविल्यामुळें हाच भगवन्निदेश होय असें समजून मीं हरिवंश लिहिला असें पंतांनीं हरिवंशाच्या उपोद्घातांत लिहिलें आहे. पंतांचें आपल्या यजमानांच्या ठिकाणीं इतकें शुद्ध प्रेम होतें कीं, अहल्याबाई व बाजीराव पेशवे हे त्यांना आपल्या आश्रयास बोलावीत असतांनाही व नाइकांचें वैभव बाबूजी नाइकांच्या मृत्यूमुळें व त्यांच्या पुत्रांत वांटण्या होऊन तें विभागलें गेल्यामुळें अतिशय कमी झालें होतें तरी,

१ हिरा. २ नाइकांचें गोत्र शांडिल्य होतें. त्यागोत्ररूप कमलाला विकसित करणारा सूर्य. ३ ज्यानें आपल्या शांत व सुखकर शीलानें स्वर्गीय चंदन जिंकला आहे असा. ४ पत्रें यादी वगैरे ले. ३३१ व पेशव्यांची बखर पृ. ११४

त्यांनीं नाइकांचा एकदां धरिलेला आश्रय अखेरपर्यंत सोडला नाहीं. बाजीराव हे पेशवे होण्यापूर्वी एकदां भाऊबिजेसाठीं बारामतीस नाइकांकडे गेले होते. पांडुरंगरायाची स्त्री दुर्गाबाई ही बाजीरावाची बहीण होय, हें वाचकांस माहीतच आहे. भाऊबिजेचीं जेवणींखाणीं झाल्यावर पांडुरंगरायांनीं आपल्या सर्व आश्रितांची बाजीरावास ओळख करून दिली व त्यांत पंतांची विशेष तारीफ केली. पांडुरंगराय मोठ्या पूज्यभावानें ह्मणाले कीं, मोरोपंत हें आमच्या बारामतींतलें अमूल्य रत्न आहे, त्यांच्यामुळें आह्मां सर्वांना स्वर्गसुखाचा लाभ होत आहे! हें ऐकतांच बाजीराव अंमळ आढ्यतेनें ह्मणाले कीं, 'तुमच्या पदरीं असलें रत्न असणें हें तुह्मांला मोठें भूषणावह आहे.' यावर पांडुरंगराय विनयनम्र होऊन ह्मणाले, 'छे असें नव्हे. ते आमच्या पदरीं नाहींत, आह्मींच त्यांच्या आश्रयानें आहोंत!' यानंतर बाजीरावानें पंतांस आपल्या आश्रयास बोलाविलें, तेव्हां पंत ह्मणाले, "आमच्या यजमानांस आमचा कंटाळा आल्यास ते दुसरीकडे जाण्यास सांगतील! त्यांनीं जा ह्मटल्यास ईश्वर वाट दाखवील तिकडे जाऊं!!" हें उत्तर अर्थातच बाजीरावास रुचलें नाहीं व त्याचा मोरोपंतांवर मोठा घुस्सा झाला. असो. पांडुरंगरायांनीं पंत (इ. स. १७९३ मध्यें) काशीयात्रेला गेले, तेव्हां बारामतीच्या लोकांच्या तर्फेनें गंगेपुढें वकीली करावी असें त्यांना सुचविलें होतें. त्याप्रमाणें त्यांनीं काशीस 'गंगावकीली' केली व गयेस 'विष्णुपदवकीली' केली. गयेस विष्णुपदापुढें पिंड देतांना पंतांना प्रथम आपल्या उदार यजमानाचें स्मरण झालें! पंतांची स्वामिनिष्ठा, त्यांचें सत्वसंशुद्ध अन्तःकरण, व कृतोपकारांबद्दलचें स्नेहभरित स्मरण, यांनीं पुढील आर्या किती तरी प्रेमळ झाल्या आहेत:—

**श्री बाबूराय प्रभु माझा अत्यंत सदय अजद हा।**
**आर्थिजना न ह्मणो दे जैसा तप्तास जेंवि सजद 'हा'॥ ८॥**

---

१ बाजीराव पेशवे झाल्यावर कोणीही हरिदास वाड्यांत कीर्तनास आला कीं, त्यांस पुढील दंचसूत्री प्रथम शिकावी लागे.:—(१) कथा चार घटकांत आटपावी. (२) यजमान कथेंत आल्यावर हरिदासानें सभेकडे पाठ करूं नये. (३) कथेंत कृष्णचरित्र लावावें. (४) आख्यान अर्धवट सोडूं नये, पुरें करावें. व (५) मोरोपंतांची आर्या कथेंत ह्मणूं नये! पेशव्यांच्या वाड्याचा याप्रमाणें पंतांच्या आर्येवर बहिष्कार पडला!!

**श्री गायत्री-गीता-गंगा-सिद्धेश्वरैकभक्तातें ।**
**या विष्णुपदा! मुक्ति न वरिल कशी गुरुपदाब्जसक्तातें? ॥ ९ ॥**
**परि याच्या उद्देशें विष्णुपदा! पिंड अर्पिला भावें ।**
**तव अर्चनीं यश जनें सुक्षीरीं जेंवि सर्पि लाभावें ॥ १० ॥**

पंत कांहीं मिथ्यास्तुति करणारे तोंडपुजे नव्हते. बाबूजी नाइकांच्या राजकारणांतल्या बाह्य वर्तनाबद्दल मतभेद कदाचित होऊं शकेल, पण त्यांच्या खाजगी वर्तनाबद्दल पंतांनीं त्यांची जी स्तुति केली आहे, ती अनृत आहे असें मानण्याचें कांहीं कारण नाहीं. पंतांना बाबूजी नाइकांचा सहवास दोन तपांहून जास्त होता. तेव्हां त्यांनीं ज्याला गायत्री–गीता–सिद्धेश्वर यांचा भक्त ह्मटलें; 'दाता, वक्ता, योद्धा, तेजस्वी, मानधन' या प्रकारचीं विशेषणें लावलीं, 'माझा अत्यंत सदय अन्नद हा' ह्मणून विष्णुपदापुढें गाहिंवरून प्रेमाश्रु ढाळले; व 'या साधुसंगानें' आपण मुदित झालों ह्मणून गौरवानें सांगितलें; त्याच्या सद्वर्तनाबद्दल आपणास साशंक होण्यास कांहीं कारण नाहीं. पंत पांडुरंगरायाबद्दल गंगावकीलींत ह्मणतात:—

**श्रीबाबूरायाचा पुत्र पहा ! पांडुरंगराय कवी ॥**
**देवि! भगीरथनंदिनि! तात तसा स्वयश हाहि आयकवी ॥८॥**

विष्णुपदवकीलींत पुन्हां पांडुरंगरायांबद्दल 'श्रीविष्णुपदा! व्हावें यासि यश असें, तसें नको अन्य' असें ह्मटलें आहे, यावरून आपल्या घराण्याचें कुलपरंपरेचें महत्व व यश राखण्याची त्यांस आवड होती असें दिसतें. पांडुरंगरायांच्या आईबद्दल 'कमळाबाई सदया, जननीजनरीति आश्रितीं दावी,' ह्मणजे कमळाबाई आपल्या आश्रितांना पोटच्या पोरांसारखें प्रेमानें वागवीते असें पंत ह्मणतात. 'अभिमानी स्वजनांचे हे' या प्रमाणें नाइकांविषयीं त्यांनीं सामान्यतः लिहिलें आहे. नाइकांच्या मोठेपणावर भिस्त ठेवून जे जे बारामतीत आले त्यांचें त्यांचें नाइकांनीं कल्याणच केलें. पंतांनीं आपल्या यजमानाबद्दल काढलेले आणखी दोनच सरस उद्गार देऊन हा मुद्दा पुरा करितों:—

**बाबूराय तव सुतांचि, न शके तत्प्रेमवर्णना तुंड ॥**
**कुरवाळी तदपत्यें, भरुत यशें साधुकर्ण नातुंड ॥ गंगा० ९८ ॥**

---

१ मार्तंड.

ज्या बाबूरायाची तत्पुत्राची ही साधली सेवा ॥
विष्णुपदा! तारावे ते सर्वहि विनिव तूं असें देवा ॥विष्णु० ६३

१७ आपण इ. स. १७७५ मधल्या चातुर्मास्याच्या कोणे एके दिवशीं बारामतीस पंतदर्शनास गेलों आहोंत अशी कल्पना करूं या. आठ महिने स्वारी शिकारींत घालवून अमित संपत्ति घेऊन बाबूजीनाईक आपल्या फौजेसह बारामतीस चातुर्मास राहण्याकरितां आल्यामुळे बारामती नगरी हत्ती, पालख्या, मेणे, उंट, पागा, व हजारों आश्रितजन यांनीं गजबजून गेली आहे; 'दाता, वक्ता, योद्धा तेजस्वी, मानधन' असे भीष्माचार्यासारखे शोभणारे पंडित श्रीमंत बाबूराव नाईक गायत्रीचा जप, गीता व विष्णुसहस्रनामांचे पाठ व सिद्धेश्वराची षोडशोपचार पूजा यथासांग आटपून भोजनोत्तर सायंकाळच्या सुमारास व्यासपीठाच्या उजव्या बाजूस मृगाजिनावर बसले आहेत; 'श्रवणीं प्रेमाश्रु जया येती' ते दाजीबा कारभारी, इतर कारकून व आश्रित, बारामतींतले सुशील सज्जन, शास्त्री, पुराणीक व आर्येला चटावलेले विशी-पंचविशींतले तरुण विद्यार्थी यांनीं भव्य दिवाणखाना सारा गच्च भरून गेला आहे: पांडुरंगराय आपल्या बंधूंसह व आबाजीपंतांसह पुराणिकबोवांसन्मुख मोठ्या उत्सुकतेनें श्रवणोन्मुक होऊन बसले आहेत; आबाजी वेंकटेश, बापूभट जामदार, 'गुणरत्नांचा डबा' कमळाकर, जगन्नाथपंत कुंटे, अनंत भट दाते, भिवजी खोत, बाळहैदर, मैराळ शिंपी, 'रामदासाच्या सदुक्ति' नित्य गाण्याचा छंद घेतलेले बहिरोबा दादा, 'जो हरिस सप्रेम स्मरतो' तो खाटिक, तोंडावर व स्कंधांवर ४० वार असलेले रामजी व उदाजी चव्हाणबंधु, रघोपंत कोतवाल, आवजी आचार्य, देशमुख, देशपांडे, पाटील, चौगुले, वगैरे अनेक जातींचे, पेशांचे, व अधिकारांचे पुरुष मोठ्या श्रद्धाप्रेमानें पुराणश्रवणास जमले आहेत; डाव्या बाजूच्या दालनांत स्त्रीसमूहांत ताईबाई व कमलाबाई यांच्या सभोंवार शेपन्नास स्त्रिया जमल्या आहेत; त्यांत 'प्रेमें माता म्यां जीस मानिलें आहे.' अशी एका वृद्धा स्त्री, पंतांची 'बहुभर्ली रमा भार्या,' पंतांची स्त्रीगीतें मुखोद्गत असलेल्या नाइक व पंत यांच्या घरच्या मुली व सुना वगैरे अनेक स्त्रिया बसल्या आहेत,-अशा समुदायांत व्यासपीठावर आरूढ होऊन मोरोपंत रामायण, भारत किंवा भागवत यांतल्या भगवद्भक्तांच्या, वीरश्रीच्या, मुत्संदगिरीच्या, व नीतीच्या प्रेमळ व बोधप्रद कथांवर पुराण सांगत आहेत व विविध

रसांचे विविध भाव श्रोत्यांच्या चेहऱ्यावर स्पष्ट उमटलेले आहेत—अशा स्थितींत पंतांची ती शांत व प्रेमळ मूर्ति श्रोतृवृंदाच्या हृदयांत प्रेमरसाचे कल्लोळ उत्पन्न करतांना पाहून कोणास आपल्या नेत्रांची धन्यता वाटणार नाहीं! लोक प्रेमानें पंतांस 'महाराज,' 'बाबा,' 'श्रीपांडुरंग' 'रामभक्त' असें ह्मणून त्यांचे पादरज आपल्या मस्तकीं धारण करीत असत. भक्तिमंजरी-मालेंत पंतांविषयीं लिहिलें आहे:-

**निरंतर पाटी लेखणी हातीं। आर्याकाव्य नित्य करीती॥**
**नर नारी मुमुक्षु येती। अनुग्रह देती तयांसी॥ १॥**
**पंडित आणि भजनशीळ। काव्यकर्ता संत निर्मळ॥**
**विद्वज्जनांचे अर्थ सकळ। पूर्वी प्रांजळ साधु तो॥ २॥**

१८ पंतसंगानें सारी बारामती आर्यामय होऊन गेली. मुलांबाळांच्या, स्त्री-पुरुषांच्या तोंडीं घरींदारीं आर्याच आर्या होऊन गेल्या. "जेथें तेथें आर्या ह्मणती। कीर्तनरंगीं प्रेमळ गाती। शास्त्रज्ञ वैदिक अर्थ करीती। मुक्त होती श्रवण-पठणें." बारामतींतल्या लोकांना आर्यांनीं कसें मोहून टाकलें, व आर्यापतीचा त्यांना कसा अभिमान वाटे हें आर्या बारामती व मोरोपंत यांचा नित्य संबंध जोडून बारामतींच्या कांहीं तरुण आर्याभक्तांनीं ज्या कांहीं आर्या तेव्हां तयार केल्या होत्या त्यावरून स्पष्ट दिसतें:-

**आर्या कविता कीजे एका बारामतींत मोरानें॥**
**अन्य कवी ते करिती फिरती बारामती तमोरानें॥ १॥**
**बा राम तींत ह्मणवुनि तीतें बारामती असें नांव॥**
**तींत वसे तो मोरोपंत भवाब्धींत जीच नव नावं॥ २॥**
**केवळ तो शुकचि खरा, बारामतिला न मोर माना हो॥**
**स्मरतो बारामतिला, बा राम तिला नमो रमानाहो॥ ३॥**
**आर्या! तरुच्या पक्षा त्यागा बारामती तमोराशी॥**
**आर्यातरुच्या पक्षा त्या गा। बारामतींत मोराशीं॥ ४॥**

१ मोरोपंत केवळ भवसागरांतून तारून नेणारी नव नौका आहे. २अनेक प्रकारच्या बुद्धि ज्यापाशीं आहेत अशाला. ३ रमापति श्री विष्णु. ४ आर्या! (श्रवणचतुरांनों बारामती ह्म० अनेक दुर्मती ज्यांत आहेत असे, तमोराशी ह्म० अज्ञानसमूह ज्यांत आहेत अशा तरुच्या ह्म० प्रपंचवृक्षाच्या, पक्षा ह्म० अहंकारातें त्यागा, व बारामती-गांवामध्यें आर्यावृक्षाच्या आश्रयानें राहणाऱ्या त्या ह्म० सुप्रसिद्ध अशा मोरोपंत कवीला गा ह्म० भजा. निरहंकार होऊन पंतांची कविता वाचा. 'आर्यांत रुचा' असाही पाठ आहे.

बारामतकरांना आपल्या गांवांतल्या या संतकवीविषयीं केवढा अभिमान व आदर वाटत असे हें यावरून दिसतें. पंतांचा बारामतीस जो जयजयकार होत असे तोच पुढें महाराष्ट्रभर झाला व पंतांच्या आर्या पंतांच्या जिवंतपणींच काशीरामेश्वरपर्यंत पसरल्या. पंतही बारामतीला श्रीसिद्धेश्वरक्षेत्र ह्मणत. भगवद्भक्त ज्या जागेवर बसतील ती जागा क्षेत्ररूपच आहे. तुकोबांनीं ह्मटलेंच आहे. 'पावन तें कूळ पवित्र तो देश । जेथें हरिचे दास जन्म घेती.' पंत बारामतीस श्रीगणपतीच्या देवळांत गणेशासमोर बसून कविता करीत, तेथें त्यांना ज्यास्त एकांत मिळे. तें देऊळ पंत व दाते यांच्या घरांलगतच आहे. पंतांनीं बारामतीला 'क्षेत्र सिद्धेश्वरस्य प्रथितपृथुगुणे मूर्तकैलासरूपे' याप्रमाणें गौरविलें आहे. पंतांचा समागम बारामतकरांना ४० वर्षे लाभला. पंतांना बारामतकरांचें व बरामतकरांना पंतांचें केवळ वेड लागून राहिलें होतें. पंतांची प्रेमळ, शांत, व भव्य मूर्ति बारामतकरांच्या डोळ्यांपुढें सतत ४० वर्षे खेळत होती, व त्यांच्या वागमृताचे घुटके ते अतृप्तकर्णांनीं घेत होते.

१९ पंतांचें देहावसान झाल्यावर महाराष्ट्रांत रावबाजीच्या प्रेरणेनें अनीति, धर्मभ्रष्टता, व स्वार्थपरायणता यांचें साम्राज्य माजलें. पूर्वी ज्यांनीं चांगली तलवार गाजविली होती त्यांच्या जहागिरी बाजीरावानें जप्त केल्या, व त्यांच्या वंशजांस धुळीचे दिवे खायला लावले! होळकरच्या दंग्यांत पांडुरंगरायांनीं जवाहीर, सोनेंनाणें यांनीं भरून चार उंट आपल्या भावाकडे मेडदच्या किल्यांत सुरक्षितपणासाटीं पाठविले, पण ते वाटेंतच बंडखोरांनीं लुटून नेले! पांडुरंगराव इ. स. १८१० मध्यें वारले. त्याच सुमारास कृष्णराय व नीलकंठराय हेही वारले. बाबूजी नाइकांचे तिघेही पुत्र वारल्यानंतर बारामती, मेडद, व बावडें या तीनही ठिकाणीं पोरवडा झाला. वजनदार कर्त्या पुरुषाच्या अभावीं नाइकांच्या इष्टेटीची वाताहात होऊं लागली व रावबाजीनें पाजीपणाची कमाल करून आपल्या बहिणीच्या घराण्याची राखरांगोळी करून इ.स. १८१० मध्येंच नाइकांच्या जहागिरीची जप्ती केली. व नाइकांच्या प्रासादतुल्य वाड्यावरून नांगर फिरविला! रा. ब. गोपाळराव देशमुख ( लोकहितवादी ) आपल्या ऐतिहासिक गोष्टी भाग १ गोष्ट ८० मध्यें ह्मणतात; "पांडुरंगराव जोशी यांस बाजीरावसाहेब यांची सख्खी बहीण दुर्गाबाई दिली होती. ती नारायणराव यांचे खुनावरून नानाफडणिसांकडे

झाली. यामुळें तिची आई आनंदीबाई इजला फार राग येऊन तिनें बाजी राव यांस सांगितलें होतें कीं, 'तूं कधीं राज्यावर आलास तर अगोदर दु-र्गाची खोड मोड.' यावरून बाजीरावानें बारामतकरांची जप्ती करून सर्व दौलत लुटून नेली!" ही गोष्ट अगदीं खरी आहे. बारामतकरांची जहागीर गेली, पांडुरंगराव नाईक वारले व बारामतीच्या वाड्यावरून नांगर फिरविला गेला, तेव्हां पांडुरंगरावांचीं मुलेंबाळें काशीक्षेत्रास कायमचीं रहावयास गेलीं. पंतांचे वडील चिरंजीव रघुनाथपंत हे त्यांजबरोबर आपल्या मुलां-बाळांसुद्धां गेले व धाकटे चिरंजीव रामकृष्णपंत यांस त्यांचे चुलतसासरे विठ्ठलपाध्ये यांनीं बारामतीहून पंढरपुरास नेलें व तेथें त्यास रहावयास वाडा देऊन चंदूलालाकडून सोरोळे गांव इनाम देवविलें. पण तो कथाभाग पुढील एका प्रकरणांत सांगण्यांत येईल. बारामती गांवानें६०वर्षें राजाचें ऐश्वर्य भोगलें व बाबूजीनाईक व मोरोपंत यांचें समागमसुख भोगून मराठ्यांचा इतिहासांत व वाङ्मयांत आपलें नांव चिरस्थायी करून ठेवलें.

---

## प्रकरण पांचवें.

### मोरोपंतांचा गृहस्थाश्रम.

होय भय न संसारीं हरिभक्तिरसायनाचिया पानें ॥ २३ ॥

—अनुशासनपर्व अ० ३

स्नानसंध्या जपध्यान। तीर्थयात्रा भगवद्भजन
नित्यनेम पवित्रपण। अंतरशुद्ध असावें ॥ २० ॥
दृढ निश्चयो धरावा। संसार सुखाचा करावा
विश्वजन उद्धारावा। संसर्ग मात्रें ॥ २१ ॥

—दासबोध. द० २ स० ९.

१ उपोद्घात. २ थोरांचा गृहस्थाश्रम. ३ पंतांचे आईबाप. ४ पंतांचे सहोदर ५ पंतांची भार्या व अपत्यें; द्विभार्यत्वाच्या आरोपाचें खंडण. ६ पंतांचा प्रेमळपणा. ७ पंतांचें वात्सल्य. ८ पंतांचें कन्याप्रेम. ९ पंतांचें पुत्रशिक्षण. १० पंतांचें कन्याशिक्षण. ११ 'हुंडा देणें घेणें अशास्त्र.' १२ स्वजनपरित्राणाचें उदार तत्व व अविभक्त कुटुंबपद्धतीचें रहस्य. १३ पंतांची सांपत्तिक स्थिति व आरोग्य. १४ पंतांचा शुद्धाचार. १५ पंतांची रामोपासना. १६ पंतांची कर्मनिष्ठा. १७ उपसंहार.

१ मोरोपंत पन्हाळगड सोडून बारामतीस नाइकांच्या आश्रयास येऊन राहिले व तेथेंच त्यांच्या उदार आश्रयछत्राखालीं त्यांनीं आपलें सर्व आयुष्य घालविलें हें मागें सांगितलेंच आहे. या प्रकरणांत पंतांचा कुटुंबविस्तार केवढा होता, त्यांचें आपल्या कुटुंबीयांशीं वागणें कशा तऱ्हेचें होतें, त्यांची गृहस्थिति कशा प्रकारची होती व ते गृहस्थाश्रमाचे धर्म कसे पाळीत या विषयांचें विवेचन करावयाचें आहे. पंतांचें आपल्या आप्तस्वकीयांशीं वागणें मोठ्या उदारपणाचें होतें. व त्यांचा गृहाचार सर्वांनीं कित्ता घेण्यासारखा होता, असें माझें मत झाल्यामुळें व असा कित्ता अलीकडे दुर्मिळ झाल्यामुळें

या प्रकरणाचा मी अमळ विस्तार करणार आहें. जुन्या कुलीन पद्धतीच्या घरंदाज सज्जनांस यांत फारसें नवें असें कांहीं आढळणार नाहीं. तथापि पंतांच्या निधनकाळापासून आमच्या समाजांत एवढें स्थित्यंतर झालें आहे; समाजबंधनें इतकीं शिथिल झालीं आहेत; धर्म, कर्म, आचार, व विचार या संबंधांत पाश्चात्त्य विद्यांच्या संसर्गामुळें एवढी विलक्षण क्रांती झाली आहे कीं, आजकालच्या 'सुशिक्षित' समाजांत पंतांच्या वळणाचा सद्गृहस्थ औषधालाही मिळेल किंवा नाहीं याचा वानवा आहे! पंतांचा गृहाचार हा कुलीन आर्यपुरुषाच्या वर्तनाचा आदर्श आहे. ज्या गृहस्थाश्रम्याला आपला वर्तनक्रम सुधारायचा असेल त्यानें पंतांचा आरसा निरंतर आपल्या डोळ्यांपुढें ठेवावा. पंतांची आपल्या अन्नदात्यावर केवढी निष्ठा होती; एकाच यजमानाला आजन्म चिकटून राहण्यांत उत्तम ग्रंथकर्त्याची जबाबदारी ओळखून त्यांनीं केवढा शहाणपणा, सौजन्य, व स्वार्थत्याग प्रकट केला; भूतवर्तमानसंतांविषयीं, तीर्थक्षेत्रांविषयीं, मातापितागुरुजनांविषयीं त्यांची किती आदरबुद्धि होती; व एकंदरीनें त्यांचा सारा व्यवहार चित्तशुद्धी करून भगवत्प्रसादाला पात्र होण्यासाठीं कसा चालला होता हें मागील प्रकरणांवरून वाचकांच्या ध्यानांत आलेंच असेल. या त्यांच्या एकंदर वर्तनाला अनुरूप असाच त्यांचा गृहाचार होता.

२ सर्व विचारी पुरुषांच्या मतांप्रमाणेंच गृहस्थाश्रम हा उत्तमोत्तम आहे अशी पंतांचीही श्रद्धा होती. तीनही आश्रमांला आधारभूत असा हाच आश्रम आहे. हा आश्रम ईश्वरप्राप्तीला विघ्न करणारा नाहीं इतकेंच नव्हे, तर आपल्याबरोबर इतरांना ईश्वरप्राप्ती करवून देणारा आहे. 'आपले आश्रमीं स्वधर्मी असतां सर्वत्र एकुचि जाणा' या ज्ञानेश्वरांच्या उक्तीप्रमाणें किंवा 'मजमाजी रंगली चित्तवृत्ती। या लागीं विसरला गृहासक्ती। त्यासी गृहस्थाश्रमींच माझी प्राप्ती। निश्चयें जाण उद्धवा' या एकनाथांच्या उक्तीप्रमाणें पंतांचा विश्वास व वर्तन होतें. रामदासही ह्मणतात कीं 'गृहस्थाश्रम हा उत्तमोत्तम आहे, परंतु पाहिजे स्वधर्म आणि भूतदया.' भूतदया व स्वधर्माचरण यांमुळें स्वपरांचें जन्म

---

पंत सावित्रीगीतांत ह्मणतात:---

**गृहस्थाश्रमांत। सर्व धर्म घडे। तेणें मळ झडे। अंतरींचा॥ १७०॥**

**गृहस्थाला सोपें। न तसें अभ्यास। न लागे संन्यास। ज्ञानासाठीं॥ ७२॥**

सफळ करणाऱ्या गृहस्थाश्रमी, एकनाथांचा सुंदर कित्ता पंतांपुढें होता व तो ते गिरवीत होते. 'अहंकार व ममकार यांचा त्याग केला कीं प्राणी गृहींच मुक्त होतो' असें त्यांनी शांतिपर्वांत (अ. ३) म्हटलें आहे. चित्तांतून वासनाजाल काढून टाकणें, चित्त भगवद्भक्तीनें रंगविणें, व प्रपंचांत अनासक्त असून आसक्ताप्रमाणें सर्व व्यवहार करणें, हें खऱ्या गृहस्थाश्रम्याचें लक्षण आहे. असा गृहस्थाश्रमी पुरुष जीवन्मुक्तच होय. खरा गृहस्थ व खरा संन्यासी हे एकरूपच आहेत. वैराग्याच्या ज्वालांनीं कामक्रोधादि चांडाळ होरपळून लुले होऊन पडले कीं, गृहस्थ व संन्यासी यांत भेद राहत नाहीं. कित्येकांची अशी समजूत असते कीं, संसारांत विरक्त पुरुष स्त्रीपुत्रादिकांशीं फटकूनच वागला पाहिजे, व त्यांचा बाह्यसंग त्यानें सोडला पाहिजे. पण असें नाहीं. विरक्त पुरुष म्हणजे कांहीं सर्प नव्हे कीं त्याच्या फूत्काऱ्यानें संगतीचीं माणसें दुःखानें भाजून निघावीत ! चित्तांतल्या कामक्रोधादि विकारांची राख झाली म्हणजे चित्त शांत व केवळ आनंदमय असतें, त्यामुळें खऱ्या विरक्ताच्या संगापासून आनंदच स्रवतो. विषयी गृहस्थाश्रमी व विरक्त गृहस्थाश्रमी यांच्या फक्त दृष्टींत फरक असतो! पहिला मुलांबाळांवर आप्तेष्टांवर देहबुद्धीनें प्रेम करितो, दुसरा आत्मबुद्धीनें करितो! पहिल्याच्या आनंदाला व प्रेमाला भरतीओहटी असते, दुसऱ्याचें प्रेम व आनंद अखंड असतात!!! त्यामुळें 'सर्व हा संसार सुखाचा करीन। आनंदें भरीन तिन्ही लोक' असें विरक्त अशा आत्मज्ञ गृहस्थालाच म्हणतां येतें. सासरा मेला तेव्हां सत्यभामेच्या सुखासाठीं श्रीकृष्णांनीं मोठा शोक करून टिपें गाळलीं! विरक्त आत्मज्ञाला प्रपंचाचें यथार्थ ज्ञान असतें. त्यामुळें प्रपंचांतली खरी वर्तनपद्धती त्याला पूर्ण अवगत असते. वाऱ्याच्या हेलकाव्याबरोबर झाडें जशीं मागें पुढें होतात त्याप्रमाणें क्षणिक सुखदुःखांच्या झुळका आत्मस्वरूपाविषयीं अंध अशा विषयी गृहस्थाचें चित्त चंचल करीत असतात. पण ज्ञानवान पुरुष गृहांत असून मुक्तच असतो. तात्पर्य गृहस्थाश्रमाची योग्यता फार मोठी आहे. स्त्रीबंधु, मुलेंबाळें, आप्तइष्ट, शेजारीपाजारी-या सर्वांत नीतीचीं व ईश्वरभक्तीचीं तत्वें परायची उत्कृष्ट संधी गृहस्थाश्रमांत सांपडते, व भूतदया व स्वधर्माचरण हें जिव्हेनें नव्हे तर कृतीनें प्राणिमात्रांस शिकविण्याचा प्रसंग गृहस्थाश्रमांत येतो. श्रीएकनाथ महाराजांनीं असें कलियुगांत आचरून दाखविलें व त्यांच्या सारख्यांना गुरुस्थानीं योजून पंतांनीं आपला वर्तनक्रम ठरविला होता.

३ अस्तु. पंतांचा परिवार केवढा होता, त्याशीं त्यांचें वर्तन कसें होतें हें पाहून मग आचार व विचार यांचा त्यांचे ठायीं कसा मेळ होता हें पाहूं. पंतांचे आईबाप त्यांच्या मध्यम वयांतच वारले होते. पंतांच्या भारताचीं कांहीं पर्वें त्यांच्या हयातींत झालीं होतीं, त्याची पूर्तता झालेली पाहण्यास ते जगले नाहींत असें अनुशासनपर्वांतल्या 'देणें मीच न, गाइल बहु नाकीं मत्पिता, मदंबा ते' या शेवटल्या चरणावरून दिसतें. पंतांना आपल्या मातापित्यांच्या सच्चरित्राचा व आपल्या पवित्र कुळाचा अभिमान वाटत होता, हें पहिल्या प्रकरणांत सांगितलेंच आहे. पंतांच्या आईबापांचा त्यांच्या विषयींचा लडिवाळपणा, व पंतांचा आपल्या मुलांबाळांविषयींचा लडिवाळपणा, या दोहींचा अनुभव त्यांना घ्यायला सांपडल्यामुळें पंतांच्या काव्यांत वत्सलरसाचा उत्कृष्ट परिपाक झाला आहे.

४ पंतांचे सख्खे चुलते मेघश्यामपंत या नांवाचे होते. त्यांना नारोपंत, शिवरामपंत, व दाजीपंत हे तीन पुत्र होते. दुसरे नरसिंहपुरीं राहत होते, तिसरे कोल्हापुरचे वीरमुत्सदी व स्वामिनिष्ठ दिवाण रत्नाकरपंतआप्पा यांचे आश्रयास होते. पंत बारामतीस राहिले तरी त्यांचा या आपल्या चुलतबंधूंशीं पत्रव्यवहारादि सर्व संबंध अखेरपर्यंत होता. पंतांनीं गंगावकिलींत (९४) या 'पितृव्य सुतांचें' स्मरण केलें आहे. पंतांना एक वडील बहीण होती. तिचा सप्रेम उल्लेख यांनीं 'मातेहूनि बहु दया केली आदर करूनि आकानें' याप्रमाणें विष्णुपदवकिलींत केला आहे. त्यांना आत्माराम नामक एक भाचा होता त्याला त्यांनीं काशीस कृष्टंभट आर्डे या पंडितापाशीं अध्ययनास ठेविलें होतें. पंतांस दोन भाऊ होते. वडील भाऊ सोनोपंत व धाकटे आबाजीपंत. सोनोपंत हे पट्टीचे वैदिक होते व ते ऋचा उलट्या सुलट्या कशाही पाठ ह्मणत! त्यांचें आपल्या बंधूंसीं नीट पटत नसल्यामुळें व बोलक्या एकेरी स्वभावामुळें ते स्वतंत्र संसार थाटून राहिले होते. काशीयात्रेस ते पंतांबरोबर गेले होते. गंगावकिलींतः—

**द्यावी सद्गति गंगे। या माझ्या अग्रजासि जो भावें।**
**तुज भेटे स्त्रीपुत्र त्यागुनि, जेथें अवश्य लोभावें ॥९३॥**

याप्रमाणें सोनोपंतांचा उल्लेख आहे. मोरोपंत व आबाजीपंत हे मात्र [illegible]भर एकत्र होते, त्यांचें परस्परांवर निष्कपट प्रेम होतें. काहीं दिवस [illegible] नाईकांनीं आबाजीपंतांस अगळगांवची फडणिशी दिली होती पण

ते बहुधा बारामतीसच राहत, व त्यांचीं बायकामुलें पंतांजवळच असत. त्यांची पंतांवर फार श्रद्धा होती व सेवाधर्मामुळें पंतांपासून दूर रहावें लागे ह्मणून त्यांस फार वाईट वाटे. आबाजीपंतांच्या स्त्रीचें नांव सगुणाबाई होतें. हिचें माहेर कऱ्हाडास होतें, कदाचित तें सदाशिवपाध्ये यांचें घर असेल. विष्णुपदकिल्लींत आबाजीपंतांचा दोन तिनदां उल्लेख आला आहे. 'हा बा तेंवि करितसे प्रेम करी जें द्रवोनि आबा तें' याप्रमाणें आपल्या एका मित्राचें वर्णन करितांना पंतांनीं उद्गार काढला आहे. आबाजीपंत व सगुणाबाई ह्यांनीं पंतांना काशीयात्रेस जाण्याचे वेळीं साह्य केलें त्याबद्दल पंत ह्मणतात.:–

वदला प्रसन्नचित्तें साहित्य करूनि बंधु आबा 'जा'।
विष्णुपदा! तारावा याची सगुणा तशीच बा भाजा ॥ ६८ ॥

५ मोरोपंताच्या स्त्रीचें नांव रमाबाई होतें. पंतांचा विवाह बारामतीस झाला. मोरोपंतांस दोन स्त्रिया होत्या व रमाबाईच्या नेत्रांस विकार असल्यामुळें त्यांनीं दुसरी आनंदीबाई केली असें काव्येतिहाससंग्रहकारांनीं ह्मटलें आहे. पण यास कागदोपत्रीं आधार नाहीं. पंतांच्या घराण्यांत परंपरेनें आलेल्या माहितीप्रमाणें यास मुळींच विश्वसनीय मानतां येत नाहीं, पंतांच्या मुलांच्या कुंडल्या किंवा पंतांचा स्वभाव यांही या गोष्टीची साक्ष देत नाहींत. तेव्हां पंतांना दोन बायका होत्या हें सिद्ध होत नाहीं. पंतांस तीन पुत्र व तीन कन्या झाल्या. पहिला मुलगा रघुनाथ, दुसरा रामकृष्ण व तिसरा काशिनाथ ऊर्फ दादा. पंतांची वडील मुलगी साळूबाई ही राजापुरकर ठाकूर यांचे घरीं दिली होती, मधली सईबाई ही गाताऱ्यांत नांदगांवकर यांचे घरीं दिली होती, व तिसरी कोंकणांत कृष्णाजीपंत देवस्थळी यांस दिली होती. पंतांच्या वडील सुनेचें नांव लक्ष्मीबाई ठेवलें होतें, दुसरी सून आऊताई ऊर्फ आवडी ही बाबापाध्यांची कन्या होती. पंतांचा वडील मुलगा रघुनाथ याच्या हातची किरातार्जुनीयाची प्रत (श. १७१८ मधली) पंढरपुरीं आहे. तींत त्यानें 'रमामयूरजीननना राघवेण' असें स्पष्ट ह्मटलें आहे. यावरून हा मुलगा रमाबाईचाच ठरतो. पंढरपूरचें घराणें रामकृष्णाचा वंश होय. तेथें रामकृष्णपंडित रमाबाईचेच पुत्र होत ह्मणून त्रयीच्या परंपरेची माहिती आहे. पंतांचा तिसरा मुलगा काशीनाथ याची पात्रिका पंढरपुरीं आहे. तींत 'मयूरपंडितांना गृहिणी रमाबाई नाम्नी सत्पुत्ररत्नमजीजनत्' असें स्पष्ट

लिहिलें आहे. यावरून हे तीनही पुत्र रमाबाईचेच होत याविषयीं शंका राहत नाहीं. रघुनाथाचा जन्म श.१६७६ सालीं झाला, ह्मणजे पंतांस पहिला मुलगा वयाच्या २५ व्या वर्षी झाला हें उघड आहे. दुसरा मुलगा सहा वर्षांनंतर झाला. रामकृष्णपंडित यांच्या श. १७५२ मधल्या एका सरकारी कागदांत "आह्मी रामकृष्णपंडित, रंग गोरा, उमर वर्षे ७०" असें लिहिलें आहे, यावरून पंतांस रामकृष्ण हा दुसरा मुलगा श. १६८२ मध्यें ह्मणजे त्यांच्या वयाच्या ३१ व्या वर्षी झाला, हें स्पष्ट दिसतें. तिसरा मुलगा पंतांस 'शके १६९९ वैशाख कृष्ण ४ इंदुवासरे घटिका ३२ पलानि ५३ या वेळीं झाला.' याप्रमाणें पंतांना सहा अपत्यें झालीं, पण त्यांपैकीं कोणीही 'आनंदीबाई' नामक स्त्रीपासून झाल्याबद्दल पुरावा नाहीं. दुसरें असें कीं पंतांनीं रमाबाईच्या भलेपणाची स्तुति विष्णुपदवकिलींत केली आहे, ती आर्या हीः—

**मीं जरि अशक्त निर्धन कोपी तरि बहु भली रमा भार्या ।**
**ईतें सद्गति दे तूं, हेंचि करि प्रथम बोध या कार्या ॥ ६९ ॥**

ही आर्या पंतांनीं साठाव्या वर्षी केली आहे, या आर्येवरून रमाबाईस नेत्रविकारांनीं पंगुत्व आलें होतें असें वाटत नाहीं. दुसरें, रमाबाईचा उल्लेख जर पंत करितात तर आनंदीबाईचा करायला त्यांना काय हरकत होती? द्विभार्यात्व हा आमच्या समाजांत कांहीं इतका मोठा दोष मानला नाहीं कीं, सज्जनासही ही गोष्ट लपविण्याची हौस वाटावी! पंतांनीं दोनही वकिल्यांत आपले यजमान, इष्टमित्र, जवळचे व दूरचे आप्त, बारामतीचे न्हावी, तेली, परीट, चांभार, फार काय पण बरोबरचे गडी व पालखी वाहून नेणारे भोई, यांचा सुद्धां उच्चार केला आहे, मग ते त्यांना दुसरी स्त्री असती तर तिचा नामोच्चार करायला विसरले असते, एवढी कृतघ्नता त्यांचे पदरीं बांधायला यत्किंचितही आधार नाहीं! त्यांत पुन्हां लौकिक समजाप्रमाणें दुसरी स्त्री अधिक आवडती असायची! तेव्हां अंधळ्या, पहिल्या, नावडत्या, स्त्रीच्या उद्धाराबद्दल कवि कळकळ बाळगील आणि डोळस, दुसऱ्या, व आवडत्या, स्त्रीस सर्वस्वी विसरेल हें संभवनीय तरी कसें!!! शिवाय नेत्राच्या विकारासाठीं पंतांसारखा काव्यानंदांत देहभानही विसरणारा सत्पुरुष दुसरी बायको करील व 'स्नेहदाक्षिण्ययोर्योगात्कामीव प्रतिभाति मे' या प्रकारच्या कालिदासाच्या नायकमंडळांत जाऊन बसायची हांव धरील हें खरें मानण्याइतका

मूढ कोण असेल? एकंदरींत परंपरा, कागदोपत्रींचा आधार व पंतांचा स्वभाव या तिन्हीं बाजूंनीं विचार केला तर पंतांना एकच रमाबाई नांवाची अत्यंत सुशील, परम गुणवती, मोठी पतिव्रता स्त्री होती, व त्यांना द्विभार्यत्वाचा दोष लागलेला नाहीं असें सिद्ध होतें. अथवा द्विभार्यत्वाचा आरोप कोणाच्या मनांत पंतांवर लादायचाच असेल तर आपण अशी तडजोड काढूं कीं, विद्यानंद व भक्त्यानंद यांचा नित्य अनुभव घेणारी द्विनेत्री अशी जी पंतांची आनंदीवृत्ति तीच आनंदीबाई होय!

६ मोरोपंतांचें चित्त फार प्रेमळ, कोमळ, व निर्मळ होतें. 'अमृताची प्रेमभाव ही खाणी' ( मंत्रभागवत १०–६०२ ) या त्यांच्या सुंदर कल्पनेप्रमाणें ते जन्मभर सर्वांशीं प्रेमभावानें वागले. गुरुजनांविषयीं व साधुसंतांविषयीं पूज्यबुद्धि, बंधुमित्रांविषयीं सौहार्द, कन्यापुत्रादिकांविषयीं वात्सल्य, धर्मपत्नीविषयीं प्रीति, अन्य सर्व जीवांविषयीं अनुकंपा, हे सर्व प्रेमभावाचेच प्रकार होत व हे त्यांच्या आचारांत व विचारांत–चरित्रांत व ग्रंथांत–इतके ओतप्रोत भरले आहेत कीं, त्यांचें चरित्र व ग्रंथ प्रेमरसाच्या मुशींतूनच काढले आहेत असें वाटतें. 'ते दम्पती न डोळे व्यर्थ विनाप्रेम बोबडे चिपडे' ( वनपर्व ४–२९९ ) ह्म० 'ज्या स्त्रीपुरुषांत प्रेम नाहीं ते चिपड्या डोळ्यांसारखे दृष्टीलाही उद्वेग जनक आहेत.' पंतांच्या काव्यांत जसा सभ्यपणाचा पण रसपूर्ण शृंगार वठला आहे, तसा पूर्ववयांत स्वस्त्रीशीं कुलीनपणाला योग्य अशा विनोदीपणानें ते वागले असावेत:—

विनोदरससागरीं रमति मीनसे दम्पती
अशा कलहसांत्वनीं दिवसयामिनी संपती!।

कृष्ण विजय अ ६०

संसारांत स्त्रीपुरुषांच्या अन्योन्यप्रेमाशिवाय सौख्य नाहीं. धर्मपत्नीचा अधिकारही फार मोठा आहे. 'स्त्रीयोगें पुरुषांचे साधति धर्मार्थकाम'सत्या गी ( मदालसोपाख्यान २–५६ ) पंतांचें रमाबाईशीं वागणें फार प्रेमाचें व आदराचें असे, तिचा शब्द ते कधीं मोडीत नसत व तीही साध्वी फार सुशील व सुगुणवती असल्यामुळें गृहकृत्यांचा भार तिनें सर्वकाळ आनंदानें स्वशिरीं वाहिला, असें पंतवंशजांतल्या वृद्धस्त्रीपुरुषांकडून समजतें. आपली 'अशक्त व तापट प्रकृती संभाळून गरिबींत बहु भल्या रमा भार्येनें संसार नीटनेटका

केला,' ह्मणून पंतांनीं स्वभार्येचा गौरव केला आहेच. पंतांची व आबाजी पंतांची अन्योन्यप्रीति फार होती व ते आजन्म मोठ्या आनंदानें एकत्र राहिले हें वर सांगितलेंच आहे. बंधुप्रीतीबद्दल पंतांचे विचारही फार शुद्ध होते:—

**यश सुख पुण्य मिळे, मग बंधूंनीं कां न नीट नांदावें? ॥**

( आदि० ३६ )

**आत्मा जसा तसाचि भ्राता येथें न भेद कांहींच ।**
**वेदस्मृतिशास्त्रमतें, स्वानुभवें ही विशेष नाहींच ॥**

( स्त्रीपर्व० ३ )

७ पंतांना मुलांबाळांविषयीं फार प्रेम होतें. त्यांनीं आपलीं व आपल्या भावांचीं मुलें लडिवाळपणानें खेळविलीं. या स्वानुभवास्तव वत्सलरस त्यांच्या कवितेंत फारच बहारीचा उतरला आहे. पंतांचीं सारीं स्तोत्रें वत्सलरसानें भरलेलीं आहेत. गंगास्तव, केकावली, हरिवंश, ( रामकृष्णांच्या बाललीला ) वगैरे अनेक काव्यांत पंतांनीं आपल्या हृदयांतला सारा कोमळपणा ओतलेला दिसतो. 'गृहरत्नानि बालका' ह्या ह्मणीप्रमाणें पंतांचें घर मुलांबाळांनीं नेहमीं गजबजलेलें असें. 'होतो तृप्त पिता जरि बाळानें एक भरविला घास' (हरिवंश.अ.४५) हा अनुभव पंतांना होताच! पंत कर्मनिष्ठ खरे, पण देवपूजेच्या प्रसंगींही मुलगा ओंवळ्यानें येऊन शिवला तर त्याला झिटकारण्याइतका कठोर कर्मठपणा त्यांचे ठायीं नव्हता! 'बहु लाडका भजकशिशु पाठीं लागोनि ओंवळा शिवतो'. [कृष्णविजय अ.८८] बाळाच्या अव्यक्तवर्णोच्चारांनीं मोठमोठ्या कवींना व तत्ववेत्त्यांनाही भुरळ पाडली आहे, मग पंतांसारखा प्रकृतिप्रेमळ कवि तेथें दंग होईल यांत नवल काय! कोमळ फूल व निर्मळ मूल यांच्या केवळ दर्शनानें ज्याचें हृदय उदात्त व प्रसन्न होत नाहीं असा प्राणी जगतावर सांपडेल काय!

---

१ कालिदास, भवभूति, शेक्सपीयर, वर्डस्वर्थ वगैरे कवींनीं लहान मुलांवर किती सुंदर कविता केल्या आहेत? मोठमोठ्या राजांच्या दाढ्या धरणारे सार्वभौम राजे ज्या लहान मुलांपुढें वांकतात, त्यांना इमर्सननें 'A little despot असें यथार्थ विशेषण दिलें आहे!

बालमुखींचीं जरि अव्यक्तें अक्षररूपें सार्थी।
केवळ अमृतचि होतीं वत्सल गुरुजनकर्णीं आर्यी ॥

( ध्रुवचरीत्र ६१ )

जनीं तरि असें असे शिशुहि जें मुखें वर्णवी !।
पिता पिउनि ते भुले मधुरता मुखें वर्णवी ॥

( केका २६ )

इत्यादि शेंकडों रसभरित चरण पंतांच्या काव्यार्णवांतून काढतां येतील. कवीला वाटेल तो विषय वर्णितां येतो खरा, पण जेथें कवीचें हृदय रंगतें तेथचा रस कांहीं अनिर्वाच्य वठतो ! रामाच्या बाललीला वर्णितांना ( छंदोरामायण ) कवीनें खालील अत्यंत मधुर श्लोक झोंकून दिले आहेत:—

पीतां स्तनांतें क्षणमात्र राहणें
महादरें मातृमुखासि पाहणें ।
वक्त्रांत तें दुग्ध तसेंचि वाहणें
तेणेंचि फूत्कार करूनि नाहणें ॥ १ ॥

मुखांतुनी दुग्ध गळे सुनिर्मळ
उरावरी ये अतिशुभ्र वोगळ ।
मंदाकिनीचा गगनीं प्रवाह तो
चंद्रप्रभापांडुर काय वाहतो ! ॥ २ ॥

बैसोनि हर्षे जननीचिया कडे
विलोकुनी तन्मुखनीरजाकडे ।
स्मितामृतापूरित बोल बोबडे
बोले तदा ब्रह्मसुख स्वयें दडे ! ॥ ३ ॥

ज्याला मुलांच्या सहजलीलांचें कौतुक करितां येत नाहीं, त्याच्या तोंडांतून असे कोमळ उद्गार निघणारच नाहींत. लाडक्या मुलांच्या विरहानें पितरांस जें महद्दुःख होतें त्याचें हृदयद्रावक वर्णन पाहिजे असल्यास अर्जुनानें अभिमन्यूसाठीं शोक केला तो प्रसंग, व अनेक प्रकारच्या विरहदुःखाचें अंतःकरण पिळून टाकणारें वर्णन पाहिजे असल्यास स्त्रीपर्वांतला गांधारीचा शोक हे भाग वाचकांनीं अवश्य वाचावेत. पंतांनीं बालविधवेबद्दल आपली अनुकंपा ‘ शिव! शिव! ह्मणेल मरणावधि वैधव्याधिमग्न बाला हो!’ ( द्रोण. अ. ७ ) या व ‘ चिरलें काळिज कानीं कन्येचें करुणवच जसें शिरतें’ ( स्त्रीपर्व. अ. ९ ) या चरणांत किती स्पष्टपणानें प्रकट केली आहे ! संयोगवियोगप्रसंगां-

चें तुर्ते वर्णन करितांना ज्याची लेखणी इतकी द्रवते त्याचें प्रत्यक्ष अनुभव प्रसंगीं चित्त किती द्रवत असेल! पंतांचें चित्त फार आर्द्र व फार प्रेमळ होतें.

८ पंतांच्या मुली, सुना, पुतण्या, झोंपाळ्यावर बसून गाणीं ह्मणत, उखाणें-पाखाणें घालून एकमेकींना रिझवीत, बिट्ट्या, सागरगोटे वगैरे बैठे खेळ खेळत, भातुकली घरकुलींचे खेळ खेळत, छप्पापाणी, हमामा, फुगड्या वगैरे शारीरिकश्रमांचे खेळ खेळत. व पंतांना हे सारे प्रकार आवडत इतकेंच नाहीं तर पंतांचें यांना चांगलें उत्तेजन असे. घरांतल्या व शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या मुलीबाळीं कांहीं जुनीं व कांहीं पंतांनीं अभंगवृत्तांत मुद्दाम रचून दिलेलीं नवीं गाणीं झोंपाळ्यावर बसून मोठ्या हौसेनें व ईर्ष्येनें ह्मणतांना पाहून पंतांसारख्या प्रेमळ पित्यास मोठा आनंद होत असे हें साहजीक आहे! मुलींना माहेर आवडतें, त्या माहेरीं मोकळ्या मनानें खेळतात, त्यांना दागिन्यांची स्वाभाविक प्रीति असते, वगैरेबद्दल पंतांनीं फार कोमळ उद्गार काढले आहेत:–

धीला सद्‍गुण हे, जैसे मुलीला नग मोहिती ॥
(पुंडरीकप्रार्थना. ३७)

क्रीडावें मुक्तींनीं माहेरीं जेंवि लाडक्या मुलिंनीं ॥
(गंगास्तुति. ३९)

प्रेमें नवीं नवीं तीं माझ्या रसनेसि सुकविकुलगीतें ।
गीतें यावीं, येतीं माहेरिं जेंवि बहुत मुलगीतें ॥
(सन्मोरथराजि २२)

पंतांना युवतिजनांचीं ह्रद्गतें किती यथार्थ कळलीं होतीं हें पुढील चरणांवरून समजेल:—

जनककुळाहुनि पतिकुळ अधिक असावें असा वधूकाम ॥
(हरिवंश. ३९)

प्रिय हरिजन हो, आला जैसा माहेरचा बहायाला. ।
स्त्रीजन जसा विवाहा, जावें त्यां सज्जना पहायाला. ॥ २९ ॥
परि संकोच असावा आंत बहुत कृष्णकीर्तनीं काम ।
गुरुजनसमक्ष पतिचें घेतां आर्याग्रहें जसें नाम ! ॥ ५६ ॥
संसारदुःख विसरवि सत्पद्धति, मतिस जेंवि काय घडी ।
वरमायेसि विवाहीं विसरवि चवरी गुलाल पायघडी ॥ ३६ ॥
—सन्मनोरथराजि.

मुग्‍ पतिस पहाया, तसि माझी दृष्टि तपळली, लाजे ॥ ६३ ॥
—अनुशासन, अ. ३

स्त्रियांचे सामान्य आनंदाचे प्रसंगही पंत किती तरी उल्हासानें वर्णिता-त! श्रीमंत सासर मिळावेंसें वाटणें, माहेरचा गडी न्यायला आला कीं त्याला हर्षा-नें पाहायला धांवणें; लग्नाच्या मिरवणुकीला वस्त्रालंकारांनीं भूषित होऊन जाणें; तोंडापर्यंत दहादां आलें तरी पोक्त स्त्रीसमाजांत पतीचें नांव घ्यावया-ला लाजणें; पुत्राच्या लग्नांत वरमायेनें पायघडीवरून चालत जाण्याचा हक्क बजावणें—इत्यादि गोष्टी क्षुल्लक खऱ्या, पण हे प्रसंग स्त्रियांच्या जीवितांत अत्यंत भाग्याचे आणि परमानंदाचे आहेत. सामान्य स्त्रीपुरुषांच्या नित्य व्य-वहारांतल्या सुखाच्या लहान सहान गोष्टींची अवहेलना व धिक्कार पुस्तकी पंडित करोत, पण अज्ञ जनांच्या आनंदाबरोबर आपण वाहवत जाणें व आपलें सारें मोठेपण विसरून क्षणैक तदाकार होणें हेंच खऱ्या थोर ज्ञा-त्याचें [1]लक्षण आहे. आपल्या इकडे कन्या चिंता देणारी कात्री आहे असें समजतात. ' दारिका हृदयदारिका पितुः. ' पंत ह्मणतातः—

**आत्मा पुत्र, सखा स्त्री, कन्या चिंताचि सर्व काळ, जिला ।**
**प्रसवोनि वाहति मनीं श्रीमंतहि पितर सर्व काळजिला ॥**

( आदि. ३० )

जांवयास पाहतांच सासूला जें प्रेमाचें भरतें येतें तें केवळ सासूपणाचा मान ज्यांच्या वांट्याला आलेला असेल त्यांनाच ठाऊक ! पंत ह्मणतातः—

**बहुत करुनि तों एका कन्येच्या या जगांत ज्या माता ।**
**त्यांसि गमे स्वतनुपरिस अधिक सुतासूनुपरिस ज्यामाता ॥**

( स्त्रीपर्व ९ )

**यद्यपि चिंताकारण दे कन्या, त्यांसि एक ज्यामाता ।**
**कन्यांच्या संसारीं त्यां होय सुधाभिषेक ज्या माता ॥**

( मंत्र भागवत. १० )

---

१ इंग्रजी रसिक कवि गोल्डस्मिथ हा आपल्या 'प्रवाशी' या काव्यांत ह्मणतोः—

Say should the philosophic mind disdain
That good which makes each humber bosom vain ?
Let School-taught pride dissemble all it can,
These little things are great to little man!
And wiser he whose sympathetie mind
Exults in all the good of all manktind.

सासूला जांवई आपल्या शरीरापेक्षांच काय पण आपल्या मुलीपेक्षां व मुलापेक्षांही अधिक प्रिय वाटतो, व त्याला पाहतांच तिला अमृताभिषेक झाल्यासारखा परमानंद होतो!! मुलांबाळांच्या मोठ्या परिवारांत कज्जे नेहमीं फैसलुयासाठीं न्यायाधिशाकडे येतात, तेव्हां वडिलांनीं कोणत्या कलमाप्रमाणें न्याय द्यावा? पंत ह्मणतातः—'रीति दहांचीं हे कीं पहिलें समजाविती लहानातें.' (उद्योग० १) आपल्या घरचीं व शेजारचीं मुलें भांडलीं कीं कुटुंबवत्सलानें कसें वागावें? पंत सांगतातः—

**अज्ञ मुलें कलह करिति, न वदावें तेंचि बोलती स्वैर।**
**तें चित्तांत धरुनियां प्राज्ञें पुरुषें धरूं नये वैर॥**

(आदि. १०)

९ अस्तु. मुलांमुलींनीं पंतांचें घर गजबजलेलें असे, व या गोड राहणीमुळें पंतांचें घर आनंदमय असे. पंतांचें मुलांवरचें प्रेम आंधळें मात्र नव्हतें. मुलांना धाकदरारा दाखवून विद्यार्जनाच्या मार्गाला लावून त्यांचीं मनें सुसंस्कृत करण्यास त्यांनीं कसूर केली नाहीं. रामकृष्णास त्यांनीं पंढरीस त्याच्या सासऱ्याकडे ह्म० बाबापाध्यांकडे शिकण्यास ठेवलें होतें. प्रख्यात कवि रामजोशी व रामकृष्णपंत हे एकाच काळीं बाबांजवळ शिकत असत. पंढरीस पंतांच्या दोन्ही मुलांच्या हातच्या कांहीं पोथ्या व कागदपत्र आहेत, त्यांवरून पंतांनीं त्यांच्या शिक्षणाची चांगली खबरदारी घेतली होती असें दिसतें. रामकृष्ण पंडितांनीं धर्मशास्त्र व वेदांत यांचा उत्कृष्ट अभ्यास केला होता. रामकृष्ण पंडित पुढें पुढें फारच नांवालौकिकास चढले. कांहीं त्या वेळच्या धर्मशास्त्राच्या निकालपत्रांवर प्रमुखत्वेंकरून त्यांची सही आहे. शके १७१० सालीं पंत काशीयात्रेस गेले; मागें रामकृष्णपंडितांनीं १००बिघे जमीन संपादन केली, "वेदशास्त्रसंपन्न रा० रामकृष्णपंडित, मोरोपंत यांचे चिरंजीव, बारामतकर" यांस जगतापराव निंबाळकर यांनीं "चिंचोली येथें ३० बिघे जमीन थोर सत्पात्र पाहून योगक्षेमाकरितां वंशपरंपरेनें इनाम करून दिली. दोनच महिन्यानंतर नरसिंगराव सुबराव जाहगिरदार

---

१ वरील आर्या मीं विनोदानें ४ वेळां ४ पोक्त साधू झालेल्या स्त्रियांजवळ त्यांचा अभिप्राय जाणण्यासाठीं ह्मटल्या, तों त्या चारही तोंडांतून हास्यासह मला एकच अभिप्राय मिळाला! तो हा—'काय बाई! आह्मांला काय वाटतें तें पंतांना कोणीं इतकें जाऊन सांगितलें!'

यांनीं वडवड येथें ६० बिघे जमीन दिली. या दोन्ही जमिनींचा उपभोग रामकृष्णपंडितांनीं ४२ वर्षे घेतला. रामकृष्णपंडितांस त्यांचे चुलतसासरे विठ्ठलपाध्ये यांनीं पंढरपुरीं राहण्यास वाडा दिला व चंदुलालाकडून ७०० रुपये उत्पन्नाचे गांव देवविले. या गोष्टी पाध्ये प्रकरणांत सांगितल्या आहेत. रामकृष्णपंडित जातीनें मोठे विद्वान् होते व:—

श्रीमन्मयूरकविची देते संतोष मानवां कविता।
असता जरि भूमिवरी सुरगुरु तरि तोहि मान वांकविता॥ १॥

या त्यांच्या आर्येवरून त्यांची आपल्या जगविख्यात पित्याच्या काव्यांवर केवढी निष्ठा होती तें उघड दिसतें. पंतांचा पुतण्या बाळाजीपंत आप्पा यास मात्र पंतांच्या सहवासापासून काव्यरचनासामर्थ्य थोडेसें प्राप्त झालेलें दिसतें. मोरोपंतांची ह्मणून जी भगवद्गीतेवर समश्लोकी टीका प्रसिद्ध आहे तिची पहिली षडध्यायी मात्र पंतांची होती व पुढचे बाराही अध्याय बाळाजीपंतानें संपविले असें ह्मणतात. 'एकनाथस्तव' दोन प्रसिद्ध आहेत. पैकीं दुसरा नीरस असून पंतांचा खास नाहीं असें कै. वामनरावजी ओकांचें मत होतें, तें बरोबर आहे. तो स्तव बाळाजीपंतानें रचिला आहे. त्याची भाषाशैली बहुत अशुद्ध व नीरस आहे, तथापि 'श्रीएकनाथसदनीं माधवजी सर्व काम हें करितो!' ही जगप्रसिद्ध आर्या याच प्रकरणांतली आहे, हें ध्यानांत धरिलें पाहिजे! बाळाजीपंतानें 'गजगौरीव्रतार्या' नामक एक ४० आर्यांचें प्रकरण रचिलेलें पंढरीस आहे त्याचे अखेरीस पुढील आर्या आहे:-

बाळ असोनि उडावें थोरासम हौस मानितांचि अशी।
न फशीं पडेल कैसा? कैसा उतरे अशक्त शक्तकसीं?॥ ४१॥

रामकृष्णपंडित व बाळाजीपंत या दोघांनाही विद्याभिरुची उत्तम प्रकारची लागली होती, हें पंतांच्याच शिक्षणाचें व सत्सहवासाचें फल होय! रामकृष्णपंतानें विठ्ठल पाध्ये यांस एका पत्रांत खालील आर्या लिहिली आहे.

---

१ ता. १७ एप्रिल १८३० रोजीं इंग्रज सरकारानें या जमिनीबद्दल कागदपत्र सनदा हजर करण्यास सांगितलें असतां रामकृष्ण पंडितांनीं जबाब दिला. "मीरखान मशामतखान यांचें लष्कर आलें तेव्हां बहुत दंगा झाला, ते वेळीं कागदपत्र अस्ताव्यस्त झालें. सबब दाखला राहिला नाहीं, परंतु इनामाची वहिवाट चालत आहे." अ-

**सज्जामाता सत्पुत्रहि ( सत्सुत ? ) असतां दैवें दिला बरा झोला।**
**बोला प्रभुसि गुरूजी पावो हा कीं अलभ्य ही मोला ॥ २ ॥**

या आर्येतील ‘ सज्जामाता ’ व ‘ सत्पुत्र ’ या शब्दांतल्या सत् पदावरून बाबापाध्ये व मोरोपंत यांविषयीं रामकृष्णाची किती पूज्यबुद्धि होती हें दिसतें. पंतांचा तिसरा पुत्र काशीनाथ हा अल्पवयी वारला, पंत काशीयात्रेतून परत येतांना हा वाटेंत वारला असें दिसतें. ‘जो सज्जनरंजन सुत दादा मार्गांत पावला मरण ’ ( गंगावकिली ) ,‘ यात्रा असे कपाळीं हें केलें स्ववच सत्य दादानें’ (विष्णुपदवकिली) या आर्यांधींतला ‘दादा’ तोच काशिनाथ दिसतो. ‘सज्जनरंजन’ हें विशेषण पंतांनीं त्यास लडिवाळपणानें लावलें आहे. पंतांच्या शिक्षणांत तयार होत असलेला होतकरू मुलगा भल्यांना आनंद देणाऱ्या शीलाचाच निघावा यांत कांहीं आश्चर्य नाहीं. ‘ सत्पुत्रांनीं भुवनीं, सुरतरुंनीं न सुख नंदनवनीं तें ’ ( उद्योग.८ ) हा बहुधा पंतांचा अनुभवच होता. सुपुत्र व कुपुत्र यांचीं लक्षणें पंतांनीं जागोजाग सांगितलीं आहेत:—

**बापा ! प्रजा अशी जी पितरांसि भवार्णवांत सुतरी ती ॥**
( आदि. ११ )

**सन्मस्तक डोलेसें पितृहित न करील पुत्र तो अरिसा ॥**
( द्रोण ० १९ )

**जोडुनि अयश न व्हावें पितृहृदयीं अग्निकुंड लेकानें ॥**
( वन० १४ )

**तो काय जन, जयाच्या धन्यत्वें हर्षली प्रसू नाहीं? ॥**
( अनुशासन० ५ )

**जी व्यर्थ उभयलोकानुपयुक्त अपत्य वाढवी, ती तें।**
**स्पष्ट करि वात्सल्य, ज्ञाते जन ह्मणति गाढवी तीतें ॥**
( उद्योग ० १० )

**अयशस्कर तोक पळहि मळवाया धाम बा न रांगावें।**
**जरि न गमेचि तरि सुखें चित्ररचित रामवानरां गावें. ॥**
( उद्योग ० १० )

या सर्व उताऱ्यांत पंत स्पष्ट ह्मणतात कीं ‘ सुपुत्र हा पितरांस भवार्णवांतली नौकाच आहे, इहपर लोक साधून देणारा तोच सुपुत्र, यश वाढवि-

णारा मुलगा नसेल तर निसंतान बरें!' कुसंतानापेक्षा निसंतान पुरवलें, असा पंतांचा भावार्थ आहे. पुत्राला उत्तम शिक्षणानें उत्तम शील देणें हें बापाचें कर्तव्य आहे. पंत ह्मणतातः—

**द्यावें वचनकराला प्रेमें सर्वस्व—वतन, यश—तातें ।**

( हरिवंश० २९ )

**द्यावें शीलचि, द्यावें केवळ व्हाया न घात वसु तातें ।**

( उद्योग० ५ )

**अहित कथील तरि कसा गुरु? बाप कसा? तशीच आइ कशी ?**

( उद्योग० ९ )

या तीन सुंदर चरणांत किती तरी अर्थ भरला आहे! बापानें मुलाला सर्वस्व द्यायचें आहे. सर्वस्व ह्मणजे वतन व यश. केवळ वतनच द्यायचें नव्हे तर यशही द्यायचें! ह्मणजे स्वतः बाप 'यशस्वत्–सत्कीर्तिवान्' पाहिजे. वतन आणि कीर्ति बापानें संपादून ती वृद्धिंगत होण्यासाटीं पुत्राच्या स्वाधीन करावी. मुलाला लौकर चतुर्भुज करून कांहीं संपत्ति देणें एवढेंच आपलें कर्तव्य समजणारे बाप आमच्या समाजांत पुष्कळ आहेत; पण पंत स्पष्ट सांगतात कीं पित्यानें पुत्राला 'शीलचि द्यावें.' शील न देतां पुष्कळ संपत्ति दिली तर पुत्र दुर्व्यसनांत ती खर्चून आपला घात करून घेईल. ह्मणून संपत्तिपेक्षां अधीक महत्वाची जी वस्तु बापानें मुलाला द्यायची ती शील ही होय. सुशिक्षणाच्या सुसंस्कारांनीं मुलाचें मन विकासित करणें; त्याला कर्तव्यतत्पर, सदाचारी, व ईश्वरनिष्ठ करणें; व त्याला सर्वतोपरी सुमनुष्य करणें ह्मणजे त्याला शील देणें होय. तसेंच आईबापांनीं त्याला ऐहिक व परमार्थिक हिताचा मार्ग दाखवून देणें हें त्यांचें कर्तव्य होय. या-

---

१ इंग्रजी character शब्दांतला सर्व अर्थ 'शील' ह्या एका शब्दांत भरला आहे.

मज भणगाला वरदा! वर जरि करुणा करूनि देशील ।
तरि मानवती सज्जन मनें जयाला असेंचि दे **शील** ॥

( आर्याकेकावली. ८९ )

शीला जपो, बहु जपति जैसें अध्यात्म्य साधु ते लिंगा ।

( सन्मनोरथराजि. )

ते दोन चरणांवरून पंत **शीलाचें** महत्व किती मानीत तें उघड दिसतें.

प्रमाणें बापाचें कर्तव्य पंतांनीं फारच सुरेख तऱ्हेनें सांगितलें आहे. मुलाला 'शील' देणें, इहपरलोकप्राप्ति करून देणारा हिताचा मार्ग दाखविणें, व प्रेमानें त्याला आपलें सर्वस्व ह्मणजे 'वतन व यश' देणें हें बापाचें मुख्य कर्तव्य आहे. बाप रागावला तरी मुलाच्या हितासाठींच रागावतो, गुरुजनांचा कोपही कल्याणकर असतो, ही गोष्ट पंतांनीं किती सुंदर रीतीनें सांगितली आहे!:—

**कीं गुरुजन तापदही श्रेयस्कर सर्वथा अनल साच! ॥**

( आश्रम १–६ )

**मातेचा अस्नेहहि होय यशोहेतु साधु रामाला ॥**

( वन ३ – ७५ )

**सकोप दिसती गुरु, क्षणभरींच जें तापलें**
**जल–ज्वलनसंगमें–त्याजि न शैत्य तें आपलें! ॥**

( केकावली ८८ )

१० पंतांनीं आपल्या मुलींना व सुनांनाही उत्तम प्रकारचें शिक्षण दिलें होतें. विठोबादादांस पंतांनीं लिहिलेल्या एका पत्रांत 'रामायण अभंग व रुक्मिणीस्वयंवर अभंग पाठविले आहेत. लिहून घेऊन लौकर पाठवावेत. चिरंजीव सौभाग्यवती मुलींस वाचावयास पाहिजेत.' असा मजकूर आहे. यावरून पंतांच्या मुलींना व सुनांना लिहितां वाचतां येत होतें, व त्या पंतांचीं काव्यें वाचीत असत हें स्पष्ट दिसतें! त्यांची नातसून, मोरभाऊची स्त्री सरस्वतीबाई, ही रघुकिरातादि काव्यें पढली होती, मोठ्या पंडितांना अडलेल्या आर्या ती हां हां ह्मणतां उकलून दावी, शेंकडों आर्या तिला पाठ येत, व तिजपासून तिचीं मुलें व पुतणे पंतांच्या आर्या लावावयास शिकले!! यावरून स्त्रीशिक्षणाविषयीं पंताच्या काय कल्पना असाव्यात याचें अनुमान होतें. स्त्रियांना

---

1 स्त्री शिक्षणाविषयीं अलीकडे पन्नास वर्षांत आमच्या पंडितमंडळांत निष्कारण रण माजलें आहे. प्राचीन कालापासून आमचेकडे स्त्रियांना योग्यशिक्षण मिळत आहे. सावित्रीव्रतासारखीं व्रतें उद्यापनें करितांना स्त्रियांचीं मंडळें भरून पुण्यस्त्रियांचीं चरित्रें जेव्हां स्त्रिया सुरावर गातात, किंवा पांहटेस भूपाळ्या, आरत्या, पदें, अभंग, पाळणें, धांवे ह्मणतात, तेव्हां कोणी बारकाईनें पाहिल्यास त्यास आढळून येईल कीं पाटीपेन्सिलीवर लिहितां न येणाऱ्या स्त्रियांचें सुद्धां पांठातर फार असतें, व त्याचा त्यांच्या वर्तनावर फार

आवश्यक असें गृहशिक्षण मिळाल्यावर नीतिशिक्षण व धर्मशिक्षण द्यावयाला कोणताही सुज्ञ पुरुष हरकत आणीलसें मला वाटत नाहीं. कुलीन स्त्रियांचीं कर्तव्यें पंतांनीं यथार्थ वर्णिलीं आहेत:—

**कीं कुलवतीस गुरुजनभजन न घडतां वृथा जिणें वाटे ।**

( आश्रम ३–३ )

**सासू करी उपेक्षा त्यागीना स्वविनयासि परि सून ॥**

( अश्वमेध० १–१८ )

**पतिच्या छंदें केलें व्रत तप जें काय सर्व तें फळतें ॥**

( हरिवंश २६–६९ )

**साध्वीला जें कांहीं कांतप्रिय तेंचि कार्य होय जनीं ॥**
**वरपुरुषसंग बाई! ब्रह्मानंद स्त्रियांसि जाणावा! ॥**

( हरिवंश ३६–९७ )

**पतिच्या संगावांचुनि सर्व स्त्रीच्या वृथा कळाकुसरी ॥**

( हरिवंश ३९–६१ )

---

चांगला परिणाम होतो. जनाबाई, मुक्ताबाई, आका, वेणु,इत्यादि स्त्रियांचीं मराठी काव्यें पाहावात, म्हणजे पुरुषांच्या बरोबरीनें अध्यात्मज्ञान मिळालेल्या स्त्रिया आमच्याकडे होऊन गेल्या आहेतहें कोणासही समजेल.पुरुषांनीही स्त्रियांना योग्य शिक्षणद्यायला कसूर केली असें दिसत नाहीं.वामनपंडितांनीं आपल्या गिराबाईला उपदेश करण्यासाठीं 'प्रियसुधा ग्रंथ'केला, व पंतांचे समकालीन कवि निरंजनमाधव यांनीं आपल्या पत्नीसाठीं सहा ग्रंथ करून तिला आपल्या योग्यतेला आणली; अशा गोष्टी डोळ्यांपुढें ढळढळीत दिसत असतां वृथावाद कांहींजण माजावितात हें आश्चर्य नव्हे काय ? पंतांचेंही स्त्रीशिक्षणाविषयीं व स्त्रीवर्गाविषयीं फार उदार विचार होते. त्यांनीं आपल्या यजमानाच्या मुलींसाठीं सीता सावित्री व रुक्मिणी यांवर अभंगवृत्तांत तीन सुंदर गीतें रचिलीं(वर मुलींना जे वाचावयास पाहिजेत म्हणून पत्रांत उल्लेख आहे ते अभंग म्हणजे हींच गीतें होत ); मदालसा सारख्या प्राचीन व जनाबाई,मुक्ताबाई,व अहल्याबाई या सारख्या अर्वाचीन सतींचीं स्तोत्रें गाइलीं; भारतादि ग्रंथांत द्रौपद्यादि सतींविषयीं बोलतांना हमेष आदरपूर्वक उद्गार काढले; 'पतिव्रताकीर्तनांत' सुमारें पन्नास सतींना स्वोद्धाराविषयीं विनविलें; यावरून स्त्रीजातीविषयीं त्यांची किती सन्मानबुद्धि होती हें स्पष्ट दिसतें. आर्यास्त्रियांचे विनयादि गुण रक्षून व बभ्रा केल्यावांचून पंतांसारखे सद्गृस्थ स्त्रीवर्गास कसें शिक्षण देत हें

'कुलीन स्त्रीला सासूसासऱ्यांची सेवा झाली नाहीं तर जिणें व्यर्थ वाटतें; सासूनें कितीही वाईटतऱ्हेनें वागविलें तरी सून मर्यादातिक्रम करीत नाहीं; साध्वीला कांतप्रिय तेंच प्रिय असतें, ती व्रतानुष्ठानेंही पतीच्या छंदानें करिते;' अशा प्रकारचीं श्रेष्ठ तत्वें पंतांच्या काव्यांत सर्वत्र विखुरलेलीं सांपडतात. त्यांचीं काव्यें वाचणाऱ्या त्यांच्या सुनामुलींनाहीं हाच उपदेश पंतांच्या तोंडून ऐकायला मिळाला असेल. 'मतासि जशा श्वशुराच्या कुलवती सुना टपती' ( विश्वेश्वरस्तुति ८७ ) अशा सुना पंतांच्या घरींच नांदत होत्या.

---

१ पंतांनीं आपल्या सुनांस व मुलींस सारखें वागविलें होतें. पंतांचें सीतारामायण उत्तमांपैकीं एक आहे, त्यांत ' सीताप्रभृति स्वसा-जावा,' भेटल्यावर जो रामचरित्राविषयीं संवाद झाला, तो वर्णिला आहे. यांत सीतेनेंच रामचरित्र कथन केलें आहे, यांत जावाजावांनीं सख्या बहिणीप्रमाणें कसें वागावें हें दर्शविलें आहे. पंतांच्या सुना लक्ष्मीबाई व आऊताई व मुली साळुबाई, सईबाई वगैरे यांच्या शिक्षणार्थ पंतांनीं हें रामायण रचिलें असावें. सीता अत्र्याश्रमाचें वर्णन करितांना अनुसूयेविषयीं ' तद्भार्या अनुसूया मजवरि करि सासुमायसी माया ' असें ह्मणते. ' अनुसूया मजवर सासूसारखें व आईसारखें प्रेम करिते ' असा सीतेचा भावार्थ. सीतेसारख्या कुलीन स्नुषेनें माया करणाऱ्यांत ' आईच्या आधीं सासूचें नांव ' घ्यावें हें जसें साहजीक आहे, तसें कुलीन मलाना सुशिक्षण देणाऱ्या पंतांसारख्या कुलवंतानें असें यथार्थ वर्णावें हेंही स्वाभाविक आहे ! सीताशुद्धीनंतर दशरथमामाजींनीं आपलें कसें गौरव केलें हें सांगतांना सीता ह्मणते:—

संसारीं असतात साधु कुलज स्नेहाढ्य कैं सासरे,
मामाजी परि एक! यासह दुजा साम्यास कैसा सरे? ।
पोटासीं धरिलें, सये! मज शिरीं हुंगोनियां दाटले,
प्रेमें तातचि वाटले, नयनिंचे नाहीं झरे आटले! ॥ १५० ॥
मातें ते वदले ' तुवां उपवनें तैशींच वत्से! वनें
केलीं, जें पतिभक्तिसद्व्रत—सतीसर्वस्व—तत्सेवनें! ।
भर्ता तारुनी संकटीं कविसभा श्रीसंपदे वारिला.
विश्वोपद्रव जाहला तव तपें या कंप देवारिला ॥ १५२ ॥
त्वां सूर्यवंश सुयशें सति ! धन्य केला ।
वैदेह धन्य तुज पावुनि कन्यकेला ॥
प्रेमें असा मज दिला बहुमान, लज्जा ।
सांगे मदीय नयनांसि ' पदींच मज्जा ' ॥ १५३ ॥

पंतमामाजी आपल्या सुनांस असें थोरपणानें वागवीत असतील खास !

११ पंताच्या वडील मुलास–राघोपंतनानास–आबाजीपंतांनीं पंतांच्या वर्षश्राद्धापूर्वी एक पत्र लिहिलें आहे. त्यांत पराडकरांच्या घरांतल्या कोणा मुलाच्या लग्नाची वाटाघाट चाललेली दिसते. या पत्रांत आबाजीपंत लिहितात:– "यानंतर शरीरसंबंधाचा विचार तुमचे पत्रावरून व सातान्याचे पत्रावरून कळलें, अवकाश थोडका, जाणें दूर, हें कसें घडतें! संधान तोडूं नये. त्यांजकडून देणें घेणें याचा विचार किमपि बोलों नये. हुंडा घेणें अशास्त्र, वडिलांची आज्ञा नाहीं. याकरितां तो प्रकार न बोलणें. वैशाखमासीं लग्न योजावें हेंच करारांत असावें." या उताऱ्यावरून मोरोपंतांना आबाजीपंत किती पूज्य मानीत व त्यांच्या पश्चातही त्यांनीं घालून दिलेल्या मार्गाचा अवलंब कसा सश्रद्ध करीत हें स्पष्ट दिसतें. तसेंच पंतांना 'हुंडा घेणें अशास्त्र वाटत' असल्यामुळें त्यांनीं एवढीं लग्नकार्यें केलीं तरी हुंड्याचें नांवही काढलें नव्हतें असें मानण्यास हा सबळ पुरावा आहे. मुलाच्या किंवा मुलीच्या लग्नांत हुंडा घेणें ह्मणजे जनावराच्या खरेदीसारखें होत असून अगदीं नीचपणाचें काम आहे. आपल्या इकडे मुली विकणारे कसाई पूर्वीपासून कमी नव्हते, हें 'कन्येचा जे नर करीती विकरा। ते जाती अघोरा नरकपाता' या तुकोबाच्या किंवा:–

---

१ हुंड्याच्या बाबतींत पंतांचें उदाहरण नव्या जुन्या चालीच्या स्त्रीपुरुषांनीं घेण्यासारखें आहे. गेल्या दहा वीस वर्षांत महाराष्ट्रांतल्या पांढरपेशा जातींत हुंड्याचें केवढें बंड माजलें आहे, हुंड्याच्या विलक्षण मागण्यामुळें मुली होणें आईबापांना केवढें प्राणसंकट वाटूं लागलें आहे, तसाच मुलगा लग्नाचा झाला कीं हुंडा मागण्याचें केवढें अवसान वराच्या आईबापांस चढतें हें बहुधा सर्वांच्या प्रत्ययास आलें असेल! पुण्यासारख्या ठिकाणीं वारानें जेवणाऱ्या मुलाची आई जवळ कपर्दिक नसतांही आठ आठशें रुपये हुंडा किती हक्कानें मागते! परभू जातींत तर हुंड्याच्या बेसुमार मागण्यामुळें २५।३० वर्षांपर्यंत अविवाहित राहिलेल्या मुली मीं पाहिल्या आहेत! अशिक्षित लोकांत कांहीं लोभी बाप शेंकड्यावर मुलीचीं वर्षें मोजून जन्माचें दारिद्र्य घालविण्याची हांवही बांधतात! समाजसुधारणेचें कंकण बांधणारे वीरही प्रसंगीं हुंड्यासाठीं व क्षुल्लक मानपानासाठीं जिगजिग घालतात व एक दोन शेंकड्यांसाठीं लग्नें मोडतात. एकदां रावसाहेब **गणेशपंत** यांच्या मुलाचें निघालें लग्न. गणेशपंत पहले पदवीधर विद्वान् व पैसेवाले! तेव्हां १८००रुपये हुंडा देऊन **गोपाळपंतांनीं** आपली मुलगी त्यांच्या मुलास दिली. मुलगी चांगल्या ठिकाणीं पडते ह्मणून गोपाळरावांनीं जिवाअगोचर खर्च केला! ऐनवेळीं मानपानासाठीं विहिणांत भांडणें झालीं. तीं तुटायला पुरुषांत आलीं. विद्वान् गणेशपंत संतापाच्या भरांत

**तद्बाणाहत ते अधःपतनभाक् झाले महासंगरीं**
**जो कन्याद्रविणें स्वजीवन करी तत्पूर्वजांचेपरी ।**

[ कुशलवाख्यान ७–३६ ]

या मोरोपंतांच्या प्रतोदावरून उघड दिसतें.

१२ याप्रमाणें पंतांच्या कुटुंबाची व त्यांच्या कुटुंबसंबंधीं विचारांची थोडक्यांत हकीकत दिली आहे. पंतांचा कुटुंबविस्तार फार होता. स्वतः मोरोपंत व त्यांची स्त्री रमाबाई, त्यांचे धाकटे भाऊ आबाजीपंत व भावजय सगुणाबाई, त्यांचा प्रथम पुत्र रघुनाथ व सून लक्ष्मीबाई, त्यांचा द्वितीय पुत्र रामकृष्ण व त्याची स्त्री आउताई, तिसरा पुत्र दादा, त्यांच्या साळु, सई वगैरे तीन विवाहित मुली, आबाजीपंताचे चार पुत्र बाळाजीपंत उर्फ आप्पा, दिनकर, सदाशिव व लक्ष्मण व चौघांच्या स्त्रिया, पंतांची बहीण आका,त्यांचा आप्त गंगाधर भट पराडकर, याशिवाय नातवंडें व जवळचे दूरचे कांहीं आप्त, इतक्या सर्व विस्तृत कुटुंबाचे चालक मोरोपंत होते! असें गोकुळासारखें गजबजलेलें त्यांचें घर होतें. मोरोपंतांसारखा प्रेमळ, सात्विक व साधुवृत्तीचा पुरुष कुटुंबाचा नेता असल्यावर त्या घरांत शांति व सौख्य नांदत

---

वरपित्याच्या अभिमानानें ह्मणाले ‘ हें पहा ! आमच्या मंडळीची समज तुह्मीं केलीच पाहिजे. नाहींतर येत्या वैशाखांत पोराचें दुसरें लग्न ठोकून देतों ! आह्मांला काय कमी आहे ? ’ गोपाळपंत त्रासले व देहभान विसरून ह्मणाले, ‘ माझी कार्टी मेली ह्मणून मी समजेन, पण आतां एक पै अधिक खर्चायला मजजवळ नाहीं.’तथापि मित्रांनीं सांगितल्यावरून पोरीकडे लक्ष देऊन गोपाळरावांनीं कर्जात ४०० रुपयांची आणखी भर घातली! पुढील सालीं गणेशपंताच्या मुलीचें निघालें लग्न ! त्याही दैवगतीनें गोपाळरावाचा स्नेहीच निघाला. लग्न ठरून हुंड्यापर्यंत मजल आली. गणेशपंतांनीं ४१५ शें रुपयेपर्यंत हुंडा देण्याचें कबूल केलें. तेव्हां तो गृहस्थ ह्मणाला, ‘ गणेशपंत!मला हुंडा अठराशें रुपये पाहिजे, यांत कमी पडणार नाहीं. शिवाय आमची मंडळी सांगेल ती करणी केली पाहिजे!गुदस्तां गोपाळरावाला नाडून तुह्मी जे पैसे घेतले ते सारे मी तुह्मांपासून उकळणार!! नाहींतर आह्मांला तुमच्या मुलीची गरज नाहीं ! ! ! ’ अशीं उदाहरणें सुशिक्षितांत थोडींथोडकीं नाहींत, हवीं तितकीं दाखवितां येतील! मोरोपंत-सद्गृहस्थांचा आदर्श कसे होते हें नव्याजुन्यांनीं शिकण्यासारखें आहे. वाचाळता केल्याशिवाय योग्य समाजसुधारणा करण्याच्या धडा त्यांनीं कृतीनें घालून दिला!

असतील यांत कांहीं आश्चर्य नाहीं. मुलामुलींच्या संबंधानेंही त्यांचें गणगोत पुष्कळ वाढलेलें होतें. आपले आप्तेष्ट, आपले स्वजन, यांचें प्रसंगीं साह्य करावें, त्यांचें रक्षण करावें, त्यांच्या दुःखांनीं चित्त कळवळावें, असें पंतांचें वारंवार सांगणें आहे. आपल्या धनाचा व विद्येचा उपयोग स्वजनव्यसन-निवारणार्थ जर आपण केला नाहीं तर त्या विद्येला व धनाला घेऊन काय करायचें आहे, असा त्यांचा फार उदारपणाचा व प्रेमळ विचार होता:—

**दुर्गत बंधु पहातां दुःख जसें इतरथा न मातें तें ॥**
( सभा० ७-३३ )

**धन काय? काय तेंही जें स्वजनव्यसन पळविना शास्त्र? ॥**
( भीष्म० ७-२७ )

**आनृण्य न जोडावें तरि आह्मीं अर्थ जोडिला काय ? ॥**
( भीष्म० १२-६० )

**स्वजनपरित्राणाहुनि अन्यव्रत मत नसेंचि आर्याला ॥**
( द्रोण० १३-२० )

या विचारांप्रमाणें स्वजनांविषयीं मोठा कळवळा व स्नेहभाव पंतांनीं आमरण वाहिला होता. आमच्या समाजांत अविभक्त कुटुंबपद्धती फार प्राचीन काळापासून चालत आली आहे. घरांतला वडील पुरुष—मग तो बाप, चुलता, किंवा भाऊ कोणीही असो, हा घरांतला खरा यजमान व इतर सर्व मनुष्यें त्याच्या तंत्राधीन. मोठे कर्ते भाऊ झाले तरी ते वडील भावाचा बापाप्रमाणें मान ठेवतात; मुलगा मोठा वयस्कर, विद्वान् व अधिकारसंपन्न झाला तरी घरांत वृद्ध बाप आहे तोंपर्यंत त्याला आपली सत्ता घरांत चालविण्याची इच्छा होत नाहीं. त्याला जेवायचें बाहेरचें आमंत्रण आलें तरी तो तें स्वतःन घेतां बापाकडे जायला सांगतो ! या अविभक्त कुटुंबपद्धतीमुळें घरांत एकतंत्रीपणा राहतो, बजबजपुरी माजत नाहीं, संघशक्तीचे सारे फायदे घराण्याला मिळतात, घराण्याची इभ्रत, दरारा व वजन बाहेरच्या लोकांवर पडतें, व घरांतल्या

---

१ **मद्बंधूचे माझे तारावे सर्व मामक ज्याही ॥**
( गंगावकिली ९६ )

**विष्णुपदा ! तारावे जांवाई सर्व मामक ज्याही ॥**
( विष्णुपदवकिली ७९ )

सर्व स्त्रीपुरुषांस शांतिसौख्याचा उपभोग घ्यावयास सांपडतो. घराण्यांत सर्व जीव एका प्रेमरज्जूनें बद्ध असले, व अशीं पुष्कळशीं घराणीं संघशक्तीमुळें सकस व प्रबळ अशीं राष्ट्रांत असलीं कीं राष्ट्राचेंही संघबळ वाढतें. पूर्वापार चालत आलेले सुसंस्कार व चालीरीती यांनीं ज्या घराण्याला दृढ धरिलें आहे, त्यापेक्षां अधिक सुखी असें दुसरें घराणें सांपडणार नाहीं. घरांतल्या पुरुषांतला एकोपा बिघडल्यास मात्र त्यांनीं आपापलीं बायकामुलें घेऊन विभक्त रहावें यांत सर्वांचें हित आहे. पटवर्धनघराण्याचें सामर्थ्य एकोप्यानें वाढलें' व पेशव्यांच्या घराण्याला गोपिकाबाई व आनंदीबाई या वाळवी लागल्यामुळें तें पोखरून गेलें! मोरोपंतांचे वडील बंधु सोनोपंत हे पट्टीचे वैदिक होते, पण थोडे एककल्ली व तामसी होते. यामुळें त्यांनीं आपला संसार निराळा थाटला हें बरें झालें. ते जन्मभर फाटून राहिले होते तरी पंतांनीं त्यांजविषयींचा व त्यांच्या मुलाबाळांविषयींचा प्रेमभाव कायम ठेवला होता. पंतांच्या मृत्यूनंतर दोन वर्षांनीं पंतांचे पुत्र, आबाजीपंत, व सोनोपंतांचे पुत्र बापू, हे विभक्त झाले. तेव्हांचीं विभक्तिपत्रें मला पंतगृहींच सांपडलीं. त्यांपैकीं एकांत आबाजीपंत ह्मणतात:-' कै. सोनोपंतबाबा व मोरोपंतबाबा व आह्मीं तिघे बंधु, त्यास तीर्थस्वरूप सोनोपंत बाबा यांणीं स्वतंत्र रोजगार करीत होते त्यांणीं आपला ऐवज चिजवस्त भांडीं वगैरे वेगळीं राखून राहिले. समाईक संसाराचे खर्चाकडे दिली नाहीं.' त्याच वाटणीच्या प्रसंगीं (शके १७१७ राक्षसनाम संवत्सरे माघ शु. १ भौमवार) बापूजी सोनदेव यांणीं 'तीर्थस्वरूप राघोपंतनानास' फारकतपत्र लिहून दिलें. त्यांत 'आपण लहान असतां आपलीं आईबापें निवर्तलीं. त्यांचे मागें तुमचे वडिलांनीं आपलें लग्न करून पालिग्रहण केलें...ती. कै. सोनोपंत बाबा स्वतंत्र रोजगार करून आपला ऐवज व चीजवस्त वेगळी राखून राहिले. एकवटपणाचे खर्चास कांहीं दिलें नाहीं. तुमचे वडिलांनीं व ती. आबांनीं संसार चालविला. आमचे तीर्थरूप यांचा वित्तविषय जो होता तो आह्मांस दिला. उभयतांच्या वांटणींत आमचा संबंध

१ चाळीस वर्षें पंतांच्या छत्राखालीं नांदलेल्या कुटुंबांत त्यांच्या मृत्यूनंतर दोन वर्षांत फळ्या झाल्या व एका घराचीं चार घरें झालीं! पतांचा वडील मुलगा व धाकटा मुलगा यांतही वांटण्या झाल्या. रामकृष्णपंत राघूनानास एका पत्रांत लिहितात 'मतबुद्धि तुह्मांस भाऊस्थानापन्न मानते. तुमची मती मजवर गोविंदवत् असावी ती नाहीं तरी हा विकल्प माझे चित्तांतून काढावा.' राघूनाना आपला पुत्र गोविंद यास घेऊन उज्जयिनीस राहण्यास गेले. आबाजीपंत ब्रह्मवर्ती गेले व रामकृष्णपंत कांहीं वर्षांनीं पंढरपुरास गेले.

नाहीं' असा मजकूर आहे. हे दोन्हीही उतारे महत्वाचे आहेत. यावरून मोरोपंतांनीं आपणापासून विभक्त राहिलेल्या वडील भावाच्या पश्चात् त्याच्या मुलाचें संगोपन करून त्याचें लग्न करून दिलें होतें, हें दिसतें. वरचें पंतांचें जड दडपण नाहींसें होतांच घरांतले कर्ते पुरुष आपापलीं बायकामाणसें घेऊन विभक्त झाले, तरी पंत जीवमान होते तोंपर्यंत त्यांच्या विषयीं सर्वांचाच आदरभाव असल्यामुळें सारें कुटुंब त्यांच्या आश्रयछत्राखालीं सुखानें नांदलें. पंतांचा थोडा दूरचा एक आप्त पंतांनीं जन्मभर जवळ बाळगिला होता. गंगाधर भट बीन अनंत भट पराडकर यांस पंतांनीं पुत्रवत् पाळलें. अनंत भट कऱ्हाडास रहात. गंगाधर भट 'श्रीक्षेत्र कऱ्हाडाहून' 'तीर्थस्वरूप मोरोभाऊस' एका पत्रांत लिहितात:-"दशकुमार व भीष्मपर्व मेणकापडांत बांधोन पाठविलीं आहेत. वे. सदाशिव पाध्यांच्या घरीं गडाहून भोजनकुतूहल आणला आहे. पाहिजे असल्यास पाठवूं" अनंत भट वारल्यावर गंगाधर भट पंतांस लिहितात:-"वडिलांच्या चरणवियोगामुळें वाईट वाटतें. उदयीक वर्षश्राद्ध करितों. मला आतां आपणच वडील आहांत. शरीरास फार जपावें." मोरोपंतांनीं यानंतर गंगाधरभटास आपल्या जवळच बोलावून घेतलें. गंगाधरभट पंतांच्या सेवेंत अखेरपर्यंत राहिले. हे पंतांस काशीयात्रेस संभाळून घेऊन गेले, पंतांनीं याबद्दल त्यांचें गौरव केलें आहे:-

**हें पुण्यकार्य नेलें सिद्धिस गंगाधरें पराडकरें! ।**
**सत्पुरुष अशक्ताची काय प्रक्षाळिती न राड करें? ॥ ४० ॥**

—विष्णुपदवकिली.

बारामतीस जें पराडकरांचें घराणें आहे. तें बहुधा गंगाधर भटाचें असावें. —मोरोपंतांचे वडील बंधु जन्मभर विभक्त होते तरी त्यांच्या पश्चात् त्यांच्या मुलांचा सांभाळ पंतांनीं केला, त्यांचे धाकटे बंधु आबाजीपंत व त्यांचीं मुलेंबाळें हीं सर्व मोरोपंतांकडेच होतीं. पंतांच्या कुटुंबाचा विस्तार मोठा होता. व या सर्व मनुष्यांचा बोजा जन्मभर पंतांनीं स्वशिरीं वाहिला, हें व एवढा संसार करून विलक्षण उद्योगमातत्यानें एक लाख सुरस ग्रंथ करून मागें ठेविला, हें पाहिलें ह्मणजे त्यांच्या बुद्धिवैभवाचें, उद्योगपरतेचें व अनुपम सुजनतेचें परमावधीचें आश्चर्य वाटतें.

१३ पंतांची सांपत्तिक स्थिति सर्वस्वी सुखावह नव्हती. त्यांनीं सारा जन्म

नाईक यांच्या आश्रयानें घालविला व नाइकांनींही मोठ्या उदारपणें सर्व-प्रकारें त्यांचा सांभाळ केला हें खरें, तथापि वाढत्या कुटुंबाच्या परिपोषणाची चिंता व अनेक प्रकारचीं सांसारिक जंजाळें यांनीं त्यांनाही बरेंच सतावून सोडलें होतें. विठोबादादांस एका पत्रांत ' संसारीं नवनवेच गुंते पडतात ' असें त्यांनीं लिहिलें आहे, यावरून प्रांपचिक अडचणी त्यांच्या मार्गेंही होत्या हें उघड आहे; पांडुरंग स्तोत्रांतः—

**भो नाथ ! प्राकृतोपि प्रभुरिह भवति त्यक्तनिन्द्रः कुटुंबी**
**पंचानां पालकोपि क्षणमपि न मनाग्जातु निद्रात्यचिंतः ॥**

असा त्यांनीं उद्गार काढला आहे, आणि ह्मणूनच पंचवीस माणसांचा प्रपंच चालवून ग्रंथरचनेचा जो विशाळ उद्योग त्यांनीं केला त्याची महती अधिक मानायला हवी. यजमान जरी चांगले होते तरी पंतांची मंडळी निराळ्या वाड्यांत स्वतंत्रपणें राहत असल्यामुळें गृहप्रपंचांतल्या बारीकसारीक गोष्टी त्यांच्या कानांवर घालून त्यांना त्रास देणें पंतासारख्या मानी पुरुषांस आवडत नसे. नाइकांची व पेशव्यांची नेहमीं चुरस असल्यामळें व या चुरशीचा परिणाम हळू हळू नाइकांचीं उत्पन्नें जप्त किंवा कमी होण्यांत होत असल्यामुळें, समुद्रांतल्या तुफानांत जहाज हेलकावे खाऊं लागलें कीं जहाजांतले सर्व पदार्थ अस्थिर होतात, त्याप्रमाणें नाइकांच्या आपत्तीबरोबर पंतांनाही आपत्ती भोगावी लागे यांत कांहीं संशय नाहीं. पेशव्यांशीं अनेक वर्षें झटापटी करून बाबूजी नाइकांवर सोमल खाण्याचा प्रसंग आला, पेशवे व प्रतिनिधि यांच्या पदप्राप्तिविषयींच्या त्यांच्या खटपटी विफळ झाल्या, सोलापूरचा किल्ला व इतर मोठे महाल जाऊन त्यांची सत्ता व उत्पन्न अगदीं खालावलें, बाबूजी नाइकांच्या मृत्यूनंतर त्यांच्या दोन पुत्रांत वांटण्या होऊन त्यांना कमी उत्पन्नाच्या पांडुरंगरायाचा आश्रय दृढ धरावा लागला, या सर्व प्रसंगांवरून पंतांची सांसारिक स्थिति सर्वकाळ सारखीच सुखाची होती असें ह्मणवत नाहीं. त्यांनीं एका बारामतकरांच्या आश्रयानें काळ लोटला, व अहल्याबाई किंवा बाजीराव यांच्या सारख्यांनीं त्यांना सन्मानानं बोलाविलें असतांही त्यांनीं आपल्या पहिल्या यजमानाला सोडलें नाहीं, यावरून कृतज्ञता, निर्लोभता, व भलेपण, हे गुण त्यांचे ठायीं किती वसत होते हें स्पष्ट दिसतें. धनानें विश्व आपलेसें करितां येतें

हे त्यांना माहीत होतें. ' विश्ववशीकरणाचा घ्यावा नलगेचि मंत्र धनदानें, ' (आदि. २८–२५) पण द्रव्यलाभ त्यांचे ठिकाणीं मुळींच नव्हता. तो असता तर अहल्याबाई, बाजीरावासारख्यांचीं आलेलीं अवदानें त्यांनीं सोडून दिलीं नसतीं. विठ्ठलपाध्ये यांनीं एका पत्रांत स्पष्ट ह्मटलें आहे,'मोरोपंतांनीं निरंतर श्रीभगवत्सेवा केली, योगक्षेम श्रीशांनीं एका बारामतकरांच्या हातून चालविला. ' पंतांनीं एका यजमानास चिकटून राहण्यांत दुसरेंही मोठें कार्य साधलें, तें त्यांना आमरण विद्याव्यासंग कायम ठेवतां येऊन भगवभक्ति करून शांतपणें देहाचें सार्थक करितां आलें हें होय. दानधर्मांत, तीर्थयात्रांत, परोपकारांत खर्च करण्याइतकें द्रव्य आपणापाशीं नाहीं असें त्यांस वाटत असे. ' विद्याधनदेहाची मज उपशांतेश्वरा ! नसे शक्ति ' ( द्विचत्वारिंशाद्विगयात्रा ३७) या चरणांत आपणाजवळ विद्या, धन, व देह ह्मणजे आरोग्य, यांपैकीं कांहींच नाहीं असें ते ह्मणतात. त्यांनीं रमाभार्येवरच्या आर्येंत ' मी जरी अशक्त निर्धन' असें ह्मटलें आहे. तसेंच एकनाथस्तवांत ' हातीं न चित्त वित्तहि ' असा उद्गार काढला आहे. पंतांचें शरीर स्थूल होतें व पुढें पुढें बैठ्या कामामुळें तें वायुबद्धही झालें. ते अशक्त असत. त्यांच्या इष्टमित्रांनीं त्यांच्या आरोग्याविषयीं नेहमीं काळजी बाळगलेली दिसते. व प्रसंगीं त्यांनीं औषधेंही पाठविलेलीं त्यांच्या पत्रांवरून दिसतात. स्वतः पंतांनाही औषधोपचाराची माहिती कमी नव्हती. द्रव्याची हाव त्यांनीं कधीं बाळगली नाहीं. ' तनुनिर्वाहापुरता संग धरुनिही अनर्थ मज घडला ' ( आर्याकेकावली ९९. ) या चरणांत आपण फक्त तनुनिर्वाहापुरता संग धरिला आहे ह्मणून ते स्पष्ट सांगतात. ' बहुधन असो नसो परि, एक असावें गृहीं गृहीं दुभतें,' (आदि. २३–२९) या चरणांत व्यक्त केलेल्या आर्यांच्या डामडौलविरहित साध्या वागणुकीप्रमाणें त्यांची राहणी अगदीं साधी होती. रामजोश्यासारख्या चंगीभंगी माणसास द्रव्याची अपेक्षा फार, पण तेही आपल्या बुद्धिमत्तेच्या जोरावर थोरांची हांजी हांजी न करितां हवा तितका पैसा मिळवीत! पंतांची राहणीच साधी होती. मग निस्पृहता त्यांच्या ठिकाणीं असल्यास नवल

---

आरोग्याचें महत्व पंतांस ठाऊक होतें. ' धर्मार्थाखिलपुमर्थप्राप्तीचें मुख्य मूळ हें देह ' ( बृहद्दशम ८०. ), ' देह सदा रक्षावा ' ( बृ. ८८. ) " पुरुषार्थाचें साधन बा धनसे हें शरीर रक्षावें " ॥ ( प्रश्नोत्तरखंड अ. ११ )

काय ? पंतांच्या मित्रमंडळांत सारेच त्यांच्यासारखे भाविक व सात्विक लोक होते. कोणा मोठ्या सरदाराची मैत्री त्यांनीं पाडली नाहीं, किंवा द्रव्यासाठीं एखाद्या 'श्रीमन्महाराजांस' एखाद्या काव्याचें अर्पणही केलें नाहीं ! अहल्याबाईच्या स्तवनांत 'जाणे, धर्म करीना, त्या स्तवितो कोण पंडितंमन्या ?' असा एक चरण आहे. यांत त्यांनीं स्पष्ट सुचविलें आहे कीं, 'अहल्याबाई धर्मशील, व दातृत्वगुणसंपन्न होती, ह्मणूनच मी तरी आपल्या वाणीचा वेंच तिच्या स्तवनांत केला आहे !' मनुष्यस्तुतीचा त्यांस पूर्ण कंटाळा होता ह्मणून त्यांनीं कोणाची पर्वा बाळगिली नाहीं. 'धनदाचीहि नसे, मग अन्याची काय निःस्पृहा परवा!' (कर्ण० २९—३१). चाळीस वर्षे ज्याच्या आश्रयानें काढलीं त्याचीही स्तुति त्यांनीं १०।९ आर्यांतच आटोपली आहे. पंतांनीं यजमानस्तुति पाल्हाळानें केली नाहीं, ह्मणून त्यांचे ठायीं कृतज्ञता लवमात्र नव्हती' असा विविधज्ञानविस्तारकर्त्यानें त्यांजवर आपल्या पहिल्या पहिल्या लेखांत आक्षेप केला होता. या आरोपाचें खंडण करण्याचें आतां कारणच राहिलें नाहीं. आर्याकेकावलींत रामाला पंत मागतातः—

**मन हेंचि फार इच्छी, कीं आतां सेवणें तुझे पाय ! ।**
**तुजवांचुनि इतरांच्या भजनीं मजलागि होय फळ काय ? ॥ ६३ ॥**

पंतांच्या काळीं पंतांना हवें तितकें द्रव्य संपादितां आलें असतें. पण त्यांनीं तनुनिर्वाहापुरताच संग धरल्यामुळें द्रव्यसंचय केला नाहीं. तथापि त्यांच्या पुण्याईवर व कीर्तीवर त्यांच्या पुत्रांस त्यांच्याच हयातींत थोडीशी कमाई करितां आली.

१४ मोरोपंतांचें आचरण यावज्जीव शुद्ध व पवित्र होतें हें सांगण्याची कांहीं अवश्यकता नाहीं. देवभक्तांच्या स्तवनांत ते आपणास पातकी ह्मणतात, पण साधूंच्या पापपुण्याच्या कल्पना सामान्य जनांहून फार निराळ्या असतात हें विसरतां उपयोगी नाहीं. त्यांची भूमिका फार निराळी असते. षड्विकारांचा वारा चित्तास लागत आहे, विषयककल्पनेचा तरंग हृत्सरावर उठत आहे, वासनाजाल तूटून गेलें नाहीं, प्राक्कर्मांचें खंडण होऊन लिंगदेह जळून खाक झाला नाहीं, जीवाचें परमात्म्याशीं अखंड ऐक्य होऊन 'जन्मास जाणें येणें खुंटलें' नाहीं, तोंपर्यंत साधुपुरुष आपणास पातकीच समजतात. 'पतित मी पापी शरण आलों तुज। राखी माझी लाज पांडुरंगा' असें तुकारामबोवाही विलज्जपणें देवापुढें नाचून गाऊन ह्मणतात. मोरोपंतही आपली

चित्तशुद्धि व्हावी, हृदयांतलें कश्मल पार जळून जावें, ह्मणून देवापुढें बसून मुक्तकंठ होऊन अश्रू ढाळीत:—

**बा उद्धरी मला मी पापी, लटिकेंचि कोण विंदुनि घे ? ।**
**मिथ्या दुःख मिरवितां नेत्रांतुनि काय अश्रुबिंदु निघे? ॥**

( नामरसायन. ४८ )

अशी अवस्था कोणा भाविकाची होत नाहीं ? ' निष्पापोस्मीति मन्ये तदपि खलु कुतोऽद्यापि नो तापशांति ? ' असें पांडुरंगस्तोत्रांत त्यांनीं ह्मटलें आहे. मी निष्पाप आहें असें देवापुढें निष्पाप पुरुषाशिवाय कोण ह्मणेल ? जनांच्या स्थूलदृष्टीनें जें पाप तें पंतांच्या या काय पण पूर्वीच्याही अनेक जन्मांतल्या देहांला शिवलें नव्हतें, पण वर जी साधूंच्या पापाची कल्पना सांगितली त्या कल्पनेंतलें पाप नष्ट होऊन भगवत्प्रसादाला आपण पात्र होऊन कृतार्थ व्हावें एवढीच पंतांची इच्छा होती. पंतांची भूमिका जन्मतःच मोठ्या अधिकाराची होती. त्यांनीं आपल्या वयाच्या २९ व्या वर्षी प्रल्हादविजय ग्रंथ रचिला होता, त्यांत त्यांनीं ' हरिध्यानासक्त ' ' प्रकृतिविषयप्राप्तविकृती,' ' सुकृती ' अशीं विशेषणें आपणास लाविलीं आहेत. उद्योगपर्वाच्या अंतीं आपलें चित्त ' असत्पथातीत ' झालें आहे असें ते ह्मणतात. तथापि जन्ममरणांतून सुटण्याची त्यांची तीव्र इच्छा असल्यामुळें त्यांनीं ईश्वरोपासना अखंड चालविली. 'भगवन्महिमा गातां होताहे कायवाङ्मनः शुद्धि'(अनंतव्रतकथा). पूतरामायणांत ते ह्मणतात.

**गातां भक्तमयूरमेघ भगवान् श्रीरामसीतापती**
**बाच्या भव्ययशीं निवे मति, भवीं अत्यंत जी तापती, ।**
**ऐसें सांगति साधु, येतहि असे गातां यश प्रत्यय !**
**स्वामीच्या स्मृतिनें घडे कलियुगीं दुर्बुद्धिला अत्यय ॥ १६४ ॥**

१५ मोरोपंतांचें उपास्यदैवत राम होय. पंत प्रथम घरच्या उपासनेमुळें शालिग्रामाची पूजा करीत,पण त्यांची रामभक्ति दृढ व्हावयास एक कारण झालें. अहमदनगरास एक परम रामभक्त होता. त्याजवळ रामपंचायतनाच्या सुंदर मूर्ति होत्या, त्यांची त्यानेंउत्कृष्ट भक्ति केली होती. त्याला संतति नव्हती, वय शंभराला टेंकलें होतें. आपल्या रामाची योग्य पुरुषाकडून अखंड पूजाअर्चा कशी चालेल ही त्यास चिंता पडली. तेव्हां त्याला स्वप्नांत रामानें दृष्टांत

दिला कीं, 'बारामतीस शुभाशय मोरोबा पराडकर आहे त्याच्या स्वाधीन मला कर.' या दृष्टांताप्रमाणें त्या वृद्ध भक्तानें नगराहून सोंवळ्यानें पायीं चालत येऊन त्या मूर्ति मोरोपंतांच्या हवालीं–ते बारामतीस आल्यावर लौकरच-केल्या. 'भगवान् राम आपल्या घरीं चालत आले, तेव्हां हाच आपल्यावर थोर अनुग्रह झाला,' असें जाणून मोरोपंतांनीं परम भक्तीनें त्या रामपंचायतनाच्या मूर्ति घेतल्या. त्या राममूर्ति अद्याप पंतगृहीं आहेत. पंतांच्या वेळेपासून दीडशें वर्षें त्या रामपंचायतनाची पूजा पराडकरांच्याच घरीं चालते. पंत रामनवमीचा उत्सव मोठ्या थाटानें करीत. नऊ दिवस उपोषित राहून वाल्मीकिरामायणाचें एकाग्रतेनें पारायण करायचें, पारणें सोडायचें, रामजन्माचा उत्सव प्रेमानें करायचा, असा त्यांचा क्रम सतत चालला होता. हा रामनवमीचा उत्सव त्यांचे वंशज अद्यापही यथाशक्ति करितात. उत्सवाचे समाप्तीचे वेळीं 'वर असा विभो दे कीं वत्सा गा मल्लीला' हें त्यांचें पद अद्यापही ह्मणावयाचा प्रघात आहे. पंतांची अनेक दैवतांवर अनेक स्तोत्रें, पदें, वगैरे आहेत. सर्व देवांत ऐक्यभाव आहे, ही पंतांची श्रद्धा होती. कोणत्याही देवाची कोणत्याही नामानें प्रार्थना केली तरी ती परमात्म्याला पोंचते अशी त्यांची निष्ठा असल्यामुळें उपासनेचा व उपास्यदेवतेचा दुरभिमान त्यांना लवमात्र शिवला नाहीं. 'हरिहर हे सर्वोत्तम, एकचि बा, यांत लव नसे भेद;' [हरिवंश ४९] हें त्यांचें मत त्यांनीं अनेक ठिकाणीं व्यक्त केलें आहे. 'श्री हरिहरनामें हो! सर्व तुह्मीं एक, गुह्य हें संतीं' कथिलें (प्रांतप्रार्थना९) हें त्यांनीं लक्षांत ठेविलें होतें. पंतांनीं बहुतेक देवतांचीं स्तवनें केलीं आहेत; तरी 'अनेकीं सदा एक देवासि पाहे' या समर्थोक्तीप्रमाणें सर्व देवता एकरूप आहेत, एकच परमात्मा निरनिराळ्या रूपानें प्रकटला आहे ही त्यांची श्रद्धा कायम होती. पंतांची रामोपासना शुद्धसत्वगुणी होती. ते रामभक्त आहेत अशी प्रसिद्ध झाली होती. तेच ह्मणतात: 'भक्त श्रीरामाचा मी, हा झाला जगांत बोभाट!' (महद्विज्ञापना२३) विठ्ठलावर व रामावर त्यांचीं अत्यंत प्रेमळ स्तोत्रें आहेत. पंत रोज रामाची पूजा झाल्यावर खालील गोड आरती ह्मणत:—

**ऐक बा रामराया! तुझ्या वंदितों पाया।**
**आवरीं आपुली हे विश्वमोहिनी माया॥ ध्रु०॥**
**मी मूढ हीन दीन सर्वसद्गुणहीन।**
**तूं क्षमाशील देवा! शुद्धचरितनिजाधीन॥ १॥**

घडो सदा साधुसंग नसो विषयप्रसंग ।
सप्रेम भक्ति द्यावी सत्व वैराग्य अभंग ॥ २ ॥
वाटतें नित्य भावें तुझे साधुगुण गावे ।
मन हें आवरेना सांग काय म्यां करावें? ॥ ३ ॥
करितां संसारकाम मुखीं असो तुझें नाम ।
दयाघना भक्तमोर याचा पुरविसी काम ॥ ४ ॥

ही आरती किती साधी, प्रेमळ व गृहस्थाश्रमी पुरुषाला नित्य ह्मणायला योग्य आहे बरें! मोरोपंतांचें एक 'आशंसाष्टक' आहे त्यांत त्यांनीं आपला आशय फारच मधुर शब्दांत ओतला आहे, त्यांतील ४ श्लोक पहा:—

तव पादसरोरुहीं स्वचित्तभ्रमरातें रस चाखवूनि गोवूं ।
तुज भक्त तुजे सदैव गाती मृग आह्मीं गुणगीतसक्त होवूं ॥१॥
मज वाटतसे सभाग्य मोठें, भगवद्भक्त तयांत म्यां जुडावें, ।
तदधीन तुज्या यशःसुधेचा ऱ्हद गंभीर, तयामधें बुडावें ॥ २ ॥
तुज वर्णिति संत, संगमुक्त, प्रकृतिप्रेमळ, तद्गुणीं शिरावें! ।
तुजिया गुणसागरांत माजें मन हें सैंधव माधवा! विरावें ॥ ३ ॥
मन हें विषयीं उडीच घाली विष हें जाणुनि यावरी विटावें ।
तव कीर्ति उदार कामधेनू तिस मीं होउनि वासरूं चिटावें ॥ ४॥

पंतांच्या हृदयांतला सारा शुद्ध भाव या 'आशंसाष्टकांत कसा आरशासारखा स्वच्छ दिसत आहे! त्यांनीं आपले मनोरथ 'सन्मनोरथराजि' याही गोड काव्यांत सामान्यरूपानें सांगितले आहेत. पंतांनीं आपल्या उपास्यदेवतेचा

१ पंतांची आशंसा भगवद्भक्तांत जुडावें, भगवद्यशाच्या सरांत बुडावें, अशीच होती. अनंतपाध्ये, विठोबादादा, सिद्धेश्वरबाबा, अशा 'भगवज्जन'प्रसंगानें पंतांना गृहादि लोभ टाकून जावें असें वाटे यांत काय नवल? खऱ्या भगवद्भक्तांचा संग होतांच ते ज्या भक्तिरसांत सतत रमतात त्या अमृताधिक भक्तिसुखाची माधुरी अखंड प्राशायला मिळावी ह्मणून कोणाला उत्कंठा वाटणार नाहीं? 'तुझें नाम निर्लज्ज होऊनि गावें । प्रपंचांतुनी शीघ्र वाटे निघावें'(विठ्ठलस्तोत्र ३)असें पंतांप्रमाणें नामस्मरणाचें दिव्य सुख अनुभवणाऱ्या कोणा सुजनास वाटत नाहीं? तुकारामबोवांच्या कथाप्रसंगीं शिवरायाची वृत्ति कशी होत असे, व हंपीविरूपाक्षाचें गर्द वनांतलें एकांतांतलें शिवालय पाहून राज्यत्याग करून तेथेंच नित्य वास करावा ह्मणून त्यांस कसें वाटलें हें इतिहासज्ञांस माहीत आहेच!

प्रसाद अखेर प्राप्त करून घेतला. 'आहे प्रसाद मजवरि ह्मणुनिच वदनासि ये- तसें नाम.' (आर्याकेकावली १०५) याप्रमाणें रामाची आपल्यावर पूर्ण कृपा झाली आहे, अशी त्यांची श्रद्धा होती. पंतांचें अखेरचें काव्य केकावली तें तयार झाल्या- बरोबर त्यांना साक्षात् रामदर्शन झालें. 'परि रामचरणपद्मप्रसाद झाला' असें गीतेच्या उपोद्घातांत त्यांनींच ह्मटलें आहे!

१६ मोरोपंत जसे भगवद्भक्त होते तसेच ते कर्मनिष्ठही होते. कांहीं लोक 'न बाणतां स्थिति अंगीं । कर्मत्यागी लंड तो' अशा कर्मपर चरणांचा अना- दर करून 'तुका ह्मणे सर्व धर्म हरिचे पाय' अशा चरणांच्या आश्रयानें स्नानसंध्यादि नित्यकर्में व श्राद्धपक्षादि नैमित्तिक कर्में टाकून धर्मभ्रष्ट होतात; किंवा कांहीं इंग्रजी जाणणारे पंडित कर्ममार्गाची पायरी कनिष्ठ ठरवून भक्तिमार्ग व ज्ञानमार्ग श्रेष्ठ आहेत असें नुस्तें तोंडानें ह्मणतात व मूर्तिपूजेची अवहेल- ना करून भक्ष्याभक्ष्यादिकांचाही विधिनिषेध पाळीत नाहींत! मोरोपंत असे कोरडे—ब्रह्मज्ञानी नव्हते. 'आचारः प्रथमो धर्मः' या तत्त्वाप्रमाणें त्यांचें कर्मा- चरण चांगलें होतें. 'न बरा आवश्यकक्रियालोप (आदि.९–१०) या म- ताप्रमाणें त्यांचा आचार होता. 'कर्म कसें टाकावें? जी सद्विद्या (ब्रह्मविद्या) मुखांत मायसी अमृत ओती, ती कर्मत्याग न करितांच फळवती होती' (उद्योग. ३–५४) हा त्यांचा सिद्धांत होता व त्याप्रमाणें त्यांचें आन्हिक पुष्कळ होतें. त्यांचें प्रातःस्नान कधीं चुकलें नाहीं. स्नान, संध्या, पूजा, ब्रह्मकर्म वगैरे नित्यकर्म आटोपून नंतर ते ग्रंथवाचनाच्या व ग्रंथलेखनाच्या व्यवसायास लागत. स्नान केल्यावर पायाला माती लागूं नये ह्मणून ते पायांत ज्या खडावा घालीत, त्या खडावाच त्यांच्या पादुका ह्मणून अद्याप पंतगृहीं पूजितात. ते देवपूजा ज्या चौरंगावर बसून करीत तो चौरंगही अद्याप पंतगृहीं आहे. संस्कृत पांडुरंगस्तोत्रांत 'पापोहं पापकर्मोतिच सततमहं स्नानकाले ब्रवीमि' असा एक चरण आहे, त्यावरून पंतांच्या आन्हिकाची कल्पना ये- ईल. भगवद्गीता व विष्णुसहस्रनाम या दोन ग्रंथाचा त्यांचा नित्य पाठ असे. ब्राह्मणाचें नित्यकर्म संभाळून त्यांनीं काव्यरचना केली आहे. गृहस्थाश्रमी पुरुषा- ला अतिथि देवासारखा पूज्य आहे व बलिहरणप्रसंगीं यजमानानें अतिथी- ची कांहीं काळ वाट पहावी असें शास्त्र आहे. अतिथिसत्क्रियेचें महत्व पंतां- नीं असें वर्णिलें आहे:—

**तपोव्रतजपक्रतुप्रमुख सर्वही साधुनीं**
**मनेंहि न विलंघिली अतिथिसत्क्रिया साधुनीं!।**

**(भक्तभूषण० १६)**

त्याचप्रमाणें कुलधर्मकुलाचारही मनुष्यानें अवश्य पाळले पाहिजेत असें त्यांचें सांगणें आहे. ' सत्कुलजाचेंचि सदा स्वकुलाचारांकडेचि मन वाहे, ' असा उद्गार त्यांनीं महाभारतांत काढला आहे.

१७ याप्रमाणें पंत भगवद्भक्त असून कर्मनिष्ठ होते; सगुणोपासक असून अद्वैती होते; पंडित असून विनयशील होते! स्वतः सुवृत्त संत होते, पण आपणास साधूंचा चरणरज समजत! कवीश्वर होते पण आपणास कविंकिकर ह्मणवीत! महाबुद्धिवान् होते पण स्वतःस मतिमंद समजत! ते महापुण्ययशाचा पुंज होते पण स्वतःस अत्यंत लघु समजत! थोर पुरुषांचे सर्व सद्गुण त्यांच्या ठिकाणीं होते. अशा पुरुषाच्या गृहस्थाश्रमांत त्याला परमार्थ कां साधतां येणार नाहीं ? आपल्या धाकट्या भावाचें, पत्नीचें, कनिष्ठ वयाच्या व अधिकाराच्या पुरुषांचें गौरव करण्यांत त्यांना आनंद वाटे. इतका उदारपणा त्यांच्यात होता. पंत आपल्या आईबापांशीं, गुरुमित्रांशीं, स्त्रीपुत्रादिकांशीं, ग्रामस्थांशीं, स्वपरजनांशीं, ज्या तऱ्हेनें वागले, ती तऱ्हा; त्यांचा तो उदारपणा; त्यांचें तें शुद्ध, भाविक, व प्रेमळ हृदय; त्यांची सत्संगाविषयींची लोलुपता; त्यांचे विनयादि अमोल गुण व सर्व गुणांना शोभा देणारी त्यांची अस्सल प्रतीची भगवद्भक्ति–हे त्यांचे गुण पाहिले ह्मणजे असें वाटतें कीं, त्यांनीं गृहस्थाश्रमांत इहपरलोक साधले व 'हरिभक्तिरसायनाच्या' पानानें भवभ्रांति दूर करून कृतार्थ होत्साते ते भगवत्पदाला पोंचले.

---

# प्रकरण सहावें.

## मोरोपंतांचे आप्त व मित्र.

### पंढरपूरकर अनंत पाध्ये, बाबा पाध्ये व विठ्ठल पाध्ये.

**स्नेह करी, इष्ट करी, तर्पी, रक्षी, सदैव संमानी. ।**
**पावे सुखें सुखहि तें मित्र-असें ह्मणति सर्वेहि ज्ञानी. ॥ १ ॥**

—महाभारत.

१ पाध्ये व त्यांची बखर. २ सदर बखरीचा सारांश. ३ पाध्यांचा तळतळाट. ४ अनंतपाध्ये व अन्नपूर्णाबाई. पंतांचा अनंतपाध्यांशीं प्रेमसंबंध. ५ माधवराव पेशवे यांचा समंजसपणा. ६ काशीनाथ बाबा. ७ विठ्ठलपाध्ये. ८ पाध्यांचा योग-क्षेम. ९ पंत व पाध्ये. १० त्यांचा आप्तपणा, पंतांच्या मुलाचा विवाह. ११ मोरोपंत आणि बाबापाध्ये यांचा स्नेहसंबंध. १२ विठ्ठलपाध्यांचें चंदूलालास पत्र.

१ कोंकणांत रत्नागिरी जिल्ह्यांतील गोळवली गांव पाध्यांस इनाम आहे. तेथील हे मूळचे राहणारे. संगमेश्वर तालुक्यांतल्या ७२ गांवची ' ज्योतिष, धर्माधिकरण, उपाध्येपण, पुजारीपण, यांची वृत्ति पाध्यांकडे फार पुरातन काळापासून' चालत होती. हा तालुका ' शके १६८१ प्लवसंवत्सरीं शृंगार-पुरकर सुर्वे मारून काढून ' शिवाजीनें घेतला. सिंहासनाधीश्वर शिवाजी ' १९ वर्षें अव्याहत राज्य करून शके १६०२ रौद्र संवत्सरीं चैत्रपूर्णिमेस शांत झाला.' पुढें श्रीपतरावापासून कान्होजी आंग्रे सरखेल यांची सत्ता या प्रांतीं झाली. ते शांत झाल्यावर त्यांचे पुत्र सेखोजी,संभाजी,व तुळाजी,यांनीं अनुक्रमें सत्ता केली. 'शाहुराजे शके १६७१ शुक्लसंवत्सरीं मार्गशीर्ष वद्य३स शांत झाले. त्यांचे प्रधान बाळाजी बाजीराव यांनीं राज्याचा बंदोबस्त केला.' इकडे पाध्यांचे मूळपुरुष भास्कर–पुढें नारोपाध्ये, त्यांचे पुत्र अंतोपाध्ये, 'त्यांचे पुत्र काशीपाध्ये यांनीं आपले घरीं कोणी संगमेश्वरकर जोशी विद्या-भ्यासास ठेवले होते. त्यांसच आपल्या वृत्तीची व्यवस्था पाहण्यास सांगितलें.' सुमारें ३०।३५ वर्षांनंतर काशीपाध्ये वारले, व त्यांचे पुत्र यज्ञेश्वरपाध्ये व

अनंतपाध्ये वृत्तीची व्यवस्था पाहूं लागले. तेव्हां सदर 'कृष्ण जोशी हे पेशव्यांचे आप्त असल्यामुळें त्यांनीं पेशव्यांचे जोरावर वृति आपली ह्मणून वाद उपस्थित केला.' तो चालून अखेर नानासाहेबांनीं वृत्ति जोशांचे स्वाधीन केली. ही हकीगत पन्हाळगडीं व पंढरपुरीं पाध्यांचे वंशज सांगत असत; व त्यास यज्ञेश्वर पाध्ये यांनीं शके १६८०साली समग्र हकीकतीची बखर लिहून ठेवलेली पाध्यांचे जुन्या दप्तरांत सांपडली तिचें प्रमाण मिळालें. पाध्यांचें घराणें जुनें, विद्वान, व सालस होतें. ही बखर मोडींतच लिहिलेली आहे. तिच्या आधारें ही हकीकत तिच्याच शब्दांनीं मीं देत आहे.

२ संगमेश्वरीं राहणारे सरदेसाई यांचे घरीं प्रथम जोशी यांनीं पाध्यांची वृत्ति तेथें असतां आपला टिक्का लाविला. पुढें दोघांचा वाद चालू झाल्यावर सरदेसाई यांनीं उभयतांचे हक्क चालविले. नंतर जोशी यांनीं पेशव्यांकडून परवाना आणून ती वृत्ति आपलीशी केली ( शके १६७८ ). पुढें हा वाद पुण्यास पेशव्यांचे वाड्यांत उभयतांकडून चालू झाला. कृष्णजोशी यांनीं पाध्यांचे भाऊबंध बाळोपाध्ये व इतर सात आठ पुरुष साक्षी ह्मणून उभे केले. 'रामशास्त्री माहुलीकर देशस्थ पंडित यांनींही कृष्णजोशी यांचा अगत्यवाद धरिला. पेशव्यांनीं दिलेलें पत्र पाध्यांनीं नाकारिलें व तुह्मी आह्मी बैसोन पंच द्रविडांसमक्ष न्याय बोलूं असें बोलले. दोन्ही पक्षांकडोन जामीन घेण्यांत आले.' पण 'पाध्ये यांजपासोन पेशवे लक्ष रुपये गुन्हेगारी घेणार,' असें कृष्णजोशी यानें भय घालून पाध्यांचा जामीन फोडला. 'पाध्यांनीं सातारचे लक्ष्मणभट सप्रे देऊं केले, पण ते वितंडवादी ऐसें निमित्त ठेऊन पेशवे यांनीं तो नाकारिला. पाध्ये बोलले, 'संगमेश्वर महाल श्रीपतराव प्रतिनिधी यांहीं कान्होजी आंग्रे याशीं इजारा दिला. त्यावर कान्होजी यांहीं आमचे तीर्थरूपास धारापत्र इनाम देऊन शाहूराजे व श्रीपतराव यांचीं पत्रें करून दिलीं.' पेशव्यांनीं जोशी यांचीं पत्रें पाहिलींशीं केलीं. जोशी यांचे पक्षपाती रामशास्त्री यांस पंचांत घालतां, तर बाळशास्त्री तेलंग यांसही घाला, असें पाध्ये ह्मणाले. पेशवे शके १६७८।९ मध्यें श्रीरंगपट्टणचे स्वारीस गेले. वाद तसाच राहिला. पुढें अधिक अश्विनमासीं पुनः पंचाइत चालली. पंचांत पक्षपात होऊं लागला. तेव्हां 'पांच जातीचे पांच पंच व पांच इतर सभ्य व पेशवे यांनीं बसून न्याय करावा' असें पाध्ये बोलले. 'कित्येक निःपक्षपाती पंच उपरत

आहले. बहिरव जोशी पंच यांनीं पेशव्यांचें चित्त पाध्यांविषयीं इतराज केलें. पुढें रामाजी जिवाजी यास कोंकणांत पाठवून पाध्ये यांचे घरीं चौक्या बसविल्या व त्यांचा विश्वासू गोविंद सेवक यास मुसक्या बांधून विचारूं लागले–' पाध्ये यांचे ताम्रपट व पत्रें कोठें आहेत ? ' तो ह्मणाला, ' आपणांस ठाऊक नाहीं. सांवताच्या धामधुमींत गेले असें ऐकतों, बाकी यज्ञेश्वर पाध्ये यांनीं निवडून पुण्यास अनंत पाध्ये यांजकडे पाठविलें!' तेव्हां त्यास खोटें सांगितलें, ' उपाध्ये यास दस्त केलें आहे. तूं कागद पत्रें दे. ' तो ह्मणाला, ' त्यांचें अक्षर दाखवा. ' महालचे पाटणकर अधिकारी अनुकूळच होते. ' गोविंद कबूल होईना. तेव्हां त्यास रानांत नेऊन यातना केल्या. मढाच्या घांटापर्यंत व तोरणा किल्यापर्यंत आणलें. पाध्यांच्या माणसांनीं टांकोटांक बातमी पुण्यास पोहोंचविली. पेशवे पुण्याबाहेर औरंगाबादेकडे जाण्यासाठीं डेरे ठोकून होते. उभय पाध्ये बंधूंनीं डेऱ्यापुढें मोठा शंखध्वनि करून चार दिवस उपोषणें केलीं.' व पेशवे यास बोलले, ' आमच्या न्यायाचा तुह्मीं कळस केला ! आमच्या मनुष्याशीं तुह्मी चौक्या बसविल्या आहेत त्या उठवून गोविंद चाकर यांस मुक्त करावा, तर आह्मी अन्न घेऊं. ' यानंतर सुटकेचें पेशव्यांचे हुकूम सुटतांच पाध्ये गांवांत येऊन जेवले. न्याय मिळत नाहीं हें पाहून पाध्ये फार खवळले. शके १६८० मध्यें पेशवे पुण्यास आल्यावर पुनः पाध्ये ह्मणाले ' परोक्ष साक्षी आह्मी प्रमाण मानीत नाहीं. उभयतां वादींस श्रीकृष्णेमध्यें घालावें व त्या प्रांतींचे लोकांस सत्वपूर्वक विचारून खरा वादी असेल त्यास हातीं धरावयास सांगावें. ' पेशवे यांणीं त्यांस पत्रें दाखवावयास सांगतांच पाध्ये बोलले, ' पत्रानिमित्त तुह्मी आमचे घरीं जबरदस्ती केली. दरबारांत पत्रें काढल्यावर तुह्मीं अपहार करणार. ' तेव्हां बाळकृष्ण शास्त्री यांस पत्रें पाहण्यास पेशव्यांनीं सांगितलें. ' त्याची निशा जाहल्यावर ते पाध्यांचे पक्षपाती अशी जोशी यांनीं घालमेल करून ती गोष्ट राहविली. बहिरव जोशी वगैरेनीं वतन जोशी यांचेंच खरें असा निर्णय केला. जोशी यांचा लिखितभुक्तसाक्ष दाखला किमपि नसतां पौष वद्य प्रतिपदेस रविवारीं सनदा जोशी यांचे स्वाधीन केल्या. वतन गेलें!'.

३ येणेंप्रमाणें हकीकत देऊन अखेर यज्ञेश्वर पाध्ये तळतळून ह्मणतात, " येणेंप्रमाणें आह्मी तीन वर्षें क्लेश भोगून न्यायानिमित्त पुण्यामध्यें ब्रह्मस्व ( कर्ज ) भक्षून व कांहीं दिवस प्रतिगृहीं शुल्कवृत्ति करून राहिलों असत

न्याय न करून आमच्या वृत्तीचा अपहार करून उच्छेद केला याचें पारपत्य करणार श्री आराध्य समर्थ आहे." यज्ञेश्वर हताश होऊन गोळवलीस परत गेले. अनंत पाध्ये यांनीं गोळवलीचे आपले घरास आग लावून त्याची रक्षा पेशवे यांचे पालखींत टाकली व बोलले, 'तुह्मीं आमच्या घराण्याची राखरांगोळी केली, तुमचा कुलक्षय होऊन असेंच वाटोळें होईल!' नंतर पेशव्यांचे राज्यांत उदक प्राशन करावयाचें नाहीं अशी प्रतिज्ञा करून ते सातारचे हद्दींत श्रीक्षेत्र पंढरींत येऊन राहिले. ही गोष्ट शके १६८० सालीं घडली.

४ अनंत पाध्ये हे वृत्तीचा उच्छेद झाल्यावर पंढरीस येऊन राहिले. ते परम वैराग्यशील व भगवद्भक्त[1] होते. मोरोपंत बारामतीस आल्यावर सहाच वर्षांनीं अनंत पाध्ये पंढरीस आले. पंत त्यांस गुरुतुल्य समजत. त्यांचीं पंतांस गेलेलीं दोन पत्रें सांपडलीं आहेत, त्यांवरून त्यांचा परस्पर घरोबा पुष्कळ होता असें दिसतें. त्या पत्रांत पंतांनीं शाकुंतलादि पुस्तकें मागितल्याचा उल्लेख असून शेवटीं 'अच्युतानंद गोविंद नामोच्चारण निरंतर करावें, येविषयीं तुह्मांस बहुत लिहावें असें नाहीं,' असा त्यांनीं पंतांस उपदेश केलेला आहे. अनंतपाध्यांची पत्नी अन्नपूर्णा. त्यांचे पुत्र काशिनाथ बाबा एका स्वकृत ग्रंथाच्या अखेरीस ह्मणतात:—

**वंदे श्रीमदनन्ताभिधगुरुचरणौ सतां मताचरणौ ।**
**जननीमथान्नपूर्णां संपूर्णां सद्गुणैर्धाम् ॥ १ ॥**

अन्नपूर्णाबाई महासती होती. तिचे वडील पुत्र काशिनाथ बाबा हे होत. हे सुमारें ४० वर्षांचे असतांना विटाळ गेल्यावर विठ्ठलप्रसादानें तिला दुसरा पुत्र झाला. त्याचें नांव विठ्ठल ठेविलें. तो एक वर्षाचा होतांच शके १६९६ मध्यें अनंतपाध्ये वारले. तेव्हां विठ्ठलास काशिनाथ बाबाचे ओटींत घालून 'त्वां याचें पुत्रवत् पालन करावेंस ही तुला माझी आज्ञा' असें निरवून ती सती सती गेली! माधवराव पेशवे यांची स्त्री रमाबाई किंवा ही बाबापाध्यांची आई अन्नपूर्णाबाई अशा ज्या पतिव्रता स्त्रिया त्या काळीं महाराष्ट्रांत होत्या, त्यांच्या पुण्याईनें पुरुषांच्या कर्तृत्वास यश येत असे. अनंतपाध्ये व अन्नपूर्णा यांचा अंत्यसंस्कार पंढरीस ज्या जागीं झाला तेथें पिंपळ उगवला आहे, व तो बाबा व

---

१ " अनंतोपाध्ये भगवद्भक्त । भागवतधर्म ज्या सकळ विदित " असें राजाराम प्रासादी ह्मणतात. ( भक्तमंजरीमाला. अ. ५८ )

विठ्ठल या उभयबंधूंच्या समाधीशेजारीं असून त्या एकंदर स्थानास 'पाध्यांचा मठ' ह्मणतात. मोरोपंतांनीं अनंतपाध्यांस सन्मणिमालेंत गोंवलेंच आहे. शिवाय ते स्वर्गारोहणपर्वाच्या अखेरीस ह्मणतातः–

**श्रीगीतेच्या एकादशसंख्याचा जसा उपाध्याय।**
**केवळ भक्तिरसमय श्रीमदनंताख्य जो उपाध्याय॥ १॥**
**तो होय शोभवुनि या कवनांतें साधु विप्र भासविता।**
**निजतेजें श्री देउनि पंकरुहा जेंवि विप्रभा सविता॥ २॥**

पंतांचीं काव्यें वाचून अनंतपाध्ये त्यांस प्रोत्साहन देत व भारताचीं पुष्कळ पर्वें अनंतपाध्ये यांच्या नजरेखालून गेलीं होतीं.

५ पानपतांत मराठ्यांस जी ठोकर बसली ती पाध्ये यांनीं एका लेखांत ह्मटल्याप्रमाणें त्यांच्या शापामुळें असो, नानासाहेबांच्या अदूरदर्शिपणामुळें किंवा भाऊसाहेबांच्या उद्दामपणामुळें असो, मल्हारराव होळकर व गोविंदपंत बुंदेले यांच्या अंगचुकारूपणामुळें असो, किंवा या सर्व कारणांमुळें असो, पण मराठ्यांच्या वाढत्या सत्तेस प्रतिबंधक झाली यांत संशय नाहीं. तरी तिच्यांतून पुनः मराठ्यांचें डोकें फार लौकर वर निघालें व यास मुख्य कारण माधवराव पेशव्यांचें शहाणपण होय. रा. बाळाजी प्रभाकर मोडक यांनीं कोल्हापूरच्या इतिहासांत ( भाग १ पृष्ठ ६३।६४ ) या थोर पुरुषाच्या समंजसपणाची एक गोष्ट दिली आहेः–"माधवरावास अंतकाळच्या समयीं पश्चात्ताप होऊन त्यांनीं विद्वान् शास्त्री व पंडित यांस विचारिलें कीं, पेशव्यांचे राज्यांत धर्मोत्कर्ष होत आहे, दौलतींतील सर्व लोक सुखी आहेत, प्रजापालन चांगलें होत आहे, असें असतां पेशव्यांचे वंशास क्षय लागला व पानपतीं दौलत बुडाली याचें कारण काय? तेव्हां काशीकर पंडित यांनीं स्पष्ट उत्तर केलें कीं, 'स्वामिद्रोहापेक्षां थोर पातक नाहीं. धन्यास प्रधान प्रतिबंधांत ठेवून राज्याचा उपभोग करूं इच्छितात! हें ऐकून माधवरावानें आपले कनिष्ठ बंधु नारायणराव यास बोलावून सांगितलें कीं, 'सातारकर महाराजांकडे पांच लक्षांचा नवीन तालुका नेमून

---

१ पंतांचा अभिप्रायही असाच होता. ( मागें पृष्ठ५९पहा. ) सातारच्या महाराजांस नानासाहेबांनीं योग्य रीतीनें वागविलें नाहीं, व स्वस्वामीशीं द्रोह केला असें त्या वेळीं तरी सर्वांचें मत झालें होतें.

ठेवावें. येणेंकरून संतोष न झाल्यास आणखी दोन लक्षांचा प्रांत जास्त देऊन मर्जी सुप्रसन्न करून घ्यावी." शिवाजीच्या गादीची प्रतिष्ठा नानासाहेबांनीं कमी केली होती, ती वाढवून महाराजांस संतुष्ट करण्याचा विचार माधवरावाचा समंजसपणा दर्शवितो. असाच शहाणपणा त्यांनीं पाध्यांस मिळवून घेण्याचे कामीं केला. संगमेश्वर जोशांस नानासाहेबांनीं इ. स. १७५८ मध्यें वृत्ति दिली, पण अखेरचें निवाडपत्र माधवरावांकडून इ. स० १७६२ मध्यें मिळालें. पण पुढें पाध्यासारख्या विद्वान व सालस घराण्याशीं आपला बेबनाव राहणें बरें नाहीं, असें त्यांस वाटून त्यांनीं एक लक्ष रुपये व कांहीं गांवें पाध्यांस इनाम द्यावयाचें कबूल केलें, पण अनंतपाध्यांनीं ती गोष्ट कबूल केली नाहीं. इतक्यांत पंढरीस काशिनाथ बाबांनीं संस्कृत पढविण्याची एक शाळा घातली होती, तेव्हां त्यांस वळविण्यासाठीं रामशास्त्र्यानीं माधवरावांस सुचविलें, व त्यास पुणें मुक्कामीं नेण्यासाठीं सरंजामानिशीं पंढरपुरीं पालखी पाठविली. पण बाबांनीं क्षेत्रसंन्यास घेतल्यामुळें पंढरीचें सीमोल्लंघन त्यांस बंद झालें. रामशास्त्र्यांच्या मध्यस्थीनें पुण्याच्या दक्षिणेंत काशिनाथबाबांचें नांव अग्रभागीं घालून सालिना बाराशें रुपये बाबांस देण्याचें ठरलें.

१ बाबापाध्ये स्वतः अत्यंत निस्पृह होते. ते अखेरपर्यंत अयाचितवृत्तीनें राहिले. ते आठ दिवसांपेक्षां जास्त शिधा घरांत ठेवीत नसत. त्यांच्या वडिलांचा एक रुप्याचा पेला होता. ज्या दिवशीं घरांत कांहीं नसे त्या दिवशीं तो पेला ते गहाण टाकीत! बाबा अत्यंत विरक्त होते. पित्याच्या पश्चात् कर्तेपण त्यांजकडेच आलें. पंढरपुरीं विठ्ठलाचे उपचार बाबांनीं वाढविले. शेजारतीचे वेळीं देवाची प्रार्थना बाबांपासून चालली आहे. पांडुरंगाच्या व रुक्मिणीच्या संस्कृत आरत्या त्यांनीं केल्या, त्याच देवापुढें नित्य ह्मणतात.

---

१ त्यांस पंढरीनाथाची आज्ञा झाली कीं, "विद्या सांगावी विद्यार्थियां । अन्न द्यावें क्षुधितां आलियां । आश्रमधर्म स्वीकारुनीयां । राहि सखया तूं येथें" ( भक्तमंजरीमाला अ. ५८ --४२,) या आज्ञेप्रमाणें बाबानीं आपलें आयुष्य वेंचलें.

२ पंढरी सोडूनि तीर्था जाणें । हें तों अयुक्त सर्वांगुणें ।
भीमातारीं मुक्ति पूर्ण । लोळती जाण वाळवंटीं ॥ ७३ ॥

( भ. मं. मा. अ. ५८ )

हरीपंत फडके यांनीं त्यांस एक चांगला वाडा दिला व किबेसाहेबांनीं वीस हजार रुपये खर्चून दागदुजी करून तो राहता केला. त्या वाड्यांत शिरतांच डाव्या बाजूचे खांबापाशीं बाबा-पूजेंत गुंतले असतां-एकदां दौलतराव शिंदे दोन तास हात जोडून उभे होते! इच्छा ही कीं बाबांनीं कांहीं इनाम गांवें घ्यावीं. पण बाबांनीं 'त्यांस देणें असेल तें श्री विठ्ठलाकडे द्या' ह्मणून सांगितल्यावर त्यांनीं देवळांत चौघडा सुरू केला. बाबा इतके निरिच्छ होते. त्यांचें तेज, दरारा, व भगवद्भक्ति यांचें लोक मोठ्या प्रेमानें अद्याप वर्णन करितात. वेदविद्या व शास्त्रविद्या पंढरीस बाबांनीं आणली. बाबा देवदर्शनास निघाले कीं, ते परत येईपर्यंत रस्त्यांस मनुष्य फिरकत नसे! ते नित्य अर्धघटिका पांडुरंगाची पूजा व प्रार्थना करीत व तोंपर्यंत बडवे मुद्दां गाभाऱ्याबाहेर उभे रहात; त्यांशीं प्रत्यक्ष पांडुरंग बोले अशी अद्याप त्यांची ख्याति आहे. याच पुण्यपुरुषानें 'धर्मसिंधु' रचिला.

७ एकदां विठ्ठल पाध्ये पुण्यास दक्षिणेसाठीं गेले असतां पोरपणाच्या अल्लडपणामुळें एकदम बाबांचे आसनावर जाऊन बसले, तेव्हां रामशास्त्री रागानें बोलले, 'या आसनाला पाय लावण्यापूर्वीं बारा वर्षे काशीवास केला पाहिजे!' हा अपमान विठ्ठलास फारच बोंचला, व तो तडक काशीस जाण्यास निघाला. तथापि बाबांनीं जरबेनें त्यास परत बोलावून पंढरीस आणलें. पण रामशास्त्र्यांचें अंजन फार जोराचें बसलें असल्यामुळें त्यांनीं बाबांच्या मागें हुटहुट लाविली व अखेर बाबांचे सल्ल्यानें तो काशीस गेला. काशी ह्मणजे संस्कृतविद्येचें आगर; शास्त्री पंडितांचें माहेर! निळकंठशास्त्री थत्त्यांचे गुरु अहोबलशास्त्री, अमृतरायाचे गुरुबंधु अद्वैतानंद, वगैरे अनेक बडीं प्रस्थें तेथें होतीं. कृष्णंभट्ट आर्डे यांजपाशीं विठ्ठल पाध्ये शिकायला राहिले. त्यांचे घरींच ते भोजनादि करीत. परम कष्ट करून व बुद्धीचा उत्तम व्यय करून ते नामांकित झाले, व काशीभर गाजले. न्यायव्याकरणादिकांत प्रवीण झाले, त्यांत त्यांचा व्याकरणाचा बाणा होता. बाबा रोज ४० अध्याय भागवत वाचून उपरांतिक भोजन करीत. ते भगवद्भक्त होते व त्यांचा धर्मशास्त्राचा बाणा होता. विठ्ठल पाध्ये काशीस असतांना बाबांनीं आपला 'धर्मसिंधु' काशीस्थ पंडितांच्या परीक्षणार्थ पाठविला, व लिहिलें कीं, 'त्यांस पसंत पडल्यास बरें, नाहींतर गंगेंत बुडीव.' काशीकर पंडितांनीं महिनाभर त्याची चिकित्सा करून तो पसंत केला व तो पालखींत मिरवून आठ दिवस गंगातीरीं दीपो-

त्सव केला. यानंतर तो ग्रंथ सर्वत्र पसरला. मोरोपंतांस बाबांनीं लिहिलेलीं कांहीं पत्रें सांपडलीं आहेत, त्यांत विठ्ठल पाध्ये काशीस सहकुटुंब गेल्याचा उल्लेख आहे. असो; विठ्ठल पाध्यांनीं गुरुगृहीं राहून विद्या पुरी केली. एकदां गुरुगृहीं श्राद्ध होतें. गुरुपत्नी नित्य पतीच्या आज्ञेप्रमाणें त्यांचें ताट वाढून नेमलेल्या जागीं ठेवी, व हे सवईप्रमाणें जेवीत. त्यांच्या अध्ययनास कोणी व्यत्यय आणीत नसत. श्राद्धदिवशीं त्या ठिकाणीं ब्राह्मणांच्या उष्टया पत्रावळी झांकून ठेविल्या होत्या. ' ब्रह्मानंदीं लागली टाळी । कोण देहातें सांभाळी, ' या कोटींतले विठ्ठलपाध्ये ! ते नित्याप्रमाणें आपल्या ठिकाणचें अन्न खाऊन पुन: अध्ययनास बसले ! गुरुपत्नीस झालेला प्रकार समजतांच ती घाबरली व तिनें पतीस खरा प्रकार सांगितला. गुरूनें क्षणैक चिंतन करून या कृतविद्य शिष्यास स्वगृहीं जाण्यास परवानगी दिली! धर्मसिंधुकारांचे बंधु, स्वत: पंडित, ह्मणून त्यांस झांशीच्या राणीनें पालखी पाठवून सन्मानानें झांशीस नेलें, व पूजा केली. तेथें स्वत: पूजा न घेतां विठ्ठलांनीं पाटाची पूजा करविली; कारण बोलले ' बाबा जिवंत आहेत. पूजेचे अधिकारी ते आहेत ! ' राणीनें विठ्ठलपाध्यांवर सोन्याचीं फुलें उधळलीं. हैदराबादेस हाच थाट झाला. तेथें रत्नखचित हार त्यांच्या गळ्यांत पडला. याप्रमाणें पूजा घेत घेत ते उत्साहानें माहुलीकडे वळले, व ह्मणाले कीं, 'आधीं रामशास्त्र्यांचें दर्शन घेईन. ते गुरु झाले, माझ्या विद्येची किंमत ते करितील.' वाटेंत त्यास समजलें कीं ते आटपले, तव्हां विठ्ठलपाध्ये ढळढळां रडले व बोलले, 'माझ्या विद्येचा परीक्षक गेला, आतां ही विद्या कोणास दाखवूं? ' रामशास्त्रीही ह्मणत कीं, ' मजमागें पुण्याचें न्यायाधीशाचें काम विठ्ठल पाध्ये करील.' नंतर विठ्ठल पाध्ये परत पंढरीस आले. हार वगैरे बाबांपुढें ठेविले. बाबांनीं हार पांडुरंगाच्या गळ्यांत घातला. ही बंधुप्रीति, ही विरक्ति, ही भक्ति! असले राष्ट्रीय गुण राष्ट्रांत होते तोंपर्यंत मराठे, मोंगल व टोपीकर यांस पाणी पाजीत होते! पेशवाईच्या उत्तरार्धांत पुण्यास रामशास्त्री प्रभुणे व निळकंठशास्त्री थत्ते,व पंढरीस बाबा आणि तात्या पाध्ये हीं प्रस्थें फार मोटीं होतीं यांनीं महाराष्ट्रांत संस्कृतविद्येचें पुनरुज्जीवन केलें. पेशव्यांची दक्षिणा व रामशास्त्र्यांची परीक्षा यांच्या उत्तेजनानें पुणें शहरीं संस्कृत विद्येचा जयजयकार होऊं लागला. बाबा पाध्ये व विठ्ठल पाध्ये यांनीं संस्कृत विद्येचा प्रसार पंढरीस राहून केल्यामुळें कर्ममार्गी पंडितांस भक्तिमार्गाची गोडी लागूं लागली.

रामशास्त्र्यांच्या पश्चात् पुण्यास न्यायाधीशाचें काम निळकंठशास्त्री थत्ते यांनीं केलें. निळकंठशास्त्र्यांचे शिष्य मेरुशास्त्री, कृपाशास्त्री, राघवेंद्राचार्य गजेंद्रगडकर, नारायणशास्त्री व भास्करशास्त्री अभ्यंकर, कृष्णशास्त्री व मोरशास्त्री साठे, त्रिंबकशास्त्री शाळिग्राम ( यांचे शिष्य भीकूशास्त्री गोडबोले व त्यांचे भीमाचार्य झळकीकर ) वगैरे विद्वान् प्रसिद्ध होऊन गेले. विठ्ठल पाध्यांच्या शिष्यांत राघवेंद्राचार्य, पुण्याच्या सभेंत 'वैय्याकरणकेसरी' ही पदवी पावलेले व 'मल्यावरही माझें हाड व्याकरण बोलेल,' ह्मणून गरजणारे कृष्णाचार्य, श्रीनिवासाचार्य तिरूपती, श्रीपत्याचार्य वगैरे अनेक पंडित झाले. दोनदोनशें विद्यार्थी कानडा ह्मैसुरापासून विद्याभ्यासास पंढरीस येत. याप्रमाणें बाबा व त्यांचे बंधू तात्या यांचीं संक्षिप्त चरित्रें आहेत.

८ तात्यांचे जेष्ठ बंधु ' श्रीबाबा संन्यस्त होऊन शके १७२७ मध्यें सिद्धीस पावले ', असा लेख आहे. विठ्ठल पाध्ये यांनींही निःस्पृहतेनें त्यांचे मागें ११ वर्षें संसार चालविला, बाबांच्या कीर्तीमुळें व त्यांच्या विद्वत्तेमुळें कोणीही राजेरजवाडे पंढरपुरीं आले ह्मणजे देवदर्शनानंतर पाध्यांचेच भेटीस जात. स्वराज्य होतें तेव्हां सहज संसार थाटांत चाले. पण पेशवाई शके १७४० मध्यें बुडाली. देशांत बंडाई माजली. लोकांस पुढचें चित्र दिसायला लागलें. विठ्ठल पाध्ये यांस इतर आप्तेष्टांनीं सांगितलें कीं, ' तुह्मीं आजवर इनामें वगैरे घेतलीं नाहींत, तें चाललें; पण यापुढें दिवस कठीण येतील. मुलाबाळांची तर्तूद पहा. ' पाध्यांचें वजन अतिशय होतें. शके १७४५ सालीं विठ्ठल पाध्ये बाहेर पडले, व सहा महिन्यांतच त्यांनीं तीन हजारांचीं इनामें संपादिलीं ! हे सारे कागदपत्र व सनदा मीं स्वतः पाहिल्या आहेत, त्या याच एका सालच्या आहेत. बाळाबाई शितोळे ( दौलतराव शिंदे यांची आत्या ), मिरजकर, सांगलीकर, रामदुर्गकर, निपाणकर, फत्तेसिंग भोसले, जमखिंडीकर, सरकार परांडा, वगैरेकडून मिळून दोन तीन हजारांचें सालीना उत्पन्न पाध्यांस मिळालें. निजाम सरकाराकडून ७२० रुपयांची देणगी होती, ती अलीकडे वऱ्हाड प्रांत इंग्रजांनीं घेतला त्यांत गेली! आज मित्तीला पाध्यांकडे—सुमारें दोन हजारांचें उत्पन्न आहे. याप्रमाणें विठ्ठल पाध्ये हिंडून आले, तोंच त्यांचे शिष्य श्रीआप्पाचार्य बडोद्यास संभावनेसाठीं गेले होते, त्यांस २५ हजार रुपये दक्षिणा मिळाली ती त्यांनीं पंढरपुरीं ' गुरुदक्षिणा ' ह्मणून पाठविली ! इतक्यांत विठ्ठल पाध्ये आटोपले. देशांत सु-

वृत्ता होती, तेव्हां विद्येचें असें चीज होत असे. स्वराज्य, सुवृत्ता, सुस्थिति यांचा काळ संपला. चक्र फिरलें. नागकवीनें ह्मटल्याप्रमाणें:—

**पेशवाइचें राज्य बुडालें केवढा बसला धक्का।**
**देखत देखत घरांत शिरला पहा! फिरंगी बोका॥**

९ बाबा पाध्ये व विठ्ठल पाध्ये यांची संक्षिप्त माहिती येथवर दिली आहे. आतां मोरोपंत व सदर पाध्ये यांचा परस्पर संबंध त्यांच्या पत्रव्यवहारावरून उघड करून दाखवावयाचा आहे. बाबा पाध्ये नामांकित धर्मशास्त्री होते, व मोरोपंत नामांकित कवि होते. तथापि दोघेही समविद्य, समरसिक, व खरे भगवद्भक्त असल्यामुळें आपल्या समाजांत आप्तपणा सामान्यत: विटुष्ट पाडण्यास कारण होतो तसा प्रकार न होतां त्यांचा स्नेह आमरण कायम राहिला.

१० पंतांस रामकृष्ण हा दुसरा पुत्र त्यांच्या ३१ व्या वर्षी ह्म. श. १६८२ साली झाला. पंत विठोबादादांस एका पत्रांत लिहितात:-" श्रीभगवद्दयापात्र राजश्री गुरुपुत्र श्रीकाशिनाथोपाध्याय यांसी साष्टांग नमस्कार सांगावे. पृथक पत्र लिहिलें नाहीं ह्मणून विरस न व्हावें, आप्तांस बहुत काय लिहावें हे विनंति." यांत बाबांस पंत आप्त ह्मणतात. याच पत्रांत भगवंतराव प्रतिनिधि दिवंगत झाल्याचा ताजा उल्लेख आहे. यावरून हें पत्र शके १६९७ मध्यें लिहिलें होतें असें वाटतें, कारण याच सालीं भगवंतराव वारल्याचा दाखला इतिहासांत सांपडतो. या दोन लेखांवरून रामकृष्ण १५ वर्षांचे होण्यापूर्वींच बाबा पाध्यांनीं आपली कन्या आवडी उर्फ आऊताई ( सासरचें नांव सुंदराबाई ) त्यांस देऊन पंतांस आपले व्याही करून घेतलें होतें असें दिसतें. रामकृष्णपंडित कांहीं वर्षें विद्याभ्यासासाठीं बाबा पाध्यांजवळ पंढरपुरीं राहत होते.

११ बाबा पांडुरंगभक्त व रसिक असून आपल्या व्याह्याच्या कविता प्रेमानें वाचीत; व पंतही त्या अभिप्रायार्थ व शोधनार्थ त्यांच्याकडे पाठवीत

---

१ शके १६९६ च्या पूर्वी पंतांची 'आर्याकेकावलि' प्रसिद्ध झाली होती. या प्रेमळ आर्या तात्काळ सर्वत्र फैलावल्या होत्या. बाबांनीं केकीचा [ मयूराचा ] गौरव करून मोठ्या प्रेमानें पुढील आर्या त्यांजकडे पाठवून दिली;—

**ऐकुनि विश्व सुखावें, ज्या केकीचा अपूर्व तो टाहो।**
**त्याला आयुष्याचा ईश कृपेनें कधीं न तोटा हो!॥ १॥**

याबद्दल पंतांच्या पत्रांत जागोजाग उल्लेख आहेत. विठोबादादांस पंतांनीं लिहिलेल्या पत्रांतून खालील वाक्यें सांपडतात.

"आपणाकडे मनोरथराजि पुस्तक पाठविलें आहे. श्रीमद्वेदशास्त्रसंपन्न रा. बाबा व आपण मिळोन वाचावें."

"श्रीमदुपाध्याय श्रीबाबा यांजकडे श्रीहरिहरार्या पाठविल्या आहेत. आपणही तन्मुखें श्रवण करून सफल कराव्या.'

"श्रीगणेशचरित्र व श्रीदेवीचरित्र एकुण पत्रें १४ बाबापाध्ये यांजकडे पाठविलीं आहेत. ते पाहून तुह्मांस देतील. शिवाय सुदामचरित्र पत्रें १४ एकूण २८.,,

"मुक्तामाला श्री बाबांकडे पाठविली आहे. केवळ गीर्वाण वाणी आहे."

"मंत्ररामायण बाबा शोधितील मग लिहावें. सुश्रुत ग्रंथ श्री बाबा उपाध्याय यांसी पावता करावा."

या अवतरणांवरून पंत आपली संस्कृत व मराठी कविता ही बाबांच्या अवलोकनासाठीं व शोधनासाठीं पाठवीत, याविषयीं शंका रहात नाहीं. भर्तृहरीच्या शतकत्रयावर आर्या करण्याविषयीं बाबा एका पत्रांत पंतांस सुचवितात.

"पूर्वीं दोन पत्रें आपणांस लिहिलीं त्यांत भर्तृहरीच्या आर्यांविषयीं लिहिलें होतें. त्याचें उत्तर न आलें. त्यामुळें प्रस्तुत मुजरत माणूस पाठविला आहे. तरी आर्या तयार झाल्या असल्या तरी पाठवून द्याव्या. नसल्या तरी त्वरेनें तयार होऊन येतील असें झालें पाहिजे." बाबांच्या या सूचनेप्रमाणें पंतांनीं भर्तृहरीच्या श्लोकांवर आर्या केल्या असें दिसत नाहीं. वामनाच्या गीतासमश्लोकींवर, अभिप्राय देतांना 'रीति समश्लोकीची अतुला साधेल काय अन्यास' असें पंतांनीं ह्मटलें आहे, त्यावरून पंतांनीं असा प्रयत्न करून पाहिला असावा असें वाटतें. संस्कृत पंचमहाकाव्यांच्या धर्तीवर आपल्या ह्या पंडित व्याह्याचींही महाकाव्यें असावीं या ईर्ष्येनें बाबांनीं पंतांस जें पत्र लिहिलें होतें, तें मागें तिसऱ्या प्रकरणांत दिलेंच आहे. बाबा पंतांस गुरुजनांत गणीत. वडीलधाऱ्या पूज्य माणसांस गुरुतुल्य लेखण्याचा जुना सांप्रदाय होता. बाबांनीं रुक्मिणीपत्रिका ह्मणून २१ आर्या केल्या आहेत, त्यांचे शेवटीं " श्रीमदार्याचार्य मयूरेश्वराशिक्षित महामहोपाध्याय काशीनाथविरचितार्यैकविंशतिः समाप्ता" असें लिहिलें

आहे. त्यांतही पंतांची यमकाची धाटणी त्यांनीं उचललेली दिसते. बाबांची त्यांतील एकच आर्या पहा.

**दे भजनदान अणखी सुखाकरा लोकदा नको कांहीं ।**
**त्या मागिजे द्विजांहीं दिवाकरालोकदान कोकांहीं ! ॥ २० ॥**

ही पंतांच्या सहवासापासून जडलेली यमकप्रीति बाबांच्या धर्मसिंधूंत व आर्यांतही दिसते.

काशिनाथबाबांचा धर्मसिंधु शके १७१२ मध्यें झाला असें प्रथम परिच्छेदांत संक्रांतीचे दानसमयीं जे अयनांश सांगितले आहेत त्यावरून सिद्ध होतें. श्रीमद्भागवताच्या दशमस्कंधावर दोन्ही व्याह्यांच्या टीका आहेत. बाबांचें संस्कृत 'तृष्णीसार' व पंतांचा प्राकृत 'कृष्णविजय.' मराठी कवींतल्या रघुनाथपंडित व आनंदतनय ह्या व्याह्यांच्या जोडीसारखीच ही जोडी आहे. काशिनाथ बाबा, मोरोपंतांच्या मागून नातवंडें पाहून, अकरा वर्षांनीं शके १७२७ मध्यें आटोपले.

१२ पंतांचे चिरंजीव रघुनाथपंत व रामकृष्णपंत हे आपल्या परिवारासह बारामतीसच होते. बाजीराव पेशव्यानें बारामतकरांचा वाडा व सारी दौलत जप्त केल्यावर आश्रयाभावामुळें त्यांची बरीच दैना झाली. पुढें पेशवाईही लयास गेली, तेव्हां विठ्ठल पाध्ये यांनीं एक पत्र देऊन रामकृष्णपंतास हैद्राबादेस पाठविलें. हैद्राबादचे दिवाण प्रसिद्ध कायस्थ पंडित चंदूलाल ( इ. स. १८१८-१८४३ ) हे आपल्या औदार्यामुळें सर्व हिंदुसमाजास फार मान्य झाले होते. त्यांनीं भरतखंडांतल्या गुणी पुरुषांस पुष्कळ जहागीरी व इनामें दिलीं. असो. विठ्ठलपाध्यांनीं चंदूलालास इ. स. १८२५ च्या सुमारास लिहिलेलें पत्रच मात्र देतों:—

" श्रीमत्सकलराजकार्यधुरंधरेषु स्वसंपत्समृद्धिप्रसाधितपुरंदरेषु श्रीमच्चंद्रलालाभिधानेषु महाप्रधानराजबहादरेषु प्रभुषु,

श्रीपौंडरीकक्षेत्राधिवासीविठ्ठलोपाध्यायप्रयुक्ताशीराशिसहस्रं प्रतिघस्रं समुल्लसंतु श्रीशकृपयास्ति क्षेमं हे विशेष.

चिरंजीव राजश्री रामकृष्ण पंडित बारामतीकर जगत्प्रसिद्ध महाभगवद्भक्त श्रीमोरोपंत बाबा यांचे पुत्र स्वतो विद्वान्, सुशील, शांत, दांत हे आपली उभयलोकीं गीयमान कीर्ति श्रवण करून आपले दर्शनार्थ आले आहेत, तर त्यांचा यथोचित सत्कार करावा. वडिलांनीं निरंतर श्रीभगवत्सेवा केली.

योगक्षेम श्रीशांनीं एका बारामतकरांच्या हातून चालविला. सांप्रत ते[1] काशीस गेले, यास्तव आपले आश्रयार्थ आले आहेत, आपण सरकारांतून किंवा स्वतः यांचें नियत स्वास्थ्य करून देऊन श्रीक्षेत्रपंढरींत वास करून श्रीशसेवा यांस नैश्चिंत्यानें घडेल तें करावें, याविषयीं आपणांस श्रीकृपेनें सामर्थ्य, औदार्य, निरंतर अभ्यास, दिला आहे. साफल्य करावें याविषयीं आपण योग्य आहांत, किंबहुना सूज्ञमूर्धन्येषु धन्येषु इत्याशिषः"

हें पत्र घेऊन रामकृष्णपंत भागानगरास गेले. तेथील भेटीचें वर्णन त्यांनीं एका पत्रांत केलें आहे, पण तें लांब असल्यामुळें देतां येत नाहीं. रामकृष्णपंतांची चंदूलालानें संभावना करून त्यांस५००रुपयांचें जें वर्षासन दिलें, तें सारोळें गांव पंतांच्या वंशजांकडे कांहीं वर्षें चाललें, पण पुढें तें इनामकमिशनच्या धामधुमींत जप्त झालें! याप्रमाणें पंतांचे आप्त, मित्र व हितकर्ते पाध्ये यांची थोडक्यांत हकीकत दिली आहे. पंतांच्या घराण्याचा पाध्यांच्या घराण्याशीं फारच निकट संबंध होता. मोरोपंत पन्हाळगडावर असतांना केशव पाध्ये व गणेश पाध्ये हे पंतांचे गुरु झाल्यामुळें पंतपाध्यांचा जो संबंध जडला, तो पंत बारामतीस आल्यावर बाबापाध्यांची मुलगी पंतांनीं आपली सून केल्यामुळें दृढतर झाला, व विठ्ठलपाध्यांच्या मध्यस्तीनें पंतांच्या चिरंजीवास सारोळें गांव इनाम मिळाल्यानंतर तर पंतांचें घराणें पाध्यांच्या उपकृतिभाराखालीं निरंतरचें राहून गेलें. याप्रमाणें पंतपाध्यांचा संक्षिप्त इतिहास आहे.

---

१ बारामतकरांच्या दौलतीचें देशबुडव्या बाजीरावानें वाटोळें केल्यानंतर बारामतकरांच्या वंशजांनीं काशीवास पत्करिला हें मागील प्रकरणांत सांगितलेंच आहे.

# प्रकरण सातवें.



## पंतांचें मित्रमंडळ

**तो मित्र होय बापा! पापाचारांत जो बुडों नेदी ॥ १ ॥**

—प्रश्नोत्तरमाला.

१ विषयप्रवेश. २ पंतांचें मित्रत्व; थोरांची अनास्था. ३ पंतांचे बारामतींतले मित्र. ४ विठोबा दादा चातुर्मासे यांचें चरित्र. ५ पंतांचीं विठोबा दादांना गेलेलीं पत्रें. ६ पंतांची विठोबादादांवर कविता. ७ जिजीबाईवर पंतांची आर्या ८ विठोबादादांचे दोन अभंग. ९ भैराळ बोवा चातुर्मासे. १० कोल्हापूरचे सिद्धेश्वर महाराज. ११ सिद्धेश्वर व पंत यांची भेट. १२ सदाशीव पाध्ये कऱ्हाडकर. १३ विठोबा ताहराबादकरांचीं पंतांस दोन पत्रें. १४ बाळंभट काजळे यांचें पंतांस एक गद्यात्मक व एक आर्यात्मक अशीं दोन पत्रें. १५ रामचंद्र अद्वैत याचें पत्र. १६ कोल्हापूरचे दाजीबा पुजारी. १७ रामचंद्र अनंत बडवे. १८ राम बडवे याच्या पंतांवर आर्या. १९ रामबडव्याच्या मार्मिक अभिप्रायाची योग्यता. २० रामजोशी सोलापूरकर. २१ रामजोश्यांचें चरित्र, व कवित्ववक्तृत्वादि गुण. २२ रामजोश्याचा अंत. २३ रामजोश्यांची कविता. २४ रामजोशी व पंतांची आर्या. २५ पंत व रामजोशी यांची भेट. २६ आर्येच्या अनेकार्थत्वाबद्दल जोशीबोवांची कोटी. २७ निरोष्ठ्यरामायणाबद्दलची कथा. २८ रामजोश्याचा पंतांच्या मंत्रभागवतावर अभिप्राय. २९ पंतांचे समकालीन कवि.

१ मोरोपंतांसारख्या सात्विक व विद्याव्यासंगी सत्कवीच्या स्नेह्यांचें व भक्तांचें मंडळ फार विस्तृत होतें यांत कांहीं नवल नाहीं. रामजोशी बावांनीं पंतांच्या आर्या कीर्तनप्रसंगीं ह्मणायचा प्रघात पाडल्यामुळें त्या लोकप्रसिद्ध झाल्या अशी सार्वत्रिक समजूत आहे. पण जोशीबोवांचा व पंतांचा स्नेह जमण्यापूर्वीं पंतांच्या आर्या काशीरामेश्वरापर्यंत गाजल्या होत्या, सर्व महाराष्ट्रभर आर्याभक्त उत्पन्न झाले होते, ते पंतांचीं आख्यानें तयार होतांच मोठ्या उत्सुकतेनें मागवून लेखनपठणासाठीं नेत असत, प्रसंगीं अमुक अमुक प्रसंगावर काव्य करून आह्मांकडे पाठवा अशा सूचना पंतांकडे अनेक येत असत, व यथाकाल पंत त्या सूचनांचा आदरही करीत; या गोष्टी

आतां पत्रव्यवहारावरून उघड होत आहेत. जोशी बोवांची कीर्ति मोठी, त्यांची वाणी मोठी रसाळ, त्यांचें निरूपणसामर्थ्य व वक्तृत्व लोकोत्तर, त्यांचें अनुयायीमंडळ मोठें व त्यांचा संचार सर्वत्र, यामुळें पंतांची आर्या आबालवृद्धांच्या कानांवर पडावयाला जोशीबोवांची वाणी कारण झाली हें खरें, तथापि जोशीबोवांच्या अगोदरही पंतांच्या आर्येचे भोक्ते अनेक निर्माण झाले होते व पंतांची आर्या आपल्या मोहक गुणांमुळें लोकादरास अगोदरच पात्र झाली होती. पंतांना एक शतक होऊन गेलें आहे. पंतांच्या स्नेह्यांचीं व भक्तांचीं नांवेंही आज कोणाला माहीत नाहींत. यामुळें पंतांचा व त्यांच्या मित्रांचा जो पत्रव्यवहार झाला असेल त्याचा आतां पत्ता लागणें दुरापास्त झालें आहे. पंतांचा व त्यांच्या आप्तेष्टांचा सारा पत्रव्यवहार जर उपलब्ध होता तर त्यांच्या चरित्रावर केवढा प्रकाश पडला असता ! अस्तु. मला सांपडलेल्या पत्रादिकांच्या साह्यानें हा भाग यथाशक्त्या पुरा करणें प्राप्त आहे.

२. पंतांचे आप्त व स्नेही काशिनाथबावा पाध्ये यांची हकीकत व त्यांचा परस्पर संबंध याबद्दल मागील प्रकरणांत विवेचन केलेंच आहे. या प्रकरणांत पंतांचे मित्र विठोबा दादा चातुर्मासे, सदाशिव पाध्ये, बाळंभट काजळे, रामजोशी, विठोबा ताहराबादकर, रामचंद्र वडवे, रामचंद्र अद्वैत, मैराळबावा व चिंतामणि जोशी, यांच्याबद्दल मिळालेली माहिती वाचकांस सादर करावयाची आहे; व पत्रव्यवहार व काव्यें यांच्या आधारानें त्यांचा व पंतांचा काय संबंध होता हें दाखवावयाचें आहे. पंतांचा स्वभाव सरळ व गोड असल्यामुळें एकदां जडलेला स्नेह उत्तरोत्तर वृद्धिंगतच होत असे. पंतांच्या सुस्वभावामुळें, भगवद्भक्तीमुळें, किंवा कवित्वामुळें त्यांच्यावर शुद्ध प्रेम करणारे सज्जन पंतांच्या काळींही बरेच होते. पंतांच्या मित्रमंडळींत मध्यम स्थितींतले पण रसिक व प्रेमळ असेच लोक होते. तो काळ जरी स्वराज्याच्या ऐश्वर्याचा होता, तरी श्रीमंत व सरदार लोक, किंवा लढाईच्या कामांत गुंतलेले मोठमोठे वीर व मुत्सद्दी, यांपैकीं कोणीही पंतांची भेट सुद्धां घेतलेली दिसत नाहीं! पुण्यापासून बारामती कांहीं लांब नव्हती. पंतांसारख्या गुणी मनुष्याची पारख तेव्हांच्या नांवाजलेल्या वीरमुत्सद्यांस झाली होती असें दिसत नाहीं. दूरदूरचे सामान्य स्थितींतले रसिक मात्र पंतांच्या आर्यांचें कौतुक करीत, पण वरिष्ठ दर्ज्याचे श्रीमंत लोक बहुधा आपल्या ऐषआरामांत, विषयसुखांत, व आपल्या मोठेपणाच्या धुंदींत निमग्न

असत. व लढवय्यांचीं वगैरे कामें करणारीं व राजकारणांत गुंगलेलीं माणसें बहुधा परमार्थविमुख असत. पेशवाईतले बहुतेक सारे राजकारणी पुरुष केवळ रजोगुणी होते. शिवाजी महाराज साधुसंतांच्या दर्शनाविषयीं जसे लोलुप असत, व हरतऱ्हेच्या गुणी नररत्नांचा संग्रह करण्याचें त्यांना जसें वेड असे, तसा प्रकार पुढच्या राज्यकर्त्या पुरुषांचा दिसत नाहीं. शिवरायांच्या अंतःकरणांत भक्तीचा ओलावा होता, 'धर्मरक्षणासाठीं आह्मीं फकिरी घेतली आहे,' असें त्यांस निरंतर वाटत असे, ते नित्यसत्वस्थ होते, यामुळें सर्व प्रकारच्या गुणी मनुष्यांची, मुख्यतः संतांची, विचारपूस करण्याची त्यांच्या ठिकाणीं बुद्धि होती. त्यांना संतांची योग्यता जाणण्याची शक्ति होती. शिवरायांच्या पश्चात् मराठीराज्यांत केवळ रजोगुणी अशा बऱ्याच खालच्या दर्ज्याच्या वीर मुत्सद्यांच्याच हातीं साऱ्या राष्ट्राचीं सूत्रें आलीं होतीं. केवळ राजकीय विषयांच्या आखाड्यांत कुस्त्या खेळून एकमेकांस चीत करण्यांत व बुद्धिबलानें किंवा बाहुबलानें आपली लौकिक उन्नति करून घेण्यांतच त्या काळचे महाराष्ट्रीय कर्ते पुरुष दंग होऊन गेले होते. शिवरायाच्या भूमिकेचे पुरुष कोणी नव्हते. पंतांनीं तुकारामस्तुतींत ह्मटलेंच आहेः—

**सुज्ञ शिवाजी राजा न ह्मणे तुकयासि काय साधु निका ? ।**
**तत्पंडितप्रधानां न कळे गुण, समज फार आधुनिका ! ॥ २२ ॥**

या आर्येंत आपल्या राष्ट्रांतल्या खऱ्या साधूंची पारख नसणाऱ्या पंडित प्रधानांवर पंतांनीं जो आक्षेप घेतला आहे तो तत्कालीन इतर पुढाऱ्यांवरही बहुधा तसाच लागू पडतो. पंत काशीयात्रेस जावयास निघाले तेव्हां चोळीमहेश्वराहून अहल्याबाईनें पालखी पाठवून त्यांना सन्मानानें पाचारून नेलें व त्यांस चार दिवस तेथें ठेवून घेतलें, पण नाशकापासून कोल्हापूरापर्यंतच्या टापूंत नावाजलेल्या वीरमुत्सद्यांनीं या संतकवीबद्दल फारच अनास्था दाखविली! असो. वरच्या मंडळींपैकीं कोणी पंतांची विचारपूस केली नाहीं, तर पंतही कोणा राजाला किंवा महाराजाला आपलें काव्य अर्पण करायला धांवले नाहींत! 'तनु निर्वाहापुरता संग' धरून ते आपल्या आयुष्याचा सद्व्यय करीत होते. सामान्य स्थितींतल्या रसिकांनीं पंतांचीं किंमत जाणली होती. पंतांचे मित्र एक तर भक्त होते, किंवा रसिक होते. विठोबा दादांसारखे सच्छील भक्त, रामजोशासारखे असच्छील पण रसिक कवी, व रामचंद्र बडव्या सारखे रसज्ञ, हे पंतांच्या सदाचाराला, कवित्वाला, व भगवद्भक्तीला

मुळून गेले होते. पंतांचे मित्र त्यांच्याच सारखे भाविक होते. पंतांनीं मित्राची व्याख्या अशी केली आहे कीं 'जो पापाचारांत बुडों देत नाहीं तोच मित्र होय!' सन्मित्राच्या सहवासांत '**अघ शमतें, सुख गमतें, मन रमतें, जेविं दिव्य संगीतीं.**' सन्मित्रोक्ति हें संसारतापानें दग्ध झालेल्या मनाला उत्तम प्रकारचें भेषज आहे असें पंतांनीं ह्मटलें आहे. '**सन्मित्रोक्ति करी जें अमृतनदाची न ते करी लहरी.**' ( भीष्मपर्व. अ० ४ ) असमशीलांचा स्नेह जडणें अशक्य आहे असें पंत ह्मणतात:—

**मित्र सधन सधनाचें, साजे गोदुग्ध मित्र गोदुग्धा, ॥ २ ॥**
**श्रोत्रियसख अश्रोत्रिय, शूरसख क्लीब, सुकविसख अकवी ।**
**आह्मां असें नसे श्रुत, हंससख न मानसस्थ ही बक वी ॥५॥**

—आदिपर्व अ०२३

मित्राचें लक्षण पंतांनीं एका सुभाषितरूप आर्येंत असें केलें आहे:—

**स्नेह करी, हृष्ट करी, तर्पी, रक्षी, सदैव संमानी, ।**
**पावे सुखें सुखहि तें मित्र ! असें ह्मणति सर्वहि ज्ञानी॥१८॥**

-कर्णपर्व. अ०२९

संकटकाळीं मित्राशिवाय कोणी उपयोगीं पडत नाहीं हा साऱ्या जगाचाच अनुभव आहे. '**कष्टीं न टिके दीनाजवळ इतर, एक परि सखा टिकतो.**' ( विष्णुपदवकिली ) सज्जनांचा स्नेह जडणें फार कठिण आहे, पण एकदां जडलेला स्नेह कधींही तुटत नाहीं, असा पंतांसारख्या सज्जनांचा अनुभव आहे. '**स्नेहबंधन सज्जनें भुवनत्रयींहि न तोडिलें.**' ( छंदोरामायण ) पंतांना बाळपणापासून मरेतोंपर्यंत स्नेह्यांबद्दल फार प्रेम वाटे, व रसिकमित्रसंगतीबद्दल तर ते फारच उत्कंठित असत. रामायण, भारत, भागवत यांतील भगवद्भक्तिपर किंवा ज्ञानपर विषयांवर सुखसंवाद करावे, 'सततं कीर्तयन्तो मां' अशांच्या संगांत निर्विषय विषयाची चर्चा करून परस्परांचा आनंद पोषीत असावें, 'जनांच्या निंदास्तुति किंवा वधूधनांच्या वार्ता' सोडून भगवत्प्रेम देत–घेत किंवा काव्यरस पीत–पाजीत आनंदानें काळ सारावा, 'कीर्तयन्तश्च मां नित्यं तुष्यन्तिच रमन्तिच' याप्रमाणें जगांत सुखसंवृद्धि करीत सर्वत्र आनंदाचाच वर्षाव करावा,—याप्रमाणें पंतांनीं आपल्या सुशील मित्रांच्या सहवासांत काळ काढला. रामरीतींत ते ह्मणतात:—

**सद्व्यसनीं वेंचावें आयुष्य, नसेचि भरंवसा याचा ।**
**झालों जीर्ण तरि मनीं आहे रसिकांत भर वसायाचा! ॥ ६७ ॥**

असो. आतां पंतांच्या मित्रांबद्दल व चहात्यांबद्दल मिळालेल्या अल्पस्वल्प माहितीच्या आधारानें या भागाची उभारणी करूं.

३ पंतांचें वास्तव्य बारामतीसच असल्यामुळें त्यांच्या तत्रस्थ मित्रांबद्दल प्रथम लिहितों. पंतांच्या गुणांवर व कवित्वावर लुब्ध झालेले व त्यांजवर शुद्ध प्रेम करणारे मित्र खुद्द बारामतीस कांहीं कमी नव्हते. पंत आबालवृद्धांस फार प्रिय असत, सर्व जातींचे व सर्व दर्ज्यांचे लोक त्यांजवर फार प्रेम करीत, व त्यांचेंही सर्वांवर निर्मळ प्रेम असे. याबद्दल विशेष चर्चा पुढें काशीयात्रा प्रकरणांत होईल. विष्णुपदवकिलींत[१] त्यांनीं बारामतीच्या कित्येक मित्रांचा उल्लेख केला आहे. त्यांत 'साधुमन व रसिक दामोदर, 'गुणरत्नांचा डबा कमलाकर, ' बंधु आबा जसें प्रेम करितो तसें द्रवोनि प्रेम करणार ' बाबा, ' केवळ माझ्या प्रेमामुळें ' काशीस बरोबर येणारे कुंटे, ' मजवरी सुस्नेह करणारे सिंपी,' याप्रमाणें पंतांनीं आपल्या कित्येक मित्रांचे उल्लेख केले आहेत ! ' सन्मित्रपुत्र विठ्ठल, आर्यांच्या सेवनीं जया गोडी,'--ह्या विठ्ठलाबद्दल कांहीं ज्यास्त माहिती मिळती तर बरें होतें. नामरसायनांत पंतांनीं रघुनाथपंत कोशे, आपले शेजारी नारायण भट दाते, व अनंतनारायण बावा या तिघांबद्दल फार प्रेमळ उल्लेख केले आहेत:—

**रघुनाथपंत कोशे, संप्रति गेले समीप सेवेला ।**
**प्रेमें सिंचित होते या कवना ते, सखे जसें वेला!॥ ११२ ॥**
**श्रीनारायणभट्ट, ज्ञाते श्रीपांडुरंगपदभक्त ।**
**शेजारी मी त्यांचा, पुसतां कथितील वृत्त ते व्यक्त ॥ ११३ ॥**
**नित्य पुराणकथांचें यांस तुझ्यांस हि, असें समव्यसन ।**
**करितिल अनंतनारायण बावा, सर्व गुणसमुल्लसन ॥ ११४ ॥**
**दुर्गुण असेल तो हे कैसे कथितील? साधु कीं दर्पी ।**
**पाहे आत्मानुभवें, असतांही दोष, राममय सर्पी ॥ ११५ ॥**

---

१ अनंत नारायण दाते व त्यांचे चिरंजीव पांडुरंगभट, नारायणभट, व बाळकृष्णभट, हे सर्व चांगले विद्वान असून पंतांच्या घराण्याशीं त्यांचा फार सलोखा होता. दाते त्यांचें घर पंतांच्या घराच्या पश्चिमेस लगतच आहे. अनंतनारायणांचा एक चुलत भाऊ वासुदेवभट होता. यांचे उल्लेख गंगावकिलींत पंतांनीं केले आहेत. नाईक आपल्या आश्रितांसी फार सदयतेनें वागत. नारायणभटाच्या मुलीच्या ( हराच्या ) लग्नप्रसंगीं ' एक चावर जमीन व वस्त्रालंकार ' पांडुरंगराव नाईक यांनीं त्यांस दिली, दात्यांची मंडळी पंतांबरोबर काशीयात्रेस गेली होतीच. २ मारुतिरायांस

पंत आपलीं कवनें आपल्या गुरूंकडे, बाबापाध्ये, विठोबादादा वगैरेंकडे पाहण्यास पाठवीत असतच, पण खुद्द बारामतीस त्यांच्या कवनांचे विद्वान् रसिक व भाविक वाचक कांहीं कमी नव्हते. बारामति हा गांव मूळचा लहान होता, पण बाबूजी नाईकांनीं तेथें वास्तव्य केल्यामुळें बारामतीची वस्ती वाढली, व दाते प्रभृति पुष्कळ विद्वानांचीं घराणीं नाइकांच्या आश्रयास येऊन राहिलीं. असो. वरील सरस आर्यांतले पंताचे मित्र स्वर्गस्थ झाले होते असें वाटतें. पंतांचें मित्र 'प्रेमें सिंचित होते या कवनातें, सखे जसे वेला.' या चरणांत किती प्रेमळपणा भरला आहे! 'माझे मित्र प्रेमरसानें सिंचन करीत आहेत ह्मणून माझी काव्यलता भरभरून आपल्या पद्यसुमनांच्या परिमळानें दशदिशा दरवळून टाकीत आहे,' असें येथें पंत ह्मणतात!! 'अनंत नारायण बाबा तुह्मांस माझे गुण मात्र सांगतील, पण माझ्या दोषांचा हे तुह्मांपाशीं उच्चार सुद्धां करणार नाहींत. कारण सज्जनांचा धर्मच असा आहे कीं, 'आत्मौपम्येन' ते सर्वत्र पाहतात. यामुळें असलेले दोषही त्यांच्या राममय झालेल्या दृष्टीला दिसत नाहींत.' येथें पंतांची किंवा त्यांच्या मित्राची कां दोघांची तारीफ करावी हें मला कळत नाहीं! अनंत नारायण बावा शेवटीं पंढरीस विठोबादादांच्या घरीं जाऊन राहिले होते. त्यांस पंत एका पत्रांत लिहितात: "आपल्या सेवेशीं चित्त सादर आहे. विराट पर्वें ३२ साद्यंत पाठविलें आहे. श्रीचरणीं निवेदनप्रसाद सज्जनांकरवीं देऊन न्यून तें पूर्ण करून आरंभिलें श्रीमदुद्योगपर्व संजययानपर्यंत झालें हें पुढें चाले असें श्रीचरणापाशीं स्मरणपूर्वक प्रार्थून आशीःपत्रें सनाथ करावें हे विनंती." पंतांचा विनयमधुर स्वभाव या दोन वाक्यांवरूनच प्रतीत होतो. या पत्राच्या शेवटीं बावापाध्यांनाही नमस्कार लिहिला आहे. हें पत्र बावांच्या अवलोकनार्थ पाठविलेंच असलें पाहिजे. विठोबादादा, बाबा पाध्ये, पंत, अनंत बाबा, वगैरे संतमित्र जेव्हां पंढरीस एकत्र जमत असतील तेव्हां प्रेमसुखाचा मोठा रंग उडत असेल! असो. बारामतीस सिद्धनाथ रामदासी, (जन्म शके १६८७) राजाराम प्रासादीचे गुरु, हे सत्पुरुष राहत असत. त्यांच्या व पंतांच्या बैठकी गणपतीच्या देवळांत होत. पंतांपेक्षां हे वयानें फार लहान असत, तथापि हे मोठे अधिकारी होते. भक्तमंजरीमालेंत पुढील ओंव्या आहेत:—

**मोरोपंडित बारामतीचा। आवडता परम श्रीस्वामीचा॥**

**सन्निध आश्रम तयाचा । समागम ज्याचा सतत तया ॥ १॥**
**अतिस्नेह मयूरेश्वरीं । प्रेम सिद्धचरणांवरी ।**
**भूअंतर्गत बैसती विवरी ! संगतीं बरीं परस्परं ॥ २ ॥**

याच ग्रंथांत पुढें ह्मटलें आहे कीं, नित्य नरनारी, मुमुक्षु, यांची पंतांच्या दर्शनार्थ दाटी होत असे. असो. विठोबादादा प्रभृति पंतांच्या मित्रांकडे आतां आपण वळूं. बाबापाध्यांबद्दल मागच्याच प्रकरणांत लिहिलें आहे. आतां प्रथम विठोबादादांकडे वळूं.

४ **विठोबादादा चातुर्मासे:**—प्रांत औरंगाबाद तालुका शिल्लोड कसबे अनवे येथें बापूजीपंत नांवाचे भारद्वाज गोत्रीय एक शिवभक्त ब्राह्मण रहात असत, त्यांचे पुत्र विठोबा गोसावी हे होत. बापूजीपंतांच्या कुटुंबाचें नांव उमाबाई. विठोबादादा मामलतीचे कामावर बरींच वर्षे होते एकदां वरिष्ठ यवन अंमलदारानें द्रव्याभिलाषानें त्यांजवर कांहीं बालंट आणून त्यांस कारागृहांत टाकलें. तेथें ते नाथांचें भागवत व रुक्मिणीस्वयंवर या ग्रंथांचे पाठ करीत असतां सेवाधर्माचा त्यांस वीट आला व आयुष्य ईश्वरोपासनेंत न घालवितां द्रव्यार्जनांत व नीचसेवेंत घालविल्याचा पुरा पश्चात्ताप झाला! सुटका झाल्यास ईशसेवेंतच देहाचें सार्थक करण्याचा त्यांनीं संकल्प केला. दैवयोगानें त्यांजवरील आरोपांचें निरसन होऊन ते दोषमुक्त झाले व लागलीच बढतीचा हुकूम आला! पण पुन्हां परसेवेचा पट्टा त्यांनीं गळ्यांत अडकविला नाहीं! यापुढें आठ महिने अनव्यास राहून ते चतुर्मास पंढरीस राहूं लागले. पंढरीक्षेत्र ह्मणजे साधुसंतांचें माहेरघर. तेथें अनंत पाध्ये व बाबा पाध्ये, बाळकृष्ण बाबा, कृष्णाजी बाबा खिस्ते, गुंडोजी बाबा, वगैरे अनेक साक्षात्कारी पुरुष होते. विठोबा पुरे भगवद्भक्त झाले. ते दरसाल चतुर्मास पंढरीस राहत ह्मणून त्यांचें चातुर्मासे हें नांव पडलें. विठोबा दादा मोठे गोड स्वभावाचे, प्रेमळ, व सदाचरणी होते. ते निरभिमान होऊन मुलांबाळांत व कुणब्यामाळ्यांत फार मिसळत. बाळगोपाळांचा मेळा त्यांस सर्वदा प्रिय

१ यांचें अल्प चरित्र पंढरीस विठ्ठलछापखान्यांत छापिलें आहे. तें बरेंच अशुद्ध आहे. पण त्यांत दादा महाराजांची माहिती व बऱ्याच गोड आख्यायिका यांचा संग्रह केला आहे. मी हा लेख, हें चरित्र, सध्यांचे चातुर्मासे बोवा यांची परंपरागत माहिती, व कागदपत्र, व काव्यें यांच्या आधारानें लिहिला असून पूर्ण विश्वसनीय आहे. भक्तमंजरीमालेच्या ६८ व्या अध्यायांतही यांचें चरित्र वर वर्णन केल्याप्रमाणेंच दिलें आहे.
त्या कीर्तनाचें त्यांत राजारामप्रासादीनें सुरस वर्णन केलें आहे.

असे. कीर्तनप्रसंगीं ते देहभान विसरून निःशंक नाचत. त्यांच्या प्रेमळपणाच्या चार गोष्टी येथें सांगणें अवश्य आहे. (१)एकदां बाबा पाध्ये कीर्तनास बसले असतां दादांनीं ' भक्ति श्रेष्ठ कां कर्म श्रेष्ठ ? ' हा विषय निरूपणास काढला, व भागवतांतील आधार देऊन भक्तिपंथाचें श्रेष्ठत्व स्थापित केलें. श्रोतृसमाज डोलायला लागला, दादा प्रेमभरानें नाचूं लागले, नेत्रांतून अश्रुप्रवाह चालला, शरीर रोमांचित होऊन सात्विक अष्टभाव देहीं स्पष्ट उमटले, दादांनीं गळ्यांतली तुळशीची माळ काढून उजव्या हातांत धरिली, जानवें डाव्या हातांत धरिलें, व सगद्गदस्वानें बाबास विचारिलें, 'बाबा' 'भक्ति श्रेष्ठ कां कर्म श्रेष्ठ? ' कर्मप्रधान धर्मसिंधु रचणारे बाबाही पांडुरंगोपासकच होते, त्यांनीं तात्काळ माळेकडे बोट दाखविलें! दादा असे सहृदय व प्रेमळ कीर्तनकार असत. (२) एकदां 'रुक्मिणीनें एक्या तुळशिदळानें गिरिधरप्रभु तुळिला । दयाघन भक्तीं आकळिला ' या सुप्रसिद्ध पदावर दादांचें कीर्तन चाललें असतां एका सभाधीट मनुष्यानें मध्येंच विचारलें 'बोवा! ही प्राचीन गोष्ट झाली! आज याचा अनुभव आहे? दादांनीं उत्तर दिलें ' होय! भक्तीचें सामर्थ्य अद्भुत आहे. ' तो मनुष्य ह्मणाला ' प्रतीति पाहिजे! ' 'बरें आहे' ह्मणोन बुवांनीं आपला पूजेचा बाळकृष्ण, लहानशी तुला व तुळशीपत्र आणविलें, व पांडुरंगाचें स्मरण करून हातांत तुला धरिली व बाळकृष्णाला एका काट्यांत बसवून दुसऱ्या काट्यांत तुळशीपत्र टाकलें तों सारखें भरलें! सर्व श्रोतृजनांनीं विठ्ठलनामाचा गजर करून सभास्थान दणाणून दिलें, व शंकाकारानें बोवांच्या चरणीं लोटांगण घातलें!! दादा महाराज प्रथम वाळवंटांत कीर्तन करीत, पुढें शिवराम आप्पा खासगीवाले यांनीं त्यांच्या कीर्तनासाठीं मोठा सभामंडप आपल्या वाड्यांत तयार करविला, ह्या ठिकाणीं ते कीर्तन करूं लागले. (३) एकदां विठोबादादा पुण्यास गेले असतां त्यांस श्रीमंतांनीं आपल्या वाड्यांत कीर्तन करावें ह्मणून विनंती केली. ठरल्याप्रमाणें बोवांचा मेणा सरकारवाड्याकडे चालला असतां वाटेंत एका विड्याचीं पानें विकणाऱ्या बाईच्या दुकानांत जमलेले कांहीं लोक ह्मणाले ' हे पंढरपूरकर मोठे अधिकारी आहेत, अशांचें कीर्तन आपणां गरीबांस कशाला ऐकायला सांपडणार ? ' दादांनीं त्यांची श्रवणेच्छा ऐकून मेण्यांतून उतरून दुकानापुढेंच कीर्तनास आरंभ केला! श्रोत्यांची तेथेंच थाप पडली. तें कीर्तन संपवून

१ हे मिरजेचे पटवर्धन होत असें भक्तमंजरीमालाकार ह्मणतात.

वाड्याजवळ आले, तों दरवाज्यापुढें सहस्रावधि श्रवणेच्छूंच्या झुंडी जमल्या होत्या. बड्या लोकांशिवाय वाड्यांत कोणाचा शिरकाव होईना. दादांची जमलेल्या लोकांनीं विनवणी केल्यावरून दादांनीं 'सर्व समाज आंत तरी घ्या नाहीं तर मी येथें वाड्यासमोरच कीर्तन करितों' असा निरोप पाठविला. अखेर सर्व समुदायास वाड्यांत सोडलें व मोठा बंदोबस्त करून दादांच्या कीर्तनास प्रारंभ झाला. येतांना वाटेंत खेळणाऱ्या कांहीं मुली

**'दोन पिंपळ शेजारीं एक पिंपळ दरबारीं**
**दरबारींचा राहूं द्या माझा खेळ मांडूं द्या'**

हें गाणें ह्मणत होत्या, तें दादांच्या कानांवर पडलें होतें. त्या गाण्याच्या आधारावर दादांनीं 'ऊर्ध्वमूलमधःशाखं' या श्लोकाचा अर्थ उघड करून सांगितला व बायकामुलींचीं गाणीं सुद्धां किती अर्थप्रचुर असतात हें श्रोत्यांस समजावून दिलें! (४) दादांच्या जवळ डोंगऱ्या ह्मणून एक विश्रामू कुत्रा होता. तो यांच्या सूक्तिश्रवणानें परमार्थज्ञ बनला, कोणाच्या आंगावर जाईनासा झाला. पुढें एकादशीस तो उपवास करूं लागला, त्या दिवशीं भाकरी तोंडापाशीं नेली तरी तो तिजकडे ढुंकून सुद्धां पाहीना. शेवटीं अनवें मुक्कामीं रामनवमीच्या उत्साहानंतर त्यानें देह ठेविला. त्याची समाध अद्याप अनवें मुक्कामीं दगडी चिऱ्यांनीं बांधलेली आहे! दादांनीं एका सहज वक्र असलेल्या आपल्या दासीला सरळ केली; दादांना एकदां अहल्याबाईंनीं इंदूर मुक्कामीं आवंतून नेलें होतें, त्यांचीं कांहीं कीर्तनें बाईंनीं ऐकिलीं; व पुढें चातुर्मास असल्यामुळें त्यांस इंदुरास राहण्याविषयीं आग्रहानें विनविलें, पण दादांनीं आपला चातुर्मास विठ्ठलपुरीस घालविण्याचा नियम सांगितला व बोलले 'एकाची नोकरी पत्करली असून दुसऱ्याची कशी करावी!' याप्रमाणें विठोबा दादांचें चरित्र संक्षेपानें सांगितलें आहे.

५ अशा सत्पुरुषाच्या पायीं मोरोपंतांसारखा सात्विक व प्रेमळ पुरुष लीन असे, व अंगीकृत कार्यांत आपणांस यश मिळावें ह्मणून त्याच्या आशीर्वादाची अपेक्षा करी यांत आश्चर्य नाहीं. पंतांच्या पत्रांत विठोबादादाविषयीं पराकाष्ठेचा पूज्यभाव प्रकट झालेला आहे. पंतांनीं स्वहस्तांनीं विठोबादादांस लिहिलेलीं चाळीस पत्रें आहेत; हीं सारीं पत्रें पंतांच्या भाविक व विनयप्रधान अंतःकरणाचीं ज्ञापक आहेत. या पत्रांपैकीं एक दोन पत्रें मासल्याकरितां खालीं देतों:-

" श्रीमद्भगवद्भक्तशिरोमणी राजश्री विठोबादादा तथा
बाळकृष्णबाबा स्वामीचे शेवेशीं

विद्यार्थी मयूरकृतानेक साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल श्रावण वद्य दशमी यथास्थित जाणोन स्वकीय लिहीत असावें. आपण लीळाधर बावा ( बरोबर ) पाठविलें पत्र पुस्तक पावलें. आपणांस दशम पूर्वार्ध व गीतार्या पाठविल्या आहेत. भक्तिचंद्रिका पुस्तक श्रीमत्सकलवेदशास्त्रसंपन्न रा. बावापाध्याय यांस पावतें करावें. श्रीद्रोणपर्व जयद्रथवधांत झालें. रात्रीं युद्धाचा आरंभ आहे. आपल्या पुण्याशीर्वादें सिद्धीस गेल्यावर आधीं आपणाकडेच पाठवीन. मुक्तामाला तेथें बावांजवळ असेल, केवळ गीर्वाणभाषाच आहे. बहुत काय लिहूं ? कृपा करावी हे विनंती:—

**खातो समस्तांसहि काळजी जी । ती साधुला भी करि काळ 'जी जी!'।**
**कीं ते सदा वर्णिति जानकीशा । जो दे शिवो मोह न जा न कीशा॥१॥**

**काढिली स्पष्ट मोहाच्या पाठिची साल साधुंनीं ।**
**भगवत्कीर्तनें केलीं देवांची सालसा धुनी॥ २ ॥"**

पंतांच्या भारताचें द्रोणपर्व जयद्रथवधांत रचून झालें त्यावेळीं लिहिलेलें हें पत्र आहे. दुसऱ्या पत्रांत "अलीकडे अश्वमेध महाप्रस्थान दोन पर्वें लिहिलीं. स्वर्गारोहण लिहितों हें सिद्धीस पावविता आपला प्रसाद समर्थ आहे. जालीं पाठवावींच पण नीट एकदां पाहोन पाठवावीं. लिहितों हें पर्व श्रीचरणांची प्रार्थना करून संपूर्ण होय असें करावें," असें लिहिलें आहे. तिसऱ्या पत्रांत "आश्रमवासपर्वार्ध लिहित असतों. आनुशासनिक कांहीं

---

१ हे बाळकृष्णबावा ब्रह्मचारी होते. ते नेहमीं पंढरीस राहत, व चातुर्मासे बोवांचा त्यांचा फार ऋणानुबंध असल्यामुळें ते त्यांजजवळ असत. हेही परम भक्त होते. यांचें एकच पद पहा.

पद १.

**पांडुरंग पाहतां डोळां । मोठा आनंद वाटला ॥१॥**
**मातें बोलवेना बोला । जेथें वेदहि मौनावला ॥२॥**
**भाळीं शोभे कस्तुरि टिळा । नेसे पाटोळा पींवळा ॥ ३ ॥**
**गळां शोभे तुळशीमाळा । कर ठेविले कटिला ॥ ४ ॥**
**पुंडलिकाच्या भाकेला । इटे उभा पंढरिला ॥ ५ ॥**
**बाळकृष्णें या मूर्तिला । ठाव हृदयीं दीधला ॥ ६ ॥**

लिहोन संपविलें. पुढें चालोन सिद्धीस ग्रंथ पावे असें श्रीप्रभूच्या चरणपद्मातें प्रार्थावें" असा मजकूर आहे. चवथ्या पत्रांत "आपण पत्र पाठविल्यावरून प्रश्नोत्तरखंड, साधुरीति, दोन ग्रंथ पाठविले आहेत. स्वीकार करून साद्यंत आयकावें. मंत्ररामायण रा. बाबा शोधितील मग लिहावें" अशीं वाक्यें आहेत. या अशा उल्लेखांवरून पंत विठोबा दादांच्या आशीर्वादांसाठीं कसे उत्कंठित असत, आपले नवे नवे ग्रंथ त्यांजकडे व बाबा पाध्यांकडे कशा प्रेमबुद्धीनें पाठवीत, व त्यांच्या प्रोत्साहनाचा काय उपयोग होई, याचा चांगला खुलासा होतो. पंतांनीं विठोबादादांस लिहिलेल्या पत्रांपैकीं आणखी एक महत्वाचें पत्र खालीं देतों:—

"श्रीमद्भगवद्भक्तवर्य राजमान्य राजश्री विठोबा दादा
( तथा ) बाळकृष्णबावा यांचे शेवेशीं,

विद्यार्थीमयूरकृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. भवानीमनुष्याहातीं पुस्तक पाठविलें (तें) पावोन समाधान झालें. ...विजयादशमी जाल्यावरि येणें ह्मणोन आज्ञा–ती मस्तकीं धरून यावयाच्या उद्योगातें करितों. श्रीमंतांजवळ हरिवंश होतो ऐसें आहे. श्रीमंत जों गृहीं असतात पर्जन्यकाळीं, तोंच आपलाही समाज श्रीक्षेत्रीं. यांस सोडून यावें तरी यांच्या चित्तानुकूळतेंकरून! अशास तुमच्या कृपेनें घडेल तें पहावें. सुश्रुतग्रंथ श्री बाबा उपाध्याय यांशीं पावता करावा, तुह्मांस कांहीं पुस्तकें पाठविलीं पहावीं. श्री द्रोणपर्व श्री गुरुपुत्रांकडील आलें नाहीं. आल्यावरी आपणाकडे येईल. शांतिपर्व राजधर्मपर्व प्रारंभ झाला आहे. सांप्रत वर्षाकाळीं बुद्धीस आळस आला राहिलें. खोकला झाला आहे. आपणही चार दिवस धीर धरावा. वर्षाकाळीं असें बुद्धिमांद्य किंचित होतें. वृद्धपणीं शक्त्युत्साह उणा पडतो. श्री ज्ञानदेवाचें चरितांचें कीर्तन झालें. पुढेंही चालेल. मींही यावयाच्या यत्नांत आहें. संसारीं नवनवेच गुंते पडतात. देव कृपा करील तरीच सत्समागम घडोन अत्युत्सवपात्र जन होतो. बहुत काय लिहिणें दया करावी हे विनंती. गंगाभागीरथी श्रीमातृश्री जिजीबाईच्या चरणांवरी साष्टांग नमस्कार प्रविष्ट करावा.

श्रीमद्भगवद्भक्त मैराळबाबा स्वामीचे शेवेशीं साष्टांग नमस्कार. गतशोक न करावा. तीर्थरूपांच्या हृदयाशीं तोषवावें हे विनंती."

६. एका पत्रांत पंतांनीं खालील आर्या लिहून विठोबादादांकडे पाठविल्या आहेत. दादांच्या चरित्रांतल्या कांहीं गोष्टींला या आर्या ह्मणजे मोठ्याच प्रमाणभूत होणार आहेत. पंत आपल्या हातांनीं आपल्या समवयस्क मित्राला या आर्या लिहून पाठवितात, तेव्हां त्यांचें महत्व किती मानावें हें सांगायला नकोच:

**श्री विठ्ठल निज-निजजन-सद्गुणकीर्तनसुखार्थ अवतरला ।**
**ज्याच्या सूक्तिश्रवणें जडही गोष्पद करूनि भव तरला ॥ १ ॥**

**ज्याच्या वरप्रसादें वक्रा दासीहि जाहली सरला ।**
**श्वानाचा ही सूक्तिश्रवणसुखें ताप सुदृढ ही सरला ॥ २ ॥**

**नेत्रांत मुखांत कृपा ज्याच्या हृदयांत सर्वदा वसली ।**
**शद्बांत मधुरता श्री हरिच्या अंकीं जशी तशी बसली ॥ ३ ॥**

**प्रेमळ रसिकशिरोमणि मृदु परमपटु शांत ।**
**कांत मुखश्री ज्याच्या उपदेशें बहुत जाहले दांत ॥ ४ ॥**

---

* हें पत्र महत्वाचें असून यामुळें इतके खुलासे होतातः (१) पंतांचे यजमान बाबूजी नाईक हे आठ महिने बाहेर स्वारीस जात व बरसातींत बारामतीस येत; त्यांस पंत मूळ संस्कृतावरून अगर स्वकृत प्राकृतावरून हरिवंशादि ग्रंथांचें पुराण सांगत. (२) चतुर्मासांतच विठोबा दादा आपला 'भक्तसमाज' घेऊन पंढरीस रहात, व यजमानांचें 'चित्तानुकूल्य' पंतांस सांभाळावें लागे ह्मणून इच्छेप्रमाणें त्यांस पंढरीस जातां येत नसे. 'अत्यंत सदय अन्नद' असला तरी सेवाधर्माचें जूं सदैव धारण करणें कष्टप्रद आहे! (३) पंतांच्या बुद्धीस वर्षाकाळीं किंचित् मांद्य येई. यजमान घरीं असल्यानें त्यांस पुराण सांगावें लागे ह्मणून ह्मणा किंवा पावसाळा वसंताप्रमाणें कविप्रतिभा उज्वल करणारा नाहीं ह्मणून ह्मणा पण मिल्टनकवीप्रमाणें पावसाळ्यांत पंतांची काव्यरचना कमी होई! (४) शक्त्युत्साह उणा पडूं लागला ह्मणून पंतांस वाईट वाटे, पन्नाशीच्या आंतच पंत आपणास वृद्धपण आलें ह्मणून समजतात! आजन्म चालविलेल्या विद्याव्यासंगामुळें तर ही क्षीणता आली नसेल ना? (५) संसारांतल्या नव्या नव्या अडचणी त्यांच्याही मागें होत्या!

**संत विठोबा दादा लहानें थोरांत सांगतां वाटे ।**
**टाकुनि खेळ मुलांनीं यावें पायां पडावया वाटे[1] ॥ ५ ॥**

पंतांनीं आपल्या महाभारताच्या उपसंहारांत खालील आर्येत विठोबा दादांचा उल्लेख केला आहे.—

**बहु शोभाप्रद झाला श्रीविठ्ठल भक्तराय कवनातें ।**
**जेविं ऋतूंचा करितां प्रकट गुण वसंत नायक वनातें ॥ ४० ॥**

कै. वामन रावजी ओक यांनीं ' विठ्ठलभक्तस्तुति ' ह्मणून जें प्रकरण स्फुटसंग्रहांत छापलें आहे, त्याच्या पदच्छेदांत, टीपांत, वगैरे बऱ्याच चुका झाल्या आहेत. याचें कारण रा. ओक यांस विठोबादादांचें नांवही माहीत नव्हतें, मग तें प्रकरण विठोबा दादांच्या स्तुतिपर आहे हें त्यांस कसें समजावें ? या प्रकरणांतले १।२ श्लोक पहाः—

**निजजना अमृतें बहु तर्पिती । स्व अनवे अनवेकर अर्पिती ।**
**सतत पूर्ण मुकुंदयशोरसें । न वदना वद ना ह्मणती असे ॥ १ ॥**
**करिति विठ्ठल भक्त कथा बरी । सुदृढ बाळहि जीस मनीं धरी ।**
**वश जयासि सदा भगवान् हरी ।कुतुक या तुकयापरि भूवरी ॥५**

७ विठोबा दादांची एक जिजाबाई नांवाची बालविधवा बहीण होती. तीही परोपकारांत व भजनपूजनांत काळ घालवीत असे. बंधूच्या संगतीनें ती थोर अधिकारास पोंचली होती. मोरोपंत दर पत्रांत तिला साष्टांग नमस्कार पाठवीत असत. तिजवर पंतांनीं खालील आर्या केली आहे:—

---

१ विठोबा दादांच्या चरित्रांतील गोष्टी व हा त्यांच्या कविमित्राचा अभिप्राय यांचा कसा सुरेख मेळ बसतो ! आमच्या या धर्मशिक्षकाचें हें चरित्र लिहित असतांना मला गोल्डस्मिथ कवीच्या Deserted village या लहानग्या पण गोड काव्यांतल्या Village Preacher चें फार स्मरण झालें ! मुख्यतः ही शेवटली आर्या व त्या लच्या दोन ओळी यांत किती तरी साम्य आहे !

Even children followed with endearing wile,
And plucked his gown to share the goodman's smile.

२ कवींचे ग्रंथ नीट समजण्यापूर्वी त्याच्या चरित्राची व परिस्थितीची पूर्ण माहिती असणें किती जरूरीचें आहे हें यावरून कळणार आहे., सदर प्रकरण चातुर्मासे यांच्या दसरीं दादांची स्तुति ह्मणूनच जपून ठेवलें आहे. शिवाय श्लोक १ मधील ' अनवेकर ' पद तर निःसंदेह आहे !

**भवभय जायास्तव त्या नमितों मीं सर्वकाळ जीजीतें ।**
**बहु भूतदया हृदयीं रंकाची सर्व काळजी जीतें ॥ १ ॥**

८ पंढरपूरक्षेत्रीं आषाढीकार्तिकीला जो देवाचा रथ निघतो त्यापुढें पहिली दिंडी चातुर्मासे बुवांची असते व गोपाळकाल्यालाही त्यांजकडेच पुढारीपण येतें, यावरूनही विठोबादादांची मान्यता तत्कालीन साधुसंतांत व वारकऱ्यांत किती असेल याचें चांगलें अनुमान बांधतां येतें. याप्रमाणें विठोबादादा आपल्या गुणांनीं लोकप्रिय झाले होते. हे मोरोपंतांपूर्वी तीनच वर्षे ह्मणजे शके १७१३ श्रावण कृष्णत्रयोदशी रोजीं समाधिस्त झाले. ते अनवे गांवींच आटोपले होते. पण जिजीबाईच्या इच्छेमुळें ताटीवरचे उठून बसले व पंढरीस येऊन त्यांनीं देह ठेविला! यांची एकनाथस्वामी व तुकोबा यांच्या ग्रंथांच्या ठिकाणीं विशेष भक्ति होती. यांचा मठ पंढरीस भीमातीरीं असून त्यांच्या समाधीची पूजाअर्चा चालते, व अद्याप वारकरी सांप्रदायांत चातुर्मासे बोवांचा नांवलौकीक मोठा आहे.

विठोबा दादा प्रेमळ कीर्तनकार व आत्मानुभवी सत्पुरुष ह्मणून सर्वत्र गाजले, व मोरोपंतही आपल्या पत्रांत त्यांना अशाच भावानें पूज्य मानतात. दादांची कविता कांहीं प्रसिद्ध नाहीं. त्यांचे दोन अभंग पंतांच्या संतस्नेहाचा प्रसाद ह्मणून मी आपल्या वाचकांस अर्पण करितों. त्यांत त्यांनीं स्वचरित्रच संक्षेपानें सांगितलें आहे:—

( १ )

**आदौ शिवभक्तीं भागवतीं मिनवीलें । अद्वैत ठसवीलें कृपाळूवा ॥१॥**
**कारागृहीं होतों आठवीत तूज । जाला गुरुराज जगद्गुरू ॥ २ ॥**
**कुटुंबासहीत आणविलें पंढरीं । कृपा दासावरी केली पूर्ण ॥ ३ ॥**
**विठ्ठलदास शरण आलों जी सत्संगा । आतां पांडुरंगा उपेक्षूं नये॥४॥**

---

१ हा शक विठोबा दादांचा रामचंद्र बडवे ह्मणून एक शिष्य होता त्यानें आपल्या सद्गुरुस्तवनांत' दिला आहे. ' ज्याचें आन्हिक पाहतां न घटिकाही आढळे वाउगी' हा चरण दादांच्या सततोद्योगाची साक्ष देतो. ' ज्याची स्वैरकथा उगी परिसतां दुःकल्पना मावळे ' या चरणावरून दादांचा अधिकार मोठा होता असें स्पष्ट दिसतें:—

विठोबा गोसावी जनकजननी सद्गुरु मला।तयाच्या पादाब्जीं सतत भजनीं जीव रमला
दयाब्धीचा इंदू परिहरि कृपें मोहरजनी । दिसे सर्वाभूतीं अचळ गुरु चिंतामणि जनीं ॥१

( २ )

**विठोबानें दया केली । आपुली सवे जी लाविली ॥ १ ॥**
**हेंचि मागावें तयाला । छंद असू द्या मनाला ॥ २ ॥**
**जरी जावें विसरून । तांचि देताहे स्मरण ॥ ३ ॥**
**विषयीं वैराग्य । हेंचि विठ्ठलाचें भाग्य ॥ ४ ॥**

९ **मैराळ बोवा चातुर्मासे**:—हे विठोबा दादांचे पुत्र होत. पंतांनीं दादांस लिहिलेल्या सर्व पत्रांत यांना नमस्कार आहे व स्वतंत्रपणें यांना लिहिलेलीं अशींही कांहीं पत्रें आहेत. हीं दादांच्या मरणानंतर लिहिलेलीं असून त्यांत रामायणें व त्यांच्या यादी पाठविण्याविषयीं उत्सुकता दर्शविली आहे. या पत्रांबद्दल व मैराळबोवांच्या हातून कांहीं रामायणें कशीं नष्ट झालीं या बद्दल 'रामायणांच्या प्रकरणांत ' माहिती दिली आहे. येथें एवढेंच सांगायचें कीं मैराळ बोवा हे पंतांच्या आर्येचे पुरे पुरे भोक्ते होते. पंतांचें काव्य झालें कीं तें नेमानें विठोबादादांच्या अवलोकनास जाई. मैराळभाऊ त्याची नक्कल करून घेत. असें करितां करितां मैराळभाऊस पंतांच्या आर्यांचा मनस्वी नाद लागला, तो इतका कीं पंतांच्या घरीं पंतांच्या कवितेचा जितका संग्रह आहे तितकाच किंबहुना त्याहून थोडा अधिक संग्रह आज चातुर्मासे यांच्या घरीं आहे! येथील सर्व आर्या मैराळभाऊंच्या हातच्या आहेत व त्यामुळें पंढरीक्षेत्रीं पंतांच्या काव्यांचे दोन संग्रह आहेत, असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. मैराळ भाऊ कीर्तन करीत. कीर्तनप्रसंगीं पंतांच्या आर्यांवर त्यांचा सारा भर असे. मैराळभाऊ पंतांस 'तीर्थस्वरूप महाराज मोरोपंतबाबा अपत्यें मैराळानें' हा मायना लिहीत. मैराळभाऊ पंतांस गुरुस्थानीं मानीत यामुळें चातुर्मासे घराणें अद्याप पंतघराण्यास गुरुघर समजतें.

पंत इ. स. १७८९ मध्यें काशीयात्रेस गेले. तेव्हां गंगेपुढें केलेल्या वकीलींत त्यांनीं विठोबादादा व मैराळभाऊ यांचे स्पष्ट उल्लेख केले आहेत.:—

**गंगे देवि! विठोबा दादा श्री विष्णुभक्त शिवशील[1] ॥ ८१ ॥**
**याचा परम प्रेमळ नंदन मैराळ तो तथापि कसा ।**
**येता? जो पंढरपुरच्चूतवनीं करितसे कथा पिकसा ! ॥ ८२ ॥**

मैराळ बोवांचा उल्लेख पंत पुन्हां प्रेमानें विष्णुपदवकिलींत करितात:—

---

१ मंगल, पवित्र, आहे शील ज्याचें असा.

**मैराळ बहु प्रेमळ विष्णुपदा ! विष्णुकीर्ति जो गातो।**
**स्वप्रिय भक्त करावा, आहे सद्भक्तिकीर्ति-जोगा तो ॥ ५० ॥**

मोरोपंतांचें भारत इ. स. १७७०-८० पर्यंत झालें असावें असें मी अन्य प्रसंगीं दाखविलेंच आहे. पंतांनीं त्रिठोबादादांस लिहिलेलीं बहुतेक पत्रें याच भारतरचनाकालांतलीं असल्यामुळें त्रिठोबादादा भगवद्भक्त झाल्यानंतर त्यांचा व पंतांचा ऋणानुबंध जडला व उभय कुळांतला स्नेह दृढ होऊन तो आजन्म टिकला हें उघड होतें. त्यांच्या घरोब्याच्या कांहीं साध्या पण प्रेमळ गोष्टी वाचकांना सांगण्याइतकी माहिती मला मिळाली असती तर बरें झालें असतें ! एक गोष्ट मात्र सांगतां येते. एकदा मैराळ भाऊंची मुलगी लग्नाची झाली होती. बारामतीस जोशी यांचे पुत्र अविवाहित आहेत असें जाणून 'मैराळभाऊंची मुलगी मी तुमच्या मुलास देववितों' असें पंत सहज सदर जोशी यास ह्मणाले, व त्याप्रमाणें मैराळभाऊस त्यांनीं पत्र लिहिलें. मैराळ भाऊंनीं परत लिहिलें ' ठीक आहे. आपण आपली मुलगी दिली ह्मणालां तर दिली ! टिपण पाहणें नको. मुहूर्त कळवा, आह्मी येतों !' इकडे जोशी यांनींही पंतांच्या शब्दाला मान देऊन मुलगी न पाहतांच लग्न ठरविलें, व त्याप्रमाणें हें कार्य झालें! पूर्वींच्या घराण्यांतील एकोपा, परस्परांवरचें निष्कारण प्रेम, विश्वास व कळकळ, वडीलधाऱ्या सर्व पुरुषांचा मान ठेवण्याची तऱ्हा, हीं अलीकडे अगदीं बदलून गेलीं आहेत. आमच्या समाजांतलीं हरएक तऱ्हेचीं बंधनें शिथिल होऊन समाजांत सर्वत्र विस्कळितपणा आला आहे हें पाहिलें ह्मणजे वरील गोष्टीचें फारच कौतुक वाटतें !

'श्रीहरिगुरुभक्तिपरायण मैराळभाऊंस, अगळगांव, परगणे बारसी, येथून' आबाजीपंत लिहितात: "बहुत दिवस जाले. दर्शनाचा लाभ जाला नाहीं. तेणें करून चित्ताचें समाधान होत नाहीं. आपलें येणें गतवर्षी बारामतीस न जालें. तीर्थरूप राजेश्री मोरोपंत बाबा प्रतीक्षा करीत होते. मीहि घरींच दोन मास होतों. पण लाभास पात्र न जालों. सेवावृत्तीमुळें सदैव येथें राहणें घडतें. यांत कृपा करून पत्र पाठवून परामर्श करीत असावे हे विनंती."

अस्तु. मैराळभाऊ इ० स. १८०४ मध्यें चैत्र महिन्यांत (१७२६)[1] वारले

---

१ मैराळबोवांचे चिरंजीव त्रिंबक उर्फ आबा, त्यांचे चिरंजीव रामभाऊ, व त्यांचे पुत्र बाळकृष्ण बुवा सध्यां ( श. १८३० ) विद्यमान आहेत. यांना मोंगलाईत चांगलेंच इनाम आहे. हेही चतुर्मास पंढरीस येऊन राहतात.

समाध त्यांच्या वडिलांपासून एका हाताच्या अंतरावर आहे, व दोन्ही समाधींवर सुशोभित मंदीर बांधलें असून पुढें भव्य सभामंडप बांधला आहे.

१० **सिद्धेश्वर महाराज**—शके १६५५—१७२३. यांचा जन्म मोरोपंत चार वर्षांचे असतांना ह्मणजे शके १६५५ सालीं चैत्र शुद्ध ९ स मंगळवारीं पुनर्वसुनक्षत्रावर झाला. यांच्या वडिलांचें नांव रामभटजी व मातोश्रीचें नांव गोदावरीबाई असें होतें. हे यजुर्वेदी ब्राह्मण. रामभटजींस शंकराची उपासना होती. सिद्धेश्वराचा व्रतबंध पंचमवर्षी झाला व लागलाच विवाहही झाला. पहिली स्त्री वारल्यावर यांनीं दुसरी केली. हे गृहस्थाश्रमी होते. यांना तीन मुलगे व दोन मुली झाल्या.

प्रख्यात कटावकर्ते राजयोगी अमृतराय हे यांचे गुरु होत. रामभटजींनीं हे अमळ वयांत येतांच नौकरीची गोष्ट काढली तेव्हां त्यांनीं त्यांस "मनुष्य–यजमानाचें आर्जव केल्यानें आह्मांस काय देणार? श्रीराम सर्वोत्तम-त्रैलोक्याचा यजमान–आमच्या एकट्याची उपेक्षा करील काय?" असा रोकडा जबाब दिला! 'औरंगाबादेस जाऊन त्यांनीं सत्पुरुष अमृतराय यांजपासून उपदेश घेतला.' घरांत राहून स्नानसंध्या निर्वेध होत नाहीं ह्मणून गुरूस विचारितां त्यांनीं काशीस आपले गुरुबंधु अद्वैतानंद यांजकडे जाण्यास सांगितलें. काशीस त्यांनीं दोन वर्षे वास केला. व पंचदशीचें अध्ययन करून अनुभव घेतला.

परत गुरुभेटीस आले तेव्हां गुरूनें "शाबास! तुम्हीं आह्मांहून अधीक

---

१ यांच्या चरित्राची विस्तृत हस्तलिखित बखर मला पुण्यास लो० बळवंतराव टिळक यांनीं इ. स. १९०१ च्या जुलै महिन्यांत दिली. त्या बखरीच्या आधारानें ही या सिद्धपुरुषाची माहिती येथें दिली आहे. सिद्धेश्वर महाराज व मोरोपंत यांच्या भेटीची सारी हकीकत या बखरींतून अक्षरशः उतरून घेतली आहे. मला सिद्धेश्वर महाराजांच्या चरित्राची शिळाप्रेसवर कोल्हापुरास छापलेली प्रत नंतर मिळाली त्यांत या भेटीची हकीकत तेवढी वगळलेली आहे. प्रो० टिळकांनीं दिलेली बखर जुनीच असून सुद्बाबा महाराज यांचे वाड्यांतून ती त्यांना मिळाली असल्यामुळें अधीक विश्वसनीय मानली पाहिजे.

१यांचे गुरु अमृतराय हेच खरे. भक्तमंजरीमालेंत सिद्धेश्वरभटजीचें चरित्र (अ.५६।५७) दिलें आहे, तें ह्या असेंच आहे.

कमाई केली " ! असें ह्मणून त्यांची पाठ थोपटली. सिद्धेश्वर महाराज पुढें योगसमाधीच्या अभ्यासाकरितां आठ वर्षे नरसिंहपुरास राहिले. ते तेथेंच गुरुप्रसादानें कृतार्थ झाले व त्यांनीं जगदुद्धारास प्रारंभ केला. त्यांचे अनेक चमत्कार प्रसिद्ध आहेत. ते नंतर पंढरीस योगानंद, अद्वैतानंद, व वैकुंठानंद असे तीन स्वामी होते त्यांच्या दर्शनास गेले. कोल्हापूरचे तिसरे शिवाजी राजे ( शके १६८२-१७३४ ) हे यांच्या सिद्धि पाहून यांचे शिष्य बनले. ' तूं राज्य यथान्याय करून प्रजापालन करावें. दुष्टांस दंड करून साधुसंतांचें पाळण करून आपल्या धर्मप्रमाणें चालावें ' असा शिवाजी राजे यांस उपदेश केला. शिवाजी राजाचा आपल्या सद्‌गुरूवर पूर्ण विश्वास व फार भक्ति होती. या सिद्धेश्वर महाराजांचा अनुग्रह महादजी शिंदे, शेणोलीकर, फडके, वीरमाडकर, रेटरेकर, वगैरे सरदारांनीं घेतला होता. सिद्धेश्वर महाराजांची चोहोंकडे ख्याती झाली. पुण्यास सखारामबापू, नाना आदिकरून मुत्सद्यांनीं त्यांस पुण्यास समारंभानें नेऊन त्यांचा मोठा सत्कार केला. शिरोळाहून पंतसचिवांनीं भोरास आदरानें नेऊन त्यांचा अनुग्रह घेतला. याशिवाय सहस्रावधि गरीबगुरिबांवर या सत्पुरुषानें कृपा केली. कोल्हापूरचे महाराज शिवाजी राजे यांनीं आपली स्त्री सुंदराबाई यांसह शके १७०१ सालीं अनुग्रह घेतला. शके १६९९ सालीं महादजी शिंदे यांनीं ' हें चरणदर्शन मला जाहलें. पुनीत झालों. माझी शिष्यकोटींत गणना असावी. ' असे सप्रेम उद्गार काढले. रामदासस्वामींची कृपादृष्टि सर्वकाळ जशी थोरल्या शिवरायांवर होती, तशीच सिद्धेश्वरमहाराजांची कोल्हापूरच्या तिसऱ्या शिवाजी महाराजांवर होती. याप्रमाणें सहस्रावधि जीवांचा उद्धार करण्यात आयुष्य वेंचून हे सत्पुरुष शके १७२३ वैशाख शुद्ध ६ सोमवारीं समाधिस्थ झाले.

सिद्धेश्वर महाराज सिद्धकोटींतले खास. यांची गुरुपरंपरा खालील आर्येत स्पष्ट झाली आहे:-

**श्रीपति विधिसनकादिक नारद तो व्यास योगि शुकतारू ।**
**पूर्णानंद ज्ञानानंद अमृतराय सिद्ध राजगुरू ॥ १ ॥**

यांची योग्यता ज्यावरून चांगली ध्यानांत येणार आहे असें एकच यांचें पद खालीं देतों.

आह्मी श्रीरामाचे दास । जालों सर्वस्वी उदास ।
सारुनि अवघा दृश्यभास । निरालंबीं राहिलों ॥ १ ॥
नाहीं नाम रूप गोत्र । तेथें कैचें शिखासूत्र ।
दंडकमंडलू वस्त्र । काय कशास पाहिजे ? ॥ २ ॥
नाहीं क्रिया आणि कर्म । कैंचा वर्णाश्रमधर्म ।
पूर्णबोधाचें हें वर्म । संत सज्जन जाणती ॥ ३ ॥
ब्रह्मानंदीं केला वास । अन्नमय दृश्यभास ।
जालों आतां स्वप्रकाश । लिंगदेहा भंगुनी ॥ ४ ॥
ब्रह्मसुख नाहीं फुका । जिता जीवित्वासी मुका ।
असंगासी संग निका । तरि हें सौख्य सांपडे ॥ ५ ॥
सिद्धेश्वरीं नाहीं अन्य । अमृतसेवा हेंचि धन्य ।
बुद्धिबोधेंसी हें शून्य । पूर्णानंदीं पावलों ॥ ६ ॥

सिद्धेश्वरमहाराजांची योग्यता याप्रमाणें फार मोठी होती. मोरोपंत साधुदर्शनाचे भुकेले होते, अमुक ठिकाणीं साधु आहेत असें कळलें कीं हे त्यांच्यासाठीं त्वरेनें धांवून जात. तें स्वतः वैराग्यसंपन्न व रामोपासक असूनही साधुसंतांचा चरणरजही शिरोवंद्य मानीत. ते सिद्धेश्वरबोवांच्या दर्शनास गेले व त्यांनीं त्यांजवर आर्या केली, ही हकीकत बखरींतील खालील उताऱ्यावरून स्पष्ट होईल.

" बारामति येथें राहणार जगविख्यात कवि मोरोपंत पंडित यांनीं अनेक प्राचीन ग्रंथांवर तसेंच स्फुट विषयावर बहुत कविता केल्या, त्या कवितेच्या ओघामध्यें ' सन्मणिमाला ' ह्मणोन कांहीं आर्याछंदानें महान्‌भगवद्‌भक्त सत्पुरुष यांचा निर्देश केला आहे. त्या प्रसंगीं मोरोपंत यांस न कळतां पुढें कांहीं दिवसांनीं असें कळलें कीं, महान् भगवद्‌भक्त व तत्त्ववेत्ते श्री सिद्धेश्वर भटजी बोवा ह्मणोन कऱ्हाडानजीक नरसिंहपूर येथें असतात ह्मणोन समजलें. यानंतर पंडित यांस फार विस्मय होऊन बारामतीहून मुद्दाम श्रीच्या दर्शनाकरितां ह्मणोन लोक जात येत असल्याचें अवलोकन करून त्या लोकसमुदायाबरोबर श्री ज्या घरीं होते त्या घरीं जाऊन श्रीस अवलोकन करितांच ' मोरोपंडित ! आतांच आलां का ? ' ह्मणोन श्रीनें विचारिलें ! तें पंडित यांणीं श्रवण करून सद्गदितांतःकरणानें ' मी अपराधी, त्याचे निरसनार्थ या चरणदर्शनास आलों आहें. तर क्षमा करून बुद्धीस प्रेरणा कर-

णार श्री समर्थ आहेत ' ह्मणोन, पंडित यांणीं प्रार्थना केली कीं ' महाराज मीं अल्पमतीनें सन्मणिमाला ह्मणोन कांहीं आर्या केल्या, त्यांत आपलें नांव घालण्याचें राहिलें त्यास त्या मालेमध्यें आपलें नांव व्यक्तरूपानें असावें अशी बुद्धीस प्रेरणा श्रीनीं करावी,' ह्मणोन केलेली विनंति श्रवण करून ' मोरोपंडित ! आह्मां मनुष्याचें नांव कशास पाहिजे ? ' तेव्हां पंडित यांणीं न ऐकतां तसें करण्याविषयीं आज्ञा जाहली पाहिजे ह्मणोन विनंति केल्यावरोन ' बरें आहे ' ह्मणोन आज्ञा जाहली. त्या वेळीं पंडित यांणीं आर्या केलीः—

**नमिले श्रीसिद्धेश्वरभडजीबावाचिया सुपदकमला ।**
**त्या सन्मणिमालेला सांपडेल आजि हें सुपदक मला ॥ १ ॥**

याप्रमाणें आर्या करून पुढें कांहीं दिवस श्रीचे सहवासास राहून श्रीचा निरोप घेऊन पंडित हे आपल्या गांवीं परत गेले. "

१२ **सदाशिव पाध्ये कऱ्हाडकरः**—पंतांचे गुरु केशव पाध्ये पन्हाळ्यास राहत असत. त्यांचे पुत्र नारायण, सदाशीव, यज्ञेश्वर, व शंकर. या चौघांपैकीं सदाशिव पाध्ये यांचा व पंतांचा स्नेह फार होता. सदाशिव पाध्ये कऱ्हाडास श्रीमंत पंतप्रतिनिधी यांच्या आश्रयास होते. हे पंतांचे सहाध्यायी होते, यांचीं कऱ्हाडाहून पंतांस आलेलीं कांहीं पत्रें माझ्या पाहण्यांत आलीं. हे पंतांस आपल्या पत्रांत ' अस्मद्बंधुवर्गेषू मयूरसूरिषु' किंवा ' मित्रवर्येषु मयूरसूरिषू ' असा मायना लिहितात. या उभयतांचा सहाध्यायीपणांत जडलेला स्नेह आमरण कायम राहिला. सदाशिव पाध्ये यांजकडून संस्कृत ग्रंथ आणविण्याचा व ते आपल्या नवीन रचलेल्या काव्यांबरोबर परत पाठविण्याचा पंतांचा धूम धडाका चालला होता हें मागें ' मोरोपंतांचें शिक्षण व विद्याव्यासंग ' या प्रकरणांत दाखविलें असल्यामुळें येथें त्याची पुनरुक्ति करीत नाहीं. प्राकृत काव्यरचनेंत आपलें आयुष्य घालविण्याचा आपला निश्चय पंतांनीं आपल्या या बाळगड्याला पुष्कळदां सांगितला असेल. समवयस्क, समविद्य, समस्वभाव तरुण मित्रांना परस्परसंगतींत जो अत्यंत सुखाचा अनुभव येतो त्याचें वर्णन कोणीं करावें ! सदाशिवपाध्ये कऱ्हाडाहून एका पत्रांत पंतांस लिहितात; " चिरंजीव यज्ञेश्वरोपाध्याय सकुटुंब करवीरीं राहिले आहेत. वर्षत्रय जाहले आह्मीं सर्व कऱ्हाडीं आहों. श्रीपितृचरण गडीं सुखी आहेत. परम अशक्त जाहले आहेत. येथील स्थिति कारभारी यांजमुळें विलक्षण जाहली आहे. " दुसऱ्या एका पत्रांत असा मजकूर आहेः " शरीरीं ज्वरो-

पशम जाला ह्मणोन लिहिलें, परंतु पूर्ववत् बलोपचय नाहीं त्यास औषध प्रस्तुत करावें. जिरें तोळे चार किंचित् निसून भाजावें, आणि त्यांचें चूर्ण करावें, त्यांत चुना, गूळ आठ तोळे घालून मेळवावा आणि गोळ्या १८ कराव्या. प्रातःकाळीं १ गोळी घेत जावी. तेणें करून जीर्णज्वरोपशम होईल. व बुभुक्षा व पूर्वबल होईल. भेटीविषयीं बहु उत्कंठित अंतःकरणवृत्ति आहे. येथें श्रीमंत राजश्री पंतसंनिध आहों. दर्शनाविषयीं मानस त्वरायुक्त आहे. घडेल तो सुदीन."

सदाशिव पाध्ये यांच्या सूचनेवरून पंतांनीं कांहीं काव्यें रचलीं आहेत. ब्रह्मोत्तरखंड, मदालसोपाख्यान व कृष्णामाहात्म्य हीं काव्यें सदाशिव पाध्ये यांच्या सूचनेवरून रचल्याबद्दल पंतांनीं त्या त्या काव्यांतच स्पष्ट सांगितलें आहे.

गंगावकिलीच्या आर्या ७८।७९ मध्यें पंतांनीं 'मद्गुरुपुत्र सदाशिव व यज्ञेश्वर' यांचा उल्लेख केला आहे, व सदाशिव पाध्ये यांस 'वरशील, साधु, सहाध्यायी' हीं विशेषणें लावलीं आहेत.

१३ **विठोबा ताहराबादकरः**—पंतांचे समकालिन संतचारित्रकार महिपतीबोवा भरतखंडांतील विख्यात संतांचीं चरित्रें आपल्या प्रेमळ व गोड वार्णानें गात होते, ठिकठिकाणच्या संतांची माहिती मोठ्या प्रयासानें गोळा करून नाभाजीचा कित्ता पुढें ठेवून सरळ व सुबोध ओव्यांत ते ती ग्रथित होते. महिपतीबोवांचे ग्रंथ व कीर्ति पंतांच्या ह्मणण्याप्रमाणें 'स्नेहाचा सत्सरीं जसा बिंदु' पसरतो त्याप्रमाणें जगांत पसरत होती. महिपतबोवांचे ग्रंथ पंतांनीं वाचले होते पण उभयतांची कधीं भेट झाली होती किंवा नाहीं, अगर त्यांचा परस्पर पत्रव्यवहार होता कीं नाहीं हें अद्याप समजलें नाहीं. पण महिपतिबोवांचे पुत्र विठोबा गोसावी यांचीं २१४ पत्रें पंतांस आलीं आहेत त्यावरून पंत व विठोबा यांचा मात्र स्नेहसंबंध निर्विवाद ठरतो. हे विठोबा गोसावी बाबापाध्ये यांजवळ विद्याभ्यासार्थ राहिले होते. बाबांनींच त्यांची शिफारस मोरोपंतांकडे करून परस्परांची ओळख करून दिली. बाबा पंतांस एका पत्रांत लिहितात, "हरिदास राजेश्री विठोबा गोसावी ताहराबादकर यांहीं आपणांस पुस्तकांविषयीं लिहिलें आपण ग्रंथ पाठवून द्यावे ते प्रती करून आपणांस शीघ्र परत करितील." यापुढें मोरोपंत व विठोबा गोसावी यांचा संबंध जडला व तो उत्तरोत्तर दृढच झाला. विठोबा

गोसावी यांची मोरोपंतांविषयीं किती भक्ति होती, व त्यांच्या काव्यांविषयीं त्यांचा किती आदर होता हें दाखविण्यासाठीं त्यांचें एक पत्र खालीं देतों:-

श्री पांडुरंग

" श्रीहरिभक्तिपरायण महाराज मोरोपंत बावा स्वामीच्या शेवेशीं:—

अपत्य चरणरज विठोबा गोसावी पायांवर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विनंती उपरि आह्मांकडील वर्तमान तरी स्वामींच्या आशीर्वादें सर्व मंडळी सुखरूप असे. यानंतर श्रीगुरूंहीं निरंतर कृपा करून पत्रद्वारें सेवकांस संतोषवीत असावें. स्वामींस धोतरजोडा एक पाठविला आहे. वस्त्र स्वामींस योग्य नाहीं तरी याचा स्वीकार करावा ह्मणजे दासाचा मनोरथ पूर्ण होईल. स्वामी साक्षात् पंढरीनाथ, मग तेथें न्यून काय ? परंतु दीनाची आवड पूर्ण करावी हें महाराजांस उचित ... ... प्रस्तुत घरींच आहे. आणि लेखक अनुकूळ. यास्तव उद्योगपर्व, भीष्मपर्व येथें प्रती करावयास पाठवावीं. म्यां ते पायांसी विनंति केली होती कीं दोन चार चालींचीं पदें करावीं ... ... मीं आपल्या कृपेविषयीं सतृष्ण यास्तव सांभाळ करावा हे विनंती. दादा यांसी नमस्कार. लिखितार्थ परिसून महाराजांच्या पदांची प्रती पाठवून द्यावी हे विनंति. "

मोरोपंतांनीं ' महिपतिस्तुति ' हें प्रकरण विठोबा गोसावी यांच्या ' प्रेरणेवरून ' रचलें असें पंतांनीं त्यांतच ९ व्या आर्येमध्यें सांगितलें आहे. विष्णुपदवीकिलीच्या ४७ व्या आर्येत ' तारावे उपकर्ते जे सज्जन विठ्ठलादि गोसावी ' याप्रमाणें पंतांनीं विठोबा ताहराबादकरांचा उल्लेख केला आहे. पंतांचे देहावसान झाल्यावर त्यांचे पुतणे आप्पा यांस विठोबा एका पत्रांत लिहितात: " श्री महाराजांही सहस्र आर्या संतांवर केल्यात ह्मणोन ऐकिलें, त्यास तें प्रकरण आह्मांकडे आलें नाहीं. आणि बाबासाहेब महायात्रेस-गेले होते तिकडे जीं प्रकरणें जालीं असतील तीं स्वामी पाठविणार होते. प्रस्तुत ......सहस्र आर्या संतांच्या आणिक प्रकरणें लहान थोर जालीं असतील तीं पाठवावीं त्यांची प्रती करून सत्वर पावतीं करूं परंतु पत्र रितें न फिरावें. श्री बाबासाहेब जशी कृपा करीत होते तशी आंपली असावी " पंतांचे वडील पुत्र राघोपंत नाना यांस ते एका पत्रांत लिहितात. " थोर दशम व हं रामायण, दोहा रामायण व कडव्यांचें रामायण हे ग्रंथ बारा-

मतीस लेखक असेल त्यापासून लिहून कार्तिकीस पाठवावे रुपये पाठवून देऊं हे विनंती. ”

या पत्रांतील उताऱ्यांवरून विठोबा ताहराबादकर यांस पंतांविषयीं केवढा आदर होता हें स्पष्ट दिसतें. त्यांना गाण्याचें चांगलें अंग होतें ह्मणून ते पंतांचीं पदें नित्य रात्रीं देवापुढें बसून गात असत.

१४ **बाळंभट काजळे**:—मोरोपंतांच्या काव्यरसाला लुब्ध झालेल्या अनेक रसिकांपैकीं बाळंभट उर्फ यादव काजळे या नांवाचा एक मनुष्य होता. हा नगरच्या किल्ल्यांत रहात असे. मोरोपंतांच्या आर्येविषयीं अत्यंत प्रेम, खुद्द पंतांविषयीं उत्कट भक्ति, व आर्यापतीचें आर्यावृत्तानेंच अनुकरण करण्याची इच्छा, या तीन गुणांमुळें याचीं दोनच पत्रें पण फार रसभरित झालीं आहेत:—

(अ) बाळंभटाचें गद्यात्मक पत्र.

“ श्रीरामचंद्रचरणांबुजावलंबस्वांतरोलंबसौजन्यपारावरसकलकवीशमौलिभूषण राजमान्य राजेश्री सुहृध्दुरीण सद्गुरुवर्य राजश्री

मोरोपंत बाबा वडिलांचे शेवेशीं:—

विद्यार्थी बाळंभट काजळे मुक्काम नगरदुर्ग चरणावर मस्तक ठेवून कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील क्षेम जेष्ट कृष्ण ६ पर्यंत दुर्गांत सुखरूप असों विशेष. आपण पूर्वी पत्रप्रेषणेंकरून बाळकविरहतापनिरसन केलें. दर्शनलाभास तों द्वादशवर्षे अतिक्रांत झालीं. मध्यें आपण महायात्रेस जाण्याचे वेळेस आगमनसमयीं विद्यार्थी मी सुरगांवाजवळ असतां मला कळविलें नाहीं आणि माझा समाचारही घेतला नाहीं. आपण पुढें गेल्यावर प्रवरासंगमक्षेत्रास आलों तेव्हां ऐकिलें कीं आपण येथें आले तेव्हां जे मनास हळहळ वाटली ते ईश्वर जाणे......मी तत्रभवद्दर्शनमात्राविषयीं उत्सुक आहें याविषयीं फार प्रयासही नव्हता. हय्यंगवीनाधिक मृदुमानसास बाळकाविषयीं इतकी उपेक्षा न व्हावी. परंतु माझेंच दुरदृष्ट प्रबळ प्रतिबंधक झालें. पक्षरहित बाळकास पक्षिणी माताच उपेक्षूं लागली तर त्याचा उपाय काय? सांप्रत तापत्रयार्दित आहे तें वर्तमान पत्रीं लिहितां येत नाहीं हें नम:—

**मयूरेश्वराला नमस्कार माथा। पदीं बाळ ठेवूनि रक्षा अनाथा।**
**[illegible]वाची। अवस्था पुढें काय या यादवाची! ॥”**

मोरोपंत काशीयात्रेला इ. स. १७८९ मध्यें गेलें व येतांना सुरेगावाजवळून जाऊन त्यांची भेट झाली नाहीं याबद्दल बाळंभटाला जी हळहळ वाटली ती त्यानें या पत्रांत व्यक्त केली आहे, व पंतांचें मानस 'हय्यंगवीनाधिक मृदु' असून त्यांनीं आपली उपेक्षा केली याबद्दल आपल्याच 'दुरदृष्टाला' ह्म० दुर्दैवाला दोष लावला आहे.

( आ ) बाळंभटाचें आर्यात्मक पत्र.

श्रीमन्मोरोपंतस्वामीच्या त्या नमी सुपदकमळा।
यादव कज्जळ[1] षट्पद जेथें करितें अखंड पदक मळा ॥ १ ॥
बारामतिहूनि आलों घेउनि तुमचा निदेश नगराशीं।
वर्ष सुखाचें गेलें दीडचि, मग ये असौख्यनगराशी[2] ॥ २ ॥
येथें आली वामा[3] पामासम दे सुखासी ते मजला।
तेंच तिनें लघु काळें केल्या दुःखाचिया मला मजला ॥ ३ ॥
येथुनि गेली क्षेत्रा[4] गर्भवती ते ज्वरार्त घरिं पडली।
नसतां मीं तत्संन्निध गर्भ पडुनि यममुखांत सांपडली ॥ ४ ॥
पाणी सरतां जैशी जाई वाळूनि जाय कोमेली।
तैशी आयुष्यांतीं माझी हा हाय! बायको मेली ॥ ५ ॥
भार्यांतर न करावें होती माझी अशीच मग मरजी।
परि मीं ईश्वरनिर्मित मिथ्या करणार कोण पामर जी ॥ ६ ॥
दुसरी दैवबळानें अबळा आली दिसून मज कृत्या।
विसरुनि गेलों यास्तव खेदातिशयें स्वकीय हितकृत्या ॥ ७ ॥
तनु तनु[6] झाली रोगें इष्ट वियोगें सुचे न तजवीज।
वर सापत्न्यभ्रातृक्षय[7] मज जाळी अतर्क्य मज वीज[8] ॥ ८ ॥
आर्या प्रसन्न मजला हो, आर्याचा सदा घडो संग,।
आर्याछंदीं मति हो, भार्या न रुचो, असेंच द्या सांग ॥ ९ ॥
दुःखसमुद्रीं नौका तुमचे पाय स्मरूनि मन आहे।
पत्रजळें शमवावी भवदीयवियोगवन्हीची[9] आंहे ॥ १० ॥
दुर्गायुतान्विता[10] मज दुर्गात्राला[11] न होय उद्योग।

१ यादव काजळ. २ दुःख पर्वताच्या राशी. ३ स्त्री. ४ खरजेसारखी. ५ प्रवरासंगमास. ६ कृश. ७ सावत्र भावाचा मृत्यु. ८ विजेसारखा धक्का देऊन. ९ ज्वाला. १० संकटांनीं ग्रासलेल्या मला. ११ गात्रें दुर्बळ ज्याची अशाला.

**दुर्गाश्रया मला श्री दुर्गातोषें घडो भवद्योगें ॥ ११ ॥**
**सारांश हाचि करुणा तुह्मीं करा मजवरी अहीनैंमनें ।**
**सुज्ञाप्रति बहुलेखन किमर्थ करणें मदीय हीं नमनें ॥ १२ ॥**

१५ **रामचंद्र अद्वैतः**—पंतांची कीर्ति ऐकून त्यांच्या दर्शनाची इच्छा करणाऱ्या एका संस्कृतपद्धतिलोलुपानें लिहिलेलें एकच मासलेवाईक पत्र सांपडलें आहे! खुद्द पंतांचीं घरगुतीं पत्रें फार सोप्या भाषेंत लिहिलेलीं आहेत. पण या 'बंभरडिंभायमान' रामचंद्रानें 'श्रीमद्विदेहराजनंदिनी-हृदयानंदकररघुनंदनचरणारविंदमिलिंदायमानस मोरोपंत बाबांस' हें पत्र लिहिलें आहे त्याचा डौल कांहीं विलक्षण आहे:—"श्रुत्वा तु दूरे भवदीय कीर्ति' या श्लोकांचा जसा पूर्वार्धाभिप्राय तसा या श्रोत्रनेत्रांकारणें विवाद पडला आहे! तो परिहार कधीं होईल हा दैवयोग न कळे. भवच्चरणारविं-दसंदर्शनलाभानंद इंदुचकोरन्यायसा वाटतो. मीं तों अंकिंचन. वंचना न करितां माझ्या ठायीं पुत्रवात्सल्य विशेष राखिला पाहिजे हे विज्ञापना."

१६ **दाजीबा पुजारीः**—हे कोल्हापूरच्या देवीचे पुजारी होते. यांना मोरोपंतांच्या कवितेची गोडी फार लागली होती व हे बारामतीहून पंतांच्या आर्या मागवून लिहून घेत. पंत वृद्ध होते, हे नुक्ते बाळपणांत आले होते! यांनीं उद्योगपर्व लिहून घेतलें, त्याचे अखेरीस आपला मार्मिक अभिप्रायही लिहिला आहे तो असाः—

**हें फार सार भारतपर्वीत अपूर्व पर्व उद्योग ।**
**ह्मणवुनि लिहिलें स्वकरें, निकरें सोडूनि सर्व उद्योग ॥ १ ॥**
**कविता मयूरकविची, तीस मना, सुरभि मान वाचावी ।**
**तीच सतत, निरसाया, कविंहीं निजदुरभिमान, वाचावी ॥ २ ॥**
**ज्यां श्री मयूरकविपरि न परिसिला सकल कवि महीवरता[६] ।**
**साजेना कां तैसा त्या कविला सकलकविमहीवरता[७] ॥ ३ ॥**

---

१ नगरच्या किल्ल्यांत राहणाऱ्याला. २ आपली संगती. ३ थोर मनानें.

**४ श्रुत्वा तु दूरे भवदीय कीर्तिं कर्णौच तृप्तौ नच चक्षुषी मे !।**
**तयोर्विवादं परिहर्तुकामः समागतोहं भवदीक्षणाय ॥ १ ॥**

अर्थ—आपली दुरून कीर्ति ऐकून माझ्या कर्णांची तृप्ति झाली, पण नेत्रांची तृप्ति झाली नाहीं! ह्मणून त्यांच्या वादाचा निकाल लावण्याकरितां मी आपल्या भेटीस आलों आहें!"

५ कामधेनु. ६ पृथ्वीवर. ७ सकल कवींतलें अग्रगण्यत्व.

पंतांच्या समकालीन रसिकांनींच पंतांना कविमालेंत अग्रस्थान दिलें होतें. आपला दुरभिमान गळावा अशी ज्या होतकरू कवींची इच्छा असेल त्यांनीं पंतांची कविता वाचावी अशी दाजीबाप्रमाणें मीही अर्वाचीन कवींना विनंती करितों ! दाजीबांच्या हातची पंतकविता मी पाहिली आहे, दाजीबांच्या दप्तरीं पंतांची हस्तालिखित कविताही मला कांहीं मिळाली आहे.

१७ **रामचंद्र अनंत** बडवेः--पंढरपुरच्या बडवे मंडळींत प्रल्हादबोवा बडवे हे मोठे साक्षात्कारी पुरुष होऊन गेले. यांनीं शिवरायाची कारकीर्द पाहिली होती. पुढें औरंगजेब जेव्हां दक्षिणेंत मराठी राज्य बुडवण्याकरितां आला तेव्हां त्यानें श्रीविठ्ठलमूर्तीचा उच्छेद करण्याचा घाट घातला होता. अशा प्रसंगीं प्रल्हादबोवांनीं पांडुरंगास आपल्या बळदांत लपवून ठेवून श्रीचें रक्षण केलें. प्रल्हादबोवा प्रेमळ भक्त होते. त्यांनीं अमृतानुभवाचें संस्कृत भाषांतर केलें आहे. त्यांस पुत्र रामचंद्र नांवाचे होते. त्यांचे पुत्र व प्रल्हादबोवांचे नातू अनंत हे होते व अनंताचा पुत्र व प्रल्हादबोवांचे प्रपौत्र रामचंद्र बडवे हे मोरोपंतांचे समकालीन त्यांच्या आर्येचे भोक्ते होते. प्रल्हादबोवा नातू खेळवून शके १६४० मध्यें समाधिस्त झाले. त्यांच्या समाधितिथीचा उत्सव ( माघ कृष्ण ११ ) पंढरीस विठ्ठलमंदिरांतच होतो. विठ्ठलमूर्ति एकदा एकनाथांचे पणजे भानुदास यांनीं विजयानगरच्या राज्यांतून आणिली होती व तिचे पुढचें संकट प्रल्हादबोवांनीं टाळून शाहूराजे गादीवर येतांच पुन्हां इ. स. १७०९ मध्यें ती स्थापिली यामुळें या उभयतांची वारकरी सांप्रदायांत प्रसिद्धि आहे. यांचे प्रपौत्र रामबडवे हे पंतांचे स्नेही होत.

१८ **रामबडवे यांचे गुरु विठोबा दादा चातुर्मासे** हे होत. रामबडवे यांनीं मोरोपंतांच्या स्तवनपर ज्या आर्या केल्या आहेत, त्यांवरून त्यांची योग्यता व रसिकता बरीच दिसते. या मयूरस्तुतिपर आर्या २४ च आहेत. यांत मोरोपंतांच्या काव्यगुणांची महती फार मार्मिकपणानें वर्णिली आहे. ' सुश्लोक वामनाचा ' ही सर्वत्र गाजलेली मार्मिक आर्या याच रामचंद्र बडव्याची आहे व हा याच एका आर्येवर अजरामर होऊन राहील असें कोण ह्मणणार नाहीं ? याच्या आर्या काव्येतिहाससंग्रहांत छापलेल्या आहेत, व 'यांची मूळ

---

**1 प्रल्हाद बोवांची, अनंत व राम बडवे यांची कविता अद्याप छापलेली नाहीं, ती मला उपलब्ध झाली आहे.**

प्रत पंतगृहीं आहे. पंतांच्या समकालीन मित्राचें हें अभिप्रायपत्र तत्कालीन रसज्ञांच्या मताचें द्योतक ह्मणून येथें देतों:—

रामबडवेकृत मोरेश्वरवर्णनार्या.

भगवत्तनू[1] हरिकथा करि आर्यांनीं [2]अलंकृतीयुक्त।
मोरेश्वरपंताची ह्मणतीं पंडित अलं कृती युक्त ॥ १ ॥
मोरेश्वरपंताची ऐकुनि कविता मनीं सुकवि लाजे।
पावे विवर्णता, तें मीं किति वर्णूं जनीं सुकवि लाजे! ॥ २ ॥
अक्षरसंगति, यमकें, सुशब्द, अर्थाचिया चमत्कृतिला,।
पाहुनि भुले कवि ह्मणे, 'बुडवूं या काय मीच मत्कृतिला?' ॥ ३ ॥
आर्याकेका करितचि शिरला वाटे मयूर यमक-वनीं।
सुजनासि फार पीडिल ह्मणुनि बुडविला किरातयम कवनीं ॥ ४ ॥
यत्स्थिति पहतां मूर्धा डोलविला निज असेल जनकानें।
यच्छांति यत्सदयता ऐकोनि, किती शिके सुजन कानें? ॥ ५ ॥
आर्या अर्थविचारें गातां ही सुस्वरासिकता नाहीं।
अक्षरसंगति यमकें वेधी मन जोवं रसिक तानांहीं ॥ ६ ॥
कवितेंत भाषणांतहि भासे मृदुतकरूनि शुकपिकसा।
विश्वफळ श्रीरामा घाली कवनें विहाशि शुकपिकसा ॥ ७ ॥
सुश्लोक वामनाचा अभंगवाणी प्रसिद्ध तुकयाची।
ओंवी ज्ञानेशाची किंवा आर्या मयूरपंताची ॥ ८ ॥
अष्टोत्तर शत केलीं जेणें रामायणें पृथग्रस तीं।
भारतभागवतादि ग्रंथ करी मान्य जे समग्र सतीं ॥ ९ ॥
सर्वोत्कृष्ट कवन करि परि बाधी गर्वलेशही न जया।
सत्कुलज नम्रता धरि, गुणनिभृतत्वें न होय हीनज या ॥ १० ॥
कठिण ग्रंथ ह्मणुनि या आर्यांतें निंदिती न सुकवी ते।
मोठ्या मोठ्या कविचे मान्या यन्नृणति ओष्ठ सुकवीतें ॥ ११ ॥
सुजनोत्थकवनसद्रस दुष्टास न घेववूं सके कानीं।
संतोष मयूराच्या काय बिडालास होय केकांनीं? ॥ १२ ॥
सुस्वरकंठ रसिकें आर्या गातां मयूरबाबाची।
वेधी सुजनमनातें, न तसी धून ऐकतां रबाबाची! ॥ १३ ॥
वानी पंढरि न तसें साकेतातें गयाविमुक्तातें।
वर्णी भक्तां न तसें विरक्तसंन्यासिभवविमुक्तांतें ॥ १४ ॥

---

१ हरिकथारूप भगवन्मूर्तीला. २ भूषित. ३ लज्जेनें फिकटपणा.

**कवन सुरेंद्रायमरां मिळतें तरि हें सदार सिकते ते ।**
**साभार मिळतां सेविल नामाभासें उदार सिकतेतें ? ॥१५॥**
**कवन श्रवण करुनि खळ मानव न रमेल येथ न रमो तें ।**
**परि सज्जन श्रुतींतें भूषविलचि तेथिं जेंवि नर मोतें ॥ १६ ॥**

१९ पंतांच्या कवितेवर रामचंद्र वडवे यानें या आर्यांत जो अभिप्राय दिला आहे तितका मार्मिक अभिप्राय तितक्या शब्दांत दुसऱ्या कोणालाही देतां येणार नाहीं असें मला वाटतें. पंतांचे मित्र व शत्रु या दोघांचींही मतें त्यांत ग्रथित केलीं आहेत, व पंतांच्या काव्यांवर आजन्म व्यासंग ठेवणारा मनुष्य जें काय मत देईल तेंच त्यानें त्यांत दिलें आहे. त्यानें पंतांच्या कवितेचा रसिकतेच्या दृष्टीनें, भक्तिदृष्टीनें, व भाषादृष्टीनें विचार करून योग्य असाच अभिप्राय दिला आहे व याप्रमाणें मोरोपंतांच्या काव्यगुणांचा सर्व बाजूनें विचार करून त्यांच्या गुणांवर व स्वभावावरही त्यानें आपलें मत दिलें आहे. नव्या चिकित्सकांसही पटेल अशा पद्धतीनें त्यानें मोरोपंत व त्यांची कविता यावर आपलें मत गोड वाणीनें व्यक्त केलें आहे. या चोवीस आर्यांतला रामवडव्याचा अभिप्राय मी गद्यांत सांगतों:—

" मोरोपंताची कविता पाहून चांगला कवीही लज्जायमान होतो, त्याची अक्षरसंगति, त्याची यमकरचना, त्याची ठाकठिकीची रचना, त्याचे अर्थचमत्कार, हे पाहून नव्या कवीला आपली कविता बुडवून टाकावीसें वाटतें! मोरोपंताचें आचरण तरी काय वानावें ! ब्रह्मनिष्ठ जनकानें मान डोलविली असती असी त्याची स्वरूपस्थिति, त्याची शांती, त्याची सदयता, त्याचप्रमाणें त्याच्या वाणींतली मधुरता, सर्वोत्कृष्ट कवनें रचुन तीं पंडितांनीं गावीं अशा योग्यतेचीं उतरलीं असून त्याच्या अंगीं बाणलेली निरभिमानता, हे मोरोपंताचे गुण कोण वाखाणणार नाहीं. मोरोपंताच्या आर्या कठिण ह्मणून निंदक ह्मणतात; पण परगुणद्वेष्टे रसग्रहणाला असमर्थच होतात असें मीं ह्मणतों! सरसकाव्यरचनासामर्थ्य ज्यांना साधत नाहीं तेच पंताच्या आर्येस नाक मुरडतात! पण मीं सांगतों कीं पंताची आर्या सुस्वर कंठानें रसिकानें ह्मणावी ह्मणजे त्याला तिची माधुरी कळेल. मोरोपंतानें भारतभागवतादि ग्रंथ केले; १०८ रामायणें रचलीं; पंढरी, पांडुरंग व त्याचे भक्त यांचीं स्तोत्रें गायिलीं; पंताच्या आर्या तयार होतांच भरतखंडभर पसरल्या; त्याच्या आर्यांतील भक्तिरसानें विठ्ठल नाचूं लागला; त्यांनीं रामायणांत त्रयोदशाक्षरी मंत्र साधून, व भागवतांत

एकादशाक्षरी मंत्र साधून ग्रंथरूपानें भगवंताला पूजिलें. पंताची कविता इंद्राच्या कानीं जाईल तर तो सुद्धां इंद्राणीसह ती शिकायला येईल, अशा सत्कविआर्यापतीला माझा नमस्कार असो. ''

२० **रामजोशी सोलापूरकर**:—( शके१६८४–१७३४ ) पंतांच्या मित्रमंडळांत रामजोशासारखा बुद्धिवान् कवि दुसरा नाहीं. त्याची बुद्धि लोकोत्तर होती, त्याची वाणी पराकाष्ठेची रसाळ होती, त्याची लोकप्रियता असामान्य होती व या सर्वगुणांत जर सदाचरणाची भर पडती, व त्याची काव्यसंपत्ति आहे यापेक्षां अधिक विस्तृत असती तर आजकाल रामजोशाच्या बरोबरीनें नांव घ्यायला मराठींत दुसरा कवि आढळताना! 'रामजोशाच्या लावण्यांनीं तो तो शृंगारवीरादि रस किंवा वैराग्यपर उपदेश जसा मनावर ठसतो तसा इतर छंदांत रचलेल्या कोणत्याही काव्यानें ठसत नाहीं,' ( शालापत्रक. मार्च १८७५ ) असा कृष्णशास्त्री चिपळोणकरांनीं दिलेला अभिप्राय पुष्कळ अंशीं योग्य आहे. मोरोपंतासारख्या जुन्याचालीच्या सत्वशील व भक्तिमान् पुरुषाच्या चालीरीतींत व रामजोशासारख्या चंगीभंगी करणाऱ्या रंगेल रसिकाच्या चालीरीतींत केवढें अंतर! वस्तुतः या उभयतांच्या वागणुकींत दाक्षिणोत्तर ध्रुवांइतकें अंतर होतें, पण जोशीबोवांची रसिकता व अस्सल प्रतीची काव्यशक्ति यांची पंतांच्या मनावरअशी छाप पडली कीं त्यांना जोशीबोवांची भेट घेण्याची उत्कंठा झाली! विठोबादादांस पंतांनीं लिहिलेल्या पत्रांपैकीं एका पत्रांत पुढील वाक्य आहे. ' सोलापूरकर राजश्री कविप्रवर रामज्योतिर्विद् स्वामींचे शेवशीं साष्टांग नमस्कार. भेटी घडावी हे विनंति ' जोशीबोवांचा जन्म शके १६८४ मधला असून विठोबादादा शके १७१३ मध्यें समाप्त झाले. तेव्हां रामजोशांनीं तिशीं उलटण्याच्या आंत मोरोपंतासारख्याकडून ' कविप्रवर ' ही पदवी मिळविली व आपल्या भेटीचा त्यांना चटका लावला, ही काय सामान्य गोष्ट आहे? आमच्या दुर्दैवानें जोशीबोवांनीं पुष्कळशी कविता किंवा एखादें मोठें काव्य केलें नाहीं व ज्या लावण्या केल्या त्याही सोलापुरीं भाऊबंदांच्या भांडणामुळें लोकांना मिळत नाहींत! गेल्या दहापांच वर्षांत रामजोशांच्या काव्यांचीं दप्तरें मिळविण्याचा प्रयत्न पुष्कळ जणांनीं केला, पण त्यांपैकीं कोणालाही आजवर यश मिळालें नाहीं. पंत व रामजोशी यांचा कांहीं पत्रव्यवहार मिळता तर किती नामी झालें असतें! पण वर दिलेल्या वाक्याशिवाय पंतांनींही जोशीबोवांचा

कोठें उल्लेख केलेला आढळत नाहीं. पंत व रामजोशी यांच्या संबंधाच्या कांहीं आख्यायिका मात्र उपलब्ध आहेत, व पंतांच्या आर्यांचा फैलाव जोशीबोवांनीं कीर्तनांत केला अशी प्रसिद्धी आहे, ह्मणून त्यांचें चरित्र येथें थोडक्यांत देतों.

२१ धोंडभट जोशी यास मुसलमान पातशहाकडून सोलापूरची ज्योतिषपणाची व जोशीपणाची वृत्ति मिळाली होती. त्यांच्या वंशांतल्या जगन्नाथ जोशांस मुद्गलभट व रामजोशी हे दोन पुत्र झाले. मुद्गलभट हे जाडे विद्वान् , शास्त्री, व पुराणिक होते. यांनीं संस्कृतांत 'यदुवंश' ह्मणून एक काव्य केलें आहे. बाळपणीं बाप वारल्यामुळें मुद्गलभटाकडे रामजोशी यांच्या प्रतिपाळणाचें काम आलें. पण रामजोशी यांनीं हलकट लोकांत मिसळावें, नाचतमाशे करावे, अचकट विचकट व बीभत्स लावण्या रचून ह्मणाव्या, नाच्या पोऱ्यामागें डफावर गाणें गावें! असल्या त्यांच्या वागणुकीमुळें त्रासून मुद्गलभटांनीं १८ व्या वर्षीं रामजोशास 'तूं आमच्या शास्त्रीघराण्यास कलंक लावणारा कुलांगार जन्मला आहेस' असें ह्मणून घराबाहेर घालवून दिलें! रामजोशी नंतर तुळजापुरीं एक वर्ष होते, तेथें रात्रीं देवीनें यांच्या जिव्हेवर कांहीं अक्षरें कोरल्याचा यांस दृष्टांत झाला. पुढें स्वारी भटकत पंढरपुरास आली, तेथें दोन वर्षें बाबापाध्ये यांजपाशीं राहून काव्यालंकार व व्याकरणशास्त्र यांचें अध्ययन केलें. बाबापाध्ये हे यांच्या अलौकिक बुद्धीची तारीफ करीत, पण स्वारीचे चंगढंग पाहतांच त्यांनींही त्यांस घालवून दिलें! कांहीं वर्षें स्वारीनें कर्नाटक प्रांतीं काढलीं व तिकडे ते कानडी भाषा शिकले. पुढें आपल्या गुरूचा राग काढून टाकावा ह्मणून ते पंढरीस आले व कानडी ब्राह्मणाचें सोंग घेऊन एकदा बाबांच्या घरीं जेवायाला आले. जेवण होईपर्यंत स्वारी संस्कृतांत अशा सफाईनें बोलत होती कीं, बाबांस हे कोणी विद्वान् कानडी शास्त्री आहेत असेंच वाटलें! भोजनोत्तर जोशीबोवांनीं आपलें खरें स्वरूप प्रकट केलें, तेव्हां बाबा रागानें ह्मणाले 'राम्या! अरे गाढवा! मला असें फसविलेंस काय?' जोशीबोवा फार विनयशील असत. त्यांनीं बाबांचे पाय धरिले व क्षमा मागितली! कांहीं दिवस ते बाबांजवळ राहिले. पंढरीस असतां त्यांनीं 'क्षमातळीं इजसमान नाहीं उमामहेश्वरपुरी' ही सुंदर लावणी केली. नंतर रामजोशी सोलापुरीं परत आले. मुद्गलभट एक दिवस आजारी होते, तेव्हां रामजोशी यांनीं व्यासपीठावर बसून

उत्कृष्ट पुराण सांगितलें. धोंडी शाहीर हा त्यांचा परम मित्र होता.बंधूच्या भीतीनें रामजोशी यांनीं कांहीं लावण्या दुसऱ्याच्या नांवावर प्रसिद्ध केल्या व कांहीं बिननांवी केल्या असें ह्मणतात. सवाई माधवराव पुण्यास रंग खेळले तेव्हांपासून महाराष्ट्रांत रंगेल पुरुषच फार उत्पन्न झाले! अनंत फंदी, सगन भाऊ, होनाजी बाळा, बाळा कारंजकर, धोंडी बापू, राघो धवशा, मार्तंडा शिंपी, मल्हारी न्हावी, रामा गोंधळी, वगैरे गुणी मंडळी हळूहळू तयार होत होती; त्यांच्या गुणांचें चीज करून त्यांची व आपली कीर्ति अजरामर करणारे रावबाजी अद्याप गादीवर यायचे होते! या सर्व मंडळाचे उस्ताद विद्वान् शास्त्री कुळांत जन्मलेले, बाबापाध्यांसारख्या पंडिताजवळ पढलेले, महाबुद्धिमान् व शीघ्रकवि रामजोशी हेच होत! रामजोशी यांची चिमानायकीण, त्यांचा रेशमी काढण्याचा झोंपाळा, घोडा, कुत्रीं, माकडें, राघू वगैरे पशुपक्ष्यांचा समुदाय, तमाशाप्रिय विषयासक्त अनुयायांच्या झुंडी, यांचें वर्णन येथें करावयाचें कारण नाहीं! जोशीबोवा शाक्त होते एवढें सांगितलें ह्मणजे ते मद्य, गांजा, तंबाखू यांचा आदर करीत हें कांहीं निराळें सांगायला नको! तसेंच अशा प्रकारचा मनुष्य उधळ्या व दिवाळखोर असे व त्याचे भगत त्याला पैशाचा पुरवठा करीत तरी तो पुरा पडत नसे, सावकाराच्या जाचांतून त्यांना अनेक वेळां त्यांच्या रसवंती रसनेनें सोडविलें, वगैरे प्रकारही उघड समजण्याजोगेच आहेत! जोशीबोवांच्या वाणींत विलक्षण जादू भरलेली होती, त्यांचें वक्तृत्व पराकाष्ठेचें चित्ताकर्षक होतें, व त्यांचा स्वभाव दिलदार व उदार होता, याबद्दल त्यांच्या अनेक आख्यायिका प्रसिद्ध आहेत. एकदां एका सावकारानें त्यांचें एक कीर्तन ऐकून पांच हजाराचे रोखे फाडून दिले; श्री शंकराचार्यांची स्वारी जोशीबोवांवर बहिष्कार घालायला आली होती पण त्यांचें भाषण व वैराग्यपर लावण्या ऐकून संतुष्ट झाली; मुद्गलभटांचा राग त्यांच्या पुराणकीर्तनप्राविण्याच्या कीर्तीमुळें कमी झाला; सांगली संस्थानचे अधिपति चिंतामणराव आप्पा यांस जोशीबोवांच्या आचरणामुळें वाटणारा तिरस्कार त्यांची तान ऐकतांच पार नाहींसा झाला व माडीवरून खालीं कीर्तनास येऊन बसल्यावर जोशीबोवांचे अंगावर शालजोडी घालून त्यांनीं त्यांचा सत्कार केला; वगैरे गोष्टी जोशीबोवांच्या मोहक रसवंतीची साक्ष देतात. रामजोशी फार निर्भीड होते. एकदां इचलकरंजीकरांचे वाड्यांत जोशीबोवांचें कीर्तन चाललें असतां आश्रित मंडळींत यांच्या जबर बिदागीबद्दल वाटाघाट चाललेली पाहून

जोशीबोवांनीं समयसूचकता दाखवून खालील आर्या तात्काळ रचून कथेंतच ह्मटली:—

**भोजासम कविताप्रिय कर्णापरि दानशूर घोरपडे।**
**ऐसें असतां माझ्या देणगिचा कां तुह्मांस घोर पडे ! ॥ १ ॥**

सोलापुरास सुबरावबाबा ह्मणून एक साधु मठ बांधून राहत होते. जोशीबोवांचा श्रोतृसमाज जसा वाढूं लागला तशी त्यांच्या कीर्तनाला जागा विस्तृत लागूं लागली. एकदां कीर्तनासाठीं सुबरावबावांचा मठ जोशीबोवांनीं मागितला असून त्यांनीं तो दिला नाहीं ह्मणून हट्टानें जोशीबोवांनीं त्यांच्या मठासमोर कीर्तन केलें व त्या प्रसंगीं:—

**हटातटानें पटा रंगवुनि जटा धरिसि कां शिरीं।**
**मठाची उठाठेव कां करी।**

ही लावणी रचून ह्मटली, व तींत अखेर ‘ सदा हरि कविरायावर फिदा ’ ह्मणून आपली कडी वर ठेवून दिली ! एकदां परशुरामभाऊ पटवर्धन यांच्या वाड्यांत जोशीबोवांचें कीर्तन चाललें होतें. परशुरामभाऊ फार शूर योद्धे होते. कर्णपर्वांतला शेवटचा प्रसंग—कीं पृथ्वीनें रथचक्र गिळिलें असतां एका हातानें कर्ण तें चक्र बाहेर काढीत होता व दुसऱ्या हातानें शत्रूवर बाण सोडीत होता तेव्हां अर्जुनानें सवड साधून त्याचें शिर छेदिलें—तो वीररसप्रधान प्रसंग मोरोपंती आर्यांच्या आधारानें परशुरामभाऊंपुढें रामजोशी कीर्तनप्रसंगीं मोठ्या आवेशानें वर्णन करीत असतां ‘ हें अधर्मयुद्ध झालें ’ असें ह्मणाले, तोंच परशुरामभाऊंनीं त्वेषानें अस्तन्या मागें सारून ‘ मी परशुरामभाऊ जिवंत असतां माझ्यासमोर हें अधर्मयुद्ध ! ’ असें ह्मणतच तलवार म्यानाबाहेर काढिली ! कारभाऱ्यानें ‘ हें कीर्तन आहे ’ ह्मणून हळूच सुचवितांच भाऊ देहभानावर आले !! दुसऱ्या दिवशीं जोशीबोवांनीं ‘ रासमाला’ प्रकरण काढून कीर्तनांत शृंगाररसाची कमाल करून सोडली. जोशीबोवांनीं कारभाऱ्यास आधींच सांगून ठेविलें होतें ‘ कीं बाईसाहेबांना यजमानसाहेबांची स्वारी अमुक वेळां आपल्या भेटीला येणार आहे ’ हें आधीं कळवून ठेवा. कीर्तनांत जोशीबोवांनीं शृंगाररस इतका ओतला कीं परशुरामभाऊंची स्वारी कीर्तनामध्येंच उठून तडक बाईसाहेबांच्या महालाकडे चालती झाली !!!

२२ असो. याप्रमाणें जोशीबोवांच्या वाणींत कांहीं विलक्षण सामर्थ्य होतें. त्यांचें वक्तृत्व, त्यांची कवित्वस्फूर्ति, त्यांचें चातुर्य व त्यांची समयसूचकता, त्यांची रसिकता व गुणलुब्धता, हे गुण खरोखर वर्णनीय आहेत.

आपल्या वयाच्या ५० व्या वर्षी इ. स. १८१२ या सालीं जोशीबोवा पुण्यास आले व त्यांनीं आपला काशीयात्रेला जाण्याचा हेतु प्रकट केला. दोन दिवस परडी फिरली तों १५,००० रुपये जोशीबोवांपुढें येऊन पडले! पण हा त्यांचा शेवटचा हेतु सिद्धीस न जातां त्यांचें पुण्यासच प्राणोत्क्रमण झालें.

२३ जोशीबोवांची फार कविता प्रसिद्ध नाहीं. कांहीं लावण्या मात्र प्रसिद्ध आहेत. याशिवाय त्यांचे चुटके, कटिबंध, आर्या, श्लोक, पदें, मदालसा चंपू ( संस्कृत ), छंदोमंजरी, वगैरे बरीच कविता आहे. त्यांचें साहित्यशास्त्रज्ञान त्यांच्या बहारीच्या छेकापन्हुतींवरूनच स्पष्ट दिसतें. त्यांच्या 'बाई यशोदे मूल तुझा कान्हा' या लावणींत मराठी, हिंदुस्थानी, कानडी, व संस्कृत या चार भाषा आहेत! त्यांच्या गौळणी व कृष्णलीलापर लावण्या गोड आहेत. त्यांच्या काव्यांत प्रसादगुण सर्वत्र भरलेला आहे. त्यांची भाषा सरळ, सहज, अस्खलित, व जोरदार आहे. त्यांना सर्व रस चांगले वर्णितां येतात. पण शृंगारपर, वैराग्यपर, वीररसपर, व वर्णनपर असे यांच्या लावण्यांचे चार वर्ग करितां येतात:-

**कोण्या ग सुभगाची मदनमंजरी। सांग सखे सुंदरी॥ ध्रु०॥**

या त्यांच्या शृंगारपर लावणींत जी बहार आहे तीच :—

**नरजन्मामधि नरा करुनि घे नरनारायणगडी।**
**तरिच सार्थक मानवकुडी॥ ध्रु०॥**

या वैराग्यपर लावणींत आहे; तीच गोडी :—

**ब्राह्मणीराज्य जोरदार घोड्यावर स्वार होते शीपाई।**
**अबर सदि कैकांनिं पाहिली शत्रु ठेविले नाहीं॥ ध्रु०॥**

या वीररसप्रधान लावणींत आहे; तीच खुमारी :—

**भूतळांत अशी या स्थळांत यमुनाजळांत ही मगबाळा।**
**अशी भुवनत्रयीं कोणती दुजी वेल्हाळा॥ ध्रु०॥**

या वर्णनपर लावणींत आहे. रामजोशांच्या लावणींत भक्तिरसहि कांहीं कमी नाहीं.

'बा काय घालिसी संसृतिचा पिंगा ।
या मानवदेहीं भज रे श्रीरंगा ॥ ध्रु० ॥'

ही व

भज भज भवजलधिमाजि मनुजा ! शिवाला ॥ ध्रु० ॥

ही लावणी किती तरी गोड आहे! जोशीबोवांचे कित्येक चरण इतक्या सफाईनें व इतके चटकदार उतरले आहेत, कीं मला वाटतें एक एक चरण ह्मणजे एक एक स्वतंत्र व्याख्यान आहे:—

(१) रांडा पोरें वंचक चोरें जंवर मिळवितां तंवर थवा ।
शिणें तंवर तीं भुतें भोंवतीं कोण कुणाचा सखा जिवा ॥ १ ॥
(२) वित्त पाहतां पित्त येतसे चित्त पाहिजे मला ।
असें हरि ह्मणतो नुमजे तुला ॥ २ ॥
(३) भगवंत भुकेला भक्तिचा पाहुणा ॥ ३ ॥
(४) सरक सरक तूं पडुं नको गहनीं दुर्ममता खोटी ।
हरिमायेचा खेळ कळेना टांगिल उफराटी ॥ ४ ॥
(५) कितीक येती कितीक जाती घिरटी होते काळाची ॥ ५ ॥
(६) काम कोप हे मारा मग तुह्मि साधन अन्य करा न करा ॥६॥

असे अनेक अर्थप्रचुर आणखी पुष्कळ चरण देतां येण्यासारखे आहेत. जोशीबोवांच्या कवितेची माधुरी एवढ्यावरून ही कळण्यासारखी आहे. त्यांच्या चार लावण्या ऐतिहासिक आहेत. एक सवाई माधवरावाच्या कारकीर्दीत झालेल्या ब्राह्मणी राज्याच्या उत्कर्षावर आहे; दुसरी होळकरदंग्यावर आहे; तिसरी इ. स. १८०३ मधल्या भयंकर दुष्काळावर आहे; चवथी रावबाजी-वर आहे. दुसऱ्या व तिसऱ्या लावणींत जोशीबोवांनीं समाजांतली सारी घाण चवाठ्यावर आणली आहे, त्यामुळें समाजस्थितीचें हुबेहूब चित्र त्यांत वठलें गेलें आहे. त्यावरून रावबाजींच्या कारकीर्दींत पुण्यास जो गोंधळ माजला होता, त्याची वाचकांस चांगली कल्पना येणार आहे. रावबाजींवरच्या लावणींत जोशीबोवांनीं 'या आनंदवल्लीच्या तुऱ्याचें' अवास्तव गौरव केलें आहे तें पाहून मात्र आश्चर्य वाटतें. रावबाजींचे दुर्गुण जरी अनंत होते तरी त्यांचा गवई, तमासगीर, शाहीर वगैरे गुणिजनांना आश्रय होता व तत्कालीन लोकांत त्यांच्या दातृत्वाची ख्याति होती ह्मणून कदाचित् जोशीबोवांनीं हें स्तवन केलें असेल! जोशीबोवांचे भाषेंत संस्कृताची प्रौढी व प्राकृताची सरलता हे दोन्ही गुण आहेत. 'धिग धिग जळो तुझी जिनगाणी'

' उसंत खा, ' ' कोण्याग झाडाचा तूं पाला, ' कुठ होती रांड पोटजळी, ' ' मग होईल फें फें, ' वगैरे अगदीं प्रचारांतले रचनाप्रकार पुष्कळ वेळां आल्यानें त्यांच्या भाषेस मोहकपणा आला आहे. ' किली ' 'गोष्पद,' इ० मोरोपंती शब्द, ' यति मतिरतिपति ' वगैरे मोरोपंती प्रास, यांच्या लावण्यांत सांपडतात, यावरून पंतांची कविता जोशीबोवांनीं वाचल्याचें स्पष्टच होतें. जोशीबोवांची कीर्ति व लोकप्रियता इतर सर्व शाहीरांस दिपवून टाकण्यासारखी होती. पेशव्यांचे दरबारीं त्यांस ' अभिनव कालिदास ' ही पदवी मिळाली होती, निळकंठशास्त्री थत्ते यांनीं त्यांच्या कीर्तनांतल्या कर्मकांडस्थापनेनें संतुष्ट होऊन त्यांचा मोठा सत्कार केला होता; व मोरोपंतासारख्यानें त्यांस ' कविप्रवर ' असें संबोधून त्यांचें सख्य संपादिलें होतें.

२४ जोशीबोवा पूर्ववयांत फार रंगेल होते पण पुढें ते बरेच निवळले त्यांच्या शृंगार व वैराग्य या विरोधी रसांवर फारच बहारीच्या लावण्या आहेत. येथें वाचकांस भर्तृहरि व जगन्नाथपंडित यांचें स्मरण झाल्याविना राहणार नाहीं. कोठें भर्तृहरीचें शृंगारशतक व कोठें वैराग्यशतक ! तसेंच कोठें जगन्नाथपंडिताचा भामिनीविलास ( मुख्यतः पूर्वार्ध ) व कोठें अश्वधाटी ! यावरून असें अनुमान निघतें कीं भर्तृहरि, जगन्नाथपंडित, व रामजोशी यांसारखे शुद्धमनस्क, बुद्धिमान् , व विचारी पुरुष पूर्ववयांत अनेक खेळ खेळले असले तरी तारुण्याचा उमाळा ओसरतांच उमजून वैराग्यशील व भक्तिमान् बनतात ! ! आजन्म पवित्र राहणाऱ्या पुण्यपुरुषांपेक्षां अर्थात् यांची योग्यता कमीच समजली पाहिजे. तथापि ' पश्चात्तापेन शुध्यति ! ' हें तत्त्व कांहीं खोटें नाहीं.

जोशीबोवांच्या डोळ्यांत अंजन घातलें आमच्या मयूरकवितावधूनें !

" निर्दूषणा गुणवती रसभावपूर्णा ।
सालंकृतिः श्रवणकोमलवर्णराजिः "

अशी मयूरकन्या जेव्हां आपल्या पणांत आली, तेव्हां तिनें आपल्या आर्यगुणांनीं अनेक रसिकांस चटका लाविला, पण ती अखेर वश झाली जोशीबोवांस ! पांडुरंगराय नाईक लक्ष्मीसेवारत ह्मणून, बाबापाध्ये कर्मठ धर्मशास्त्री ह्मणून, मैराळबोवा व विठोबा ताहराबादकर भावडे हरिदास ह्मणून, तिला पूर्णपणें कोणीही आवडतना ! अखेर तिनें आपल्या गुणांवर लुब्ध झालेल्या, आपल्याच सारख्या रसिक व शांतवीरशृंगारादिरसनिपुण अशा रामजो.

शाच्या गळ्यांत माळ घातली ! ! हा समसमांचा योग पाहून एका मर्मज्ञ प्रेक्षकानें:—

**जैशी जनकें दिधली सच्चिद्घन राम जो सिता त्याला।**
**तैसी मयुरें दिधली स्वार्या ती रामजोसितास्याला! ॥ १ ॥**

हें मंगलाचरण ह्मणून या परस्परानुरूप जोडप्यावर मंगलाक्षता टाकल्या! सतीच्या संगतीनें बहकलेला पतीहि सुमार्गावर येतो, या तत्त्वाप्रमाणें रामजोशाच्या बुद्धिवैभव, लोकप्रियता, व रसिकता, या गुणांवर लुब्ध झालेली जी आर्यावधू तिला आपल्या पतीच्या विषयासक्तीविषयीं मत्सर उत्पन्न झाला; व:—

**जिया उत्तम कुळींचिया होती। आणि गुण लावण्य आथी।**
**तिया आणिकीतें न साहती। सुतेजपणें ॥ २ ॥**

या ज्ञानोबारायांच्या उक्तीप्रमाणें तिनें आपल्या सवतीला पतीच्या हृदयमंदिरांतून पार हुसकून दिलें ! हळू हळू जोशीबोवांना तिचा कंटाळा येऊं लागला, आपल्या नव्या आर्यावधूच्या ते पूर्ण कबज्यांत आले व त्या सतीनें त्यांना अल्पकाळांतच आपल्या सारखे शुद्धसत्वगुणी व ईश्वरभक्तिपरायण केलें ! ! कर्तव्यतत्पर व सुमनस्क साध्वी स्त्री आपल्या चंगीभंगी झालेल्या व कुसंगतीनें बिघडलेल्या पतीवर आपल्या सद्गुणांनीं पुरा पगडा बसवून त्याला दुर्व्यसनमुक्त करिते या सिद्धान्ताच्या स्पष्टीकरणार्थ हें उदाहरण खासें देण्यायोग्य आहे ! ! !

२९ रामजोशी पंढरीस असतांना एकदां मोरोपंतही तेथें देवदर्शनार्थ आले. जोशाबोवांचें कीर्तन होणार ह्मणून शेंकडों प्रेक्षक एका जुन्या वाड्यांत जमले होते. जोशीबुवांनीं पंतांस मुद्दाम बोलाविलें, पण ' नटाचें तोंड पाहणें शास्त्रविहित नव्हे ' ह्मणून पंतांनीं जाण्याचें साफ नाकारिलें. फार भीड खर्चून त्यांना अखेर जोशीबोवांनीं कीर्तनास आणलेंच, पण ते सभेकडे पाठ करून माडीवर बसून ऐकूं लागले ! पंतांचा आपल्याविषयींचा वाईट ग्रह काढून टाकण्याकरितां जोशीबुवांनीं मुद्दाम हा प्रसंग घडवून आणला. त्यांनीं त्या दिवशीं वैराग्यभक्तिपर लावण्या ह्मणून कीर्तनांत श्रोत्यांस तल्लीन करून सोडलें. मोरोपंतही फार संतुष्ट झाले व रामजोशी यांची त्यांनीं पाठ थोपटून त्यांस सांगितलें, ' अशी अमृतासारखी मधुरं वाणी जनांना विषयकर्दमांत बुडवून टाकण्यांत न खर्चितां आजच्यासारख्या कीर्तनांनीं त्यांस परमार्थाचा मार्ग दाखविण्यांत तुम्ही ती वेंचाल तर तुमच्या जन्माचें सार्थक होईल ! ' हा उपदेश वायां गेला नाहीं. जोशीबोवा ह्मणाले ' कीर्तनाची तयारी मजपाशीं नाहीं '

यावर पुन्हां पंत ह्मणाले. 'विद्वत्ता व वक्तृत्व हे तुमचे गुण असामान्य आहेत. मात्र तुह्मी डफ टाकून हातीं वीणा घेतला पाहिजे. दुसरें, मी आर्या करितों त्या कशासाठीं व कोणासाठीं ? तुमच्यासारख्यांना कीर्तनांत त्या उपयोगीं पडाव्या ह्मणून तर मीं हा उद्योग चालविला आहे! ' जोशीबोवांनीं तात्काळ डफ टाकून देऊन वीणा हातीं घेतला. जोशीबोवा पूर्वी तमासगीर होते ते हरिदास बनले; व त्यांचा व्रात्यपणा लवकर सुटला नाहीं, तरी पंतकृतीचा त्यांनीं स्वीकार केल्यापासून त्यांच्या वृत्तींत हळू हळू पालट होत गेला, व शेवटीं ते दुर्व्यसनांपासून मुक्त होऊन हरिभजनीं रत झाले.

२६ पंतांच्या आर्यांचा व्यासंग जोशीबोवांनीं खूपच वाढविला. एके दिवशीं जोशीबोवांच्या कीर्तनप्रसंगीं पंत हजर होते. जोशीबोवा अमळ विनोदी व धीट होते. त्यांनीं पंतांच्या भारतांतल्या एका आख्यानावर कीर्तन चालविलें. असतां एका आर्येचा एक कथानकपर व एक वेदांतपर असे दोन अर्थ सांगितले व चटकन् पंतांच्या उदराकडे बोट करून ह्मणाले " माझ्या अल्पमतीस जे दोन अर्थ सुचले ते मीं सांगितले, पण या विशाल उदरांत आणखी किती अर्थांचा समावेश झाला आहे हें त्याचें त्यासच ठाऊक! " याप्रमाणें पंतांच्या विशाल बुद्धीची तारीफ करितां करितां पंतांच्या दोंदिलपणावरही जोशीबोवांनीं थोडासा रोख ठेवला ! पंतांच्या आर्येंत अर्थबाहुल्य असतें अशी प्रसिद्धी पंतांच्या वेळेपासून आहेच.

२७ एकदा पंत निरोष्टरामायण रचीत असतां ओंठाला ओंठ लावल्याशिवाय ह्मणजे पवर्ग गाळून तें रचावयाचा त्यांचा बेत असल्यामुळें त्या दिवसापुरते ते पांच वर्ण गाळावयाचा त्यांनीं निश्चय केला. जोशीबुवांनीं सहजासहजीं पंत आपल्या खोलींत काय करीत आहेत हें मुकाट्यानें पाहून येण्याला आपल्या कारकुनास सांगितलें. कारकुनास पाहतांच पंतांनीं खोलींतूनच उत्तर दिलें कीं, 'रघुनाथचरित लिहीत आहें.' रोजचा सोपा 'राम' सोडून पंतांनीं आज 'रघुनाथ' कां धरिला याचा विचार करितां करितां चतुर रामजोशांच्या एकदम लक्षांत आलें कीं पवर्ग गाळून रामायण रचण्यांत पंत गुंतलेले असावेत. पंत त्या वेळीं अनेक रामायणें रचीत होते व त्यांपैकीं बहुतेक जोशीबुवांच्या पहाण्यांतही आलीं होतीं. त्यावरून हे कांहीं तरी रामायण रचीत आहेत व 'रघुनाथ' 'व राम' या शब्दांतील वर्णांचा विचार करितां 'म' हें पवर्गांतलें अक्षर टाळण्याकरितां पंतांनीं 'रघुनाथ' शब्द योजला असला

पाहिजे असा त्या चतुर पुरुषानें तर्क बांधला व दुसरे दिवशीं जोशीबोवा पंतांचे भेटीस आले तेन्हां प्रथम 'पंत, काढा पाहूं तुमचें निरोष्ठ्यरामायण बाहेर!' असें ह्मणाले. पंतांना जोशीबुवांच्या कल्पकतेची धन्यता वाटली.

२८ जोशीबुवांनीं मोरोपंतांच्या भागवतावरचा आपला अभिप्राय खालील आर्येत नमूद करून ठेवला आहे.:—

**वाणी मयूरवदनीं जी न शुकातें द्विजोत्तमा यावी।**
**पक्ष श्रीहरि धरि जरि काय न करि तरि अनंत मायावी ॥ १ ॥**

या आर्येतला 'मयूर' 'शुक' 'द्विजोत्तम' 'पक्ष' ह्या शब्दांवरचा श्लेष उघडच आहे. 'श्रीशुकांनीं भागवत रचिलें व मोरोपंतांनींही भागवत रचिलें, पण शुकाचार्यांच्या वाणींत गोडी कमी इतकी ती मयूराच्या वाणींत आहे, भगवंतांनींच मयूर कवीचा पक्ष धरिला मग त्या अनंत मायावीला काय करितां येणार नाहीं?' असा जोशीबोवांचा अभिप्राय आहे. या आर्येवरून मोरोपंती भागवत परम सुरस उतरलें आहे, व मोरोपंत भगवंताचे अनुगृहीत आहेत असें पंतांचे तरुण भक्त रामजोशी यांचें मत स्पष्ट दिसते.

२९ याप्रमाणें मोरोपंतांचे मित्र रामजोशी यांची संक्षिप्त हकीकत आहे. ती ते पंतांचे समकालीन समगुण कवि ह्मणून, त्यांचे मित्र ह्मणून, त्यांच्या कवितेचा प्रसार करणारे प्रख्यात हरिदास ह्मणून, इतक्या विस्तारानें येथें द्यावी लागली. पंतांचे समकालीन संत व कवि कृष्णदयार्णव, शिवदिन केसरी, अमृतराय, सोहिरोबा आंबिये, महिपतीबाबा, ज्योतिपंत भागवतकार, देवनाथ महाराज, अवचितसुत काशी, शहामुनि, निरंजन माधव योगी, वगैरे प्रसिद्ध सत्पुरुष होते. यांपैकीं कित्येकांच्या पंतांच्या भेटी झाल्या असतील, यांपैकीं कित्येकांनीं पंतांची कविता वाचली असेल, त्यांचा पंतांच्या कवितेवर व पंतांच्या कवितेचा त्यांच्या कवितेवर किती परिणाम झाला असेल, वगैरे गोष्टींचा विचार करण्यास प्रस्तुत ग्रंथांत सवड नाहीं. '**पंतांचे समकालीन मराठी कवि**' ह्मणून मी एक निराळा ग्रंथ आज पांच वर्षे लिहीत आहें. तो निम्मा तयार झाला आहे. सर्व ग्रंथ छापून या ग्रंथाच्या मागोमाग तो प्रसिद्ध होईल. याच ग्रंथांत या विषयावर एक प्रकरण घालावें असें

माझ्या मनांत होतें. पण तें प्रकरण इतकें वाढलें कीं कांहीं मित्रांच्या सूचनेवरून त्याचा निराळाच ग्रंथ करणें मला योग्य वाटलें. पंत व त्यांचे समकालीन कवि यांचा अन्योन्य संबंध तर खास होता, हें पंतांनीं अमृतराय, महिपती वगैरेंवर ज्या आर्या केल्या आहेत त्यावरूनच उघड होतें. आणखी दोन गोष्टी येथें सुचवून हें प्रकरण पुरें करितों. निरंजनमाधवांनीं एक निरोष्ठ्रामायण व एक तेराच श्लोकांचें मंत्ररामायण रचिलें आहे! हीं दोन्ही रामायणें पंतांच्या रामायणापूर्वींचीं दिसतात. हीं पंतांच्या पाहण्यांत किंवा ऐकण्यांत आलीं असावींत असें मानण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं. हीं रामायणें वाचून पंतांना अशींच रामायणें रचण्याची स्फूर्ति झाली नसेल कशावरून? पंतांचीं रामायणें अगोदरचीं आहेत असें सिद्ध झाल्यास निरंजनमाधवांच्या वाचण्यांत पंतांची कविता आली होती असें तरी मानावें लागेल. कांहीं ठरलें तरी त्यांनीं एकमेकांची कविता पाहिली होती हें खास आहे. सगनभाऊंनीं आपल्या एका लावणींत पंतांच्या ‘ गीतार्यांची ’ तारीफ केली आहे! पंढरपुराजवळच्या गोपाळपुरीं अवचितसुत काशी यानें द्रौपदीस्वयंवर नामक एक ओंवीबद्ध ग्रंथ शके १६१८ मध्यें रचिला. याची कविता फारच रसाळ असून याच्या ‘ हरिची भगिनी ह्मणे सुभद्रा रुक्मिणिवीहनी दया करा ’ ही सुभद्राहरणाची लावणी व ‘ भीमकबाळा ह्मणे नृपाळा त्या शिशुपाळा मी न वरीं ’ ही रुक्मिणिस्वयंवराची लावणी या दोन्ही आबाळवृद्धांना ऐकून माहीत आहेतच. पंतांच्या कृष्णविजयाच्या ८३व्या अध्यायांतली रुक्मिणिविवाहाची कथा व काशीकवीची ही रुक्मिणिस्वयंवराची लावणी या दोन्ही एकदम पाहिल्या ह्मणजे स्पष्ट दिसतें कीं यांपैकीं कोणी तरी कोणाच्या तरी आख्यानावरून आपली कविता रचिली असावी. एकच प्रसंग पहा:—

पंतः—रुक्मी माझा दादा जो आह्मां साजणांमधें मोठा।
खोटा नव्हेचि परि हरिचरितरसीं तो भिजे न मणिगोटा॥१॥
काशीकविः—रुक्मी माझा वडील दादा आह्मां साजणांमधि मोठा।
शहाणा परंतु हरिचरितामृतरसांत न भिजे मणिगोटा॥

असे अनेक तुलनात्मक प्रसंग दाखवून सिद्ध करितां येईल कीं पंत व त्यांचे समकालीन कवि यांचा अन्योन्य संबंध प्रत्यक्ष अगर काव्यरूपानें निश्चयेंकरून होता. येथें थोडी दिशा मात्र दाखविली आहे, विशेष उहापोह करण्यास अवकाश नाहीं. असो. पंतांच्या गुणांनींच ते आपल्या काळीं

सर्वत्र गाजले होते. गुण जवळ असल्यावर कीर्तीची अडचण कधींच पडत नाहीं ! खऱ्या भक्तांची व चेल्यांची वाण पडत नाहीं ! ह्मटलेंच आहे.

गुणाः कुर्वंति दूतत्वं दूरेपि वसतां सताम् ।
केतकीगंधमाघ्राय स्वयमायान्ति षट्पदाः ॥ १ ॥

---



# प्रकरण आठवें.



## पंतांची काशीयात्रा

**नाना तीर्थी क्षेत्रांस जावें । तेथें त्या देवाचें पूजन करावें ।**
**नाना उपचारीं अर्चावें । परमेश्वरासी ॥ १७ ॥**

—दासबोध. द० ४ स० ५

१ काशीयात्रेचें माहात्म्य. २ प्रवास व तीर्थयात्रा यांची आवश्यकता व पंतांच्या तीर्थयात्रा. ३ अमरसिंह जाधव. ४ अमरसिंहाबरोबर पंत काशीयात्रेस जाण्यास निघतात. ५ पंतांचे मुक्काम. ६ पंतांचें गयेचें पत्र. ७ पंतांची कविता काशीस्थ पंडित मान्य करितात. ८ या गोष्टीचें महत्व. ९ पंतांची काशीस झालेली कविता १० गंगावकिली व विष्णुपदवकिली. ११ या वकिल्यांची योग्यता; पंतांचें चातुर्य व लोकप्रीति. १२ परत फिरतांना अहल्याबाई होळकरीण या साध्वीची व पंतांची भेट. १३ खरवंडीच्या कुळकर्ण्याचें पत्र.

१ महायात्रेचें माहात्म्य भारतीयांस फार प्राचीन काळापासून अतीशय वाटत आलें आहे. जन्मास आल्यासरसी एकदा काशीयात्रा घडावी अशी प्रत्येक भाविक हिंदूची प्रबळ इच्छा असते. गयावळाच्या तोंडून ' तेरे पितर स्वर्ग गये ' अशीं अक्षरें ऐकावीं, देहपतन काशीस व्हावें, मरणसमयीं गंगोदक मुखांत पडावें, मेल्यावरही आपल्या अस्थि गंगेंत पडाव्या, अशी सर्व धर्मशील भारतीयांची मनीषा असते. काशीयात्रा घडणें हें महत्पुण्याईचें फळ आहे, व ती घडली ह्मणजे देहाचें सार्थक झालें असें सर्व समजतात. 'गंगाजललवकणिकेचें' माहात्म्य आचार्यांनींही वर्णिलें आहे. ' तळमळ न करी कोणा सुखाचें तुज पहावया चित्त ! ' असें पंत गंगावकीलींत ह्मणतात. काशी, गंगा व संस्कृतविद्या, या तीन देवींचा एकत्र वास ज्या स्थळीं अखंड आहे त्या स्थळाचें माहात्म्य कोणास वाटणार नाहीं ? तरुण विद्याभिलाषी पुरुष अध्ययनासाठीं, साधक व मुमुक्षु आत्मप्राप्तीसाठीं, राजकारणादि व्यवहारांत जन्म घालविलेले कर्ते पुरुष उत्तरवयांत चित्तशुद्धि होऊन विश्रांति मिळावी यासाठीं, सत्पुरुष स्वस्वरूपानुभवजन्यसुखासाठीं या महाक्षेत्राच्या संगतीची इच्छा करितात. मोठमोठे कवि व ग्रंथकर्ते

हे काशीस्थ पंडितांकडून आपल्या ग्रंथांस संमति मिळून ते लोकादरार्ह व्हावे यासाठीं काशीची कास धरितात. या अनेक कारणांमुळें काशीक्षेत्राचें महत्व आपल्याकडेस फार मानिलें आहे.

२ पुस्तकीज्ञानाची पूर्तता होण्यास प्रवासाची अवश्यकता असते. प्रवासामुळें अनेक लोकांच्या चालीरीति पाहण्यास सांपडतात, हरतऱ्हेच्या पुरुषांच्या ओळखी होतात, शरीरांत नवीन जोम व कंटकपणा येतो, अनेक प्रसंग व अडचणी येतात त्यांतून पार पडण्याची तालीम मिळते, व सृष्टिवैभवाचे अनंत नमुने पाहण्यास मिळतात; यामुळें बुद्धीचा संकोच जाऊन तिला विशाळपणा येतो आणि नद्या, नाले, दऱ्या, गुहा, गिरिकंदरें वगैरेंच्या अवलोकनानें चित्ताची प्रसन्नता व उन्नति होते. एकंदरीनें ग्रंथवाचनापासून मिळालेलें ज्ञान अंगीं मुरायला प्रवासारखें दुसरें साधन नाहीं. तरुण राजपुत्रांना देशोदेशीं प्रवासाला पाठविण्यांची चाल सर्व देशांत सर्व काळीं असते. ही सामान्य प्रवासाची गोष्ट झाली. भरतखंडही पुण्यभूमि असल्यामुळें प्राचीन–अर्वाचीन अनेक संत, साधु, यति, तपस्वी, व कवि यांचीं जन्मस्थानें किंवा समाधिस्थळें पाहण्यांत येतात आणि स्वानुभवी पुरुषांच्या प्रत्यक्षदर्शनानें हृदयवृत्ति प्रसन्न होऊन चित्तशुद्धि व आत्मोन्नति यांचा मार्ग अनायासें सांपडतो. मराठी कवींपैकीं ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, मुक्तेश्वर, निरंजनमाधव, अमृतराय, रामदास वगैरेंनीं तीर्थयात्रा पूर्ववयांतच केल्या होत्या. मोरोपंत गरीब स्थितींतले व प्रपंची पुरुष असल्यामुळें त्यांना पूर्ववयांत काशीयात्रा करितां आली नाहीं, तरी महाराष्ट्रांतलीं व कोंकणांतलीं अनेक तीर्थें व क्षेत्रें त्यांनीं पाहिलीं होतीं. कोल्हापुराहून बारामतीस जातां येतां त्यांना बरींच तीर्थें पहावयाला सांपडलीं होतीं. पंढरपुरास ते बराच वेळ गेले होते, दोन तीनदां खुद्द यजमानाबरोबर गेले होते, शिवाय पंढरीस त्यांचे मित्र विठोबा दादा, बाबा पाध्ये, वगैरे राहत असल्यामुळें व बाबा पाध्ये यांची व त्यांची पुढें सोयरीक झाली असल्यामुळें त्यांना पंढरी पुष्कळ वेळ घडली होती. शिवाय आळंदी, देहू, पैठण, परळी, नाशीक, वाई, व्यंकोबाची गिरी, खंडोबाची जेजूरी, तुळजापूर, गाणगापूर, नरसिंगपूर, नरसोबाची वाडी, चिंचवड, वगैरे क्षेत्रें पंतांनीं निरनिराळ्या वेळीं पाहिलीं होतीं, व प्रसंगोपात्त तेथील देवतांवर व साधूंवर कविताही केली होती. कोंकणांत त्यांना आपल्या सौंदळ गांवीं कधीं कधीं जावें लागे तेव्हां राजापूरच्या गंगेचेंही स्नान त्यांना घडलें होतें. ‘ मज एक

वेळ घडलें, सत्संगातिनें अलभ्य मज्जन हो ' असें त्यांनीं तिच्या स्तवनांत ह्मटलें आहे. याप्रमाणें दक्षिणेंतलीं लहान मोठीं अनेक तीर्थें पंतांनीं पाहिलीं, पण काशीयात्रा त्यांना घडली नव्हती. साठी उलटून चालली, म्हातारपणचीं चिन्हें शरीरावर स्पष्ट उमटूं लागलीं, तेव्हां काशीयात्रा करण्याचा त्यांचा बेत झाला. त्यांच्या संकल्पाप्रमाणें त्यांना काशीयात्रा घडण्याचा योग जुळून आला. अमरसिंह जाधवाबरोबर पंत महायात्रेस निघाले.

३ बारामतीपासून दोन कोसांवर माळेगांव ह्मणून एक खेडें आहे, तेथें अमरसिंह जाधव हे राहत असत. यांचें घराणें इतिहासप्रसिद्ध आहे. ज्ञानेश्वरमहाराजांनीं ' जो सकळकळानिवास । न्यायातें पोषी क्षितीश ' ह्मणून ज्याचें गौरव केलें आहे त्या रामदेवराव जाधवाच्या घराण्यांत लुखजी जाधवराव ह्मणून एक प्रख्यात सरदार झाले. त्यांची कन्या जिजाबाई शिवाजी महाराजांची मातोश्री होय. लुखजी जाधवरावांचा पणतु प्रख्यात धनाजी जाधव हा होय. धनाजीचा वडील पुत्र चंद्रसेन बाळाजी विश्वनाथाशीं वांकडें आल्यामुळें मोंगलांस जाऊन मिळाला. त्यास निजामानें बावन लक्षांची जहागीर देऊन हैद्राबादेस आपणाजवळ ठेवून घेतलें. धनाजीचा धाकटा पुत्र शंभुसिंह यास शाहूमहाराजांनीं परत बोलावून माळेगांव व निजामच्या हद्दींतील पाथर्डी, प्रभुणें वगैरे प्रांताची तीन लक्षांची जहागीर दिली. या शंभुसिंहाचे पुत्र राजे अमरसिंह जाधव हे होत. यांचा जन्म इ.स. १७३२ मधला असून हे इ.स.१८१८ ला वारले. सांष्टी, पानपत, खर्डे वगैरे लढायांत अमरसिंहानें फार पराक्रम केला होता. अमरसिंह हा मोठा शिवभक्त होता व पन्नाशी उलटून गेली तरी पुत्रलाभ झाला नाहीं ह्मणून सदोदित खिन्न असे. यानें काशीयात्रेला जाण्याचा बेत केला व बरोबर बंदोबस्तासाठीं पांचशें स्वार घेतले.

४ त्या वेळेस काशीयात्रेला जाणें फार धोक्याचें होतें. बरोबर रखवालीस हत्यारबंद शिपाई घेतल्याखेरीज यात्रेस जाणें सुखावह नव्हतें. सातपुड्याचे डोंगर व मुख्यतः सिंधव्याचा घाट यात्रेकरूंना फार भयप्रद असत. या पहाडांत भिल्ल, कोळी, रामोशी यांची वस्ती असे. तेथें चोर, लुटारू, दरवडेखोर हे दिवसाढवळ्या यात्रेकरूंस लुटून हाणमार करीत, यामुळें यात्रेसाठीं दोनदोनशें पांचपांचशें बैलगाडी एका जुटीनें निघत असे. दर दिवसाचा मुक्काम चार मैलांवर होत असे, व काशीयात्रा

करून लोक दीड वर्षांनीं आपापल्या गांवीं परत येत. अमरसिंहाबरोबर हत्यारबंद पांचशें शिपाई होते व पेशवे सरकाराकडून गांवोगांवच्या अधिकाऱ्यांस त्यांची दरमुक्कामास बरदास्त नीट ठेवावी ह्मणून पत्रें गेलीं होतीं, यामुळें या यात्रेला वाटेंत विघ्न आलें नाहीं. अमरसिंहानें बरोबर दुकानें, बाजार, व गाईंचीं खिल्लारें घेतलीं होतीं. मुक्कामास बरोबरचे लोक उतरतात तोंच सर्व दुकानें उघडायचीं व ज्याला जो जिन्नस वाटेल तो त्यानें घ्यायचा, खर्च जाधवांकडे. वाटेंत दर मुक्कामास कांहीं नवीन यात्रेकरू येऊन मिळत. कांहीं बैरागी, गोसावी, किंवा इतर यात्रेकरू यांनाही मुक्कामामुक्कामास फुकट शिधा देण्यांत येई. बरोबर कांहीं गरोदर स्त्रिया होत्या व त्यांचीही व्यवस्था नीट ठेविली होती. पांडुरंगराय नाईक यांच्या घरचीं कांहीं माणसें, पराडकर, दात्ये, आठवले वगैरे त्यांचे आश्रित; व बारामतीपुरींतले शेकडों लोक अमरसिंहाबरोबर काशीयात्रेस निघाले. ही यात्रा फारच मोठी झाली. बरोबर अनेक डेरे, राहुट्या, तंबू, पालख्या, मेणे, डोल्या, वगैरे होत्या. सामानसुमानासाठीं उंट होते. पंतांसारख्या सन्मान्य पुरुषासाठीं भोई नौकरीस ठेवले होते. अनंत भट दात्ये यांनीं कार्तिक शुद्ध ११ शके १७१० रोजीं डोलीवाल्यांशीं असा करार केला होता: " माणसें डोलीस असामी आठ, डोली प्रयागास नेऊन घालावी, त्याचा मक्ता रु. १६७॥, डोलींत स्वारी एक व मूल ३।४ वर्षांचें एक." पंत विठोबादादांस एका पत्रांत लिहितात; " महायात्रेस जावें असा विचार जाला आहे, आशीर्वाद देऊन हें कार्य सिद्ध करावें. " काशीयात्रेला जायची उठावणी पंतांची ' बहु भली रमा भार्या ' या साध्वी स्त्रीनें केली असें ' हेचि करी प्रथम बोध या कार्या ' या विष्णुपदवकिलींतल्या चरणांवरून स्पष्ट दिसतें. पंतांचे धाकटे बंधु आबाजीपंत यांनीं सर्व सिद्धता केली; " वदला प्रसन्नचित्तें साहित्य करूनि बंधु आबा ' जा. ' " पंतांचे आप्त गंगाधरभट पराडकर यांनीं वाटेंतली सर्व व्यवस्था ठेविली;—' हें पुण्यकार्य नेलें सिद्धिस गंगाधरें पराडकरें. ' पांडुरंगरायनाईक यांनीं पंतांना दीड वर्षाची फर्ली देऊन पाठविलें;—' श्री पांडुरंगरायें मज तुज वंदावयासि पाठविलें. ' अमरसिंह जाधव यांनीं पंतांस बरोबर नेलें;—' श्री विष्णुपदा आला मज घेउनि अमरसिंह हा राजा. ' याप्रमाणें पंतांच्या भार्येनें उठावणी केली, बंधूनें साहित्य केलें, पांडुरंगरायांनीं

१ या यात्रेप्रीत्यर्थ अमरसिंहानें तीन लक्ष रुपये खर्च केले.

परवानगी दिली, गंगाधरभटांनीं प्रवासांत त्यांची काळजी वाहिली, व ही यात्रा करविण्याचें श्रेय अमरसिंहानें घेतलें. पंतांनीं कृतज्ञपणानें याप्रमाणें सर्वांचा आठव गंगा व विष्णुपद यांपुढें करून त्यांस उद्धरण्याविषयीं त्यांची प्रार्थना केली आहे.

९ काशीयात्रा ऊर्फ महायात्रा काशी, प्रयाग, व गया या त्रिस्थळीयात्रे- शिवाय पूर्ण होत नाहीं. पूर्वी बहुधा दिवाळी झाल्याबरोबर घरून निघत, व मेळा जमून ( या साध्या मेळ्यास काफला किंवा संघ ह्मणत ) मकरमासाचे सुमारास प्रयागास जात. मकरसंक्रांतीपासून मासभर त्रिवेणीस्नानासाठीं प्रयागास रहात, व महाशिवरात्रीसाठीं काशीस जात. मधुमासास गयेस जाऊन मधुगया करून पुन्हां काशीस येत, व तेथें मार्गशीर्ष शुद्ध १५ पर्यंत रहात. बारामतीस दात्यांचे दप्तरीं या काशीयात्रेच्या रोजच्या मुक्कामाची व दात्यांच्या जमाखर्चाची एक लांबलचक *जंत्री आहे तिजवरून बारामती सोडल्या- पासून सव्वाचार महिन्यांनीं पंत काशीस पोंचले असें दिसतें.

---

*या बारामतीकरांच्या यात्रेंतले कांहीं मुक्काम व ज्या मार्गानें हा तांडा काशीस गेला तो मार्ग वाचकांच्या कांहींसा लक्षांत यावा ह्मणून येथें थोडासा विस्तार करितों. शके १७१० **कार्तिक** शुद्ध १ ला लोक गांवाबाहेर पडले. तेथून काशीस जायचा क्रम असा:--शु. १ ते ५ गांवाबाहेर; शु. ८ बुधवार उडवंडी; शु॥ ९ ते १२ शिरसाफळ; शु १४ नांदादेवी; शु. १५ गुरुवार आरवी; वद्य १ लिंपणगांव; वद्य २ शनिवार चांभारगोंदें; वद्य. ३ रवि. पिंपरी; वद्य ४ रुई; वद्य. ५ उकडीगांव; वद्य. ६ बुधवार. डोंगरगांव; वद्य ७ गुरु. खरवंडी; वद्य ८-तें १० टोकें; वद्य ११ गाजगांव; वद्य १२-१३ वेरूळ; वद्य १४ देवगांव; व कार्तिक वद्य ३० टाकळी. **मार्गशीर्ष**.—शु. १ मंगळवार भडगांव; शु ७ गुरुवार. जळगांव; शु. १०-१२ बऱ्हाणपूर; वद्य ४।५. ओंकारमांधाता; वद्य ११-१२ इंदूर; वद्य. ३० उज्जनी. **पौष**- शु. १ रविवार उज्जनी; शु. ६।७ सारंगपूर; शु. ९ ओंकार; वद्य ३।४ सागर; वद्य ३० नरसींगड **माघः**—शुद्ध ३।४ चित्रकूट; वद्य २।५ गोराडपूर; वद्य ७।८ यमुना उत्तरगीर. **फाल्गुन**—शु. ६ सोम, महाराजगंज. शु. ७ मोहनसराई. पुढें फाल्गुन वद्य ८—११ पर्यंत सर्व काशींत होते. **चैत्र** शु. ११ गया. तेथपासून वैशाख वद्य ७ शनिवार पर्यंत गया. शके १७ ११ चा चतुर्मास व मार्गशीर्ष अखेर काशींत. ही वर थोडक्यांत दिलेली जंत्री अनंतभट दात्यांच्या दप्तरीं आहे. हे पंतांबरोबरच काशीया- त्रेस गेले होते. पंतांचीं काशीयात्रेंतलीं पत्रें आहेत त्यांच्या मितया वरील मित्यांशीं जुळल्या आहेत. **श. १७१० च्या कार्तिकांत पंत यात्रेस निघाले.**

पंतांनीं गयेहून बारामतीस आबाजीपंतांस एक मोडी पत्र लिहिलें आहे तें जसेंच्या तसेंच खालीं देतों:—

" चिरंजीव राजश्री आबाजी बापूजी यांसः—

मोरो बापूजी आशीर्वाद उपरी येथील कुशल तागाईत वैशाख शुद्ध चतुर्तिथीपर्यंत मुक्काम श्रीगया येथें सुखरूप असो विशेष. येथें आल्यास वीस एकवीस दिवस जाले. गयावृजनास प्रारंभ जाला आहे. वटश्राद्ध दोचौं रोजां होईल. यंदां येथें धारण तूर्त गहू सा पासरी, तांदूळ चांगले वीस शेर, तूप चार शेर, हरभरे नऊ साडेनऊ पासरी, मीठ सात शेर येणेंप्रमाणें आहे. पेशजीं पत्रें प्रयागाहून व काशीहून पाठविलीं तीं पावलींच असतील. घरचीं माणसें सर्व सुखरूप आहेत. वेदमूर्ति रा. अनंतभट दात्ये सहकुटुंब व जगन्नाथपंत व वेंकाजी मुकुंद ही आपली मंडळी सर्व सुखरूप आहेत. यंदा गयावळाची उडी फार दिसते आहे. ईश्वरें पार पाडल्यानंतर मागाहून लिहून पाठवूं. संभाजी व केदारी व संभु सुखरूप आहेत. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

---

त्यांनीं वैशाख शु. ४ बुधवार श. १७११ (ता.२९ एप्रिल १७८९) रोजीं गयेहून आपल्या बंधूस पत्र लिहिलें आहे तें पुढें दिलेंच आहे. आषाढ वद्य ८ बुधवार (जुलै१५) रोजीं त्यांचें एक काशीचें पत्र आहे. हीं पत्रें व खरवंडीच्या कुळकर्ण्याचें पत्र पाहिलीं ह्मणजे **पंत श. १७१० च्या कार्तिकांत महायात्रेस निघाले व श. १७१२ ची बरसात सुरूं होण्यापूर्वीं परतले हें सिद्ध होतें.**

१ हीं सारीं नावें विष्णुपदवकिलींत आलीं आहेत.

**प्रेमें घेउनि आले साधु जगन्नाथ पंत जे कुंटे ।**
**योग्याचि हें, जन्ममरण सत्पुरुषाच्या अनुग्रहें खुंटे ॥ ४१ ॥**
**तूतें भजुनि निवावा राम, जगन्नाथ पुत्र हा दुसरा । ... । ४२ ॥**
**सेवी अनंतभट्ट, श्रेष्ठा जी वाट ती सखे दास । ... । ४४ ॥**
**मज संरक्षित आले संभाजी, शंभु, साधु केदारी ।**
**विष्णुपदा ! तारावे हे देवुनि यांस बोध खेदारी ॥ ७० ॥**
**बारामतीपुरीचा तव वेंकटराय देशमुख दास।...।६०**

**—गंगावकिली.**

सेवेसी गंगाधरभट्ट व रामाजी जगन्नाथ यांचे साष्टांग नमस्कार. पत्रें पाठविलीं आहेत तीं ज्यांचीं त्यांस प्रविष्ट करावीं. चिरंजीव सौभाग्यवती सगुणाबाई व लक्ष्मीबाई व आऊताई व सौ. साळू, चिमा व बाळीस आशीर्वाद. चिरंजीव राजश्री आप्पास व नाना व बापू व दिनकर यांस व सदाशीव व नारायणपंत व सौ. सईबाईस आशीर्वाद व लक्ष्मणास आशीर्वाद.

इकडे राजकी वर्तमान कांहीं विशेष नाहीं स्वस्थ आहे ऐसें ऐकण्यांत आहे. तिकडील राजकी वर्तमान सविस्तर लिहिणें. चहूं घरचीं चार पत्रें आहेत. दर पत्रास जासुदास पात्रलाप्रमाणें देऊन घरन्या चार आण्यांची भरती करून द्यावी."

या महत्वाच्या पत्रावरून खालील खुलासे होतात. ( १ ) ह्या पत्राची 'पैवस्ती श्रावण शुद्ध१ ' ह्मणून खालीं आबाजीपंतांनीं लिहिली आहे, त्यावरून गयेहून जासुदाबरोबर पाठविलेलें पत्र तीन महिन्यांनीं पुणें प्रांतीं येत असे असें दिसतें. पत्रें आणण्याच्या श्रमाबद्दल जासुदास मुशाहिरा फार थोडा मिळे. हा त्या वेळच्या कमालीच्या स्वस्ताईचा दर्शक आहे. ( २ ) पंतांनीं दिलेल्या बाजारभावांवरून इ. स. १७९० मध्यें गयेकडे किती स्वस्ताई होती हें समजतें. ( ३ ) आधुनिक पंडितांप्रमाणें पंतांचें व्यवहाराकडे दुर्लक्ष नव्हतें. ज्या ज्या गांवीं मुक्काम पडायचा त्या त्या गांवच्या इतर माहितीप्रमाणें बाजारभावही समजून घेण्याची त्यांची चाल होती. (४) 'लहान थोर मंडळीस आशीर्वाद व नमस्कार' हा अलीकडचा औपचारिक मायना न लिहितां पंतांनीं भावजय, सुना, लेंकी, व पुतण्ये या सर्वांचीं नांवें घेऊन स्मरणपूर्वक आशीर्वाद लिहिले आहेत यावरून त्यांचे स्वकुटुंबीयांवरचें निस्सीम प्रेम व्यक्त होतें. हीं घरच्या मंडळींचीं नांवें पंतांच्या वंशावळींचा खरेखोटेपणा ठरविण्यास उपयोगीं पडलीं आहेत. ( ५ ) 'राजकी वर्तमान सविस्तर' कळण्याची पंतांस इच्छा होती यावरून देशस्थितीविषयीं ते उदासीन नव्हते हें उघड दिसतें. गंगावकिलींत त्यांनीं 'श्रीविष्णुस्वामीभक्त' नाना फडणवीस, 'प्रभुप्रताप' गाजविणारे हरिपंत फडके, रास्ते, अहल्याबाई व माधवराव पेशवे या सर्वांचा प्रेमपूर्वक नामोच्चार केला आहे यावरूनही हेंच सिद्ध होतें.

गयेस असतांना पंतांनीं 'विष्णुपदवकिली' रचिली. सांग गयाव्रजन केलें:—

**विष्णुपदा ! सांग करी केलें पिंडप्रदान तुजवरि तें ॥ ९७ ॥**

७ पंतांनीं पुढें आषाढ महिन्यांत विठोबादादांस एक पत्र लिहिलें आहे त्यांत "आषाढ वद्य ८ पावेतों श्रीकाशींत सुखी आहे. आपणाकडील पत्र तत्रस्यांच्या पत्रांबरोबर आल्यास पावेल" असें वाक्य आहे. पंतांनीं चातुर्मास काशीक्षेत्रीं राहून काढला. काशीक्षेत्र ह्मणजे संस्कृत विद्येचें आदिपीठ. मोरोपंत अनायासें संस्कृतभाषेच्या माहेरघरीं गेले होते. संस्कृताभिमानी पंडित काशीक्षेत्रीं फार असायचेच. संस्कृतांतलें ज्ञानभांडार प्राकृतांत आणल्याबद्दल शास्त्री लोकांचा प्राकृत कवींवर पहिल्यापासून थोडासा राग असे. भागवताच्या पहिल्या पंचाध्यायीनंतर एकनाथस्वामींचा काय छळ झाला व काशीस्थ पंडितांच्या पसंतीस त्यांचें भागवत उतरल्यावर केवढा गौरव झाला हें सुप्रसिद्ध आहे! पंतांनीं काशीस जाण्याच्या पूर्वीं रचलेलीं काव्यें सर्वत्र पसरलेलीं होतीं, संस्कृत मंत्ररामायणादि त्यांचीं संस्कृत काव्येंही पूर्वीच कांहीं पंडितांच्या वाचनांत आलीं होतीं; तथापि पंतांची कीर्ति मुख्यतः मराठी काव्यांमुळें झाली होती. काशीस आल्यावर पंतांनीं आपली मराठी कविता तेथील पंडितांपुढें ठेविली, तेव्हां तिची शलाकापरीक्षा करावी असें सर्व पंडितांनीं ठरविलें. सभेंत परीक्षा झाली तेव्हां एकदम् खालील सुंदर आर्या निघाल्या:-

**वदवि मयूराकरवी श्रीराम विराटपर्व चवथें बा।**
**स्वल्प ह्मणोनि न सोडी अमृताची शक्ति सर्व चव थेंबा ॥ १ ॥**
**रामघन सत्प्रसादामृत जों जों बहु वळूनि वर्षतसे।**
**तों तों भक्त मयूर स्वार्याकेका करूनि हर्षतसे ॥ २ ॥**

यावर हंस आपल्या निबंधांत ह्मणतात "या विराटपर्वाच्या शेवटल्या आर्या आहते. त्यांत कथानकाचा कांहीं एक संबंध नसून ह्या केवळ पंतकवीच्या स्वतंत्र व निर्मळ प्रतिभानिर्मितच आहेत. भगवत्प्रसादानें परीक्षेच्या वेळीं अशाच सुंदर कविता काशींतील पंडितांच्या प्रेमावलोकनास पात्र झाल्या ही मोठी आनंदाची गोष्ट झाली...असे सुभग अलंकार पाहून काशींतील महापंडित फार प्रसन्न झाले. आणि पंडितांची प्राकृतावर स्वाभाविक अप्रीति असतांही प्राकृतांतील वरच्या सारख्या आर्यांचें अपूर्व लावण्य अवलोकन करून त्यांनीं पंतांच्या कवितेची मोठी वाहवा केली. ज्या पात्राला पाहून पंडित लोक

नाक मुरडीत होते त्याच पात्रांत आपला काव्यरस भरून तो पंडितांपुढें ठेवून पंतांनीं त्यांकडून चाखविला आणि पाकनैपुण्यांत आपणास वाहवा ह्मणवून घेतलें. एवढ्याच गोष्टीवरून आह्मी पंतांस महाराष्ट्रकविमुकुटमाणि ह्मटलें तरी हरकत नाहीं. मग तत्वत: त्यांचें कवितासौंदर्यही वरील आख्यायिकेस उत्तेजकच आहे असें पाहिल्यावर कोणता रसिक आह्मांस अनुसरणार नाहीं ? " असो. पंत काशीस असतांना तेथील शास्त्रीपंडितांनीं त्यांची ' व्यासपूजा ' केली. पंताची व्यासपूजा करावी किंवा न करावी असा प्रश्न उपस्थित झाल्यामुळें गंगेत चिठ्या टाकल्या ' न ' तेवढा उडून गेल्यामुळें पंतांची व्यासपूजा सर्वांनीं आनंदानें केली.

८ मोरोपंतांनीं आपली कविता काशीस्थ पंडितांस दाखवून त्यांजकडून पसंती मिळविली या गोष्टीचें महत्व मराठी भाषेच्या दृष्टीनें फार आहे. संस्कृतांतलें ज्ञानभांडार प्राकृतांत आणण्याचा कित्ता प्रथम ज्ञानोबारायांनीं घालून दिला, प्राकृताविषयींचा पंडितांचा आराग्रह काढून टाकून, सामान्यजनांच्या उद्धारासाठीं प्राकृत ग्रंथ करण्यास कोणतीच हरकत नाहीं असें संमतिपत्र एकनाथ महाराजांनीं मिळविलें, व प्राकृत ग्रंथसंपत्ति काशीस्थ पंडितांस दाखवून त्यांजकडून प्राकृत भाषेचें गौरव मोरोपंतांनीं करविलें, यास्तव त्यांचे प्राकृत भाषेवर अनंत उपकार आहेत. मग यांनीं जी ग्रंथरचना केली ती पाहिली असतां हे प्राकृतभाषारूपी इमारतीचे भले मजबूत स्तंभ आहेत हें कोण कबूल करणार नाहीं ?

९ काशीस असतांना पंतांनीं बरींच काव्यें निर्माण केलीं. ते रोज भगवद्गीतेची टीका प्राकृतांत लिहून एका ब्राह्मणास अर्पण करीत अशी आख्यायिका

१ अलीकडील विख्यात पंडित माधवराव रानडे यांनीं अशीच थोडीशी कामगिरी केली आहे. त्यांनीं इ. स. १८९० पासून पुढील दहा वर्षांत क्रमानें महिपति, रामदास, ज्ञानेश्वर, तुकाराम, व एकनाथ यांचे ग्रंथ वाचून मुंबईस जी गोड व्याख्यानें दिलीं तीं ज्यांनीं ऐकिलीं असतील त्यांना त्यांचा मराठी भाषेवरील व्यासंग व प्रीति पाहून खचित फार आनंद झाला असेल. माधवरावांनीं मराठींत ग्रंथरचना केली नाहीं, पण मुंबईच्या विद्यापीठांतील अत्युच्च परीक्षेस मराठी संतांचे ग्रंथ नेमण्याचा जो चार वर्षांपूर्वी ठराव झाला व अलीकडे इंग्रजी पंडितांनाही मराठीविषयीं थोडी बहुत कळकळ वाटूं लागली आहे याला कांहीं अंशीं कारण माधवरावांनीं मराठीचा पुरस्कार केला हेंच होय

आहे. ही खरी असल्यास त्यांच्या अष्टोत्तरशत रामायणांप्रमाणें अनेक गीताटीकाही असण्याचा संभव आहे. काशीस शोध केल्यास कदाचित् सांपडतील. यांची गंगारामायण, काशीरामायण, प्रयागरामायण हीं रामायणें बहुधा त्या त्या ठिकाणीं झालीं असावींत. 'गंगावकिली,' 'विष्णुपदवकिली' हीं त्यांच्या चरित्राला थोडीं साह्यभूत होणारीं काव्यें अनुक्रमें काशी व गया येथें झालीं हें उघडच आहे. काशीच्या पंचक्रोशींतील व साधारणतः उत्तरेकडील देवतांच्या स्तुतिपर स्तोत्रेंही याच प्रसंगीं झालीं. गंगादिकांच्या स्तवनपर पंतांनीं सुमारें ६०० आर्या वगैरे केल्या आहेत. या सर्व प्रकरणांत केवळ स्वोद्धारासाठीं रचलेल्या 'गंगास्तवाची' योग्यता अधीक आहे. हा स्तव सरळ सोप्या भाषेंत रचलेला असून पंतांच्या हृदयवृत्तींच्या लाटांबरोबर बाहेर आलेला असल्यामुळें यांत माधुर्यप्रसादादि गुण उत्कृष्टत्वानें साधले आहेत. पंतांच्या हृदयाकाशांतील निर्मलत्वपावनत्वादिगुणांचें प्रतिबिंब यांत फारच स्वच्छ पडलें आहे. हा 'गंगास्तव' पंतांच्या उत्तम काव्यांत मोडण्यासारखा आहे. पंत काशीस गंगेच्या घाटावर एकटे बसून हा गंगास्तव करीत आहेत असें समजून आपण त्यांच्या पावनमूर्तीच्या मागें क्षणभर उभे राहून ऐकूं ह्मणजे आपलेंही चित्त प्रसन्न व निर्मळ होईलः—

**तुवां मत्पुत्राला जननि ! दिधला मान, कळलें**
**तुझें कारुण्यार्द्रे ! मन मजकडे स्पष्ट वळलें ।**
**सुखें येणें झालें, सकळहि पथीं विघ्न टळलें**
**प्रसू प्रक्षाळिल त्वरित न कशी बाळ मळलें ? ॥ १ ॥**
**वदे ज्ञाता, 'मुक्त त्वरित तुज गंगा करिल गा !'**
**मला नाहीं संतांहुनि इतर या भूवरि लगा ।**
**तुला आलों आहे जननि ! कर जोडूनि शरण**
**स्वतीरीं त्वां द्यावें द्रवुनि मज काशींत मरण ॥ २ ॥**
**गळावा त्वत्तीरीं भगवति ! न हा देह सदनीं**
**पडो गंगे ! तूझें मरणसमयीं तोय वदनीं ।**

---

१ काशीयात्रेस निघण्यापूर्वी 'गंगाप्रार्थना' व 'गंगाविज्ञप्ति' हीं काव्यें पत्र ह्मणून पंतांनीं एका गृहस्थाबरोबर गंगेकडे पाठविली होतीं. गंगोप्रार्थनेंत 'गंगाप्रार्थनार्थ या आर्या पाठविल्या काशीप्रति' असा स्पष्ट उल्लेख आहे. श. १७१० च्या कार्तिकांत काशीविश्वेश्वराचा सोटा त्यांस काशीस घेऊन गेला !

विवेकीं यावें जें धवलपण हेरंबरदनीं
भवीं हो त्वत्क्षेत्र, प्रभुनयन तें जेविं मदनीं ॥ ३ ॥
तुझ्या तीरीं नीरीं हृदय रमतें, दुःख शमतें,
यशोगानें पानें कुमत गळतें, विघ्न टळतें, ।
कळी भंगे गंगे ! षडरि झुरती, दोष नुरती,
दिली रामें नामें तशिच जगतीला निजगती ॥ ४ ॥
श्रीभागीरथि ! शेवटीं निजतटीं दे वास या, हा किती ?
कोणी ही शरणागता सदय जे ज्ञाते न ते हाकिती ।
माता धांवुनि आलिया स्वनिकट ग्रीष्मातपीं तापल्या
आधीं कीं कुरवाळिती विनविती स्नेहें मुला आपल्या ॥ ५ ॥

पंतांसारख्या शुभाशयास काशीक्षेत्राचा वास आवडावा यांत नवल नाहीं. तीर्थयात्रेच्या प्रसंगानें सुपुरुष आपल्या चित्ताची शुद्धि करून घेतात. पंत सकाळसंध्याकाळ स्नानसंध्येस गंगेच्या घाटावर जात, तेव्हां गंगेचा उदकध्वनि त्यांच्या चित्तास फार आल्हादवीत असावा असें:—

' करीत प्रेमानें श्रवण मम पाथोरव रहा '
असें गंगे ! मातें ह्मणसि जरि तूं, थोर वर हा ।

या गोड श्लोकार्धावरून वाटतें.

पंतांनीं काशीस, प्रयागास, गयेस असतांना तेथील देवतांवर लहान लहान स्तोत्रें बरींच केलीं. काशीविश्वेश्वर, काळभैरव, अन्नपूर्णा, मणिकर्णिका, प्रयाग, यमुना, गदाधर, बिंदुमाधव, या देवतांवर कांहीं आर्यारूप स्तोत्रें केलीं व कांहीं अभंग व पदेंही केलीं. काशीस येतांक्षणींच ' श्रीकाशि ! तुझें दर्शन घडलें, झडलें अशेषही ताप ' याप्रमाणें काशीची स्तुति केली. काशीविश्वेश्वरास पंतांनीं ११० आर्यांचा ' स्तवबिल्व ' वाहिला, तो प्रत्येक मुमुक्षूनें अवश्य पाहावा. त्यांतील ४।२ आर्या पहा:—

मरणावसरीं सर्व प्राण्यांचा होय दक्ष कान वरी ।
उपदेश करिसि ज्या तो मुक्तीस विचारदक्ष कां न वरी ? ॥ ९ ॥
भाटपण प्रभुवर्या ! कोणा दिधलें नसे तुवां कविला ? ।
वांकविलें जग, एकचि सद्धर्माचा न सेतु वांकविला ॥ २० ॥

---

१ काशीस मरतेवेळीं जीवाचा कान वर होतो व श्रीविश्वेश्वर त्याच्या कानांत मंत्र फुंकतात. २ कोण ज्ञाता तुझा स्तव करीत नाहीं ?

हरिती संत तमातें, संतत मातें तदीय संगातें ।
दे देवा ! प्रिय करिती सत्संगति जें करी न गंगा तें ॥ ७५ ॥
निर्येति तव मतासि, जशा श्वशुराच्या कुलवती सुना, टपती ।
प्रेमें समसंगोपन करिसी तूं ईश्वरा ! जुनाट पती ॥ ८७ ॥
विश्वेशा ! तूं साक्षी, कर्म शुभाशुभ तुला सकळ कळतें ।
तव मन, जेंवि पित्याचें दुःखित देखुनि मुलांस कळकळतें ॥९८॥

गदाधराच्या प्रार्थनेंत पंत ह्मणतात:-

वाहे विपत्प्रवाहीं, त्या आप्तहि भुज न दे, वदे ' वाहे ! ' ।
तैसा न दीनबंधो ! तूं,[१]गाती सुजन देवदेवा ! हें ॥ १३ ॥

द्विचत्वारिंशल्लिंगयात्रेंत पंत ह्मणतात:-

दे अभय, महादेवा ! सेवावी शेवटीं सदा काशी ।
राशि द्रव्याचा हित न करी तो, कायशांति जो नाशी ॥ ३ ॥
या कामाद्यहितांतें देवा ! वीरेश्वरा ! दुजा निवटी ।
ऐसा कोण त्रिजगीं ? द्युमणिद्युति तम हरील कीं दिवटी ? ॥ ९ ॥
दे भक्ति, मुक्ति अथवा स्वर्गद्वारेश्वरा ! नको स्वर्ग ।
सुखलेश नसे नाकीं बा ! तेथें कीं वसे द्विषद्वर्ग ॥ २० ॥
क्षुद्राचपळा माझ्या चित्तशशा जंबुकेश्वरा ! वंची ।
तूंचि प्रसन्न हो, मज ठावीं प्रभुयोग्य भाषणें कंचीं ! ॥ ४२ ॥

या आर्यांतल्या मागण्यांची समर्पकता सर्वांच्या सहज लक्ष्यांत येणार आहे. ' विपत्प्रवाहांत वाहणाऱ्याच्या उपयोगीं आप्तही पडत नाहींत, ' हा पंतांचा ६० उलटून गेल्यानंतरचा उद्गार व्यवहाराभिज्ञ पुरुषांस तेव्हांच मानवेल. तसेंच 'शरीर व मन यांची शांति बिघडून टाकणारी द्रव्यराशि ' वृद्धपणीं तरी दृष्टिआड करून जर जन भगवद्भजनार्थ काशीसारख्या क्षेत्रीं वास करितील तर त्यांच्या देहाचें सार्थक होणार आहे. 'सेवावी शेवटीं सदा काशी' या ह्मणण्यांत किती तरी अर्थ आहे! जन्मभर संसार, पोरें बाळें, देणें घेणें, मान आणि पदव्या, कुळें, सावकारी आणि वकिली, हेंच करीत बसायचें कीं नाहीं ? ' काळाची हे उडी पडेल बा जेव्हां । सोडवीना तेव्हां मायबाप ' प्रत्येक जीवानें आत्महितदक्ष असावें. त्यासाठीं बाळपणापासून धर्मपर बुद्धि असावी. म्हातारपणीं पेन्शन घेऊनही आतांचे बहुतेक वृद्ध पुरुष पूर्ववत् संसारकार्यांत; पत्ते, बुद्धिबळें, व सोंगट्या, यांच्या डावांत; लायब्ररी,

---

१ दैव आमचें प्राक्कर्म त्वदधीन आहे असा भाव.

वर्तमानपत्रें, जगाच्या नित्य चालणाऱ्या उलाढाली यांच्या निरर्थक वादविवादांत; आपल्या अमोल आयुष्याचा व्यर्थ वेंच करितात. तारुण्यावस्थेंत, प्रौढावस्थेंत, ' संसार सुखें करावा, ' पण तेव्हांही 'परमार्थ कांहीं वाढवावा' आणि वृद्धावस्थेंत तर सर्वसंगपरित्याग करून केवल परमात्मचिंतनांत काळ सारावा. आमच्याकडची जुनी प्रणाळिका अशी होती. दुर्दैवानें पंतांसारख्या पुरुषांच्या चरित्रांतच ती आतां पहायची वेळ येऊन ठेपली आहे! परमार्थमार्गाचें ज्ञान बाळपणापासून असावें, संसार करीत असतांना त्यांतून आपली सुटका हळु हळू करून घेत असावी, व अखेर ब्रह्मस्वरूपीं लीन व्हावें. पंत देवापाशीं नेहमीं भक्ति मागतात, कामक्रोधादिकांपासून मुक्तता मागतात, सत्संगासाठीं ते हापापले होते ह्मणून वारंवार सत्संग मागतात, देवापुढें आपलें हृदय उघडें करून सर्वस्वार्पण करितात, त्या सर्व प्रकारांवरून त्यांची आत्मबुद्धि कशी निरंतर जागरूक होती हें दिसतें. पंत नित्य जागृत असत, ते बाळपणापासून ' हरिध्यानासक्त ' होते ह्मणून अखेरपर्यंत ही त्यांची जागृति कायम राहिली.

१० ही यात्रा पंतांना सर्वतोपरी सुखावह झाली. संगतीच्या लोकांनीं त्यांची योग्यता ओळखून त्यांची बरदास्त उत्तम ठेविली होती. पंतांनींही या सर्व सुजनांचें आनृण्य जोडण्याची खाशी युक्ति शोधून काढिली! त्यांनीं बरोबर आलेल्या व मागें बारामतीस राहिलेल्या बहुत लोकांच्या वतींनें गंगा व विष्णुपद यांजपुढें वकिली केली! आपल्या इष्टमित्रांस व सुहृज्जनांस तारावें ह्मणून पंतांनीं फार प्रेमानें त्यांस आळविलें आहे. आपले ' अच्युतप्रमुख बाळमित्र; ' ' मातेहूनि बहु दया करणारी ' आका; आपले ' अत्यंत सदय अन्नद ' बाबूजी नाईक ( यांच्या नांवानें विष्णुपदापुढें पंतांनीं एक पिंडही कृतज्ञताबुद्धीनें अर्पिला! ); ' आश्रितीं जननीजनरीति ' दावणारी पांडुरंगरायांची आई कमळाबाई; ' आत्रा द्रवोनी जें प्रेम करी तें करणार ' बाबा पाध्ये; 'प्रेमें म्यां जोस माता मानिलें आहे' अशी कोणी वृद्धा; व आपले गुरु, मित्र, बंधु, सुना, लेंकी, जांवई, व्याही, साडू, सासरे, मामेभाऊ वगैरे सारे आप्तेष्ट; या सर्वांची वकिली पंतांनीं केली आहेच, पण याशिवाय बारामतीपुरींतले ' मजवरि सुस्नेह करणारे शिंपी, ' पाटील, कुळकर्णी, चौधरी, देशमुख, देशपांडे, न्हावी, परीट, तेली, महार, मांग वगैरे सर्व जातींच्या व दर्जाच्या लोकांबद्दलही पंतांनीं सप्रेम व सोल्हास वकिली केली आहे! बापूभट्ट जाम-

दार, भिवजी खात, बाळ हैदर, मैराळ शिंपी, बहिरोबा रामदासी, मुद्गलभट, रहाळकर, एकबोटे, गाडगीळ, आठवले, दाते, राघोपंत कोतवाल, आवजी आचार्य, वगैरेंचीं नांवें घेऊन कोणाच्या दारिद्र्याचीं, कोणाच्या निपुत्रिकपणाचीं, कोणाच्या व्याधींचीं, कोणाच्या मानसिक व्यथांचीं गाऱ्हाणीं गंगा व विष्णुपद या देवतांजवळ सांगून त्यांच्या आधिव्याधी निरसून त्यांस तारण्याविषयीं पंतांनीं अतिप्रेमळपणानें विनविलें आहे! या दोन वकिल्यांवरून पंत बारामतीस आबालवृद्धांस व आचांडाळांस कसे प्रिय होते व त्या सर्वांबद्दल उलट त्यांचें हृदय किती सस्नेह असे हें अगदीं उघड दिसतें. ही पंतांची विश्वकुटुंबी वृत्ति पाहून त्यांच्या साधुत्वाची कोण तारीफ करणार नाहीं? ज्या भोयांनीं त्यांचा मेणा वाहिला व ज्या गड्यांनीं त्यांची सेवा केली त्यांना सुद्धां पंत विसरले नाहींत! पंतांचा स्वभाव भारी गोड व प्रेमळ होता, ते सौम्यवृत्तीचे सुजन होते यांत तिळमात्र शंका नाहीं. श्रीरामचंद्रांनीं अयोध्या वाहून वैकुंठीं नेली व पंतांनीं बारामतकरांचे आत्मे गंगेच्या पायीं वाहिले! बारामतकरांना असा निरपेक्ष, शुद्धमनस्क, साधु वकील दुसरा कोण मिळता? पत्रव्यवहारावरून असें दिसतें कीं तेही त्यांना 'महाराज, स्वामी, बावा,' ह्मणून पूज्यभावानें आळवीत असत.

११ या दोन्ही वकिल्यांत आणखी एक खुबी आहे. प्रत्येक संसर्गी मनुष्याच्या स्वभावाकडे, गृहस्थितीकडे, आचरणाकडे व पंतांचें किती सूक्ष्म लक्ष होतें हें या वकिल्यांवरून सिद्ध होतें. 'वेदांतश्रवणनिरत निर्मळमति विश्व-

---

१ बारामतिस्थ अनेक जातींच्या पुरुषांचीं नांवें घेऊन त्यांनीं आळविलेंच आहे, पण कांहीं ठिकाणीं सामान्यतः सर्वांचीच वकिली ते करतातः—

**बारामतिस्थ जे त्या पाळी तूं सर्व देशपांड्यातें।**
**बारामतींत असती जे तारावेचि देवि! तेलिहि ते।**
**तारावे विष्णुपदा! मजवरि सुस्नेह करिति जे शिंपी।**
**गंगे! त्वां तारावे कुंभार, सुतार, परिट, लोहार,।**
**बारामतीपुरीचे जे पाटिल चौघुले तदघ भंगे।**

ज्या बारामतकर स्त्रीपुरुषांना या सत्पुरुषाच्या संगतीचा लाभ चाळीस वर्षे झाला, ज्यांना तारावें ह्मणून देवतांजवळ पंतांनीं एवढी कळकळीनें वकिली केली, ज्या बारामतीच गांवाचें नांव पंतांमुळें जगभर गाजलें, त्यांनीं किंवा त्यांच्या वंशजांनीं पंतांचें कांहीं चिरंतन स्मारक आपल्या गांवांत करून ठेवूं नये ही लाजिरवाणी गोष्ट नव्हे काय?

नाथसुत तात्या 'स संतति व कीर्ती मिळावी; ' किती राघोबा जोशी सोशील विपत्ति ? अधनता खोटी ! ' ह्मास्तव त्याचें दारिद्र्य जावें; ' जो रामकृष्ण ऐसें देवि ! पहांटे ह्मणे सदा सांजे' त्या शिवबाचा नामसंकीर्तनामुळें पापनाश व्हावा; ' साधुमन न रसिक ' दामोदर याचें चित्त निवावें; ' वरिच दिसे यन्मनीं न राग दिसे ! ' ह्मणजे जो दिसण्यांत तापट प्रकृतीचा आहे पण ज्याचें मन निर्मळ आहे अशा प्रभाकराला तारावें; ' विष्णुपदा ! तारीं जो स्मरतो सप्रेम हरिस खाटिक तो ' पावन करावा; ह्मणून पंतांनीं जागोजाग आळविलें आहे. नाईक व नाईकांच्या मंडळीविषयीं त्यांनीं प्रेमोद्गार काढले आहेतच, पण ' यांचे आश्रित, सेवक, गुरु जे तत्कामना पुरो, हित हो ' ह्मणूनही मागितलें आहे ! बाबूजी नाइकांच्या नातवंडांनीं ' यशें साधुकर्ण भरावे ' ह्मणून ही स्वसदिच्छा त्यांनीं प्रकट केली आहे. पंतांना काशीयात्रेस नेणारे अमरसिंह जाधव यांच्या संबंधानें गंगावकिलींत खालील आर्या आहे:-

**जो अमरसिंह जाधव, या धवल प्राज्य यश जसें मातें ! ।**
**तोकहि लोकहितावह दे जें शिवभक्तिच्या रसें मातें ! ॥ ८५ ॥**

अमरसिंहाला पुत्र नव्हता. त्यांची तिसरी बायको ही वडगांवकर निंबाळकरांची कन्या होती. निपुत्रिकपणामुळें ते फार दुःखी होते. ते मोठे शिवभक्त होते. माळेगांवीं जाधवांच्या वाड्यांत सुंदर रुपेरी देव्हाऱ्यांत शंकराचें एक सुंदर लिंग आहे. तें बाबासाहेबांना ( अमरसिंहाचें प्रसिद्ध नांव ) मोठ्या युक्तीनें प्राप्त झालें. यांचा मुक्काम काशीस असतांना एक गोसावी तें लिंग घेऊन आला. बाबासाहेबांना मूळची शंकराची उपासना होतीच, ह्मांना तें लिंग प्राप्त व्हावें ह्मणून फार ध्यास लागला. गोसावी कांहीं तें देईना. बाबासाहेबांना त्याच्या प्राप्तीशिवाय चैन पडेना, त्यांनीं गोसाव्याला आपल्या तंबूंत ठेवून घेतलें होतें, व त्यावर सक्त नजर ठेविली होती. तो सुटून जाऊं पहात होता. त्याला बाबासाहेबांनीं एक लाख रुपये देऊं केले तरी तो ऐकेना. शेवटीं कंटाळून त्यानें तें शंकराचें लिंग बाबासाहेबांच्या स्वाधीन केलें व तंबूच्या बाहेर पडला तों दिसेनासा झाला. बाबासाहेबांनीं त्याचा पुष्कळ शोध केला तरी तो पुन्हां सांपडला नाहीं ! लिंगप्राप्ति हा महत्प्रसाद समजून त्यांनीं शिरीं वंदिला. अद्याप माळेगांवीं राजवाड्यांत त्या लिंगाची नित्यपूजा फार भक्तीनें करितात. लिंगावर गंगाप्रवाहाची शुभ्र छटा असून तें दर्शनीय आहे. तेव्हां अशा कडक शिवभक्ताला पुत्र ' शिवभक्तिच्या रसानें मातणारा'

व्हावा असें पंत ह्मणतात तें योग्यच आहे. या आर्येत पंतांनीं फार मौज केली आहे. आधीं बाबासाहेबांना मुख्य आधि पुत्राभावाची होती. तेव्हां त्यांना पुत्र व्हावा अशी प्रार्थना पंतांनीं गंगेजवळ करावी हें योग्यच आहे! तोही पुत्र कसा व्हावा तर 'लोकहितावह' असा व्हावा. राजेरजवाड्यांच्या पुत्रांचें शिक्षण असें असायला पाहिजे असतें कीं त्यांना आपल्या प्रजेचें-लोकांचें-कल्याण करण्याचें सामर्थ्य यावें. धनाजी जाधवाचा पणतू 'लोकहितावह' ह्म० लोककल्याणकारी निपजावा असें ह्मणण्यांत पंतांनीं केवढें राष्ट्रीयदृष्टीचें चातुर्य व्यक्त केलें आहे!! पुन्हां तो पुत्र लोकहितावह असून बापाचा जो धर्म,—जी उपासना—ती उत्कर्षाला नेणारा, 'शिवभक्तिच्या रसानें मातणारा' असावा, असें ह्मणण्यांत पंतांनीं एका सुंदर तत्वाचा बोध केला आहे!!! पंतांसारखा मार्मिक पुरुष प्रत्येक पदांत, किती अर्थ उघड करितो हें यावरून समजणार आहे.

१२ काशीहून निघतांना पंतांनीं काळभैरवाची स्तुति केली ती अशी:—

**श्रीकाळभैरवा त्वां विघ्न निवारूनि रक्षिल्या यात्रा।**
**गात्रासि तसा जपसी जैसा शरणगता कृपापात्रा॥ १॥**
**स्तविति प्राकृत जन तुज काशीचा कोतवाल या नावें।**
**विश्वेश्वरप्रतिनिधे! प्रेमें त्वां तेंहि योग्य मानावें॥ २॥**

---

१ अमरसिंहाला बहुत काळानंतर एक पुत्र झाला. त्याचें नांव रत्नसिंह असें ठेवलें होतें. याच्या जन्माची गोष्ट चित्तवेधक आहे. बाबासाहेब मोठ श्रद्धावान् व धार्मिक पुरुष होते, पुत्रप्राप्तीसाठीं एका साधूची सेवा त्यांनीं एक वर्षपर्यंत केली. देवबोवा नांवाचे एक धनगर जातीचे साधु टाकेवाडीस रहात असत. हे मोठे सिद्ध पुरुष होते. यांची कीर्ति ऐकून बाबासाहेब त्यांच्या सेवेला आपल्या धर्मपत्नीसह वर्षभर जाऊन राहिले होते. देवबोवा जंगलांत रहात. त्यांचे जवळ गाईंचीं खिल्लारें होतीं व त्यांची उपासना गोमातेची होती. ते फक्त दुधावर रहात. त्यांचे जवळ त्यांची एक बहीण असे. ते कधीं बाबासाहेबांना दगड मारीत, कधीं त्यांच्या तोंडांत मारीत, कधीं अभद्र बोलत. तरी दिलीपराजासारखी त्यांनीं त्या साधूची एकनिष्ठ सेवा केली. वर्षअखेर साधु प्रसन्न झाले व ह्मणाले 'राजा! तुला पुत्र होईल, पण पुत्रजन्माबरोबर तूं नाहीं तर तुझी पत्नी मरेल. कोण तयार आहे तें मला सांग.' पतिपत्नींचा प्रीतिकलह होऊन अखेर राणीनें 'मरायला मी सिद्ध आहें. ते पुत्रमुख पाहोत. मला हळदीकुंकवासुद्धां मरण हवें!' ह्मणून सांगितलें. साधूनें त्यांना माळेगावास परत पाठविलें. वर्षानंतर पुत्र झाला. त्याचें नांव रत्नसिंह ठेवलें. त्याची आई मेलीच. साधूच्या बहिणीनें त्यास दोन वर्षे पाळिलें. तिची ही समाध बेलदेवास आहे. रत्नसिंहाचे पुत्र अमरसिंह होते, व अमरसिंहाचे पुत्र शंभूसिंह हे होत. यांना दोन पुत्र व दोन कन्या आहेत.

याप्रमाणें काशीयात्रा संपवून मोरोपंत परत निघाले. वाटेंत चोळीमहेश्वर येथें श्री० अहल्याबाई होळकरीण या साध्वीचा मुक्काम होता. अहल्याबाई साधुसंतांस आवर्जून ठेऊन घेई, व त्यांची भक्तिपुरस्सर सेवा करी. तिनें विठोबादादांना इंदुरास बोलावून नेऊन त्यांचीं कीर्तनें वाड्यांत करविलीं हें मागील प्रकरणांत सांगितलेंच आहे. पंतांनाही तिनें पालखी पाठवून महेश्वराला आणलें. तिची व पंतांची भेट झाली. या भेटीची कांहीं हकीकत कळावी म्हणून इंदुरास मीं पुष्कळ चौकशी करविली; पण कांहीं हकीकत कळली नाहीं. पंतांनीं गंगावकिलींत आधींच अहल्याबाईबद्दल गंगाबाईपाशीं भीड खर्चली होती:—

**देवि ! अहल्याबाई यावी भेटावयासि सत्वर ती ।**
**तूं पुण्यकीर्ति हे ही, गंगे दोघीजणीहि सत्वरती ॥ ९० ॥**

पुण्यकीर्ति व सत्वरती अहल्याबाईचें पावनत्वलोकोपकारित्वादि गुणांमुळें गंगेशीं केलेलें सादृश्य किती हृदयंगम आहे बरें ! अहल्याबाई व मोरोपंत या पुण्यजीवांचा समागम भवभूतीनें ' सतां सद्भिः संगः कथमपिहि पुण्येन भवति ' या चरणांत म्हटल्याप्रमाणें खरोखरच विरल होय ! गयेस मोरोपंतांनीं अहल्याबाईच्या स्तवनपर सहा आर्या केल्या, त्यांपैकीं तीन खालीं देतों:—

**देवि अहल्याबाई ! झालीस जगत्त्रयांत तूं धन्या ।**
**न न्यायधर्मनिरता अन्या कलिमाजि ऐकिली कन्या ! ॥ २ ॥**
**धर्मार्थ गोत्रजन्या[1] किंवा झालीस तूं धराजन्या[2] ।**
**तुज देवि ! भेटली ती सत्कीर्ति कधींच हे न राजन्या ॥ ४ ॥**
**श्रीविष्णुपदा ! स्तविली त्वद्भक्ता हें तुलाचि मानावें ।**
**विश्व जिला वानितसे कां न मयूरेंहि तीस वानावें ! ॥ ६ ॥**

मनुष्यस्तुतीचा पूर्ण कंटाळा असल्यामुळें ज्यानें आपल्या यजमानाच्या स्तुतीलाही १०।१२ आर्यांपेक्षां अधिक आर्या दिल्या नाहींत, त्या समकालीन निस्पृह संतकवीनें जिचें ' जगत्रयांत धन्य झालेली, ' ' न्यायधर्मनिरत, ' ' सत्क्रियावती, ' ' विष्णुपदभक्ता ' ' विश्वमान्या ' अशीं यथार्थ विशेषणें लावून गौरव करावें तिची योग्यता खरोखरच अगदीं असामान्य असली पाहिजे. ' मोठमोठ्या राजांना ज्या सत्कीर्तीचा लाभ झाला नाहीं ती सत्कीर्ति अहल्याबाईला भेटली ' असें पंत म्हणतात, यावरून त्या वेळीं साऱ्या भरतखंडभर अहल्याबाईच्या सद्गुणांची कीर्ति कशी दुमदुमुन राहिली होती हें दिसतें.

१ पार्वती. २ सीता.

अहल्याबाईनेंही पंतांना आपल्या आश्रयास राहण्याविषयीं विनविलें, पण पंतांचें आपल्या यजमानावर फार प्रेम असल्यामुळें त्यांनीं ही विनंति मान्य केली नाहीं. याप्रमाणें महायात्रा संपवून व सत्पुरुषांच्या भेटी घेऊन मोरोपंतांची स्वारी बारामतीस परत आली.

१३ पंतांच्या समागमें जे लोक काशीयात्रेस गेले त्यांपैकीं खरवंडीचे कुळकर्णी हे एक होते, त्यांच्या मुलानें पुढें दिलेलें पत्र पंतांस लिहिलें आहे:—

"श्रीमत्सकलविद्वज्जनवर्य रमाकांतचरणभक्तिपरायण राजश्री मोरोपंत बाबा स्वामींचे शेवशी,

चरणरज आबाजी जनार्दन कुळकर्णी मौजे खरवंडी पै॥ नेवासे कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागाईत वैशाख शुद्ध अष्टमी गुरुवार मुक्काम कसबे येरंडोल जाणून स्वानंदलेखज्ञाना केली पाहिजे, विशेष आपण महायात्रा संपादून आलां हें परस्परें ऐकिलें. क्षेत्र जनस्थानास जावयाचा उद्योग असलियास मार्ग येरंडोलावरूनच. परंतु सांप्रत ऐकिलें कीं आपण अमरसिंह जाधवासह आज भडगांवचे मुक्कामास गेलां. दर्शनाचा लाभ होईल ऐसी इच्छा होती परंतु योग न घडला. आमचे तीर्थरूप यात्रेस तेथून आपणासमागमें गेले त्यास ते प्रयागाहून मथुरेस गेले असें ऐकिलें. यास्तव सेवेशी प्रवेश केला आहे तरी वृत्त असेल तें इत्थंभूत लेखन करावें व तीर्थरूपजी गेले त्यांनीं आपले पाशीं पालमेखा लोखंडाच्या असें रहिमतपूरकर यांचे उंटावर माणसांसमागमें पाठविलें आहे त्यास येथून प्यादा आणावयास पाठविला आहे......कांहीं आर्या अनायासें संग्रहीं लिहिल्या असल्यास पाठविल्या पाहिजेत हे विज्ञापना."

गयेस असतांना पंतांनीं पिंडप्रदान केलें. 'विष्णुपदा! सांग करी केलें पिंडप्रदान तुजवरि तें' याप्रमाणें ही महायात्रा यथासांग करून पंत इतर मंडळीसह शके १७१२ ची बरसात सुरू होण्यापूर्वी बारामतीस परत आले.

---

# प्रकरण नववें.

## अखेर साधली.

**पर्व आणूनि तये दिवशीं । विसर्जन केलें जडदेहासीं ।**
**मोरोपंत वैकुंठवासी । निजधामासी पैं गेले ॥ १ ॥**

—राजाराम प्रासादी.

१ पंतांचें जन्मसाफल्य. २ 'प्रांतप्रार्थना' हें शेवटचें काव्य. ३ देहावसान. ४ महाराष्ट्राची योग्यता व त्याला श. १७१६ सालीं लागलेलें ग्रहण. ५ पंतांचें स्वरूप व स्वभाव.

१ मोरोपंतांनीं आमरण विद्याव्यासंग सतत चालवून भगवत्सेवा केली; 'फाटका संसार विवेकानें नेटका करून' पंचवीसतीस माणसांचें संगोपन केलें; संसाराचें लोढणें गळ्यांत बाळगून पाऊण लाख मराठी कविता निर्माण केली व देशभाषावैभव अपार वाढविलें; विनय, प्रेमळपणा, सदाचार इत्यादि सद्गुणांनीं संसर्गी जनांस मोहून सच्छीलाचें पोषण केलें; 'प्रपंच साधुनि परमार्थाचा लाहो ज्यानें केला तो नर भला भला' या साधूक्तीप्रमाणें वागून इहपरलोक साधले व स्वतःस, स्वतःच्या कुळास व स्वदेशास धन्यता आणली. पूर्ववयांत योजलेले सर्व संकल्प त्यांनीं भगवत्कृपेनें सिद्धीस नेले. 'भगवंत व भगवज्जन यांचे गुणानुवाद गाण्यांत चतुर रसिकानें आयुष्य घालवावें' असें त्यांनीं २७ व्या वर्षी एका काव्यांत ह्मटल्याप्रमाणें आपल्या उद्दिष्टास सिद्धीस नेलें. पुष्कळ तरुण तारुण्याच्या ऐन भरांत हवे तितके सत्संकल्प करितात, पण संसाराच्या ज्वाला अंगाला लागूं लागल्या कीं त्यांचे ते संकल्प मनांतल्या मनांत जिरून जातात व भवचक्रांत सांपडून 'तुका ह्मणे काय वांयावीण धिंद । पती ना गोविंद दोन्ही नाहीं' या साधुवचनाप्रमाणें धड प्रपंचही हातीं लागत नाहीं व धड परमार्थही साधत नाहीं अशी त्यांची स्थिति होऊन जाते. एक उद्दिष्ट मनांत जागृत ठेवून त्याच्या सुकाणूप्रमाणें आयुष्याची नौका हाकारीत राहण्यास मनाचा खंबीरपणा लागतो, धैर्य लागतें, विषयसुखलालसा जिंकावी लागते, इंद्रियनिग्रह बलवत्तर असावा लागतो, एकनिष्ठता लागते, परमेश्वरावर दृढ विश्वास असावा लागतो, व पूर्वपुण्य पदरीं असावें लागतें. आपल्या आयुष्याचें अंतिम निश्चित ठर-

बून 'शेंडी तुटो कां पारंबी तुटो' अशा निग्रहानें जे त्याच्या सिद्धीसाठीं कायावाचामनें अहर्निश झटतात तेच वीरपुरुष होत. अशा वीरपुरुषांत कोणी धर्मवीर असतात, कोणी युद्धवीर असतात व कोणी भाषावीर असतात. शिवाजी व रामदास हे धर्मवीर, बाजीराव व झांशीची राणी हे युद्धवीर, आणि वामन व मोरोपंत हे भाषावीर होत! महाराष्ट्र भाषेची योग्यता मोरोपंत जन्मास आले तेंव्हां जी होती, तीपेक्षां ते आटोपले तेंव्हां ती किती तरी वाढली. नानाप्रकारच्या अक्षरगणवृत्तांत व मात्रावृत्तांत, सयमक, निर्दोष, मनोहर अशी विविध विषयांवर व पाउण लाख कविता निर्माण करून त्यांनीं मराठी भाषेला संस्कृत किंवा अभियुक्त भाषेच्या पदवीस चढविलें. हा त्यांनीं मोठा पराक्रम केला. 'जरि हा मयूर नाहीं तरि लोकांना न दीसती आर्या' ही या भाषावीराची गर्जना सर्वथा खरी आहे. 'मी जर जन्मास आलों नसतों तर अमुक लोककार्य झालें नसतें' असें ज्याला वाटतें तोच धन्य होय. असो. पंतांनीं महाभारत, रामायण, व भागवत हे ग्रंथ व त्यांतील शेंकडों आख्यानें व उपाख्यानें मराठी भाषेंत आणलीं, तीर्थक्षेत्रांवर व संतांवर हजारों आर्या केल्या व कित्येक कमालीचीं सुंदर अशीं स्वतंत्र स्तोत्रें व लघुकाव्यें रचून अखेर आपल्या काव्यशक्तीचें सर्वस्व वेंचून केकावलीसारखें जगत्तोषकर व परम मनोहर दिव्य काव्य निर्माण केलें. सामान्यतः असा नियम आहे कीं, परमेश्वर ज्याच्या अंगांत जे लोकोत्तर गुण ठेवतो त्या सर्व गुणांचा उत्कृष्ट परिपाक त्याच्या ज्या कृतींत होतो त्या कृतीनंतर त्याला फार दिवस तो मृत्युलोकीं ठेवीत नाहीं! परिपक्क झालेलें अमृतफळ या मानवांना न देतां तो स्वतःच घेऊन जातो! ज्याच्या कडून जें कार्य परमेश्वराला करायचें असतें तें कार्य त्याच्या हातून होण्यापुरती दिव्य गुणांची सामुग्री त्याला देऊन त्या गुणांच्या उत्कृष्टत्वांत तें कार्य त्याच्या कडून करवितो व लागलेंच त्याला आपल्या स्वरूपांत नित्य विश्रांतीचें स्थान देतो.

पंतांनीं हें केकावलिस्तोत्र अखेर रचिलें व रामरूप होऊन जड देहाचें विसर्जन केलें. केकावलीनंतर पंतांना साक्षात्कार झाला व ते रामरूप झाले अशी जुन्या लोकांतही प्रसिद्धि आहे. पंतांनीं जन्मादारभ्य भगवत्सेवा केली. त्यांची काव्यरचना हें त्यांचें बाह्यरूप होय; रामपरता हें त्यांचें अंतःस्वरूप होय. पंत मुख्यतः भगवद्भक्त होते, त्यांनीं काव्यरचना केली ती भक्तिभावाच्या दृढतेसाठीं केली. पूर्ववयांतल्या कांहीं काव्यांत कोठें कोठें कीर्ति-

लालसा व स्वाभिमान प्रकट झाला आहे, पण मंत्रभागवत व केकावलि यांच्या रचनाकालींच त्यांचा अवशिष्ट सात्विक अहंभावही लयाला गेला व नंतर ते ' मिसळे जसें नभ नभीं, कीं तेजीं तेज, तोय तोयांत ' याप्रमाणें रामरूपांत मिसळून गेले व संसारपाशांतून मुक्त झाले.

२ शके १७१६चा चैत्रमास उगवला. नित्याप्रमाणें पंतांनीं रामनवमीचा उत्सव स्वगृहीं हर्षनिर्भर होऊन केला. रामनवमीचें पारणें दशमीस सुटलें व एकादशीच्या दिवशीं पंतांना ताप आला. तो द्वादशीस पुष्कळ वाढला. आपला अवसानसमय जवळ येऊन ठेपला आहे असें पंतांस वाटलें. पंतांचे सर्व गणगोत जमा झाले. पंतांनीं सर्वांस अखेरचा निरोप सांगितला, निरवानिरव केली, 'मरणसमयीं कोणी भोंवतीं जमून रडारड करूं नका, उलट आनंदानें रामनामाचा गजर चालू द्या,' असें आप्तेष्टांस बजावलें व 'प्रांतप्रार्थना' म्हणून अगदीं अखेरचें १७ आर्यांचें अत्यंत हृदयद्रावक असें काव्य केलें. या 'प्रांतप्रार्थनेंत' पंतांचा उदारभाव प्रकट झाला असून गोमाता, भूमाता, तुळशी, गंगा, रामनाम, भक्तजन, आप्तजन यांना त्यांनीं करुणरवानें विनविलें आहे व त्यांनीं जन्मभर केलेल्या उपकारांचें प्रेमपूर्वक स्मरण केलें आहे! ही कृतज्ञताव्यक्ति पाहून ज्याचें हृदय द्रवणार नाहीं असा पाषाण कोणी आढळणार नाहीं असें मला वाटतें. गाईनीं दुग्धरसानें आपलें जन्मभर पोषण केलें, आपल्याला भूमातेनें लेंकरासारखें उरावर वागविलें, रामनामानें जिव्हेला चट लावून जन्मसार्थक होण्याचा मार्ग दाखविला, संतसज्जनांनीं सुपथ लाविला, वगैरे प्रकारें:—

पण पंतांच्या शब्दांनींच हा प्रकार दाखवूं म्हणजे झालें!

**दुग्धादिस्वरसें[1] बहु पोषण केलें, सदैव, गाई हो!**
**गोमयदानें अंतीं मज दीना उद्धराचि आई! हो ॥ १ ॥**
**विश्वंभरे! [2]क्षमे! तूं देउनि शयनार्थ दर्भ, कामातें।**
**या पुरवुनियां, अंतीं देवि! करीं धन्य [3]अर्भका मातें ॥ २ ॥**
**माते तुळसि! असो तव दळ वदनीं, मूळमृत्तिका [6]भाळीं।**
**प्राणावसानसमयीं, इतुकीच दया करुनि, सांभाळी ॥ ३ ॥**

---

१ दूध, दहीं, तूप वगैरे देऊन. २ पृथ्वी. ३ बाळकाला. ४ पत्र ५ मूळांतली माती. ६ कपाळीं.

अंतीं हें आस्य वसिव, जेंवि दशरथास्य रामनामा ! तें ।
त्वत्कामनाचि वाढो, न स्पर्शो अन्य कामना मातें ! ॥ ४ ॥
श्रीशिवनामा ! त्वां वा रसनेला लाविलीच चट सारें ।
परि अंतीं जप, केलें कारुण्य वृथा बुडेल चटसारें ! ॥ ५ ॥
[3]भगवज्जन हो ! धंदुनि, पदर पसरितों, असोंचि द्या स्मरण ।
[4]तरण तसें मज पाजा, श्रीहरिहरनाम, पातल्या मरण ॥ ६ ॥
मोहाया न करावा प्रांजलि जो मी मयूर या [5]तजर ।
आप्त मुदित हो ! सुखवा हरिनामाचा करूनियां गजर ॥ ७ ॥
त्रैलोक्यपावनत्वें भगवज्जनमंडळीच गंगा हो ।
यास्तव अंतीं माझ्या प्राप्त इचें संनिधान[7] अंगा हो[8] ॥ ८ ॥

या सतराही आर्या प्रत्येकानें वाचाव्यात. या आर्यांवरून अंतकाळीं कोणत्याही प्रकारची तळमळ पंतांच्या अंतःकरणाला शिवली नव्हती व जन्मभर केलेल्या रामभक्तीचा व सदाचरणाचा सत्परिणाम त्यांच्या पवित्र चित्तावर झाला होता हें स्पष्टच दिसतें.

३ चैत्री पौर्णिमेच्या दिवशीं ह्मणजे हनुमज्जन्माच्या मंगल दिवशीं पंत रामरूप झाले. रामभक्त मारुतीच्या जन्मकाळींच रामनामाचा जयघोष सर्वत्र चालला असतांच रामभक्त मोरोपंत रामरूप झाले हें योग्यच झालें. भक्तांचा अंतही गोडच व्हावयाचा. मंगलाचें मंगल असें जें रामरूप त्याचा निरंतर ध्यास करणारें चित्तही मंगलांतच लीन होऊन जातें, मग तो समयही मंगलच कसा असणार नाहीं ! मोरोपंत शके १७१६ च्या चैत्र शुद्ध १५ स मंगळवारीं हनुमज्जयन्तीच्या पर्वणीवर मंगलरूप झाले. रामनामाचा साद घालीत पंतांनीं देह ठेविला. गीर्वाणसागरांतून आपल्या अतर्क्य बुद्धिप्रभावानें या मयूरमेघानें काव्यामृत शोषून त्याचा काठिण्यक्षार नाहींसा करून महाराष्ट्रभूमीवर पेयामृताचा वर्षाव सतत चाळीस वर्षें केला व कृतकृत्य झालेला नश्वर देह ठेविला. पंत आपलें कार्य करून गेले. पुण्यबलानें त्यांचे सत्संकल्प सिद्धीस गेले. पांडुरंगराव नाईक यांचा मनोदय पंतांच्या दहनभूमीवर राममंदिर बांधण्याचा होता पण पंतांच्या आज्ञेवरून त्यांच्या अस्थि पंढरीस पुंडलीकास-

१ मुख. २ गोडीनें, माधुर्यानें; रससारज्ञता रसनेच्या ठायीं आहेच. सार ह्म० उत्कृष्टांश. ३ संतसज्जन हो ! ४ रोग्यास पेजेंप पाणी देतात तें. ५ आरडाओरड. ६ गंगा ही त्रैलोक्याला पावन करणारी असल्यामुळें गंगेंत सर्व पुण्यपुरुषांचा समावेश होतोच. ७ सांनिध्य. ८ होवो.

मोर चंद्रभागेच्या डोहांत टाकण्यांत आल्या. पंतांचा संसार नाइकांच्या आश्रयानें चालत होता, व नाइकांची इस्टेट जप्त करून त्यांच्या वाड्यावरून बाजीरावानें पुढें १२।१५ वर्षांतच नांगर फिरविला! पंतांच्या दहनभूमीवर पांडुरंगराव नाइकांच्या ह्मणण्याप्रमाणें राममंदिर उभारलें गेलें असतें तर त्या ठिकाणीं पुढें दिवा लागायचीही पंचाइत पडली असती! तेव्हां पंतांनीं आपल्या अस्थि पंढरीस नेण्याविषयीं जो आग्रह धरिला तो भाव्यर्थाला धरूनच होता यांत संशय नाहीं. पंतांच्या अस्थि पंढरीस गेल्या हेंही ठीकच झालें, कारण त्यांच्या अस्थींच्या मागोमाग त्यांचें घराणें त्यांच्या हस्तलिखित पोथ्या घेऊन कायमचें राहण्यास पंढरीसच गेलें! शिवाय ज्या पांडुरंगभक्तानें सारा जन्म पांडुरंगाच्या व तद्भक्तांच्या यशोवर्णनांत घालविला त्याच्या अस्थींनींहि पांडुरंगाच्या पायींच दडी द्यावी हें अगदीं स्वाभाविकच आहे!

४ पंतांचें देहावसान झाल्यावर महाराष्ट्राच्या भाग्यसूर्यास खग्रास ग्रहण लागलें! पंतांनीं महाराष्ट्राचें वैभव पाहिलें, व रावबाजीचे पाय पेशवाईस लागण्यापूर्वींच त्यांनीं डोळे मिटले! वर्ष दीड वर्षांतच महाराष्ट्रांतील सर्व कर्ते पुरुष गेले. हरिपंत फडके, महादजी शिंदे, सवाई माधवराव पेशवे, अहल्याबाई होळकरीण व मोरोपंत पराडकर हे शके १७१६ च्या (इ० इ, स. १७९४ च्या) आंतबाहेर एकामागें एक गेले व त्यांच्या बरोबर महाराष्ट्राचें मुत्सद्दीपण, पराक्रम, भाग्य, पुण्य व वाग्बळ सर्व अस्तंगत झालें!! पुढच्या ग्रहणांत एकटा नानाफडणीस राहिला, पण तो जरी बडा अक्कलवंत होता तरी वरील पंचकांत असलेलें पुण्यबळ त्याच्यापाशीं नव्हतें. राष्ट्रैक्याला अवश्य असें तडजोडीचें मुत्सद्दीपण हरिपंत फडक्याबरोबर गेलें, स्वकीयपरकीयांना चळचळां कांपायला लावणारा पराक्रम महादजी शिंद्याबरोबर गेला, मराठ्यांच्या भाग्यानें सवाईमाधवरावाबरोबर उडी घातली, मराठ्यांच्या पुण्याईनें अहल्याबाईबरोबर नर्मदेंत बुडी मारली व मराठ्यांची वाग्मिता पंढरीस पांडुरंगाच्या चरणापाशीं दडून राहिली!! मराठ्यांचें राष्ट्र नामशेष होणारें नाहीं, सर्व आपत्तींतून तें तरून अखेर जगाच्या डोक्यावर बसल्याशिवाय राहणार नाहीं. ज्ञानेश्वराचा, नामदेवाचा, एकनाथाचा, तुकारामाचा शिवाजीचा, रामदासांचा, तानाजी मालुसऱ्याचा, चोखा मेळ्याचा, बाजीराव व माधवराव पेशव्यांचा, रामशास्त्री प्रभुण्याचा, वामनमोरोपंतांचा, साडेतीन शहाण्यांचा, बाजी देशपांड्याचा व जिवबादादाचा—यांचा

महाराष्ट्र जगाच्या इतिहासांत आपला यशोदुंदुभि निरंतर वाजवीत राहणार! अहल्याबाई आणि लक्ष्मीबाई यांचें राष्ट्र मरणार नाहीं. ज्ञानेश्वरतुकारामांनीं ज्या महाराष्ट्र भाषेंत वेदगर्भ प्रकट केला ती मराठ्यांची भाषा त्रैलोक्यांत नित्य राहील. अभंग प्रसवणारी भाषा अभंगच राहणार, व ज्या मराठ्यांची वाणी अमृतमय आहे त्या मराठ्यांचें राष्ट्र अजरामर आहे हें पुनः पुन्हां सांगायला नको. असो, अशी जरी गोष्ट आहे तरी इ. स. १७९४ मध्यें महाराष्ट्राला खग्रास ग्रहण लागलें ही गोष्ट खरी आहे. मराठ्यांचा भाग्यसूर्य मध्यान्हीस येण्याच्या सुमारास जन्मलेला महाराष्ट्रकविनायक तो सूर्य अस्तंगत होण्याच्या पूर्वी निवर्तला हें त्याच्या पुण्याईचें लक्षण आहे. शके १५३० ह्या एका सालीं तुकाराम, रामदास व मुक्तेश्वर हे जन्मले, तेव्हां महाराष्ट्राचे ग्रह जसे उच्चींचे होते तसे शके १७१६ सालीं ते नीचींचे होते असें दिसतें!

९ मागील प्रकरणांतून पंतांच्या स्वभावादिकांचें जागोजाग विवेचन झालें असल्यामुळें निराळें वर्णन देण्याचें कारण उरलें नाहीं. पंतांची तसबीर मिळाली नाहीं. त्यांनीं स्वतः आपली तसबीर ( फोटो ) काढून ठेविली होती, पण ३० वर्षांपूर्वी मुंबईस ती कोणीं नेली व हरवली असें समजतें! पंत शरीरानें स्थूल, वर्णानें गोरे, वृत्तीनें शांत व सौम्य होते. त्यांचा स्वभाव फार उदार व प्रेमळ होता, वृत्ति नित्य गंभीर व प्रगल्भ होती. पंतांना डावा पंजा हालवण्याची मात्र एक चमत्कारिक खोड होती. पंत लिहीत बसले कीं त्यांचा डावा पंजा सदा हाले! एकदा एक दूरचा गृहस्थ रामजोशाबरोबर त्यांच्या दर्शनास आला होता, त्यास हा प्रकार पाहून हंसू आलें व त्यानें जोशीबोवांस 'यांचा हा हात असा कां हालतो?' ह्मणून प्रश्न केला. जोशीबुवांनीं समयसूचकतेनें तात्काळ उत्तर दिलें. "पंत पद्यरचना करूं लागले ह्मणजे त्यांच्यापुढें तेलंगी ब्राह्मणांप्रमाणें यमकांची गर्दी होते, प्रत्येक यमक 'मला कवितारूपी रमण्यांत सोडा' ह्मणून त्यांना विनवीत असतें. 'मी येतों, माझी सोय करा' ह्मणून याचना करणाऱ्या यमकांना 'तूं ये! तूं नको,' असें सांगण्याच्या कामावर डाव्या हाताची पंतांनीं नेमणूक करून दिली आहे!!" पंतांच्या समकालीन व नित्यपरिचित अशा रामबडव्यानें पंतांच्या स्वभावाचें वर्णन करितांना पंतांची स्थितप्रज्ञता, शांति, सदयता, निगर्वीपणा, इत्यादि गुणांचें गौरव केलें आहे. (पृ. १४६ ). पंतांचें मन लोण्यासारखें मऊ होतें असें बाळंभट काजळ्यानें

यांच्या संगतींत दीड वर्ष राहून ह्मटलें होतें. ‘ हय्यंगवीनाधिक मृदु मानस ’ असे त्याचेच शब्द आहेत ! पंतांनीं आपले आईबाप, गुरु, ‘ अच्युतप्रमुख बाळमित्र, ’ त्यांच्या आश्रयानें राहणारा गंगाधरभट पराडकर, पंतांची ‘बहु भली रामा भार्या, ’ पंतांचे ‘ थोर सदय अनद ’ बाबूजीनाईक, पंतांच्या काव्यलतेला ‘प्रेमानें सिंचणारें’ त्यांचें अनेक मित्र, इत्यादिकांबद्दल जागोजाग जे उद्गार काढले आहेत त्यांवरून त्यांच्या प्रेमळपणाची व कृतज्ञताबुद्धीची चांगलीच साक्ष पटतें, ‘ पंतांचा गृहस्थाश्रम ’ ह्या प्रकरणांत पंतांच्या नित्याचाराचें व कुटुंबस्थितीचें वर्णन केलेंच आहे. दुसऱ्याच्या अल्प उपकाराबद्दलही त्याचा मोठा गौरव करायचा व गुण तेवढे घेऊन त्याची सदाचाराकडे प्रवृत्ति पाडायची असा पंतांचा स्वभावच होता. त्यांची राहणी साधी असे. लहानथोरांशीं प्रेमानें व निष्कपटबुद्धीनें ते वागत. त्यांना कोणतेंही व्यसन नव्हतें. विनय आणि आत्मप्रत्यय यांचें योग्य प्रमाण त्यांच्या ठिकाणीं होतें. लोभ सोडून तनुनिर्वाहापुरता बारामतकरांचा आश्रय धरून ते राहिले होते. यजमान व यजमानांच्या घराण्यांतील मंडळी यांविषयीं त्यांच्या मनांत मोठा प्रेमादर वागत होता, तथापि त्यांची निःस्पृहता व निरिच्छता कधी ढळली नाहीं. एकदा बाजीरावानें त्यास आपणांस पुराण सांगा ह्मणून ह्मटलें तेव्हां ‘ यजमानांस मी पुराण सांगेन तेव्हां आपण ऐका’ असें त्यांनीं उत्तर केलें होते! सिद्धनाथासारखें सत्पुरुष भेटलें कीं ‘ भू अंतर्गत बैसतो विवरीं । संगती बरी परस्परें ’ ह्याप्रमाणें त्यांचा सुखसंवाद चाले. पंतांना एकांतीची व सत्संगतीची मनापासून आवड होती. रिकामटवळी व दुराचारी मंडळी त्यांना भिऊन वागे. निंदकाचा छळ प्रथम त्यांनाही थोडाबहुत सोसावा लागला, तथापि निंदकांना आपले उपकर्ते मित्र समजण्याइतका परमार्थ त्यांच्या अंगीं बाणला होता. ‘रामरीति’ मध्यें ते ह्मणतातः—

**देवा ! निरामय सुखी शतवत्सर सर्व खळ असावेच ।**
**न प्रार्थितां नच करिल तीर्थाचा पंकजळ मला वेच ॥ ४७ ॥**

विद्याव्यासंग आणि भगवद्भक्ति या शिवाय पंतांनीं जन्मांत दुसरें कांहीं केलेंच नाहीं. त्यांच्या अंतवृत्तींचे प्रतिबिंब त्यांच्या काव्यांत पडलें असल्यामुळें त्यांची काव्यें हेंच त्यांचें सुविस्तर चरित्र होय.

# प्रकरण दहावें.



## पंतांचा कवितासमुद्र.

मागील नऊ प्रकरणांत पंतांच्या चरित्राचें साग्र विवेचन केलें, आतां उत्तरार्धाच्या पुढील प्रकरणांत पंतांच्या कवितासागराचें आलोडन करावयाचें आहे. पंतांची कविता तीन लाख आहे असें मालाकारप्रभृतींनीं लिहिलें आहे. पण ही संख्या मोजदाद न करतां अनुमानधबक्यानें दिली आहे, ती अर्थात् चुकीची आहे. पंतांची कविता पाऊण लाख आहे. पंतांचें महाभारत १७१७०, सर्व रामायणें मिळून १६०००, मंत्रभागवत ३५९२, कृष्णविजय ३६६९, ब्रह्मोत्तरखंड १२००, व हरिवंश ५४४४ मिळून ४७०७५ पद्यें होतात. पंतांचे विस्तृत ग्रंथ एवढेच होत. ह्यांपैकीं ४० हजारांवर केवळ आर्या आहेत, व बाकीची कविता भिन्नभिन्न वृत्तांत रचलेली आहे. इतर स्फुट प्रकरणें जमेस धरिलीं तर सरासरीनें आणखी ८।१० हजार कविता निघेल. पंतांचीं अनुपलब्ध काव्यें विचारांत घेतलीं तर सर्व मिळून पंतांनीं पाऊणलाख कविता रचली असें ह्मणावयास कांहीं हरकत नाहीं! जवळ जवळ साठ हजार कविता उपलब्ध आहे व १०।१५ हजार कविता रचली असून नष्ट झाली असण्याचा संभव आहे; कांहीं केलें तरी पाऊण लाखावर आंकडा जात नाहीं. पाउण लाख पद्यें ह्मणजेच कांहीं लहान काम नाहीं. सर्व संसाराचीं कामें संभाळून व संसाराच्या दगदगी सोसून, पंतांनीं बहुधा -निर्दोष, शब्दचमत्कारवती, सरस, प्रसादयुक्त अशी पाऊण लाख कविता निर्माण करून महाराष्ट्र भाषेवर व महाराष्ट्रांतील लोकांवर चिरस्मरणीय उपकार करून ठेवले आहेत.

पंतांच्या काव्यांचे रचनाकाल ठरविणें फारच कठिण आहे. त्यांनीं स्वतः प्रल्हादविजयाशिवाय कोणत्याही काव्यावर रचनाकाल दिलेला नाहीं, तथापि कांहीं काव्यांत पूर्वी रचलेल्या काव्यांचे उल्लेख केले आहेत त्यावरून व कित्येक अंतर्बाह्य प्रमाणांवरून त्यांची संगति मीं बसविलेली आहे. मी

माझीं अनुमानें व प्रमाणें जेथल्या तेथें बहुतेक देणार आहें. त्यावरून मला वाटतें कीं, पंतांनीं प्रथम संकृत पुराणांतून कथा घेऊन त्यावर स्वतंत्र आख्यानें तयार केलीं. पंतांनीं ब्रह्मोत्तरखंड व भस्मासुराख्यान हीं स्कंधपुराणांतील कथांच्या आधारें रचिलीं, कुशलवचरित हें तेरा अध्यायांचें सुंदर प्रकरण जैमिनी अश्वमेधाच्या आधारें रचिलें, मदालसाख्यान, हरिश्चंद्राख्यान, साध्विमहिमा व देवीमाहात्म्य उर्फ सप्तशती आर्या हीं चार प्रकरणें मार्कंडेय पुराणांतील कथांच्या अनुरोधानें रचिलीं, व प्रल्हादविजय विष्णुपुराणाधारें रचिला. हीं आठ प्रकरणें व यजमानांच्या मुलींसाठीं रचलेलीं पूर्ववयांतलीं तीन गीतें हीं ११ काव्यें पंतांनीं आपल्या वयाच्या २३ व्या वर्षापासून २९ व्या वर्षापर्यंतच्या पांच वर्षात रचिलीं आहेत, याबद्दलचा उहापोह मीं ‘ ग्रंथकर्तृत्वाचा पहिला भर’ ह्या नांवाच्या अकराव्या प्रकरणांत करणारच आहें. वरील अकरा प्रकरणांचें विवेचन अकराव्या प्रकरणांत झाल्यावर बाराव्यांत मंत्ररामायण व तेराव्यांत कृष्णविजय उर्फ बृहद्दशम यांचें विवेचन होईल. १३ ह्या प्रकरणांपैकी हरिश्चंद्राख्यान, सप्तशती आर्या, व मंत्ररामायण हींच प्रकरणें हरिदासांनीं विशेष उचललीं व पंतांच्या आर्या बारामतीबाहेर फडकूं लागल्या. मंत्ररामायणाचे उपोद्घातोपसंहार वाचले ह्मणजे पंतांना आत्मप्रत्यय येऊं लागल्याचें स्पष्ट दिसतें व ‘ आर्यकथाछंदानें आर्याछंदेंचि जन्मलीं सरलें ’ ह्या त्यांच्या उद्गारावर श्रद्धा बसते. कृष्णविजयांत भगवद्भक्तीचा अंकुर त्यांच्या सत्वसंशुद्ध झालेल्या हृदयभूमीवर उगवलेला पाहून ब्रह्मोत्तरखंड प्रथम रचणारा ‘हा नवीन कवि’ भगवद्भक्तांच्या मेळ्यांत शिरण्याची इच्छा करणारा ‘ भाविक मुमुक्षु ’ आहे असें स्पष्ट वाटतें. पुराणकथा गातां गातां व मंत्ररामायण व कृष्णविजय हीं रामकृष्णांचीं चरित्रें वर्णन करितां करितां उत्पन्न झालेल्या भगवद्भक्तीच्या प्रेमांकुरास सिंचन करण्याकरितां पंतांनीं अनेक देवता, तीर्थें, क्षेत्रें इत्यादिकांचीं स्तोत्रें केलीं व संशयरत्नावलीसारखीं कित्येक नितांतमधुर लघुकाव्यें केलीं त्यांचा विचार ‘स्तोत्रकलाप’ नामक चवदाव्या प्रकरणांत मी करणार आहें. कृष्णामाहात्म्य, व्यंकटेशस्तोत्र, दुर्गादेवीस्तव, विनायकमाहत्म्य, दत्तदयोदय वगैरे निरनिराळ्या देवतांची पंतांनीं स्वोद्धारासाठीं याचना केली आहे. या सर्वांत ‘दत्तदयोदय’ हें स्तोत्र अत्यंत मधुर असून दत्तोपासकांनीं तें आपल्या नित्यपाठांत आणावें अशी माझी त्यांस नम्र प्रार्थना आहे. ह्याशिवाय संशयरत्नावलि, आर्या केकावलि, नामार्या, नाम-

सुधाचषक, नामरसायन, वाङ्मनःप्रार्थना, सन्मनोरथराजि, प्रश्नोत्तरमाला, पतिव्रताकीर्तन, गुरुस्तुति, महद्विज्ञापना व आशंसाष्टक ह्या बारा काव्यरूप स्तोत्रांत पंतांनीं आपल्या हृदयांत उत्पन्न होणाऱ्या भक्तिमहानदीचा लोट सोडून दिला आहे. हें प्रकरण अत्यंत मधुर होईल व भगवद्भक्तीची गोडी चाखणारे सद्रसिक त्यावर प्रेमानें डोलतील! हीं स्तोत्रकाव्यें रचून झाल्यावर किंवा रचीत असतांना पंतांनीं 'हरि ज्यांचा कैवारी त्या पांडुसुतांचें चरित्र आपण तरावया गाण्याचा' उद्योग सुरू केला व आपल्या कीर्तिमंदिराचा मुख्य स्तंभ जो 'महाभारत' ग्रंथ तो ७।८ वर्षांत रचला. पंतभारताचा विचार मी पंधराव्या प्रकरणांत करणार आहें. पंतांचे यजमान बाबूजीनाईक व मित्र विठोबादादा, बाबा पाध्ये वगैरेंना पंतभारतामुळें परमानंद झाला व पंतांचें यश महाराष्ट्रांत चिरस्थायि झालें. हरिदासांच्या व रसिक श्रोत्यांच्या पंतभारतावर उड्या पडल्या व पंतांच्या जिवंतपणींच पंतांच्या भारतीआर्या महाराष्ट्रभर कथाकीर्तनांतून चमकूं लागल्या. पंतांचें पूर्ववय संस्कृत ग्रंथांच्या परिचयांत गेलें. काव्यें, नाटकें, पुराणें, साहित्यछंदःशास्त्रादिकांवरचे ग्रंथ इत्यादिकांशीं परिचय होऊन नंतर पंतांनीं कवितादेवीच्या अंगणांत उडी घातली असल्यामुळें कुशलवचरित, मंत्ररामायण वगैरे काव्यांत संस्कृत कवितेचें वळण अतिशय दिसतें. तथापि पंतांच्या हृदयांत भक्तिप्रेम जसजसें वाढत चाललें व श्रीभागवतायर त्यांचीं पारायणें व पुराणें होऊं लागलीं तसतसे पंत स्वतःच भागवत ह्मणजे भगवद्भक्त झाले. भगवद्भक्तांचे गुण गाण्यासाठीं त्यांनीं 'संतप्रकरणें' रचावयास प्रारंभ केला, त्यांचा विचार मीं सोळाव्या प्रकरणांत करणार आहें. पंढरपूर, पुंडलीक व पांडुरंग यांजवरील पंतांच्या आर्या, सामान्यतः संतस्तवनार्थ त्यांनीं रचलेलीं प्रकरणें, तुळसीदासप्रभृति हिंदुस्थानी संत व ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास, महिपति इत्यादि महाराष्ट्र संत यांवरचे पंतांचे अभिप्राय इत्यादिकांचें विवेचन ह्या प्रकरणांत येऊन पंतांची वामन पंडित व मुक्तेश्वर यांच्याशीं तुलना करणार आहें. ह्या प्रकरणांत महाराष्ट्रांतील भागवतधर्माचा प्रसार करणाऱ्या संतांबद्दल पंतांचे अभिप्राय देण्यांत येऊन पंतांच्या विशेष योग्यतेचेंही तुलनेनें स्पष्टीकरण होईल. चवदावें प्रकरण 'स्तोत्रकलाप' व हें सोळावें 'संतप्रकरण' हीं दोन प्रकरणें वाचकांनीं विशेष काळजीपूर्वक वाचलीं ह्मणजे पंतांच्या हृदयभूमीची त्यांस चांगली ओळख पटून पंतांच्या

स्वतंत्र कवितेची योग्यता कळेल. ह्या दोन प्रकरणांतलीं काव्यें पूर्ण स्वतंत्र आहेत. भागवतधर्मीय संतांची महती गायिल्यावर पंतांचें चित्त भागवतपर झालें व त्यांनीं श्रीमद्भागवताकडे आपलें चित्त वळवलें. पंतांनीं भागवतांतून भीष्मभक्तिभाग्य, ध्रुवचरित्र, अंबरीषाख्यान, सुदामचरित्र, गोपीगोडवे वगैरे जीं अत्यंत सुरस अशीं १९ प्रकरणें रचलीं त्यांचें विवेचन सतराव्या प्रकरणांत येईल व अठराव्यांत पंतांच्या मंत्रभागवताचा विचार होईल. हे दोन्ही भाग भक्तिरसानें पूर्ण ओथंबलेले आहेत. एकोणिसाव्या प्रकरणांत पंतांच्या अष्टोत्तरशत रामायणांचा विचार होईल व विसाव्या प्रकरणांत पंतांचीं अखेरचीं काव्यें हरिवंश, गीतार्या, रामरीति व केकावलि यांचा ऊहापोह होईल. पंतांच्या केकांची परस्परसंगति दाखवून पंतांच्या अखेरच्या व अत्यंतात्यंत सरस अशा या काव्यरूप स्तोत्राचा विशेष बारकाईनें विचार करावयाचा आहे.

ह्याप्रमाणें पुढील दहा प्रकरणांत पंतकवितारत्नाकरांत दहा बुड्या मारून प्रत्येक वेळीं जीं दिव्य रत्नें हातीं लागतील तीं वाचकांस दाखविण्याचा माझा मनोदय आहे. त्यांच्या नित्यदर्शनानें मला जो परमानंद झाला तो माझ्या देशबांधवांसही व्हावा अशी उत्कंठा झाल्यामुळें पुढील प्रकरणांत प्रांजळबुद्धीनें मी आपले विचार पंतांच्या उक्तींसह प्रकट करणार आहें. शेवटचें प्रकरण एकविसावें होईल. त्यांत पंतांच्या कवितेचा भाषादृष्टीनें विचार व्हावयाचा आहे. यमकरचनेचा इतिहास व पंतांचीं यमकें, अनुप्रास, श्लेष, ह्मणी, अनुकरणवाचक शब्द, संस्कृती वळण, यावनी शब्द, पात्रानुरूप भाषा, लोकोक्ति, रस, अलंकार, आर्यावृत्त व दोष इत्यादिकांचा त्यांत विशेष ऊहापोह करावयाचा आहे. दहा प्रकरणांत पंतकवितेचें अंतःस्वरूप व अकराव्यांत तिचें बाह्यस्वरूप दृष्टीस पडेल. पहिल्या दहाही प्रकरणांत तिच्या हृदयस्थ प्रेमाची ओळख पडेल व या अकराव्या प्रकरणांत तिचें बाह्यरूप व नटणें मुरडणें इत्यादि बाह्य क्रिया पाहण्यास सांपडतील. एकंदरींत पुढील अकराही प्रकरणें वाचकांनीं काळजीपूर्वक वाचलीं ह्मणजे पंतकवितेचें अंतर्बाह्य स्वरूप त्यांस यथार्थपणें कळणार आहे. ह्या सर्व प्रकरणांत अवतरण करून घेतलेलीं पद्यरत्नें वाचकांनीं पहावीं ह्मणजे त्यांस पंतकवितार्णवांत निमज्जन केल्याचें श्रेय मिळेल असा मला भरंवसा आहे. उतारे इतस्ततः वरवर चाळून देत नाहीं, प्रत्येक काव्याचें काळजीपूर्वक

मंथन करून त्यांतील उत्कृष्ट पद्यें संदर्भासह किंवा अर्थासह मी देत आहे, पंतकाव्यांतील बहुतेक उत्कृष्ट आर्या यांत वाचकांस सांपडतील. प्रत्येक काव्याचें विवेचन करतांना पंतांचा भाव काय होता व त्यांच्या मनांत वेळोवेळीं कसकसे विचारतरंग उठत गेले याची ओळख करून घेऊन व वाचकांस ती पटत जाईल अशा धोरणानें हीं प्रकरणें मीं लिहिणार आहे. मराठी भाषेच्या अभ्यासाकडे वाचकांचें लक्ष विशेष प्रकारें लागावें अशा बेतानें शेवटचें प्रकरण लिहिण्याचा विचार आहे. वाचकांनीं पंतकवितादेवीचें अंतर्बाह्य स्वरूप भक्तिप्रेमपूर्वक पाहण्यास 'शुद्ध अचंचळ मनें' तयार व्हावें अशी त्यांस प्रार्थना करून मी पंतकवितासुधार्णवांत रामाचें नांव घेऊन पहिली बुडी टाकतोंच.

---

## पंतांचा कवितासमुद्र.

| ग्रंथ | | पद्यसंख्या. |
|---|---|---|
| १ मोरोपंती महाभारत | | १७१७० |
| २ मोरोपंती रामायणें (सुमारें) ... .... ... | | १६००० |
| ३ हरिवंश ... ... ... ... ... ... | | ५४४४ |
| ४ कृष्णविजय उर्फ बृहद्दशम ... ... ... ... | | ३६६९ |
| ५ मंत्रभागवत ... ... ... .... ... | | ३५९२ |
| ६ ब्रह्मोत्तरखंड ... ... ... ... ... | | १२०० |
| | एकूण | ४७०७५ |
| ७ स्फुट प्रकरणें एकंदर (सुमारें) | | १०००० |
| (अ) काशी प्रकरणें | १००० | |
| (आ) संत प्रकरणें | १००० | |
| (इ) भागवती प्रकरणें | १६५२ | |
| (ई) कुशलवाख्यान | ५०६ | |
| (उ) गीता सप्तशती | ४०७ | |
| (ऊ) गीतार्या | ७१८ | |
| (ऋ) संतांचीं गाणीं | ६१२ | |
| (ऌ) स्तोत्रें, कांहीं इतर स्फुटें वगैरे. | ४००० | |
| | | ५७०७५ |

# अष्टोत्तरशत रामायणें.

१ अद्भुत रा० २ अनुष्टुभ् रा० ३ आर्यागीतिमुक्तामाला. ४ आद्यार्या रा० ५ उमा रा० ६ ऋषि रा० ७ एकपदी रा० ८ एकश्लोकी रा० ९ ओवी रा० १० कडव्याचें रा० ११ कथासुधा उर्फ विद्युन्माला रा० १२ कन्यारत्न रा० १३ कविप्रिय रा० १४ कल्पलता उर्फ पुष्पिताग्रा रा० १५ कल्याण रा० १६ काशी रा० १७ गंगा रा० १८ गदघ्न रा० १९ गुरु रा० २० घनाक्षरी रा० २१ छंदो रा० उर्फ वृत्तरत्न रा० २२ तन्वी रा० २३ तीर्थ रा० २४ त्रिःसप्तमंत्र रा० २५ दंडक रा० २६ दाम रा० २७ दास रा० २८ दिंडी रा० २९ दिव्य उर्फ दीर्घ रा० ३० दोहा रा० ३१ दोहा सोरठा रा० ३२ धन्य रा० ३३ धर्म रा० ३४ धीर रा० ३५ नामांक रा० ३६ निरोष्ठ रा० ३७ पंचचामर रा० ३८ पंचशती रा० ३९ परंतु रा० ४० पीयूष रा० ४१ पुण्य रा० ४२ पुत्र रा० ४३ पूत रा० ४४ पृथ्वी रा० ४५ प्रयाग रा० ४६ प्रहर्षिणी रा० ४७ बालमंत्र रा० ४८ भाव रा० ४९ मंच रा० ५० मंजु रा० ५१ मत्तमयूर रा० ५२ मंत्रगर्भसाकी रा० ५३ मंत्रमय रा० ५४ मंत्ररामायण. (प्राकृत) ५५ मंत्र रा० (संकृत) ५६ मंत्रा रा० ५७ मंत्री रा० ५८ मात्रा रा० ५९ मुक्तामाला उर्फ मुद्रा रा० ६० रम्य रा० ६१ राज रा० ६२ रामनामाष्टोत्तर शत रा० ६३ रामप्रार्थना उर्फ रामायणाष्टक. ६४ लघु रा० ६५ वरद रा० ६६ विचित्र रा० ६७ विबुधप्रिय रा० ६८–७७ विष्णुसहस्रनाम रामायणें. ७८ शिव रा० ७९ शिव रा० (दुसरे) ८० शुद्ध रा० ८१ श्रवणामृत रा० ८२ श्रीप्रिय रा० ८३ श्रीमत्सु रा० ८४ श्रीरमणीय रा० ८५ श्रीरामायण. ८६ श्रीहररमणीय रा० ८७ श्लोकबद्ध रा० ८८ सत्कीर्ति रा० ८९ सत्व रा० ९० सच्छ्राव्य रा० ९१ सद्गर्भ रा० ९२ सद्गीत रा० ९३ सद्भक्तसर्वस्व रा० ९४ सद्रत्न रा० ९५ सद्वित्त रा० ९६ सन्नामगर्भ रा० ९७ सप्तमंत्र रा० ९८ सवाया रा० ९९ स्रग्विणी रा० १०० सीतारामायण. १०१ सीतागीत उर्फ अभंग रा० १०२ सुख रा० १०३ सूरा रा० १०४ सौम्या रा० १०५ हनूमद्रामायण. १०६ हूं रा० १०७ हृद्य रा० १०८ हर्ष रामायण.

# प्रकरण अकरावें.



## ग्रंथकर्तृत्वाचा पहिला भर.

**हरिपादयुगश्रवणप्रवणें**
**भगवज्जनदिव्यकथाश्रवणें ।**
**चतुरें रसिकें समय क्रमणें**
**सुख अन्य नसेंचि भवभ्रमणें ॥ १ ॥**

—**प्रऱ्हादविजय.**

१ विषयप्रवेश. २ पंतांची पहिली आर्या. ३ ब्रह्मोत्तरखंड. 'हा कवि नवीन' ४ राजपुत्रास उपदेश. ५ भस्मासुराख्यान. ६ कुशलवचरित. ७ सतींचीं गाणीं. ८ ओंवी आणि अभंग. ९सीतागीत. १०रुक्मिणीगीत. ११सावित्रीगीत १२मदालसाख्यान. १३ त्यांतील उत्कृष्ट उतारे. १४ हरिश्चंद्राख्यान. १५ त्यांतील करुणरसाचा परिपाक व राजाप्रजासंबंध. १६ साध्वीचा महिमा. १७ देवीमाहात्म्य. १८ प्रऱ्हादविजय. भगवद्यश व सत्कथा गाण्यांत आयुष्य वेंचण्याचा पंतांचा 'सत्य-संकल्प' १९ प्रऱ्हादाची अद्वैतबुद्धि व २० मूळाशीं तुलना.

१ श्रीरामभक्त मोरोपंत ह्यांच्या कवित्वगुणाचा विकास केव्हां व कसा होऊं लागला हें सांगतां येणें कठिण आहे. ते उपजत कवि होते. पूर्वपुण्य-बलावर काव्यशक्तीचें पाथेय बरोबर देऊन ईश्वरानें त्यांना ह्या मनुष्यलोकांत आणून सोडलें होतें. यावर पंतांनीं आपल्या बुद्धिबळाच्या व सद्गुणांच्या जोरावर चाळीस वर्षांच्या सततोद्योगानें एक लक्ष काव्यग्रंथ निर्माण करून सत्कीर्तिपरिमळानें सारा महाराष्ट्र दरवळून सोडला. ईश्वरीसूत्रानें सारे विश्व-व्यापार चाललेच आहेत व त्याच्या आज्ञेशिवाय झाडाचें पानही हालत नाहीं ही गोष्ट सर्वथैव खरी आहे. तथापि मनुष्यदेह ही कर्मभूमि आहे. जो पुरुष श्रेष्ठ कार्य करितो तो जगद्वंद्य होतो, कनिष्ठ कार्य करितो तो अधम ठरतो. सूर्य सर्व जगताला भासविणारा असून जीवांच्या बऱ्यावाईट कर्मांचा त्याला लेप नाहीं त्याप्रमाणें परमेश्वर सर्वांचा प्रेरक असून जीवांच्या उच्चनीच

कार्याचें कर्तृत्वही त्याजकडे नाहीं. जीव कर्मतंत्र आहे, भोगतंत्र नाहीं. कर्माचें फल देणारा ईश्वर आहे, पण कर्म करणारा जीव स्वतंत्र आहे. नर करणी करील तर नराचा नारायण होईल. 'ही कर्मभूमि आहे, व सत्कर्म करीत राहणें एवढेंच माझें इहलोकीं कार्य आहे' अशी दृढ भावना धरून श्रेष्ठ पुरुष सततोद्योग करीत असतात व ज्या एका चिच्छक्तीच्या बळावर सारे विश्वव्यापार चालले आहेत त्या चिच्छक्तीला मनोभावें शरण जाऊन आपलें सर्व कर्तृत्व तिच्या माथीं मारून आपण कर्तृत्वाहंकार टाकून मोकळे होतात! चांगलें कार्य कोणतें, वाईट कोणतें; उच्च कोणतें, नीच कोणतें; राज्यपद देणारें कोणतें, भिकेस लावणारें कोणतें; हें जाणण्याचें तारताम्य मनुष्यांत आहे, व त्याप्रमाणें वागणेंही बहुतक त्याच्या स्वाधीन असतें. "पुरें आरंभावें कर्म, न पौरुष कदापि सोडावें " ह्या तत्वानुसार श्रेष्ठ पुरुष वागत असतात. प्रयत्नांधीन पुष्कळ गोष्टी आहेत, दुर्बळ व बुद्धिहीन पुरुष कर्म सोडून कपाळावर हात मारून बसतात; बिनचूक कार्य करण्याचा मार्ग शोधीत नाहींत; दृढनिश्चय, नेट, उत्साहशक्ति, व सततोद्योग हे गुण अंगीं आणीत नाहींत; व दैवाला बोल लावतात! दैव तरी पूर्वकर्माचाच पर्याय आहे हें ते विसरतात. दैवाला म्हणजे पूर्वकर्माला प्रस्तुतकर्मानें सर्वथा बदलणें शक्य नसलें तरी पुष्कळ आळा घालतां येतो हें ते ध्यानीं आणीत नाहींत. सत्यवानाचा पूर्वकर्मानें निश्चित झालेला मृत्यु सावित्रीला उत्कटपुण्यकर्मानें टाळतां आला! सांगण्याचें तात्पर्य एवढेंच कीं प्राप्त झालेल्या गुणांचीं वृद्धि करणें किंवा ते रानांतल्या पुष्पांप्रमाणें सुकून जाऊं देणें हें मनुष्ययत्नाधीन आहे. मोरोपंतांना उपजत काव्यशक्ति होती, सत्कवीला लागणारे गुण बीजरूपानें त्यांच्यांत जन्मतः होते हें जरी खरें आहे तथापि त्यांच्या अचाट उद्योगामुळें ते उदय पावले. काव्यरसज्ञ गुरूंचा सहवास, काव्येतिहासपुराणग्रंथांचें अध्ययन, सृष्टयवलोकन व निरंतर अभ्यास यांच्या योगानें त्यांची काव्यशक्ति विकास पावली. उत्तरोत्तर भगवत्प्रेमा वाढत गेल्यामुळें त्यांच्या काव्यकर्तृत्वाला शुद्धतर वळण लागलें.

२ असो. आतां पंतांच्या काव्यरचनेस प्रारंभ कसा झाला हें पाहूं. पंतांनीं प्रथम पुराणग्रंथ वाचले व त्यांतून लहान लहान प्रकरणें घेऊन त्यांवर स्वतंत्र आख्यानें तयार केलीं. विष्णुपुराण, मार्कंडेयपुराण, जैमिनी-अश्वमेध, व ब्रह्मोत्तरखंड या चार ग्रंथांतून पंतांनीं प्रथम कांहीं प्रकरणें निवडून

काढली व त्यावर आर्या करण्यास प्रारंभ केला. कुशलवोपाख्यान व ब्रह्मोत्तरखंड हे ग्रंथ त्यांनीं अगोदर रचिले असावेत. पंतांची अगदीं पहिली आर्या अशी आहे:—

**नित्य तुह्मीं प्रभुपाशीं पेढे बरफी नवा खवा खावा ।**
**तरि म्यां एके दिवशीं रेवडिचा स्वाद कां न चाखावा ॥ १ ॥**

पंत पन्हाळगड सोडून बारामतीस पितृदर्शनास ह्मणून आले ते तेथेंच राहिले. बारामतीस आल्यावर थोड्याच दिवसांनीं ते आपल्या वडिलांबरोबर पंढरपुरास श्रीविठ्ठलदर्शनास गेले. तेथें एके दिवशीं रेवडीकरबोवांच्या कीर्तनाची झांगड उडून राहिली होती. गर्दी इतकी झाली होती कीं पंतांना वाट मिळेना, तेव्हां तेथल्या लोकांची प्रार्थना करण्याच्या बुद्धीनें त्यांनीं ही पहिली आर्या केली, असें ह्मणतात. पंत बारामतीस आल्यावर बाबूजी नायकांचें चित्त आपणाकडे वेधावें ह्मणून त्यांनीं, सीता, रुक्मिणी व सावित्री यांचीं तीन गीतें त्यांच्या मुलीसुनांना करून दिलीं ह्मणून सांगतात. पण या गीतांच्या पूर्वीं त्यांचीं ४।५ तरी काव्यें झालीं असावींत असें वाटतें. त्यांनीं कुशलवचरित व ब्रह्मोत्तरखंड, हीं काव्यें लिहिण्यापूर्वींही पन्हाळगडीं आपल्या देवीउपासक गणेशपाध्यांच्या आज्ञेवरून 'देवीमाहात्म्य' केलें असावें. कसें-ही असो. त्यांनीं आपलें लक्ष बारामतीस आल्यावर थोड्याच दिवसांनीं काव्यरचनेकडे लावलें असावें किंवा बारामतीस येण्यापूर्वीं दोन तीन काव्यें पन्हाळगडींच गुरुसान्निध झालीं असावींत. एक दोन प्रकरणें पन्हाळगडावर झालीं असतील, पण बाकीचीं बारामतीस आल्यावर झालीं असलीं पाहिजेत. सदर काव्यांपैकीं ब्रह्मोत्तरखंड व भस्मासुराख्यान हीं स्कंदपुराणांतून घेतलीं आहेत; कुशलवचरित जैमिनी-अश्वमेधाच्या आधारें लिहिलें आहे; मदालसाख्यान, हरिश्चंद्राख्यान, साध्वीमहिमा, व देवीमाहात्म्य हीं चार प्रकरणें मार्कंडेय पुराणांतील कथाभागांच्या आधारें रचिलीं आहेत; प्रल्हादविजय हें विष्णुपुराणांतील कथेचें भाषांतर आहे, व सतींचीं गाणीं मात्र अगदीं स्वतंत्रपणें रचलेलीं आहेत. ह्या सर्वांचा आतां विचार करूं.

३ **ब्रह्मोत्तरखंड**:—पंतांनीं स्कंदपुराण अ० २३—४४ यांच्या आधारानें प्रस्तुत प्रकरण लिहिलें आहे. त्यांनीं या ग्रंथाचे २२ अध्याय केले असून आर्यांची संख्या १२०० आहे. पंतांचे यजमान बाबूजी नाईक यांना शंकराची उपासना होती. बारामतीस शंकराचें एक फार प्राचीन देवालय

आहे, त्याला काशीविश्वेश्वराचें देऊळ ह्मणतात. या देवळांतच श्रीधरस्वामींनीं शके १६४० मध्यें आपला शिवलीलामृत ग्रंथ संपविला होता. मूळ ब्रह्मोत्तरखंड संस्कृतांत आहे. त्याचा विस्तार श्रीधरस्वामींनीं मराठींत केला, व त्यानंतर ज्या मंदिरांत श्रीधरस्वामींनीं आपला शिवमाहात्म्यपर ग्रंथ केला त्याच मंदिरांत त्यानंतर ३९ वर्षांनीं पंतांनीं आपला 'ब्रह्मोत्तरखंड' रचिला. श्रीधरस्वामींनीं आपला ग्रंथ बारामतीस संपविला यास प्रमाणः—

**ब्रह्मकमंडलूच्या तीरीं। द्वादशमती नाम नगरी।**
**आद्यंत ग्रंथ निर्धारीं। तेथेंचि झाला जाणिजे॥**

ही शिवलीलामृतांतलीच ओंवी होय. द्वादशमती ह्म० बारामती. तेथल्या ब्रह्मकमंडलू नदीला कऱ्हा नदी ह्मणतात. पंतांचे गुरुबंधु व गुरुपुत्र सदाशिव केशव पाध्ये यांनीं पत्र पाठवून पंतांस शिवलीलापर ग्रंथ करण्यास सुचविलें. 'लिहिलें सुयश मयूरें या हेतु सदाशिवाख्य गोसावी' (अ० १२) मोरोपंत नुक्तेच बारामतीस गेले होते, तेथें त्यांना नित्य श्रीकाशीविश्वेश्वराचें दर्शन होत होतें, श्रीधरस्वामींनीं शिवलीलामृत ग्रंथ तेथेंच केल्याची सर्वांस ताजी आठवण होती, यजमान बाबूजी नाईक यांना शंकराची उपासना होती, व ह्मणूनच यजमानांचें लक्ष आपल्या तरुण कविमित्राकडे अधिक लागावें या बुद्धीनें सदाशिव पाध्यांनीं मोरोपंतांना प्रस्तुत ग्रंथ लिहिण्याची सूचना केली असावी! या वेळीं पंत कवि ह्मणून जगदंगणावर नुक्तें डोकावूं लागले होते. कालिदासानें मालविकाग्निमित्र नाटक पूर्ववयांत लिहिलें तेंव्हां 'पुराणमित्येव न साधु सर्वं' या श्लोकाच्या द्वारें, 'मी काव्यरचनेच्या कामांत नवीनच आहें ह्मणून मला धुडकावून लावूं नका' अशी त्यानें प्रेक्षकांची प्रार्थना केली. असाच प्रकार पंतांनींही प्रस्तुत ग्रंथांत केला आहे. उपसंहारांत ते ह्मणतातः—

**शिवकीर्तिग्रंथ ललित रचिला भावें करूनि आर्यांहीं।**
**करुणा करुनि सकृत् तरि वाचावा हा समूळ आर्यांहीं॥ १॥**
**विनवितसें साधूतें अणिकहि देवून हाक विनवीन।**
**कीं द्या आशी 'शुचि हो सद्यश सेवून हा कवि नवीन!'॥ २॥**

यांचा भावार्थ उघडच आहेः "कृपा करून हा माझा ग्रंथ एकवार तरी वाचा. मी नवीन कवि आहें ह्मणून माझा अव्हेर करूं नका. मला यशःप्राप्ति व्हावी ह्मणून मी तुह्मांला मद्ग्रंथ वाचायचे श्रम देत आहें व असे तुह्मांस श्रम

देण्याचे प्रसंग आणखीही येणार आहेत!" प्रथम कवीनें आपण होऊनच 'हा माझा प्रथम प्रयत्न आहे, याकडे दयार्द्रदृष्टीनें पहा' असें वाचकांस विनविलें आहे. प्रस्तुत ग्रंथ विशेष सरस उतरला नाहीं व यांत पंतांना काव्यरचनेची व मुख्यतः आर्याघटनेची भट्टीही बरोबर साधली नाहीं. या ग्रंथाचा पंतांनीं अन्यत्र कोठेंही उल्लेख केला नाहीं. व पंतकाळींही बारामतीच्या बाहेर याचा प्रसार झाल्याचें दिसत नाहीं. यांतील आर्या क्लिष्ट नाहींत, तथापि यांत मोरोपंती थाट अगर प्रेमळपणा या दोहोंचाही फारसा पत्ता लागत नाहीं. पंतांच्या आत्मिक किंवा बौद्धिक शक्तींचा विकास अगर गीर्वाण वाणीचे संस्कार या काव्याला फारसे लागलेले दिसत नाहींत, तथापि पुण्यसंस्कारवान् भाविकानें हा ग्रंथ लिहिला आहे असें मात्र दिसतें. असो, दुसरें, 'हा

१ या ग्रंथाची, सतींच्या गीतांची, कुशलवचरिताची व पंतांच्या पूर्ववयांतल्या आणखी चार दोन काव्यांची पंतलिखित प्रत त्यांचे घरीं नाहीं. हीं काव्यें पंतांच्या पूर्ववयांत लिहिलीं गेलीं ह्मणून तीं पंतगृहीं राहिलीं नाहींत असें वाटतें. मंत्ररामायण पंतलिखित आहे त्याचीं पानें त्यानंतर लिहिलेल्या काव्यांच्या पानांपेक्षां जुनाट आहेत. पंतांनीं पोर्तुगीज कागद वापरला होता असें मजपाशीं असलेल्या कांहीं पोथ्यांवरून उघड दिसतें. ब्रह्मोत्तरखंडाची एक प्रत पंतमित्र मैराळबोवा चातुर्मासे यांच्या हातची मीं पाहिली आहे. पंतांच्या हातच्या आर्या व छापील प्रतींतल्या आर्या यांच्यांत बऱ्याच ठिकाणीं तफावत पडलेली दिसते. छापील प्रतींतून वरील आर्यार्ध 'कीं आशी शुचि होवुं सयश सेवूनि हा कवि नवीन' असा आहे, पण मैराळ बोवांच्या प्रतींत तो 'कीं या आशी "शुचि हो सयश सेवूनि हा कवि नवीन!" असा आहे. हाच पाठ खरा आहे. या ग्रंथाच्या शेवटची आर्या सर्व छापील प्रतींत अशी आहे:—

**मंत्र 'श्रीशिव जय शिव जय जय शिव' हा मनीं सुखी राहे।**
**आमरण ग्रंथरसिक शिवचरणीं रत मयूर हा वाहे॥ १॥**

हीच आर्या मैराळबोवांच्या प्रतींत पुढील प्रमाणें आहे:—

**मंत्र 'श्रीशिव जय शिव जय जय शिव' हा मनीं मुखीं राहो।**
**आमरण ग्रंथ रचुनि हरिहरचरणीं मयूर हा वाहो॥ १॥**

या दुसऱ्या आर्येचा अर्थ किती सुरेख आहे हें मार्मिकजन जाणतीलच. मैराळबोवांची पोथी अगदीं मूळ पोथीवरून लिहिली असल्यामुळें सर्व छापील प्रतींपेक्षां अर्थातच जास्त प्रमाण मानली पाहिजे. कवीच्या ग्रंथांत असे अपपाठ मागाहून घुसत जातात व कालांतरानें लेखकप्रमादामुळें बिचाऱ्या कवीस 'चिकित्सकांचे' तडाखे निष्कारण खावयाचा प्रसंग येतो!

ग्रंथ सकृत् तरी करुणा करून वाचा' ह्मणून पंतांनीं सांगितलें आहे, तेंही सकारण आहे. हा ग्रंथ मागें पडण्याचें कारण माझ्या मतें असें आहे कीं शिवभक्तांची तृषा 'शिवलीलामृत' या श्रीधरी ग्रंथानें भागत असल्यामुळें व त्या ग्रंथाचा रसाळपणा, गोडी, व विचित्रता प्रस्तुत ग्रंथांत तितकी न उतरल्यामुळें याची विशेष प्रसिद्धि झाली नाहीं. तिसरें 'अणिकही देऊन हाक विनवीन' असें पंत ह्मणतात. या वाक्यांत यापुढें आणखी ग्रंथरचना करण्याचा आपला मनोदय पंतानीं व्यक्त केला आहे. एकंदरीनें प्रस्तुत ग्रंथ पंतांनीं प्रथम रचिला असें उघड होतें. पंतांचें वय या वेळीं फारसें प्रगल्भ नसावें. 'श्रीशिवकथा यथामति लिहिली हे रामनंदनें बाळें' या आर्यार्धांतील बाळ हें पदही केवळ औपचारिक दिसत नाहीं.

४ सीमंतिनीकथा व मुख्यतः तदंतर्गत सुमेधाख्यान, भद्रायुकथा व शिवयोगीकृत सद्बोध हे प्रसंग सदर ग्रंथांत चांगले साधले आहेत. सर्व ग्रंथ सकृत् सुद्धां वाचण्याची ज्यांना सवड नसेल त्यांनीं शिवयोग्यानें राजपुत्र भद्रायूस जो सुंदर बोध केला आहे (अ. ११) तो अध्याय अवश्य वाचावा. त्यांतील थोडासा प्रकार पहाः—

**वत्सा ! शाश्वत होय श्रुति-तज्ज्ञपुराण-कथित जो धर्म ।**
**तो सेव्य उभयलोकीं, प्राणी तेणेंचि पावतो शर्म ॥ १६ ॥**
**भज सन्मार्गातें तूं दैवज्ञाची करूं नको गर्हा, ।**
**स्वप्नींहि देवहेलन न करावें रीति हे तुला अर्हा ॥ १७ ॥**
**गोविप्रातिथिपूजन, स्वाध्याय, स्नान, होम, मंत्र, जप, ।**
**पितृतर्पण, देवार्चन, यातें तूं आळस त्यजुनि जप ॥ २२ ॥**
**जी सत्कथा, सदागम, सद्व्रत, सद्धर्म, जें सदाचरण, ।**
**बा ! यांची तृष्णा धर, भावें स्मर शंभुचे सदा चरण ॥ २१ ॥**
**तूं क्षत्रधर्मरत जरि तरि बा ! हिंसा करूं नको स्वैर ।**
**बहुभाषण, परनिंदा, वत्सा ! तैसेंचि शुष्क जें वैर ॥ २४ ॥**
**सुखसंपन्नीं मैत्री, नित्य दया दुःखितीं जनींहि, करी ।**
**संतोष पुण्यवंतीं, बा ! औदासीन्य दुर्मतीं न धरी ॥ २६ ॥**
**सक्रोध हो अरिजनीं, स्वकलत्रीं हो सकाम तूं बापा ।**
**सकृप सलोभहि चित्तीं हो स्वजनांच्या हरावया तापा ॥ २९ ॥**

---

**१ वेद व वेदरहस्य जाणणाऱ्या पुराणांत सांगितलेला. २ कल्याण. ३ निंदा. ४ सच्छास्त्र.**

**नास्तिक, धूर्त, पतित, शठ, षंढ, कितव, चपल, खल, जड, क्रूर ।**
**निजकल्याणाकरितां वत्सा ! सोडूनि यांसि दे दूर ॥ ३१ ॥**
**सावध सदा असावें संसारीं, स्वहितकृत्य लक्षावें ।**
**पुरुषार्थांचें साधन बा धनसें हें शरीर रक्षावें ॥ ३४ ॥**
**निर्दोष जे तयांची चित्तांत कधीं धरूं नको शंका ।**
**प्राणहि वेंचुनि रक्षी वृद्धा बाळा सुदुर्बळा रंका ॥ ३६ ॥**
**यत्नें कीर्तिच जोडी बा ! होय पदार्थ हाचि बहु धन्य ।**
**राजे पंडित यांचें भूषण नाहींच कीर्तिहुनि अन्य ॥ ३९ ॥**
**आयुष्य, कीर्ति, यश, बळ, पुण्य-द्रव्य, प्रजोन्नति प्राज्य ।**
**जेणें तें कर्म करी, धर्मन्यायेंचि चालतें राज्य! ॥ ४४ ॥**
**संपत्तींत विपत्तित वत्सा ! होवूं नको कधीं भ्रांत ।**
**पापीं गुरु-बहुबोलीं ब्रह्मकुलीं सर्व काल हो भीत[1] ॥ ४७ ॥**
**ज्ञातिसुतबंधुमित्रीं भार्याजनपंक्ति यांत समभावें ।**
**वर्तावें नित्य तुवां कीं सर्वांहीं तुझेंचि यश गावें ॥ ४८ ॥**
**कुलटा गणिका कामुक जेथें बहु नीच जन तशा स्थानीं ।**
**राहूं नको क्षणहि कीं-दुर्देशीं न प्रवर्तती ज्ञानी ॥ ५१ ॥**
**आचमन करुनि शुद्ध ब्राह्ममुहूर्तीं उठोनियां व्हावें ।**
**भावें गुरुचरणातें नमुनि शिवातें सदा तुवां ध्यावें ॥ ५५ ॥**
**पर्यटणभुक्तिभाषणशयनक्रीडेंत सर्वदा साचा ।**
**प्रेमा शिवीं असावा, हाचि महाधर्म सर्व दासाचा ॥ ६० ॥**

हा उतारा फार लांब झाला. अलीकडच्या राजपुत्रांना वरच्या सारख्या शिक्षणानें तयार केले तर भरतखंडाच्या हद्दीबाहेर दैन्य, दारिद्र्य, व दुःख हे आपापल्या परिवारासह खास पळून जातील!-वरील बोध मुख्यतः राजपुत्रांनीं व सामान्यतः सर्व तरुणांनीं हृदयपटावर निरंतर कोरून ठेवावा इतका तो सर्वोत्कृष्ट आहे. ह्या आर्या वडिलांनीं मुलांकडून नित्य पाठ म्हणवून घ्याव्यात. सदर प्रसंगावर श्रीधरस्वामींनींही ओंव्या केल्या आहेत, पण पंतांचें चातुर्य व धोरण कांहीं अलोट आहे. आमचे कांहीं मराठीकवि उपदेशप्रसंगीं असे वाहवतात कीं कोणत्या प्रसंगीं कोण कोणाला उपदेश करितो आहे याचेंही त्यांना भान रहात नाहीं. उपदेशप्रसंग म्हटला कीं जें चांगलें वाटेल तें

---

१ पापाचें भय बाळग; गुरूंशीं अति बोलूं नकोस, किंवा गुरुजनांचा बोल कापून घेऊं नकोस; ब्राह्मणांना असंतुष्ट करूं नकोस.

लिहीत सुटायचें. पंतांचें कधीं असें नसायचें. त्यांचा तारतम्यभाव सर्वदा जागरूक असतो. राजपुत्राला काय बोध करणें योग्य आहे याचें मूळ धोरण त्यांचें सुटलें नाहीं. प्रश्नोत्तरखंड हा ग्रंथ समग्र नाहीं तरी वरील अठरावा अध्याय तरी गुरुजनांनीं स्वतः वाचून मुलांकडून पाठ करवून घ्यावा असें पुन्हां आग्रहानें सुचवितों. पंतांच्या काव्यार्णवांतही अशीं मौक्तिकें फार नाहींत.

अध्याय ३ व १९ मध्यें परमपतितांचीं चरित्रें दिलीं आहेत व असे पतितही शिवभक्तीनें व सत्संगानें कसे उद्धरले हें चांगलें सांगितलें आहे. शिवोपार्जन कसें करावें हें अ. १७ मध्यें सांगितलें आहे तें असें:—

**भूप ह्मणे, " संकल्प प्रथम करावा सदा, मग ध्यान ।**
**पाद्याचमनार्घ्यांतीं घालावें निर्मलोदकें स्नान ॥ १ ॥**
**गंधाक्षत नानाविध पुष्पें तरुचीं तशींच वेलांचीं ।**
**घेउनि नाम वहावीं त्रिदळें निवडूनि रम्य बेलांचीं ॥ २ ॥**
**मग धूप दीप भावें नैवेद्य प्रभुसि नमुनि अर्पावा ।**
**शंभु चिताभस्माच्या उपहारें करुनि नित्य तर्पावा ॥ ३ ॥**
**स्तवन करावें, गावें, नाचावें, प्रभुपुढें न लाजावें ।**
**स्पष्ट ह्मणावें ' जाइल सोडुनि सर्वस्व जरि मला, जावें ' " ॥ ४ ॥**

हा पूजाविधि सर्व भाविक सुजनांना स्वानुभवानें ज्ञात आहेच. सर्व धर्मविधीला मुख्य श्रद्धा पाहिजे. पंत ह्मणतात:—

**श्रद्धाचि करितसे हित धर्माचें, जेंवि माय तनयाचें ।**
**जप, तप, मख, गुरुपूजा, मुख्य श्रद्धाचि आयतन याचें ॥ ५ ॥**
**श्रद्धेनें भजत्यातें पाषाणहि फलद होय, जो अज्ञ ।**
**तोही सद्गुरु होतो, अश्रद्धेनें वृथा महा यज्ञ ॥ ६ ॥**

प्रकृत ग्रंथांत सुभाषितरूप सुंदर चरण बरेच आहेत.

**( १ ) सत्पुरुषचरणदर्शन होतें, बुडतां भवार्णवीं, बेट ।**
**( २ ) गुह्य कथावें सुजनीं, सुक्षेत्रीं बीज पेरिलें रुजतें ।**
**( ३ ) श्रमणें नको बहु तपें, प्रभुच्या स्मरणें चुके भवभ्रमणें ।**
**( ४ ) स्वच्छंदाचरणानें राहेना कुलजकीर्तिची शुचिता ।**
**( ५ ) संसारीं पुरुषार्थ-प्रासादा साधुसंग हा पाया ।**

प्रस्तुत ग्रंथावरून कुलीन, श्रद्धाळू, व प्रेमळ मातापितरांच्या व गुरूंच्या पवित्र छायेखालीं वाढलेल्या मयूरचित्तांकुराला पाहून कोणा सुजनाचें मन आल्हादित होणार नाहीं ? बाळपणींच आपला धर्म, आपले आचार, आपली

सर्वोत्कृष्ट राहणी, आपले ईश्वरविषयक, संतविषयक व सदाचारविषयक सिद्धांत, याविषयीं पंतांच्या मनावर जे उत्तम संस्कार झाले ते त्यांच्या पुढील सर्व ग्रंथांत शतशः प्रकट झाले आहेत. आपल्या श्रुतिस्मृतिपुराणोक्त धर्माविषयीं, आपल्या परंपरेनें आलेल्या व कुलीन घराण्यांत अद्याप कोठें कोठें दिसून येणाऱ्या आचारविचारांविषयीं व चालीरीतींविषयीं पंतांचा जो आदरभाव होता त्याचें मननपूर्वक अध्ययन करून आपली वृत्ति चिराध्यासानें तत्सम बनवून जो त्यांचें चरित्र व ग्रंथ वाचील त्यालाच त्यांतील अनुपम माधुरी कळणार आहे.

९ **भस्मासुराख्यानः**--हें आख्यान मोठें गमतीचें आहे. हें ब्रह्मोत्तरखंडांतूनच घेतलें आहे. सर्पाला सुधा पाजल्यानें दात्याच्या जिवावर कशी येऊन बेतते हें या कथेंत सांगितलें आहे. शंकर ह्मणजे भोळे दिगंबर. रावणबाणादिकांनीं त्यांना स्तवनानें संतुष्ट करून वर मागून घेतले होते, तसाच भस्मासुरानें एक वर मागितला कीं, "मीं ज्याच्या डोक्यावर हात ठेवीन तो तत्काळ मरावा!' आशुतोष व परम दयाळु अशा शंकरानें, पात्रापात्रविचार न करितां, तो वर दिला. पण त्या मात्रागमनी दुष्टानें 'केला संकल्प लोकत्रयैं[1]-सुभगशिवारत्न त्याचें हराया!' शंकराला त्याचा नाश करणें कठिण नव्हतें, पण 'जाळावा जरि लोचनानळकणें[2], दुष्कीर्ति भक्तक्षयें!!' मोठेपणामागें संकटें फार. आपल्याच वरानें पुष्ट झालेला दुष्ट मारावा तरी अपकीर्तीच पदरीं पडणार! मग शंकर पळूं लागले.

**न सावरति सर्वथा दशभुजाहि देवा जटा**
**वृषासहित राहिल्या चरण पादुका वाजटा[4]।**
**शिरःस्रजाहि[5] धांवतां त्वरित भंग पावे, गळे,**
**गळोनि पडले फणी पथि भुजंगपा[6] वेगळे ॥ २२ ॥**

**गळाल्या गळ्यांतूनि रुद्राक्षमाला।**
**नसे निर्भयस्थान रुद्रा क्षमाला।**
**पळे विष्टपीं[7] ऊघडा नागवा जी।**
**पदालाचि मानी प्रभू नागवाजी ॥ २३ ॥**

---

१ त्रैलोक्यामध्यें परमसुंदर असें पार्वतीरूपी रत्न. २ नेत्रांतल्या कोपाग्नीच्या कणानें. ३ मंदी. ४ चट् चट् वाजणाऱ्या. ५ डोक्यांवरच्या माळाही गळून पडल्या. ६ सर्पांचा स्वामी ७ स्वर्गांत.

शंकराचें अनाठायीं औदार्य पाहून देव पुष्कळ चरफडले व 'या औदार्यें सुरांचें घर बुडवितसे हा महाराज भोळा!' असें ह्मणून ते कोपानें जळूं लागले. भगवान् विष्णु बटुवेश घेऊन भस्मासुराला ठकवायला आले:—

अजिनदंडकमंडलुमेखळा ।
कुशधर द्विजबाळ गमे खळा ।
पाथिं तयासि धरूनि नमो हरी ।
मधुर वाक्पटु तो मन मोहरी ॥ ३१ ॥

बटूनें भस्मासुराला जवळ बसवून घेतलें, गोष्टीमाता केल्या, मधुर भाषणानें त्याला भुरळ पाडली, त्याची वरप्राप्तीची गोष्ट ऐकून घेतली व शंकराची निंदा करून सांगितलें:—

राहे प्रेतीं पिशाचीं गतविभव वसे नित्य नग्न स्मशानीं
त्याचा विश्वास कैसा तुह्मि दृढ धरिला शाहण्यांनीं अज्ञांनीं?॥ ३९ ॥

बटुवचनावरून भस्मासुरानें वरपरीक्षा पाहण्यासाठीं आपलेच हात आपल्या मस्तकावर ठेवले व तो तत्काळ भस्म झाला!

ऐसें संकट वारिलें, मग हरी गेला महेशाकडे,
हें बोले, 'जन हे विभो! विचरती पूज्यापुढें वांकडे।
ते होती निजभद्रजीवनयशःस्नेहक्षयीं कांकडे
सर्वज्ञ प्रभुजी! तुह्मीं हागिरडे घेतां असे कां कडे?' ॥ ४० ॥
महेशाचें देवें त्वरित हरिलें संकट बटु-
स्वरूपें, हे लीला मधुर, अमृताचा घट कटू।
रसन्यूनाधिक्यग्रहणविषयीं जे जन पटू
पिती[2] श्रोत्रास्यें ते हरिजन सुधेला घुटुघुटु ॥ ४१ ॥

ही कथा लहान आहे, पण खुबीदार आहे. कथा निवडण्यांत व सरहस्य गाण्यांत पंतांनीं चातुर्य खर्च केलें आहे. श्लोकही सरळ व साधे आहेत. पुढें पंतांनीं जीं रामायणें विविधवृत्तांत गायिलीं त्यांचे श्लोक जसे घोंटीव, गोंडस व प्रतिभातेजानें दिपवणारे झाले, तसे कुशलवोपाख्यान व प्रस्तुत प्रकरण यांत झाले नाहींत. पूर्ववयांतलीं हीं काव्यें असूनही इतकीं सुंदर उतरलीं आहेत याबद्दल कवीची तारीफच करणें योग्य आहे. पंत जैमिनि-अश्वमेध,

१ मुळांत स्त्रीवेष घेतल्याचें वर्णन आहे. श्रीधरांनींहि शिवलीलामृताच्या १२ व्या अध्यायांत भस्मासुराख्यान वर्णिलें आहे त्यांत विष्णूनें मोहिनीरूप धरिलें असेंच आहे.
२ पितात, पीती असें पाहिजे.

मार्कंडेयपुराण, विष्णुपुराण, स्कंदपुराण, वगैरे पुराणें वाचण्यांत गर्क झाले होते, त्यांतील कोणकोणत्या कथा काव्यांत आणाव्या या विचारांत होते. या काव्याच्या अखेरीस पंत ह्मणतात 'हरियश गातां आकर्णितां भवभय हरितें' ह्मणूनच हें भस्मासुराख्यान 'भावार्थें गाइलें हो सद्गुदितरत जो त्या मयूरेश्वरानें.'

६ **कुशलवचरित** यांतील श्लोकांची संख्या सुमारें पांचशें आहे व यांत पंतांनीं बहुविध पण सर्वप्रसिद्ध अशा बहुतेक वृत्तांची व अलंकारांची योजना केली आहे. हें एक लहानसें खंडकाव्यच आहे. याची प्रसिद्धी मात्र याच्या योग्यतेप्रमाणें झालेली नाहीं. पंतांनीं छंदःशास्त्र नुक्तेंच पाहिलें होतें, व काव्यनाटकांचा संस्कारही त्यांच्या बुद्धीला चांगला झाला होता. पंतांनीं संस्कृत जैमिनिकृत कुशलवाख्यान 'पाठार्थ' लिहून घेतलेलें पंढरीस आहे. हें 'अमृतापेक्षांही मधुर आहे' असें त्यांनीं खालीं लिहिलें आहे. यावर त्यांचा शक असता तर त्यांच्या ह्या मराठी कृतीचाही शक आपणास काढतां आला असता. मूळाचे ३९ अध्याय पंतांनीं १३ अध्यायांत आणले आहेत. कालिदासभवभूत्यादिकांचा व पंचमहाकाव्यांचा संस्कार पंतांवर किती झाला होता हें या काव्यांत पूर्णपणें पहावयास सांपडतें. मुख्यतः उत्तर-रामचरित व रघुवंश यांतील कल्पना व वर्णनप्रकार या काव्यांत पदोपदीं स्पष्ट दिसतात. यांतील रामराज्याचें वर्णन, सीतेचे डोहळे, तिचा त्याग करण्यापूर्वी रामबंधूंनीं रामाच्या केलेल्या विनवण्या. सीतेचा वनांतला शोक, तपोवनांतल्या पशुपक्ष्यांनीं तिजवर दाखविलेलें प्रेम, सीतेची रामावरची निष्काम प्रीति, वाल्मीक्याश्रमीं तिचा झालेला सत्कार, कुशलवांचे जन्म व बालशिक्षण—हे प्रकार कवीनें इतक्या बहारीनें वर्णिले आहेत कीं हें काव्य वर्ण्य असूनही त्याला दृश्यकाव्याची योग्यता आली आहे. रामानें सीतादेवीचा रजकाच्या निंदेवरून त्याग केला ही गोष्ट पंतांच्या कोमल मनाला फार क्लेशदायक झाली होती! ते परमरामभक्त होते तरी रामाच्या ह्या कृतीबद्दल त्यांनीं आपली मुग्ध नापसंती बऱ्याच ठिकाणीं दाखविली आहे, तरी रामासारख्या धीरोदात्त पुरुषानें 'अपवादभयास्तव व निजकुलयशास्तव मी स्वबंधूपेक्षां व स्वतनुपेक्षांही प्रियकर अशा शुद्धचरित सतीचा त्याग केला' हेंही त्यां-

---

१ सत्कवींच्या ग्रंथांत रमणारा. २ भैरावबोवांनीं या काव्याची प्रत शके १७०१ आश्विन शु.१३ रोजीं लिहून पुरी केली. हें काव्य त्या पूर्वी पुष्कळ वर्षें रचून झालें असावें.

नीं स्पष्ट सांगितलें आहे. ह्या काव्याच्या उत्तरार्धांत कुश व लव यांचें शत्रुघ्न, लक्ष्मण, भरत, मारुती, व राम यांशीं जें युद्ध झालें त्याचें वर्णन तर फारच आवेशानें केलेलें आहे. पंतांना वीररसाची भट्टी किती उत्तम साधत चालली होती, हें पहावयाचें असल्यास हें काव्य वाचावें. कोमलता व उदात्तता हे गुण रामचरित्रांतच भरले आहेत, मग ते ह्या काव्यांत बहारीनें वर्णिले आहेत हें सांगण्याची गरज नाहीं. लवाला रामपक्षीयांनीं पकडून नेल्यामुळें शोकग्रस्त झालेल्या सीतेस पहातांच कुश ह्मणतोः—

**वदरोदनमोहहेतु[1]ला**
**उचिता अंबे[2] ! दशा न हे तुला ।**
**तव दुःख न नाशिलें जरी**
**तरि लोकीं व्यसु[3]ताचि साजिरी ! ॥ १ ॥**
**अहह ! श्रम जाहला तुला**
**न दिसे यासि जगत्त्रयीं तुला[4] ।**
**तव वक्त्र[5]निशीन कोमला**
**मग तें जीवितही नको मला ! ॥ २ ॥**

मातृभक्तांचें किती नामी लक्षण या दोन श्लोकांत सांपडतें ! ‘ जिंकूनि त्वत्सुतातें कवण जयधन ब्रह्मगोळांत लाहे ! ’ असा मातेपाशीं सिंहासारखी गर्जना करणारा हा बालवीर रणभूमीवर येतांच शत्रूंना उद्देशून ह्मणतोः-

**असेल सामर्थ्य तरीच चापीं ।**
**मौर्वीसि जोडा विशिखांसि सोडा ! ।**
**नसेल सामर्थ्य तथापि सारे ।**
**हस्तासि जोडा मम बंधु सोडा ! ! ॥ १ ॥**

या एकांगवीरानें शत्रुघ्नभरतादिकांशीं जो घनघोर संग्राम केला त्याचें विस्तृत वर्णन मूळांतच वाचलें पाहिजे.

ह्या काव्यांत पंतांनीं युद्धवर्णन करीत असतांना दृश्य सृष्टींतल्या गोष्टींना नीतिसृष्टींतल्या उपमा पुष्कळदां दिल्या आहेत. काव्याच्या द्वारें नीतिबो[illegible] करण्याची ही पंतांची युक्ति वाखाणण्यासारखी आहे. एक दोनच उदाहरणें पहा

**नेत्रें असोनि उघडीं तिमिरीं स्वपरांसि वीर नोळखिती ।**

---

१ रडण्याचें कारण. २ हे आई ! ३ मरण. मातृदुःख वर निवारतां आलें नाही तर मग जगून काय करावयाचें आहे ? ४ तुळणा ५ मुखचंद्र.

आकस्मिकफललब्धश्री मदांध अकुलीन नर जसे कुमती ॥ १ ॥
गणिकास्पर्शें होतें क्षीण यशः, पुण्यपुंजही जळती ।
ह्मणुनि जणों बहुभुक्तक्षितिला धर्मज्ञ हरि न आतळती ! ॥ २ ॥

… … … … … … … … …

सारेही पडती सुतीक्ष्ण [६]परिघें संताडितां ते तसे
अंतीं नास्तिक वेदबाह्य नरकीं दुःशास्त्रवेत्ते जसे ! ॥ ३ ॥

वाल्मीक्याश्रमांत रामाचा अश्व दूर्वा खाऊं लागला त्या वेळची आर्या पहा:—

त्या गहनींच्या दुर्वा मरकतमणिपुंजदीप्तिच्या सवती ।
हरिच्या हरिति मनातें तरुणनरांच्या जशा विलासवती ! ॥ १ ॥

रामानें सीतेचा त्याग केला तेव्हां रामबंधूंनीं जे शोकाश्रु ढाळिले ते जणूं सीतामाता जी भूमि तिला सावध करण्यासाठीं तिच्या अंगावर शिंपलेलें जीवनच होय अशी उत्प्रेक्षा करून पंत ह्मणतात:—

"[७]सीतात्याग-द्विजप-जननीं वाढला दुःखसिंधू[८]
शोकाश्रूंहीं भिजविति तदा भूमितें रामबंधू ।
कन्यात्यागश्रवणजनितक्लेशमूर्छेसि गेली
शिंपोनिया ह्मणवुनि जणों जीवनें शांत केली ! ॥ ३१९ ॥

सीतात्यागानंतर सीता लक्ष्मणास ह्मणते:—

मद्विधि-कलश[९]भवानें रामकृपासिंधु शोषिला सारा ।
आतां मज शफरीला कैचा अन्यत्र वासरा थारा ! ॥ ४.४६ ॥
शोक लास्य[१०] करी हृदंगणिं, कंठ केवळ शोकलों[११],
कोमलानन पूर्णचंद्र तिचा तदा बहु कोमेला[१२], ।
'कां पती रुसला?' ह्मणे, 'सकळेंद्रियें बहु कांपती ।
भारें[१३] तीस निजांग होय, वदे अशी मग भारती[१४] ॥ ४.७१ ॥

वरच्यासारख्या सुंदर उत्प्रेक्षा व सरळ अनुप्रास प्रस्तुत काव्यांत पुष्कळ ठिकाणीं साधले आहेत. अध्याय १०–१३ मध्यें युद्धवर्णन फारच नामी साधलें आहे.

---

१ अकल्पित व अप्रयास मिळालेल्या संपत्तीनें मदांध झालेले. १ वेश्येच्या संगानें. ३ पुण्याचे डोंगर. ४ पुष्कळ राजांनीं भोगलेल्या. ५ रथाचे घोडे. ६ शस्त्रानें. ७ सीतेचा त्याग हाच कोणी चंद्र त्याच्या उदयाबरोबर. ८ दुःखाचा सागर. ९ माझें दैव हाच कोणी अगस्त्य. १० नृत्य. ११ शुष्क झाला. १२ कोमेजला, १३ ओझें. १४ वाणी.

जैसे वायुविभावसू कुशलव क्रोधें तसे धांवले
विस्फारूनि धनुर्लतांसि सहसा सैन्यांतरीं पावले।
केलें मर्दन मांसकर्दमपटें रक्तस्रवंती किती
तेथें वाहति पाहती भट मनीं कल्पांतसें तर्किती ॥ ६ ॥
कितेक रथ मोडिले ध्वज कितेक ही तोडिले
कितेक शर सोडिले गज कितेक ही झोडिले।
असंख्य भट ताडिले यमपुराकडे धाडिले
शिरःप्रकर पाडिले बहुत यापरी नाडिले ॥ ९ ॥

प्रस्तुतग्रंथांतलीं रणवर्णनें मोठीं बहारीचीं आहेत.

कुशलवचरितांत माधुर्य व ओज हे गुण चांगलेच दृष्टीस पडतात. वृत्तशास्त्र, साहित्यशास्त्र, व संस्कृत काव्यनाटकग्रंथ यांच्या मार्मिक अध्ययनाचें फळ ह्मणजे प्रस्तुत काव्य होय. हें संस्कृत काव्यांच्या धाटणीवर गेलें असल्यामुळें संस्कृतज्ञांसही पटेल असें आहे. याची भाषा सोपी व अक्लिष्ट आहे, व एकंदरीनें हें काव्य पंतांच्या उज्वल कल्पनाशक्तीस भूषणावह होईल अशीच याची योग्यता आहे. खुद्द पंतांना हें आपलें काव्य फारच आवडलें होतें असें नामरसायनांत त्यांनीं 'बा हे रीति पहावी! मज तों वाटे सुधानदी वाहे' याप्रमाणें त्याची स्वतः जी वाखाणणी केली आहे त्यावरून उघड दिसतें. आणि खरोखरच हे काव्य सर्व रसाज्ञांना सुधानदीप्रवाहासारखेंच आनंददायी वाटेल यांत शंका नाहीं. संस्कृत शब्दांचा, नानाविध यमकांचा व लांबलांब समासांचा मोठा भरणा प्रस्तुत काव्यांत असल्यामुळें कोठें कोठें अल्पस्वल्प दोष सांपडतात. 'चंदनउटी ह्म० चंदनाची उटी; सहावाध्याय ह्म० साहावा अध्याय; दोघ बंधू ह्म० दोघे बंधू, स्वात्मकानें ह्म० आपल्या कानानें; गुणांचियारामें ह्म० गुणांच्या आरामानें वगैरे ह्या काव्यांतले कांहीं क्षुद्र दोष शालापत्रकांत रा. स. मो. भिडे यांनीं ( सष्टं. १८९१ ) दाखविले आहेत ते बरोबर आहेत. या ग्रंथाच्या अखेरीस काव्यलेखनव्यवसायाबद्दल 'लोकिं नाहींच आर्यकार्य दुसरें या विग्रहें नश्वरें' असें ह्मणून पंतांनीं आपला हेतु प्रकट केला आहे.

७ **सतींचीं गाणीं:**—सीतागीत, सावित्रीगीत, व रुक्मिणीगीत, हीं तीन गीतें बायकांना पाठ करावयाच्या फार उपयोगीं आहेत. या गीतांच्या

१ अग्नि व वायु. २ रक्ताच्या नद्या. ३ मुंडक्यांचे ढीग.

योग्यतेप्रमाणें त्यांचा आपल्या समाजांत प्रसार झालेला दिसत नाहीं. गायकांच्या ह्मणण्यांत कित्येक कवींचीं गाणीं अगदीं रूढ होऊन गेलीं आहेत, त्यांप्रमाणें हीं रूढ होण्याच्या सर्वथा लायकीचीं असूनही अजून झालीं नाहींत. मुलींना हीं वाचायला व पाठ करायला जरूर द्यावींत. हीं गीतें फार सरळ व सोपीं आहेत. सीता, रुक्मिणी, व सावित्री ह्या पतिव्रतांचीं चरित्रें व मुख्यतः विवाहवृत्तें अत्यंत हृदयंगम आहेत. यांच्या कथा जिला माहीत नाहींत अशी हिंदु स्त्री कोठेंही सांपडणार नाहीं. प्रस्तुत गीतें पंतांनीं अगदीं पूर्ववयांत मुद्दाम मुलींसाठीं रचिलेलीं आहेत. पंतांची सोप्यांत सोपी कविता ह्मणजे हीं गीतेंच होत व कठिणांत कठिण कविता ह्मणजे कृष्णविजयाचा पूर्वार्ध होय! ह्या गीतांत यमकरचनेकडे बरेंच लक्ष पुरविलेलें दिसतें तथपि यमकें फार सुलभ, सहज आलेलीं व मनोहर अशीं आहेत. पंतांनीं सीतागीत प्रथम रचिलें, नंतर रुक्मिणीगीत रचिलें, व शेवटीं सावित्रीगीत रचिलें. या तीनही गीतांत सावित्रीगीत सर्वोत्कृष्ट आहे. तीनही गीतें गोड आहेत, पण काव्यदृष्टीनें व रसदृष्टीनें सावित्रीगीतच श्रेष्ठ ठरतें. हीं पंतांचीं पूर्ववयांतील काव्यें असून इतकीं उत्कृष्ट उतरलीं आहेत कीं, उत्तरकालीन उत्तमकाव्यांची तीं सहज बरोबरी करूं शकतील!

८ **सीतागीत** या गीतांना पंतांनीं बायकांचेंच आवडतें वृत्त घातलें आहे. खुद्द पंतांनीं एका खाजगी पत्रांत या वृत्ताला 'अभंग' वृत्त ह्मटलें आहे, पण याला 'ओवी' ह्मणणें योग्य होईल असें मला वाटतें. ज्ञानेश्वरींतली अगदी पहिली ओवी घ्याः–

**ॐ नमोजी आद्या। वेदप्रतिपाद्या। जयजय स्वसंवेद्या। आत्मरूपा ॥१॥**

ही ओंवी अभंगाचा एक पाद होऊं शकते. जसेंः—

**ॐ नमोजी आद्या वेदप्रतिपाद्या। जयजय स्वसंवेद्या आत्मरूपा ॥ १ ॥**

ज्ञानेश्वरांच्या वेळेपासून गेल्या सहाशें वर्षांत ओंवी व अभंग यांचे पुष्कळ प्रकार झाले आहेत. पण पहिली ओंवी व पहिला अभंग वर दिल्याप्रमाणेंच असला पाहिजे. या तऱ्हेनें पाहिले ह्मणजे मूळ ओंवी व अभंग एकच असून ह्मणण्याच्या भेदामुळें पुढें हा भेद झाला असें दिसतें. ओंवी व अभंग हीं दोनही वृत्तें केवळ मराठी भाषेंतलींच आहेत हेंही ध्यानांत धरिलें पाहिजे. आजही आपणः–

**आपुलीया बळें नाहीं बोलवत। सखा भगवंत वाचा त्याची ॥ १ ॥**

याला अभंगच ह्मणतों. पण तुकोबा याच वृत्ताला ओवी ह्मणतात! तुकोबांचे 'बाळक्रीडेचे अभंग' प्रसिद्ध आहेत. त्यांना लोकांनीं 'अभंग' ठरविले आहेत, पण तुकोबांनीं या ओंव्या आहेत ह्मणूनच सांगितलें आहे! ओवींत तीनदां यमक लागतें, पहिल्या पादांतलें यमक अवश्य ठरविलें नाहीं ह्मणजे त्याचाच अभंगपाद ज्यास्त सोपा होतो. तुकोबादिकांच्या अभंगांत तीन यमकांचेही पुष्कळ चरण आहेत. जसें:-

**बैसोनी निवांत शुद्ध करी चित्त। तया सुखा अंत-पार नाहीं ॥ १ ॥**

नाथांनीं ओवीला चार यमकें अवश्य ठरवून व अक्षरांची संख्या अमर्यादित करून ओवी जरा ऐसपैस केली आहे. असो. सांगायचें तात्पर्य एवढेंच आहे कीं ओवी व अभंग यांचें मूळ स्वरूप एकच आहे, खऱ्या ओवीचे पहिले तीन पाद सयमक व प्रत्येक पाद सहा अक्षरांचा असे असून चवथा पाद चार अक्षरांचा असतो, ह्मणजे प्रत्येक ओवींत बावीस अक्षरें असतात. एक ओवी ह्मणजे अभंगाचा एक चरण होतो. चार, पांच, सहा अशा ओंव्यांत एकच तत्व गुरफाटलें व शेवटच्या ओवींत कवीचें नांव घालून तें पुरें केलें ह्मणजे तोच अभंग होतो! अशा ओंव्या अमर्यादित सारख्या चालल्या ह्मणजे त्यांना अभंग न ह्मणतां ओवी ह्मणणेंच रास्त आहे. अभंग ओवीचें रूपांतर पावून झालेला आहे. मराठी कवितेचें मुख्य वृत्त ओवी हेंच आहे. कोणाचीही काव्यांत स्तुति करणें म्हणजे त्याच्या 'ओंव्या गाणें' अशी ह्मण ही मराठींत याचसाठीं आलेली आहे. तुकोबांचे 'बाळक्रीडेचे अभंग' अभंग नसून ओंव्याच आहेत. त्याचप्रमाणें पंतांचीं तीनही गीतें अभंग वृत्तांत नसून ओवीवृत्तांत रचिलीं आहेत असेंच ह्मणणें योग्य वाटतें. पंत स्वभावतः फार व्यवस्थित, टापटिपीचे असल्यामुळें त्यांनीं या २२ अक्षरी मूळवृत्ताला धरूनच हीं गाणीं केलीं आहेत. शिवाय मुली आपलीं झोंपाळ्यावर बसून ह्मणायचीं गाणीं याच चालीनें ह्मणत असत. मुलींच्या चालींत मुलींच्या धर्मशिक्षणासाठीं अगदीं सरळ व सुलभ ओंव्या पंतांनीं आपल्या पूर्ववयांत करून दिल्या, यावरून लोकशिक्षणाचा बोजा आपल्या शिरीं वाहणारांनीं फार बोध घेण्यासारखा आहे.

**यज्ञासाठीं भूमि। नांगरितां धन्या।**
**सांपडली कन्या। सीतादेवी ॥ १ ॥**

ही सीतागीताची पहिली ओवी आहे. ही मुलींच्या लोकप्रसिद्ध ओवीशीं ताडून पहावी.

**पहिली माझी ओवी । पहिला माझा नेम ॥**
**तुळशीखालीं राम । पोथी वाची ॥ १ ॥**

यांत ओवीच्या पहिल्या तीन पादांत एकेक अक्षर जास्त आहे, बाकी मुली ह्मणतांना ते बरोबर ह्मणतात. अक्षराच्या बाजूनें पाहतां ती अशी हवी:—

**पैली माझी ओवी । पैला माझा नेम ।**
**तुळ्शी खालीं राम । पोथी वाची ॥ १ ॥**

**अभंग आणि ओवी** ह्यांचा हा संबंध लक्षांत ठेवून वाचकांनीं पुढील गीतें वाचावींत.

९. प्रथम **सीतागीत** यांत सीतेनें आपल्या जावा झालेल्या बहिणींना-श्रीरामाबरोबर वनांत निघाल्यापासून तों रावणवधानंतर परत अयोध्येंत यइपयतचा—सारा वृतांत सांगितला आहे, ह्मणजे संक्षेपानें रामायणाच्या ठळक गोष्टी सांगितल्या आहेत. पंतांनीं उत्तर वयांत रामकथा परोपरीनें १०८ वेळां गायिली आहे, पण पूर्ववयांतल्या त्यांच्या या बालरामायणाला पाहूनही त्यांची धन्यता वाटते! रामाबरोबर वनांत चालतांना सीतेला जो आनंद वाटे त्याचें ती वर्णन करिते:—

**लक्ष्मण भावोजी । मागें, पुढें स्वामी,। मज आहे धामीं । ऐसें वाटे ॥११**
**जेव्हां कांहीं वाटे । चालतां मी भागें । मुरडोनी मागें । विलोकिती॥१३**
**बाई ! काय सांगों । स्वामींची ती दृष्टि । अमृताची वृष्टि । मज होय१४**

सीतेनें लक्ष्मणाला कठोर शब्दांनीं ताडण करून रामामागें पिटाळलें:—

**'वांछितोसी दुष्टा! । अग्रजाचा घात । माझ्या अंगा हात लावावया' ३८**
**ऐशी बाई! माझी । ऐकतांची वाणी । डोळां आलें पाणी । भावोजींच्या**
**मातेनें दापितां । वत्स पित्याकडे । जाय तैसें घडे । लक्ष्मणासी ॥ ४२ ॥**

रावण संन्यासी होऊन आला तेव्हां:—

**भिक्षा द्याया गेले । रेघेच्या बाहेर । सासूर माहेर । बुडवाया ! ॥ ४६ ॥**

सीताशुद्धीसाठीं मारुती लंकेंत गेल्यानंतर:—

**मज ह्मणे 'चाल, । बैस माझे स्कंधीं । तूं दुर्गा, मी नंदी । दास तुझा '**
**रावणें वानर । मानूनियां तुच्छ । पेटवीलें पुच्छ । जाळावया ॥ ११३ ॥**

---

१ या सीतागीतालाच पंतांनीं पुढें 'अभंगरामायण.' असें नांव दिलें आहे.

**पुच्छ पेटतांची । हनुमंत उडे । लंकेमध्यें बुडे । वाडे आळी ॥ ११४ ॥**
**देवांनीं वदनीं । घातली आंगोळी । लंकेची रांगोळी । पाहोनियां ॥११५**

हीं सारीं वर्णनें बायकांच्या बोलीला किती धरून आहेत! सीतागीताच्या शेवटीं पंत सांगतात:—

**श्रीरामातें गावें । श्रीरामातें ध्यावें । श्रीरामातें भावें । आठवावें ॥१७२॥**
**रामाचें चरित । अमृत-भरित । सेवावें त्वरित । सर्वांनींही ॥ १७३ ॥**
**श्रीराम दयेचा । मेघ त्या समोर । प्रेमें दास मोर । नाचतातो ॥१७४॥**

१० **रुक्मिणीगीताची** कथा अशीच गोड आहे. श्रीकृष्णाच्या प्रमुख भार्या व द्रौपदी एकदां एकत्र बसल्या असतां द्रौपदीच्या सांगण्यावरून रुक्मिणीनें आपल्या लग्नाची कथा सर्वांना सांगितली, तीच हें गीत होय. सीतागीतावरून पंतांना पुढें 'सीतारामायणा'ची कल्पना सुचली; तशीच ह्या रुक्मिणीगीतावरून पंतांना कृष्णविजयाच्या ८३ व्या अध्यायाची कल्पना सुचली. हीच कथा त्या अध्यायांत पंतांनीं आर्यावृत्तांत सांगितली आहे. तो अध्याय ह्मणजे या गीताची सुधारलेली आवृत्ति होय. श्रीकृष्णाला रुक्मिणीनें पत्र पाठवून त्वरित येण्याविषयीं काकुळतीनें विनविलें असून तो लवकर आला नाहीं. लग्नमुहूर्ताला फक्त रात्र राहिली तेव्हां तिची फार धांदल उडाली. ती ह्मणते:—

**न आले त्या दिशीं । मध्यें रात्र मात्र । चिंताज्वरें गात्र । तापविलें ॥ ३४**
**त्या रात्रीं लागला । नाहीं माझा डोळा । प्राण कंठीं गोळा । झाले होते ३५**
**जो ऐसें मन्मन । चिंतेंत राहाटे । स्फुरला पहाटे । डावा बाहु ॥ ४६ ॥**

अंबिकेच्या दर्शनाला रुक्मिणीला मोठ्या बंदोबस्तानें नेलें तरी कृष्णानें सर्वांवर मोहनी घालून सेनापेटींतून या कन्यारत्नाला उचलून नेलें तेव्हांच्या सुंदर ओव्या:—

**या कन्यारत्नाला । केली सेनापेटी । अंबिकेच्या भेटी । नेते झाले ॥५९॥**
**जगदंबेची म्यां । पूजा केली भावें । कार्य सिद्ध व्हावें । न कां मग? ॥६०**
**जे मज भोंवते । होते उभे मेले । अंबेनें ते केले । वेडे सर्व ॥ ६१ ॥**

---

१ **चिंताज्वरांत रात्रौ माझा नाहींच लागला डोळा ।**
**आयासाठीं कंठीं शतवार प्राण जाहले गोळा ॥ ३५ ॥**

२ कृष्णविजयांत डाव्या बाहूच्या स्फुरणावर पंतांनीं सुंदर उत्प्रेक्षा केली आहे.
**तों प्रिय कंठीं आपण पडोनि हेही सुखांत पाडावी ।**
**या भावेंचि स्फुरली करि माझी भुजलता कृपा डावी! ॥ ४० ॥**

**गळाली मेल्यांच्या। हातींवी हातेरें। पळांत मातेरें। झालें त्यांचें ॥६४॥**
**ज्यांच्या तेजें रवि-। शशि मालवले। ते घ्याया लवले। माळा माझी६७**
**मस्त। नेतां वीर। एक ही न बोले। वाटले ते कोल्हे। सिंह स्वामी! ॥७०**

यापुढें रुक्मिणीचा दादा व चैद्यादि खळ यांशीं बळराम व कृष्ण यांनीं जें युद्ध केलें त्याचें नामी वर्णन केलें आहे:--

**केला नसे कोणी। रामासम रण। रामास मरण। भय नाहीं ॥ ८६ ॥**
**वाहिलीं क्षौणितें। खणीत शोणितें। वर्णावें कोणी तें। महायुद्ध? ॥ ९६॥**
**वीर अभिमुख-। प्रहारें जे मेले। अप्सरांनीं नेले। वरूनी ते ॥ ९७ ॥**
**वैरी वीर बहु। रणांत गळाले। उरले पळाले। मृत्यु भयें ॥ १०० ॥**
**दादानें देखिले। स्वरक्तें रंगले। जे रणीं भंगले। चैद्यादिक ॥ १०२ ॥**
**दादानें रथाशीं। रथ मेळवीला। क्षण खेळविला। प्रभूंनीं तो ॥ १०९॥**

श्रीकृष्णानें दादाचें शीर उडवण्यास नग्न खड्ग उचललें तेंव्हां रुक्मिणीनें ' घातली लाजूनी। मिठी पायीं. ' यावर दयाळु श्रीकृष्ण:--

**सोडोनियां कोप। सकळ वळले। न कळवळले। कोणा आर्ती?॥११६॥**

श्रीकृष्णस्वभावाचें वर्म रुक्मिणी सांगते:--

**स्वामींची दुर्जनीं। उग्रता बाहेर। मानस माहेर। करुणेचें! ॥ ११२ ॥**

सर्व सुजनांनीं व भाविकांनीं ही कथा अवश्य वाचावी. कारण ' लावी धर्मन्यायभक्तिज्ञानपथा। स्वयंवर कथा रुक्मिणीची. '

**११ सावित्री गीत** हें या दोनही गीतांहून अधिक मधुर आहे. मूळ कथाच अत्यद्भुत, करुणरसयुक्त व अतीव पावन आहे व पंतांची प्रतिभाही हें गीत गातांना उज्वल झाली होती. मूळांतही गोडी व पंतवाणींतही गोडी, यामुळें ही कथा गोडच गोड झाली आहे. वटसावित्रीव्रताच्या प्रसंगीं सर्व कुलस्त्रियांनीं सदर गीत ध्यानपूर्वक ह्मणावें. या गीतांत सावित्रीचा दृढनिश्चय, तिचें पातिव्रत्य, तिचा सदाचार, तिचें धारिष्ट, व मुख्यत: यमधर्माशीं तिनें केलेला चातुर्यविनययुक्तियुक्त संवाद, हे प्रसंग कवीनें अत्युत्कृष्ट वर्णिले आहेत. मद्रदेशाचा राजा अश्वपति ' सावित्री देवीचें करी आराधन। देहदाराधन समर्पूनी. ' देवीप्रसादानें त्याला ' पुत्रशताहूनि धन्या ' अशी

---

**१ माळा ऊचलितां प्रिय आपणहि रथावरूनियां लवला।**
**लव लागेना तों घे अंकीं करुणासमुद्र कालवला ॥ ७५ ॥**
**कृष्णविजय अ. ८३**

ही कन्या झाली. रूपें गुणें ही अति दिव्य असल्यामुळें हिला कोणीही मागण्यास धजेना. तेव्हां राजानें तिला आपला नवरा पाहण्यास पाठविलें, व ' शोधी ती मानेसा । नवरा जीवाला । नव राजीवाला । जशी भृंगी. ' तिनें सत्कुल व सद्गुण यांजकडे लक्ष देऊन राज्यभ्रष्ट झालेल्या द्युमत्सेनाचा पुत्र सत्यवान् ' वरिला तो पति भावें मनें. ' अश्वपतीच्या दरबारीं अकस्मात आलेल्या नारदानें त्यास सांगितलें कीं ' त्या गुणमंदरा । वर्षमात्र आयु । जातां काळवायु । उन्मळील ! ' राजानें सावित्रीला दुसरा वर पाहण्यास सांगितलें, तरी " सावित्री ह्मणे जो । वरिला मीं मनें । तोचि गुरुजनें । मज द्यावा." सावित्रीला अखेर इष्टवर मिळाला, सत्यवानाशीं तिचा विवाह झाला.

आपल्या अंतःकरणांतलें शल्य सासू सासरा व पति यांच्या दृष्टीस यत्किंचितही न पडूं देतां तिनें एक वर्ष वनांत त्यांच्यासह सुखानें काढिलें. पंतांनीं तिच्या सदाचाराचा निर्मल आरसा मुलींपुढें ठेविला आहे. त्यांनीं दहाच ओव्यांत तिचें सच्चरित्र इतकें बहारीचें वर्णिलें आहे कीं स्त्रियांना याहून उज्ज्वलतर कित्ता पुढें ठेवायला अन्यत्र कोठेंही मिळणार नाहीं! किंबहुना पंतांनीं या दहा मोत्यांची गळसरी आपल्या आर्यभगिनींच्या गळ्यांत घातली आहे, ती त्यांनीं अक्षय्य आपल्या गळ्यांत ठेविली तर ' कल्याणा गणती नाहीं त्यांच्या. ' ती गळसरी ही:—

**हर्षली पावोनी । जशी सती भर्गा । वनाहूनि स्वर्गा । तुच्छ मानी ॥८१॥**
**तशीच सावित्री । आनंदली मनीं । क्रीडे तपोवनीं । पतिसंगें ॥ ८२ ॥**
**वांटी बहु, स्वल्प । वस्त्र नग ठेवी । वल्कलें तो देवी । सुखें नेसे ॥८३॥**
**श्वशूराची आज्ञा जशीच वेदाची । तिळही भेदाची । बुद्धि नाहीं ॥८४॥**
**कुळदेवताची । ती श्वश्रु मानिली । पूजिली वानिली । सावित्रीनें ॥८५॥**
**केवळ अतिथी- । अभ्यागत बाळ । करि प्रतिपाळ । माता सती ॥ ८६ ॥**
**मानियेला शाक- । फळ-मूळ-कंद- । रसांहूनि मंद । सुधारस ॥ ८७ ॥**
**बोलावें सस्मित । मृदु परिमित, । सत्य, प्रिय, हित, । बोलबिल्या॥८८॥**
**सर्वांच्या मागूनी । तृणशय्येवरी । सुखें निद्रा करी । उठे आधीं ॥८९॥**
**एकांतीं पतीचें । हृदय रमवी । संताप शमवी । सेवाधर्मे ॥ ९० ॥**

संतोषवृत्ति, गुरुशुश्रूषा, आतिथ्य, मंजुभाषण, व पतिसेवा या आर्य कुलीन स्त्रीगुणांची मूर्ति जी सावित्री तिच्याहून उज्जलतर स्त्रीरत्न त्रिभुवनांत

दुसरें कधींही झालें नाहीं! अवधीचे तीन दिवस उरले तेव्हां सावित्रीनें त्रिदिनव्रत करून चवथ्या दिवशीं सकाळीं त्याची समाप्ति केली व सारा दिवस पतिसंगांत घालावयाचा निश्चय करून अस्तमानीं पारणें फेडावयाचा विचार केला. सत्यवंत खांद्यावर कुऱ्हाड टाकून रानांत जाऊं लागला तेव्हां:–

**सावित्री ह्मणे, 'जी। मीं येत्यें वनाला। वियोग मनाला। न सोसवे'॥**

सत्यवंत ह्मणाला, 'तूं उपोषित आहेस, शक्तिहीन झाली आहेस, कानन दुःखद आहे, व तुझीं पाउलें मृदु आहेत तर घरींच रहा.' तेव्हां:–

**सती ह्मणे,'मज। दुःखांतची सूख। तुमचें श्रीमुख। विलोकितां'॥११८॥**
**सत्यवंत ह्मणे;। 'कांते! न रुसावें। तुवां हें पुसावें। वडिलांस'॥१२०॥**
**सासूसासऱ्यांतें। ह्मणे, 'न कोपावें। मज हें ओपावें। वरदान॥ १२१॥**
**फळें आणावया। जातांना वनांत। माझ्याही मनांत। वाटे जावें॥ १२२॥**
**वर्ष झालें आल्या। सोडूनि माहेर। आश्रमाबाहेर। गेलें नाहीं'॥ १२३॥**

मोठ्या मिनतवारीनें वडिलांची आज्ञा घेऊन 'धैर्यें हृदयातें धड करून' सावित्री पतीसंगें वनांत गेली व तेथें:–

**पतीच्या सुखार्थ। बळें आणी हास्य। मयूरांचें लास्य। विलोकूनी॥१३०॥**
**विनोद वचनें। पतीतें डोलवी। दाटूनी बोलवी। पुण्यकथा॥ १३१॥**
**एके नेत्रें प्रिया। एके नेत्रें काळा। पाहे राजबाळा। हृष्टा-भीता॥ १३२॥**

लांकडें तोडतां तोडतां सत्यवंताच्या मस्तकीं शूळ उठला व तो सतीच्या मांडीवर डोकें ठेवून निजला तेव्हां तिला वाटलें 'आला ठोकताळा। भविष्याचा.' यमधर्मानें त्याच्या कंठांत पाश घातले व 'पुरुष काढितां। अंगुष्ठप्रमाण। निष्प्रभ निष्प्राण। देह झाला' (१५५). यानंतर सावित्री व यमधर्म यांचा संवाद(१८०–२४०) होऊन सावित्रीनें यमधर्माला कांहीं युक्तीनें व कांहीं भक्तीनें जिंकून त्याजपासून पांच वर मागून घेतले व पतीचे प्राण परत आणले. सावित्रीच्या भाषणांत अद्भुत चातुर्य, गौरव व धर्मज्ञान ओतप्रोत भरलें आहे.

प्रथमच यमधर्मानें तिला परत जाण्यास सांगून पतीची सांग क्रिया करण्यास सांगितलें तेव्हां:–

**सावित्री ह्मणे, 'गा!। देहासवें छाया। जशी तशी जाया। पतिसवें॥१६३**
**प्राण जाऊं द्यावे। पति न सोडावा। स्वधर्म जोडावा। मुख्य हाची'॥१६४**

तिच्या संवादचातुर्यानें यमधर्म परम संतोष पावला. पंत ह्मणतातः 'ती सती मुरली । गाय कृष्णसार । काय कृष्णसार । यमधर्म !' ( २१४ ) 'आपल्याला शंभर पुत्र सतीव्रतस्थ राहून मिळावे' हा वर तिनें मागितला, तो तिच्या संभाषणचातुर्याला भाळलेल्या धर्मराजानें पटकन् दिला, आणि मग सावित्रीला धीर येऊन तिनें वक्तृत्व चालविलें:-

**साध्वी ह्मणे देवा! । जी धर्मसंतती । इच्छिती संत तो । धर्मासाठीं २१८**
**संतांची शाश्वत । धर्मी चित्तवृत्ती अधर्मी प्रवृत्ति । स्वप्नीं नसे ॥२१९॥**
**संतांपासूनीयां । संतां भय झालें । असें कानां आलें । नाहीं कधीं॥२२२**
**संत चालवीती । सत्यें तरणीतें । तपें धरणीतें । धरिताती ॥ २२३ ॥**
**प्रसाद शाश्वत । अर्थ बहुमान । यांचें मूलस्थान । संत तुह्मीं ॥ २२६ ॥**

या बोलण्यावर यमधर्म फारच संतुष्ट झाला व 'पांचवा वर माग' असें ह्मणाला, तेव्हां तिनें 'स्वसत्य सांभाळा । मत्पति वांचवा' हाच वर मागितला. यमधर्म चकित झाला, व 'धर्म ह्मणे बाई ! प्रताप हा भला । जिंकिलें त्वां मला । पतिव्रते !' ( २३९ ). सावित्री आपला भर्ता घरीं घेऊन आली, तिचे सर्व वर मिळाले, पतिसह तिनें चारशें वर्षे राज्य केलें. सावित्रीची कथा गाणाऱ्या स्त्रिया इहपरलोकीं पतिसुख भोगितील, कारण पतिव्रतेचा महिमाच असा आहे कीं 'पतिव्रता तरे । पतिव्रता तारी । पतिव्रता नारी । जगदंबा' ( ३०७ )

**१२ मदालसाचरित:**—पंत तिमरें सावित्रीगीत गात होते, तेव्हां चवथ्या एका सतीचें चरित्र वाचण्यांत ते गुंग झाले होते. मार्कंडेयपुराणांत मदालसेची पवित्र कथा ( अ० १८-३३ ) वर्णिली आहे, ती तेव्हां पंत वाचीत होते. सावित्रीगीतांत ( ओवी १७४ ) यमधर्मानें सावित्रीचें गौरव केलें तेव्हां 'तूंही मदालसेसारखीच धन्य आहेस!' असें यमधर्मानें ह्मटल्याचें सांगितलें आहे. मार्कंडेयपुराणाची ताजी कथा डोळ्यांपुढें असल्यामुळें पंतांना सहज मदालसेचा दृष्टांत आठविला. सावित्रीगीत संपल्यावर पंतांना मदालसेचें गीत गाण्याची इच्छा झाली, मात्र तें वरील तीन गीतांच्या चालींत न रचितां आर्येंत रचण्याची त्यांना बुद्धि झाली. पंतांनीं सारी मदालसाकथा ६ अध्यायांत ( आर्या ३३३ ) वर्णिली आहे. मीं मूळ मार्कंडेयपुराणांतली कथा पंतांच्या कथेशीं पद्यशः ताडून पाहिली आहे. संस्कृतपुराणांतून सदर कथा मराठी काव्यांत आणतांना पंतांनीं कोणतें धोरण पुढें ठेविलें होतें तें

ह्यायोगें समजलें. पुराणांचा हेतु कथेचें मिष करून धर्मशास्त्रादिकांचा बोध करायचा असतो. पंतांनीं मधले उपदेशपर विस्तार अजिबात गाळून सरळ गोष्ट तेवढी घेऊन ती काव्यरूपानें सांगायची पद्धत स्वीकारली आहे. मूळांतून कथा तेवढी घेऊन ती अलंकारादिकांनीं नटवून तिला पंतांनीं काव्याचें मनोहर रूप दिलें आहे. संस्कृतासारख्या कठिण भाषेंतले किंवा इंग्रजीसारख्या परकीय भाषेंतले विचार मराठीसारख्या लोकांच्या बोलण्याचालण्याच्या सोप्या भाषेंत आणतांना असेंच धोरण ठेवायला पाहिजे. मदालसेची कथा मनोरम आहे. गंधर्वकन्या मदालसा परम रूपगुणवती होती. तिला एका राक्षसानें पळवून उद्यानमंदिरांत नेऊन ठेवलें. ऋतुध्वज नांवाचा एक सर्व सुलक्षणसंपन्न राजपुत्र होता, त्याला यज्ञविघ्ननिवारणार्थ गालवमुनींनीं बोलाविल्यावरून तो वनोपवनें रक्षीत चालला. सूकररूपानें फिरणाऱ्या वरील राक्षसाचा त्यानें वध केला. नंतर तो उद्यानांत शिरला व मदालसेला पाहता झाला. उभयतांची दृष्टादृष्ट झाली व उभयतां काममोहित होऊन त्यांचा गांधर्वविवाह लागला. ऋतुध्वज भार्येसह परत स्वनगरीस आला व मोठा आनंद करिता झाला. तो पुनः यज्ञद्विजरक्षणार्थ पृथ्वीवर हिंडत असतांना त्या राक्षसाच्या भावानें कपटमुनिवेष धरून त्याचें कंठभूषण मागून घेतलें, व परभारें त्या ऋतुध्वजाच्या राजधानींत जाऊन राजपुत्र मेल्याची खोटीच बातमी राजाला सांगितली. सर्व नगरी शोकग्रस्त झाली व मदालसेनें तात्काळ प्राणत्याग केला. ऋतुध्वज परत आला तेव्हां त्याला सर्व कपट समजून आलें, मदालसेसाठीं त्यानें मोठा शोक केला, व तिच्याशिवाय अन्य भार्या न करण्याची प्रतिज्ञा करून वैराग्यशील बनला. त्या राजपुत्राच्या शेकडों मित्रांत नागराजाचे दोन पुत्र होते, त्यांनीं हा वृतांत पाताललोकीं जाऊन आपल्या बापास सांगितला. नागराजानें शिवाराधना करून मदालसा कन्या मागून घेतली. ऋतुध्वजाला नागराजानें आपल्या नगरीं पाचारण करून नेलें, मोठा उत्सव केला व 'वर माग' ह्मणाला; तो ह्मणाला 'धनधान्यादिकांनीं माझें राज्य संमृद्ध आहे, मला पितृकृपेनें कांहीं उणें नाहीं;' पण त्याचें अंतर्यामींचें दुःख जाणून नागराजानें मदालसेला पुढें उभी केली, तिला पाहतांच ऋतुध्वज मोहव्याप्त झाला. नागराजानें खरी गोष्ट सांगून मदालसा त्याचे स्वाधीन केली. आपल्या पुनर्लब्ध भार्येसह ऋतुध्वज स्वनगरीं आला व सुखानें राज्य करूं लागला. त्याला चार पुत्र झाले, पण प्रत्येक पुत्राला

जन्मतांक्षणीं मदालसा वैराग्योपदेश करून ब्रह्मपरायण करी. तीन पुत्र याप्रमाणें विदेही झाले. चवथा पुत्र 'अलर्क' जन्मतांक्षणीं राजानें क्रोधानें मदालसेला सांगितलें कीं याला वेदांत सांगून प्रवृत्तिमार्गच्युत करूं नकोस. मदालसेनें पत्याज्ञेनें अलर्काला व्यवहारराजकारणपटु केलें. त्यानें कित्येक वर्षे राज्य केलें. तोही मातृप्रसादानें आपल्या तीन भावांप्रमाणें अंतीं ब्रह्मपरायण झाला. महासती मदालसा इचें हें संक्षिप्त चरित्र आहे.

१३ मार्कंडेयपुराणांत मदालसा व तिचा पुत्र अलर्क यांची कथा २५ अध्यायांत विस्तारानें सांगितली आहे. मदालसेनें आपल्या पुत्राला जो बोध केला तो धर्मशास्त्रप्रवण सज्जनांना मान्य होणारा आहे, तो सर्व भाग पंतांनीं गाळला आहे, पुढें अलर्काला श्रीदत्तांनीं वेदांत पढविला, तोही भाग पंतांनीं सोडून दिला आहे, व पंतांनीं पहिले सात आठ अध्याय घेऊन त्यावर मदालसाचरित्र रचिलें आहे, पंतांच्या पदरचा भाग त्यांत कांहीं नाहीं. त्यांनीं मूळ कथेंत बिलकूल फरक केला नाहीं, फक्त वर्णनसंक्षेप करण्यांत व कथाभाग मनोरंजक करण्यांत त्यांनीं जागोजाग अनुपम चातुर्य प्रकट केलें आहे. पंतांनीं हाही ग्रंथ सदाशिव पाध्ये यांच्या सूचनेवरून रचिला आहे असें 'श्रीमद्गुरुपुत्रांहीं आज्ञा केली निरोप पाठउनीं' या आर्यार्धावरून स्पष्ट होतें:-

प्रस्तुत कथा इतकी गोड आहे कीं, तिच्या आधारें एक उत्कृष्ट दृश्यकाव्य ऊर्फ नाटक रचितां येईल. पंतांनीं संस्कृत नाटकें वाचलीं होतीं, व त्यांना नाटकांची गोडीही होती. वरील सारखें सुंदर कथानक लाभूनही त्यांनी त्यावर नाटक रचिलें नाहीं याबद्दल थोडेंसें आश्चर्य वाटतें. अथवा त्यांची बुद्धि परमार्थप्रवण व महाकाव्यक्षम असल्यामुळें तिला ही दिशा लागली नाहीं असेंच म्हटलें पाहिजे. पंतांना वरील कथानक मौजेचें वाटून तें त्यांनीं मराठींत आणलें, हें त्यांच्या त्या वेळच्या तारुण्याला, कल्पनशक्तीला, व सुबुद्धीला योग्यच होतें:—नायकनायिकांच्या प्रथम भेटीचा प्रसंग पहा:—

**रत्नकनकपर्यंकीं पाहे तो रतिसमा नवी रमणी ।**
**अवलोकिला तिणेंही सहसा हा स्मरसमान वीरमणी ॥ ११ ॥**
**पर्यंकावरुनि उठे त्यातें अवलोकितांचि ती मोहे ।**
**जळपवनाद्युपचारें स्वस्था तीची सखी ह्मणे हो हे ॥ १२ ॥**
**निजवृत्त सांग सुमते ! येथें आलासि कोणत्या कार्या ।**
**तूं कोण देव किंवा दानव गंधर्व नाग कीं आर्या ॥ १३ ॥**

ऋतुध्वजानें आपला सर्व वृतांत व मुख्यतः राक्षसवधाची गोष्ट सांगितली

श्रवण असें होतां ती हर्षे लाजे मदालसा कन्या।
वदनीं सुस्मित राहे पाहे स्वसखीमुखाकडे धन्या ॥ ४२ ॥

शेवटीं त्यांचा गांधर्वविवाह झाला तेव्हां वधूसखीनें उभयतांना सुंदर बोध केला. मूळांत फक्त वरालाच बोध केला आहे. ती ह्मणाली:—

" पति परमेश्वर याच्या भजनीं अनुकूलबुद्धि हो, भावें।
लोभावें न तनुसुखीं, त्यां संपादुनि कीर्ति शोभावें " ॥ ५४ ॥
त्या नृपपुत्राहि ह्मणे. 'तुज सर्वज्ञासि काय शिकवावें'।
स्नेहें वदत्यें, " स्त्रीसह पुरुषार्थत्रय जपोनि पिकवावें ॥ ५५ ॥
दोघे चिरकाळ तुह्मी सतत सुखें पुत्रपौत्रसह नांदा।
तुमच्या यशासि सज्जन सेवृन चकोर ते जसे चांदा " ॥ ५७

विवाहोत्तर:—

क्षितिपर्यटन करुनि तो स्वजनीं करि अमृतवर्ष वीरमणी।
क्रीडुनि रम्योपवनीं मणिभवनीं बहुत हर्षवी रमणी ॥ ६५ ॥

ऋतुध्वज राजपुत्र मेल्याचें खोटें वृत्त ऐकतांच 'प्रियशोकें प्राणांतें तत्काळ सती मदालसा सोडी.' राजा व राणी यांनींही मुनिमखरक्षणार्थ जपतांना राजपुत्र मेला हें ऐकून आनंदच मानला. ऋतुध्वज परत आल्यावर त्यांस खरी हकीकत कळली तेव्हां फार शोक झाला ( अ. ३ ) :—

चित्तीं नृपपुत्र ह्मणे, " मजकरितां त्यागिला स्वकाय जिणें।
तीच भली, धिक् कठिना मातें ! हें श्लाघ्य होय काय जिणें ? ॥ ३ ॥
उत्तरकार्य करी मग नृपसुत डोळे करूनियां ओलें।
' म्यां स्त्री मदालसान्या न वरावी ,' निश्चयें असें बोले ॥ ७ ॥

राजपुत्रानें ' जीवित ताताधीन ' पडल्यामुळेंच केवळ धारण केलें. एका जन्मांत तरी मनुष्यानें एकाच भार्येवर प्रेम करावें हें जें वरील गोष्टीचें रहस्य, तें प्रथम पत्नीच्या तेराव्याला पुन्हां मुहूर्त पाहणाऱ्या व एकपत्नी असूनही अनेक स्त्रिया करणाऱ्या नृशंस पुरुषाधमांनीं लक्षांत ठेवावें ! नागेंद्रानें ऋतुध्वजाला वर मागावयास सांगितलें तेव्हां तो पुरुषवर ( अ. ४ ) ह्मणतो:—

द्यावा अवश्य वर हे चित्तीं तरि-हेतु सर्वशर्मांचा।
हृदयांतूनि न जावा माझ्या संस्कार पुण्यकर्मांचा- ॥ १० ॥

नागेंद्रकृपेनें मदालसेचें पुनर्दर्शन होतांच राजपुत्राची जी अवस्था झाली तिचें हृदयंगम वर्णन कवीनें केलें आहे. मदालसेची सुमाता म्हणून पंतांनी फार योग्यता वर्णिली आहे. आयांना मुलाला सन्मार्ग शिकवायला किती उत्कृष्ट संधि असते ? मदालसेची पुत्रशिक्षणपद्धति वाखाणतांना पंत म्हणतात ( अ ५ ) :—

**स्तन पाजितां निजवितां हालवितां बाळकासि खेळवितां ।**
**दे बोध, जो सुदुर्लभ थोरांसि सहस्रकल्प मेळवितां ! ॥ १३ ॥**

ह्या आर्येत पंतांनीं सन्मातेचें किती मनोहर चित्र काढलें आहे! थोराला ही हजारों वर्षांच्या ग्रंथाध्ययनानें, अवलोकनानें, व स्वबुद्धिसामर्थ्यानें जो धर्मनीतिबोध होणें दुर्घटआहे तो सन्मातेपासून बाळाला तो स्तनंधय आहे तेव्हांपासून सहजासहजीं मिळतो! एकाबाईनें एका प्रसिद्ध धर्मगुरूस एकदा विचारिलें ' महाराज ! मुलाला शिक्षण द्यावयाला कोणत्या वयापासून प्रारंभ करावा ?' धर्मगुरूनें विचारिलें, 'बाई ! तुमच्या मुलाचें वय काय आहे?' बाईनें मुलाचें वय चार वर्षांचें आहे म्हणून सांगितल्यावर तो आश्चर्यचकित होऊन म्हणाला, ' काय ? तुम्ही अद्याप आपल्या लेकराला शिक्षण द्यायला लागला नाही तर मग तुम्ही त्याच्या वयाचीं चार वर्षें फुकट घालविलीत ! मुलानें डोळे उघडून आईच्या तोंडाकडे पाहण्यास सुरवात केली कीं लागलीच त्याच्या शिक्षणास प्रारंभ झाला पाहिजे !!' ' स्तन पाजितां निजवितां हालवितां बाळकांसी खेळवितां ' आईला आपल्या मुलाना शिक्षण देतां येतें. जिजाबाईनें शिवरायाला वीररसाचें दूध केव्हां पाजलें ? नेपोलियनाला वीरधर्म शिकायला त्याच्या आईनें कोणत्या शाळेंत पाठविलें होतें? ज्ञानेश्वराला कोणत्या गुरूपाशीं रुक्मिणीबाईनें ठेवलें होतें ? नेपोलियन कृतज्ञतेनें नेहमी म्हणे कीं ' माझा मोठेपणा हा माझ्या आईच्या सुशिक्षणाचें फळ आहे. ' अमेरिकेतील संयुक्त संस्थानांचा अध्यक्ष आडाम्स एकदा मुलींच्या शाळेंत बक्षिसें वाटतांना गहिंवरून म्हणाला कीं ' माझ्या योग्यतेचें मूळ माझ्या आईनें मला बाळपणीं जें शिक्षण दिलें त्यांत आहे. तिनें जन्मापासून धर्माचीं व नीतीचीं तत्वें मोठया ममतेनें हंसत खेळत माझ्या मनावर बिंबविली होतीं म्हणूनच आज या मानाला मी पात्र झालों आहें. ' जगांत जे जे थोर पुरुष झाले त्या सर्वांना थोर गुणांचें बाळकडू त्यांच्या आईनेंच पाजिलें होतें असें इतिहासावरून दिसतें. अलीकडे धर्मनीतीचें शिक्षण शाळांतून मिळावें

ह्मणून कांहीं ठिकाणीं ओरड चालली आहे. शिक्षणाची वस्तुत: उत्कृष्ट शाला ह्मणजे घर होय व त्यांतही मुलाचा स्वाभाविक गुरु ह्मणजे त्याची आई होय. तिला मुलाला हांसत खेळत सर्वकाळ सुशिक्षण देतां येतें. असो.

मूळांत मदालसेनें अलर्काला जो बोध केला तो दहा अध्यायांत कथन केला आहे, पण पंतांनीं असा विस्तार न करितां त्या सर्वांचें मंथन करून वरील आर्यारूपीं एकच दिव्य रत्न बाहेर काढलें आहे. पंतांनीं कथेपुरता मूळ पुराणाचा आधार घेऊन त्यावर स्वतंत्र आख्यान रचिलें आहे. पद्याला पद्य जुळवून भाषांतर करायचें कामहा सोपें नाहीं, पण पंतांनीं तसें न करितां स्वतंत्रपणानें, तारतम्य ठेवून मूळ संस्कृत ग्रंथांच्या आधारानें प्राकृत काव्यें रचिलीं आहेत. मूळांत ऋतुध्वजाच्या गुणवर्णनांत कित्येक श्लोक दिले आहेत, पंतांनीं त्यांचा सारांश मनांत घेऊन ' सुगुणकेलिसद्म '–सद्‌गुणांचें क्रीडास्थान–या एका विशेषणानें आपलें काम भागविलें आहे. शिवाय तो राजपुत्र होता हें ध्यानीं आणून:—

**त्याचा पुत्र ऋतुध्वज वरगुण जैसा जयंत शक्राचा ।**
**मदहर गजयूथांचा सिंह तसा तो स्वशत्रुचक्राचा ॥ १ ॥**

या प्रमाणें दोन पदरच्या समर्पक उपमा घालून त्याच्या शौर्याचें वर्णन केलें आहे. भाषांतर किंवा रूपांतर करतांना असा तारतम्यभाव पंतांनीं नेहमीं प्रकट केलेला आहे.

१४ **हरिश्चंद्राख्यान**. (अ० ९आर्या२७६). हें आख्यान पंतांनीं मार्कंडेयपुराण अ० ७।८।९ मधून घेतलें आहे. सत्वधीर आर्यनृपतीचें हें चरित मूळांतच अति उदात्त व करुणरसपूर्ण आहे. मराठींत पंतांच्या पूर्वी मुक्तेश्वर विष्णुदासेनामा, व श्रीधर यांनीं हें गायिलें होतें. श्रीधराची बायाबापड्यांना सुद्धां समजणारी पण जाणत्या नेणत्या सर्वांना रडवणारी साधी रसाळ वाणी; मुक्तेश्वराची प्रतिभासंपन्न, प्रौढ, व भव्यवर्णनचातुर्यानें दिव्य चित्रपट उभारणारी तेजस्वी वाणी; व मनुष्यस्वभावाची विविधछाया स्पष्ट उमटविणारी, व आर्यसमाजाचीं मूलभूतरहस्यें व श्रेष्ठांचे अंतर्गत व्यापार खुबीनें व्यक्तकरणारी कोमल, करुणामय व चित्तोन्नतिकर अशी पंतांची वाणी या तीन भिन्न भिन्न पण आपापल्यापरीनें अत्यंत मनोहर व हृदयंगम वाक्शक्ति समरासि-

१ अभंगवृत्तांत. २ पांडवप्रताप. अ० ३०.

कत्वानें जाणायची कोणास इच्छा असेल तर त्यानें तिघांचेंही हरिश्चंद्राख्यान वाचावें. श्रीधर व मुक्तेश्वर यांनीं मूळ पुष्कळ वेळ सोडून आपल्या कल्पनाशक्तीच्या व खवळलेल्या मनोवृत्तींच्या छंदानें स्वतंत्र वर्णनें दिलीं आहेत. पंतांनीं मूळाला यत्किंचित सोडलें नाहीं. एखादा दृष्टांत किंवा उपमा योजण्यांत, किंवा थोडा संक्षेपविस्तार करण्यांत किंवा कथेचें किंवा एखाद्या विशिष्ट प्रसंगाचें रहस्य प्रकट करण्यांत त्यांनीं आपल्या बुद्धीचा व कवित्वशक्तीचा उपयोग केला आहे, एवढें लक्ष्यांत बाळगलें ह्मणजे पंतांचें हरिश्चंद्राख्यान हें मूळाचें शुद्ध व सरळ पण अति मार्मिक व खुबीदार भाषांतर आहे असें स्पष्ट दिसतें. श्रीधर मनोवृत्ति हालवून सोडतो, मुक्तेश्वर दिव्यवर्णनाच्या प्रचंड ओघांत मनोवृत्ति पार वाहून नेतो, पंत कोमल पण उदात्त विचारांच्या प्रवाहांत चित्तवृत्ति रंगवून स्तिमित करितात. श्रीधर रडवितो, मुक्तेश्वर दिपवितो व पंत रमवितात. तिघेही कवि सर्वांस प्रिय व वंद्यच आहेत. आबालवृद्धांना श्रीधर प्रिय होतो, काव्यरसज्ञांना मुक्तेश्वर वंद्य वाटतो व व्युत्पन्नरसिकांना पंतांची धन्यता वाटते. वस्तुतः तिघेही श्रेष्ठ, सरस, बुद्धिमंत व आत्मतत्वाला स्पर्श करून आल्यामुळें भगवद्दयापात्र झालेले व अतएव प्रासादिकच आहेत.

१५ हरिश्चंद्राची कथा विश्रुतच आहे. तो व त्याची भार्या तारामती यांचा विश्वामित्रानें फार छल केला व तो त्यांनीं अद्भुत धैर्यकवच अंगावर घालून आनंदानें सोसला, पण ते आपल्या सत्वापासून तिळमात्र ढळले नाहींत. हरिश्चंद्र अयोध्येचा राजा होता. त्याजपासून विश्वामित्रानें प्रथम भूमिदान घेतलें व मग दक्षिणा मागितली. राजापाशीं कांहीं देण्यास नसल्यामुळें राणीला त्यानें दासी ह्मणून एका ब्राह्मणास विकली व स्वतः डोंबाच्या घरीं राहिला. तेथें तो प्रेतावर्गाल मसणपट्टी वसूल करण्याच्या कामावर राहिला. तेथें कित्येक दिवस परम क्लेशांत काढल्यावर एकदां त्याची राणी आपल्या सर्पदष्ट पुत्राचें शव घेऊन तेथें आली. राजाचें चित्त एका भयंकर दुःस्वप्नामुळें व्यथित झालें होतें. इतक्यांत हा प्रकार पाहून व काळानें वंशतंतु उपटून काढल्याचें पाहून त्याला परम दुःख झालें व उभयतां मरायला सिद्ध झाले इतक्यांत यमधर्म (हाच डोंब झाला होता) व इतर देव राजावर प्रसन्न झाले व प्रजांसह त्याला स्वर्गाला घेऊन गेले. हरिश्चंद्र सत्वाला जागला. असा सत्वधीर पुरुष रामराजाच्या पूर्वजांत झाला. पंतांनीं ह्मटलें आहे:—

**ज्या शाणघर्षणादिक संस्कार-चढे गुणासि तोचि मणी ।**
**यश सारिकाचि पावे, पंजरबद्धाहि काय हो चिमणी ? ॥ अ०५-२३॥**

सहाणेवर घर्षणादि प्रसंग ज्या हिऱ्याला येतात तोच मोल पावतो. "हिरा ठेवितां ऐरणी । वांचे मारितां जो घणी.' पिंजऱ्यांत पडायचे प्रसंग सारिकेलाच येतात. चिमणीला कोण पिंजऱ्यांत टाकतो ? 'बलवत्तर विधि देतो थोरला थोरल्याचि तापातें !' प्रस्तुत काव्यांत पंतांनीं करुणरसाची शिकस्त करून सोडली आहे. निष्कंटक राज्यश्री विश्वामित्राला समर्पिल्यावर राजापाशीं कांहीं राहिलें नाहीं व ' संपन्न मित्र असते, तरि येतें संकटांत कामातें ' असा कांहीं विचार करीत व धायीं धायीं रडणाऱ्या पौरांचें तो सांत्वन करीत आहे:—

**तों मुनि येऊनि सहसा, धिक्कार करुनि ह्मणे, रहातोस ! ' ।**
**मंत्र करिसि पौरांसी ? राज्य दिलें घ्यावया पहातोस ? ॥ अ० १-४०॥**

राजा गांगरून अधोमुख बसला असतांना त्याची धैर्यशालिनी राणी ह्मणत्ये:—

**राया ! या संसारीं बुध, संरक्षावयासि सत्य, जिती ।**
**सर्वस्व त्यजिती परि सत्य स्वप्नींहि साधु न त्यजिती ! ॥ अ० २-१४॥**

तारामतीनें अडखळत राजाला सुचविलें कीं—

**झालें अपत्य मजला, इच्छुनि फळ हेंचि करिति बुध भार्या ।**
**ह्मणुनि मज विकुनि, घेउनि धन, द्यावी दक्षिणा तया आर्या ॥ अ.२-१९**

ही राणीची कठोर पण थोरपणाची मसलत ऐकून राजा मोहव्यास झाला:—

**दयिते ! असें कसें गे अश्राव्य अवाच्य वाक्य वदलीस ।**
**कर्पूर जीस व्हावा, झाला गर त्या तशाहि कदलीस ? ॥२-२१ ॥**

विश्वामित्रानें दक्षिणेचा तगादा लावला व ह्मणतो:—

**सत्यें हा रवि तपतो, सत्यें भूमि प्रतिष्ठिता जाण ।**
**सत्यांत पुमर्थ सकळ, सत्यचि जीवांसि पवितनुप्राण ॥ अ. २-३२ ॥**

' सूर्यास्ताच्या आंत दक्षिणा दे नाहीं तर शापून भस्म करीन ' अशी भीति विश्वामित्रानें घातली व:—

---

१ **मूळः—सत्येनार्कः प्रतपति, सत्ये तिष्ठति मेदिनी ।**
**सत्यं चोक्तं परो धर्मः स्वर्गः सत्ये प्रतिष्ठितः ॥ अ० ८-३५ ॥**

**गेलों यापरि गाधिज आधिजलधिमाजि भूप बुडवून।**
**ने शापभीति वात्या तद्धैर्यतृणासि दूर उडवून ॥ अ० २-३५ ॥**

राजाचा मोह दूर करून राणीनें धैर्यानें त्याला सांगितलें की सत्य प्रतिपालन कर, व 'रक्षी स्वपूर्वजांच्या अतुला शुद्धा महायशा! पावे.' अहाहा! याचें नांव धर्मपत्नी. आर्यस्त्रियांना केवढा हा उदात्त व वळणदार कित्ता तारामतीनें घालून दिला आहे? संकटांत घाबरलेल्या पतीला धैर्य देऊन, स्वविक्रयासारखा पूर्ण स्वार्थत्यागाचा उपाय सुचवून, त्याला पूर्वजयशरक्षण करून सत्यप्रतिज्ञत्व कायम ठेवण्याचा सल्ला देणाऱ्या बाई तारामती! तुला महापातकनाशन अशा महासतींच्या पंचायतनांत लोकांनीं उगीच नाहीं बसविलें! कठोर मन करून 'स्पष्ट, नृशंस, अमानुष, राक्षस, त्याहूनि पापतर आहे' या प्रमाणें आत्मधिक्कार करून राजानें राणीला ब्राह्मणास विकली, तेव्हां:—

**विप्रें ओढुनि नेतां, शिशु शोकें ह्मणुनि 'अंब! अंब!' रडे।**
**झोंबे वस्त्रासि, मनीं फोडी ती मायगाय हंबरडे ॥ अ० २-४९॥**

अत्युष्ण श्वास सोडून राणी आपल्या रोहिताश्व पुत्रास ह्मणते:—

**ये बा! दूरुनिच पहा, राजसुता! आतळे न आंगा तें।**
**झाल्यें दासी मीं कीं, नातें पहिलेंचि धरिसी कां गा तें?॥अ. २-५२॥**

यानंतर:—

**द्विज केश धरुनि ओढी, ओढी तो शिशुहि वस्त्र कवळून।**
**खवळून पदें हाणी विप्र परि नव्हेचि दूर जवळून ॥ अ० २-५३ ॥**
**जरि ताडिला तरि हि तो अंबांब! ह्मणोनि शिशु मिठी घाली।**
**न्हाली घर्माश्रुजळें वंदुनि विप्रासि विनविती झाली ॥ ५४ ॥**
**'बा घेतली असी हे मी दासी, हाहि बाळ घे दास।**
**तव कार्य साधिका कसि? जरि या होईन पात्र खेदास ॥ ५५ ॥**

१ या आर्येबद्दल मूळांत 'इत्युक्त्वा स ययौ विप्रो राजा चासीत् भयातुरः' एवढें-च साधें वाक्य आहे, पण पंतांनीं त्याच्या भाषांतरांत चिंतेवर अगाध सागराचें व शापभीतीवर वावटळीचें रूपक करून गोड आर्या निर्माण केली आहे! कारागिरी ती हीच! २ मूळांत 'मां मा स्प्राक्षीः राजपुत्र! अस्पृश्याहं तवाधुना,' असें आहे अस्पृश्या' शब्दाचें स्पष्टीकरण पंतांनीं उत्तरार्धांत केलें आहे. 'तूं राजसुत आहेस. मी आतां तुझी आई नाहीं! दासी आहें.'

ब्राह्मणानें तारामतीबरोबर रोहिताश्वालाही विकत घेतलें. पंत ह्मणतात:—

**विप्रें केली ज्यांची व्हावी धनदास ही खरेदी न।**
**विधि फिरतां होती जे प्रभुचे जन दास ही, खरे दीन ॥ ५८ ॥**

दैव फिरलें कीं जन प्रभूचे दीन दास होतात! राजानें अनिवार शोक केला कीं ' धिक्कार मला-कष्टीं सुकलत्र तसेंचि लोटिलें मुल तें! ':-

**रविनें न निरखिली जी, स्पर्शेलि वातें विशंक न व्यजनें।**
**अवलोकिली पुरीं ती ओढुनि नेतां असंख्य नव्य जनें ॥ ६० ॥**
**हा सति! हासतिरस्कृतचंद्र! तुज विकुनिही न घामेलों।**
**हा तनय! हातनय मी जोडुनिहि न या महा अघा मेलों ॥ ६५ ॥**

विश्वामित्राला स्त्रीपुत्रांला विकून द्रव्य दिलें तरी तो क्रुद्धच राहिला:—

**ऐसी संसाराची होतां दैवें करूनि बंडाळ।**
**ये विकत हरिश्चंद्र प्रभुला घ्यायासि उग्र चंडाळ ॥ ७५ ॥**

चांडाळानें राजालाही विकत घेतलें व घेऊन गेला, त्या प्रसंगीं पंतांनीं पदरची सुंदर आर्या घातली:—

**बांधुनि, ताडुनि, ओढुनि, नेति न देउनि रडों पडों, बकरें।**
**तैसाचि ने नृपातें, दंड उगारूनि, उग्र डोंब, करें ॥ अ० २-८७ ॥**

मूळांत स्मशानाचें फार सरस वर्णन आहे, पण पंतांनीं तें गाळलें आहे. बारा महिने गेल्यावर राजाला भयंकर स्वप्न पडलें, त्यांत त्यानें उग्रशोकामुळें खवळलेल्या पित्तप्रकोपामुळें कित्येक वाईट प्रसंग पाहिले, पण ' तद्विस्तर तापवील बहु काना ' ह्मणून पंतांप्रमाणें मीहि त्यांचें वर्णन करीत नाहीं! मात्र त्या स्वप्नांत यमधर्मानें तारामतीला वेणी धरून ओढल्याचें पाहिलें तेव्हांची सुरस आर्या देतों:—

**तुटले हार, कच शिरीं सुटले, फुटले चुडे, वसन फिटलें,।**
**ती दुर्दशा प्रियेची पाहुनि नृपचित्त जीवितीं विटलें ॥ अ० ३-२० ॥**

यमधर्मानें राजाला सांगितलें:—

**देइल यावरिहि तुला पुत्रमरणशोक, जाण हें साचें।**
**परि सत्वकवच असतां वक्र न होईल अग्र केसाचें! ॥ अ. ३-२४ ॥**

हा उत्तरार्ध किती उदात्त व उत्तेजक आहे? पुढें चंडालवेषांत मसण·

१ पंतांची टीप; ' जे जन प्रभु ते ही खरे दीन दास होतात, २ पंखा. ३ नीतिच्युत. ४ पापाला जोडून ही. ५ बाताहात.

पट्टी वसूल करीत हरिश्चंद्राची स्वारी फिरत असतां आपल्या सर्पदष्ट पुत्राचें शव घेऊन तारामती तेथें आली. एकमेकांस ओळखतांच त्यांनीं अनिवार शोक केला, तो पंतांनीं इतका सुरेख वर्णिला आहे कीं पाषाणास पाझर फुटल्याशिवाय राहणार नाहीं. त्यांवर दुःखाचे कड कोसळले व अग्निज्वाळेनें जाईचा मांडव करपून जावा तसी तारामती करपून गेली, त्यांना वारंवार मूर्च्छा यावी, पुन्हां सावध व्हावें, पुन्हां मूर्च्छा यावी, पंत लिहितातः—

**'हा! हा!' म्हणत नृप उठे, राज्ञीहीः ओतु आखुला धरितो।**
**क्षण सोडितो, जनाला मोहावि तैसींच कौतुकें करितो॥ अ० ३-४९।**

पुत्रशोकार्त राजा मरण्यास तयार झाला; पण तशाही प्रसंगीं त्याचें सत्व टिकलें. 'सोडावें वपु, परि मीं परतंत्र, पहा अभाग्य हें खोटें.' त्यानें राणीला निरविलें व म्हणाला; "तूं ब्राह्मणसेवेंत चुकूं नकोस. कारण 'निज धर्म उपासावा प्रेमें, स्वाश्रितहितार्थ जागे हा! त्या विप्राशीं नीट वाग 'नृपपत्नी या गर्वें अवमानावा न विप्र तो धामीं.' पण राणी म्हणाली कीं हे दुःख इतःपर मला सोसवत नाहीं, तर आपण उभयतां दहनांत जळून जाउ व निरयांत कां होईना पण एकत्र राहूं.' याप्रमाणें संकटाची परमावधी झाली व हरिश्चंद्रानें:—

**साक्षी करुणाब्धि प्रभुवर जेव्हां संकटांत आठविला।**
**तेणें ब्रह्मादि सकळ सुरजन तत्सांत्वनार्थ पाठविला॥ अ० ४-१॥**

देवांनीं हरिश्चंद्राच्या 'दमसत्यातितिक्षा' प्रमुख गुणांचें गौरव केलें, व त्यावर पुष्पवृष्टि केली. रोहिताश्वाला उठविलें तेव्हांः—

**साधु हरिश्चंद्र सुता, आलिंगुनि सुचिर मस्तकीं हुंगे।**
**न सुटे मिठी तयाची, सुमधुरसीं जेंवि गुंतली मुंगी॥ अ० ४-१५॥**
**ती माय दिसे जडली त्या माशी काय पा! गुळाला हे।**
**तन्यूनचि तो जो जन अंध नयन, पाय पांगुळा, लाहे॥ अ० ४-१६॥**

या आर्या पंतांनीं स्वतंत्र रचून घातल्या आहेत. ह्या वत्सलरसानें कित ओथंबल्या आहेत! त्यांचा वंशतंतु तुटला होता, पण पुत्र जिवंत होतांच त्यांना अत्यानंद झाला. आंधळ्याला डोळे आले किंवा पांगळ्याला पाय फुटले म्हणजे जो हर्ष व्हावा तोही त्यांच्या परमहर्षाहून खुजाच! हरिश्चंद्राच्या सत्वाची आणखी एक कसोटी आहेच. इंद्रानें त्याला स्वर्गास बोलावलें तेव्हांः—

---

१ मांजर. उंदराला.

**भूप ह्मणे, ' देवेंद्रा ! मत्स्वामी श्वपच संकटीं त्राण ।**
**करिता झाला देउनि धन, माझे ह्मणुनि राहिले प्राण ! ॥ अ० ४-२० ॥**
**त्याचें न वारिलें तें ऋण, आज्ञा घेतली नसे त्याची ।**
**स्वर्गासि न येइन मीं, तुज कोप न यो, मदुक्ति हे साची!' ॥ ४-२१ ॥**

केवढी ही कृतज्ञता ! कुलवंताची गोष्टच निराळी. यमधर्मानें सांगितलें कीं, ' चंडाळ दुसरा कोणी नाहीं. तुझी सत्वपरीक्षा घेण्यासाठीं मीच तो वेष घेतला होता ! ' इंद्रानें हरिश्चंद्राला बालकसाध्वीसमेत स्वर्गाला बोलावलें तेव्हां त्या पुण्यपुरुषानें जें उत्तर दिलें त्याचें भरतखंडांतल्या सर्व राजेलोकांनीं निरंतर मनन करावें. ' राजा प्रकृतिरंजनात ' ही राजा शब्दाची व्याख्या आहे. प्रजा शब्दसुद्धां अपत्यवाचकच आहे. राजा आणि प्रजा यांचें नातें भरतखंडांत अनादिकालापासून मायलेकरांचें आहे. ' प्रजाः प्रजा स्वा इव तंत्रायित्वा ' असें कालिदासानें इक्ष्वाकुकुलोत्पन्न दिलीपाचें वर्णन केलें आहे. पाश्चात्यलोक राजा प्रजेनें नेमलेला वरिष्ठ अधिकारी व ह्मणून प्रजेचा मुख्य सेवक समजतात. तिकडे राजा व प्रजा यांचे अन्योन्य हक्कांबद्दल लढे माजतात; राजा व प्रजा यांच्या हक्कांत निसर्गविरोध आहे असें ते समजतात. आमच्याकडे सूर्यचंद्रवंशांत हजारों वर्षेंपर्यंत हरिश्चंद्र, नळ, धर्मराज, शिवाजीमहाराज, अहल्याबाई, इत्यादि राजे असे झाले कीं प्रत्येकाचें चरित्र पाहिलें ह्मणजे ' स पिता पितरस्तासां केवलं जन्महेतवः ' असेंच वाटतें. हरिश्चंद्रानें इंद्रास दिलेलें उत्तर पहाः—

**मजकरितां साकेतीं बहुदुःखी जन, तयांसि सोडून ।**
**स्वर्ग रुचेल मज कसा ? भक्तत्यागें महाघ जोडून ॥ अ० ४-२५ ॥**
**स्वजनसह सुखी स्वर्गीं होइन कीं जाउनि भ्रमी नरकीं ।**
**भक्तत्याग करावा कैसा ? धर्मज्ञ कुलज मीं नर कीं ! ॥ २८ ॥**

हरिश्चंद्र प्रजेला सोडून कसलेंही सुख भोगायला तयार नव्हता. ' स्वर्गासि जरि तयांचें माझें होइल तरीच आगमन ' असें उदारपणानें त्यानें इंद्रास सांगितलें. शुभाशुभ कर्में करणारे सर्वच जन स्वर्गाला कसे पात्र होतील ? असें इंद्रानें विचारलें तेव्हांः—

**नरवर ह्मणे, ' कुटुंबी जे कोणी लोक, तत्प्रभावानें ।**
**भोगितसे राज्यातें राजा, नच केवळ स्वभावानें ॥ अ० ४-३१ ॥**

**तें त्यां जनप्रसादें शक्रा ! सर्वहि अनुष्ठिलें कर्म ।**
**उपकारी न त्यजिन, स्वर्गी वांछुनि तयाविना शर्म ॥ अ० ४-३३ ॥**
**जें तपदानमखसुकृत माझे, त्यांचेंहि बा ! असो सम तें ।**
**गमतें समुचित मज हें, सुकृतश्रमतें, न केवळ स्वमतें ' ॥ ४ ३४ ॥**

या आर्यात केवढें उदात्त रहस्य सांठविलें आहे! राजा जें सुख भोगितो, तें आपल्या एकट्याच्या पुण्याईनें नव्हे तर सर्व जनांच्या पुण्यसंघातानें! हरिश्चंद्र आपलें सुकृत प्रजाजनांसीं समत्वानें विभागावयास तत्पर होता यांतच त्याच्या थोरपणाचें बीज आहे. असो. देवांनीं सर्व प्रजाजनांसह हरिश्चंद्राला-त्या रामपूर्वजाला-विमानांत बसवून स्वर्गी नेलें. तत्पूर्वी देवांनीं हरिश्चंद्राला आणखी एक बायको करून दिली! ती फार दिवस कुमारिकाच होती, तिला योग्य वर मिळत नव्हता.

**अद्यापि दुर्निवारं स्तुतिकन्या वहति कौमारम् ।**
**सद्भ्यो न रोचते सा सन्तोप्यस्यै न रोचन्ते ॥ १ ॥**

देवांनीं विचार केला कीं या स्तुतिकन्येला हरिश्चंद्र हाच वर योग्य आहे ! तिला तर तो फार पसंत झाला, हरिश्चंद्र अर्थात लाजाळुपणामुळें संकोचानें खालीं मान घालून बसला होता. पण हरिश्चंद्राचे नवीन मित्र कसचे ऐकतात! त्यांनीं या अनुरूप वधुवरांचा विवाह लावला, त्यांची थाटानें मिरवणूक काढली, व वधूला वराच्या मांडीवर बसविलें:—

**मग सुर साकेतातें घेउनि गेले नृपासि मिरवीत ।**
**गुरु नवरीस वरांकीं, तत्करणीं तेंवि नुतिस शिरवीत ॥ अ० ४-४० ॥**

मला वाटतें या विवाहमंगलप्रसंगीं मोरोपंत हरिश्चंद्राच्या पाठीमागें करवल्याच्या नात्यानें उभे राहून वधूवरांवर अक्षता टाकीत होते. त्याच अक्षताभंग न पावणाऱ्या शुभ्र यशाचे तंदुल—आर्यारूपानें अवतरल्या आहेत!!

१६ **साध्वीचा महिमा:**—मार्कंडेयपुराणांतल्या १६ व्या अध्यायाच्या पूर्वार्धांतून कौशिकभार्येची कथा देऊन पंतांनीं त्यावर ५५ साक्या केल्या आहेत. कौशिक नांवाचा एक दुराचारी, व कुष्टरोगी ब्राह्मण होता, त्याची भार्या महासती होती:—

**होता कौशिक विप्र क्रोधी, अतिदुष्ट, गलित, कुष्टी, ।**
**तन्मन सती कराया न झके, पान्मका अति मुदी ॥ १ ॥**

तो दुराचारी होता. ती सती असूनही त्याचें चित्त धरूं शकली नाहीं, तरी ' निधिला लुब्ध तमी फार जपे, परि तो उगाचि गांजी.' पतीच्या अत्याग्रहावरून एकदां ती पतीला खांद्यावर घेऊन गणिकागृहीं जात होती, तों सुळावर चढलेल्या मांडव्य ऋषीला त्याचा पाय लागला तेव्हां 'ज्यानें मला चाळविलें, तो सूर्योदय होतांच मरो!' असा त्यानें शाप दिला. तिनेंही आपल्या दिव्य पातिव्रत्यतेजानें ' पाहों बरें, कसा रवि उदया येतो ' असें ह्मणून सर्वत्र अंधार पाडला ! यज्ञयागादि क्रिया बंद झाल्या, सर्व देव घाबरले, व अनुसूयेकडे गेले. अनुसूया साम करण्यासाठीं सतीकडे गेली, त्या तिच्या तपोबलाची तिनें महती गायिली, 'पतिसेवेचा महिमा अद्भुत मज आला अनुभव हो' असें ह्मणून तिच्याकडून सूर्याला प्रकटविलें, व तिनें स्वतः आपल्या तेजानें तिचा मृतपति जिवंत केला. ' स्त्रीला या लोकीं परलोकीं गति पतिच, नसे अन्या ' हें या कथेचें सार आहे. ज्याचें कर्तव्य त्यानें ईश्वरसाक्षित्वानें करावें ह्मणजे तो निर्भय आहे हें या कथेचें तात्पर्य आहे.

१७ **देवीमाहात्म्यः**—हें देवी सप्तशती ह्मणून जें प्रकरण प्रसिद्ध आहे त्याच्या आधारें पंतांनीं रचिलें आहे. देवी सप्तशती मूळ मार्कंडेयपुराणांत आहे, तिचे अध्याय १३ ( ७९--९० पर्यंत ) आहेत. नवरात्रांत या सप्तशतीचे पाठ करण्याची बऱ्याच ठिकाणीं चाल आहे. या प्रकरणास नमन किंवा उपसंहार पंतांनीं घातलेले नाहींत, तर एकदम ' श्रीमान् चैत्रकुलोद्भव सुरथ ' याच्या कथेस प्रारंभ करून मधुकैटभ, महिषासुर, शुंभ, निशुंभ वगैरे दैत्यांचा देवीनें कसा नायनाट केला याचें वर्णन केलें आहे. शेवटचा देवीस्तुतीचा भाग पंतांनीं गाळला आहे, यावरून देवीनें दैत्यवध केला तेवढाच इतिहास वर्णायचा पंतांचा हेतु होता असें दिसतें. बहुतेक भाग भाषांतरात्मक आहे. सुरथ राजा सार्वभौम होता, व शिवायः—

**औरस पुत्रांसि जसा तात तसा तो प्रजांसि परिपाळी ।**
**दैवें बाधी लागे कुदशेची त्या तशाहि परि पाळी ॥ २ ॥**

त्याचे अमात्य शत्रुपक्षांस सामील झाले, शत्रूनें त्याचें राज्य हरण केलें,

---

१ मूळ, ' तस्य पालयतः सम्यक् प्रजाः पुत्रानिवौरसान् '

त्याचा कोश हस्तगत केला, व त्यास पिटाळून लावलें. तो सुमेधामुनींच्या आश्रमांत आला व शोक करूं लागला:—

दुर्बल भृत्य माझे, पावावें स्वास्थ काय मज्जगरें ! ।
झालें मजही राज्य त्याज्य खळजनें, जसेंचि अन्न गरें ॥ १० ॥
मत्सचिव करित असतिल अनुवृत्ति मदीय शत्रुभूपांची ।
हाय कसी आवडली सेवा मानसखगांसि कूपांची ॥ ११ ॥
कोश क्षय पावेलचि जो अति कष्टें जपोनि सांचविला ।
म्यां आपणांसि समयीं कार्या येइल ह्मणोनि वांचविला ॥ १२ ॥

तो स्वराज्यभ्रष्ट राजा ह्याप्रमाणें शोक करीत आहे तोंच तेथें समाधि-वैश्य प्राप्त झाला व रडूं लागला:—

सर्वस्व हरुनि मजला स्त्रीपुत्रांहीं वनासि पाठविलें ।
केलें म्यां परिपालन जें कांहीं तें तिहीं न आठविलें! ॥ १८ ॥

राजा व वैश्य हे दोघेही समदुःखी झाले व त्यांनी त्या मुनीस विचारलें कीं 'आमचा आप्तस्वकीयांनीं निष्ठुरपणानें त्याग केला असूनही त्यांच्या विषयींचें ममत्व आह्मांला कां सोडीत नाहीं ?' मुनी ह्मणाले, 'बाबांनो! हें सारी विष्णूची माया आहे. संसारानें तुमचा त्याग केला तथापि तुमचें मन संसार सोडीत नाहीं, ' ज्ञान्यांचेंही वोढुनि करि मोहाच्या अधीन हें मन गा! ह्मणून भगवंताची जी सर्वशक्ति महामाया तिची ब्रह्मदेवही नेहमीं प्रार्थना करितात कीं:—

हरि हर विधि देही हे कोणाहि तुझी न वर्णवे लीला ।
त्रिभुवन अवलंबुनि तुज जसें फळपुष्पपर्ण वेलीला ॥ ३८ ॥

त्या मुनींनें नंतर देवीनें मधुकैटभादि राक्षसांस अतुळ युद्ध करून कसें मारिलें तें सविस्तर सांगितलें. प्रस्तुत ग्रंथ सर्व आपद्ग्रस्त पुरुषांनीं, मुख्यत स्वराज्यच्युत क्षत्रियांनीं अवश्य वाचावा ह्मणजे भगवन्मायेचें स्वरूप काय आहे हें त्यांस समजून पुष्कळ समाधान वाटेल. प्रस्तुत ग्रंथ वाचून 'व्हावें कृतकृत श्रीहरिमायेतेंहि यजुनि सुज्ञानें.' पंतांनीं देवीच्या स्वरूपाचें, तेजाचें

१ ये ममानुगता नित्यं प्रसादधनभोजनैः ।
अनुवृत्तिं ध्रुवं तेऽद्य कुर्वन्त्यन्यमहीभृताम् ॥ १ ॥
२ संचितः सोतिदुःखेन क्षयं कोशो गमिष्यति ।

पराक्रमाचें खणखणीत भाषेनें वर्णन केलें आहे. देवांनीं देवीची स्तुति केली तेव्हां ती " ऐकोनि ' आः किमेतत्. ' कुपित खळ ह्मणे, ससैन्य तो धांवे," तेव्हां देवीही चंडक्रुद्ध होऊन " मग साट्टहास वारंवार शिवा गर्जना करी राजा ! " पंतांना युद्धवर्णनें फार बहारीचीं साधतात, पण त्याबद्दल पुढें मंत्ररामायण व महाभारत यांचा विचार होईल तेव्हां लिहिणें योग्य होईल. प्रस्तुत देवीमाहात्म्यांतही युद्धप्रसंग उत्कृष्ट वर्णिले आहेत, व आर्यारचनाही सुलभ व सरस झाली आहे. देवीनें खळ मारिले तेव्हां:—

**विश्व प्रसन्न झालें होय जसें भास्करोदयीं कमळ ! ।**
**उत्पातमेघ शमले सर्वव्योम प्रकाशले अमळ ॥ १ ॥**

**१८प्रल्हादविजयः**—पंतांनीं आपल्या कोणत्याच स्वरचित काव्यावर रचनाकाल दिलेला नाहीं. मात्र या काव्याची जी मूळ पंतलिखित प्रत पंढरीस आहे, तिच्या शेवटीं या काव्याचा रचनाकाल दिलेला आहे, तो असाः— " बहुधान्य संवत्सर पौष शुक्लाष्टमी शुक्रवासरेषु मस्तु तस्मिन्सदभीष्टकाले श्रीमत्केशवगणेशपंडितपदप्रसादादयं ग्रंथोऽगमत्सममाप्तिम. " यावरून प्रकृत ग्रंथ शके १६८० पौष शुद्ध ८ ( ता. ५ जानेवारी. इ. स. १७५९ ) रोजीं ह्मणजे आपल्या वयाच्या २९ व्या वर्षी पंतांनीं रचिला असें निर्विवाद ठरतें. इकडे पानपतच्या घनघोर संग्रामासाठीं महाराष्ट्रांतील वीरपुरुष सज्ज होत होते, तोंच बारामतीस महाराष्ट्रकविनायक तिशी उलटण्याच्या सुमारास—

**हरिपादयुगस्मरणप्रवणें । भगवज्जनदिव्यकथाश्रवणें ।**
**चतुरें रसिकें समय क्रमणें । सुख अन्य नसेचि भवभ्रमणें ॥१॥**

असा आजन्म पाळला जाणारा दीक्षाविधि उरकून घेत होते. प्रस्तुत काव्य विष्णुपुराणांतर्गत प्रल्हादकथेच्या(अ. १६-२०)आधारें लिहिलें आहे. काव्य वाचनलेखनाचा व्यवसाय निरंतर करण्याचा निश्चय पंतांनीं तिशीच्या आंतच केला हें लक्षांत ठेविलें पाहिजे. 'हा काळव्यय चांगला, इतरथा आयुष्य जातें वृथा' असा त्यांचा विचार लवकर नक्की ठरल्यामुळें आयुष्यकर्तव्याची त्यांची दिशा रेखून गेली. प्रत्येक बुद्धिवान् तरुण आपल्या कर्तव्याची दिशा याप्रमाणें रेखून टाकील व तदनुसार आपला वर्तनक्रम ठेवून आपलें बुद्धिसर्वस्व एका विषयांत प्रावीण्य मिळविण्यासाठीं वेंचील तर किती बहार होईल ? जे सूर्यकिरण इतस्ततः पसरले जातात त्यांची सर्व उष्णता चोहोंकडे पांगून जाते व तिच्यापासून कांहीं कार्यनिष्पत्ति होत नाहीं, पण तेच सारे किरण सूर्य-

कांतमण्याच्या केंद्रांत एकवट केले तर त्यापासून अग्नि प्रकट होतो. ह्याप्रमाणेंच बुद्धीची गोष्ट आहे. सर्व बुद्धिशक्ति एकच विषयांत पारंगत होण्यासाठीं खर्च केल्यास त्यापासून मोठें कार्य होतें. बहुशाखा नसाव्यात, बुद्धि व्यवसायात्मिका असावी. हंसकाकीय आख्यानांत हंसाला एक गति होती; काकाला शंभर गति ठाऊक होत्या असें वर्णन आहे. अखेर काकाची त्रेधा उडून त्याच्या वांट्याला पतन आलें, हंसाची एकगतिनैपुण्यामुळेंही वाहवा झाली! यासाठीं बुद्धिमंतानें आपल्या कर्तव्याची मर्यादा रेखतांना फार विषयांची हांव बांधूं नये. एकाच बुद्धीला अनेक विषय गम्य नसतात. काव्य, व्याकरण, नीतिशास्त्र, इतिहास, गणित, भूगर्भशास्त्र, वनस्पतिशास्त्र, ज्योतिष, वेदांत:—शास्त्रें अनंत आहेत, आयुष्य थोडें आहे, मानवी बुद्धीला मर्यादा आहे. यासाठीं अनेक शास्त्रांत प्रावीण्य मिळविण्याची जो हांव बांधील त्याची चांगली फजीती झाल्याशिवाय राहणार नाहीं. सकाळीं गणिती, दुपारीं वेदांती, व संध्याकाळीं कवि ! अशा रीतीनें बहुधाज्ञानामागें जो लागेल त्याच्या हातीं कांहींच लागायचें नाहीं. ह्मणून बुद्धिमंत पुरुष अनेकशास्त्र्यांचीं सामान्य तत्वें चतुरस्रतेसाठीं शिकतात, बुद्धिविकास होण्यासाठीं भिन्न भिन्न पंडितांकडून त्यांचीं रहस्यें समजावून घेतात, पण आपल्या कार्याची दिशा ठरवायची वेळ आली ह्मणजे एखादा विषय आपल्या रुचिपरत्वें निवडून काढतात, व त्यांत प्रावीण्य मिळविण्यासाठीं जन्माभ्यास करितात. अशा प्रकारचे विचार पंतांच्या मनांत या वेळीं आले असतील. शास्त्राध्ययनाच्या नादीं न लागतां आपल्या स्वभावांतला प्रेमळपणा, हरिभक्तीचा ओलावा, काव्यविषयक नैसर्गिक अभिरुचि व प्रतिभासंपन्नत्व हे गुण लक्ष्यांत आणून काव्यग्रथनाच्या कामीं त्यांचा आजन्म व्यय करायचा जो या प्रसंगीं त्यांनीं निश्चय केला तो फार शहाणपणाचा होता यांत तिळमात्र संशय नाहीं. संस्कृत ग्रंथांचें अध्ययन पुरें करून संपादित ज्ञानाचा व नैसर्गिक प्रतिभेचा उपयोग त्यांनीं मराठी भाषेच्या उन्नत्यर्थ केला यांतही त्यांचें चातुर्य स्पष्ट दिसतें. उत्तरोत्तर संस्कृत भाषेकडून लोकांचें लक्ष अंमळ कमी होऊन तें मराठीकडे अधिक लागणार हें

१ वाणि नसावी लेशहि रसिकपणीं, अणु महा असो शास्त्र ।
सर्वांच्याहि करावें साराला, हृदय आपुलें पात्र ॥ १८३ ॥
मंत्रभागवत, स्कंध ११.

जाणून व बहुजनांच्या कल्याणार्थ ग्रंथ रचायचा हेतु धरून त्यांनीं मराठी भाषेवर अनुग्रह करण्याचें मनांत आणलें याबद्दल त्यांचें गौरव करावें तितकें थोडेंच होणार आहे. या ग्रंथांत ' देशभाषानिबद्धोपि सेव्योयं रसवेदिभिः ' अशी पंतांनीं संस्कृतज्ञ पंडितांची भीत भीत विनंति केली आहे. प्रस्तुत ग्रंथरचनाकाळीं पंतांची स्वतःच्या योग्यतेविषयीं किती खात्री होती हें:—

**हरिध्यानासक्त प्रकृतिविषयप्राप्तविकृती**
**कृती लक्ष्मीरामाकृतिभव मयूरेश सुकृती ।**

या श्लोकार्धावरून स्पष्ट दिसतें.

१९ या काव्यांत पंतांनीं आर्यागीति वृत्ताचा अवलंब केला आहे. एकंदर पद्यसंख्या २४१ असून विजय ४ आहेत. याचें वृत्त जरी ह्मणायला जड जातें, तरी साऱ्या काव्यांत सुलभत्व व प्रसाद उत्तम साधले आहेत. ग्रंथाच्या नांवाप्रमाणें यांत प्रऱ्हादाचें चरित्र मुख्यत्वें वर्णिलें आहे. हिरण्यकशिपूचा यांत फारसा वृत्तांत आणला नाहीं. फक्त त्यानें प्रऱ्हादाचा जो छळ केला त्याचें वर्णन विस्तारानें केलें आहे, नृसिंहानें त्याचा नाश केला याबद्दल दोनचार पद्यांत निकाल लावला आहे. पंतांचा तारतम्यभाव सर्वदा फार जागरूक होता. प्रऱ्हादानें शाळेंतल्या आपल्या सोबत्यांस जो बोध केला व बापाला समबुद्धीचें जें तत्व सांगितलें तें फार सुंदर वर्णिलें आहे. 'तुझा नाश परोपरीनें करीत असतां आह्मांला यश कां येत नाहीं, ' असा बापानें प्रश्न केला तेव्हां प्रऱ्हाद ह्मणतो:—

**मीं तनुवचनमनांहीं परदुःखातें कदापि वांछित नाहीं ।**
**अन्यजनीं मजमाजीं एक हरी हेचि बुद्धि शाश्वत माजी ॥ ८ ॥**
**भेदचि माझा शमला, यास्तव नाहींच सर्वथा नाश मला ।**
**ह्मणउनि हरी भजावा, स्वपर असा भाव तो समूळचि जावा॥१०**

हिरण्यकशिपूनें प्रऱ्हादाला नीतिमार्ग पुसिले तेव्हां तो भक्तराज ह्मणतो:-

**मित्रामित्र असावे तेव्हां नीतिप्रकार सर्व पुसावे ! ।**
**एकचि आत्मा साचा, व्यर्थ श्रम कासया नयाभ्यासाचा? ॥ ३६ ॥**
**तुज मज भूतांमाजि एक हरी सत्य गोष्टि ताता ! माजी ।**
**अरिमित्र कथा राया ! कैची ? स्थळ कोणतें तीस थाराया?॥३७॥**
**रागद्वेष उमटती, जेथें हरिभक्तिमार्ग सारे सुटती ।**
**हें टाकुनि जनका ! मीं ह्मणतों कीं यत्न साधिजे निष्कामीं ॥३८॥**

**आत्मत्वें जो सारें पाहे, तो सोडिलाचि या संसारें।**
**मग कैंचा क्लेश वसे? ज्याला जन सर्व भासले केशवसे! ॥ ४६ ॥**

—विजय-तिसरा.

२० प्रस्तुत काव्य मूळ विष्णुपुराणांतल्या चार अध्यायांशीं पद्यशः ताडून पाहतां असें दिसतें कीं पंतांनीं बहुधा पद्यशः भाषांतर करण्याचा यांतही यत्न केला आहे, तथापि वृत्तभेदामुळें व यमकाधीनतेमुळें कोठें कोठें कमजास्त पदें पडलीं आहेत. विष्णुपुराण व त्यांतही प्रऱ्हादकथा फारच सुंदर आहे, पंतांनीं भक्तिप्रेमामुळें त्यांतील वेंचक तेवढें आख्यान काढून त्यावर अनुरूप असा मराठी पोशाख चढविला आहे. सदर आख्यानांत यमकांची गर्दी बरीच झाली असूनही त्यांनीं अर्थहानी कोठेंही केली नाहीं. यांतील पद्यांवरून काव्यरचना करितांना पंतांनीं भाषा कमावण्याकडे विशेष लक्ष दिलें होतें असें स्पष्ट दिसतें. सदर काव्य पंतांच्या उत्तमांपैकीं एक आहे. पंतांनीं दहा बारा वर्षांनंतर रचलेल्या नामरसायनांत ह्मटलें आहे:—

**श्रीमद्विष्णुपुराणीं पाहुनि अत्यंत आदरें रचिला।**
**प्रऱ्हादविजयनाम ग्रंथ पहा! नगाचि मणिगणीं खचिला ॥ १०५ ॥**

आतां चारदोन पद्यें मुळाशीं ताडून पाहूं:—

प्रऱ्हादाला त्याच्या बापानें विचारिलें कीं 'तुला मच्छत्रुप्रेम कोणीं शिकविलें?' तेव्हां तो ह्मणतो:—

मूळ—

**शास्ता विष्णुरशेषस्य जगतो यो हृदि स्थितः।**
**तमृते परमात्मानं तात कः केन शास्यते? ॥**

पंत—

**प्रऱ्हाद ह्मणे ' हृदय-स्थित परमात्माचि मुख्य शास्ता सदय।**
**त्याविण कोणा कथणें, मज इतरालाहि, आत्मतत्व शिकवणें? ॥१**
**हृदयीं विष्णु जनाच्या, जो मार्गीं लावितो स्वपदभजनाच्या।**
**त्याचा प्रसाद मजला झाला, ह्मणवूनि हा स्वलाभ समजला ॥ २ ॥**

यांतील पहिलें पद्य मूळाचें केवळ भाषांतर असून दुसरें पद्य अर्थ विशद करण्यासाठीं पंतांनीं पदरचें घातलें आहे. हिरण्यकशिपूनें मुलास बोलावून आणलें व एखादा श्लोक ह्मणावयास सांगितलें:—

मूळ—

**समाहूयाब्रवीद्गाथा काचित्पुत्रक गीयताम्।**

पंत—

**आत्मकुमाराजवळी स्थापूनि असें ह्मणे असुरराजबळी ।**
**' गा वत्सा ! गाथा रे, जेथें माझें स्वचित्त सुभगा ! थारे ॥ १ ॥**

' माझें स्वचित्त ' हे ' पिंवळा पितांबर ' गाईचें गोमूत्र ' या सारखेंच विचित्र आहे ! असो. प्रल्हादाचें उत्तर:—

मूळ—

**यतः प्रधानपुरुष यतश्चैतच्चराचरम् ।**
**कारणं सकलस्यास्य स मे विष्णुः प्रसीदतु ॥ १ ॥**

पंत—

**जेथुनि पुरुष प्रकृती, स्थिर, चर, जो सर्वदा दयार्द्रप्रकृती ।**
**जो वरद रमावर हा तो विष्णु सदा प्रसन्न आह्मांवर हो ॥ २ ॥**

हिरिण्यकशिपूच्या पुरोहितांनीं त्या दैत्यास सांगितलें:—

मूळ—

**बालत्वं सर्व दोषाणां दैत्यराजास्पदं यतः ।**
**ततोत्र कोपमत्यर्थं योक्तुमर्हसि नार्भके ॥ १ ॥**

पंत—

**करुणाकंचुक तात त्यजिति न, जरि लेंकुरें सदा चुकतात ।**
**अनुकंपापात्रास स्वसुतास असा दिजे न भूपा त्रास ॥ २ ॥**

असो. 'रसवित् पंडितांनीं मुद्दां सेवण्यास योग्य, अशीं काव्यें देशभाषेत रचण्याचा, भगवज्जनदिव्यकथाश्रवणकथन करण्याचा, काळव्यय चांगला करून तो वृथा न दवडण्याचा' हा जो आपला संकल्प पंतांनीं आपल्या एकोणतिसाव्या वर्षी इतका निश्चून जगजाहीर केला त्याप्रमाणें त्यांचें आचरण यावज्जीव कसें राहिलें हें त्यांच्या पुढील उद्योगपरंपरेवरून वाचकांस कळणारच आहे. पुराणांतील लहान मोठ्या कथा मराठींत आणण्याचा प्रयत्न चांगला सफल होतो असें पाहून पंतांनीं मोठी उडी घेण्याचा विचार केला, व त्यांची पहिली उडी त्यांच्या उपास्यदेवतेच्या कथानकावर पडली. पंतानीं वाल्मीकिरामायणाच्या व हनूमन्नाटकाच्या आधारें रामायणकथा आर्यावृत्तांत गाण्याचा निश्चय केला व त्यांचें 'मंत्ररामायण' जन्मास आलें, पण त्याचा विचार पुढील प्रकरणांत करूं.

———

# प्रकरण बारावें.

—∞⁕∞—

## मंत्ररामायण.

वाल्मीकिविप्रोत्तमकाव्य पद्म
श्रीरामलीला मकरंदसद्म।
तेथें मयूरेश्वर भृंग झाला
सेवावया नित्यसुखें रसाला ॥ १ ॥

१ पहिलें रामायण. त्याच्या रचनेचें चातुर्य व त्याची मंत्रात्मकता. २ पहिल्या पांच कांडांतले सुंदर भाग. मुख्यतः रामाचा सीताविरहजन्य शोक. ३ रावणाची आत्मश्लाघा. ४ अंगदशिष्टाई. ५ युद्धाचीं अप्रतिम वर्णनें. ६ सीतेचें मारुतीच्या गळ्यांत हार घालणें. ७ उपरोधिक भाषणाचा मासला. ८ प्रस्तुत काव्यांतले गुण, मुख्यत वीररसाचा उत्कर्ष. ९ प्रस्तुत काव्यांतले दोष. १० पंतांच्या कवितेवरचे संस्कृताभिमानी व प्राकृताभिमानी लोकांचे आक्षेप; व पंतांच्याच शब्दांनीं त्या आक्षेपांचें खंडण:—संस्कृत भाषा व मराठी भाषा.

—उपसंहार.

१ पंतांच्या रामायणांपैकीं पहिलें रामायण ह्मणजे मंत्ररामायण हें होय. पुढें आपल्या हातून अनेक रामायणें रचिलीं जाणार आहेत असें या वेळीं पंतांना स्वप्न सुद्धां पडलें नसेल! हें संपूर्ण रामायण आर्यागीति वृत्तांत रचिलें आहे. याला मंत्ररामायण हें नांव द्यावयाचें कारण 'मंत्रप्रयुक्त रचिलें चरित्र भार्येचि रामरायाचें!' हें होय. 'श्रीराम जयराम जयजय राम' ह्या त्रयोदशाक्षरी मंत्रांत हें सारें रामायण गुंफलें आहे. पहिल्या कांडांत प्रत्येक आर्येचें पहिलें अक्षर ह्या मंत्रांत गुंफलें आहे. दुसऱ्या कांडांत दुसरें, तिसऱ्या कांडांत तिसरें, ह्याप्रमाणें सातव्या कांडापर्यंत सारीं कांडें मंत्रमय साधलीं आहेत! 'एका मंत्रगुणीं मीं आर्यामुक्ताचे गुंफिल्या तेरा' ह्म॰ एका मंत्रांत तेरा आर्या याप्रमाणें हें सारें रामायण मंत्रमय झालें आहे. सातव्या कांडांत सातव्या अक्षरीं वरील त्रयोदशाक्षरी मंत्र साधून पंतांनीं शिवाय एक मौज केली आहे. ह्या उत्तरकांडांत पंतांनीं सारी रामरक्षा गुंफली आहे!

'केवळ उत्तरकांड श्रीरघुपतिमंत्ररत्नमंजूषा' केलें आहे, मात्र यांतलीं सर्व रत्नें अद्याप कोणासही सांपडलीं नाहींत. वामनरावजी ओक यांनीं महत्प्रयासानें पहिल्या पन्नास आर्यांत सहा मंत्र शोधून काढले आहेत. पंतांनीं स्वतः ह्मटलें आहे:--

**देहीं आत्मा तैसा आर्यांतीं मंत्रवर्ण सांग वसे।**
**सूक्ष्मदृशांवांचुनियां कथापरालांचि तो कसा गवसे ? ॥ १ ॥**

रामायणकथा सात कांडांत रचायचा पंतांचा बेत प्रथम पासूनच होता, मात्र पहिल्या पांच कांडांवरून पाहतां पुढचीं कांडें हीं लहान व्हावयाला पाहिजे होतीं, पण युद्धकांडाला प्रारंभ करितांच पंतांचा बेत फिरला व युद्धकांड विस्तारानें रचण्याचा त्यांनीं निश्चय केला. पहिल्या कांडांत ७२ च आर्या आहेत, व सुंदरकांडांत १९६ आर्या आहेत. युद्धकांडास प्रारंभ होतांच पंतांच्या वाणीला स्फुरण चढलें. 'संक्षिप्तकांडपंचक, अतिविस्तार-प्रयुक्त तो सावा' ह्या सहाव्या कांडांत ८५८ गीति आहेत. ह्या कांडांतल्या वीररसाला कविचित्तभृंग अगदीं लोभून जाईल असा वीररसपरिपाक ह्यांत साधला आहे. उत्तरकांड हेंही राममंत्ररत्नांची मंजूषा (पेटी) करण्याचा पंतांचा मनोदय असल्यामुळें बरेच फुगलें आहे. त्यांत ४२९ गीति आहेत. पंतांनीं स्वतः ह्या प्रंथांत १८८० आर्या आहेत व १४६ मंत्र आहेत ह्मणून सांगितलें आहे. सातही कांडें मिळून त्रयोदशाक्षरी मंत्र १४६ वेळां साधला आहे. उत्तरकांडांत जे राममंत्र साधले आहेत त्यांची संख्या पंतांनीं मुग्धांतच ठेवली आहे, ती सूक्ष्मदृशांवांचून कोणाला सांपडूंच नये असा त्यांचा हेतु दिसतो! मूळ कल्पनेपेक्षां हें रामायण मोठें झालें, सरस झालें, रसिकवरमान्य झालें, असें पाहून त्याला सुंदर उपोद्घात जोडून आपल्या पद्यरत्नांची कोणी चोरी करूं नये ह्मणून त्यांनीं पद्यसंख्या व मंत्रसंख्या मोजून त्यावर आपली मोहोर केली आहे! प्रस्तुत ग्रंथ सुजनांनीं मान्य करावा अशी विज्ञप्ति करतांना पंत ह्मणतात:--

**नृपमुद्रांकित पत्र प्रजेसि होतें जसें शिरोधार्य।**
**प्रभुचरित मंत्रचिन्हित यास्तव धरितील मस्तकीं आर्य ॥ १५ ॥**

२ बालकांडांत नारदानें वाल्मीकिला 'राघवचरित भावें गावें' असें सांगून छंदोमयी वाणी दिली येथपासून तों रामविवाहापर्यंतचा सर्व वृत्तांत संक्षेपानें कथन केला आहे. रामविवाहप्रसंगींच्या पुढील आर्येंतलें यमक किती साधें आहे:—

**महदुत्सवें विवाहीं अर्पी नृप जावयांसि नग-राशी ।**
**पूजुनि पंक्तिरथातें आज्ञा दे जावयासि नगरासि ! ॥ ६५ ॥**

दुसरें कांड सरस आहे. कैकेयीनें ' दे मत्सुतासि पृथ्वी, अटवी रामासि ' हे दोन वर मागितले तेव्हां सत्यप्रतिज्ञ दशरथ राजा पुत्रवियोगविव्हळ होऊन कैकेयीची केविलवाणी होऊन विनवणी करिता झाला:—

**तुज सर्व राज्य दिधलें. आणिक ही माग जे अभीष्ट तुला ।**
**गुणवदपत्यवियोगक्लेशासि जगत्त्रयीं नसेचि तुला ! ॥ १० ॥**

कैकेयीला मत्सरपिशाचानें झपाटलें होतें ती कां त्याला बधते ? रामाला 'तुज वनवास बरा कीं ताताला नरकवास ?' असा तिनें प्रश्न केला तेव्हां:—

**राय असें आयकितां ' हाय ! ' ह्मणे, ' बायको नव्हे कृत्या ।**
**काय करूं जाय वना बा ! यश जोडी करूनि सत्कृत्या ' ॥ ३१ ॥**

भरत मातुलगृहाहून परतला तेव्हां कैकेयीचें दुष्टचरित त्यास समजलें, व क्रोधानें त्याच्या अंगाचा भडका झाला. तिच्या महालांत येतांच तो ' दंडाहतभुजग तसा कोपें मातेकडे तदा मुरडे ! ' भरतानें स्वजननीची फार निर्भर्त्सना केली. भरताच्या सात्विक क्रोधाचें चित्र येथें कर्त्यानें फार नामी काढलें आहे. तिला भरतानें ' यमकार्यकारिणी कृत्या ' ह्मटलें आहे. दशरथगृहाच्या किंबहुना अयोध्येच्या साऱ्या राज्याच्या सुखस्थितींत माती कालविणारी, ' ह्रीश्रीदयागृह ' अशा रामाला क्लेश देणारी, पतिहन्त्री कैकेयी भरताची आई खरी, पण भरत ह्मणतो ' मारावें तुज पापे ! परि ह्मणतो रामराय माय तुला ! पुढची आर्या पहा:—

**' तूं राक्षसीपरीसहि अधमा, जे निजकुटुंब खातीस ।**
**मीही पाप तुझा सुत ! ' हें बोले, होय पारखा तीस ॥ ८१ ॥**

कवि उत्कृष्ट चित्रकारही असतात. एखाद्या सुशिक्षित चित्रकारानेंही हेवा करावा असें उदारकोपाचें चित्र आमच्या कर्त्यानें येथें काढलें आहे. भरतानें आयत्या वाढून आलेल्या राज्यश्रीचा धिक्कार केला याबद्दल त्याची स्तुति करून पंत ह्मणतात:—

**जे श्री स्वयेंचि आली, यत्न न करितां, अशीच ही वरजी ।**
**तातादिकांसि मारुनि दुःखें संपादिती महीवर जी ॥ ९३ ॥**

राज्यासाठीं तातादिकांना मारल्याचें आमच्या इतिहासांत तर कोठें दिसत नाहीं. पंतांच्या दृष्टीपुढें बहुधा औरंगजेब बादशहाची कृति असावी ! सीता

वियोगानंतर रामानें जो तिजसाठीं शोक केला त्याचें वर्णन या रामायणांत पंतांनीं चार वेळां केलें आहे! हा विप्रलंभशृंगाराचा प्रसंग पंतांना या तरुण वयांत आवडला, हें साहजिक आहे. एकच कथा, पण वयोपरत्वें त्या कथेतले ते ते भाग मनुष्याला आवडत असतात! 'कृतांतकटकामलध्वज जरा' दिसों लागल्यानंतर असल्या प्रसंगाचें पंतांनीं पुनःपुनः वर्णन केलें नसतें. असो. सुवर्णमृगाच्या नादीं लागून राम दूर गेले, इतक्यांत भिक्षुवेषानें रावणानें येऊन सीतेला उचलून नेलें. राम परत आले तेव्हां (अरण्यकांड):—

**आलय जाउनि पाहे, तों सीता राघवासि भेटेना।**
**त्या समयाहुनि दारुण मृत्यु, असा लक्ष्मणासि वाटेना॥ ७०॥**
**"रुचिराक्षा नाहीं कीं वत्सा! हें अन्यगेह वाटतसे।**
**इतर स्थळासि आलों चुकती अनभिज्ञ लोक वाट तसे॥ ७१॥**
**वत्सा! मज जरि म्हणसी 'सीतेची हेचि होय दलशाला'।**
**तरि मीच रामनामा नसेन! साध्वी दिसेल काशाला?॥ ७२॥**
**श्वशुराला परलोकीं गेलिस जरि तूं करावया नमना।**
**पुसल्यावांचुनि कैसी सीते! झालीस आज यानमना?॥ ७७॥**
**मज राजकन्यके! तूं वरुनियां पावलीस न सुखातें।**
**खातें हें चित्तातें; सांगों कोणास मीं स्वदुःखातें॥ ८०॥**
**हा कमलाक्षि! तनूदरि! सुंदरि! जाये! प्रिये! अये! सदये!।**
**विधुमुखि! पिकगर्वापह! अमृताहुनि गोडसें स्वयें वद, ये"॥ ८१॥**

'श्वशुरनमनाला परलोकीं गेल्याची कल्पना रामासारख्या पितृभक्तालाच यणार आहे व असें वर्णनही भारतीय सत्कवीलाच सुचणार आहे. पंपासरोवरीं राम आले तेव्हां त्यांनीं पुन्हां शोक केलाः—(किष्किंधाकांड):—

**तेथें मयूर, सारस, हंस, कपिक्रौंचकीरकोकांतें।**
**सस्त्रीकांतें पाहुनि मानी प्रभु धन्य पक्षिलोकांतें॥ १॥**
**अलिपुंज देखतां मज सीतेचे केश लक्ष्मणा! स्मरती।**
**तत्कबरीसम हे शिखिपिच्छकलाप स्वमानसीं भरती॥ २॥**
**मद्हृदय हंस पक्षी पीडिति गतिभाषणेंकरून वनीं।**
**नवनीतकोमलांगी सीता दिसते मला मनोभुवनीं॥ ५॥**
**वत्सा! धरारुहातें वेष्टुनि वल्ली जशाचि आहेत।**
**सीतालिंगित होतों ऐसा, परि तो न पूरला हेत!॥ ६॥**

या वर्णनांत स्मरणालंकार स्पष्टच आहे. पुन्हां वर्षाकाळ सुरू होतांच राम ह्मणतात:—

**वत्सा ! अमला आत्मा, हा वर्षाकाळ काळसा आला ।**
**गगनच्युत जलधारा या धरितो कालकूटसाजाला ! ॥ ८५ ॥**
**सप्राणा जनकसुता असेल ? मीं काय तोस पाहीन ! ।**
**स्त्री हारवूनि रडतो ऐसा कोणी नसे त्रपाहीन ! ॥ ८६ ॥**
**नरराय देत असतां अभाग्य हा मीं न पावलों कमला ।**
**कांतेला हारविलों, हांसत असतील सर्व लोक मला ! ॥ ८७ ॥**

सुग्रीवप्रमुख सर्व वानरवीर घेऊन श्रीराम समुद्रतीरीं आले तेव्हां त्यांनीं आणखी एकवार शोक केला त्या प्रसंगांतली एक आर्या:—

**हा सीते ! रुचिराक्षी ! तुजविण झाली सदा तनू कारा ।**
**कां राक्षसें मलाही नेउनि संपादिलें न उपकारा ? ॥ ३८ ॥**

या सर्व आर्या विप्रलंभशृंगाराच्या आहेत. पंतांचा 'शृंगार' ह्मणजे गुरुजनांच्या मर्यादेखालीं वागणाऱ्या कुलीन तरुणांचा शृंगार होय. त्यांत विनय, लज्जा, संभाळून वर्णन केलेलें असायचें. पंतांचें वीररसाशीं किंवा भक्तिरसाशीं जसें पूर्ण तादात्म्य होतें तसें शृंगाररसाशीं होत नाहीं. त्यांचीं काव्यें व त्यांतले शृंगारप्रधान प्रसंगही कुलीन स्त्रीपुरुषांनीं वाचण्यासारखे सभ्य व निर्मळ असतात. असो. सीतेचा शोध करण्यासाठीं 'समुद्रोल्लंघन करण्यास कोण तयार आहे' याचा विचार करण्यासाठीं प्रमुखवानरांची सभा भरली. 'कोणाचाच हिय्या होत नाहीं' हें पाहून वृद्ध जांबवंतानें मारुतीची शिफारस केली:—

**याचे भुजदंड महा प्रचंड यमदंड दंडदक्ष महा ।**
**हा वज्रदेह केवळ सुरशत्रुपराजयप्रद क्षम हा ॥ १३८ ॥**
**हा विजगवीर्यशाली, दुर्धर, दुर्धर्ष, सर्ववीरमणी, ।**
**लंघुनि नदीपतीतें, शोधील नृपालसूनुची रमणी ॥ १३९ ॥**

मारुती अशोकवनीं गेला तेव्हां त्यानें 'गर्दभीगणीं कपिला' किंवा 'भांगेमधीं तुळशी तशी' राक्षसमिंडलपरिवेष्टित सीता देवी पाहिली (सुंदरकांड); व त्याला वाटलें:—

**शिव शिव ! जगन्निवासा ! कैसी गति जानकीस या घडली ? ।**
**श्रीशालिग्रामशिला यवनाच्या शून्यमंदिरीं पडली! ॥ ३४ ॥**

इतक्यांत निस्त्रप व स्मरार्त रावण तेथें आला व नानाविध कामचेष्टा करूं लागला. पंतांनीं त्याच्या त्या चेष्टांना 'अश्राव्य, अवाच्य' ह्मटलें आहे व सीतेनें जो त्याला खडबडीत जबाब दिला त्याचा मात्र विस्तार केला आहे! सीता रावणाला ह्मणते:—

**कां परदारासंगति निजचित्तामाजि मानिसी सारा?।**
**साराया न वृथा तूं पुण्यायुर्द्रव्यकोश हा सारा! ॥ ४१ ॥**

मारुतीनें सीतेला राममुद्रा देऊन विश्वास उपजविला तेव्हां सीता ह्मणते:—

**हा रक्षोधम मी निजपतिप्रत्यानलांत होमीन।**
**परि इच्छा आहे कीं जन रामयशोर्णवांत हो मीन! ॥ ६८ ॥**
**तनुजानुजमित्रांसह रक्षःपतिचा गुडासम ग्रास।**
**कालानें केल्यावर पावेन सुखास मी समग्रास! ॥ ६९ ॥**

रावणानें मारुतीला 'तूं कोण? कोठचा? वन कां मथिलें?' ह्मणून विचारिलें तेव्हां मारुतीनें त्याला 'मी रामाचा दूत आहें' एवढेंच सांगितलें. पण 'रामाचा' या नामाला जीं संस्कृतशब्दमय विशेषणें पंतांनीं लाविलीं आहेत त्यांत पांच आर्यांत मिळून दहा समास आले आहेत, ह्मणजे प्रत्येक आर्यार्ध एक संपूर्ण समास आहे! यांपैकीं पहिली व शेवटची आर्या घेतों:—

**रविवंशजदशरथनृपसंतानक्षीरसिंधुचंद्राचा।**
**गाधिजमुनिमखनाशकराक्षसमथनक्रियावितंद्राचा ॥ ११२ ॥**

... ... ... ... ... ... ... ... ... ...

**वरविक्रममंडित भुजदंड निहित चंडचापदंडाचा!।**
**मी दूत राघवाचा, त्वद्विधदुष्टककालदंडाचा ॥ ११७ ॥**

संस्कृत शब्दघटित कठोरव्यंजनमिश्र अशी वाक्यरचना बराच वेळां वीररसाची पोषक असते, व तशी प्रस्तुत ग्रंथांत असल्यामुळें ती गुणावहच मानिली पाहिजे.

३ असो. आतां युद्धकांडांत काय काय प्रकार आहेत ते पाहूं. बिभीषणानें रावणाला 'रामाची सीता रामाला दे, व्यर्थ वंशकुठार होऊं नकोस' ह्मणून बोध केला, पण तो त्याला न रुचून त्यानें उलट बिभीषणाचीच निर्भत्सना केली (६१–७४) त्या प्रसंगाचे आसुरी संपत्तीचा पुतळा जो रावण त्याचे क्रोधोद्गार वाचण्यालायख आहेत. तो 'अंगारसंचयप्रभदृक्' रावण आपल्या भावावर उसकून ह्मणतो:—

" हरि-वरुण-धीद-यम,ज्वलन-श्वसन-महेश-सोमांतें ।
मीं जिंकिलें अशांतें ! उपदेशा काय तूं शिशो ! मातें ? ॥ ६६ ॥
मीं त्रिभुवनराजा, मी शास्ता, मी वंद्य, रत्नभोक्ता मी, ।
मी ज्ञानी, मी मानी, मी प्रभु, मी स्तुत्य, मी तुझा स्वामी! ॥ ६७॥
तूं रिपु अनुजछद्म, ज्ञातीचा कोण धरिल विश्वास ? ।
दायाद व्यसनातें इच्छिति, हें ठाउकेंचि विश्वास " ॥ ६९ ॥
यापरि अन्यायप्रिय रावण कोपस्मरज्वरें बरळे ।
सरळेचि वक्र दिसती काळानें दृष्टि जधवां तरळे !॥ ७४ ॥

४ प्रस्तुत रामायणांत 'अंगदशिष्टाई' चें वर्णन ( २८८-३१४ ) फार सुरेख आहे. अंगद रामाचा निरोप रावणाला सांगतोः—

चतुरानन जगदीश्वर त्याचा तूं पौत्र, भूतपतिदास ।
श्रुतसंपन्न, नयज्ञ, ब्राह्मणसुत, पावलासि सुपदास ! ॥ २९० ॥
सुरभूसुर यत्नानें पूजावे, धर्मसेतु रक्षावे,
निर्मल यश जोडावें, व्यसन-अनाचार ते उपेक्षावे ॥ २९१ ॥
या विहिताचारातें सोडुनि धरिलीस वृत्ति जन-नीचा ।
अनुसरलासि दशास्या ! पक्षाला तूं स्वकीयजननीच्या ! ॥२९२॥
विधिवरसामर्थ्यानें, होउनि मदमत्त वन्यकुंजरसा ।
धर्मद्रु मोडिले हे, केली ध्वस्ताचि वेदकुंज रसा ॥ २९३ ॥
जनकमहाराजसुता, रविकुलतिलकाजसूनुची सून ।
तूं न कळत नेली तरि दे, हो सद्वृत्त आजपासून ॥ २९८ ॥
नाहीं तरि सायक हे, हे भुज, हा खड्ग, हें धनूरत्न ।
मीं सज्ज जयधनातें, तूं निधनातें स्वयें करी यत्न ! ॥ ३०४ ॥
रविवंशज राजांची बहुसरला भ्रूलताहि चाप-लता ।
ते वक्रा झाल्यावर चालेना जिष्णुचीहि चापलता ! ॥ ३०१ ॥

शेवटची आर्या लोकप्रसिद्ध आहे. राम ह्मणतात 'आह्मी सूर्यकुलोत्पन्न राजे नुस्ता दरारा दाखवूनच राज्य करितों. आमची भ्रूलता व चापलता या कधीं वक्र होत नाहींत. पण जर एकदा वक्र झाल्या, तर इंद्राची सुद्धां प्रतिष्ठा आह्मांपुढें चालत नाहीं !' ही आर्या मजेची आहे, पण तींत एक मोठा दोष आहे. इंद्र ज्या रावणाच्या बंदिखान्यांत लोळत पडला होता, त्या रावणापुढें रामानें आपल्या चापलतेची स्तुति करतांना, 'चालेना जिष्णुचीहि चापलता !' ह्मणून डौल मारावा हें अयोग्य आहे ! हा दोष रामाचा नाहीं, अर्थात् कर्त्याचा आहे ! रावणाला रामाचा निरोप सांगून अंगद ह्मणतोः—

तूं करुनि समर न मर, भ्रमरसम रघूत्तमांघ्रिनवपर्णीं ।
रम, रस घे, अमरचि हो ! भ्रमरहित स्वस्थ नांद निजसर्णीं ॥३०६॥

या आर्येंत रसपोष होऊन सात वेळां 'मर' अक्षरांची आवृत्ति होऊन सुरेख अनुप्रास साधला आहे. या शिष्टाईनें शुद्धीवर न येतां उलटा 'हा धृष्ट पुष्ट मर्कट मारूनि हिरवाचि ग्वा. न रांधावा' असा रावणानें राक्षसांना हुकूम केला. ते वानरः—

म्हणती 'हा रजनीचर आचार-भ्रष्ट, दुष्ट, पापिष्ट, ।
विष्टपकंटक, कष्टद, शिष्टद्वेष्टा, धरा करा पिष्ट !' ॥ ३२२ ॥

९ यानंतर 'झाला निरुपम समर. प्लवगगणीं आणि यातुधानगणीं'. त्या युद्धांत उभय पक्षांचे मोठे मोठे योद्धे पडले, पण रावणप्रधान प्रहस्त पडल्याचें जेव्हां रावणानें ऐकलें तेव्हां मात्र युद्ध निकरावर आलें:—

ते दुंदुभिनादद-रव, दरवर, वीणा, मृदंग वाजविती ।
गजहयरथचक्रध्वनि भटसिंहध्वान भुवन गाजविती ॥ ४०१ ॥
कांपे धरा थरारा, गिरि चळती, अब्धि होय संक्षुब्ध, ।
पांसु प्रांशूष्णांशुद्युति चोरुनि, होय सुरनदीलुब्ध ॥ ४०२ ॥
प्रांशु ध्वज हेममय, द्विपगिरिसे, रथ विमानसंकाश, ।
खगपतिगति हय ऐसे, सैन्य करी निरवकाश आकाश ॥ ४०३ ॥
वासवनीलश्री तो कवची, खड्गी, गदी, शरी, चापी, ।
प्रासी, शूली, कुंती, मुसली दशकंठ पातला पापी ॥ ४०४ ॥
तो समर लोमहर्षण केला, त्याला तुला नसे कांहीं ।
केशाकेशि, नखानखि, मुष्टामुष्टि. प्लवंगलोकांहीं ! ॥ ४०६ ॥
नानायुधव्रजक्षत कपि कोपें पादपाद्रिशिखरांहीं ।
रात्रिंचरसेनेला मर्दिति पदमुष्टिदंत नखरांहीं ॥ ४०७ ॥
मृत गजहयदेहांतें हातें उचलोनि मारिती रिपुला ।
क्षतरक्षः क्षतजांच्या क्षितिपृष्ठीं वाहती नदी विपुला ॥ ४०८ ॥
दुर्बुद्धिमंदिरातें दशकंठाच्या कठोरहृदयातें ।
मुष्टिद्रुमोपलांहीं मारुति ताडी रणांत अदयातें ॥ ४०९ ॥
घेउनि धिक्कारातें, जय देउनि रामबाहुदंडांतें ।
यातु गृहीं जाय, गणी कोदंडातेंचि कालदंडांतें ! ॥ ४२२ ॥

नंतर रावणानें कुंभकर्णाला उठवावयास राक्षस पाठविले. कुंभकर्ण निद्रादेवीचा साक्षात प्रियपति ! त्याला उठविण्यासाठीं राक्षसांनीं जो अट्टहास

केला त्याचें पंतांनीं हास्यरसप्रचुर वर्णन ( ४३१–४४१ ) केलें आहे. हास्यरस व अद्‌भुत रस या दोन्ही रसांचें हें अद्‌भुत मिश्रण आहे:—

**विंध्य तसा निजला तो ! वदनदरीमाजि निबिड आंधार! ।**
**फार भयंकर भासे, पातालाचेंचि काय तें दार ! ॥ ४३३ ॥**

केवढी विशाळ उत्प्रेक्षा ही ? इंग्रजी कवि मिल्टन याच्या महाकाव्यांतल्या ( अद्‌भुत ) रसाशीं बरोबरी करणारें हें वर्णन आहे. कुंभकर्णाला उठवायला राक्षसांना कोण प्रयास पडले ! पंत ह्मणतात:—

**एक सहस्र महारव दुंदुभिसहि ताडिले कितेकांहीं ।**
**मुद्गरमुसलें करिती ताडन, परि लागती न ते कांहीं ! ॥ ४३६ ॥**
**शतसंख्याक जलाचे कुंभहि आणूनि रिचविले कानीं ।**
**केशोन्मूलन केलें, झाले निजकंठ शुष्क हाकांनीं ! ॥ ४३७ ॥**

बिचारे राक्षस दमून गेले, पण कुंभकर्ण कांहीं केल्या उठेना, तेव्हां पंत विनोदानें ह्मणतात ‘ निद्रापराजयास्तव केलें त्यांहीं प्रसिद्ध युद्ध खरें !’ अखेर कुंभकर्ण एकदांचा उठला, पण उठतांक्षणींच ‘ मधुलोहितघट वटघट सेवी मांसासमेत तत्काल!’ कुंभकर्णानें केलेलें युद्ध त्याच्या वीर्याला साजण्यासारखेंच झालें. ‘ तो दुर्धर रजनीचर शतशः प्लवगांसि आननीं वैरी ! ’ कुंभकर्णवधानंतर रावणाची कंबरच खचली, तेव्हां ‘ विजय पराजय दोन्ही पर्यायें भेटताति सकळांला ’ याप्रमाणें इंद्रजितानें त्याचें सांत्वन केलें व तो युद्धास पुढें सरसावला. ‘ शौर्योत्साहाद्यनंतगुणशाली ’ अशा मारुतीनें व लक्ष्मणानें युद्धाची सीमा केली. इंद्रजिताख्य प्रतापमार्तंडानें खडतर शरकिरणगणानें कपिजीवनास शोषून टाकलें, व आपण मर्त्यामर्त्यांला दुर्जय व्हावें ह्मणून कामगम स्यंदनप्राप्तीसाठीं हवन आरंभिलें, त्याला रामवानरांनीं विघ्न केलें त्याचें वर्णन पहा:—

**पौलस्त्यकुमाराध्वररक्षकरक्षःक्षयस्पृहावंत ।**
**अंतकनिभ प्लवंगम गेले रिपुहस्तिचे महावंत ॥ ५७८ ॥**

---

१ मुक्तेश्वरी भारतांत ( आदिपर्व अ. ३६ ) रात्रीचें बहारीचें वर्णन वाचकांनीं अवश्य वाचावें. त्यांत ही पुढील विशाळ उत्प्रेक्षा किती अद्‌भुतरसपूर्ण व आल्हादक आहे:–

**असो हे निशा दाटली काळी । जेवीं काळपुरुषाची कांबळी ।**
**ब्रह्मांडदेवतेवरी सगळी । पांघुरविली आप्तत्वें ॥ ६१ ॥**

शेक्सपिअरनें सिंबेलाइन नाटकांत रात्रीच्या वर्णनांत Blanket of the dark
... योजिली आहे

ते गगनग मग अगनगधर खरतर वीर नीरदासारे ।
वर्षति अध्वररक्षणदक्षासुरसंघ मस्तकीं सारे ॥ ५७९ ॥
मांसाचे संचय किति; रक्ताचे वाहती महापूर ।
शूरजनक्षय झाला, भू रजहीना, द्रुमाद्रिही चूर ! ॥ ५८१ ॥
विघ्न असा यजनाला होतांचि उठे सचापशरधारी ।
संनद्ध युद्ध बद्ध श्रद्ध क्रुद्ध प्रसिद्ध विबुधारी ॥ ५८२ ॥

रणाग्रणी इंद्रजित् लक्ष्मणहस्तें मरण पावला:—

तेव्हां जयजयशब्दें गर्जति मुनि सिद्ध देव गंधर्व ।
पर्व अपूर्व तयांला झालें, आनंद पावले सर्व ॥ ५९४ ॥
ते दुंदुभि वाजविती धिमिधिमिधिमि देवलोक आनंदें, ।
गंधर्व करिति तननन, तत्थैथैथय्य अप्सरोवृंदें ! ॥ ५९५ ॥

पुढें साक्षात् रामरावणांचें अतुल युद्ध झालें. धुळीचे लोट वर उडाले व त्यांनीं सारें आकाश व्यापून गेलें, यावर पंतांनीं तीन अत्युत्कृष्ट उत्प्रेक्षा केल्या आहेत:—

धूळीच्या निकरानें पडला सर्वत्र निबिड आंधार ।
काय रजःपटलानें भूमि करी निर्जरांसि आधार ! ॥ ६२६ ॥
कीं गगनस्थामरजनकांतांची धूलिमय तिरस्करिणी ! ।
संमर्द सोसवेना ह्मणुनि पळे कीं रजोमिषें धरणी ! ॥ ६२७ ॥

लक्ष्मणाला शक्ति लागली तेव्हां मारुतीनें औषधिगिरि आणून त्यास वांचविलें. त्यानंतर उभयपक्षीं जो खणखणाट उडाला त्याचें घनघोर वर्णन पंतांनी केलें आहे:—

शरनाराचांजलिकप्रासगदाखड्गशूलपरिघांतें ।
हातें धरूनि राक्षस ताडिति कपिशांसि निष्ठुराघातें ॥ ६३२ ॥
शूर प्लवंग रागिट विकट कठोर प्रचंड भुज धीट ।
नीट प्रहार करुनी शत्रूंतें रगडिती जणों कीट ॥ ६३६ ॥
तो अतुल लोमहर्षण रण जेथें शोणितापगापूर ।
राक्षस कपींस तेसे जैसा दीप्तानलास कापूर ! ॥ ६३७ ॥
रघुकुलनायकसायकनिकरें रिपुशस्त्रवृष्टिला वारी ।
वारिदसम बाणगणें तो तो वर्षे समस्तदेवारी ॥ ६४२ ॥

युद्धसमाप्तीला आलें. रामानें अगस्तिदत्त बाण सोडून रावणास मारलें, जगतीला परमानंद झाला:—

तो शर परमप्रखर ज्वलनाशनिदीप्ति काय यमदंड ! ।
अंडजपति पवनगती धांवे रिपुला करावया दंड ॥ ७०२ ॥
रावणतनु जगतीवर, रामावर देवपुष्पवृष्टि गळे ।
बाष्पें निशाचरांचे अमरांचे जाहले निरुद्ध गळे ॥ ७०६ ॥
सुप्रभ दिनमणि झाला, अतिशीतल मंद गंधवह वाहे, ।
त्या पर्वीं ब्रह्मांड प्रभुकीर्तिक्षीरसागरीं नाहे ! ॥ ७०९ ॥

६ 'मरणांत मात्र वैर' हे तत्व बिभीषणास सांगून रामानें त्याजकडून रावणाची क्रिया करविली. पुढें मंदोदरीसांत्वन, सीतेचें दिव्य, दशरथाचें दर्शन व बोध, रामाचें अयोध्यागमन, भरतभेट व राज्याभिषेक हे प्रकार क्रमाक्रमानें फार सुरेख वर्णिले आहेत, पण विस्तारभयास्तव त्यांचा निर्देश करण्यापलीकडे कांहीं करितां येत नाहीं. मात्र युद्धकांडसमाप्तीचे वेळीं मारुतीचे गळ्यांत प्रत्युपकारार्थ सीतादेवीनें हार घातला त्या कोमल प्रसंगाची ( ८४४–८५४ ) वाचकांस आठवण दिल्याशिवाय राहवत नाहीं. श्रीरामचंद्रानें सर्व लहानमोठ्या प्लवंगांचा यथायोग्य सत्कार केला व 'चिंताबुधितीराला पावायाला मला तुह्मीं सेतु' ह्मणून सर्वांचें गौरव केलें; पण मारुतीच्या अनंत उपकारांचें काय ?:—

मुक्तामणिहारातें सीता घेवोनि हस्तकीं होती ।
तों सर्वज्ञवराला कळली तच्चित्तभावना हो ! ती ॥ ८४४ ॥
राम ह्मणे 'प्रमदे ! या लोकीं जो योग्य हार हा देया !
त्याला देतां राज्य प्राणहि नाहींत सर्वथा प्राज्य' ॥ ८४५ ॥
एवं रघुवीराच्या वाक्यें झाली प्रहृष्टरूपा हे ।
माता जसी सुतातें, तैसी ते मारुतीकडे पाहे ! ॥ ८४७ ॥
शिरकरकमलें चरणीं समर्पितां मारुतीस ती सीता ।
देवी मणिहारासह दे हृदयाभीष्ट भक्तिसुप्रीता ॥ ८४८ ॥
'तूं निर्मल निजगुणमणिभूषित वत्सा! सदैव परि हार ।
कंठीं' ह्मणे, 'असो दे, मद्विस्मृतिचा करील परिहार ॥८४९॥
आह्मां उपकाराचा सागर लंघावया नसे नाव ।
धन्य वदान्यांमध्यें घ्यावें पहिलें सदा तुझें नांव' ॥ ८५१ ॥
सकल जनीं मरुदात्मज पावे ब्रह्माद्यलभ्य सत्कार ।
फार प्रेमाश्रुप्लुतलोचन भावें करी नमस्कार ॥ ८५२ ॥
पवनतनुज हेमप्रभ सितमुक्ताहार घालितां कंठीं ।

**भासे कनकाद्रीच्या बलाकमालाचि काय उपकंठीं ! ॥८५३॥**

या मनमोहक प्रसंगाचें एखादा चितारी सुंदर चित्र काढील काय ? रामामारखा प्रभु, मारुतीसारखा सेवक, सेवकसत्काराचा असा सुप्रसंग— आणि हें वर्णायला कोमलप्रकृति सत्कवि मोरोपंत ! मग काय विचारावें ? दुधांत साखर पडल्यासारखें झालें आहे. शेवटच्या आर्येतील उत्प्रेक्षा किती उदात्त आहे ? असो. मारुतीनें रामरायापाशीं जो वर मागितला आहे तो सांगून युद्धकांड संपवूं.

**यावत्काल तुझें यश, तोंवर तव पाददास वांचावा ।**
**त्वच्चरितामृतसद्रस हृदयघटामाजि नित्य सांचावा ॥**

उत्तरकांड: २२६

७ अगस्त्यादि मुनि रामदर्शनार्थ आले व रामानें विचारल्यावरून त्यांनीं रावण, मारुती, सुग्रीव इत्यादिकांच्या पूर्वकथा त्यास सांगितल्या, त्यांचें व रामचरित्राच्या उत्तरार्धाचें वर्णन उत्तरकांडांत आलें आहे. ऋषींनीं 'त्रिभुवन निर्भय केलें, खल वधिले, धर्म रक्षिले सर्व ' ह्मणून रामरायाचें गौरव केलें. रामानेंही:—

**लंकेश निशिचराधिप मेला तुमच्या तपःप्रभावानें ।**
**कारुण्याकुलहृत्स्थल मजला स्तवितां स्वपुत्रभावानें ॥ ६ ॥**

याप्रमाणें त्यांची स्तुति केली. हा परस्परसत्कार योग्यच होता. ब्रह्मतेज व क्षात्रतेज एकवटल्यामुळें रावणासारख्यालाही तें दुरासद झालें व रिपुदमन होऊन वर्णाश्रमधर्माची स्थापना होऊन भरतखंडाला सुख झालें. तेव्हां अकालीं कोणी मरत नव्हता. एकदा एक वृद्ध ब्राह्मण पुत्रशोकग्रस्त होऊन रामाकडे आला व ह्मणाला " तुझ्या राज्यांत कोठें तरी 'वर्णाचारविपर्यय झाला ह्मणवूनि विप्रसुत मेला !' " रामाला तो उपरोधिक बोलला:—

**तुजसम नृप जगतीवर असतां रामा ! प्रजेसि काय उणें ? ।**
**स्वगुणें मत्तुल्यजनत्राणाचि करिजेल सर्वथा निपुणें ! ॥ ३२० ॥**
**संपादिलें बरें यश ! धर्मात्मा धन्य तूं भला राजा ।**
**हे तव गुण गायाला गेला स्वर्गासि बाळ हा माझा ! ! ३२१ ॥**

यावर नारदानें येऊन रामास सांगितलें:—

**हें वर्णचतुष्टय जरि निजधर्माचा करील परिहार ।**
**तरि परधर्माचारें होतो ऐसाचि लोकसंहार ! ॥ ३३० ॥**

यानंतर रामानें शोध करून ब्राह्मणधर्मरत शूद्र शंबूकाला दंड करून सर्व वर्ण स्वधर्मस्थित केले, व प्रजेला अपरिमित सुख दिलें व योग्यकालीं स्वर्गास प्रयाण केलें.

८ पंतांच्या दरबारीं भक्तिरसाच्या खालोखाल, किंबहुना बरोबरीनें वीररसाला मान आहे. पंतांच्या पूर्वकालीन सर्व काव्यांत मंत्ररामायणाचा नंबर पहिला लागतो, व त्यांतही युद्धकांडाची योग्यता विशेष आहे. सुग्रीव आणि रावण, लक्ष्मण आणि इंद्रजित, राम आणि रावण, व वानरवीर आणि राक्षसवीर यांचीं खणाखणीचीं युद्धवर्णनें यांत इतकीं अप्रतिम साधलीं आहेत कीं प्रत्यक्ष मयूरवीर त्या प्रसंगीं जातीनें हजर होते व स्वचक्षूंनीं पाहिलेल्या गोष्टी ते विलक्षण आवेशानें सांगत आहेत असा प्रतिपदीं भास होतो! वीररस व अद्भुतरस या दोहींचा उत्कृष्ट मिलाफ झालेला प्रस्तुत काव्यांत पाहण्यास सांपडतो. मंत्ररामायण रचण्यापूर्वीच पंतांना आर्येची टांप बरोबर साधली होती यामुळें, मनोवृत्तींच्या प्राबल्यामुळें, व संस्कृत शब्दभांडाराच्या किल्ल्या स्वाधीन झाल्यामुळें वीररसाचा ओघ असा अस्खलित चालला आहे. शस्त्रास्त्रांच्या खणखणाटाबरोबर शब्दास्त्रांचाही खणखणाट असा अमोघ चालला आहे, खऱ्या युद्धांतली वीरश्री अत्यंत सदृश अशा शब्दसमुहांचा पाट फोडून बेफाम होऊन धांवत आहे; कीं हीं वर्णनें वाचून क्षणैक ज्याच्या अंगांत मर्दुमकीचा आवेश चढणार नाहीं असा वाचक मिळणें मुष्किलीचें पडेल असें मला वाटतें. सुप्रतिभावान् कवि प्राक्कालीन इतिहास वर्णीत असतांना असा तन्मय होतो, वर्तमानकालाची त्याला विस्मृति पडते व भूतकालीन योद्ध्यांशीं व सर्वश्रेष्ठ पुरुषांशीं तद्रूप होऊन जातो, यामुळें भूतकालीन व्यक्ति प्रत्यक्ष डोळ्यांपुढें वावरतांना त्याला दिसतात, त्यांच्या कृति तो प्रत्यक्ष पुढें पाहतो, त्यांचे स्वभाव व त्यांचीं राजकारणें यांचीं गूढ रहस्यें त्याला आपोआप उकलत जातात! अशी स्थिति पंतांची प्रकृतप्रसंगीं झाली होती. पंतांनीं पुढें १०८ रामायणें रचिलीं, पण प्रकृत रामायणांतल्या युद्धकांडाची बरोबरी त्यांपैकीं कोणत्याही रामायणानें किंबहुना पंतांच्या भारतानें सुद्धां केली नाहीं. पंतांच्या कवितेचे उत्कृष्ट गुण या मंत्ररामायणांत आहेत. यांत नानाविध मनोरम अलंकार आहेत, सुंदर उत्प्रेक्षा आहेत; शृंगार, वीर, अद्भुत हे तीन रस मूर्तिमंत उभे केले आहेत; ‘ अर्थयमकाचे फार चमत्कार ’ आहेत; ‘प्रेम, प्रतिभा, शिक्षा’

हे गुण आहेत; उपदेशप्रसंग आहेत; रामराज्याच्या सुखाचें नामी वर्णन आहे; मारुतीचा बाहुप्रताप व रामभक्ति यांचीं सुंदर चित्रें आहेत—यांत मोरोपंतांच्या बुद्धिवैभवाची, अंतःप्रेमाची, भाषाप्रभुत्वाची, व प्रतिभासंपन्नतेची चांगली ओळख पटते. हा ग्रंथ स्वतः पंतांना इतका आवडला होता कीं पुढें नामरसायनांत त्यांनीं 'वाचा वाचाया बहु झड घाली, ग्रंथ सत्य नांवाचा' असें डौलानें ह्मटलें आहे! पंतांच्या काळीं सुद्धां हा ग्रंथ फार लोकप्रिय झाला होता, अशीं १००।१२५ वर्षांच्या मागें याच्या प्रती होऊन गांवोगांवीं परसल्या होत्या त्यावरून दिसतें. पंतांची कवीश्वर मंदिरांत तत्कालीन रामकांनीं जी स्थापना केली ती प्रथम प्रस्तुत ग्रंथावरून केली. काशीयात्राप्रकरणांत आबाजी जनार्दन कुळकर्णी, खरवडीकर, प्रगणे नेवासें-यानें पंतांना लिहिलेलें एक पत्र ९ व्या प्रकरणांत छापलें आहे. त्या पत्राचे मथळ्यावर सदर कुळकर्ण्यानें पुढील श्लोक लिहिला आहेः—

**एकाद्वित्रिचतुःशरर्तुगिरिभिर्वर्णैःक्रमोद्भासितैः**
**कृत्वा विश्रुतराममंत्रघटनां सर्वेषु कांडेषु च ।**
**यस्तत्प्राकृतभाषया ललितया रामायणं निर्ममे**
**तस्मै धीनिधये मयूरकवये तुभ्यं नमस्तांनमः ॥ १ ॥**

ह्या श्लोकांत आबाजीनें 'पंतांच्या मंत्रघटनेचें व ललित प्राकृत भाषेचें' गौरव करून त्या धीनिधीला ( बुद्धिसागराला ) नमन केलें आहे. पंतांच्या समकालीन पुरुषांना ह्या रामायणानें कसें चकित करून सोडलें हें वरील श्लोकावरून स्पष्ट दिसतें. खुद्द पंतांनीं ह्या रामायणाच्या उपोद्घातांतः—

**जसे होती देव प्रमुदित शचीनायकवनीं**
**तसे त्यारम्भाते बुधजन मयूरेशकवनीं ।**

असा स्वाभिमानाचा व डौलाचा उद्गार काढला आहे. पूर्वींचीं पांच सात काव्यें होऊन नंतर प्रस्तुत सुंदर ग्रंथ झाला तव्हां कवीला अशी अभिमानाची उक्ति प्रकट करण्याचें धैर्य आलें. प्रस्तुत ग्रंथाचा उपोद्घातही पंतांनीं निःसंशय ग्रंथसमाप्तिनंतर लिहिला आहे. त्याच्या आरंभीं **नमनरूप जी संस्कृत** आर्या आहे, तींत पंतांनीं आपले गुरु गणेशकाका पाध्ये याच्या **नखचंद्रकांतिसमूहांत** मला 'प्रतिभारत्न' मिळालें ह्मणून ह्मटलें आहे. **प्रतिभारत्नाचा लाभ झाल्याची** प्रतीति पंतांना मंत्ररामायणरचनाप्रसंगीं **आली व ह्मणूनच** या महालाभप्राप्तीचा त्यांना असा डांगोरा पिटतां आला!

९ प्रस्तुत काव्यांत उपमा, उत्प्रेक्षा व शब्दरचना अत्यंत समर्पक व ठाकठिकीची आहे, हें मागें दिलेल्या सुंदर उताऱ्यांवरून वाचकांच्या लक्ष्यांत आलेंच असेल तेव्हां त्याबद्दल विस्तार करण्याचें कारण नाहीं. उपमायोजनेंत कोठें कोठें अल्प दोष झालेले दिसतात. रामानें सीतेसाठीं शोक केला तेव्हां सुग्रीवप्रमुख सर्व वानरांनीं रामाचें सांत्वन केलें व " ह्मणति, 'विभो भेटेल क्षितिजेसह कीर्तिही नवी रमणी. " ( युद्ध. ४९ ) रामाच्या एकपत्नीव्रताची प्रसिद्धी होती, व रामाचें सीताविषयक शुद्ध प्रेम सुग्रीवादिकांना चांगलें माहीत होतें, तेव्हां त्यांनीं ' सीता पुन्हां प्राप्त होईल ' असें रामास आश्वासन देतांना कीर्तिरूप ' नवी रमणी ' ही तुला प्राप्त होईल असें ह्मणणें अयुक्त होय. कीर्ति ही अमूर्त असल्यामुळें मूर्त सीतादेवीला तिचा हेवा वाटायचें कारण नव्हतें हें खरें, पण रामाची सीतावियोगानंतर जी परम विव्हलता कवीनें वर्णन केली आहे तिला तरी प्रस्तुतसारखी उपमा योग्य नाहीं असें मला वाटतें! रावणानें बिभीषणाची निर्भर्त्सना केली त्यांत ' मच्छत्रुविजय इच्छिसि दुष्टा ! बंधुत्व हें तुझें जळलें ' ( युद्ध. ७० ) असा उद्गार काढला आहे. असा उद्गार नायकांच्या तोंडीं शोभला असता! अशोकवनांत रावणाबद्दल मारुती सीतेला ह्मणतो:—

**हा पलभोजन, गूथीं जसा कृमि, अघीं तसा रमे, यातें ।**
**मी पलमात्रें वधितों, जैसा मृगकांत सारमेयातें ॥ सुंदर० ॥ ७३ ॥**

रावणासारख्या महापराक्रमी देवरिपूला विष्ठेंतल्या अळीची दिलेली उपमा चिळस आणणारी असून फार क्षुद्र आहे ! उत्तरार्धांत त्याला कुत्र्याची उपमा दिली आहे तीही योग्य नाहीं, पण इतकी वाईट नाहीं; तथापि तिच्यांतही एक गोम आहे. या आर्येच्या पुढील आर्येंत रामयशोवर्णनाची मारुतीनें मोठी काळजी बाळगिली आहे, मग स्वतःला मृगकांत ह्मणजे सिंह ह्मणून घेतल्यावर नंतर रामाला द्यायला उपमा कोणती उरते ? मारुतीनें युद्धप्रसंगीं समोरासमोर उभे राहून रावणाला कुत्रा ह्मणून स्वतःकडे सिंहत्व घेतलें असतें तर हरकत नव्हती, कारण असा अहंकार उत्साहवर्धक असल्यामुळें वीररसाचें पोषणच करितो. पण प्रस्तुत प्रसंगीं तो अयोग्य आहे. माझ्या मतें ही सर्व आर्याच दोषरूप आहे. बलाढ्य शत्रूला उपमाही समर्पक दिल्या पाहिजेत. पंतांच्या उपमा बहुधा समर्पक असतात, पण पंतही असे एखाद्या प्रसंगीं चुकतात. वानरांनीं लंका वेढिली तेव्हां ते ' गुडराशिला

पिपीलिकसे व्यापणारे' दिसले ! ( युद्ध० ३८९ ) महद्वस्तूला अशा अत्यंत लघु उपमा शोभत नाहींत. साहित्यशास्त्रकारांनीं हा दोष ह्मणूनच गणला आहे. पंतांनीं एके ठिकाणीं 'अन्य निशाचर जीवनरस नेला राममार्गणभ्रमरीं' ( युद्ध० ३३४ ) असें ह्मटलें आहे. याचा अर्थ असा:—'रामबाणरूप भ्रमरानें राक्षसप्राणरूप रस हरण करून नेला' शृंगाररसाची जीवनभूत अशी ही उपमा युद्धप्रसंगीं अगदीं अप्रयोजक दिसते ! ही उपमा वीररसाला हानिकारक आहे व हंसांनीं ह्मटल्याप्रमाणें तीमुळें 'प्रलयसंमर्दनादि वीररसोत्कर्षक क्रियांचा लोप होऊन चुंबनालिंगनादिकांचा भास होऊं लागतो !' रावणवधानंतर दशरथानें विमानांतून उतरून रामास आशीर्वाद दिला तेव्हां त्याला 'विपक्षलोकप्रतापरविराहु' (युद्ध० ७६६) असें विशेषण लावलें आहे ! येथें रामशत्रुप्रतापाला सूर्याची उपमा दिली आहे, व रामाला राहूची उपमा दिली आहे ! राम हा सूर्यकुलोत्पन्न राजा, व सूर्ययश वाढविणाऱ्या राजांतला अग्रणी, असें असून सूर्याला क्षणभर ग्रासणाऱ्या राहूची उपमा त्याला देण्यांत केवढी रसहानी झाली आहे ! दुसरा दोष रामशत्रुप्रतापाला नित्य तेजस्वी सूर्याची उपमा देऊन त्याचें विश्वविजयित्व सुचविलें आहे ! म्हणजे या विशेषणानें विपरीतार्थनिष्पत्ति मात्र झाली आहे. संपूर्ण आर्या अशी आहे:—

**अस्थिरता जे श्रीची ते तुझ्या शत्रुजीवनीं राहो ।**
**संतत कल्याण असो ! विपक्षलोकप्रतापरविराहो ! !॥**

पूर्वार्धांत 'शत्रुजीवन लक्ष्मीसारखें चंचल असो' ह्मणून ह्मटलें आहे व उत्तरार्धांत शत्रुप्रतापाला सर्व दाहक व देदीप्यमान अशा सूर्याची उपमा दिली आहे. हा केवढा विरोध ! मला वाटतें पंत इतके अन्यत्र कोठेंही चुकले नसतील ! ! असो. असे चार दोन बारीकसारीक दोष प्रस्तुत परम सुंदर, परमाल्हादक, काव्यांत असले, तथापि ते पंतांच्या 'काव्यगुणसूर्यरश्मींपुढें गिरिगुहांतील अंधकारासारखे दूरच्या कोपऱ्यांत काणाच्या दृष्टीसही न येण्यासारखे आहेत,' हें निर्विवाद आहे.

१० प्रस्तुत काव्य जसें अत्यंत सरस उतरलें आहे तसे त्याचे उपोद्घातोपसंहारही अत्यंत सरस व महत्वाचे असे झाले आहेत. मोरोपंत गणेशकाकापाध्ये यांचे हाताखालीं संस्कृत पढून व्युत्पन्न पंडित झाले होते. तेव्हां त्यांच्यासारख्यांनीं नैषधचंपूसारखे सरस ग्रंथ नित्य चाळीत असून त्यांतील

शब्दश्लेष व अर्थश्लेष यांच्या मजा मारीत व त्यांतील कूटें उलगडून आपलें पांडित्यप्रदर्शन करीत शास्त्रीमंडळांत जन्म घालवयाचा, पण असें कांहींच न करितां त्यांनीं बिचाऱ्या मराठी भाषेचा अभिमान धरून पंचविशीच्या आंत तिच्यांत ग्रंथरचना करण्यास प्रारंभही केला! त्यांनीं प्रथम ब्रह्मोत्तरखंड लिहिला, तेव्हां मराठीभाषेच्या इतिहासांत आपली एकंदर कृति अद्भुत क्रांति करून तिची योग्यता वाढवील व तिला अभियुक्तभाषांच्या परिषदेंत बहुमानाचें स्थान देण्यास कारण होईल असें त्यांच्या ध्यानींमनींही आलें नसेल! त्यांनीं प्राकृत भाषेच्या उद्धारासाठीं हातांत लेखणी घेतली तेव्हां महाराष्ट्रांत सुशिक्षितांचे दोन वर्ग होते. एक केवलसंस्कृताभिमानी व प्राकृतविद्वेषी पंडित; व दुसरे मराठी संतमंडळाच्या कृतींवरच आपली भूक भागविणारे प्राकृताभिमानी पंडित. आज जसे इंग्रजी शिकलेले विद्वान् केवळ मराठी जाणणाऱ्यांची अशिक्षितांत गणना करितात व मराठी भाषेची पदोपदीं अवहेलना करण्यांत परमभूषण मानून इंग्रजीची उठल्या सुटल्या तारीफ करीत सुटतात, तसे त्यावेळीं पंचमहाकाव्यें, चंपू वगैरे पढून संस्कृतभाषेची थोरवी गाणारे संस्कृताभिमानी पंडित ‘ प्राकृतांत काय आहे हो! दरिद्री, मूर्ख, नेणत्यांची ती भाषा ’ असें ह्मणून मराठीची हेळणा करीत असत. उलटपक्षीं आज इंग्रजी भाषेचें अपार वैभव पाहूनही केवळ स्वाभिमानानें तिच्याकडे ढुंकूनही न पाहणारे जसे कांहीं लोक आहेत, तसे त्या वेळीं संस्कृत भाषेचा मराठीच्या अभिवृद्ध्यर्थ केवढा उपयोग होणार आहे हें न जाणतां केवळ ओवी व अभंग यावरच संतुष्ट राहणारेही कांहीं होते. मोरोपंतांनीं दोन्हीं पक्षांच्या मधला मार्ग स्वीकारला, व जाणते पुरुष नेहमीं असेच करितात. संस्कृतांतलें ज्ञानभांडार, संस्कृतांतल्या शब्दार्थांच्या चमत्कृति, संस्कृतांतले नानाविध रस व अलंकार, संस्कृतांतल्या वर्णनपद्धति या निःसंशय श्रेष्ठ प्रतीच्या होत हें जाणून त्यांची गोडी प्राकृतांना हळहळ लागावी ह्मणून पंतांनीं संस्कृतांतले ते ते प्रकार महाराष्ट्र भाषेंत आणले, व संस्कृत भाषेची महती व अभिमान कायम ठेवून मराठी भाषेचा महती व अभिमान वाढविला. संस्कृतज्ञांमध्यें जे केवळ शब्दशास्त्रीच होते त्यांचा पंतांना मनापासून राग येत असे. पंत पहिल्या प्रतीचे रसिक होते यामुळें अशांना पाहून ‘ रस न समजती. ह्मणविति रसिक, ह्मणुनि चित्त बहुत हळहळतें ,’ (रामगीति ६०) अशी पंतांची स्थिती होई. पंत व्युत्पन्न होते, रसिक होते, व

भक्त होते. व्युत्पत्ति, रसिकता व भक्ति हे गुण एकसंश्रयदुर्लभ असून त्यांचा त्रिवेणीसंगम पंतांच्या ठिकाणीं झाला, व ह्मणून पंतांच्या कवितेचा परिपाक इतका उत्कृष्ट उतरला आहे. आपल्या आयुष्यांतली आपली भाषाविषयक मुख्य कामगिरी पंतांच्या लक्षांत मंत्ररामायणरचनाप्रसंगीं आली ह्मणून त्यांनीं प्राकृतभिमान्यांना उपोद्घातांत गोंजारून घेतलें आहे व संस्कृताभिमान्यांची कानउघाडणी उपसंहारांत केली आहे:—

**गीर्वाणशब्द पुष्कळ जनपदभाषाचि देखतां थोडी ।**
**यास्तव गुणज्ञ लोकीं यांची घ्यावी हळू हळू गोडी ॥ १७ ॥**

आपली भाषा 'प्राकृतसंस्कृतमिश्रित यास्तव कोणी ह्मणेल ही कथा,' अशी शंका घेऊन पंतांनीं त्याला वरील आर्येंत उत्तर दिलें आहे कीं 'बाबा रे केवळ मराठी शद्बांतच मी आपलें हें काव्य रचिलें असतें, पण मराठी भाषेंत शद्बांचा पुरेसा भरणा नाहीं व गीर्वाणभाषेंत शद्बसंग्रह मोठा आहे, ह्मणून नाइलाजानें मला अशी मिश्रभाषा योजावी लागत आहे! हींच काव्यें अशींच हळू हळू वाचीत जा ह्मणजे तुह्मांला कालांतरानें तिचा परिचय होऊन ती कठिण वाटणार नाहीं व प्राकृत भाषाही येणेंकरून पुष्ट होईल!' उपसंहारांत पंतांनीं संस्कृताभिमान्यांची समजूत मुक्तेश्वरादि कवींप्रमाणेंच कांहीं युक्तीनें व कांहीं दांडगाईनें घातली आहे. पुढील मजेदार श्लोक पहा:—

**'गीर्वाणें राघवाचें यश रसिक जना लागतें फार मिष्ट ,**
**तैसें न प्राकृतानें,' अचतुर ह्मणती! मानिती तें न शिष्ट!! ।**
**पीतां गोक्षीरकांतस्वरमणिचषकें येतसे जेंवि गोडी**
**सारखाला पलाशद्रुमदलपटलें सेवितां ते न सोडी ॥ ११ ॥**

याचा भावार्थ असा आहे कीं वाल्मीकिप्रभृति कवींनीं रामयश संस्कृतांत गाइलें तरी गोड व आह्मीं तें प्राकृतांत गाइलें तरी गोडच. दूध सुवर्णाच्या रत्नखचित पेल्यांत प्यालें काय व पळसाच्या द्रोणांत प्यालें काय सारखेंच. पात्रभेदानें दुधाची गोडी थोडीच बदलते? तशी भाषाभेदानें रसहानीहि होण्याचें कारण नाहीं. सामर्थ्य असल्यास खुशाल सोन्याच्या पेल्यांतून दूध प्यावें! पण अशी श्रीमंती सर्वांना कोठून असणार? गरीबगुरीब पळसाच्या द्रोणावरच आपली गुजराण करणार! पंतांनीं पुढील दोन श्लोकांत आणखी दोन दृष्टांत दिले आहेत! (१) मोत्यांचा हार रेशमानें गुंफला काय व सुतानें गुंफला काय, प्रभेला कांहीं कमीपणा येत नाहीं. (२) चांदीचा दिवा असला काय

व मातीची पंती असली काय, दोहींतली दीपशिखा तमोनाश करण्यांत सारखीच समर्थ आहे. या तीनही दृष्टांतांत संस्कृत भाषेची श्रीमंती व मराठी भाषेची गरीबी सुचविली आहे, पण अज्ञानहारक सामर्थ्य दोहींकडे सारखेंच असून सौकर्यास्तव मराठीचा अंगिकार सर्वोपकारक आहे असा यांत ध्वनि आहे ! यासंबंधानें पंतांचा पुढील श्लोक फारच सरस आहे:-

**श्रीवाल्मीकिप्रभृतिमुनिहीं वर्णिली रामलीला**
**मादृक्षांहीं मुदितहृदयें काय गावें न तीला ? ।**
**श्रीकंठेंद्राद्यमरपरिषत्सेव्यगंगाप्रवाहीं**
**संध्यास्नानादिक न करणें या मानवांहीं ? ॥ ६ ॥**

या श्लोकाची गोडी काय वानावी ? रामलीलेला गंगाप्रवाहाची दिलेली उपमा पावनत्वासह अत्यंत समर्पक आहे. ' रामकथागंगेंत वाल्मीक्यादि देवतुल्य पुरातन मुनींना यथेच्छ विहार करण्यास जर हरकत नव्हती तर मजसारख्या समुत्सुक मुमुक्षूला त्यांत चित्तशुद्धीपुरतें निमज्जन करण्यास प्रत्यवाय कां असावा ? ' असें ह्मणण्यांत पंतांनीं प्राचीन कवींची योग्यता राखून आपलाही अधिकार प्रकट केला आहे. रामलीलेला शायला गंगेची उन्नत व परममंगल उपमा पंतांना आठवली हें त्यांच्या सद्भावाचें चांगलेंच प्रमाण आहे. गंगेविषयींचा पूज्यभाव हिंदुमात्राच्या हाडीमाशीं खिळलेला आहे. प्रस्तुतकाळच्या इंग्रजीपंडिताला अशी उपमा आठवणें कठीणच ! या उपमेपासून त्याला आल्हाद तरी कितपत होईल याची शंकाच आहे ! अनादिकालापासून चालत आलेल्या त्यांच्या राष्ट्रीयभावना नष्ट झाल्या असताल, त्यांची राष्ट्रीय वाङ्मयाची माधुरी कळण्याची पात्रताही नाहींशी होते. पंतांनीं उपसंहारांत " माझी सत्कृति दूषिली जरि खळें उत्कंखळें आग्रहें । सेवावीच परंतु नित्य रसिकें " अशी प्रार्थना केली आहे; त्याप्रमाणें रसिक पुरुषांनीं तिचें सेवन केलेंच आहे. पंतकवितेचे जे निंदक असतील त्याबद्दल पंतांच्याच शब्दांनीं सांगावयाचें म्हणजे ' चंडाळांनीं जरी त्रिभुवनपावनी गंगेंत वमन केलें, तरी तिचें अमृत श्रोतिय-देवसेव्यच राहणार ! ' ह्या मंत्ररामायणांत श्रीरामहनुमत्प्रभृति आर्यांचे आर्यचरित गातां गातां ' सरल आर्यावृंदें जन्मास आलीं,'-त्यांचें पूर्वींचें आयाससाध्यत्व नाहींसें हो-

ऊन त्या प्रसादप्रतिभागुणांमुळें तीं खळखळ मुखावाटे बाहेर पडलीं—व राम-यश गातां गातां मीं अंतर्बाह्य पूर्नात झालों—असें सांगतांना पंतांनीं उपो-द्घातांत ह्मटलें आहे:—

**आर्यकथाछंदानें आर्याछंदेंचि जन्मलीं सरलें ।**
**यांहीं माझें तनुवाक्कर्ममनःपाप सर्वथा सरलें ॥ १६ ॥**



# प्रकरण तेरावें.



## श्रीकृष्णविजय.

चहूं आश्रमां प्रकाशकु । त्रिलोकीं कृष्ण गृहस्थ एकु ।
तोचि ब्रह्मचारी नैष्ठिकु । अतिनेटकु संन्यासी ॥ १ ॥
तेणें अवाप्तसकळकामें । ऐसी आचरिला अगाध कर्मे ।
मानव तरावया मनोधर्मे । कीर्ति मेघश्यामें विस्तारिली ॥ २॥

—श्रीएकनाथ.

१ कृष्णविजय उर्फ बृहद्दशम या ग्रंथाचें काठिन्य. बावापाध्ये यांच्या सूचनेवरून सदर ग्रंथ पंतांनीं लिहिला. २ निंदकांचा समाचार; कृष्णभक्ति; ' अभय दिधलें आहे, वाहे शुचिप्रतिभा झरा. ३ पातिव्रत्यधर्म आणि गोपी. ४ प्रद्युम्नकथा. ५ कृष्णाचा रुक्मिणीशीं विनोद. ६ दुर्योधनाचा मद. ७ श्रीकृष्णाचा गृहस्थाश्रम ( सर्व करून अलिप्तता. ) ८ रुक्मिणीचें स्वविवाहवृत्तकथन. ( अतिसुलभ व अतिप्रेमळ आख्यान. ) ९ सुभद्राविवाहाची सुप्रसिद्ध कथा ( विनोद व हास्य यांचें उत्कृष्ट उदाहरण. ) १० पृथ्वीवृत्तांतली ईशस्तुति. ११ पहिले १०।१२ ग्रंथ. १२ उपसंहार.

१ कृष्णविजयाला बृहद्दशम असेंही ह्मणतात. पंतांनीं श्रीभागवताच्या बाराही स्कंधांवर ' मंत्रभागवत ' ह्मणून एक विस्तृत ग्रंथ आपल्या उत्तरवयात लिहिला, त्यांतही दशम स्कंधावर एक प्रकरण आहेच. तेव्हां त्याहून हा ग्रंथ निराळा आहे व अधिक विस्तारानें लिहिला आहे हें दाखविण्यासाठीं मागाहून याला मोठा दशम ह्मणजे बृहद्दशम असें लोक ह्मणूं लागले. खुद्द पंतांनीं या ग्रंथाला ' कृष्णविजय ' असेंच ह्मटलें आहे. या ग्रंथाचे एकंदर अध्याय मूळाप्रमाणेंच ९० आहेत. पूर्वार्धांत ४९ व उत्तरार्धांत ४१. एकूण पद्यसंख्या ३॥ हजारांवर आहे. पूर्वार्ध व उत्तरार्ध या दोहींच्या शेवटीं उपसंहार आहेत. पहिल्या ५४ अध्यायांत आर्यावृत्ताची योजना केली आहे,हें वृत्त ह्मणायला जड जातें. प्रथम पंतांनीं याच वृत्ताला हातीं धरिलें होतें, पण हें वृत्त ह्मणायला अवघड असल्यामुळें पुढें पंतांनीं आर्यागीतीचा अवलंब केला.

पंतांच्या वेळेपासून ज्या वृत्ताची आर्यावृत्त ह्मणून प्रसिद्धी झाली आहे तें वृत्त वस्तुतः गीति होय. अध्याय ५४-७९ पर्यंत कुशलवचरिताप्रमाणेंच विविधवृत्तांची योजना केली आहे, व शेवटचे ११ अध्याय मात्र पंतांनीं प्रसिद्धीस आणलेल्या आर्यावृत्तांतच लिहिले आहेत. प्रस्तुत ग्रंथाचा उत्तरार्ध ह्मणजे अ. ५४ पासून अखेरपर्यंत अत्यंत सरस उतरला आहे. काव्यदृष्टीनें पूर्वार्धही चांगला आहे, पण सहज मुखानें न ह्मणतां येण्यासारख्या आर्यावृत्तांत त्याची रचना झाल्यामुळें व तीही फार क्लिष्ट व यमकप्रचुर अशा भाषेंत झाल्यामुळें तो लोकांच्या फारसा पाहण्यांत येत नाहीं. प्रस्तुत ग्रंथाबद्दल दोन आख्यायिका आहेत. एक अशी आहे, कीं पंतांच्या सोप्या व सरळ भाषेंतली लहान लहान काव्यें वाचून त्यांचा एक स्नेही त्यांस ह्मणाला, " ही कविता कसली ? एखादा पोर सुद्धां ही लावील ! " हें ऐकून पंतांनीं बृहद्दशमाच्या आर्यागीति तयार केल्या ! ! ( विविधज्ञानविस्तार वर्ष ४ अंक ६ ) दुसरी आख्यायिका अशी आहे कीं बाबा पाध्ये यांच्या सांगण्यावरून पंतांनीं हा ग्रंथ रचिला. व त्यांच्या सारख्या पंडितालें सुद्धां हा फार कठिण झाला असा अभिप्राय दिल्यावरून पंतांनीं मंत्रभागवत लिहिलें. मंत्रभागवत हा ग्रंथ पुष्कळ सरळ व सोपा असल्यामुळें व त्यांत यमकानुप्रासांना पंतांनीं प्रवेश करूं न दिल्यामुळें सर्वांना सहज लागेल असा सुलभ झाला आहे. शंकर पांडुरंग पंडित या संस्कृतपंडितानें प्रस्तुत कृष्णविजयग्रंथावर विपुल टीपा देऊन प्रथम प्रसिद्ध केला तेव्हां त्यांची सुद्धां ग्रंथ उकलतांना कशी तारंबळ उडाली हें त्यांच्या टीपांवरून दिसून येतें. असो. वरील दोन्ही आख्यायिकांत उघड दिसणाऱ्या दोन गोष्टी खऱ्या आहेत. एक प्रस्तुत ग्रंथ ह्मणजे त्याचा पूर्वार्ध फार बिकट झाला आहे व दुसरें तो बाबापाध्यांच्या सांगण्यावरून पंतांनीं रचिला आहे. बाबापाध्ये कृष्णोपासक होते व त्यांनीं भागवताच्या दशमावर ' तोषणीसार ' ह्मणून संस्कृत टीकाही केलेली प्रसिद्ध आहे. बाबा पाध्ये व मोरोपंत हे दोघे परम मित्र होते व पुढें तर व्याहीव्याही झाले. उभयतांनीं मिळून भागवताच्या दशमावर विस्तृत टीका केल्या आहेत. भेद एवढाच कीं पंत हे कवि असल्यामुळें त्यांनीं 'कृष्णविजया'सारख्या स्वतंत्र काव्यरूपानें मराठींत ती टीका केली व बाबा हे पंडित

१ वृत्तीं आर्धीं आर्या ध्याव्या सेव्याचि फार साधी आर्या ।
युक्ता सद्यमकांनीं व्यावी रसिकीं करूनि उद्यम कानीं ॥ ५ ॥

असल्यामुळें त्यांनीं संस्कृतटीकापद्धतीप्रमाणें ती संस्कृतांत केली. बाबांचा 'तोपर्णासार' पंतांच्या 'कृष्णविजया' च्या मागाहून झाला आहे. कृष्णविजयाच्या पूर्वार्धाच्या अखेरीस पंतांनीं 'सज्जनप्रार्थना' केली आहे तींत 'श्रीमद्भागवतामृतोदधि तुह्मी अर्थज्ञ ते मेघसे' असा उद्गार आहे तो मुख्यत: बाबांना उद्देशूनच दिसतो. त्याचप्रमाणें ग्रंथसमाप्तीच्या वेळीं ( अ. ९० ) पंतांनीं ह्मटलें आहे:—

**कीर्ति श्रीपतिचीच सज्जन सदा सप्रेम आकर्णिती**
**सर्वस्तुत्य कवींद्र शौरिचरितें अत्यादरें वर्णिती ।**
**गावें नित्य 'मुकुंद सद्यश यथाबुद्धि त्यजूनि त्रपा'**
**ऐसें सांगति, पाजिती हितसुधा विद्वत्सभा सुप्रपा ॥ ४२ ॥**
**ते आज्ञा स्वशिरीं धरूनि भगवद्भक्तप्रिया सत्कथा**
**श्रीरामात्मज साधुशिष्य वदला सोडूनि सर्वव्यथा ।**
**हें मानेल निजप्रसादमुखरच्छात्रोक्त साधुव्रजा**
**जैसें शिक्षित कीरभाषण रुचे कीं जें वदे स्वप्रजा ॥ ४३ ॥**

या सविनय प्रेमळ उद्गारांवरूनही पंतांनीं प्राकृत ग्रंथ कोणा विद्वान् संतांच्या प्रेरणेनें लिहिला हेंच सिद्ध होतें. आतां येथें बाबांचें नांव नाहीं हें खरें, पण एकंदर प्रकारावरून बाबांचीच 'आज्ञा स्वशिरीं धरून' पंतांनीं प्रकृत ग्रंथ लिहिला असें मला निभ्रांत वाटतें. शिवाय लोकप्रसिद्धीचाही निष्कारण अवमान करण्यास कांहीं कारण नाहीं.

२ पूर्वार्ध फार क्लिष्ट झाला ह्मणून त्यावर कांहींजणांचा रोप होऊन प्रतिकूल टीकाही झाली असावी. पूर्वार्धाच्या अखेरीस, कोणत्याही छापील प्रतींत नाहींत असे, निंदकांवर खूप करडी पण दयाळूपणाची नजर ठेवून टीका केले ले, पांच सुंदर श्लोक मूळ पंतलिखित प्रतींत आहेत. कित्येक वर्षांनंतर पंतांनीं हे श्लोक तेथें स्वहस्तें लिहिले आहेत. त्यांपैकीं एकच श्लोक पहा:—

**आह्मां श्रीरामभक्तां अजितनुतिविणें स्वस्तुती तो न अर्हा,**
**पापघ्नी पुण्यदात्री करिशिल जरि तूं निंदका ! होय गर्हा ।**
**मानूं तोषा न रोषा परि ह्मणति तुह्मां निंदका वेद, 'वाटे**
**स्वर्गाच्या चूकले हे पडतिल नरकीं !, हा मना खेद वाटे!॥४॥**

निंदकाची जिव्हा दुसऱ्याचे दोप काढण्यांत तरबेज असते. ती त्याचीं पातकें पुसून टाकून त्याचा उद्धार करिते ह्मणून पंत ह्मणतात.:—' सन्मान्या

चिरंजीविनी तुझी असो तीं निंदका ! जीभ रे. ' वरील पांच श्लोक केवळ पूर्वार्धाच्या टीकाकारांलाच उद्देशून लिहिले आहेत असें नाहीं, पण ते तेथेंच सुचण्यांत कांहीं तरी कार्यकारण संबंध असला पाहिजे. प्रस्तुत ग्रंथ लिहितांना आपली पंडितता मिरवावी असा दांभिकपणाचा गर्व धरून मीं ग्रंथ लिहिला नाहीं तर श्रीकृष्णप्रीतीला वश होऊनच लिहिला आहे व हा माझ्या मनांतला "श्रीमद्विश्वात्मसाक्षी तदनुगजनही जाणती भाव सर्व," असें पंत ह्मणतात तें यथार्थ आहे. पूर्वार्धाच्या काठिन्याबद्दल, संस्कृतशद्बप्राचुर्याबद्दल, व यमकवैपुल्याबद्दल कोणाचा कसाही अभिप्राय असला तथापि आद्यंत्य सारा ग्रंथ विमल भगवद्यश गाण्यासाटीं पंतांनीं रचिला असल्यामुळें त्यांच्या परमपावन भगत्प्रेमाच्या आर्द्रतेनें त्याला सर्वत्र सारखीच माधुरी आली आहे, हें कोणासही कबूल करावें लागेल. उत्कट प्रीतीमुळें सदर ग्रंथाला एकप्रकारचा विलक्षण सांघपणा आला आहे व वाचकांच्या दृष्टीनें पूर्वार्ध कठिण झाला असला तरी त्यांत मुद्रां प्रसाद आहे. सर्वच ग्रंथ प्रसादयुक्त आहे. हा लिहीत असतांना पंतांच्या शुचिप्रतिभेचा विमल झरा वाहत होता ! अंतःप्रेरणेनें त्यांना वाटत होतें कीं संतकृपेनें प्रकृत ग्रंथांत उत्तम प्रकारचा प्रसाद उतरला आहे. ते ह्मणतातः—

**अभय दिधलें आहे, वाहे शुचिप्रतिभा झरा !**
**विधुमणिचिया सारा ताराप कारण पाझरा ।**
**जडहि कविता जोडी, गोडी गुणीं हरिच्या धरी,**
**सहज तुमचा हीना दीना प्रसाद समुद्धरी ॥ ३ ॥**

पूर्वार्ध, उपसंहार.

प्रस्तुत ग्रंथाची रचना चालली असतांना मधून मधून पंतांना भक्तिसुखानुभवजन्य रोमांचादि सात्विक अष्टभावांची प्रतीति येत असे. श्रीकृष्णलीलांचें मननगायन करितांना वारंवार त्यांच्या नेत्रांतुन प्रेमाश्रूंचे पूर वाहत, व स्वतः भगवद्दयापात्र झाल्याबद्दल त्यांना परमधन्यता वाटे. यासंबंधीं जेव्हां जेव्हां पंतांचे उद्गार प्रकट होतात तेव्हां तेव्हां ते वाचकांच्याही वृत्ति क्षणैक तरी तद्रूप करितात. अ. ९९ चे शेवटीं पंत ह्मणतातः—

**मेघाचें प्रतिबिंब पाहुनि सुखें नाचोंचि लागे भुले**
**मानी सर्व मनोरथद्रुम फळीं ओथंबले आपुले! ।**
**ऐसा भक्तमयूर चातक हि जो नेणे दुजीं भावुकें**
**३३—३४**

**तो साक्षाद्धमदर्शनीं किति सुखी ते प्रेमळा ठावुके ! ॥ ५१ ॥**

तसेंच अ. ५७ मध्यें

**दयामृतघन श्रीमान् कृष्ण लक्ष्मीपती हरी ।**
**करी भक्तमयूरातें सुखी हत्ताप संहरी ॥ ६१ ॥**

कृष्णविजय ग्रंथावर वामनरावजी ओकांनीं टीपा देतांना मूळ ग्रंथाशीं प्रस्तुत ग्रंथाची तुलना करून जागोजाग विस्तारसंक्षेपाचीं स्थळें दाखविलीं आहेत व कित्येक ठिकाणीं पंतांनीं व्यासावरही कशी ताण केली तेंही सप्रमाण दाखविलें आहे. त्यांनीं एके ठिकाणीं म्हटलें आहे; " पंत स्वप्रतिभाबळानें नूतन अलंकार घडवून ते मूल ग्रंथकाराच्या सरस्वतीवर घालून तिला कशी साजरी करितात हें पहावयाचें असेल तर तसें करण्यास हें काव्य हें उत्तम स्थळ आहे. यांत पंतांनीं आपले पदरचे नग घालून मूल ग्रंथकाराच्या वाणीला ठिकठिकाणीं अत्यंत मनोहारित्व आणिलें आहे. " ही गोष्ट खरी आहे.

३. आतां प्रस्तुत ग्रंथांतल्या कांहीं उत्कृष्ट स्थळांचा विचार करूं.

श्रीकृष्ण गोपींना पातिव्रत्यधर्म शिकवितात ( अ. २९ ):—

**पति तद्बांधवसेवा हा स्त्रीचा मुख्य धर्म यातें सेवा ।**
**बाळातें पोसावें हित भेषज लागतां कटुहि सोसावें ॥ २६ ॥**
**अगुण सगुण पति तातें द्विधला त्यजिजे न टाकिजे पतितातें ।**
**कीं जारीं सुख न सती वांछिति, दोन्हीहि लोक येणें नसती!॥२७॥**

या नंतर 'सर्व धर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज ' हें रहस्य भगवत्सहवासानें ज्यांच्या मनांत पक्कें ठसलें होतें त्या परमभागवत गोपींची अवस्था काय झाली व त्यांनीं श्रीकृष्णास काय उत्तर दिलें तें पहा:—

**भ्याल्या मदन-दवाला धांवति सेवावयासि पद-नद बाला ।**
**तो बहु दुस्तर वाटे मध्यें या धर्मनर्म रोधचि वाटे ॥ ३१ ॥**
**पंकांत द्रमी रुतती ते व्याकुळ जाहलीच तसि भीरुतति ।**
**चरणांगुष्ठें महिला खणिति शिरायासि काय दुःखितमहिला ॥३२**
**केलें रामांवर जें क्षण औदासीन्य सदय रामावरजें ।**
**तें दे बहु भी रुसती स्वजीवनीं न जगजीवनीं भीरु सती ॥ ३४ ॥**
**प्रणयक्रोधवशमती सुदती वदती विलोकुनी धव शमती ।**
**" क्रूर विभो न वदावें दग्धातें काय जाळिसी नव-दावें ॥ ३६ ॥**
**न जरि आवडि, लांचे त्वत्पदजनाच्या करूं भजन वडिलांचें ।**
**याविण गेहीं न सवे लागे कैची क्रिया उगेही न सवे ॥ ४० ॥**

**शिपिलियां तरुबुड तें दळफळकुसुमांत जळ मिळे कीं बुडतें ? ।**
**कथिला तो धर्म-पण त्वच्चरणीं अर्पितां खरें धर्मपण " ॥ ४१ ॥**

४ प्रद्युम्नविवाहाच्या कथेंत (अ. ५९) शृंगारवीरवत्सलरसांची फार बहार उडाली आहे; पंतांचा 'शृंगार' ह्मणजे नेहमीं मर्यादा रक्षून वर्णिलेला असायचा:—

**भृंगाची पंक्ति मौर्वी, कुसुममय धनू बाण तेहि प्रसूनें**
**लीलेनें दास केले असुर सुर नर प्रौढही ब्रह्मसूनें । ......**

त्या ब्रह्मसूचा ह्मणजे मदनाचा प्रताप यांत चांगलाच वर्णिला आहे. रतीनें मायावती रूप धारण केलें होतें, तिचा:—

**लज्जा व्यालोलदृष्टीं स्मितरुचिरमुखीं भ्रूयुगीं नृत्य नर्म**
**व्याहारीं कोमलांगीं अभिनव मिरवे घर्म रोमांचधर्म । ...**

हा थाट पंतांनीं छान वर्णिला आहे. प्रद्युम्नाला द्वारकेंतून पळवून नेलें ह्मणून रुक्मिणी शोकग्रस्त झाली होती. मायावतीनें प्रद्युम्नाला गगनपथानें द्वारकेंत आणलें, तरी कृष्णपत्न्यांना त्याची ओळख पटली नाहीं तथापि सहजवात्सल्यानें रुक्मिणीची स्थिति कशी चमत्कारिक झाली ती पहा:—

**वैदर्भी यास पाहे, द्रव हृदयिं धरी, तत्क्षणीं स्तन्य वाहे,**
**कीं ते आनंद लाहे जन्हि तनुज असें ज्ञात होणेंचि आहे, ।**
**बाष्पानें कंठ दाटे, सकळ तनुवरी क्षिप्र रोमांच थाटे,**
**शोकाचा सिंधु आटे, त्वरित परम तद्दर्शनीं लाभ वाटे ॥ २९ ॥**
**ह्मणे ' हा कोण श्रीयदुपतिसम श्रीनरमणी ?**
**गर्भे या पुत्रास प्रसवलि नराची न रमणी ।**
**अशा रत्नाची जी खनि जनि तिचा धन्य कुसवा !**
**स्वयें याचें वृत्त प्रियसखि ! पुसा गे न पुसवा ' ॥ ३० ॥**

रुक्मिणीला हा स्वपुत्र आहे हें कळतांच परमानंद झाला हें सांगणें नकोच.

५ श्रीकृष्णानें रुक्मिणीशीं एकदां विनोद केला कीं ' हातचा राजा सोडून मला गवळ्याला वरून फसलीस ! अजून तरी अनुरूप वराला वर ! ही श्रवणकटु भाषा ऐकून वावटळीनें केळ उन्मळून पडावी तशी ती पडली. तिला श्रीकृष्णानें प्रेमानें उचलून धरिलें, सावध केलें, व सांत्वन करितांना ते ह्मणाले:( अ. ६० )—

**कसें वदसि ? पाहसी ? चलकटाक्षमोक्षेक्षण**
**प्रिये ! भृकुटिशोभि हें मुख तुझें पहावें क्षण ! ।**

**कसें अधरपल्लवस्फुरण ? लोचनीं शोणता ?**
**गृहीजन तयास यापरिस लाभ तो कोणता ! ॥ ८ ॥**
**विनोदरससागरीं रमति मीनसे दंपती**
**अशा कलहसांत्वनीं दिवसयामिनी संपती ! ।**
**ह्मणोनि परिहास हा सहज आजि केला, लसे**
**तुझें न मुख, भीतिला न धरि नायिके लासले ॥ ९ ॥**

६ सुयोधनसुता लक्ष्मणा कृष्णसुत सांबानें हरण केली, तेव्हां कौरव यादवांचें युद्ध जुंपलें. त्या प्रसंगाचें वर्णन करितांना ( अ. ६८ ) दुर्योधन-बळरामप्रभृतींचीं औपरोधिक व व्याजोक्तिपर भाषणें इतकीं सुंदर वठलीं आहेत कीं तीं वामनरावजी ओकांच्या सूचनेप्रमाणें ' वक्तृत्वकलाप्राप्ती-च्छु जनांनीं वारंवार पहावींत. ' यादवांना आह्मीं योग्यतेला चढविलें असा डौल मारतांना दुर्योधन ह्मणतोः—

**आह्मीं वाढविले, नृपासन दिलें. कीं सोयरे हे पृथा-**
**काकीचे निजबंधु, जाय अमृत व्याळासि देतां वृथा ! ।**
**केले आत्मसमान. मान दिधला शय्यासनीं भोजनीं**
**ते आह्मांसि निलाजिरे यदु पहा ! आज्ञापिती हो जनीं ! ! ॥२७॥**

या दुर्मदाचें बळरामानें पुढील दहा श्लोकांत मोठ्या त्वेषानें सुंदर खंडण केलें आहे.

७ यापुढील अध्याय ह्मणजे ६९ वा कृष्णविजय ग्रंथांतल्या सर्व अध्यायांत अत्यंतात्यंत गोड आहे. मोरोपंतांच्या काव्यार्णवांतलें तें एक अतिसुंदर मौक्तिक आहे. त्यांत परमेश्वराचा पूर्णावतार पूर्णब्रह्मचारी जो श्रीकृष्ण त्याचा गृहस्थाश्रम वर्णिला आहे ! हा अध्याय वारंवार वाचूनही मनाची तृप्ति होत नाहीं. केवळ काव्यवाचकाला या अध्यायापासून आनंद होणारच आहे, पण सश्रद्ध सगुणोपासक भगवद्भक्ताला धर्मबुद्धि नित्य जागृत ठेवायला एवढा अध्यायच पुरे आहे ! सोळा हजार बायकांचा व साष्टशत नायिकांचा पति द्वारकेंत योगमायाविलास भोगून पुन्हां ब्रह्मचारीच होता; या गोष्टींचें रहस्य ज्याला यथार्थ जाणतां येईल तो भाग्यवंत खरा ! ईश्वराचे अनंत अवतार झाले, पण श्रीकृष्णावताराचीं कृत्यें व त्यांचीं रहस्यें यांची गोडी कांहीं अनुपम आहे. असो. श्रीकृष्णाचा संसार पाहण्यासाठीं एकदा नारदाची स्वारी द्वारकेंत आली. तेव्हां ब्रह्मण्यदेवानें त्याचे पाद प्रक्षाळून पादोदक शिरीं धरिलें आणिः—

प्रेमें पूजुनि हस्त जोडुनि ह्मणे " आह्मांस हीं पावलें
द्यावाया अजि विश्वतारक ! तुह्मां स्वामी बरें फावलें ।
झाला धन्य कृतार्थ वंश यदुचा ! केली दया, वासरा
जोडा नाहिंच, भेटली बहुदिसां हे गाय या वासरा " ॥ ११ ॥

यानंतर नारदानें भगवंताची स्तुति करून ह्मटलें:--

द्यावें हेंचि विभो ! अभीष्टवरदा ! देवा ! तुझीं पावलें
चित्तीं नित्य असोत, सर्व ह्मणजे या याचका पावलें ।
प्रेमें गाइन युष्मदद्भुतयशें नाचेन युष्मज्जनीं
पावो निर्वृत्ति याद यादवपते पाथोधिच्या मज्जनीं ॥ १५ ॥

यानंतर नारद श्रीकृष्णाचीं एकेक मंदिरें पाहत सारी द्वारका पाहत चालले. कोठें श्रीकृष्ण भक्तगृहीं आहेत, कोठें स्त्रीशीं विनोद करिताहेत, कोठें मंत्र्यांशीं मसलत करिताहेत, कोठें युद्धवार्ता चालल्या आहेत, कोठें अक्षक्रीडा खेळताहेत अशा प्रकारें एकच श्रीकृष्ण अनंत रूपांनीं नटलेला पाहून नारदास धन्य वाटलें. त्या प्रसंगाचे ४।५ श्लोक येथें देतों.

पावे विस्मय विप्र तेथुनि उठे पाहे गृहीं तो तिज्या
तेथें खेळवितो मुलें, प्रियतमाकर्णीं सुधा होति ज्या--[1]।
त्या गोष्टी वदतो, सतोष हंसतो, वाखाणितो तन्मती,
ज्यांच्या सुश्रवणें सुखें निरुपमें लक्षावधी जन्मती ॥ १८ ॥

संध्योपासन मौन मंत्रजप या कर्मींच कोठें असी ।
मोठी आवडि दाखवि प्रभु ! करीं कोठें धरूनी असी ।
सद्धर्मीहि[2] कृपाणमार्गगतिचा अभ्यास दावी, रसा
वीराच्या मिरवी रवींदुकुलज[3]स्वामी नवा वीरसा ॥ २० ॥

मंत्री सज्जन उद्धवादि सुमती-नीतिज्ञ जे तारणीं
लोकांच्या-पटु-मंत्र[4] त्यांसह करी तो शत्रुजेता रणीं, ।
कोठें दाखवि नीरकेलिरस[5] तो घेऊनि योषा हरी,
चित्ताला मुनिच्या मुकुंद काळिच्या सर्वाहि दोषा हरी ॥२२॥

---

१ ज्या गोष्टी ऐकून कृष्णपत्नीला परमानंद होई, त्याच गोष्टी सांगून तिच्या मुलांच्या लीला सकौतुक पाहतो. २ धर्मात्मा असून ही तलवार वगैरे फिरवायचा अभ्यास करी. ३ सूर्यचंद्रवंशांतल्या राजांचा अग्रणी- ४ मसलत, कारवाई. ५ जलक्रीडेची आवड.

कोठें ऐके पुराणें निजचारतसुधाभाजनें सेतिहासें,
कोठें स्त्रीसीं विनोद प्रभु करि हरुनी स्वांत जे[1] नेति हांसे, ।
कोठें सद्धर्म, कोठें यदुकुळमणि तो अर्थ, कोठें हि काम,
प्रेमानें सेवि कोठें प्रकृतिपरमहोध्यानें[2] दावी निकाम, ! ॥२४॥
कोठें अत्युत्सवानें करि यदुपति तो पुत्रपुत्रीविवाहां, ।
दे हर्षें जावयांतें मणिकनकरथस्तोमें[3] सद्धस्ति वाहां, ।
कन्या जाति स्वगेहाप्रति पतिसह तें वृष्णि भूशाक्रपाणी
आणी नेत्रांस कोठें बहु धरुनि तया पोटिशीं चक्रपाणी ! ॥ २७ ॥

हा अध्याय मूळांतही मनोरम आहेच, पण ही त्याची मराठी प्रतिकृति वाचकांनीं सद्भावपूर्वक अवश्य पाहावी अशी त्यांस नम्र प्रार्थना आहे.

८. ' कौरवयादवभार्या एकाजागीं मिळोनियां ' बसतात. व त्या आपापल्या विवाहोत्सवकथा प्रेमानें एकमेकींस सांगतात तो प्रसंग. मुख्यतः कृष्णपत्नी रुक्मिणी इच्या विवाहाचा प्रसंग पंतांनीं फार बहारीनें वर्णिला आहे. (अ. ८३ ) रुक्मिणी आपल्या विवाहाची कथा पहिल्यापासून मोठ्या आवडीनें, अभिमानानें, मोकळेपणानें आपल्या मैत्रिणींना–कृष्णप्रेमानें ज्यांची हृदयें पूर्ण भरिलीं आहेत अशा 'यादवकौरवांतल्या प्रमुख स्त्रियांना'–सांगत आहे, या मनोरम प्रसंगाचें गोड वर्णन करायला पंतांसारख्या गृहसुखाची गोडी जाणणाऱ्या प्रेमळ सुजनानेंच लेखणी हातीं धरावी ? वैदर्भीविवाहाची कथा मूळांत एकाच साध्या श्लोकांत आटपली आहे, पण प्रस्तुत ग्रंथ कृष्णचरित्रपर होय हें तारतम्य जाणून पंतांनीं येथें तिचा फार मार्मिकपणानें विस्तार केला आहे; व कृष्णविवाहाची गोडी उघडच रुक्मिणीला अधिक खरेपणानें, स्वानुभवाच्या धिटाईनें, व उल्हासानें सांगतां येईल हा भाव मनांत आणून पंतांनीं ती रुक्मिणीकडूनच वदविली आहे! रुक्मिणी आपल्या विश्वासाच्या मैत्रिणींच्या मंडळांत स्त्रीभावाला अनुरूप अशा साध्या गोड सरस वाणींत ती सांगत आहे !! व पंत केवळ मार्मिक व हुषार बातमीदाराचें काम बजावीत आहेत. असो, आतां आपणही थोडेंसे आडून रुक्मिणीचें भाषण ऐकूं, स्त्रियांचें भाषण आडून पुरुषानें ऐकणें हें अकार्य खरें, पण रुक्मिणी जगन्माता आहे व पंतांसारखा सुशील मित्र पुढें झाल्यावर त्याच्या मागें जायला आपल्याला थोडी देखील शंका वाळगायला नको ! !

१ जो स्त्री हास्य करून चित्त हरी. २ महत् ब्र० ब्रह्मतेज. ३ समूह.

**प्रथम ह्मणे वेदर्भी ' बाई ! होते लहान मी कन्या ।**
**धन्या कृष्णकथा मज तेव्हांचि रुचे, न आवडे अन्या. ॥ ९ ॥**
**भगवद्भक्त ब्राह्मण जे येती मत्पित्याचिया गेहा।**
**ते हारि हरियशोमृत पाजिति–तें मात्र चालवी देहा ॥ १० ॥**
**हरिगुणगायक सज्जन ते धनलोभी नव्हेत परि हार**
**मुद्रा कंकण द्यावें, न करिति मातापिताहि परिहार ॥ ११ ॥**
**ज्या दिवशीं हरिचरितश्रवण नसे त्यांत मज दहा दुखणीं, ।**
**दुखणी काय नवखणी माडी नलगे, धरा नखेन्दु खणी. ॥ १२ ॥**

श्रीमंत बापाच्या लाडक्या मुलीला साजेसेंच हें बोलणें आहे. आईबापांच्या मनांत तिला श्रीकृष्णालाच द्यायचें होतें, पण ' रुक्मी माझा दादा जो आह्मां साजणांमध्यें मोठा, ' त्यानें तिला चैद्यालाच द्यायचें ठरविलें. तेव्हां रुक्मिणीनें सुदेव ब्राह्मणाबरोबर एक पत्र दिलें तें:—

**स्वकरें वसंततिलकावृत्तें पत्रांत सात मोजूनी ।**
**लिहिलीं होतीं तींहि लिहितां लिहितां क्षणांत योजूनी ॥ २४ ॥**

लग्नाचा दिवस उगवला तरी श्रीकृष्ण आले नाहींत तेव्हां तिची कशी तथा उडाली ती पहा ! :—

**चिंताज्वरांत रात्रौ माझा नाहींच लागला डोळा ।**
**जायासाठीं कंठीं शतधार प्राण जाहले गोळा ॥ ३५ ॥**
**लावियला म्यां दुःखीं बाई ! त्या ईश्वरासही बोल ।**
**यत्पदपद्मरजाचें चिंतामणिकोटिही नव्हे मोल ॥ ३६ ॥**

रुक्मिणी निराश झाली असतां शुभ शकुन झाला:—

**तों प्रियकंठीं आपण पडोन हेही सुखांत पाडावी ।**
**या भावेंचि स्फुरली करि माझी भुजलता कृपा डावी ॥ ४० ॥**

श्रीकृष्ण येतांच रुक्मिणीच्या चित्तांतून निघून चिंता चैद्याच्या मनांत घुसली:—

**कृष्णागमनानंदें हृदयांतुनि ज्यां बळेंचि घालविलें ।**
**चैद्यादिमनें द्याया स्थळ त्यां चिंतादिकांस पालविलें ! ! ॥ ५३ ॥**

अंबेच्या नमनाला रुक्मिणीला नेलें तेव्हां:—

**मग बाई ! दादाचे मागधचैद्यादिकांही मेल्यांचे ।**
**सैनिक मज रक्षाया आले धाकें विरोनि गेल्यांचे ॥ ५६ ॥**

प्रत्यक्ष श्रीकृष्ण आले तेव्हांचा रुक्मिणीचा आनंद व मालाग्रहण-प्रसंग:—

माझा मूर्त मनोरथ तो रथ आला प्रियास घेऊन।
दर्शन नयनें घेतीं जैसें शिशिरीं दरिद्र घे ऊन ॥ ७३ ॥
हरि रवि, मी नलिनी, स्त्री कैरविणी, वीर वायसाराती, ।
आनंदाची वेळा सांगों तुज साध्वि ! काय सारा ती ॥ ७२ ॥
माळा ऊचलितां प्रिय आपणहि रथावरूनियां लवला ।
लव लागेना तों घे अंकीं करुणासमुद्र कालवला ॥ ७५ ॥

श्रीकृष्णांनीं रुक्मिणी रथांत वाहून नेल्यावर चैद्यादिकांनीं काय केलें ?

हंसें मुक्ता नेली मग केला कलकलाट काकांनीं ।
हाकांनीं नभ भरिलें, जाय सुरांच्याहि नाद हा कानीं !॥ ७७ ॥

पुढें यादवचैद्यांचें युद्ध झालें वगैरे प्रकार सर्वश्रुत आहे. या अद्भुत-प्रेमरसाचा बिंदुही मूळ कथेंत नाहीं ! यानंतर अनेक स्त्रियांनीं आपापल्या विवाहकथा सांगितल्या त्यांतच भद्रा ह्मणते कीं ' माझ्या बापानें मला लग्नापूर्वी पतीची रत्नमूर्ति पूजेसाठीं करून दिली होती, तिचीच पूजा करितां करितां मीं स्त्रीधर्म शिकलें ':—

चामर ढाळित पार्श्वीं विनयें प्रेमें सदा उभी राहे ।
पाहे श्रीपद, नेणें बसल्यें मी काय कीं उभी आहें ! ॥ १६६ ॥
माहेरीं बाळपणीं मज झाली रत्नमूर्ति ती पाटी, ।
सिकलें तीवरि बाई ! साध्वींची कांतभक्तिपरिपाटी ! ॥ १६७ ॥

प्रस्तुत प्रकरणानें बराच वेळ घेतला, पण हें प्रकरणच बहारीचें व स्वतंत्र असल्यामुळें त्याला इतका वेळ द्यावा लागला. या प्रकरणांतलीं आर्यावृत्तें पंतांच्याच शब्दांनीं बोलायचें ह्मणजे ' लिहिलीं होतीं, तींही लिहितां लिहितां क्षणांत योजूनी ' अशीं असल्यामुळें त्यांत फार प्रसाद, साधेपणा व गोडी हीं आलीं आहेत. स्त्रीभाषापरिपाटी त्यांत उत्तमच साधिली आहे. कृष्ण-सतींच्या कथा यांत वर्णिल्या असल्यामुळें त्या कृष्णपत्नीमार्फतच पंत देवास अखेर विनवितात:—

तुमच्या आशीर्वादें जन्मोजन्मीं घडो अशी सेवा ।
हे वाङ्मनःशरीरें करितों विज्ञापना सदा देवा ॥ २१० ॥

९ प्रस्तुत ग्रंथांत आणखी एक प्रेमळ कथा ( अ. ८६ ) आहे, ती सुभद्राविवाहाची होय. ' तीर्थें हिंडत गेला ' हें आख्यान सर्वतोमुखीं झालें

आहे. पंतांच्या काळींच हें लोकप्रिय झालें होतें. गावोगांव जुन्या दप्तरांतून पंतांचें मंत्ररामायण, केकावली, संशयरत्नमाला, प्रस्तुत आख्यानासारखीं कांहीं स्फुट आख्यानें पंतकालीन पुरुषांनीं लिहून घेतलेलीं आढळतात. तीं त्यांच्या अंगच्या गुणामुळें सहजच तत्काळ जलावरच्या तैलबिंदूप्रमाणें चोहोंकडे फैलावलीं होतीं. प्रस्तुत प्रकरण जे पंतभक्त होते त्यांना लिहून घेण्यासाठीं वारंवार द्यावें लागे ह्मणून पंतांनीं स्वहस्तानें निराळें लिहून ठेवलें आहे. प्रस्तुत कथा मोठी विनोदप्रचुर आहे. सुभद्रेला पाहून पार्थयतीची कशी त्रटपट उडाली पहाः-

**यतिदर्शना सुभद्रा येउनि बसे निजाग्रजाजवळ ।**
**न वल प्रेक्षी परि यतिहस्तींचा पाहतां गळे कवळ! ॥ १२ ॥**
**घाली दुनांत सैंधव दुग्धीं जंबीर पायसीं कथिका ।**
**मथि कामशर जया त्या राम ह्मणे साधु मोक्षसत्पथिका ॥१३॥**

अण्णा किर्लोस्करांना 'सौभद्र' नाटक रचण्याची कल्पना पंतांच्या या

---

१ या निराळ्या प्रतीच्या शेवटीं मागाहून पंतांनीं पुढील अनुलोम-प्रतिलोम श्लोक लिहिला आहे, ह्याच्या अर्थाविषयीं ४ वर्षांपूर्वी केसरींत कांहीं पत्रव्यवहार ही आला होता. तो श्लोक हाः—

**नाम गा अरसा मान तोखा लाभ न बाळका ।**
**काळ बा न भला खातो न मा सार अगा मना ॥ १ ॥**

असें चित्रकाव्य पंतांनीं फारसें कोठें केलेलें आढळत नाहीं. याचा अन्वयार्थ असाः-

अन्वयः—अगा बाळका मना! अरसा तोखा लाभ न मान, बा! काळ भला न (तो) खातो. मा सार न (तस्मात्) नाम गा.

अर्थः—बापा मना! तूं अज्ञान आहेस, खरें स्वहित कशांत आहे हें तुला उमगत नाहीं. ह्मणून तूं रसहीन पांचट अशा विषयसुखालाच मोठा लाभ मानून त्यासाठीं धडपडतोस! (मन हें घातक वेडे विषयव्याळासवें करी क्रीडा—आर्याकेकावलि) तर बापा! असें करूं नकोस. काळ भला नव्हे. तो तुला केव्हांच गट्ट करून टाकील. लक्ष्मी चंचल आहे. तिच्या थाटमाटाला भुलूं नकोस तर स्वहित साधण्यासाठीं प्रभूचें नामस्मरण करीत जा.

२ याच प्रसंगाचें वर्णन मंत्रभागवतांत केलें आहे तेथें पुढील आर्या आहेः—

**वारुणि भोजनसमयीं पाहे बसतां तिला बळाजवळ ।**
**विसरे वदनीं द्यायां, वदनींचा ही गिळावया, कवळ! ॥१०४१॥**

आख्यानावरून आली असावी. निदान ' घाली सारें मीठ तुपांताचि दुग्धीं लिंबू पिळिलें ' ही साकी तरी त्यांना वरील आर्येवरून सुचली खास !

सुभद्रा दिव्य रथांत बसून आलेली पाहिली मात्र:—

**तेव्हां धावुनि बैसे पार्थ सुभद्रारथीं, जसा पाटीं ।**
**सुचिर क्षुधित ब्राह्मण हां हां ह्मणतांहि वाढल्या ताटीं !॥ २२ ॥**

पंतांनीं बावरलेल्या अर्जुनाला तेलंगी ब्राह्मणाची उपमा देऊन त्या बिचाऱ्याची थट्टाच केली आहे ! पंत स्वभाववर्णनाच्या कामीं अत्यंत निष्णात होते. या कथेंत त्यांनीं बळरामाच्या स्वभावाचें जें शब्द-चित्र वठविलें आहे तें नामांकित चिताऱ्यालाही साधणार नाहीं. बळरामदादा मोठे रागीट पण फार प्रेमळ होते. त्यांची नेहमीं घाई, लटपट, गडबड चालावयाची. राग यायलाही उशीर नाहीं व जायलाही उशीर नाहीं. ते रागावल्यावर कृतांतानेंही त्यांजकडे पाहूं नये व राग ओसरल्यावर मेघानेंही त्यांच्या औदार्याची स्पर्धा करूं नये ! संतप्त झाले ह्मणजे फाडून खातील, प्रसन्न झाले ह्मणजे ढुंगणाचें सोडून देतील ! ! हा बळरामदादांचा स्वभाव पंतांनीं या काव्यांत फारच नामी दाखविला आहे. सुभद्रेला पार्थानें रथांत घालून पळविली हें ऐकतांच: —

**प्रस्फुरदधरदल प्रभु बळभद्र ह्मणे ' खरेंचि सांगा रे ।**
**कोठें तो कपटपटू ? गांठितसें जो पटांत आंगारें ॥ ३० ॥**
**कोठें रथ ? मुसळ पुरे ! कवच ? कशाला ! धनुष्य ? राहो या ! ।**
**वत्सेला निजधर्षणकरखळदंडोत्सवासि पाहों द्या ! ॥ ३१ ॥**

हा दादांचा राग पाहून श्रीकृष्णाला जशी मौज वाटली असेल तशीच पंतांनाही वाटून ते हांसत हांसत ह्मणतात:—

**पर्वीं अर्णव तेसा भगवान् बळभद्र पुष्कळ क्षोभे ।**
**संध्यारागसुरंजितशरदभ्राहून फार तो शोभे !॥ ३२ ॥**

मुळांत अर्णवक्षोभाची उपमा आहे खरी. पण उत्तरार्धांतील बहाराची उपमा पंतांना केवळ स्वप्रतिभेनें सुचली आहे. बळराम गौरवर्ण होते म्हणून त्यांना शरदभ्राची दिलेली उपमा फारच योग्य आहे. संध्याकाळच्या तांबूस छटांनीं रंजित झालेल्या शरदृतूंतल्या मेघाप्रमाणें बळराम शोभले ! पंतांची निसर्गप्रीति ह्या अत्यंत मनोहर अशा उपमेवरून स्पष्ट होते. बळरामासारख्या जमदग्नीपुढें व्हावें कोणी? पण पार्थसखा भक्तवत्सल परेंगितज्ञ श्रीकृष्ण आपल्या वासराला कसा मोकलील ?

**आय हळूच विनयनतकाय चतुर कृष्णिराय देव हरी।**
**माय सुतार्थ पतीचे काय गुरूचे नमूनि पाय धरी!॥ ३५॥**

कृष्णांनीं दादांची समजूत केल्यावर त्याचा राग शांत झाला, त्यांनीं पार्थसुभद्रांच्या विवाहाला अनुमोदन देऊन टाकलें इतकेंच नव्हे तर ते लग-बगीनें सेवकांस ह्मणतात:—

**जा जा उठा! मुलीला पाहों: वाहों वरा,घरा आणा।**
**प्राणाधिक तो येना तरि घालाव्या मदंघ्रिच्या आणा!॥ ३८॥**

सुभद्रेची पार्थास प्राप्ति झाल्यावर अखेरमुद्रा पंत पार्थाची थट्टा करून 'झाला भर्गीरथाचा पार्थ सखा आजि या महायत्नें!' असें ह्मणतात!! या प्रकरणांत पंतांनीं एकदाच विनोदाला रजा दिलेली आढळते. सुभद्रार्जुन हे वधूवर सर्वस्वी परस्परानुरूप होते हें समालंकारानें पंत सांगतात:—

**सार्थक पार्थ करी ती करविणी तो सुधांशु गौरविता।**
**सविता बिसिनीसि वरी, कीं भेटे तो गुणज्ञ ती कविता!॥ २७॥**
**श्रुतिसत्क्रिय धर्मपथा शोभविती दंपती तसे स्वरथा।**
**अन्योन्यप्रिय संगम तो प्रेमळ भक्त ती मुकुंदकथा!॥ २८॥**

१० असो. येथपर्यंत जे सूचक श्लोक घेतले त्यावरून प्रस्तुत ग्रंथाचें स्वरूप वाचकांच्या मनांत बरेंच उतरलें असेल असें वाटतें. यापेक्षां विस्तार करण्यास स्थलावकाश नाहीं. प्रस्तुत ग्रंथांत पंतांनीं विविधवृत्तांची योजना केलेली आहे, त्यांतच त्यांच्या श्लोककेकावलीमुळें प्रसिद्धीस आलेलें पृथ्वीवृत्तही अनेकवार आलें आहे. या वृत्तांत अ. ५९ पासून ७२ पर्यंत जे श्लोक आले आहेत ते क्रमानें पाहता असें दिसतें कीं ईशस्तवनाच्या प्रसंगीं बहुधा हें वृत्त पंतांनीं योजलेलें आहे. हे सर्व श्लोक पाहतां माझ्या मतें कृष्णविजयांत सदर वृत्त प्रथम सहज ह्मणून व पुढें पुढें ईशस्तवनाला अनुरूप ह्मणून पंतांनीं योजिलें आहे. पुढें कित्येक वर्षांनीं कृष्णविजयांतले पृथ्वीछंदांतले ईशस्तवनपर गोड श्लोक वारंवार वाचतां वाचतां याच वृत्तांत एक स्वतंत्र स्तोत्र रचावें अशी पंतांस इच्छा झाली असावी. ह्मणजे केकावली बीजरूपानें कृष्णविजयांत प्रथम प्रकट झाली! आतां कृष्णविजयांतल्या कित्येक श्लोकांचा मासला पहा:—

**अहो अतुळलक्षणीं अमृत वर्षसी ईक्षणीं**
**भुज स्वजनरक्षणीं सुपटु हे असच्छिक्षणीं।**

---

१ याच वृत्तांत पंतांनीं पुढें एक रामायणही रचिलें आहे.

प्रचंड महिमा रणीं दशमुखाचिया मारणीं
इनान्वयशिरोमणि प्रकट आमुचा तूं धणी ॥ ५६. २९. ॥
तुवां वधुनि वाळिला, सुगळ दीन सांभाळिला,
नतांगदहि पाळिला, जन यशोमृतीं क्षाळिला, ।
द्विषत्पतग जाळिला, तदनुजाधि ही वाळिला,
प्रियाविरह टाळिला, भरतभक्त कुर्वाळिला ! ॥ ५६. ३४ ॥
प्रभो ! तव पदांबुजीं मधुप जे सदा लोळते
जना निववितां क्षणें सुखसुधाब्धिकल्लोळ ते ।
स्वनाम कमळें मुनिभ्रमर ज्यांत नाशी तळें
तुझें यशचि ताप जे हरि रसें मना शीतळें ॥ ६४. २१ ॥
प्रणाम तुजकारणें प्रणतवत्सला ! पावना !
भवत्पदसरोरुहस्मृति असो जगद्भावना ।
पदाब्जयुगळीं तुझ्या सुरभि मानसा वासरा
नसो विरह नीरजासह जसा नसावा सरा ॥ ६४. २२ ॥

यावरून केकावली प्रथम बीजरूपानें कृष्णविजयांत प्रकट झाली असें जें मी वर ह्मटलें आहे तें यथार्थ किंवा कसें याचा निर्णय चतुर वाचकांस तेव्हांच करितां येणार आहे. कृष्णविजयाच्या पूर्वार्धाची रचना कठिण झाली असें बाबापाध्ये यांचें मत पडल्यामुळें संपूर्ण भागवत मराठींत रचण्यास पंतांनीं कंबर बांधिली, संपूर्ण कृष्णवंशाचें वर्णन करण्यास त्यांस उत्तरवयांत पांडुरंगराय नाइक यांनीं सुचाविल्यावरून त्यांनीं पुढें हरिवंश ग्रंथ लिहिला व वर सुचविल्याप्रमाणें कृष्णविजयांतर्गत पूर्वोक्तवृत्तांतल्या श्लोकावरून पुढें त्यांनीं केकावली रचिली. ह्मणजे हा सुंदर कृष्णविजय ग्रंथ रचल्यानंतर भागवत, हरिवंश, केकावली असे ग्रंथ पुढें सहज क्रमानें झाले असें ह्मणण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं.

११ पंतांनीं प्रथम मोठा ग्रंथ लिहिला तो कुशलवचरित हा कांचा ग्रंथ होय. याबद्दल मागें लिहिलेंच आहे. यानंतर त्यांचा हनुमन्नाटकाशीं स्पर्धा करणारा 'मंत्ररामायण' हा दुसरा मोठा ग्रंथ सुमारें दोन हजार आर्यांचा तयार झाला. मध्यंतरीं कांहीं लहान लहान काव्यें व स्फुट प्रकरणें झालींच असतील, पण पंतांचा तिसरा मोठा ग्रंथ ह्मणजे कृष्णविजय हाच होय.

नामरसायन' काव्यांत पंतांनीं संशयरत्नावलि, साधुसत्कार, आर्याकेकावलि, नामसुधाचषक, रामनामार्या, संस्कृतमुक्तामाला, प्रल्हादविजय, कुशलव-

चरित, मंत्ररामायण, कृष्णविजय, इतक्या काव्यांचा पंतांनीं उल्लेख केला आहे. व त्यांतही कृष्णविजयकथा 'त्या नूतन लिहिल्या मी' असें ह्मटलें आहे यावरून वरील दहाही काव्यांत शेवटचें काव्य कृष्णविजयच लीहिलें असें स्पष्ट होतें. 'नामरसायन' अर्थात् यानंतर व कृष्णविजय संपतांक्षणींच लिहिलें आहे हें उघडच आहे.

१२ 'कृष्णविजय' ग्रंथाच्या समाप्तीबरोबर पंतांच्या कर्तृत्वाची पहिली मजल संपली. वरील लहान मोठे सारे ग्रंथ प्रसिद्धच आहेत. येवढ्यावरूनच पंतांची कीर्ति मराठी कविमंडळांत कायमची राहिली असती. पण पंतांची बुद्धि, उद्योग, व नेट असामान्य. त्यांना एवढ्यावरच कसें तृप्त राहवणार? आतांपर्यंतचा हा बालाभ्यास झाला. इतक्या वर्षांच्या कसरतीनें पंतांचें बुद्धिबल चांगलें वाढलें, स्मरणशक्ति दुणावली, भाषाप्रभुत्व चांगलें सिद्ध झालें, काव्यरचनेची हातोटी उत्कृष्ट साधली, विविधवृत्तांत काव्य करण्याची शक्ति कसाला लागून उतरली, मोठमोठीं काव्यें अंगावर घेऊन तीं तडीस लावण्याची धमक आली, विचारतरंगांबरोबर पद्यें पटापट लेखणींतून बाहेर पडूं लागलीं, यमकानुप्रासांचे चमत्कार साधून शब्दार्णवमथनसामर्थ्य अपार वाढलें; भगवत्प्रसादाची पात्रता आपणांत आली आहे, आपल्या वाणींत तेज व प्रसाद उतरत चालले आहेत असा भरंवसा उत्पन्न झाला, तेव्हां या लक्ष्मीसुत मयूरानें सरस्वतीसुत व्यासाची बरोबरी करून महाराष्ट्र भाषेचें वैभव वाढविण्याची उमेद धरिली व आपल्या अचल कीर्तिमंदिराचा भक्कम पाया जो महाभारत ग्रंथ तो रचण्यास प्रारंभ केला. पण पंतांच्या महाभारताकडे वळण्यापूर्वी त्यांनीं वेळोवेळीं भक्तिप्रेमभरित जीं उत्तमोत्तम भगवत्स्तोत्रे रचिलीं त्यांचा आधीं आस्वाद घेऊं.

# प्रकरण चवदावें.

## स्तोत्रकलाप.

**बहु गोड गुण तुझे ते ऐकावे आदरें, स्वयें गावे, ।**
**यावेगळे मनोरथ नसती ते तूज काय सांगावे ! ॥ १॥**

—आर्याकेकावलि.

१ पंतांच्या ठिकाणीं धर्मश्रद्धा जागृत राहण्याचीं कारणें:—सत्परिस्थिति, सत्कुलजता व सदभ्यास. २ पंतांचीं अनेक देवतांवरचीं स्तोत्रें:—कृष्णामाहात्म्य व्यंकटेशस्तोत्र, दशावतारप्रार्थना, गणेशस्तुति, देवीस्तुति, दत्तदयोदय वगैरे. ३ अत्यंतात्यंत प्रेमळ अशीं बारा स्तोत्रें व त्यांची गोडी. ४ संशयरत्नावलि. ५ आर्याकेकावलि. ६ नामार्या. ७ पंतांचा पेशवाईवर अभिप्राय. ८ नामसुधाचषक. ९ नामरसायन. १० वाङ्मनःप्रार्थना. ११ सन्मनोरथराजि. १२ प्रश्नोत्तररत्नमाला. १३ पतिव्रताकीर्तन. १४ गुरुस्तुतिमुक्तांजलि. १५ महद्विज्ञापना. १६ आशंसाष्टक. १७ आरत्या, पदें, अभंग वगैरे. १८ संस्कृत स्तोत्रें.

१ मोरोपंतांचा काळ धर्मबुद्धीच्या जोपासनेला प्रतिकूळ नव्हता. तुकारामरामदासादि शिवकालीन संतांचे साक्षात् शिष्य गुरुमार्गानें जाऊन भक्तिमार्गाचा डांगोरा पिटीत होते; भागवतधर्माचा प्रसार महाराष्ट्रांत खेडोपाडीं सुद्धां झाला होता; पंढरपूर, पैठण, आळंदी वगैरे क्षेत्रांत कित्येक आत्मानुभवी संत विद्यमान होते; अशा वेळीं मोरोपंतांचा जन्म झाला. त्यांच्या आयुर्मर्यादेत सुद्धां कृष्णदयार्णव, तुका विप्र, गुंडोजीबावा, सिद्धेश्वर भटजी, महिपतीबावा, शिवदिन केसरी, अमृतराय, सोहिरोबा आंबिये, ब्रह्मेंद्रस्वामी, देवनाथ महाराज, वगैरे कित्येक भगवद्भक्त त्यांचे समकालीन होते. बाबा पाध्ये, चातुर्मासेबोवा वगैरे भक्त प्रत्यक्ष पंतांचे मित्रच होते. पंतांचा जन्म ही सुवंशांत झाला होता. त्यांच्या आईला गणपतीची मोठी भक्ति होती. पंतांचें शिक्षण गणेशकाका पाध्यासारख्या कर्मनिष्ठ व स्वधर्मरत अशा शीलवंत पुरुषाच्या हाताखालीं झालें होतें. त्यांना यजमान मिळाले होते तेही

राजकारणांत कसेही असले तथापि श्रद्धावंत शिवभक्त होते. याप्रमाणें पंतांची परिस्थिति धर्मबुद्धीच्या वाढीला चांगलीच अनुकूळ होती. शिवाय पंतांच्या हृदयांत भक्तिभावाचा ओलावा बाळपणापासूनच होता. आमच्या हिंदुसमाजांत जुन्या चालीरीतींच्या कुलीन घराण्यांत जन्म पावलेल्या मुलांबाळांत बहुधा एक प्रकारचा सात्विक भक्तिभावाचा अंकुर जन्मतःच असतो. आमची समाजघटना अनादिकालापासून धर्माच्या सूक्ष्मतत्वांवर रचलेली आहे. आमचा सर्व व्यवहार धर्ममूलक असल्यामुळें नीतीचा अंतर्भाव धर्मातच होतो. धर्मासाठीं जन्म, धर्मासाठीं मृत्यु, धर्मासाठीं स्त्रीपुत्र, धर्मासाठीं द्रव्यप्राप्ति, धर्मासाठीं स्वराज्य, धर्मासाठीं यच्चयावत् सारे व्यापार— अशी आमच्या समाजधुरीणांची नित्य भावना असते. हिंदुसमाजाचे सारें जीवित, सान्या खटाटोपी, सारीं राजकारणें, सारें वाङ्मय, धर्माभिवृद्धीसाठीं आहे. माशाला जसें जळ, तसा आमच्या समाजाला धर्म आहे. आमचा धर्म आमच्या आठही प्रहरांच्या सर्व कृत्यांत व्यापून राहिला आहे. देहांत जसा आत्मा सर्वत्र आहे तसा आमच्या सर्व कृत्यांत धर्म पसरला आहे. आमचें खाणेंपिणें, आमचे आहारविहार, आमचीं नित्यनैमित्तिक कर्में, आमचीं तीर्थक्षेत्रें, आमचे सणवार, आमचे साधुसंत-फार काय आमचे विषयभोगसुद्धां-सारे धर्ममूलक आहेत! वर्षारंभापासून वर्षअखेरपर्यंत, जन्मापासून मरेपर्यंत, खेळापासून राजकारणापर्यंत आत्म्याप्रमाणें धर्माची सर्वत्र व्याप्ती आहे! आमचें निजणेंउठणें सुद्धां धर्माधीन आहे. आमच्या सर्व व्यवहाराला वळण देणारा शास्ता आमचा धर्म आहे. अशा आमच्या धर्माचीं रहस्यें संतांपासून समजून घ्यावींत व उत्तम वळणाच्या व कुलीन घराण्यांच्या नित्याचारांत तीं पाहून घ्यावींत. पंतांच्या आचारांत व विचारांत तीं सर्वच सारखीं ओतप्रोत भरलीं आहेत. सत्कुलांत जन्म, सत्परिस्थिति, व सदभ्यास या तीनही गोष्टी सच्चरित्रास पोषक असतात. पंतांच्या ठिकाणीं तिन्ही एकवटल्या होत्या. पंतांची कुलरीति व परिस्थिति त्यांच्या नैसर्गिक भक्तिभावाला पोषकच होती ह्मणून वर सांगितलेंच आहे. त्यांचा प्रयत्न, अभ्यास, धडपड ही त्याच प्रकारची होती. त्यांचीं काव्यें हीं त्याच धडपडीचीं फळें होत. त्यांनीं आपल्या भक्तिभावाच्या संगोपनासाठीं किंबहुना अभिवृद्धीसाठीं काव्यें लिहिलीं. अनेक तीर्थक्षेत्रांच्या, संतांच्या दर्शनासाठीं ते अत्युत्सुक असत. कृष्णजन्मादि पर्वांविषयीं ते निरंतर सोत्कंठ असत.

सर्व प्रकारचीं तीर्थे, सर्व प्रकारचे संत, सर्व प्रकारचीं क्षेत्रें, सर्व देवता, यांविषयीं पंतांची सारखीच पूज्यबुद्धि होती. ' अनेकीं सदा एक देवासि पाहे ' हा समर्थांचा बोध त्यांचे मनावर पुरा ठसला होता, त्यामुळे ते सर्व देवतांना शरण गेले. साधकाला लागणारे मुख्य दोन गुण:—सर्वत्र गुणदृष्टि, व सर्वत्र नम्रता. हे त्यांचे ठायीं पूर्णत्वानें वास करीत होते. कसलेंही तीर्थ असो; लहान असो वा मोठें असो, अच्छोदक असो वा मलोदक असो, ' स्नानें, पानें, स्तवनें, स्मरणें, गंगेचिया महाघ सरे ' या बुद्धीनें तेथें ' कायिकवाचिकमानसिकदोषपरिहारार्थ ' सद्भावानें बुडी मारायची ! कसलाही संत असो, ब्राह्मण असो वा चांडाळ असो, भूतकालीन असो वा समकालीन असो, ' मज तो वाटे ऐशा साधुजनांहूनि भिन्न न विठोबा ' अशा भक्तिनम्रतेनें त्याच्या पायीं मिठी घालायची ! कसलीही देवता असो रामकृष्णादि अवतार असो, वा एखादी क्षुद्र ग्रामदेवता असो, 'वा तूं शरण्य शरणागत मी, तूं दीनबंधु मी दीन, ' अशी आत्मोद्धारासाठीं सगद्गदत्वानें त्याची प्रार्थना करायची! पंतांची ही गुणैकदृष्टि त्यांच्या अस्सल साधुत्वाची ज्ञापक आहे. 'आपुलेनि गुणें । पुढिलांचें उणें । फेडूनियां पाहणें । तयाकडे' (ज्ञानेश्वरी अ. १६) या वचनाप्रमाणें त्यांचा वर्तनक्रम होता. स्वतःच्या चित्तशुद्धीसाठीं स्वतःच्या भक्तिभावोद्दीपनासाठीं, व सत्पथरक्षणासाठीं त्यांनीं बहुत काव्यें लिहिलीं, त्यांत त्यांचीं स्तोत्रें केवळ अग्रगण्य आहेत.

२ पंतांनीं अनेक देवतांवर, अनेक तीर्थांवर, अनेक नद्यांवर अनेक स्तोत्रें रचिलीं आहेत. सगळीं स्तोत्रें मिळून शंभरांवर होतील. बहुतेक स्तोत्रें स्वतःच्या प्रेरणेनें, स्वोद्धारासाठीं रचिलीं आहेत. कृष्णामाहात्म्याची पंचाध्यायी मात्र त्यांनीं सदाशिवपाध्ये यांच्या सांगण्यावरून रचिली. सदाशिव पाध्ये एका पत्रांत पंतांस लिहितात. " येथें कऱ्हाडीं रा. अंताजी वैरी श्रीकृष्णेचा उत्सव करीत असतात. त्यांच्या चित्तांत उत्सवास अनुकूळ श्रीकृष्णाचरित्र कथोपयोगी आर्याछंदांवर असावें याविषयीं त्यांनीं तुह्मांस पत्र लिहिलें होतें. लिहिल्याप्रमाणें करून पाठवावें." या पत्राचा आदर करून पंतांनीं कृष्णामाहात्म्य लिहिलें. सदर माहात्म्याच्या शेवटीं पंत लिहितात:—

**स्वगुरुपुत्र सदाशिवपंडितें । सुरसिकें निजसद्गुणमंडितें ।**
**लिहविलें परमाद्भुत सह्मजा—। यश ह्मणे काळिकाळ असह्य ज्या ॥५॥**

पण याशिवाय बाकीचीं सर्व स्तोत्रें त्यांनीं आपण होऊन स्वचित्तप्रसादासाठीं

लिहिलेलीं आहेत. पंतांनीं श्रीविठ्ठल व संत यांवर केलेल्या स्तोत्रांचा विचार 'संतस्तवनपर प्रकरणें' या भागांत केला आहे. त्याप्रमाणें काशीयात्राप्रसंगी केलेल्या स्तोत्रांचा विचार 'काशीयात्रा'या भागांत केला आहे. तेव्हां प्रस्तुतच्या भागांत त्याशिवाय इतर स्तोत्रांचाच विचार कर्तव्य आहे. पंतांनीं बहुधा त्या त्या ठिकाणच्या देवतांवर तेथल्या तेथें स्तोत्रें केलीं आहेत. काहीं घरीं बसूनही केलीं आहेत. गोदावरी, कृष्णा, कोल्हापुरची अंबाबाई, तुळजापूरची देवी, जेजुरीचा खंडोबा, गिरीचा व्यंकटेश, बारामतीचा सिद्धेश्वर, या देवतांवर त्या त्या ठिकाणीं जाऊन दर्शनानंतर स्तोत्रें केलीं आहेत. या सर्वस्तोत्रांत व्यंकटेशावरचें स्तोत्र मोठें प्रेमळ आहे. देवदासाचें व्यंकटेशस्तोत्र तर सुप्रसिद्धच आहे. मराठी स्तोत्ररत्नाकरांत आमच्या लोकांनीं त्याला अग्रस्थान आधींच दिलें आहे. हें पराकाष्ठेचें प्रेमळ, मधुर, व भक्तिरसपूरित आहे. या स्तोत्रांत करुणारस व सोपेपणा फार असल्यामुळें हें बायकामुलांच्या नित्य पाठांत असतें. पंतांचें व्यंकटेशस्तोत्रहि मोठें गोड आहे:—

**तारिसि भवांत त्यांतें,लागति जे जीव काय कांसेला ।**
**पांघुरविसी दयेचा दीनाला अभयदायका ! सेला ॥ २९ ॥**

ही त्यांतील भावना मोठी मनोरम आहे. याशिवाय हरिहरस्तव, मुरलीस्तव, तुलसीस्तव, रेणुकास्तव, अश्वघाटीशतक, रामस्तव, रामप्रार्थना, दशावतारप्रार्थना, वगैरे कांहीं लहान लहान स्तोत्रें आहेत त्यांत **रामस्तव** लहान असून चांगला आहे:—

**सेवा करावया लावा देवा ! हा योग्य चाकर ।**
**या तप्ताच्या शिरीं आतपत्र हा तुमचा कर ॥ ३ ॥**
**मायानदींत श्रीरामा ! तुझे चरण सांगडी ।**
**बहु आवडले हेची साधूंच्या मानसां गडी ॥ ५ ॥**

'दशावतारप्रार्थना' या लहानग्या गोड स्तोत्रांत दहाच आर्या आहेत, पण त्यांत पंतांनीं देवाशीं लडिवाळपणाची फारच धिटाई केली आहे!:—

**दंतीं धरा धराया देवा ! तुज कांहिं बल न सायास ।**
**मजसीं मृदुहि न वदवे, झालें तुज काय बल नसायास ? ॥ ३ ॥**
**शंका न ज्यास चित्तीं अपुली जननी जीवेंचि माराया ।**
**त्या तुज करुणा कैची बापा ! दीनः जनासि ताराया ? ॥ ६ ॥**
**पाषाणातें लावुनि केली चरणाचिया नखा रामा ।**
**मजवरि कोप कराया दशाननाचा न मीं सखा रामा ! ॥ ७ ॥**

पंतांनीं गणपतीवर दोन लहान स्तोत्रें केलीं आहेत. बारामतीस पंतांची नित्य काव्यरचनाप्रसंगीं बसायची जागा गणपतीसमोर असे. ज्या गणपति-प्रेरणेनें त्याच्या संनिध पंतांनीं बसून बहुतेक कविता रचिली त्याला त्यांनीं गणेश चतुर्थीच्या दिवशीं 'एकवीस आर्यादुर्वा' वाहिल्या आहेत:--

**श्रीगजवदना देवा ! दे वात्सल्येंकरून दास्यवर ।**
**त्वद्दासाचेंचि सदा होतें विद्वत्समंत आस्य वर ॥ १ ॥**

गणपति हा 'विद्यांचा दाता, सिद्धिबुद्धिभर्ता,' आहे. त्याचें उदर मोठें कां ? पंत ह्मणतात.:--

**तूं परमसुखसुतृप्त स्पष्ट, ह्मणुनि असलि नित्य दोंदील ।**
**किति ह्मणति 'ब्रह्मांडें उदरीं प्रभुवर्य कां न कोंदील' ? ॥ २ ॥**

पंतांनीं '**विनायकमाहात्म्य**' ह्मणून एक ४ अध्यायांचें सुरस प्रकरण गणेशजन्मावर केलें आहे. त्यांत सिंदुरासुराचा वध बाळपणींच गजाननानें पार्वतीच्या उदरीं जन्म घेऊन कसा केला याचें सुंदर वर्णन आहे. यांतील आर्या फारच सुलभ, सहज लिहितां लिहितां क्षणांत योजून लिहिलेल्या दिसतात, हें प्रकरण प्रसादपूर्ण आहे.

**तो श्रीविनायकप्रभु, जो या आधार सर्व विश्वास ।**
**निःश्वास वेद ज्याचे, ज्याचा साधूंसि पूर्ण विश्वास ॥ ३१ ॥**

देवांनां सिंदुरानें अमर्याद गांजलें:—

**तेव्हां, सुरवर, मुनिवर गेले बहु संकटीं तथा शरण ।**
**सुखहेतु सेतु ज्याचे दुस्तरसंसारसागरीं चरण ॥ ३८ ॥**

हें विनायकमाहात्म्य पंतांनीं कोणत्या तरी वर्षी गणेशचतुर्थीच्या मुहूर्तावर रचलेलें दिसतें.

पंतांनीं '**दूर्वासहस्रकाव्य**' केलें होतें. त्यांत एक सहस्र आर्या होत्या. 'त्या तीस वर्षांपूर्वी रातंजन गांवीं ( बार्शीजवळ ) रा. रामचंद्र विद्याधर जोशी या गृहस्थांपाशीं आपण पाहिल्या आहेत.' असें एका पैठणकर मित्रानें मला कळविल्यावरून मी चांगली चौकशी केली त्यांत एवढें निष्पन्न झालें कीं 'सदर काव्य पंतांनीं रचिलें होतें खास ! पण तें दादोबा पांडुरंग यांजकडे आलें होतें.' पुढील चौकशीवरून तें काव्य नष्ट झाल्याचें समजतें !! असो. पंतांनीं दुर्गादेवीवर एक स्तोत्र रचिलें आहे तेंही चांगलें आहे.

अत्यद्भुत रूप तुझें, अत्यद्भुत भक्तवत्सले ! देणें ।
अत्यद्भुत यश दुर्गे ! झालें लोकत्रयास जें लेणें ॥ १ ॥
ते शुंभनिशुंभ तसे कामक्रोधाख्य ही मथी खळ गे ।
दुर्गे ! हे तव भजनीं घातक न भले, जसे पथीं खळगे॥ २ ॥
दुर्गे ! परमेश्वरि ! हे ब्रह्मांड स्वल्प ! तव महा माया ।
माया सृष्टिसुतेवरि करिसि सदा फार तूं महामाया ॥ ३ ॥

पंतांना परमेश्वरस्वरूपाचें यथार्थज्ञान हीं सर्व स्तोत्रें गातां गातां झालें. देवता भिन्न असल्या, अथवा भिन्न भिन्न नांवांनीं निरनिराळया उपासकांनीं त्यांला संबोधून आळविलें, तथापि 'सर्व देवनमस्कारः केशवंप्रति गच्छति' हें तत्व त्यांच्या मनांत पूर्ण जागृत होतें. त्यांनीं 'दत्तदयोदय' नामक एक फारच गोड स्तोत्र दत्तस्तवार्थ केलें आहे. पंतांच्या अत्यंत सरस व करुणापूर्ण स्तोत्रांपैकीं हें एक आहे. भक्तिप्रेमानें पंतांचें हृदय यांत उकललेलें दिसतें. दत्तवर्णन करितांना पंत ह्मणतातः—

जे जे लोकीं पुत्री त्यांमध्यें धन्य तव पिता अत्री ।
कीं त्वां नित्य उभविली ब्रह्मांडशिरीं स्वकीर्तिसूछत्री ॥ ५ ॥
एक गुणग्राहक तूं, सारग्राही दुजा नसेचि कवी, ।
अगनगखगादिकां गुरु कोण ह्मणे ? स्वाहित कोण हें शिकवी? ॥८
एकांततीर्थभिक्षासेवन जनसंग्रहार्थ करितोस ।
चरितें सुकीर्तिभरितें निर्मुनि बा ! लोकशोक हरितोस ॥ १० ॥

या आर्यांत श्रीदत्तचरित्राचें सार किती सहज आणलें आहे ? श्रीदत्ताच्या बरोबरचे जगदुद्धारक दुर्वास व नारद यांच्या संबंधाच्या आर्या फार खुबीदार आहेत. पंतांच्या वाणींत स्पष्टवक्तेपणा व सौजन्य, धिटाई व विनय या विरुद्ध भासणाऱ्या गुणांचें असें मनाला मोह उत्पन्न करणारें मनोहर वर्णन करण्याचें सामर्थ्य आहे कीं, मला वाटतें असें अद्भुत सामर्थ्य अन्यत्र क्वचितच आढळेल ! दुर्वासाच्या कोपाबद्दल पंत ह्मणतातः—

मुष्टींत धरिल कोणी तरि जरि दुर्धर असे असो पारा ।
परि हा सुदुर्धर प्रभु इंद्रप्रमुखांसही न सोपारा ! ॥ ३८ ॥
तो श्रीमदंबरीष छळिला तें व्यसन केवढें भारी ? ।
करितां श्रवण थरारा कांपे अद्यापि सत्सभा सारी ॥ ४२ ॥
सोसाया त्याचे छळ बळ कैचें आज पामरा मातें ? ।
कांपे हृदय पुराणीं आइकतों चरित रामरामा तें ॥ ४०॥

परम तपस्वी व दयाळु दुर्वास तरि एवढे कोपिष्ट कां ? त्यांनीं असा भक्तांचा छळ तरी वृथा कां करावा ? पंत ह्मणतात, छे, वृथा नव्हे ' छळितो परंतु सयश वाढवितो ज्यासि चाटितो दहन ! ' आणखी

**छळ साहतां गुरुकृपें पाप जळे ! होय भद्र बहु मोठें ।**
**हें मृदुयत्नें घडतां चतुरें व्हावें जनांत कां खोटें ? ॥ ४५ ॥**

हें दुर्वासछळाचें रहस्य ठीक आहे, पण पंत श्रीदत्ताला विनवितात कीं, मी दीन दुबळा आहे. छळ सोसण्यास असमर्थ आहें ह्मणून

**छळ न करितां कराल प्रभुजी जी तीच मज दया मोठी ।**
**अपमान श्रम नसतां जें जोडे स्वल्प तेंचि धन कोटी ॥ ४७ ॥**

नारदस्तुति पुढील दोन आर्यांत फार उत्कृष्ट केली आहे. नारदासारख्या जगद्गुरूंची भूतदया यांत फार मार्मी वर्णिली आहे:—

**वाल्मीकिव्यासशुकप्रऱ्हादध्रुवमुखांसि तो तारी ।**
**हरिभक्तिज्ञानरसें ओती तो शिष्यमूर्ति ओतारी ॥ ५६ ॥**
**कंटाळे मायहि बहु हरितां शिशुचाहि बाह्यमळ हातें ।**
**बाह्यांतर नतमळ तो गुरुवर हरि, करि शिवार्थ कलहातें ! ॥५७॥**

या नंतर श्रीदत्तात्रेयाची पंतांनीं मोठ्या कळकळीनें प्रार्थना केली आहे:-

**वेंचिति परोपकारीं सर्वस्व अनित्य, जीवितहि संत ।**
**वचनाची काय कथा ! जोडिति सयश अनंत मतिमंत ॥ ९० ॥**
**करुणेचें वतन तुह्मी, शांतीचें भाग्यवंत माहेर, ।**
**सुघन ज्ञानरसाचे संत रवे मधुर आंत बाहेर ॥ ९७ ॥**
**श्रीदत्तात्रेयातें तत्तुल्यांतें समस्त संतांतें ।**
**साष्टांग नमन आहे, सांभाळा जी मयूरपंतातें ॥ १०२ ॥**

हें सर्वच स्तोत्र आंतबाहेर भक्तिज्ञानरसानें परम मधुर झालें आहे; त्यांतही शेवटीं दत्तप्रभृति समस्त संतांना पंतांनीं जें आत्मार्पण केलें आहे, आपला जीव उद्धारास्तव त्यांच्या स्वाधीन करून आपण निश्चित झाले आहेत, या एकाच गोष्टींत जें रहस्य आहे, जी अमृताधिक माधुरी आहे तिचा आस्वाद घेण्याइतकें महद्भाग्य ज्या सद्भक्तांचे असेल ते घेतीलच ! त्याचें वर्णन वाणीनें होऊं शकत नाहीं ! !

२ येथवर विशिष्ट देवतांचीं जीं स्तोत्रें पंतांनीं केलीं त्याबद्दल विचार झाला. कोणत्याही पंथाचा, अगर सांप्रदायाचा मनुष्य असला तथापि त्याला-

ही ज्यांच्या वाचनापासून परमाल्हाद होणार आहे अशा बाकीच्या सामान्य स्तोत्रांबद्दल आतां विचार कर्तव्य आहे. तीं स्तोत्रें हीं:—

संशयरत्नावलि, आर्याकेकावलि, नामार्या, वाङ्मनःप्रार्थना, नामसुधाचषक, नामरसायन, गुरुस्तुतिमुक्तांजलि, पतिव्रताकीर्तन, सन्मनोरथराजि, प्रश्नोत्तररत्नमाला, महद्विज्ञापना, व आशंसाष्टक हीं स्तोत्ररूप प्रकरणें अत्यंत सरस आहेत. हीं कोणत्याही ग्रंथाचीं भाषांतरें नाहींत किंवा यांतले कोणतेही विचार बाहेरून आणलेले नाहींत. हीं काव्यें ह्मणजे पंतांच्या श्रद्धाळ प्रेमळ व प्रतिभासंपन्न हृदयांतले उद्गार आहेत. हे पंतांचे स्वानुभवाचे विचार आहेत, किंबहुना हीं पंतांच्या अंःस्वरूपाची बाहेर पडलेली छाया आहे. हीं स्तोत्रें अत्यंत सरस, अत्यंत प्रेमळ, अत्यंत हृदयहारक, अत्याश्चर्य व अत्याल्हाद उत्पन्न करणारीं, सुरस व चमत्कारमय कल्पनातरंगांनीं मनोमोह उत्पन्न करणारीं, अति उदात्त विचारांनीं चित्तवृत्तिलय करून आनंदार्णवांत बुडवून टाकणारीं, अतिशुद्ध प्रेमरसानें तुडुंब भरलेलीं, अमोघ व दिव्य वक्तृत्वाच्या खळखळाटावरोबर संपूर्ण क्षुद्र मानवी विकारांना ऐक्यभावाच्या खडकावर आपटून नष्ट करणारीं, परमाल्हादक, परमपावन, परमप्रेमळ व परमदिव्य अशीं आहेत. हीं वाचतांना मनुष्य आपलेपण विसरत नाहीं पण तें फार विशाळ झालेलें पाहतो. या स्तोत्रांत पंत देवाशीं लगट करितात; दीन होऊन त्याचें आर्जव करितात, बरोबरीच्या नात्यानें अधिकार सांगतात; वकिली कोट्या करून व कोठें विचित्र तर्क लढवून त्यास भुरळ पाडतात; भगवंत, भगवद्भक्त व भगवन्नाम या तिघांच्या संबंधांत विलक्षण कोटिक्रम करून देवाला प्रसन्न करितात; मेघाला पाहून मयूरानें तांडव करावें, तसें प्रेमभरानें नृत्य करितात; पतीला पाहून पतिव्रतेनें आपलें हृदय उघडें करून त्याला सर्वस्व ओपावें तसें सर्वस्व देवाला वाहतात; पित्याला पाहून पुत्रानें लडिवाळपणा करावा तशी परम सलगी करितात; आईला पाहून बाळानें हट्ट करावा तसा हट्ट धरून बसतात; रुसतात, हंसतात, बागडतात, नानाविध लीला करितात! क्षणैक दीनता, क्षणैक समता; क्षणैक राग, क्षणैक मोह; क्षणैक निराशा, क्षणैक उल्हास—याप्रमाणें नानाप्रकारच्या वृत्ति देवापुढें मोकळेपणानें मांडतात ! या नानाविध चेष्टांत निष्काम, व निर्मल प्रेमरसाचा जो अद्भुत प्रवाह वाहत आहे त्यांत निमज्जन करणारा पुरुषही पंततुल्य सुखानुभव घेतल्याशिवाय राहत नाहीं !

४ **संशयरत्नावलींत** पंतांनीं देवाच्या विलंबाबद्दल किती मजेचे संशय घेतले आहेत! 'उठतां बहु त्वरेनें कोठें जातां असें तुह्मां देवा पुसती झाली जाणो!' हा पहिला संशय! 'कीं माझें दुर्दैव प्रभुच्या मार्गांत आडवें पडलें?' हा दुसरा संशय! 'किंवा मजहुनि दुसरा कोणी बहुदीन दास आढळला?' हा तिसरा संशय! याप्रमाणें एका मागें एक असे संशय घेत घेत पंत नेत्र मिटून बसले आहेत व कोठें 'किंवा तुज गुंतविलें भजकीं?' असे संशय घेऊन लागलीच 'परि ते दयार्द्र या रंकीं?' याप्रमाणें आपणच आपल्या संशयाचें निराकरण करीत आहेत!! 'कीं न श्रवणीं गेली ही माझी हाक?' अशी देवास पृच्छा करून कांहीं आठवलेंसें करून जरा डोलानें ह्मणतात 'हा कसा तर्क!' देवचरित्राची देवास आठवण देऊन ते जरा रागानें व जरा लोभानें पुन्हां विचारतात 'कशी गुरुजनीं सतीची? शिवला ज्या कुमुदिनीस असदर्क?' याचा जोर देवाच्या लक्षांत आला नसेल ह्मणून मोठी टीप स्वहस्तें देऊन पंत ह्मणतात; " गुरुसमीप, सभेंत, अस्पृश्या, सती राजसुता, पतिसमक्ष. वस्त्रमोक्षणीं. मोठी हाक कशी मारील ? तशी ऐकिली! माझी कां न ऐका?" आणखी कांहीं संशय घेतल्यावर पंत विचारतात " कीं पावावें समयीं सदय! मनांतूनि योजिलें?" पण आपल्या मनांतील अधीरता श्रीकृष्णानें आपल्या परम प्रीतीच्या राणीच्या प्रेमानुभवावरूनच ध्यानांत आणावी हें सुचवून पंत गर्वानें ह्मणतात: ' जरि ते-तरि जीव रुक्मिणीचें चित्ता, माझें अधीर मन करितें!' याप्रमाणें कोठें लघुकोपाविर्भाव, तर कोठें दीनता दाखवीत पंतांनी एकंदर ४८ संशय घेतले आहेत. आणखी थोडे संशयः-

**किंवा बरी परीक्षा केल्यावांचून न प्रसाद करा ?।**

मला कसाला लावायच्या भानगडींत नका पडूं? श्रम मात्र होतील. लाभ होणार नाहीं. कां?

**तरि वरि तसाचि आंतहि! उगाळितां कोळसा प्रयास करा॥**

वरें तुह्मी ह्मणाल हा कोण मोरोपंत मला हांका मारून सतावणार? मी समर्थ आहें!

**किंवा ह्मणसि ' समर्थोहं कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम्!'।**

पण ह्मटलें, हे सारें सामर्थ्य बाहेर दाखवायचें आहे! माजघरांत आईसाहेबांनीं दटावलें नाहीं तोंपर्यंतच हे बोल! 'स्वाधीनपतिका स्त्री वर्तविती यथेच्छ पति वर्ततो' (ही खद पंतांची टीप आहे.)

**दीनावनाविणें क्षण देइल दयितादया कशी वर्तू ! ॥ २८ ॥**

अहाहा ! या आर्येंत परमेश्वर दयाधीन आहे ! दयावश आहे, हें श्रेष्ठ रहस्य कसें मजेनें ग्रथित केलें आहे ! हेंच तत्व पंतांनीं पुढें केकावलींत ' कृपाचि जननी तुझी, सकल जीव दायाद या ' या श्लोकांत विस्तारिलें आहे. आणखी एकच संशय:—

**कीं भीशी ? मज एका उद्धरितां लागतील फार झटे ! ।**
**तारे, कोणाहि न कळतां, न्यावा झांकोनि दास पीतपटें ! ! ॥४५॥**

सावित्रीनें बरोबर वर मागून यमधर्माला चकविलें ह्मणतात, पंतांनीं तिच्यावरही कडी केली आहे! ते येथें ह्मणतात ' मला एकट्याच पाप्याला उद्धरिलें, तर मजसम लक्षावधी पाप्यांचीं झटें तुमच्या मागें लागतील अशी तुह्मांला भीति वाटत असेल तर एक युक्ति सांगतो ! त्या पाप्यांच्या दृष्टीस मी पडणार नाहीं अशा बंदोबस्तानें आपल्या पीतांबराखालीं मला झांकून गुपचुप घेऊन चला ह्मणजे झालें ! ' याप्रमाणें अनेक संशय काढून त्यांचें आपणच निराकरण करून ह्या रत्नमालेंत पंतांनीं देवाला निरुत्तर करून सोडलें आहे. या रत्नमालेचा अखेरचा पण सर्वांहून तेजस्वी मणि पाहून ज्याचें शरीर रोमांचित होणार नाहीं असा कोणी आहे काय ?

**कीं मागें गुप्त उभा असासि प्रेमें उभारुनी बाहे ।**
**तरि काय बाळकाचे तूं सादर बोल ऐकसी बा ! हे ॥ ४९ ॥**

हें स्तोत्र पंतांनाही प्रिय वाटल्यामुळें त्यांनीं मूळप्रतीवर समासांत स्वत: सुंदर टीपा दिल्या आहेत.

**५. आर्याकेकावलि:**—हें स्तोत्र प्रसिद्ध केकावलीच्या सर्वांशीं तोलाचें असून त्यापेक्षां फार सोपें व गोड आहे. आजवर याच्या ६१ च आर्या प्रसिद्ध आहेत, पण पंढरीस पंतगृहीं याच्या १७४ आर्या आहेत. हें स्तोत्र नित्य देवापुढें बसून ह्मणायला फार चांगलें आहे. हें रचीत असतांना पंतांवर कोणतें तरी मोठें संकट पडलें होतें असें स्पष्ट दिसतें. यांत करुणरस उत्कृष्ट उतरला आहे. यावर ज्यास्त लिहायला जागाच नाहीं. यांतल्या गीती नित्य जिव्हाग्रावर नाचत ठेवाव्यात:—

**श्रीरामा ! तूं स्वामी असशी माझ्या शिरावरी जागा ।**
**आह्मांसि तुझ्या पायावांचुनि निर्भय नसे दुजी जागा ॥ १ ॥**
**अपराध फार केले परि आतां हात जोडिले स्वामी ।**

करुनि दया तारावें आवडि वाढो सदा तुझ्या नामीं ॥ २ ॥
धांव समर्था सदया भवपंकामाजि बुडतसे गाय ।
निकटस्था ! हृदयज्ञा ! कौतुक अद्यापि पाहसी काय ? ॥ ३ ॥
संकट वारुनि रामा ! निजगुणकीर्तन करावया योजीं ।
आपुलिया थोरपणें रामा ! मजला स्वकिंकरीं मोजीं ॥ ४ ॥
या संकटाबरोबर वारी लोकेषणादि अनिवार्य ।
ह्मणजे हा दास तुझा झाला लोकत्रयांत कृतकार्य ॥ ५
त्वद्गुणकीर्तन करितां लज्जा हे पापिणी धरूं न गळा ।
हे ताटकांतका ! हा परमार्थ हिर्णेचि बुडविला सगळा !! ॥६॥
त्वद्गुणकीर्तन करितां स्तंभादिक अष्टभाव उपजावे ।
जावे अनात्मधर्म, क्रोधादि मनोविकार वरजावे ॥ ७ ॥
एकांतीं त्वन्नामें गायिन मधुरस्वरें स्थिरस्वांतें ।
संकट वारुनि द्यावें हें मज वरदान जानकीकांतें ॥ ८ ॥
स्तुति करुनि तुझी तुजला आम्हीं अज्ञान काय वा रिझवूं ? ।
गावुनि अमृतगुणांतें हृदयींचे ताप आपुले विझवूं ॥ ९ ॥
मन हें घातक वेडें विषयव्याळासवें करी क्रीडा ।
पीडाहि पावतें परि सावध नोहे न पावतें व्रीडा ॥ १० ॥
या कोडग्या मनाला विषयांची काय वाटती गोडी ।
खोडी तुझ्या प्रतापावांचुनियां राघवा ! न हें सोडी ॥ ११ ॥
बहु गोड गुण तुझे ते ऐकावे आदरें स्वयें गावें ।
यांवेगळे मनोरथ नसती ते तूज काय सांगावे ? ॥ १२ ॥
चापशरधरा ! धीरा ! आपद्ग्रस्तासि मज नको विसरूं ।
या परमसंकटीं मी वा पदर तुझ्यापुढें किती पसरूं ॥ १३ ॥
श्रीरामचंद्र ! राघव ! रघुवीर ! असेंचि आळविन तुजला ।
संकट वारुनि घडवीं माझ्या हातून या महाक्रतुला ॥ १४ ॥

या चवदा आर्यांवरून प्रस्तुत स्तोत्र परम मधुर आहे हें कोणीही कबूल करील. या स्तोत्रावरून या वेळीं पंतांवर कोणतें विकट संकट ओढवलें होतें त्याचा उलगडा होत नाहीं. एकदां पंत ह्मणतात ' वा जीवदान दे गा.' ह्मणजे त्यांच्या जिवावरचें एखादें दुखणें गेलें होतें कीं काय कळत नाहीं. महाराष्ट्रभाषेच्या आणि तुह्मांआह्मां सर्वांच्या भाग्यानें पंतांवरचें प्रस्तुत संकट टळलें व त्यांनीं महाराष्ट्रभाषोद्धाराचा जो महाक्रतु आरंभिला होता तो

त्यांच्या हातून तडीस गेला. या स्तोत्रांत ‘ तनुनिर्वाहापुरता संग धरुनिही अनर्थ मज घडला’ असें पंतांनीं ह्मटलें आहे तें चिंत्य आहे. पंतांच्या जिवंतपणीं पंतांची केकावलीबद्दल जी प्रसिद्धी झाली किंवा ‘ भक्त श्रीरामाचा मी हा झाला जगांत बोभाट ’ असें जें त्यांनीं पुढें महद्विज्ञापनेंत ह्मटलें आहे त्याप्रमाणें त्यांची रामभक्त ह्मणून कीर्ति गाजली ती प्रस्तुत स्तोत्रावरूनच होय असें मला वाटतें. पंतांचे मित्र अनंतपंडित व बाबा पाध्ये या उभयतांस पंतांनीं एक पत्र पाठविलें होतें, त्याच्या पाठीमागें या दोघांपैकीं कोणी तरी ( बहुधा बाबा पाध्यांनीं ) पंतांच्या या स्तोत्राबद्दल त्यांची स्तुति करून त्यांना पुढील प्रेमळ आर्येंत दीर्घायुष्य चिंतिलें आहे:—

**ऐकुनि विश्व सुखावे ज्या केकीचा अपूर्व तो टाहो ।**
**त्याला आयुष्याचा ईशकृपेनें कधीं न तोटा हो ॥ १ ॥**

नाममाहात्म्यावर नामार्या, नामसुधाचषक ( नामामृताचा पेला ) व नामरसायन हीं तीन सुंदर प्रकरणें आहेत. तीनही मिळून ३५० आर्या आहेत.

६ **‘नामार्या’**:—या फार सरळ व रसभरित आहेत. ‘भागवतांचा सुहृद् जें नाम त्याशीं, पंत ह्मणतात, माझी नवीनच ओळख झाली आहे:—

**दैवें तुजशीं सत्सहवासांत नवीच ओळखी पडली ।**
**तूझ्या मधुरतरगुणीं अतिचंचल चित्तवृत्ति ही जडली ॥ २ ॥**

पंढरीसारख्या क्षेत्रांत जातां येतां भक्तजनांच्या संगतीनें सहजच पंतांना नामस्मरणाची गोडी लागली. नामदेवतुकारामासारख्यांनीं नामाची महती केवळ स्तुतिपाठ ह्मणून गायिली नाहीं, त्यांचा स्वानुभवच तसा होता. ‘ तुका ह्मणे रामनामीं । कृतकृत्य झालों आह्मीं ’ हा त्यांचा कबूलीजबाब आहे ! पंत पुढें ह्मणतात:—

**रामें निजप्रजांतें बहु सुख दिधलें, तसेंचि तद्राज्य ।**
**नामा ! त्यामागें त्वां विश्वाला दाविलें सुख प्राज्य ॥ ९ ॥**

रामानें ‘ एक अयोध्या नेली, परि मागें पुष्कळ प्रजा उरली ’ तिचा उद्धार नामानें केला आहे. यामुळें ‘ नामा ! रामाहुनि तूं सदय ’ असें पंतांना वाटून त्यांनीं कित्येक मधुर आर्यांत रामापेक्षां नामाची महती कशी अधिक आहे हें दाखविलें आहे:—

**श्रीरामें क्षत्रियकुळ काळ, तुवां जिंकिला जगत्काळ ।**
**तो भवचापचि खंडी, तूं भवभवपाशजाळ तत्काळ ! ॥ २१ ॥**

**श्रीरामाच्या कंठीं एका मिथिलाधिपात्मजा बाळा ।**
**तुझिया गळां सुरासुरनरवरसद्वृत्ति घालिती माळा ! ॥ २२ ॥**

यापुढें मनोवेगाच्या उसळीबरोबर प्रगट झालेल्या व वक्तृत्वपरिपूर्ण अशा कित्येक रसभरित आर्या आहेत त्यांत नामावरच्या उत्प्रेक्षा तर कमालीच्या सुंदर आहेत:—

**नामा ! रामाबाई आईचा अमृतपूर्ण तूं आमा ।**
**नामा ! रामाचा तूं विश्वासू काय मुख्य जासूद ।**
**नामा ! रामानें तूं आह्मां दिधलासि साधु जामीन ।**
**नामा ! रामाचा तूं प्रसाद ! विसरसि बुधा, न दीनांतें ।**
**आह्मां रामप्रभुच्या गाईंच्या तूंचि रक्षिता गोप ।**

नामामृताची थोडीशी तरी चव घेतलेल्या मुमुक्षूला या आर्या वेड लावतील ! याशिवाय यांतील आणखी कांहीं अतिमुरस आर्या दिल्याशिवाय राहवत नाहीं.

**नामा ! सामात्य प्रभु गेला स्वपदांतरासि ज्या काळीं ।**
**दे अधिकार तुज निजप्रतिनिधिला कीं सुखें प्रजा पाळीं ॥ ३२ ॥**
**तृष्णानदींत अधना तारिसि तूं नामराज नावाडी ।**
**तोचि उदार सदन्नें जो क्षुधितां पामरां जनां वाडी ॥ ४० ॥**
**यद्रसनाग्रीं नाचसि तूं होउनि सुप्रसन्न नटसा रे ! ।**
**नाचों लागति त्याचे भवपाशविमुक्त पितर चट सारे ॥ ६९ ॥**
**कळिकाळीं मंत्रांचें तेज प्रतिवासर क्षया जाय ।**
**तेज तुज चढे नामा ! बहु मानें काळ हा तुला काय ? ॥ ५९ ॥**
**तूं हंस सत्सरीं, तूं मधुकरवर सज्जनास्यपद्मांत, ।**
**तूं सर्वार्थ प्रकटिसि दीप ब्रह्मांडराजसद्मांत ! ॥ ६१ ॥**

रामनामामृताची गोडी जाणणाऱ्या मारुतीबद्दल पुढील उद्गार पहा:—

**नामा ! महामहंता ! हा मेळविला भला नवा चेला ।**
**दे तनुमनवाचेला, न प्रार्थी भोजना न वा चेला ॥ ८८ ॥**

७ या स्तोत्राच्या अखेरीस पंतांनीं मोठ्या खुबीनें त्या वेळच्या राजकीय क्रांतीबद्दल आपला अभिप्राय दिला आहे. सातारचा शाहुराजा भोळा होता, त्याचें राज्य त्याचे प्रधानपंत यांनीं स्वहस्तगत केलें ही गोष्ट त्या वेळच्या पुष्कळ सुजनांप्रमाणें पंतांनाही आवडली नाहीं. साधुवृत्तीचे पुरुष लौकिक बाबींसंबंधानें फारसें बोलत नाहींत, पण जेव्हां बोलायचें असेल तेव्हां त्यांच्या दृष्टीला निर्भेळ सत्य असेल तेंच बोलतात. आर्या ९४–१०७ मध्यें पं-

तांनीं पेशव्यासंबंधानें मुग्ध पण स्पष्ट असें मत दिलें आहे. 'नित्य महाराज तुह्मी स्वामी, नाम प्रधानपंत अजी' याप्रमाणें राम व नाम यांवर सातारकर राजे व मुख्यप्रधान पेशवे यांचीं अनुक्रमें रूपकें देऊन पुढें या 'काळांत भरभर स्वामी तुह्मीच कीं धणी हातीं' असें ह्मटलें आहे. पुढील दोन आर्या प्रकृत विषयासंबंधानें गोड आहेतच, पण अप्रकृत विषयासंबंधानेंही चिंत्य आहेत:—

**कीं बहु उदार जरि पति तरि नयनिपुणें गुरुप्रधानानें ।**
**प्रभुकुशलार्थ प्रभुता मिरवावी तच्छिरोपधानानें ॥ ९७ ॥**
**त्रिभुवनराज्य प्रभुचें प्रतिनिधिनें त्वां स्वहस्तगत केलें ।**
**भोळ्या दिगंबराचें आक्रमिलें वतन जळ जसें तैलें ! ॥ १०२ ॥**

याप्रमाणें केवळ परमार्थपर अशा विषयांतून पंत सहज राजकीय विषयांत शिरले व तत्कालीन राजकारणांतल्या ठळक गोष्टींवर आपला अभिप्राय देऊन मोकळे झाले. ९७ व्या आर्येंत पंतांनीं सुचविल्याप्रमाणें नयनिपुण गुरुप्रधान हे प्रभुता मिरवितात खरी, पण आपल्या प्रभूनें आपलें शिर आपल्या मांडीवर ठेवलें आहे हें जाणून केवळ त्याच्या कुशलासाठींच ती मिरवितात.

८ '**नामसुधाषकांत**' पंतांनीं रामनाममहामंत्राचें बीज जाणणाऱ्या शंकराची प्रार्थना केली आहे. हें स्तोत्र थोडेंसें क्लिष्ट व ह्मणून कठिण झालें आहे, तथापि खुबीदार व सरस उतरलें आहे. शंकरांनीं रामनाममहामंत्र कंठीं धरिला ह्मणून त्यांचा विषदाह शमला, पापनाशक सामर्थ्य अंगीं येऊन जगद्धितोदयकर कर्म त्यांच्या हातून घडलें. याप्रमाणें अनेकप्रकारानें रामनामाची महती यांत गायिली असून पंतांनीं शंकरांची काकुळतीनें विनवणी केली आहे कीं 'हें नाममंत्ररहस्य मला शिकवा.' पंत ह्मणतात कीं तुह्मीं आजपर्यंत कित्येकांना वर दिले, नाममंत्रही दिले, तसा मलाही रामनामवर द्या:—

**ज्यासि दिले ते दासचि, त्यांचा कैसा करूं नको हेवा? ।**
**हे वादाची जागा! न्यायें सांगेन वाद मी देवा!! ॥ ६१ ॥**

नामाला पंत इतके कां भुलले? पंत ह्मणतात:—

**निःशेष करि कुमतिला, ताप न दे, उग्र होय न कदापी ।**
**हें नामधाम निरुपम, जगती याच्या अनुग्रहें पापी ॥ ४९ ॥**

या काव्यांत पंतांनीं 'आर्यावृत्तासंबंधानें चार ठळक उद्गार काढले आहेत. 'गद्यें, ओव्या, सवया, दोह्यातें सर्व जाणती लोक' हें ठीकच आहे, पण पंत ह्मणतात "त्याबरोबर माझ्या आर्याही लोकांनीं वाचाव्यात. आर्यासुधा

बुधांनीं गीर्वाणभाषेच्या द्वारें आकंठ प्राशिली होती, पण प्राकृतग्रंथश्रवकांनीं ती केवळ कानांनींच ऐकिली होती, मी आर्येला लुब्ध झालों म्हणून 'ते हे सुधा बुधांनीं मज लुब्धाला दिलीं सदा त्यांनीं, आतां एवढेंच मागणें आहे कीं 'उचित प्रचार भासो रसिकांस प्राकृतांत आर्येचा!' रामभक्त श्रीशंकर यांनीं आर्या प्रथम छंदःशास्त्रप्रवर्तक, जे पिंगळाचार्य त्यांना शिकविली व मी ती त्यांजपासून शिकलों!" पंत आणखी म्हणतात:—

**प्रकटी प्रथम भगीरथनृप लोकीं सुरनदीस ती आर्या, ।**
**तशि हे मयूर नाहीं तरि सर्वांला न दीसती आर्या!! ॥ १११ ॥**

यांत, 'मी मोरोपंत जन्माला आलों नसतों तर सामान्यजनांस आर्या माहीतही झाली नसती' असा जो पंतांनीं अभिमान धरिला आहे तो मिथ्या आहे असें कोण म्हणेल? पंतांच्या पूर्वी मराठी कवींनीं आर्यावृत्त हातीं धरिलें नव्हतें व त्यांच्या वेळेपासून आर्येचा महती किती वाढली आहे हें कोणास सांगावयास पाहिजे?

'**नामरसायन**' हें यानंतरचें स्तोत्र होय. हें स्तोत्र अनेक दृष्टीनें फार महत्वाचें आहे. पंतांनीं 'चंपक' जसा शंकरप्रीत्यर्थ तयार केला होता, तसें हें रसायन परम रामभक्त मारुतिराय यांच्याप्रीत्यर्थ 'जटोनि कढवीलें' आहे. यांत हनुमद्गुणगौरवपर पुढील आर्या फारच मनोहर उतरल्या आहेत:—

**बा! प्लवगांत तुवांचि व्रत मुख्य ब्रह्मचर्य वागविलें ।**
**जागविलें मन योगीं, जगदुपकारार्थ देह भागविलें ॥ १९ ॥**
**तव विक्रमाविणें, पळभरिहि, न येतीच खळबळें वळणीं ।**
**श्रीमद्रामायणरस रसिकांला स्पष्ट लागतां अळणी!! ॥ २० ॥**

यानंतर मारुतीच्या प्रार्थनेंत पंत म्हणतात:—

**आहासि याचि लोकीं रामप्रभुचा बहिश्चर प्राण ।**
**मज बहु तुझा भरंवसा, कीं बा करिशील तूं परित्राण ॥ २६ ॥**
**'श्रीरामा! जय रामा! जय जय रामा!' अशाचि हाकांनीं ।**
**सुप्तहि पशु शिशु उठती! गेला तुझिया न नाद हा कानीं? ॥२७॥**
**जलदोद्धार प्रभुनें तर्पावे सर्व सारखे दास ।**
**न्यूनाधिकप्रसादें धरि सेवकचित्त फार खेदास ॥ ४५ ॥**
**अज्ञानदशामुख मज या भवसिंधूंत कोंडिलें क्रूरें ।**
**दूरें घ्यावा त्याचा त्वांचि समाचार सत्कृपापूरें ॥ ४७ ॥**
**बा! उद्धरी मला, मी पापी, लटिकेंचि कोण भिडुनि घे! ।**

**मिथ्या दुःख मिरवितां नेत्रांतुनि काय अश्रुबिंदु गिळे ? ॥ ४८ ॥**
**आधीं नित्य अपावें दीनातें, फावल्यास नामातें, ।**
**ऐसें भूतदयान्वित जें बहुमत होय दास्य रामातें ॥ ५१ ॥**
**या जी उद्धार करा दीनाचा, पाहतां किती अंत ? ।**
**संत न अंत पहाती, हातीं असतां समर्थ भगवंत ॥ ६३ ॥**
**चुकणें भूषण आह्मां, भूषण करणें क्षमा तुह्मां देवा! ।**
**अनुरागें कीं रागें, करचरणांभोज या शिरीं ठेवा ॥ ७८ ॥**

यापेक्षा अधिक आर्तस्वरानें करुणा भाकलेली कोठें आढळेल काय? आर्या २७।४८ मध्यें पंतांनीं सहज आपल्या नित्यक्रमाचा थोडासा उल्लेख केला आहे तो तरी किती हृदयद्रावक आहे! त्या करुणावनाची प्रार्थना करितांना या मयूरानें अवशींपहांटे असा टाहो फोडावा कीं निजलेले गोठ्यांतले पशु व घरांतलीं मुलेंबाळें यांनीं दचकून उठावें! टाहो फोडतां फोडतां पंतांच्या नेत्रांवाटें भगवत्प्रेमातिशयानें वळवळा अश्रुपात व्हावा! आणि अशा परम भगवद्भक्तास अलीकडच्या अर्धवट आस्तिकांनीं किंबहुना प्रच्छन्न नास्तिकांनीं नांवें ठेवावीत, एकादुसरी आर्या किंवा समास काढून त्याचा काथ्याकूट करीत 'मोरोपंत केवळ भापांतऱ्या कवि होता, यमकें जुळवावींत ह्मणजे त्याचें काम झालें. तो संत कसचा आणि भक्त कसचा?' याप्रमाणें नाक उडवीत मोठ्या आढ्यतेनें चर्पटपंजरी करावी हें ह्या पतितकाळाचें फार मोठें लक्षण आहे! असो, प्रेमभरानें जरा सलगीच्या नात्यानें पंत ह्मणतातः—

**तूं रामदास, मींही ! तूं ह्मणसी राम ? राम बा मींही ! ।**
**तूं मुक्त, बद्ध मीं कां ? रीति बरी काय रामनामीं ही ? ॥ ८५ ॥**

वाल्मीकि उफराटीं अक्षरें ह्मणूनही तरला, मग मीं सरळ 'राम' ह्मणूनही तरणार नाहीं का?

**आधीं रा, म मग, असे अव्यवहित वर्ण दोन नामाचे ।**
**उच्चारितसे स्वामी ! ते उफराटेचि काय कामाचे ? ॥ ८६ ॥**

पंतांनीं पुढें मारुतीरायाला आपल्या काव्याचे गुण 'प्रेम, प्रतिभा, शिक्षा, रीति' हे उघड सांगितले आहेत, व 'तुमच्या पदप्रसादें फार. चमत्कार अर्थयमकांचे' साधून त्यांत प्रभुयश गाइलें आहे ह्मणून कळविलें आहे. पंत आणखी ह्मणतातः—

**प्राकृत ह्मणोनि निर्भर हांसोत अतज्ज्ञ नीच मत्कृतिला ।**
**परि जाणसील बा तूं रसिककविवरा ! मनीं चमत्कृतिला ॥६७॥**

प्राकृत काव्याला संस्कृताभिमानी पंडित हांसत असूनही पंतांसारख्या सुजनांनीं भगवत्प्रीत्यर्थ व जनहितार्थ प्राकृतभाषेंतच काव्यें रचण्याचा निश्चय कायम ठेवला हें त्यांस भूषणावह आहे. पुढील दोन आर्यांत पंतांनीं आपली काव्यस्फूर्ति रामराय व मारुतिराय यांजपासून उद्भवली आहे, तेव्हां त्यांची प्रसन्नता असल्यावर मी इतरांची पर्वा करीत नाहीं असें मनोहर दृष्टांत देऊन सुचविलें आहे.

**निजपटुसेवकवदनें, आपणही पढवितात कीरा जे।**
**'तत्कलभाषण', ह्मणती 'अमृताहुनि मधुर', कौतुकी राजे ॥७०॥**
**वीणा वेणु जडचि परि वाजवित्याची कळाचि बोलविते।**
**अन्यांची काय कथा? ती वादकमस्तकेंहि डोलविते! ॥७१ ॥**

यानंतर पंतांनीं स्वकृत ग्रंथांपैकीं कांहीं सुरस काव्यांची नांवें घेऊन तीं मारुतिरायास दाखविलीं. पहिलें पंतांचे प्रिय मंत्ररामायण:—

**यावें, दर्शन द्यावें, बोलावें, डोलवूनि डोलावें,।**
**वाटे 'स्वमंत्ररामायण,' निजनाटक, तुह्मींच तोलावें ॥ ६६ ॥**
**वाचीन 'मंत्ररामायण' आधीं मीच, मग तुह्मीं वाचा।**
**वाचा वाचाया बहु झड घाली, ग्रंथ सत्य नांवाचा ॥ १०७ ॥**

प्रथम झालेल्या काव्यांत मंत्ररामायण खरोखरीच उत्कृष्ट उतरलें आहे यामुळें, त्यांत मारुतिरायाच्या कामगिरीबद्दल 'हनूमन्नाटका' प्रमाणें पंतानीं त्याची योग्य तारीफ केल्यामुळें व मुख्यत: राममंत्र नित्य जपणाऱ्या मारुतीला मंत्रात्मक रामायण फार आवडेल अशी पंतांची खात्री असल्यामुळें वरील प्रमाणें पंतांनीं डौलाचे उद्गार काढले आहेत. मंत्ररामायणाशिवाय, प्रल्हादविजय, 'मज तों वाटे सुधानदी वाहे' असें पंतांनींच ज्याबद्दल ह्मटलें आहे तें कुशलवचरित, 'नूतन लिहिलेल्या' कृष्णकथा ह्म० कृष्णविजय, संशयरत्नावलि, साधुसत्कार, आर्याकेकावलि, नामसुधाचषक, रामनामार्या, आर्यामुक्तामाला या आठ काव्यांचा नामरसायनांत उल्लेख केला आहे. अर्थातच यानंतर रामरसायन लिहिलें गेलें आहे. पंतांनीं या काव्याचे शेवटीं आपले मित्र अनंतपाध्ये, नारायणभट दाते, अनंत नारायण बाबा, रघुनाथपंत कोशे या चौघांचा उल्लेख केला आहे. हे सर्व सज्जन पंतांच्या 'पुराणकथांचे' व 'काव्यांचे मार्मिक भोक्ते' होते.

१ पावा नानामधुरध्वनीं गाजे। परी तो वाजवित्याचेनि वाजे ॥ नाथभागवत अ. २

१० नामार्या, चपक व रसायन या तीन स्तोत्रांत पंतांनीं अनुक्रमें नामगौरव, नाममंत्रज्ञ, शंकराचीप्रार्थना व नामरसज्ञ मारुतीचेंगौरव केलें आहे. याप्रमाणें नाममाहात्म्य प्रकट केल्यावर ' वाङ्मनःप्रार्थना ' या स्तोत्रांत पंतांनीं वाचा व मन यांची प्रार्थना केली आहे. या स्तोत्राचें वृत्त ' वसंततिलका ' हें आहे. यांत मोठाले समास, लांब लांब पण सुरस यमकें, भाषाप्रौढी व अर्थगौरव हे गुण चांगले साधले आहेत. ' नामाच सोडुनि दुजा पथ वावरावें ' हा यांत वाणी व मन यांस मुख्य बोध आहे. 'नामें तरे जन, तसा न वनीं तपानें ' हा पंतांचा सिद्धांत आहे.

**'संतांसि वेड हरिनाम-नवासवाचें । पीयूष तेंवि हरिना मन वासवाचें'**

असें पंत नामामृत ओरपून स्वानुभवानें सांगतात. यांतील दोनच श्लोक पहा:—

**हो स्तोत्रपात्र रसने ! प्रभुनाम गा गे**
**मान्या शुनी न, जरि आठहि याम गागे ।**
**दे मान, पुण्य, पुरुषार्थ, सुखादि, सोपी**
**मुक्तीहि, नामरस दुर्बळसा दिसो, पी ॥ २३ ॥**
**दे रामराजचि अनंत धना, दरातें**
**पावे न तो प्रभु, करी न अनादरातें ।**
**जे नीतिचा प्रकट मोडिति कायदा ते**
**विद्यावयोद्रविण दुर्मद काय दाते ? ॥ ३२ ॥**

विद्या, वय, व द्रव्य यांच्या मदानें धुंद झालेले नीतिमार्गभ्रष्ट पुरुष जगांत फार असतातच; पण नामनिष्ठ पुरुष कोणासही भीत नाहीं, प्रपंचांत तो कसाही राहो:—

**' वर्तों प्रपंचविषयांत अवासवाही । मी नामनिष्ठ न नृपास, न वासवाही '**

याला प्रल्हादाचें उदाहरण आहेच. असो. प्रस्तुत काव्यांत पंतांची वाणी चांगली सुसंस्कृत दिसते.

**११ सन्मनोरथराजि** ( सज्जनांच्या मनोरथांची माला ):—प्रस्तुत काव्यांत पंतांचें कल्पकपण, व्यवहारचातुर्य, व अत्यंत मार्मिक पण नित्य व्यवहारांतल्या उपमेनें गंभीर विषय हीं मनोरंजक करण्याचें शहाणपण हे गुण जितके स्पष्ट दिसतात तितके ते पंतांच्या अन्य कोणत्याही काव्यांत, इतकेंच काय, पण दुसऱ्या कोणत्याही कवीच्या काव्यांत दृष्टीस पडणार नाहींत. पंतांना गृहस्थाश्रमाचें सौख्य पूर्णपणें अनुभवायला सांपडत होतें,

व त्यांच्या उदार व प्रेमळ स्वभावामुळें त्यांचें घर व शेजारीपाजाऱ्यांच्या सन्मित्रांची घरें आनंदाचीं स्थानें होऊन राहिलीं होतीं. कुलस्त्रियांच्या मनोधर्मांची पंतांना जशी ओळख होती तशी ती दुसऱ्या कोणत्याही कवीला होतीसें मला वाटत नाहीं. या काव्यांत बहुधा प्रत्येक आर्येंत एक सन्मनोरथ एका साध्या उपमेसह व्यक्त केला आहे. कुलस्त्रीसंबंधानें ह्यांत घेतलेल्या यांत बऱ्याच आर्या आहेत, पण त्या बहुतेक 'पंतांचा गृहस्थाश्रम' या प्रकरणांत घेतल्या आहेत म्हणून पुनरुक्तिदोष टाळण्यासाठीं [illegible] आर्यांचाच येथें विचार करूं. 'उपमा कालिदासस्य' अशी संस्कृत म्हण आहे, पण प्रस्तुत काव्याकडे पाहिलें म्हणजे पंतांनीं ८५ आर्यांत १०० । १२५ अति समर्पक उपमा दिलेल्या पाहिल्या म्हणजे 'उपमा मयूरस्य' अशी ही म्हण फिरवावीसें वाटतें. या काव्यांतल्या कांहीं सुंदर आर्या आतां दाखवितों:

कर्णयुगांत भरावें हे हरि ! हरिजनयश प्रचुर त्वां मे ।
जैसा दोन्हीं कोंदी गुर्जरदेशस्थ विप्र चुडयानें ॥ १ ॥
हा हो सुगम राघवनाम. सांगेंच जीभ मेलिगा ।
शीला जपो, बहु जपति जेंम अध्यात्मक साधु ते लिंगा ।

पंतांनीं या आर्येंत गुजराथी लोकांचे व लिंगाइत यांच्या ज्या विशेष प्रकारच्या महाराष्ट्रांत प्रसिद्ध आहे त्यासंबंधानें मनुष्य विनोदानें उपमा घेतल्या आहेत.

सत्संगमीं असावा प्रेमा, ग्रीष्मीं जसा असे व्यजनीं ।
रम्य हि असक्त हो मन, मधुपा चंपक जसा असंगम्य जनीं ॥ ५
कांपावें मन कुजनीं, वृद्धपणीं कांपतें जसें शिर में ।
सत्संगींच शिरावें, बाळ जनन्यंकीं जसें शिरतें ॥ १३ ॥
नच सोडावें नारायणनामातें कदापि हें वदन ।
मेल्याही लोभ्याच्या चित्तें सोडी न जसें सदन ॥ १७ ॥
हरिकीर्तिगीति जी त्यां देवा ! व्हावें कुरंग रे गीत ।
लोळावा हा सत्पदधूळींत जसा तुरंग रेतींत ॥ ३२ ॥
वत्स जसा स्तन्यातें सादर पीतो धरूनि आस्यातें ।
जें साधुमुखोद्गत यश तेंसें प्यावें करूनि आस्यातें ॥ ३४ ॥
हरिकीर्तनीं शिरावें, धनिकगृहीं जेंवि जपुनि चोरानें ।
न उठावें बहुकार्यें, बहुभारें जेंवि कुंजर ढोरानें ॥ ३५ ॥
निज देहगेहभान प्रभुभक्तांच्या कधींहि मेळांत ।
मज कीर्तनीं नसावें, जैसें शिरतां मुलांस खेळांत ॥ ३७ ॥

या काव्यांत सगळ्याच आर्या फार मौजेच्या आहेत. यांत प्रागल्भ्य व विनोद, भक्ति व व्यवहारावलोकन, यांचें सुरेख मिश्रण आहे. काव्य, नीति, व्यवहार व भक्ति यांचें स्त्रीपुत्रादिकांस शिक्षण देणें असेल तर प्रत्येक कुटुंबवत्सलानें हें काव्य त्यांजकडून पाठ करून घ्यावें !

**१२ प्रश्नोत्तररत्नमाला:**—ही श्रीशंकराचार्यकृत संस्कृत रत्नमालेची मराठी प्रतिकृति आहे. ही अर्थातच गुरुशिष्यसंवादरूप आहे. ही भाषांतररूप असल्यामुळें हींत पंतांच्या पदरचें असें कांहीं नाहीं. तथापि हें भाषांतरही इतकें सुबक उतरलें आहे कीं यांतील कित्येक चरण मराठींत ह्मणीरूपानें मुरले पाहिजेत.

**( १ ) तें शल्य, नेत्र झांकुनि केलें असतें सुगुप्त जें पाप ।**
**( २ ) शिष्या ! स्त्रीनेत्रशरें पावेना जो व्यथेसि तो योधा ।**
**( ३ ) तो मित्र होय बापा ! पापाचारांत जो बुडों नेदी ।**
**( ४ ) दरिद्रपण तेंचि जो असंतोष.**

असे चरण लोकभाषेंत अवश्य रूढ झाले पाहिजेत. या मालेच्या उपसंहारांत पुढील आर्या आहे:—

**उच्चारितासि शर्करा जासि, कटु होय खळांस सुरस ही कविता ।**
**शिष्टा पद्मा सुख दे, दुष्टा घूकांस ताप दे सविता ॥ १ ॥**

या प्रमाणें निंदकांचा समाचार घेऊन पंत ह्मणतात: 'या आर्या आर्यांनीं गाव्या, प्याव्या जशा सुधाधारा.'

**१३ पतिव्रताकीर्तन:**—ह्या पवित्र स्तोत्रांत सावित्री, अनसूया, अहल्या, अरुंधति, रुक्मिणी, मदालसा वगैरे प्राचीन पतिव्रतांना भक्तिपुरस्सर नमन करून पंतांनीं त्यांची करुणा भाकली आहे. यांतील सर्व आर्या एका सांच्याच्या आहेत. उदाहरण:—

**श्री मुनिवर्यात्रीची जी अनसूया महासती भार्या ।**
**तीस नमस्कार असो, मजवरि ती बहु दया करो आर्या ॥ ७ ॥**

याप्रमाणेंच साऱ्या आर्या आहेत. प्रत्येक आर्येंत एका पतिव्रतेस नमन आहे, व त्या आर्येंत तिच्या पतीचेंही नांव घातलेलें आहे. सर्व स्तोत्राच्या शेवटीं पुढील सुंदर आर्या आहे:—

**श्रीभगवज्जन जो जो जी जी त्याची महासती भार्या ।**
**तीस नमस्कार असो, मजवरि ती बहु दया करो आर्या ॥ ५० ॥**

आपल्याइकडे विष्णुसहस्रनाम ह्मणतांना प्रत्येक नामोच्चाराबरोबर एक तुलसीदल श्रीविष्णूला वाहावयाची चाल आहे. भगवंताला अनंत नामें आहेत, तीं सारीं कोणाला मोजवणार आहेत? प्रत्येक नांवाबरोबर परमेश्वराच्या सगुणनिर्गुण स्वरूपाची पवित्र भावना उत्पन्न होत असते. अशीं अनंत नामें घेतांना, व त्यांचा एकामागें एक सारखा उच्चार करीत असतांना सर्व नामांच्या समुच्चयोच्चारानें विशेष प्रकारची भावना बळावते, परमेश्वराच्या अनंत, अपार लीलांचे व रूपांचे वर्णन चाललें असतांना प्रेमवृत्ति उचंबळते व त्या अनंतरूपस्मरणचिंतनांत हृदय वितळून जातें, असा सर्व सुजनांचा अनुभव आहे. हें स्तोत्र सावित्रीव्रतासारख्या प्रसंगीं स्त्रियांनीं सुमनार्पणासह ह्मणावें. सदर स्तोत्र ह्मणतांना, मातेच्या समीप जसें लेकरूं बसतें तसें आपण पतिव्रतासमुदायांत त्यांजपुढें हात जोडून बसलों आहोंत असा सद्भाव जागृत होतो. याच बुद्धीनें पंतांनीं दुसरें एक सद्गुरुस्तवनपर स्तोत्र केलें आहे त्याबद्दल आतां चार ओळी लिहितों.

१८ **गुरुस्तुतिमुक्तांजलिः**—यांत अष्टोत्तरशत स्तुतिरूप विमल मोत्यांची अंजलि पंतांनीं 'श्रीगुरुरामपदाब्जीं नमनपूर्वक विनयानें समर्पिली' आहे. आमच्या इकडे मोक्षदात्या सद्गुरूबद्दल जो विलक्षण प्रेमादर आहे त्याची कल्पनाही परदेशस्थ लोकांना करितां येत नाहीं. ज्ञानेश्वरी अ० १३ मध्यें 'आचार्योपासनं' या पदावर ज्या ९३ ओंव्या केल्या आहेत, त्या वाचकांनीं अवश्य पहाव्यात; ज्ञानोबा, व एकनाथ यांची गुरुभक्ति कशा प्रकारची होती हें जाणून घ्यावें; आणि नंतर मराठी भाषेतलीं प्रस्तुतसारखीं गुरुस्तोत्रें वाचावीं, ह्मणजे त्यांची गोडी कळेल; एरवीं तीं कालत्रयींही कळणार नाहींत. 'श्रीगुरुचें म्यां व्हावें लोड, उशी, दार, सुत, पलंग, इवा' या विचारसरणीची ज्याला ओळख नाहीं त्याला प्रस्तुत स्तोत्रासारखीं स्तोत्रें तितकीं मनोरम वाटणार नाहींत. ज्ञानोबारायांचे गुरु जसे निवृत्तिनाथ, एकनाथांचे गुरु जसे जनार्दनस्वामी, तसे पंतांचे कोणी मोक्षगुरु होते, कां उत्कट प्रेमोल्हासाची आंतूनच कळ फिरविणारा, एकच असून अनंतरूपानें नटणारा, संपूर्ण ब्रह्मांडाची क्रिया व ज्ञान या शक्तींचा प्रेरक, सर्वांतर्यामी, सर्वसाक्षी, सर्वगत, परमात्मा श्रीरामचंद्रच त्यांचा गुरु होता यावद्दल निर्णय करण्यास मजजवळ कांहीं साधन नाहीं. त्यांनीं आपल्या विद्यागुरूबद्दल जागोजाग उल्लेख केले आहेत, पण मोक्षगुरूबद्दल कोठेंही कांहीं लिहिलें नाहीं. 'श्रीगु-

रुराया ! शुद्ध ब्रह्माचि तूं नर न, दिससि जरि नरसा ' या चरणावरून त्यांचे कोणी नररूपी गुरु असावेत असें अनुमान होतें. देहधारी गुरु लागतो, पण अशा खऱ्या गुरूची एकदां गांठ पडून एकांत झाला कीं गुरुस्वरूप आणि ब्रह्मस्वरूप एकच होतात. असो. प्रस्तुत स्तोत्रांत श्रीगुरूचें वर्णन फारच उत्कृष्ट केलें आहे व सबंध स्तोत्र एकदम एकसारखें ह्मणत बसलें ह्मणजे गुरुस्वरूपाची कांहींशीं अटकळ होते.

**श्रीगुरुचरणस्मरणप्रणतिस्तुतिदर्शनार्चनश्रवण ।**
**येथेंच हृदय संतत संत तरति करुनियां अतिप्रवण ॥ १ ॥**
**श्रीगुरुचे जे, त्यांच्या कामानुसारि साहती लत्ता ॥**
**गुरुभक्ताची चाले त्या काळावरहि सर्वदा सत्ता ॥ २०**
**श्रीगुरुपदप्रसादें ध्रुवबाळें सुपद जोडिलें अढळ ।**
**इच्छित पदार्थदानीं कोणाचा हात बा असा सढळ? ॥ ६० ॥**
**श्रीगुरुवांचुनि वांचुनि विफळ जिणें यांत वांकडें काय ? ।**
**शुक सांगे, 'भागविला कृष्णें वाहूनि लांकडें काय !' ॥ ६२ ॥**
**श्रीगुरु माय, श्रीगुरु तात, श्रीगुरु धणी, परित्राण, ।**
**श्रीगुरु वित्त, श्रीगुरु विद्या, श्रीगुरुचि जीवनप्राण ॥ ३४ ॥**

सर्व स्तोत्र वक्तृत्वपूर्ण आहे. पंत सद्गुरुपाशीं मागणें मागतात तें असें. ' श्रीगुरुराया, द्यावें ज्ञान भजावा, जना न सांगाया! ' 'श्रीगुरुराया दे तें मर्यादेतें न शील जें मोडी. ' तसेंच

**श्रीगुरुराया ! प्रेमें सेवावे म्यां तुझे सदा चरण**
**हे मात्र न सोडावे, जोडावें निश्चयें सदाचरण ॥ ९४ ॥**

आर्या ७९ मधील ' गातों तुझ्या यथामति मीं प्रेमें, जेंवि गाय शुक लीला ' या आर्यार्धावरून ' कृष्णविजय ' किंवा ' मंत्रभागवत ' पंत लिहीत होते, तेव्हांच प्रस्तुत गुरुस्तुति लिहिली गेली असावी असें वाटतें.

**१४ महाविज्ञापना:**--हें पंतांच्या उत्तमोत्तम स्तोत्रांपैकीं एक आहे. देवांचीं, संतांचीं स्तोत्रें, नामाचे, पतिव्रतांचे, सद्गुरूचे गोडवे गाऊन गाऊन चित्तप्रसाद झाल्यावर प्रस्तुत स्तोत्र रचिलें आहेसें स्पष्ट दिसतें. पंतांची त्यांच्या वेळीं केवळ कवि ह्मणूनच प्रसिद्धी झाली नव्हती, किंबहुना त्या वेळीं ' भक्त श्रीरामाचा मी हा झाला जगांत बोभाट. '

१ गुरु कर्णधार त्याची सुदृढा तत्वोपदेशवाक् सुतरी ।
यहनि भवाब्धी तरले बहु बुध तत्कीर्तिही जना उतरी ॥ कृष्णविजय ८०-१९

पंतांनीं 'नामार्या' लिहिल्या तेव्हां सत्सहवासांत त्यांना नामाची नवीन ओळख झाली होती, पण त्या ओळखीनंतर त्यांचा अन्योन्य प्रेमा जमून 'नामरसायन' लिहिलें तेव्हां एकांतांत सर्व भान विसरून त्यांनीं नामाशीं अशा प्रेमाच्या गोष्टी कराव्या कीं मुमपशुशिशूंनींही दचकून उठावें! पुढें नामानें त्यांजवर पूर्ण कृपा केली. 'द्रवलें नाम' (आर्या ३२)–नामानें पूर्ण कृपा केली. पण एकट्या नामाची कृपा पुरत नाहीं. त्याबरोबर 'भागवतांची ह्म. भगवद्भक्तांची कृपा व्हावी लागते. ती व्हावी ह्मणून प्रस्तुत 'महाद्विज्ञापना' केली आहे. पंतांचा निश्चय एक टरला कीं:—

**मज भागवतांचा कीं नामाचा भरंवसा. न इतरांचा।**
**बा अकलंका लंकानाथा! वाळासि जेंवि पितरांचा॥ ३१॥**

येथें लंकानाथ ह्म. बिभीषण होय. ज्या भागवतांनीं परमेश्वराला स्ववश करून ठेवला होता त्यांच्याकडून पंतांनीं 'सूत्र लावावयाचें मनांत आणलें.' व वसिष्ठ, जामदग्न्य, अरुंधति. बिभीषण, नारद, वाल्मीकि. प्रल्हाद, बळि, व्यास, एकनाथ, दामाजीपंत. जनाबाई, व 'जे पूर्वदक्षिणोत्तर. पश्चिम देशांत, मध्य देशांत' भागवत झाले त्या सर्वांची विज्ञापना पंतांनीं या मधुरतर स्तोत्रांत केली आहे. कोणी तरी खुद्दापर्यंत आपली दाद लावावी ह्मणून पंतांनीं या सर्वांकडे डोळे लावले होते! हें सर्वच स्तोत्र प्रेमळ आहे. वाल्मीकि व नारद यांच्या विज्ञापना तर फारच प्रेमळ आहेत. या स्तोत्रां तल्या कांहीं आर्याः—

**नमितों पाय वसिष्ठा! शरणागत जामदग्न्य हा या! मी।**
**कामी, क्रोधी. लोभी, सांगुनि शिष्यासि. उद्धरा स्वामी॥ १५॥**
**माते अरुंधति! तुवां मद्विषयीं एकदांचि बोलावें।**
**गुरुचें गुरुपत्नीचें वचन सुशिष्यें समान तोलावें॥ १५॥**
**प्रभुसि कथुनि मज तारीं. विश्व तुझें यश महाकवे! गाय।**
**धर्मज्ञा वाल्मीके! आली तृपिता न हाकवे गाय॥ ४१॥**

नारदस्तुतींत पुढील आर्या आहे:—

**फिरसि सदा. उद्धरिसि प्राणी संसारसंकटीं पडला।**
**अडला नुपेक्षिला त्वां, दीनजनोद्धार बहु तुला घडला॥ ५५॥**

बळीच्या विज्ञापनेंत पुढील खुबिदार आर्या आहे:—

**बा बळि! उद्धरिव कसा. सांगुनि सद्वारपाळका मातें।**
**कार्य निरोपेंचि करिल, न चुके सत् द्वारपाळ कामातें॥ ७४॥**

सीताप्रार्थनेंतही ‘ प्रभुच्या चरणवियोगें स्वात्मा तुज पोळला सुतनु! टाका ’ अशी मार्मिक उक्ति आहे. पंतांचें लिहिणें बावळटपणाचें कधींही नसायचें. देवाची करुणा भाकतांना मुद्रा खाचाखोचा असायच्या. देवाला पंतांनीं सळो कीं पळो करून सोडलें असेल! पंतांसारखा कायदेपंडित, कोटिबाज, अतिसूक्ष्म बुद्धि भक्त देवाला कधीं मिळाला नसेल! पंतांनीं देवाला पदोपदीं अड विलें आहे. इकडे अगदीं सगद्गद स्वानें, केविलवाणी मुद्रा करून, आर्तस्वरानें देवाला आळवायचें, व क्षणभरानें ‘ जरि न समुद्धरिशी, तरि विश्वांत करील भंड हा नीच! ’ अशी धमकावणी द्यायची! तुकोबांनीं देवाला खूप खेचलें आहे, पण पंतांसारखा युक्तीच्या, शब्दाच्या, अर्थाच्या कोड्यांनीं देवाला कोंडून पकडणारा भक्त देवाला खास दुसरा मिळाला नसेल! हा कोंडीचा प्रकार ‘ संशयरत्नावलींत ’ फार नामी प्रकट झाला आहे. असो. या स्तोत्राच्या शेवटी ‘ कोठें उष्टीं काढी, कोठें खटपट करी, भरी पाणी ’ याप्रमाणें देव भक्तांची अंगें सेवाचाकरी कशी करितो तें दाखविलें आहे. व ठिकठिकाणीं जे भक्त झाले ‘ ते मज शरणागतासि पावा जी! ’ ह्मणून त्यांची उत्कट प्रेमानें याचना केली आहे. या स्तोत्रांतील सारभूत अशा पुढील दोन आर्या आहेत:—

> **पंढरपुरांत झाला, जे व्हाल, असाल, भक्त बावाजी।**
> **श्रीविठ्ठलरूप तुह्मी ते मज शरणागतासि पावा जी! ॥१२९॥**
> **मागें झाले, असती आतां, होणार जे पुढें काय,।**
> **त्या भागवतांचे म्यां भावें साष्टांग वंदिले पाय ॥ १०१ ॥**

१२ **मारुतिस्तुतिः**—पंतांनीं नामरसायनांत ( आर्या १११ ) मारुतिरायाची ‘ स्वबाहुमहिम्यातें गाया आज्ञा मागितली ’ होती, ती मिळून त्यांनीं प्रस्तुत स्तोत्र रचिलें आहे. हें अनुष्टुप् वृत्तांत आहे. यांत मारुतीचें साग्र चरित्र दिलें आहे. पण नामरसायनाची गोडी याला आलेली नाहीं. ‘ तें तें वा! त्वां कर्म केलें, जें जें अन्या सुदुष्कर. ’ हें याचें तात्पर्य आहे.

१९ **आशंसाष्टकः**—पंढरीस पंतांच्या दप्तरीं एका जुन्या कागदावर हें लिहिलेलें आहे. पंतांचा सारा हृदयस्थ प्रेमळपणा व सद्भाव या लहानशा अष्टकांत प्रतिबिंबित झाला आहे. पंतांच्या हृदयमंदिरांतल्या अगदीं आंतल्या खोलींत कसल्या वृत्ति खेळत आहेत त्या आतां आपण पाहूं. पंत देवाला ह्मणतात:—

तव पादसरोरुहीं स्वचित्तभ्रमरातें रस चाखवूनि गोवूं ।
तुज भक्त तुझे सदैव गाती मृग आम्हीं गुणगीतसक्त होवूं ॥१॥
मज वाटतसे सभाग्य मोठें भगवद्भक्त तयांत म्यां जुडावें ।
तदधीन तुज्या यशःसुधेचा ऱ्हद गंभीर तयामध्यें बुडावें ॥ २ ॥
तुज वर्णिती संत संगमुक्त प्रकृतिप्रेमळ तद्गुणीं शिरावें ।
तुझिया गुणसागरांत माझें मन हें सैंधव माधवा ! विरावें ॥ ३ ॥
गमतें भगवज्जनप्रसंगें मज, टाकूनि गृहादिलोभ जावें ।
करुणावरुणालया मुकुंदा ! तुजला सादर सर्वदा भजावें ॥ ४ ॥
मन हें विषयीं उडीच घाली, विष हें जाणुनि यावरीं चिटावें ।
तव कीर्ति उदार कामधेनू तिस मीं होउनि वासरूं चिटावें ॥५॥

१६ पंतांनीं आरत्या, पदें, अभंग वगैरे मिळून ५०।६० केलीं आहेत. यांपैकीं २०।२२ प्रसिद्ध आहेत. पंतांनीं ' रामाची आरती ' केली आहे ती सर्वोत्कृष्ट आहे. ही आरती व कांहीं उत्कृष्ट पदें पूर्वींच ' मोरोपंती वेंचे ' या पुस्तकांत मी प्रसिद्ध केलीं आहेत. पंतांनीं हरि, हर, गणपति, सूर्य व देवी या पंचायतनावर केलेली आरती चातुर्मासिबोवांच्या दप्तरीं सांपडली. चातुर्मास्यांच्या दप्तरीं निम्या कार्डाएवढ्या चिटोरीवर पंतांनीं स्वहस्तानें लिहिलेला एक अभंग मिळाला तो असा:—

राहोनियां संतांपाशीं । संतापाशीं भांडती ॥ १ ॥
पावे ताप तोक थानीं । तो कथांनीं पावती ॥ २ ॥
रामतोयदा समोर । दासमोर नाचती ॥ ३ ॥

पुढील पदें किती गोड आहेत:—

रसने ! न राघवाच्या थोडी यशांत गोडी ॥ ध्रु० ॥
निंदास्तुती जनाच्या । वार्ता वधूधनाच्या ।
खोट्या व्यथा मनाच्या । कांहीं न यांत जोडी ॥ १ ॥
साधूंचिया सदातें । सुख देतसे सदा तें ।
श्रवणीं सुधा, मदातें । सोडोनि, हात जोडी ॥ २ ॥
विनवी मयूर भावें । सखि ! हेंचि नित्य गावें ।
मजला द्रवोनि द्यावें । दुसरें न बंध तोडी ॥ ३ ॥

तुज्या चरणकमळीं । होवूं अळी हें मन ॥ १ ॥
मग सुखें नरकवास । घडो यास निजदोषें ॥ २ ॥
तुझे पायीं तुळशीवाणी । माझी वाणी रंगावी ॥ ३ ॥
भक्त मयूर करुणाघना । भरीं कानां निजगुणें ॥ ४ ॥

१७ **संस्कृत स्तोत्रें:**—पंत जाडे संस्कृत पंडित असल्यामुळें मराठीप्रमाणें संस्कृत भाषेंतही त्यांनीं कित्येक सुरस स्तोत्रें रचिलीं आहेत. त्यांतही मराठींतल्याप्रमाणें यमकानुप्रासांचे चमत्कार जागोजाग साधून चांगला प्रसाद साधला आहे. त्यांची 'मुक्तामाला' प्रसिद्धच आहे. 'मुक्तामाला' मराठी अर्थासह निबंधमालाकारांनीं प्रथम प्रसिद्ध केली. याशिवाय चार पांडुरंगस्तोत्रें, शिवार्याशतक, शंकरस्तव, हरिहरप्रार्थना, रामस्तुति, कृष्णस्तवराज वगैरे दहा बारा स्तोत्रें आहेत. यांपैकीं मुक्तामाला, चतुर्थ पांडुरंगस्तोत्र, शिवार्याशतक, रामस्तुति आणि कृष्णस्तवराज हीं उत्तम आहेत. हीं वाचल्यावर पहिला विचार मनांत येतो तो हा कीं, पंत संस्कृतांत एवढे गाढे विद्वान् असूनही त्यांना प्राकृत भाषेंत काव्यें रचण्याची स्फूर्ति परमेश्वरानें दिली हा त्या दयाघनाचा महाराष्ट्रभाषेवर केवढा तरी अनुग्रह! पंतांनीं संस्कृत भाषेंतच ग्रंथ रचण्याचें मनांत आणलें असतें तर त्यांना ही गोष्ट किमपि दुष्कर नव्हती. पण आमच्या परमभाग्यानेंच त्यांना मराठी भाषेची योग्यता वाढवून तिला संस्कृत भाषेच्या पदवीस चढविण्याची बुद्धि झाली! पंतांनीं त्या वेळीं मराठीचा पुरस्कार घेतला नसता तर आज मराठी भाषेची एवढी प्रतिष्ठा वाढली असती काय? ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, दासबोध, तुकारामादिकांचे अभंग यांमुळें मराठी भाषेची उपयुक्तता व प्रौढी अगोदरच सिद्ध झाली होती ही गोष्ट खरी आहे, पण एकंदर महाराष्ट्रवाङ्मयाचा विचार करितां असेंच कबूल करणें भाग आहे कीं मोरोपंतांनीं आपली लेखणी मराठी भाषेच्या उन्नत्यर्थ हातीं धरली नसती तर मराठी भाषेची प्रगल्भता, व्यापकता, मनोहरता, आजच्या इतकी स्पष्ट झाली नसती! पंत जगन्नाथपंडित, अप्पयादीक्षित यांच्याच तोलाचे होते. ते कांहीं सामान्य पंडित नव्हते. किंबहुना संस्कृत भाषा पंतांइतकी त्यांनाही वांकविता आली नाहीं! भाषेचा लवचिकपणा पंतांपाशीं पाहून घ्यावा. प्रस्तुत चर्चाविषयक संस्कृतस्तोत्रेंच घेतलीं तरी काय मौज दिसते आहे! हरिसंबोधनस्तोत्रच पहा. पंतांचें शब्दभांडार कितो मोठें होतें हें पाहणें असल्यास प्रस्तुत स्तोत्र पहावें. यांत क पासून ज्ञ पर्यंतच्या अक्षरांत आरंभ करून शेंकडों संबोधनांनीं हें स्तोत्र पंतांनीं भरून काढलें आहे. शाकंबरी देवीच्या कुळधर्माला साठ निरनिराळ्या भाज्या करितात, त्याप्रमाणेंच पंतांनीं साऱ्या बाराखड्यांत स्तोत्र बसविलें आहे. उदाहरण 'क्ष' हें एकच अक्षर घेऊं:—

क्षेत्रज्ञ क्षमिणांवर क्षितिभरक्षत्रापह क्षोभण
क्षुत्तृष्णादिविकारषट्करहित क्ष्मानिर्जरैकप्रिय ।
क्षत्तृप्रेमपद क्षताहितमद क्षेमालय क्षौद्रवा—
कक्षेत्रेश क्षणदाचरेशदमन क्षोणीपते ! पाहि माम् ॥ ४२ ॥
क्षीरांभोनिधिमंदिर क्षणकर क्षांतापराध क्षम
क्षाम क्षीणविवर्धन क्षपितरुक्क्षुण्णासुरानीकप ।
क्ष्वेडग्रीवनुत क्षुमासुमनिभ क्षुब्धाब्धिफेनस्मित
क्षिप्रोद्धारकरोहित क्षरपर क्षेत्रस्थिते ! पाहि माम् ॥ ४३ ॥

कालिदासानें रघुवंशाच्या नवव्या सर्गांत चतुर्थ चरणांत अनुप्रास मा- धून द्रुतविलंबित वृत्त योजलें आहे. पंतांनीं तृतीयपांडुरंगस्तोत्र कालिदासाच्याच नमुन्यावर रचिलें आहे.

व्रजपते ! जपतेऽस्य भयप्रदः सुरसदो रसदो महिमा तव, ।
अघनगे घनगेयरुचेऽशनि स्त्वमव मामव मामकरार्वरम् ॥ १ ॥
वरदराज ! मुकुंद ! तुकाभिधो वणिगतिप्रथितः स्तवनैस्तव ।
सकलसाधुमनः परितोषकृत् कविवरो विवरोज्झितशुद्धवाक् ॥९॥

प्रसादभंग न होऊं देतां शब्दचमत्कार कसे साधले आहेत पहाः—

केशव केशवतुल्या न त्वयि विमुखा खला मलाकाराः ? ।
भक्तास्तव सक्ताः स्तवनतिपूजासु प्रभो ! न के धन्याः ? ॥ १ ॥
त्वामहमनिशं कलये कलये यद्दत्तसाध्वसोऽसि त्वम् ।
प्रणतेर्यत्ना अवमा अव मामित्याननं दयालुमणे ! ॥ ३१ ॥
यश्चुंबितस्त्वयानिशमीश्वर परमादृतेन वंशास्तम् ।
मन्ये रमाधराद्वरमिह माधुर्यं सदा नवं शास्तम् ॥ ७५ ॥

कृष्णस्तवराज.

वरद ! करदः संसृत्यब्धौ त्वमेव निमज्जतां
सदासि यदासि ख्यातः सत्वं सतामिति सर्वथा, ।
भवति भवतिग्मांशो सत्याः कथं न तमःक्षतिः
सदयपद ! यत्कृत्यं तद्भोः कुरुष्व नमोस्तुते ॥ २४ ॥

शंकरस्तव.

आमच्या वाचकांपैकीं संस्कृत न जाणणारे जे असतील त्यांना प्रस्तुत उतारे अंमळ कंटाळवाणे वाटतील, पण विषयपूर्तेतस्तव ते येथें द्यावे लागले.

चतुर्थपांडुरंगस्तोत्र हें या सर्व संस्कृत स्तोत्रांत फार सुलभ व प्रेमळ आहे, त्यांतील पुढील श्लोक तर सर्वोत्कृष्टच आहे:—

दीनोहं दीनबंधुस्त्वमहमघनिधिःपावनस्त्वं प्रसिद्धो
भीतोहं कालदंडाच्छरणमुपगतस्त्वामसि त्वं शरण्यः ।
दाता त्वं सद्वराणां वरदगुरुरहं याचकस्त्वं दयावा—
नार्तोहं त्वं क्षमावानहमपि विनतः पादयोःसापराधः ॥ ६ ॥

——— ———

# प्रकरण पंधरावें.

## मोरोपंती भारत.

**त्या श्रीव्यासप्रभुला वंदुनि मी भारतेतिहासरस ।**
**पाजीन तुह्मां श्रोत्यां अमृतरसाहूनि फार हा सरस ॥ आदि-०८॥**

१ मोरोपंती भारत. २ भारताची योग्यता. ३ महाभारताचीं मराठी रूपांतरें. ४ मोरोपंती भारताची लोकप्रियता. ५ मोरोपंती भारताचें स्वरूप. ६ पंतांची संक्षेपविस्तारकुशलता. ७ पंतभारताची मूळ प्रत. ८ मराठी कविता व मुख्यतः मोरोपंती कविता स्वतंत्र आहे की भाषांतररूप आहे. ९ आदिपर्व. १० सभापर्व. ११ वनपर्व. १२ विराटपर्व. १३ उद्योगपर्व. १४ विदुला आणि गौतमाबाई होळकरीण. १५ वीररसाचा उत्कर्ष. १६ भीष्माचार्य. १७ वीररसाचीं उत्कृष्ट उदाहरणें. १८ कर्ण व शल्य. हंसकाकीय कथानक. १९ स्त्रीपर्व. २० उपसंहार.

१ हा महाग्रंथ प्रस्तुत कवीच्या प्रगल्भबुद्धीचें अत्यंत सरस फळ होय. पंतांच्या स्तोत्रांत जशी केकावली, लघुकाव्यांत जसें कुशलवचरित, रामायणांत जसें मंत्ररामायण, तसें महाकाव्यांत महाभारत उत्कृष्ट होय. मंत्रभागवत, बृहद्दशम, हरिवंश या ग्रंथांपेक्षां हा ग्रंथ जसा आकारानें तसा योग्यतेनेंही मोठा आहे. यांत कवीची प्रतिभा पूर्णत्वानें विकास पावली आहे. पंतांच्या भाषेचे सर्व विशिष्ट गुण या ग्रंथांत सर्वत्र उघड दिसतात. महाभारताचें प्रस्तुत मराठी रूपांतर करितांना कवीस आपण एक महत्कार्य हातीं धरिलें आहे असें वाटत होतें व हा ग्रंथ पुरा होतांच आपली कीर्ति स्थिर झाली असें त्यास वाटलें. पंतांची खरी प्रसिद्धि या ग्रंथामुळें झाली. महाकविमालिकेंत पंतांच्या समकालीन रसज्ञांनी या ग्रंथामुळेंच पंतांना गोवलें. पंतांच्या ज्या आर्या आबालवृद्धांच्या तोंडीं आज शेंदीडशें वर्षे झाल्या आहेत त्यांपैकीं पुष्कळ आर्या त्यांच्या भारतांतल्या आहेत हें लक्षांत ठेवलें ह्मणजे त्यांच्या भारताची शीघ्रप्रसिद्धि कशी झाली हें समजेल. ही जी पंतांच्या भारताची शीघ्र प्रसिद्धी झाली तिला कारणेंही योग्य आहेत. महाभारत ग्रंथ आमच्या राष्ट्रास अत्यंत प्रिय असल्यामुळें त्याचें मराठी रूपांतर करणा-

राकडे महाराष्ट्रीयांचें चित्त वेधणें साहजीक आहे. हें तर मुख्य कारण आहेच, पण सर्वांनीं आदरिलेल्या ओंवीवृत्ताशिवाय अन्यवृत्तांत-मराठी भाषेला अपरिचित अशा आर्यावृत्तांत-नवीन जगप्रसिद्ध होऊं पाहणारा कवि संपूर्ण भारत रचीत आहे हें पाहून रसिकजनांस मोठें कौतुक वाटलें व ते हें भारत पुरें होण्याची मोठ्या उत्कंठेनें वाट पाहत राहिले. मुक्तेश्वरी भारत व श्रीधरी पांडवप्रताप हे ग्रंथ यापूर्वींच लोकादरास पात्र झाले होते. तेव्हां नवीन भारत नवीन वृत्तांत कांहीं नवीन पद्धतीवर रचलेलें पाहून लोकांनीं त्याचा जयजयकार केला व हरिदासांनीं त्याचा कीर्तनांत तात्काळ आदर केला. संस्कृत काव्यांतले रचनाविशेष-ह्मणजे नानाप्रकारचे रस, अलंकार, कल्पना वगैरे यांचा या नवीन भारतांत आदर केलेला पाहून पंडितांनींही त्याचा स्वीकार केला. कालिदासाचें उपमाचातुर्य व प्रसाद; भारवीचे अर्थगौरव; बाणभट्टानें शब्दभांडारावरचें स्वामित्व; पंडितरायाचे शब्दचमत्कार व माधुर्य; भवभूतीचे प्रकृतिवैचित्र्य व पावनत्व हे गुण पंतांच्या या काव्यांत बऱ्याच अंशानें आहेतच; पण याशिवाय ईश्वरभक्ति व नीतिशिक्षण यांचा लाभ पंतांच्या भारतवाचनापासून कोणासही होणार आहे. पंतांचें भारत वाचतांना मनोरंजनाबरोबर सदाचरणाचा बोध होऊन चित्त भक्तिरसांत वाहवतें. गुरु, शिष्य, पिता, पुत्र, राजा, प्रजा, बंधु, मित्र वगैरेंचीं श्रेष्ठ कर्तव्यें काय आहेत; शांति, क्षमा, दया, परोपकार, कुलीनत्व, सत्व, धैर्य इत्यादि सद्गुणांचीं प्रमेयें काय आहेत, कामक्रोधादि षड्रिपु, दुराग्रह, द्यूत, कुसंगति इत्यादिकांपासून दुष्परिणाम काय होतात, यासंबंधीं पंतांनीं आपले विचार कधीं पात्रांच्या तोंडांत व कधीं स्वतंत्रपणें अर्थांतरन्यासाच्या पादांत, आर्यार्धांत किंवा आर्येंत सहस्त्रशः घातले आहेत. ते सर्व एकत्र केले ह्मणजे मोरोपंत समाजांतले केवढ्या दर्जाचे नीतिशिक्षक होते हें समजतें. पंतांची काव्यवाटिका अशा सुगंधी पुष्पांच्या परिमळानें इतकी दरवळली आहे कीं, यमकानुप्रासांच्या मृदु कंटकांनीं मन जरी कधीं कधीं गोंधळलें तरी त्या पुण्यवाटिकेंत निर्मळ मनानें शिरणाऱ्या रसिकाच्या चित्तास अवर्णनीय आनंद होऊन तो डोलूं लागतो व त्यांतही ईश्वरभक्तीचा तापोपशमक शीतळ वारा वाहूं लागला कीं तो आपलें देहभान विसरून जातो! शिवाय भारतांतल्या कथा वर्णीत असतांना स्वभाववैचित्र्याकडे पंतांनीं पुरें लक्ष्य पुरविलें असून मानवी स्वभावाचें यथातथ्य वर्णन करण्याचें चातुर्य जागोजाग प्रकट केलेलें आहे.

मोरोपंतीं भारताचा सर्व बाजूंनीं विचार केला ह्मणजे हा ग्रंथ पंतांच्या यशोरूप भव्य इमारतीचा मुख्य खांब आहे असें ह्मणावें लागतें.

२ मूळ भारताची योग्यताच कांहीं निराळी आहे. आजवर पृथ्वीतलावर विशालबुद्धीचे जे महापुरुष झाले ते सर्व श्रीव्यासांच्यापुढें केवळ अर्भकासारखे दिसतात! वेदांतसूत्रें, पुराणें, व महाभारत हे ग्रंथ जी बुद्धि प्रसवली त्या बुद्धीचें सर्वगामित्व कोणीं वर्णावें? महाभारताच्या तोलाचा महद्ग्रंथ ( Epic ) भूतलावर झाला नाहीं हें पाश्चात्य पंडितांनीं सुद्धां कबूल केलें आहे. मात्र त्यांचें ह्मणणें एवढेंच आहे कीं, भारतग्रंथ एका व्यक्तीनें रचिलेला नसून अनेकांनीं मिळून रचलेला आहे. दोन हजार आख्यानोपाख्यानांनीं खचित, व एका विशिष्ट हेतूनें प्रेरित असल्यामुळें सुसंगत, असा ग्रंथ अनेकांस रचतां येणार नाहीं व त्याची उत्पत्तिभूमि एकाच महात्म्याची बुद्धि असली पाहिजे असें मला वाटतें. ज्ञानेश्वरांच्या शब्दांनीं भारताचें माहात्म्य वर्णावयाचें ह्मणजे असें ह्मणतां येईल कीं, "भारत हे सकळ कथांचें जन्मस्थान आहे. हा प्रमेयमहानिधि आहे; हा परिपूर्ण असा नवरससुधाब्धि आहे; हा सकळ काव्यांचा राजा आहे; येथें चातुर्य शहाणें झालें; येथें प्रमेयाला शोभा आली सुखाचें सौभाग्य येथें पुष्ट झालें आहे; भानुतेजानें जसें त्रैलोक्य धवळतें तसें व्यासमतीनें विश्व धवळलें आहे; व्यासांची महामति आविष्करून प्रत्यक्ष सरस्वतीच भारतरूपानें अवतरली आहे!" मानवी इतिहासाच्या सर्व बाजू, मानवी स्वभावाच्या अनंत कळा, व सांख्ययोगादि अनेक तत्वज्ञानांचीं प्रमेयें, भारतांत उत्तम प्रकारें स्पष्ट करून दाखविलीं आहेत. चारी वर्णांचें कर्तव्यें काय आहेत; आपत्कालाचे धर्म कोणते आहेत; कामक्रोधादिकांचें प्राबल्य झाल्यानें, अक्षादि व्यसनानें, कुपुत्रमोहानें, कुसंगतीनें, परदारालोभानें, गृहकलहानें कसकसले दुष्परिणाम होतात; धर्मतत्वें अत्यंत गूढ असल्यामुळें भीष्मासारख्यांला सुद्धां आकलन करण्याला कितीं कठिण जातात; श्रीकृष्णपरमात्म्यावर निष्ठा ठेवल्यानें जीवाचें आत्यंतिक कल्याण कसें होतें व सत्वशील पुरुष आपत्तींतून कसे तरतात वगैरे गोष्टींचें स्पष्टीकरण महाभारतांत केलें आहे. पंतांनीं दुर्वासभिक्षेंत स्पष्ट ह्मटलें आहे:—

**सर्व श्रुति सर्व स्मृति । जीं जीं शास्त्रें पुराणें असतीं ।**
**त्या सकळांतें महामती । भारतामाजीं सांठवी ॥ १ ॥**

**रचिला जयनामा इतिहास । चतुर्वर्गाचा निवास ।**
**श्रवणपठणें भाविकांस । भवसागरीं तारितो ॥ २ ॥**

३ मराठी भाषेंत भारताचीं अनेक रूपांतरें झालीं आहेत. सहा वर्षांपूर्वीं 'महाभारताचे मराठी अवतार' ह्या मथळ्याखालीं 'श्रीसरस्वतीमंदिर' नामक मासिक पुस्तकांत मीं ४७ पृष्ठांचा एक स्वतंत्र लेख लिहिला होता, त्याच्या उपोद्घातांत ह्या विषयासंबंधानें मीं लिहिलें होतें:—" मालोजीच्या जन्मकाळापासून तों महादजी शिंदे यांच्या मृत्यूपर्यंत महाराष्ट्रांत वीरही पुष्कळ निर्माण झाले. शिवाजीचे वडील शहाजी राजे कांहीं सामान्य प्रतीचे वीर व मुत्सद्दी नव्हते. शहाजी, शिवाजी, तानाजी मालुसरे, मोरोपंत पिंगळे, बाजी प्रभु, धनाजी व संताजी, बाजीराव व राघोबादादा पेशवे, मल्हारराव होळकर, रघोजी भोसले, गोविंदपंत बुंदेले, जिवबादादा बक्षी, रत्नाकरपंत आप्पा, विठ्ठल शिवदेव विंचुरकर, महादजी शिंदे, परशुरामभाऊ पटवर्धन, वगैरे शेंकडों वीर या अडीचशें वर्षांच्या काळांत निर्माण झाले. तसेंच शहाजी, शिवाजी, रामचंद्रपंत, प्रल्हाद निराजी, बाळाजी विश्वनाथ व माधवराव पेशवे, सखाराम बापू, नानाफडणीस, पाटील बोवा वगैरे मुत्सद्दीही उत्पन्न झाले. वीरांचे हात व मुत्सद्यांचीं डोकीं या २५० वर्षांत राष्ट्राभ्युदयार्थ खटपट करण्यांत गुंतलीं होतीं. सर्वच राष्ट्रास वीरश्री चढली होती. या वेळीं ह्या कार्यक्षम मंडळीला प्रेरणा करून त्यांच्या मनांत उदात्त विचार नेहमीं जागृत ठेवणारे संत व कविही निर्माण झाले. हा मुख्यत: वीरश्रीचा--शौर्याचा व मुत्सद्दीपणाचा—काळ असल्यामुळें अशा काळाला उत्कृष्ट शिक्षण देणारा हिंदुराष्ट्राचा महाग्रंथ जो महाभारत तिकडे त्यांचें लक्ष गेलें. द्रोणार्जुनांच्या पराक्रमाच्या गोष्टी व भीष्मकृष्णांच्या लोककल्याणकर मुत्सद्दीपणाच्या गोष्टी प्राकृत भाषेंत सामान्य जनसमूहास शिकविणारे राष्ट्रीय शिक्षक अशा वेळीं पाहिजे होते व ते निर्माणही झाले. कर्णार्जुनांचे पराक्रम ऐकून शिवरायाच्या अंगीं वीरश्री चढली. मिरजेच्या वेढ्यामुळें व प्रतिकूल काळामुळें हताश झालेल्या गोपाळराव पटवर्धनाला धीर देण्यास मुक्तेश्वराचें हरिश्चंद्राख्यान[1] कारण झालें. मराठा कवींच्या वाणींत जिवंतपणा होता व त्याचा राष्ट्रांतील कर्त्या पुरुषांच्या

१ गोपाळरावांचे वडील त्यांस लिहितात. " हरिश्चंद्राख्यान प्राकृत आह्मी पुण्याहून पांच अध्याय लिहून आणले होते. संग्रहीं होतें. तुह्मांस वाचावयास पाठविले आहेत. पांच सात वेळ पारायण करणें." ऐतिहासिक लेखसंग्रह ले. १२८

मनावर उत्तम परिणाम झाला. मराठी संतकवींची वाणी, मराठी योद्ध्यांचे बाहु व मराठी मुत्सद्यांचीं डोकीं हीं मराठी राज्याच्या अभ्युदयार्थ सतत परिश्रम करीत होतीं. ह्या १५० वर्षांच्या काळात महाराष्ट्राच्या क्रियेंत जो वीररसाचा पूर आला त्यामुळें बिंबप्रतिबिंबन्यायानें मराठी कवींच्या वाणीलाही दिव्य स्फुरण चढलें व मुख्यत: महाभारताकडे सर्वजनांचें चित्त वेधलें." महाराष्ट्राच्या उदयकाळापासून तों ऱ्हासकाळापर्यंत १५।२० कवींनीं भारताचें मराठी 'रूपांतर' करण्याचा उद्योग केला आहे. मुक्तेश्वरी भारताबद्दल 'संतप्रकरणांत' थोडासा ऊहापोह केला आहेच. मुक्तेश्वराच्यापूर्वीही कांहीं कवींनीं मराठी भारत रचण्याचा उद्योग केला होता, असें मुक्तेश्वराच्याच उल्लेखांवरून दिसतें. शहाजीच्या उत्तरवयांत व शिवाजीच्या पूर्ववयांत मुक्तेश्वरी भारत झालें. विष्णुदास नामा, श्रीधर, माधव, नरहरि मोरेश्वर, रामचंद्रबोवा रामदासी, शिवकल्याण, जिवाशिवा, मालुनाथ, कृष्णदास मुद्गल, गोपाळकवि, व मोरोपंत इतक्या कवींनीं माग्र भारत मराठींत आणलें आहे. या सर्वांचीं भारतें आज सांपडत नाहींत व सर्वच लोकमान्य झालीं आहेत असेंही नाहीं. याशिवाय शुभानंत, चंद्रात्मज रुद्र, मोरेश्वर, मैराळ वगैरे कवींनीं कांहीं कांहीं पर्वें मराठींत आणलीं आहेत. हे बहुतेक ग्रंथ शहाजीच्या जन्मापासून तों वसईच्या तहापर्यंतच्या दोनशें वर्षांच्या अवधींत निर्माण झाले हें लक्षांत ठेविलें ह्मणजे महाराष्ट्रांत पराक्रमाचें तेज उत्पन्न करण्याच्या कामीं भारताचा किती उपयोग झाला असेल याची कल्पना होईल मराठ्यांत राष्ट्रीयत्व पेरून त्यांच्या भाल्याची चमक जगाला दाखवायला, गोब्राह्मणप्रतिपालक शिवाजीपासून तों बापूगोखल्यापर्यंतच्या सर्व योद्ध्यांना स्फुरण द्यायला महाभारत किती कारणीभूत झालें हें लक्षांत आणलें ह्मणजे राष्ट्रीय शिक्षक या नात्यानें भारत ग्रंथानें अगदीं अलीकडच्या काळांतही भरतखंडांत मोठीच कामगिरी बजाविली असें ह्मणावें लागतें. भारताचीं मराठी किंवा अन्य हिंदी भाषांत कितीही रूपांतरें झालीं असलीं, तरी मूळ भारताचें महत्व कायमच राहणार आहे. 'मूळमहत्व न हरिलें मोठ्या झाल्या तथापि टीकाहीं' हें पंतांचें ह्मणणें खरें आहे. ज्यानें लक्षावधि लोकांना आजवर परमार्थ, व्यवहार व राजकारण यांचा उपदेश केला आहे अशा अद्भुत ग्रंथाकडे पंतांचें लक्ष प्रौढ वयांत लागलें हें चांगलेंच झालें.

४ मोरोपंतीं भारत रचनाकालींच लोकप्रिय झालें. रामजोशासारखे

हरिदास पंतांच्या समोर किंवा परशरामभाऊ पटवर्धनासारख्या योद्धयाच्या समोर पंतांच्या भारतांतील आख्यानें कीर्तनप्रसंगीं काढूं लागले. पंतांच्या भारतांतील द्रौपदीवस्त्रहरण, कीचकवध, भीष्मार्जुनयुद्ध, अभिमन्युपराक्रम, कर्णशल्यसंवाद, वगैरे प्रसंगांवरच्या आर्या तात्काळ महाराष्ट्रभर पसरल्या. 'जों मृदु लागे तों तों दडपी शिशु फार ऊन भातातें,' 'हांसत कर्म करावें भोगावें रडत तेंचि परिणामीं,' 'प्रार्थुनि मागति पुत्रच्छात्रापासुनि भले परिभवातें,' इत्यादि सहस्त्रावधि सुभाषितरूप आर्यार्धे पंतांच्या भारतांतूनच लोकांच्या ह्मणींत जाऊन घुसले! भारतांतील कांहीं आर्या बरोबर मुलेंवाळें सुद्धां ह्मणूं लागलीं. यासंबंधीं कांहीं उदाहरणें देऊं ह्मणजे झालें. शकुनिमामाचें नांव निघतांच:—

**शकुनि कुनीतिज्ञ कुमति येथुनि आतांचि या खळा दवडा।**
**हा न भला बुडवाया शिरला या राजमंदिरीं कैवडा॥ २७॥**

ही सभापर्वांतील (अ० ४) आर्या मुलाबाळांना आठवते. कीचकवधाची कथा निघाली कीं:—

**निववी ऐसें बहु परि तीस सुदेष्णा ह्मणे तरी 'जा च,'।**
**फारच बरी निरयगति परवशता शतगुणें करी जाच!॥ ५८॥**
**जातां परार्थहि बहु तापातें पावली सुरामा ती।**
**न करील कां पित्याची दुर्गतिची माउली सुरा माती?॥ ५९.॥**

ह्या आर्या (विराटपर्व अ० १) कीर्तनश्रवणरसिकाला प्रथम आठवतात. व्यासांची धृतराष्ट्राला:—

**तूं पांडु, विदुर मज सम, परि माझा पांडवांकडे ओढा।**
**निम्नाकडेचि धांवे नाटोपे जेविं अद्रिचा ओढा॥**

ही उक्ति (वनपर्व अ० १-११) प्रत्येकाच्या पांडवप्रेमामुळें लोकप्रिय झालेली आहे. श्रेष्ठाला वैरभावानें डिवचावयचा कोणीं प्रयत्न करूं लागला किंवा त्याची कुचेष्टा उर्फ निंदा करूं लागला ह्मणजे विदुरानें दुर्योधनास जो फटका लगावला आहे (सभा० अ० ४) त्याचें कोणासही स्मरण झाल्याशिवाय राहत नाहीं:—

१ एक अशुभ पक्षी. २ कीचकाची बहिण व विराटाची भार्या. तिनें मद्याचा पेला हातीं देऊन द्रौपदीला कीचकाकडे पाठविलें. ३ सखोल जमिनीकडे. ४ डोंगरावरून वाहणारा.

**हरिच्या पुनःपुन्हा कां काड्या नाकांत घालिसी शशका ।**
**यश काय पक्षपतिचें येइल हे चार करुनि तुज मशका ॥ ८४ ॥**
**"ब्रुयात्क्षमी गभीरोसीति यत युधिष्ठिरं प्रभुं को न ? ।**
**निज नीचपण प्रकटसि तूं श्वान भल्यावरीहि थुंकोन ! ॥ ८५ ॥**

द्रौपदीवस्त्रहरणाचा प्रसंग निघाला कीं

**देवी ह्मणे, ' अनार्या नाहींच तुझ्या मनांत पाप-दर ।**
**ओढूं नको फरफरां घेऊं दे सांवरूनि हा पदर ॥ ७ ॥**

ही आर्या ( सभा० अ० ५ ) सर्वांस आठवल्याशिवाय राहत नाहीं. 'नाहीं तुझिया' असें लोकांच्या ह्मणण्यांत आहे, पण 'नाहींच तुझ्या' असें पंतांच्या हातच्या प्रतींत आहे.

श्रीकृष्णाच्या विदुरप्रेमाचा विषय निघाला कीं:—

**शतसंख्य वाजवी ज्या जेववितां माय देवकी चिटक्या**
**तो नित्यतृप्त भगवान् विदुरगृहीं भोजनांत दे मिटक्या ॥ ७६ ॥**
**आले ढेंकर, दिधल्या मिटक्या, बहुसाल मारिले भुरके.**
**उरके सर्वामागुंन अशन, परि न ताटचाटणें उरकें ! ॥ ७७ ॥**

ह्या प्रेमळ आर्यांचें ( उद्योग० अ० ७ ) स्मरण भाविकांस झालेंच पाहिजे! कसल्याही युद्धप्रसंगाची गोष्ट निघाली कीं:—

**सूं सणणण मणणणणण वाजीत शरनिकर काय-हानिकर ।**
**वदले सुरमुनि करितो नररूपें रुद्र काय हा निकर ! ॥ ५८ ॥**

ही मजेची आर्या ( भीष्मपर्व अ० ३ ) बोबड्या मुलांच्याही तोंडून ऐकायला सांपडते!—

अभिमन्यूच्या पराक्रमाची गोष्ट निघाली कीं:—

**अंध ह्मणे, " रे संजय ! हें त्या पौत्रास वर्ष सोळावें ! ।**
**लोळावें मांडिवरी, तेणें द्रोणादिकांसि घोळावें ! ! " ॥ ८५ ॥**

ही ( द्रोणपर्व अ० ३ ) हृदयविदारक कल्पना ऐकून सर्वांच्या डोळ्यांतून खळखळां अश्रुपात चालतात ! 'कुंतीस काय सांगूं ! कृष्णेला दाखवूं कसें वदन ! ' असा अर्जुनाचा शोक ऐकून आपणही अर्जुनकालीनच होऊन गलितधैर्य होऊन जातो ! दुर्योधनानें भीमसेनास:—

---

१ ( धर्मरूप ) सिंहाच्या. २ ( दुर्योधनरूप ) ससा ३ गरुडाचें. ४ चिलटा. ५ हा सगळा आर्यार्ध संस्कृतमय आहे ! याचा अर्थ: ' तूं क्षमाशील व गंभीर आहेस असें धर्मराजास कोण ह्मणणार नाहीं ? ' ६ विदुराच्या कण्या श्रीकृष्णाला गोड लागल्या. ७ बाणांचे समूह. ८ देहघात करणार. ९ युद्ध.

**तुज लाविलें स्वतेजें म्यांच कढीभात वरण घाटाया ।**
**वाटाया प्राज्य पुरण पापडपोळ्या प्रभूत लाटाया ! ॥ १६ ॥**

असा जो टोमणा मारला [ गदापर्व अ० २ ] तो ऐकून विराटराजाच्या पाकगृहांतील बल्लवाचार्याची कोणास कींव येत नाहीं ? असो. असे पंतांच्या लोकप्रिय आर्यांचे उतारे देण्याचा मलाही वारंवार फार मोह पडतो, पण विस्तारभयास्तव हात आवरणें भाग आहे !

५ असो. पंतांच्या भारताचें स्वरूप काय आहे ह्मणजे त्याचें विशिष्टपण कोठें आहे तें थोडक्यांत पाहूं. कोणत्याही चांगल्या ग्रंथकाराचा प्रत्येक ग्रंथ लिहिण्यात काहीं विशेष हेतु असतो व त्या हेतूप्रमाणें तो त्या ग्रंथाला रूप देत असतो. पंतानीं आपला हेतु स्पष्ट सांगितला आहे. ते ह्मणतात:—

**हरि ज्यांचा कैवारी त्या पांडुसुतांसि वंदितों भावें ।**
**वाटे चरित्र त्यांचें कांहीं आपण तरावया गावें ॥ १ ॥**

पांडुसुतांचें ह्मणजे पांडवांचें चरित्र गाण्यासाठीं पंतांनीं आपलें भारत रचिलें आहे. ज्यांचा कैवारी ह्मणजे पक्षपाती साक्षात् श्रीकृष्ण परमात्मा होता त्यांचे चरित्र—त्या प्राचीन संतांचें चरित्र—'आपण तरावें' ह्मणून गाण्याचा पंतांनीं उद्योग केला. पांडवांचा सत्पक्ष नसता, श्रीहरिप्रियता उर्फ संतपण त्यांच्या अंगीं नसतें तर त्यांचें चरित्र गाऊन पंतांनीं आपल्या काव्यशक्तीचा दुर्व्यय केला नसता. आत्मोद्धाराची भावना पंतांच्या ठिकाणीं नेहमीं जागरूक असे. सच्चरित्रगायनानें चित्तशुद्धि होते व मनुष्य भगवत्प्रसादाला पात्र होतो. स्वोद्धाराची जागृति—'आपुलिया हिता' ची जागृति कायम ठेवून त्यांनीं हा प्रचंड ग्रंथ लिहिला आहे. भीष्मपर्वांत [ अ० ६ ] त्यांनीं आणखी ह्मटलें आहे की 'कविनेंहि आपणास व्यसननिधिभवांत उद्धरायास' ही कथा वर्णिली आहे. व्यसनांचा ह्मणजे संकटांचा किंवा दुःखांचा सागर असा जो हा संसार त्यांतून मुक्त होण्याची तळमळ कवीच्या मनांत नेहमीं असे. पुन्हां 'भावें समर्पिलें श्रीपतिचरणीं दोष जावया सर्व' असें त्यांनीं आश्रमवासीपर्वांत [ अ० ७ ] ह्मटलें आहे. चित्ताचा मळ झडून जावा, व संसारकल्पनांतून 'झडझडून निघावें' हा हेतु मनांत धरून पंतांनीं हा ग्रंथ लिहिला आहे. आपल्या ग्रंथास तुळशीची, बिल्वपत्राची, किंवा धत्तुरपुष्पाची उपमा देऊन त्यांनीं आपला प्रेमळपणा व्यक्त केला आहे. 'केलें प्राकृत काव्य ईश्वरपदीं धत्तुरसें वाहिलें !' [ आदि०

अ० ३९ ] ही पवित्र भावना त्यांच्या हृदयांत नेहमीं जागृत त्यांना परमेश्वराच्या पाठिंब्याचा भरंवसा वाटत असे. विश्वासाशीं ज्ञान काहीं निराळी आहे. तुकोबाप्रमाणें पंतही या ज्ञानाचे होते ! परमेश्वर आपल्या कृतीवर संतुष्ट आहे असा प्रत्यय त्यांना येत गेल्यामुळें त्यांच्या हृदयांत व त्यामुळें त्यांच्या वाणीत अद्भुत प्रसाद उत्पन्न झालेला होता. विराटपर्वांत:—

**रामघनसत्प्रसादामृत जों जों बहु वर्षोनि वर्षतसे ।**
**तों तों भक्त मयूर स्वायां केका करूनि हर्षतसे ॥ अ० ७.३८ ॥**

असे त्यांनीं म्हटलें आहे. भीष्मपर्वाच्या उपसंहारांत आपल्या कृतीनें भारताला शोभा आली आहे व ह्या माझ्या ग्रंथांत 'हरिहरभजन-सत्कथा याहून दुजी थोडी' असें ह्याचें शुद्ध रूप आहे असें म्हटलें आहे. पंत आणखी म्हणतात:—

**रसिक, कवि, परम सज्जन, भगवद्भक्त प्रसन्न होतील ।**
**न गमेल यापरिस हित, जो तो वदनांत अमृत ओतील ! ॥ ८१ ॥**

व्यासवाल्मीक्यादि महापुरुष 'प्रतिभारक्षक असल्यामुळें निंदक मळ' माझें वांकडें करूं शकणार नाहींत असेंही त्यांनीं शेवटीं उद्गार काढले आहेत. अंतःकरण निष्कपट आणि विनत म्हणजे अहंभावरहित असल्याशिवाय परमेश्वरप्रसाद जोडतां येणार नाहीं.

**मुळचोंबरें विलोकुनि भलत्याहि जनासि बाळक वळावा ।**
**सत्य प्रेमचि दावुनि सुखें तो विश्वपाळ कवळावा ॥ ९ ॥**
**कपटादरें वळो पर, पर परमेश्वर कसा वळेल हरी ? ।**
**कृष्णकृपामृतनिधिची अकपट-विनताकडे वळे लहरी ॥ १० ॥**

—उद्योगपर्व अ० ७

ह्या विदुराच्या अनुभवाप्रमाणें पंतांनाही जेव्हां प्रत्यय येऊं लागला तेव्हां:—

**सुरभीच्या कांसेसि न सुखें होऊनि वत्स लागावें ।**
**तुझियाचि दास होउनि लागावें, तुजचि वत्सला गावें ॥ ३८ ॥**

ह्याप्रमाणें त्यांनींही 'सत्यप्रेम दावून विश्वपाळास कवळण्याचा सततोद्योग चालविला.' श्रीपतिपदीं तुळसीपत्राप्रमाणें समर्पिलेलें हें कवन साधुसंतांना प्रिय झालेलें पाहून व निर्विघ्नपणानें हा वाग्यज्ञ समाप्तीस गे-

ल्या पाहून पंतांनीं आपले यजमान अनंत पाध्ये, विठोबादादा चातुर्मासे, इत्यादिकांचें प्रेमपूर्वक स्मरण उपसंहारांत केलें व आपल्या हातून महत्कार्य झालें असें वाटून व्यासाशीं आपली बरोबरी व्यंग्यार्थानें सुचवून आपल्या मातापितरांविषयीं पुढील उद्गार काढला:—

**धन्य श्रीराम पिता धन्य लक्ष्मी प्रसू जगीं झाली।**
**अ.ळी सत्यवतीची कीं भारतकीर्ति सुतमुखीं आली ॥ ४२ ॥**

भूत व विद्यमान संतांचा व परमेश्वराचा आपल्यावर कृपाप्रसाद होत आहे असा भरंवसा पंतांस भारतरचनाकालीं वाटूं लागला व हीच भावना उत्तरोत्तर वाढत जाऊन भागवतरचनाकालीं पंतांस महाभागवताचीच योग्यता प्राप्त झाली. असो, पंतांच्या भारतांत भगवत्प्रेमाचा शुचिप्रवाह आंतून वाहत आहे, पांडवाची कथा वीररसप्रधान असूनही भगवत्प्रेमामुळें तिला दिव्यत्व प्राप्त झालें आहे, ही गोष्ट ध्यानांत धरून वाचकांनीं मोरोपंतीं भारत वाचावें एवढेंच येथें सांगावयाचें आहे. मोरोपंती भारत ह्मणजे पांडवांचें संक्षिप्त चरित्र होय, हें लक्षांत ठेवलें ह्मणजे पंतांनीं आख्यानोपाख्यानांत संक्षेपविस्तार कोठें व कोणत्या धोरणावर केले हें सहजच कळतें.

६ मुख्य कथेचें धोरण यत्किंचित् न सोडतां आगंतुक विषयांना छाटा देत व आगंतुक कथांचा संक्षेप करीत पंतांनीं आपल्या भारतांत पांडवांचें पावन चरित्र विस्तारानें गायिलें आहे. मूळ उद्योगपर्वांत अध्याय ९७–१०५ पर्यंत ९ अध्यायांत गरुडगर्वपरिहाराची कथा विस्तारानें वर्णिली आहे, पण तिचा मुख्य विषयाशीं फारसा संबंध नाहीं हें लक्षांत आणून त्यांनीं तिचा संक्षेप[3] अवघ्या २८ आर्यांत केला आहे. त्याच पर्वांत गालवाचा इतिहास १७ अध्यायांत वर्णिला असून पंतांनीं त्याचा संक्षेप २२ गीतींत केला आहे. कोठें कोठें आख्यानांचा एकेक आर्यांत संक्षेप करून ते पुढें चालते होतात. उदाहरणार्थ:—

**एक कृषीवळ पीडित दुर्बळ वृष पाहतांचि महिवरती ।**
**ख्याता सुरभी देवी स्नेहें झाली उदंड गहिंवरती ॥ ६० ॥**

—वनपर्व अ० १

पंतांनीं कणिकनीति, विदुरनीति, भगवद्गीता, शांतिपर्वांतील भीष्मकृष्णउप-

१ जननी, आई. २ सखी, मैत्रीण. ३ मोरोपंती भारत अ. ८ आर्या ४८-७६. ४ सदर, आर्या ८१-१०३.

देश वगैरे प्रसंगही टाळले आहेत मूळ भारतांतील व्यासवाणीची गोडी मराठींत सर्वत्र सर्वथा उतरणें अशक्य असल्यामुळ त्यांनीं पुष्कळदां मूळावरच हवाला दिला आहे. पंतांनीं आपल्या भारतांत वरीलसारखे नीत्युपदेशाचे उत्तम प्रसंग गाळले आहेत, तरी त्यांचें तात्पर्य अर्थांतरन्यासांत गोंवलेल्या त्यांच्या सहस्रावधि आर्यांधांत आणून सोडल्यामळें वाचकांस त्याबद्दल फारसा विषाद वाटत नाहीं. ग्रंथविस्तार होईल ह्मणून पंत फार भय बाळगीत! मराठींत मोटमोठाले ग्रंथ केले तर संस्कृतभाषालोलुप हे वाचणार नाहींत व केवळ प्राकृतांना ते नीट समजणार नाहींत असें त्यांना वाटे. 'तें बहु असोचि विस्तरवद्ग्रंथ प्राकृतीं न वाचि कवि!' ( उद्योग. अ. ३ ) ग्रंथविस्तार न होऊं देण्याबद्दल पंतांनीं जें चातुर्य प्रकट केलें आहे तें पाहण्यासारखें आहे:--

**( १ ) झाला नृपति वसिष्ठस्पर्धेनें विप्र, तें असो आतां।**
**विस्तरभय दे, नाहीं तरि काळाचें हि भय नसे गातां ॥ ४० ॥**

—आदिपर्व अ० ४२

**( २ ) भीमाच्या विजयातें विदुर सविस्तर नृपासि आयकवी ।**
**तें ग्रंथविस्तराला भ्याला जो तो वदेल काय कवी ? ॥ ९८ ॥**

—वनपर्व अ० १

**( ३ ) पूजा करितां शल्य, स्तुति करितां धर्म ही वसे उगला ।**
**पूज्यत्वें स्तुत्यत्वें ते न, परि ग्रंथ मात्र हा फुगला! ॥ १७ ॥**

—उद्योगपर्व अ. २

**( ४ ) तो ब्राह्मणमाहात्म्य, क्षत्रियमाहात्म्य त्यासि आयकवी ।**
**वर्णी पतिव्रतेचें माहात्म्यहि सर्व योगिराय कवी ॥ ५५ ॥**

--वनपर्व अ० ६

**( ५ ) गाया श्रवण कराया योग्य परि ग्रंथविस्ताराकरितां ।**
**इतिहास गाळला हा, झाला भ्रम मजहि चित्त आवरितां॥३८॥**

—कर्णपर्व अ० २१

पंत संक्षेपकुशल असत हें दाखविण्याकरीतां मला हा विस्तार करावा लागला! पंतांची संक्षेपविस्तरकुशलता फारच मार्मिक आहे. ज्या गोष्टीचा संक्षेप करावयाचा आहे ती गोष्ट जातां जातां ते सांगत असतात हें वरील उताऱ्यांवरून दिसून येतें. वर्णनाच्या ऐनभरांत आल्यावर पंतांची तल्लीनता किती होत असे हें 'झाला भ्रम मजहि चित्त आवरितां' ह्या उक्तीवरून स्प-

ष्ट होतें! पंतांची संक्षेपाकडे एवढी प्रवृत्ति होती तरी कर्ण, दुर्योधन, शल्य, भीम, अर्जुन, धर्म, भीष्म इत्यादि प्रमुख पुरुषांच्या संवादांत किंवा स्वभाववर्णनांत त्यांनीं बिलकूल कसूर केली नाहीं. पांडवांचें चरित्र आपण गात आहों-न ही मुख्य गोष्ट ते पळभर सुद्धां विसरले नाहींत. मुख्य उद्देश डोळ्यांपुढें जागता ठेवून महत्कार्य सारखें नेटानें चालवणें ही गोष्ट निश्चयी बुद्धिमंताशिवाय दुसऱ्याला साधणें शक्य नाहीं. कृष्णविजयांत पंतांनीं विस्तार केला आहे, भारतांत संक्षेपाकडे त्यांचा ओढा आहे व रामायणांत तर कांहीं पुसूंच नका:—एकश्लोकी व एकपदी रामायणापासून तों दोन चार हजार श्लोकांच्या रामायणांपर्यंत भिन्न भिन्न वृत्तांत एकच रामकथा त्यांनीं १०८ वेळां गायिली आहे! पंतांच्या बुद्धीचा हा लवचीकपणा त्यांच्या भाषाप्रभुत्वाचें मोठेंच प्रमाण आहे. असो. मूळ भारतांत एक लक्ष श्लोक आहेत. पंत ह्मणतात:—

**व्यासकृत महाभारत लक्ष ग्रंथ प्रसिद्ध हा भारी।**
**आर्यावृत्तें रचितों, स्वल्पांतचि आणितों कथा सारी॥ १॥**

हरिप्रिय अशा पांडवांची कथा ' आपण तरावयासाठीं ' स्वल्पांत आणावयाचा पंतांनीं निश्चय केला व आगंतुक कथा बहुशा गाळून किंवा संक्षेपांत आणून आपलें भारत रचिलें, तरी त्याच्या सतरा हजारांवर आर्या झाल्या आहेत! तेंडुलकरांच्या प्रतींत मोरोपंती भारतांतील आर्यांची संख्या १६९२० दिली आहे, रा. ओक यांनीं ती १७१२९ दिली आहे, पण पंढरपुरीं पंतलिखित महाभारताची जी प्रत आहे तिच्यांतील प्रत्येक पर्वाच्या अंतीं पंतांनीं जी संख्या मोजून दिली आहे तिची बेरीज १७१७० आहे. विराटपर्व मात्र दुसऱ्याच्या हातचें आहे, बाकीचीं १७ हीं पर्वें खुद्द पंतांनीं स्वहस्तानें लिहिलेलीं आहेत. पंतांचें अक्षर बारीक पण सुवाच्य व वळणदार आहे, खोडाखोडी कोठेंही केलेली नाहीं. क्वचित् एखाद्या शब्दावर टीप खालीं वर कोठें तरी दिलेली आढळते. पंत फार जलद लिहीत असें दिसतें. विस्तृत टीपा देऊन पंतभारत काव्यसंग्रहांतून छापून निघालें आहे. त्यामुळें पुष्कळ मराठी वाचकांची उत्तम सोय झालेली आहे, तथापि काव्यसंग्रहांतल्या भारतापेक्षांही त्याच्या पूर्वीं छापलेली तेंडुलकरांचा भारताची प्रत अंमळ जास्त शुद्ध दिसते. गांवोगांव जुन्या दप्तरांतून पंतभारतापैकीं सभापर्व व उद्योगपर्व ह्या दोन पर्वांच्याच जास्त प्रती आढळतात. यावरून हीं पर्वें पंतकाळापासून जास्त लोकप्रिय झा-

लेलीं दिसतात आणि तीं बाकींच्या पर्वांहून अधिक सरस आहत असें मलाही वाटतें. प्रत्येक पर्वांतील प्रथम आर्येचें प्रथम अक्षर घेतलें ह्मणजे 'श्रीपांडवसहायो भगवानरविंदाक्षो जयति' असा मंत्र निघतो. आपलें भारतही पंतांनीं मंत्रखचित करायला सोडलें नाहीं! असें सांगतात कीं पंतांनीं अगोदर कर्णपर्व रचिलें व मागाहून बाकीचीं पर्वें रचिलीं. पण मूळप्रत पहातां व कर्णपर्वास नमनादि प्रारंभ नाहीं ही गोष्ट लक्षांत आणतां हें मला तरी खरें वाटत नाहीं. प्रत्येक पर्वाच्या मलपृष्ठावर वरील मंत्र लिहिलेला आहे. कांहीं पृष्ठांवर 'श्रीमयूरेश्वरप्रसन्न' या नांवाचा वाटोळा आंगठीचा छाप मारलेला दिसतो! पंतांच्या इतर कवितेप्रमाणें यांचें भारतही मूळ प्रतीबरहुकूम छापून निघणें अवश्य आहे. मूळ प्रतींतले पाठ शुद्ध असून छापील प्रतींतून अशुद्ध पाठ घुसल्यामुळें बिचाऱ्या कवीवर टीकाकारांचा पुष्कळ वेळा वृथा भडिमार होत असतो! छापील प्रती बहुतेक बरोबर आहेत. पण पंतांच्या लेखनपद्धतीचे विशेष पाहावयाचे असतील तर मात्र मूळ प्रत पाहिली पाहिजे. कोठें कोठें पंतांनीं स्वतः टीपा किंवा अन्यपाठ दिले आहेत. पण हे फार विरळ आहेत:—

(१) जें तंत्र देखिलें त्वां तें होय अनेक-वासना-जाळ।
सित असित तंतु तीं सुख-दुःखें, पट भव, तसेचि जें बाळ।
(अथवा) जं शुक्लकृष्णतंतू तीं सुखदुःखें, तसेचि ते बाळ॥
आदिपर्व अ. २-१२३

(२) देवीं[१] राजासि पुसे, 'सुरकलभांची[२] हिरोनि गति घेते।
कोणाचे शिशु? जेंसे देवांचे[३] चालते नग तिथे ते?॥ आदि० ११-२९.
(अथवा) कोणाचे शिशु जंगम नव अमरांचे जसे नग तिथे ते.

(३) तीं[४] आश्रमवृक्षांसीं शार्दूल-वराह-हस्ति हरि-सेना[५]।
बांधी सा वर्षांचा, शिकवी कण्वोक्त युक्त परिसेना॥
(अथवा) शिशु कण्वोक्तांत तेंचि परिसेना[६]॥ आदि० १२-५५॥

१ शर्मिष्ठेला ययातीपासून गुप्तपणें तीन पुत्र झाले हें पाहतांच देवयानी फणफणते. २ देवहस्तींच्या छाव्यांची गति हिरून घेणारे हे कोण? ३ कल्पवृक्ष. ४ कण्वाश्रमांत वाढलेला दुष्यंतपुत्र भरत. ५ वाघ, वराह, हत्ती व सिंह यांना. ६ मागूनचा पाठ किती युक्त आहे बरें? तो शिशु कण्वांची सर्व वचनें मान्य करी, त्यांच्या सर्व आज्ञा पाळी, मात्र क्षात्रियाचा छावा असल्यामुळें तो कण्वाचें एवढ्या बाबतींत मात्र ऐकत नसे.

आतां छापील प्रतींपेक्षां मूळांतील पाठ किती खरे व सरस असतात तें पहा:—

**( १ ) माझी कीर्ति श्री तूं बोलाया वद न कोरडे जा ये।**
**तत्कंठ कां न दाटे? येऊं देऊं नको रडें जाये॥ आदि० १२-८७॥**
**माझी कीर्ति श्री तूं! बोलाया वचन कोरडें ज्या ये।**
**तत्कंठ काय दाटे? येऊं देऊं नको रडें जाये!॥**

छापील प्रतींतली आर्या प्रथम दिली आहे तिचा अर्थच बरोबर लागत नाहीं. पंतांच्या मूळप्रतींत ही आर्या जशी आहे तशीच खालीं दुसऱ्यांदा दिली आहे. दुष्यंत शकुंतलेची समजूत करितांना ह्मणतो, "शकुंतले! तूं माझी राज्यलक्ष्मी व कीर्ति आहेस! अगे! ज्याला कोरडें ढोंग करून बोलतां येतें त्याचा कंठ काय दुःखानें दाटून येतो? तुझा कंठ ज्या अर्थी दाटून आला आहे त्या अर्थी तुझें हें भाषण वरवर नाहीं. अंतःकरणापासून आहे. हे जाये! माझी तूं धर्मपत्नी आहेस. उगी. हें रडें आवर बरें"

**( २ ) सवसाहित्य किति वदूं? राबति भुज जेथ साधुसुरतरुचे।**
**ज्या खटपटीपुढें न श्रीचें श्रीशास हीन सुरत रुचे॥ सभा० २-१६**
**ज्या खटपटपुढें न श्रीशास श्रीसही न सुरत रुचे॥**

८ मराठी कविता आणि मुख्यतः मोरोपंतांची कविता भाषांतररूप आहे कीं स्वतंत्र आहे ह्याबद्दल मालाकारांच्या वेळेपासून पुष्कळांनीं चर्चा केली आहे. मराठी कविता स्वतंत्र रचलेली नव्हे, ती केवळ भाषांतररूप आहे, असें शास्त्रीबोवांच्या पूर्वींचे इंग्रजी पंडित ह्मणत असत. त्यांच्या आक्षेपाचें खंडण शास्त्रीबोवांनीं केलें आहे. मात्र तो आक्षेप जसा एकदेशी होता, तसें त्याचें खंडणही एकदेशीच झालें आहे! मराठी कवितेला संस्कृत भाषेचा मुख्य आधार आहे, तथापि ती केवळ भाषांतररूप नाहीं. अमृतानुभव, दासबोध, सिद्धांतबोध, स्वात्मसुख, विवेकसिंधु, वगैरे ग्रंथ तर पूर्ण स्वतंत्र आहेत. ज्ञानेश्वरी, नाथभागवत वगैरे टीकाग्रंथ स्वानुभवाच्या व दिव्य स्फूर्तीच्या जोरावर लिहिलेले असल्यामुळें स्वतंत्रप्राय आहेत. मुक्तेश्वर, श्रीधर, मोरोपंत वगैरे कवींचे ग्रंथ रामायण, भारत, भागवतादि संस्कृत ग्रंथांचीं भाषांतरें किंवा रूपांतरें आहेत, तथापि त्यांच्यांतही स्वतंत्रपणाचें तेज अतिशयच आहे. मराठी भाषेंतला मोठा भाग अभंग, पदें, कटाव, आरत्या, भूपाळ्या, लावण्या, पोवाडे

वगैरे लोकप्रिय वृत्तांत आहे, तो सर्व हृदयवृत्तींचा पाट फोडून बाहेर आल्यामुळें स्वतंत्रच आहे. मराठी कविता संस्कृतांतून निघाली आहे, तथापि तिनें आपला स्वतंत्र संसार थाटला आहे. मराठी भाषा फार तर हजार वर्षांची जुनी आहे, व आपलें हिंदु राष्ट्र हजारों वर्षांचें प्राचीन आहे, तेव्हां रामायण-भारतादि राष्ट्रीय ग्रंथांत दिसणारें राष्ट्रीयत्व मराठी ग्रंथांत सहजच आहे. मराठी कवींचें सर्व शिक्षण संस्कृत ग्रंथांवरून झालें, त्यांना प्रेरणाही तिकडूनच झाली, व मराठी भाषा संस्कृत भाषेच्या आराधानें पुष्ट होऊन अभियुक्त झाली आहे. ह्या गोष्टी सिद्ध असतांना मराठी कविता पूर्ण स्वतंत्र आहे असें ह्मणणें सत्याला धरून होणार नाहीं; व बहुतेक मराठी कवि स्वानुभवानें कविता लिहिणारे असल्यामुळें ती केवळ भाषांतररूप आहे असें ह्मणणें ह्मणजेही मराठी कवींचा उपमर्द करण्यासारखें आहे. मोरोपंतांनीं मूळाचा आधार घेऊन कांहीं प्रकरणें अगदीं स्वतंत्र रचलीं आहेत, कांहीं तर पद्यशः भाषांतरें आहेत, व कांहीं ठिकाणीं उपमाउत्प्रेक्षादि अलंकार किंवा सुभाषितरूप अर्थांतरन्यास अगदीं पदरचे घातले आहेत. ह्याचें प्रत्यंतर प्रस्तुत ग्रंथांत वाचकांस जागोजाग येणार आहे. स्तोत्रें, संतप्रकरणें हीं तर अगदींच स्वतंत्र आहेत. कृष्णविजयांतलीं रुक्मिणीविवाहकथा व सुभद्राख्यान हीं प्रकरणें मूळापेक्षां पुष्कळ पटीनें रसभरित उतरलीं आहेत. भागवतांतले व प्रल्हादविजयांतले कित्येक प्रसंग तर केवळ भाषांतररूप आहेत. पंतांची कविता स्वतंत्रही आहे, भाषांतररूपही आहे, रूपांतर होऊन आलेलीही आहे! अलंकार, कल्पना, वर्णनचातुर्य कोठें संस्कृतांतून घेतलेलें आहे, व कोठें स्वतंत्रपणें स्वप्रतिभास्फूर्तीनें रचून घातलेलें आहे. मराठींतल्या आख्यानांना "केवळ कथानकांखेरीज दुसरा कोणताही मूळ संस्कृतांतला आधार नाहीं. त्यांतील विचार, कल्पना, अलंकार वगैरे सर्व त्या त्या कवींचे स्वतःचे होत," ( अंक ४६ ) हें मालाकारांचें ह्मणणें अतिशयोक्तीचें आहे. प्रस्तुत ग्रंथांतच मीं जागोजाग मूळ श्लोक व त्यावरील पंतांच्या आर्या दिल्या आहेत त्यावरून हें मत पंतांपुरत तरी चुकीचें आहे असें कळून येणार आहे. शास्त्रीबोवांनीं आणखी ( अंक ४७ ) एके ठिकाणीं ह्मटलें आहे. "पेशव्यांच्या अंमलांत प्राचीन पांडित्याचें जें पुनरुज्जीवन झालें त्याच्या ऐन भरांत मोरोपंत हयात होता, तेव्हां कमलांनीं चोहोंकडे फुलून गेलेल्या सरोवरांत विहार करणाऱ्या भ्रमरास परागांच्या छटा जशा

सहज लागून जातात त्याप्रमाणें केवळ प्रसंगोपात्त संसर्गानेंही आमच्या प्राकृत कवीवर पांडित्याची छाया पडण्याचा वस्तुतः पुष्कळ संभव होता. ह्मणजे प्राचीन संस्कृत कवींचे उपमाचातुर्य, पदलालित्य, उदात्तता वगैरे गुण, किंवा अलीकडच्यांचे पदार्थक्लिष्टत्वादि कृत्रिम प्रकार हे त्यास सहज लागावे. पण त्याच्या काव्यांत पाहूं गेलें असतां वरील दोन्ही प्रकारांपैकीं कांहींच नजरेस येत नाहीं." आमच्या कवीवर संस्कृत ग्रंथांच्या परिशीलनामुळें पांडित्याची छाया पडली आहे कीं नाहीं व प्राचीन संस्कृत कवींचे उपमाचातुर्य, पदलालित्य वगैरे गुण त्यास लागले आहेत कीं नाहीं या विषयाचा ऊहापोह मागें तिसऱ्या प्रकरणांत केला असल्यामुळें येथें त्याचा पुन्हां विस्तार करण्याचें कारण नाहीं. प्राचीन संस्कृत कवितेचें वळण पंतांच्या कवितेला अतिशय लागलें होतें असें ह्या ग्रंथांत मीं वारंवार दाखविलें आहे. पंतांच्या इतर काव्यांप्रमाणें त्यांच्या भारतालाही स्वतंत्रपणाचें व स्वयंस्फूर्तीचें तेज अतिशय आलें आहे, तथापि पंतांनीं कोठ कोठें मूळ श्लोकांचें पदशः भाषांतरही केलें आहे. पंत वीररसाच्या वर्णनांत आले कीं आपलें देहभान विसरतात, तथापि मूळ भारत पुढें ठेवून त्यांनीं आपला ग्रंथ तयार केला असें स्पष्ट दिसतें. मराठी काव्यरसिक कै. रामचंद्र भिकाजी गुंजीकर ह्यांनीं ( विविधज्ञानविस्तार वर्ष १२ अंक ५।६।७ ) 'मराठी कविता भाषांतररूप नाहीं व बहुतेक मराठी काव्यांतले जे विचार, अलंकार, कल्पनावृंद आहेत ते सर्व त्यांचे स्वतःचे होत' ह्या मालाकारांच्या मतांचें सप्रमाण खंडण केलें आहे. रा. गुंजीकरांनीं ह्या लेखांत मुक्तेश्वर व मोरोपंत ह्यांच्या भारतांतील कित्येक उतारे मूळासह दिले आहेत त्यांतूनच मूळ व पंत यांचे ४।५ उतारे येथें देतां ह्मणजे झालें. हे बहुतेक उतारे कर्णपर्वांतले आहेत.

( १ ) मूळः—

भ्रातरं निहतं दृष्ट्वा भीमसेनेन संयुगे ।
रुधिरे पीयमाने च किंस्वित् दुर्योधनोऽब्रवीत् ? ॥ १ ॥

पंतः—

दुःशासनगलरक्त प्राशुनियां ओंठ चाटितां ओले ।
भीमाकडे विलोकुनि दुर्योधन काय संजया बोले ? ॥ १ ॥

( २ ) मूळः—

मन्त्रौषधिक्रियायोगैर्व्याधौ देहादिवाहृते ।
संसप्तकानभिमुखौ प्रयातौ केशवार्जुनौ ॥ २ ॥

पंतः--

मंत्रौषधयत्नांहीं देहापासूनि रोगसा नेला ।
अश्वांनीं दूर द्विज अर्जुन संसप्तकाकडे गेला ॥ २ ॥

[ ३ ] मूळः—

यदुसदनमुपेंद्रपालितं
त्रिदशमिवामरराजरक्षितम् ।
प्रसभमिति विलोक्य को हरेत्
पुरुषवरावरजामृतेऽर्जुनात् ॥ १ ॥
त्रिभुवनविभुमीश्वरेश्वरं
क इह पुमान् भवमाव्हयेद्युधि ।
मृगवध कलहे ऋतेऽर्जुनात्
सुरपतिवीर्यसमप्रभावतः ॥ २ ॥

पंतः--

इंद्रपुरींतूनि सुधा यदुनगरींहूनि तसि पृथातनुजें ।
पुरुषवराची अनुजा हरिली, करिजेल काय तें मनुजें ? ॥ १ ॥
मृगवधकलहीं अर्जुन भांडे परमेश्वरासवें आंगें ।
विश्वांत विश्वनाथ प्रतिभट दुसरा असेल तरि सांगें ॥ २ ॥

( ४ )मूळ—

न मामस्मादभिप्रायात्कश्चिदद्य निवर्तयेत् ।
अपींद्रो वज्रमुद्यम्य किमु मर्त्यः कथंचन ॥ १ ॥

पंतः—

या दृढमदभिप्रायापासुनि वारूं शके न शक्र मला ।
मर्त्यांची काय कथा ? प्राकृतसा काय कर्ण हा गमला ? ॥ २ ॥

( ५ )मूळ—

यच्च प्रार्थयसे हन्तुं कृष्णौ मोहात् वृथैव तत् ।
न हि शुश्रुम संमर्दे क्रोष्ट्रा सिंहौ निपातितौ ॥ १ ॥
अप्रार्थितं प्रार्थयसे सुहृदो नहि सन्ति ते ।
त्वां ये निवारयन्त्याशु प्रपतंतं हुताशने ॥ २ ॥

पंतः—

त्या दोघां कृष्णांतें म्हणसी मारीन, मोह हा ! कवणें ।
' वधिले सिंह शृगालें ' ऐसें लोकांत ऐकिलें श्रवणें ? ॥ १ ॥

**इच्छिसि न इच्छिजे तें, संसारीं तुज नसेचि हित मित्र।**
**पडसी पतंगसा जरि धनंजयीं, वारिती न, हें चित्र!॥ २॥**

विस्तारभयास्तव इतकेच उतारे पुरेत. हें सारें मूळाचें पदशः भाषांतर आहे. पण हें किती सरळ, जोरदार व प्रसादयुक्त आहे! भाषांतर करणें सोपें नाहीं. गुंजीकरांनीं ह्मटल्याप्रमाणें "एका भाषेंतील कल्पना दुसऱ्या भाषेंत ठाकठिकानें व अर्थामध्यें तफावत पडूं न देतां नेणें ह्मणजे दुर्घटच काम खरें. तें पाहिजे त्यास व पाहिजे त्या वेळीं साधेल असें नाहीं. मूळ भाषेचें सौंदर्य, पदलालित्य, ध्वनिमंजुलता, विचारगांभीर्य इत्यादि गुण दुसऱ्या भाषेंत जसेच्या तसे व्यक्त करून दाखविणें लहानसान काम नव्हे!" भाषांतरकर्ता मूळ ग्रंथकाराशीं समवृत्ति असला पाहिजे; त्याला दोन्ही भाषांतील व्याकरणरचना, अर्थस्वारस्य, शब्दांचें मृदुत्व, लालित्य, सौंदर्य इत्यादि गुण उत्कृष्ट कळले पाहिजेत; त्याच्या अंगीं समंजसपणा, चातुर्य, बहुश्रुतपणा असून तो वठावलेला पाहिजे, ह्या गोष्टी मालाकारांनींही आपल्या 'भाषांतर' ह्या विषयावरील उत्कृष्ट निबंधांत उत्तम प्रकारें दाखविल्या आहेत. पंतांनीं, मुक्तेश्वरांनीं, श्रीधरस्वामींनीं किंवा कोणत्याही वरिष्ठ दर्जाच्या कवीनें मूळ ग्रंथ पुढें ठेवूनच आपापल्या टीका केल्या आहेत. मूळाला कोणींही सोडलें नाहीं. तथापि सांगकाम्या नोकरांप्रमाणें ह्यांनीं केवळ भाषांतरें केलीं नाहींत. हे केवळ भारवाही नव्हते. यजमानाचें इंगित ओळखून प्रज्ञावंत सचिव जसे त्याचे मनोदयानुरूप पण राज्याभिवृद्धीला पोषक अशा प्रकारचे स्वतंत्र उपाय शोधण्यांत निरंतर दंग असतात, त्याप्रमाणें व्यासवाल्मीकिशुकांचा भावार्थ नित्य डोळ्यांपुढें ठेवून व तो जगाला शिकविण्याचा उद्देश मनांत वाळगून आमच्या प्राकृत कवींनीं महाराष्ट्रभाषेच्या आवारांत ज्याला ज्याला जशा सुचल्या तशा प्रकारच्या कसरती केल्या आहेत! सर्व मराठी कवि व्यासवाल्मीकिशुकांचे अंकित आहेत ही गोष्ट निर्विवाद आहे. ज्ञानेश्वरमहाराजांनीं 'व्यासांचा मागोवा घेत। भाष्यकारातें वाट पुसत' ज्ञानेश्वरी केली आहे. 'सांडूनि पदपदार्था। नाहीं बोलिलों जी वृथा' अशी प्रतिज्ञा करून नाथांनीं भागवतावर टीका केली आहे. 'बोलिले जें ऋषी। साच भावें वर्ताया' आमचा अवतार आहे, असें तुकोबांनीं सांगितलें आहे. व्यासवाल्मीकिशुक हे माझे प्रतिभारक्षक आहेत व त्यांनीं वाचा दिल्यामुळें मी पोपट बोलूं लागलों आहें असें पंतांनीं

वारंवार ह्मटलें आहे. व्यासवाल्मीकिशुक हे आमचे राष्ट्रीय गुरु आहेत, ही हिंदुराष्ट्राची त्रयी आहे. हिंदुसमाजाला नीतितत्वें शिकवणारा प्रमुख ग्रंथ रामायण होय, राजकारण शिकवणारा प्रमुख ग्रंथ महाभारत होय व धर्म शिकवणारा प्रमुख ग्रंथ भागवत होय. एका दृष्टीनें पाहिलें तर भारतांत सर्व कांहीं सांगितलें आहे. महाभारत हा हिंदुराष्ट्राचा खरा राष्ट्रीयग्रंथ आहे. आमचे सर्व राष्ट्र वाल्मीकिव्यासशुकांच्या अंकित राहिलें आहे व तें अनंतकालपर्यंत राहणार. प्राकृत कवि त्यांच्या अंकित राहिले ह्मणूनच राष्ट्रजागृतीचें कार्य करण्याची शक्ति त्यांच्या वाणींत आली आहे. त्यांची वाणी अमोघ आहे. त्यांच्या वाणींत वेदार्थप्रतिपादन आहे. धर्मार्थकाममोक्ष हे चारही पुरुषार्थ साध्य करून देण्याचें सामर्थ्य महाराष्ट्रकवींच्या वाणींत आहे. संस्कृत भाषेतले शब्द, अलंकार, रस, कोट्या, दृष्टांत, कल्पना बहुतेक मराठी कवींनीं आपापल्या शिक्षणाच्या मानानें आपापल्या ग्रंथांत घातल्या आहेत. अशा दृष्टीनें विचार करितां मराठी कविता भाषांतररूप आहे असें ह्मटल्यानें तिला कोणत्याही प्रकारचा कमीपणा येतो असें नाहीं. पंतांनीं मूळ संस्कृत पुढें ठेवून आपलें भारत लिहिलें आहे तरी स्वतःचे उपमादृष्टांतादि अलंकारही शेंकडों घातले आहेत, संक्षेपविस्तार करताना अतिशय चातुर्य व धोरण प्रकट केलें आहे, स्वभावचित्रें बहारीचीं वठविलीं आहेत, वीररसाचीं वर्णनें कित्येक ठिकाणीं मूळापेक्षां अतिशय जोरदार आहेत, व एकंदरींत सर्व भारताची उठावणी इतकी अप्रतिम झाली आहे कीं अगदीं स्वतंत्र ग्रंथाची शोभा त्याला प्राप्त झाली आहे !

९ महाभारताची कथा सर्वांस माहीतच आहे, ती येथें सांगण्याचें कारण नाहीं. पंतभारताचेंही सविस्तर वर्णन करावयास स्थलावकाश नाहीं. पंतभारताचा विहंगमदृष्टीनें विचार करूं ह्मणजे झालें. आधीं आदिपर्व घेऊं या. धौम्यमुनि आणि त्यांचे तीन शिष्य ह्या कथेंत ( आदि०अ. २ ) पंतांना आपली गुरुभक्ति प्रकट करण्यास चांगलें फावलें. त्या प्रसंगाची एकच आर्या पहा:—

**गुरुसदनीं वेद जसा, विषयीं तैसा न देह राबेल ।**
**तो दास्यरूप वाहे त्या नित्य, चुको न दे, हरा बेल ॥ २५ ॥**

वेद नांवाचा शिष्य गुरुरूप शंकराला—न चुकतां—दास्यरूप बेल वाही व गुरुगृहींचीं पडतील तीं कामें हौसेनें अंग मोडून सर्वकाल करी. गुरूवरचें

शंकराचें रूपक उत्तम आहेच, पण विषयांच्या सेवेंत सारें जग गुंग झालें आहे ह्या गोष्टीची आठवणही येथें खुबीनें दिली आहे. प्रथमार्धांतला उपमा व द्वितीयार्धांतलें रूपक पंतांसारख्या गुरुपुत्रालाच आठवणारें आहे. 'सुखवी वरप्रसाद, नाहीं गुरु देव यांत तिळ भेद,' अशा प्रकारचीं गुरुभक्ति वाढवि-णारीं तत्त्वें पंतभारतांत जागोजाग सांपडतात. पुढें द्रोणार्जुनांचें अन्योन्य प्रेमही कवीनें चांगलें वर्णिलें आहे. 'दारानकुर्याय तपोर्थमायः' अशा को-टींतल्या 'जरत्कारू' नें वासुकीच्या बहिणीशीं लग्न केलें व गर्भधारणा-होतांच निद्राभंगाचें निमित्त करून तिला टाकून तो तपासाठीं वनांत निघून गेला. ही कथा (आदि०९) वाचकांनीं अवश्य वाचावी. हिंदुस्थान जेव्हां ब्रह्मविद्येचें केवळ आगर बनलें होतें, बहुतेक ब्राह्मणपुत्र जन्मादारभ्य ब्रह्म-निष्ठेच्या मार्गाला लागत, व गृहस्थधर्माकडे कोणी ढुंकूनही पाहत नसे, तेव्हां जरत्कारूसारख्या तरुणाला संसाराकडे वळविण्यासाठीं "संतति नसतां स्वर्गी पितरांसी बसावया नसे ठाव" असा धर्मशास्त्राला कायदा करावा लागला! जरत्कारूनें 'विप्रिय सोशीं विपर्यी, हा विषयाकारणें नसे सुजला' असें बजावून तूं माझें विप्रिय करिशील तर मी तत्काळ तुझा त्याग करीन अशीं स्वस्त्रीला जरब दिली. तेव्हां:—

**त्या शब्दें कंपिततनु झाली झंजानिलें जशी कदली।**
**पदलीना ते साध्वी मान्य करुनि 'बहु बरें' असें वदली ॥ ९५ ॥**
**भयचकितता मृगाची, शुनकाची जागरूकता शिकली,।**
**ती इंगितज्ञताही काकाची–ह्मणुनि सेवनीं टिकली ! ॥ ९६ ॥**

पत्नी अंतर्वत्नी (गर्भिणी) झाली असें पाहून स्वामीनें तेथून प्रयाण केलें व जातांना 'तुझ्या गर्भांत गुणमणिकरंडक आहे त्याला तूं जप. तो तुझ्या माहेरच्या कुळास दुःखमुक्त करील' असें सांगितलें. तोच आस्तिक होय! आदिपर्वांत कचोपाख्यान (अ० ९) शर्मिष्ठादेवयानींचें भांडण (अ० १०।११), शकुंतला आख्यान (अ० १२), कणिकनीति (अ० २७), ब-कासुराख्यान (अ० ३०) वसिष्ठाची कामधेनु (अ० ३३) व द्रौपदी-स्वयंवर (अ० ३४), हे प्रसंग उत्तम आहेत व ह्यांतील पुष्कळ आर्या पंतांच्या वेळेपासून लोकप्रसिद्ध झाल्या आहेत. देवयानीनें 'तूं मलिन कु-टिल नीरस जड' ह्मणून कचाला शाप दिला, व 'राजसुतेचें यश जें तुज येइल काय गे दरिद्रेतें' ह्मणून हिणवणाऱ्या राजकन्या शर्मिष्ठेला आपली

दासी करून ठेवलें. गुरूनें आपल्या बापास सोडूं नये व शापूं नये ह्मणून शर्मिष्ठेनें "कुलजेनें व्यसनकरीं प्राणहि द्यावे परंतु न ज्ञाति!" ह्या उदारतत्त्वाच उदाहरण जगाला वाढून देण्यासाठीं देवयानीचें दास्य संतोषानें पत्करिलें! पतिपुत्रसुखाभावानें शर्मिष्ठा दुःखी होऊन ययाती मला वरील काय असें चिंतीत होतीः—

**होय ऋतुमती सुमती शर्मिष्ठा व्याकुळा वराधीनें।**
**चित्तीं ह्मणे " सहावें किति दुःख कळेवरें पराधीनें ! ॥ १ ॥**
**शिशु पाळण्यांत घालुनि हालवितां निजवितां सुखें 'जो जो '**
**धात्री ह्मणति, सखीला अमृतरसचि तो निघे मुखं जो जो ॥ ३ ॥**
**काय करूं एकांतीं जरि होती भेटि वाटतें मतिला।**
**विनवुनि वरित्यें पुत्रप्राप्त्यर्थ तरि स्वयें सखीपतिला " ॥ ४ ॥**

दुष्यंत कण्वाश्रमांत शकुंतलेला पाहून भुलला व ' मद्भार्या हो ' ह्मणून ह्मणाला तेव्हां:—

**हांसुनि तीहि ह्मणे " हो ! प्रार्थावें प्रणतपारिजातातें।**
**देवा ! स्वयें वहावें या निजकारुण्यवारिजा तातें " ॥ ३९ ॥**

ह्या आर्येतला प्रत्येक शब्द मनोहर आहे. ह्या आर्येनें मला प्रथमवाचनांत एक दिवस वेडें करून सोडलें होतें! शकुंतला ह्मणत्ये, 'कण्वाच्या कारुण्यजळांत वाढलेलें मी कमळ आहें!' येणेंकरून तिनें कण्वाचा वत्सलता व आपलें अनन्य पितृप्रेम व्यक्त केलें आहे. 'प्रार्थावें प्रणतपारिजातातें,' येणेंकरून 'मी स्वाधीन नाहीं, आपण खुद्द कण्वापाशींच ही गोष्ट काढावी' असें शकुंतलेनें सुचविलें आहे व आपण कण्वाची प्रार्थना केली तर ती निष्फळ होणार नाहीं असेंही 'प्रणतपारिजात' ह्या कण्वास लावलेल्या विशेषणावरून ध्वनित केलें आहे! कण्व प्रणतांना कल्पवृक्षासारखे आहेत, ते आपली 'याञ्चा मोघ' होऊं देणार नाहींत. परपुरुष, राजा, विवाहाची गोष्ट काढणारा तेव्हां शकुंतलेनें त्याच्या नाजुक प्रश्नास 'हांसुनि' उत्तर दिलें यावरून तिची शालीनता व्यक्तच होत आहे, पण कण्वानें जर 'हें कमळ आपणांस स्वयें वाहिलें' तर त्यांत मलाही आनंदच होणार आहे

---

१ पतिसंबंधी चिंतनें. २ देहानें. ३ दाई ४ ' देवयानीला ' अशी पंतांची स्वतःची टीप आहे.

असाही गर्भितार्थ 'हांसुनि' ह्या पदांत निघतो असें मला वाटतें! कन्यादानांत 'देवा!' 'वारिज,' 'वहावें' ह्या शब्दांत काय व्यंगोक्ति आहे हें कुलीन हिंदु कुटुंबीयांस[3]च कळणार आहे. हें ध्वनिकाव्य असून यांत शब्दार्थाचें मांजुल्य अत्यंत आहे. उत्तम पद्य ह्मणजे एक दिव्य सुमन आहे, त्याचा परिमळ सर्वेंद्रियांच्या द्वारें एकदम डोक्यांत शिरला कीं रसज्ञ पुरुष आनंदानें वेडा होतो! पंतांचें भारत मूळाचें केवळ भाषांतर आहे कीं स्वतंत्र आहे याचा विचार करतांना पंतप्रतिभानिर्मित अशीं शेंकडों स्थळें यांत आहेत तीं आधीं पहावींत. असो, दुष्यंतानें जेव्हां पुढें शकुंतलेला न ओळखतां 'माय ही तुझी असती' म्हणून तिला झिडकारिलें तेव्हां तीही त्याजवर 'नीचा' 'मत्ता' इत्यादि अपशब्दांचा वर्षाव करून चवताळली व ह्मणत्ये:—

**ती ब्रह्मयोनि देवी मन्माता मेनका सुरांस मता।**
**नीचा तुझीच माता! करिल सुधेची कशी सुरा समता? ॥७४॥**

पंतांनीं ही भाषा इतकी कडक वापरली नसती तर बरें होतें. मुक्तेश्वराचें शकुंतलाख्यान पंतांच्या आख्यानापेक्षां अधिक सरस उतरलें आहे. दुर्योधनानें कर्णाची मैत्री संपादन केली व त्याला अंग देशाच्या गादीवर बसविलें तेव्हां दुर्योधन ह्मणतो [ आदि० २९ ]:—

**भूप ह्मणे, "अत्रुटिता धारा सरळा जशीच तैलाची।**
**यावज्जीव असावी त्वन्मैत्री स्थिति धरूनि शैलाची" ॥५२॥**

पर्वतासारखी स्थिर व तेलाच्या अखंड धारेसारखी सरळ, ह्या मैत्रीला दिलेल्या उपमा किती गोड आहेत! कर्णाला भीमसेन 'तूं वर्णाधम ह्म० हलक्या जातीचा आहेस' असें ह्मणून जेव्हां हिणवूं लागला तेव्हां आपल्या मित्राच्या कैवारानें दुर्योधनानें 'शूर बळा मानिती न कुळशीळा' हें तत्व ( आदि० २५ ) पुढें काढलें. 'उदकापासुनी झाला वैश्वानर' इत्यादि ४।५ दृष्टांत देऊन तो ह्मणतोः—

---

१ ह्या आर्येतली पवित्र भावना मूळांत नाहीं व कालिदासाच्या जगप्रसिद्ध नाटकांतही नाहीं. पंतांची काव्यवाटिका अशा सहस्रावधि सुमनांच्या पवित्र परिमळानें दरवळली आहे. २ 'पिता रक्षति कौमारे...न स्त्री स्वातंत्र्यमर्हति' हा मनुस्मृतींतला सिद्धांत हिंदुसमाजव्यवस्थेला आधारभूत आहे. शकुंतलेला दुष्यतानें ओळखलें नाहीं, तेव्हां तिच्या पतिप्रासादद्वारीं तिला एकटीला टाकून कण्वशिष्य परतूं लागले, शकुंतलाही त्यांच्या मागोमाग जाऊं लागली तेव्हां शार्ङ्गधर "किं पुरोभागिनि! स्वातंत्र्यमवलंबसे!!" असा तिच्यावर उसळला, हें संस्कृतज्ञांस आठवतच असेल!

**द्रोण गुरुहि कलशोद्भव, तुमचाहि प्रभव मज असे कळला ! ।**
**सांग स्वयोनिदोषें तेजस्वीयांत कोण तो मळला ! ॥ ६७ ॥**
**सर्वसुलक्षणमंडित सकवचकुंडल जगीं असामान्य ।**
**तेजोराशि उपजला, वद दुसरा कोण रे असा मान्य ! ॥ ६८ ॥**
**प्राकृत योषा याची जननी हे तों नयेचि युक्तींत, ।**
**पिकतें मौक्तिक मुक्ताशुक्तींताचि तें न अन्य शुक्तींत ! ॥ ६९ ॥**

कणिकानें धृतराष्ट्राला जी कपटनीति शिकविली तिच्यांतली—लांडगा, वाघ, उंदीर व मुंगूस ह्या चौघांस निरनिराळ्या थापा देऊन फसवून काळविटाच्या मासावर यथेच्छ ताव मारणाऱ्या कोल्ह्याच्या कुटिलतेची—गोष्ट सांगून ( आदि० २७ ) पंत तिचें रहस्य सांगतातः—

**ऐसेंचि कृतप्रज्ञें साधावें आत्मकार्य नैपुण्यें ।**
**अघशमनार्थ करावीं—होईल स्वार्थासाद्ध तें पुण्यें !! ॥ २१ ॥**

बकासुराख्यानांत ( आदि० ३० ) ब्राह्मण, त्याची स्त्री, उपवर कन्या व बोबडा मुलगा ह्यांच्यांत 'बकासुराच्या भक्ष्यस्थानीं पडून मी मरायला तयार आहें, तुह्मीं वांचा' ह्मणून जी उदारप्रेमाची स्पर्धा लागली तिचें चित्र आमच्या कुटुंबवत्सल कवीनें फार मनोहर वठविलें ब्राह्मण ह्मणतो 'स्त्रीला सोडावें तर तितीर्षूनें नौका विकण्यासारखें वेडपणाचें आहे. पुत्राचा प्रश्नच नाहीं, कन्या द्यावी तर मला पुत्राइतकीच कन्याही प्रिय आहे!' ब्राह्मणाच्या तोंडचेच शब्द ऐका:—

**जरि दान तुझें द्यावें कांते ! मज भासतें तसें तरि तें ।**
**सिंधूदरीं विकावें स्वहितार्थ तितीर्षुनें जसें तरितें ! ॥ १७ ॥**
**पुत्रचि अधिक न कन्या—अन्यास गमे; मला न लोभ्याला ॥**
**नयनयुगांतुनि एकहि द्याया स्वप्नीं न कोण तो भ्याला ! ॥ १८ ॥**

यावर त्या ब्राह्मणाच्या स्त्रीनें 'पतिपूर्वी स्त्रीस मरण उचित' ह्मणून स्वतः मरण्याचा हट्ट घेतला व 'मज भक्षीलचि तो तरि विधुरपणें सर्वथा नका राहूं !' अशी त्याच्यापाशीं मागणी केली. आईबापांचा हा संवाद ऐकून कन्या ह्मणते:—

१ द्रोणापासून झालेला. २ जन्मकथा . ३ स्त्री. ४ हें विचाराला टरत नाहीं. ५ मोतीं. ६ बुद्धिवंतानें. ७ पंचतंत्रांतही हेंच राजकारणाचें तत्व सांगितलें आहे. " येन केनाप्युपायेन शुभेनाप्यशुभेन वा । उद्धरेद्दीनमात्मानं समर्थो धर्ममाचरेत." ८ समुद्रांतून तरून जाण्याची इच्छा करणारानें. ९ ह्या आर्येत मनाचा कोमलपणा फार आहे.

(मज) 'घ्या, घ्यायाचीच सुता, हे किमपि नयेचि अन्यकामातें! २८
आत्मा पुत्र, सखा स्त्री, कन्या चिंताचि सर्वकाळ, जिला
प्रसवोनि वाहति मनीं श्रीमंतहि पितर सर्व काळजिला' ॥२९॥
ऐसें वदोनि कन्या रडवूनि रडे तशांत जवळून।
खवळून उठे बाळक बोले हस्तें तृणासि कवळून ॥ ३१ ॥
समजावुनि त्यांसि ह्मणे, 'ऐसें लाविलचलासि मालीन।
कां ललता आलनता पलतां मीं सागलांत तालीन'! ॥ ३२ ॥
हांसविली, हर्षविली व्यसनार्त तिघेहि बाळशब्दानें[1]।
अब्दानें[2] ग्रीष्मदवाकुळ[3] बर्हिकुळें जसींच अब्दानें[4] ॥ ३३ ॥

ह्या प्रेमळ कुटुंबाला वांचविण्याकरितां भीमसेनानें बकासुराशीं बाहुयुद्ध करून त्याला ठार मारलें, वगैरे कथा प्रसिद्ध आहे. थोरांना आश्रय दिल्यामुळें गरीब ब्राह्मणकुळ संकटांतून वांचलें. कौरवपांडव हे दोन प्रबळपक्ष भरतखंडभर हुतुतू घालायला प्रवृत्त झाले असतां व राजकारणाच्या धुमाकुळानें सर्व भरतखंडरूपी महासमुद्र प्रक्षुब्ध होत असतांना त्या समुद्राच्या तळाशीं–अप्रसिद्ध स्थितींत सुखानें, प्रेमानें व नीतीनें–कालक्रमणा करणारीं मानवरत्नें कशीं विखुरलेलीं होतीं हें ह्या कथेवरून वाचकांनीं समजावें! कुटुंबप्रेमाची गोडी जाणणाऱ्या आमच्या कवीनें कुटुंबनीतीचीं व समाजनीतीचीं रहस्यें आपल्या कवितेंत जागोजाग व्यक्त करून दाखविलीं आहेत. असो. पूर्वीं शर्मिष्ठा–देवयानींचें जसें आपापल्या मोटेपणाबद्दल भांडण झालें होतें, तसेंच पण वरिष्ठ दर्ज्याचें भांडण विश्वामित्र–वसिष्ठ ह्यांच्यांत झाल्याचें व वसिष्ठाच्या कामधेनूनें विश्वामित्राची त्रेधा उडवून दिल्याचें वर्णन ( आदि० अ. ३३ ) पंतांनीं फारच बहारीनें केलें आहे. बाहुबळ आणि बुद्धिबळ हीं दोन्हीं बळें श्रेष्ठच आहेत. राम आणि वसिष्ठ, शिवाजी आणि रामदास, ह्याप्रमाणें क्षात्रतेज व ब्रह्मतेज ह्या दोहोंचें जेव्हां जेव्हां एकीकरण झालें आहे तेव्हां तेव्हां भरतखंडाचा भाग्योदय झाला आहे. दोन्हीं बळें अत्यंत श्रेष्ठ व राष्ट्रोदयाला अत्यंत अवश्य आहेत. त्यांच्यांत रजोगुण शिरला कीं विरोध माजतो, व विरोध माजला कीं राष्ट्रापकर्ष होतो. ह्यास्तव अग्नि आणि वायु ह्याप्रमाणें परमसमर्थ असलेल्या ह्या दोन

१ वरील करुणारसाचें ह्या हास्यरसानें चांगलें पोषण केलें आहे. २ मेघानें. ३ उन्हाळ्यांतील वणव्यानें पीडिलेले मोरांचे कळप. ४ उदकदानानें.

मुख्य शक्ति परस्परसंगत राहताति ह्यास्तव राष्ट्रहितेच्छु पुरुषांनीं नित्य जपत असावें. ' स्वाध्याय तुझें बळ, तूं ब्राह्मण, कैचें असह्य तेज तुला?' ह्याप्रमाणें विश्वामित्रानें वसिष्ठाचा धिक्कार केला तरी तो महामुनि शांत राहिला. तीव्रतपानें प्राप्त झालेली वसिष्ठाची कामधेनु विश्वामित्राला पाहिजे होती. 'माझा आश्रमधर्म हिच्यामुळें चालला आहे, मी ही कशी देऊं' असें वसिष्ठ ह्मणाले तेव्हां.

**विश्वामित्र ह्मणे ' मीं क्षत्रिय, आधार जाण तेजाचा, ।**
**आज्ञामानसभंग न करिती भद्रेच्छु जाणते ज्याचा! ' ॥ १३ ॥**

'तुला कर्तव्य तें तूं कर' असें चोख उत्तर वसिष्ठानें दिलें तेव्हां कौशिकानें आपल्या अनुगांस 'सोडा हो धेनु ही चला हांका' असा हुकूम केला. नंतरः—

**दंडें ताडुनि नेतां फोडी ती धेनु फार हंबरडे ।**
**तेव्हां आश्रमवासि द्विजमृगखगदेवताकदंब रडे ॥ १८ ॥**

ती गाय वसिष्ठापुढें येऊन उभी राहिली तेव्हांः—

**साधु ह्मणे ' मज हृदयीं शत, तुज बाहेर हे कशा लागे ।**
**मी ब्राह्मण क्षमावान् माते! रडतीस तूं कशाला गे ॥ २१ ॥**

ती धेनु ह्मणजे वसिष्ठाची तपस्यासिद्धीच होती. 'अंगापासुनि केले प्रकट तिणें म्लेंछ यवन शबर शक,' व त्यांनीं 'पकडा लिया कहांलो' ह्मणत विश्वामित्राचीं 'तीं बारा कोश पळविलीं कटकें!' विश्वामित्राला क्षत्रबलाहून ब्रह्मतेज किती श्रेष्ठ आहे हें कळून आल्यावर त्यानें तपासाठीं हिमाद्रीचे कडे गांठले व तप करून तो राजर्षीचा ब्रह्मर्षि झाला! ब्रह्मतेजाची अवगणना क्षत्रियानें करूं नये, यांत त्याचें व राष्ट्राचें हित नाहीं, विश्वामित्रजनकांसारखे क्षत्रियही शेवटीं ब्रह्मर्षि झाले इत्यादि कथा भारतादि प्राचीन ग्रंथांत जागोजाग वर्णिल्या आहेत; व त्या पंतांच्या काव्यांतही आल्या आहेत. पंतांनीं ब्राह्मणक्षत्रियांचीं कर्तव्यें कित्येक सुभाषितांतून वर्णिलीं आहेत त्यांतील एकच सुभाषित येथें देतोंः—

**ब्राह्मणधर्म अहिंसा, सत्योक्ति तसी, क्षमा मनीं आण ।**
**क्षत्रियधर्म प्रकृतिप्रतिपालन, दंड, उग्रता जाण ॥ १ ॥**

दुष्टदमन व प्रजारंजन हा क्षत्रियाचा मुख्य धर्म आहे व षट्कर्मरतत्व व तपोनुष्ठान हा ब्राह्मणाचा धर्म आहे.

१० पंतभारतांत आदिपर्वाहूनही सभापर्व फार गोड आहे, किंबहुना

इक्षुदंडाप्रमाणें प्रत्येक कांडाला उत्तरोत्तर अधिकाधिकच गोडी येत चालली आहे. सभापर्वांत मयसभेचें पंतांचें वर्णन चांगलें आहे, तरी त्यांच्या जरासंधाख्यानाहून मुक्तेश्वराचें तेंच आख्यान अधिक विस्तृत असून अत्यंत जोरदार व बोधप्रद आहे. धर्माच्या राजसूययज्ञांत 'करिन ब्राह्मणपादप्रक्षालन, सांवडीन मी उष्टीं' ( सभा० २ ) याप्रमाणें बोलून श्रीकृष्णांनीं त्याच्या घरचीं हवीं तीं कामें केलीं, हें वर्णून श्रीकृष्णापासूनही करभार उकळणाऱ्या धर्माबद्दल पंत ह्मणतात:—

**धर्म प्रभु, न पर प्रभु, जेणें केला प्रसिद्ध तो करद ।**
**मोठ्या मोठ्यालांही बुडतां व्यसनाब्धिमाजि जो करद ॥ ७ ॥**

भीष्माज्ञेनें धर्मानें श्रीकृष्णाची अग्रपूजा केली तेव्हां शिशुपाळ संतापला:—

**बहु सांत्वन धर्म करी, न शमे, न वळे परंतु तो चैद्य ।**
**मरणाऱ्या रोग्याला काय करिल जाणता भला वैद्य ? ॥ ३७ ॥**

कपटद्यूतांत शकुनि, कर्ण इत्यादिकांच्या नादीं लागून दुर्योधनानें आपला नाश करून घेऊं नये ह्मणून विदुरानें त्यास व धृतराष्ट्रास जो निर्भीडपणाचा व कळकळीचा बोध केला ( सभा० अ. ४ ) त्या प्रसंगींच्या पंतांच्या आर्या उत्तम आहेत. द्रौपदीला पणास लावतांना धर्मराजानें 'अस्खलित चालवी गृहधर्मीं मज, यष्टि जसि पथीं अंधा' इत्यादि प्रकारें 'रूपें श्रीला, क्षमागुणें महिला' सखी साजणाऱ्या आपल्या महिलेचें जें गौरव केलें तें प्रत्येक महिलेनें पाहून आपला गृहाचार त्याप्रमाणें ठेवावा. दुःशासनानें द्रौपदीला फरफरां सभेंत ओढीत आणली तेव्हां:—

**पेटे पांडवकोपानल कृष्णादृष्टि होय तद्धमनी[1] ।**
**करितील काय हो ते ? निजमर्यादागुणींचि बद्ध[2] मनीं ! ५-१७ ॥**

'मी जिता कीं अजिता' ह्मणून द्रौपदी वारंवार विनवीत असतां व "बोला हो ! बोला हो ! बोला हो सर्व सभ्य बोला हो !" ह्मणून विकर्ण भीष्मादिकांस आरडून सांगत असतां 'धर्म परम सूक्ष्म' यास्तव स्पष्ट कोणींहि बोलले नाहींत ! द्रौपदीची विटंबना पाहून ज्या हातानें धर्मराज द्यूत खेळले तो हात जाळायला भीमसेन तयार झाला, पण 'आह्मां व्यसनार्तांची धर्मस्थिति हाचि बाज, पावें गा' असें अर्जुनानें त्यास समजाऊन स्थिर केलें. भीम ह्मणतो:—

---

**१ कोपरूप अग्नीची फुंकणी. २ 'युद्धास व द्यूतास बलावल्या जावें हा धर्माचा नियम होता आपणच केलेल्या नियमरूप दोरीनें बांधलेले.**

**श्री पुडविली महेंद्रश्रीतुल्या मज इची असे परवा ।**
**पर धार्मलोचनेच्या देखों न शकोंचि या विलापरवा ॥ ५-३४ ॥**

द्रौपदीला सभेंत नग्न करायला दुष्ट प्रवृत्त झाला तेव्हां तिनें केलेला श्रीकृष्णाचा धांवा व कृष्णानें आपल्या भक्ताची लाज राखण्याकरितां घेतलेला 'अकरावा अंबरावतार' ह्याचें पंतांनी बारा आर्यांत अप्रतिम वर्णन केलें आहे. येथें मुक्तेश्वराहून पंतवाणीचा पाझरच अधिक गहिंवर आणणारा आहे:—

**'हा ! ढळतां तिळहि पदर मांपी व्यजनासी सोम रामा जो ॥**
**ती खळसभेंत उघडी पडत्ये न पडोंनि सागरामाजी ! !' ॥ ७८ ॥**

असा तिचा शोक ऐकून भक्तवत्सल श्रीकृष्णः—

**अवतरला उतराया जो दुःसह दुष्प्रभार महिवरला ।**
**अहिवरलास्यपटु प्रभु करुणार्क द्वारकेंत गहिंवरला ॥ ८० ॥**
**शेले, शालू, साड्या, क्षीरोदकें, लांब रुंद पाटावें, ।**
**झाला अनंत वस्त्रें, कीं तीस अनाथसें न वाटावें ! ॥ ८३ ॥**

श्रितलज्जारक्षणार्थ साक्षात्परमात्मा पाठीशी आल्यावर दुःशासनाची काय कथा ? :—

**तो शतशः पट झटझट फेडुनि भागे. सभेंत वेडावे, ।**
**किति खळबळ ! जळनिधिचे कीं दुस्तरतरें तरंग फेडावे ! ॥८९॥**

पांडव वनवासाला निघाले तेव्हां कुंतीनें 'आम्हा हतभाग्येच्या पोटाला म्हणुनि भोगितां ताप' ह्याप्रमाणें आत्मधिक्कार करून घेतला, तेव्हां "कोठेंहि कधींहि चिर स्थिर अनुभविलें न दुःख सत्पुरुषें' ह्या प्रमाणें विदुरानें पांडवांचें सांत्वन करून कुंतीला आपल्या घरीं राहवून घेतलें.

११ वनपर्वांत रामकथा, सावित्रीकथा व नलदमयंतीकथा ह्या चांगल्या वर्णिल्या आहेतच, पण द्रौपदी, भीम व धर्म यांचा जो कडाक्याचा वाद झाला ( अ० २ ) त्यावरच्या पंतांच्या आर्या फारच सरस आहेत. पांडवांची आपदा पाहून व वस्त्रहरणस्मरणानें संतप्त होऊन द्रौपदी धर्मराजावर उसळ-

१ इंद्राच्या बरोबरीची संपत्ति. २ सुदर्शीच्या, द्रौपदीच्या. ३ शोकशब्दास. ४ मानी. ५ अपराधी. आग म्ह. अपराध. ६ पृथ्वीवरचा. ७ अहिवर म्ह. सर्पश्रेष्ठ कालीय. त्याच्या फणांवर लास्य म्ह. नृत्य करणारा. ८ पांढरी पातळें. ९ रेशमी वस्त्रें. १० दुष्ट दुःशासनाचें बळ. ११ समुद्राच्या प्रचंड लाटा फोडणें.

ली व भीमानें तिच्या ह्मणण्यास दुजोरा दिला. 'ही ब्राह्मणाला शोभणारी क्षमा सोडा व क्षत्रोचित तेजास्विता प्रकट करा' हें त्यांचें मागणें होतें. द्रौपदी ह्मणते:—

**'सर्वत्र क्रोध जसा तैसी सर्वत्र न क्षमा साजे'।**
**ते कैसे न वधावे? तोडिति परघातदक्ष मासा जे! ॥ ५० ॥**
**क्रोध असावा समयीं, केवळ वश चित्त न क्षमेला हो!।**
**कोप त्यजितां जरि जमदग्नि धनुर्वेददक्ष मेला हो ' ॥ ५२ ॥**
**भीम ह्मणे त्वां देवा ! जन्मापासोनि सेविला धर्म, ।**
**त्याचें हें फळ ! नाहीं धन, मान, स्थान, यश, नसे शर्म ॥५९॥**
**ज्यासीं जैसें त्यासीं तैसें जरि वर्ततासि तरि अरि ते ।**
**हरिते कां सर्वस्व ? व्यसनीं आह्मांसि मग्न कां करिते ? ॥६०॥**
**देतील राज्य न सुखें, धरिजे कितवोक्तिचा न विश्वास, ।**
**काळाचाहि भरंवसा नाहीं जो नित्य खाय विश्वास ॥ ६६ ॥**

यावर धर्मराज ह्मणाले. 'द्यूताला युद्धाला जावेंचि बलावल्या' ही माझी प्रतिज्ञा मी पाळीत असतां शत्रूंनीं कपटद्यूतानें मला जिंकलें यांत माझा काय अपराध होता बरें'? धर्मानें क्षमा व तितिक्षा यांचें महत्व सांगितलें व कसलीही आपत्ति आली तरी क्रोधवशता पतनावह असल्यामुळें तिच्या स्वाधीन होणें बरें नव्हे हें त्यांना परोपरीनें सांगितलें–पणाप्रमाणें मला बारा वर्षे वनवास भोगलाच पाहिजे, मी सत्यापासून व धर्मापासून रेसभर भ्रष्ट होणार नाही असें त्या शीलवंत महात्म्यानें मोठ्या जोरानें सांगितलें. आपत्तींत मोह न पावतां सत्याला धरून राहणें हें शील धर्मच रक्षूं जाणें!धर्मराज निकरानें ह्मणतात:—

**प्राणांस तुह्मांस हि मीं त्यजिन, न धर्मास पळहि सोडीन ।**
**हें व्रत धर्मचि रक्षूं, बापा न कदापि अयश जोडीन ॥ ८२ ॥**
**बा गा ! धर्माच्या तों कोणी सोडूं नयेचि कांसेतें ।**
**निष्फळ होतीं मेघें त्यजिलीं आलींहि जीविका शेतें! ॥ ८३ ॥**

कोणत्याही प्रसंगीं धर्म, नीति, व सत्य यांची कांस सोडूं नये, हींच आपली आशा पूर्ण करितील, व अंतीं यशस्वी करितील ही धर्मराजाची खात्री होती. आपली बाजू खरी असल्यामुळें भीष्मद्रोणादि महाशयांचा आपल्याला नैतिक पाठिंबा आहे, तो आपण सत्यच्युत झाल्यास नाहींसा होईल असें धर्मास वाटत होतें, द्रौपदी व भीम यांचा राग अनावर झाला

होता व तें साहजीक होतें, पण अशा व्यामोहकाळीं धर्मराजाची बुद्धि निरभ्र राहिली हेंच त्याच्या मोठेपणाचें व पांडवांच्या यशाचें मुख्य कारण होय. सदर प्रसंगीं पुष्कळ वाचकांना द्रौपदी व भीम यांचेंच ह्मणणें अधिक रुचतें. मुक्तेश्वरानें आपल्या भारतांत किंवा भारवीनें किरातार्जुनीयांत खणखणीत व ओजस्वी भाषणें त्यांच्याच तोंडांत घातलीं आहेत. एका अर्वाचीन नाटककारानें तर धर्मराजाला तुच्छतेनें 'मवाळ' ठरवून त्याला उपहासपात्र केलें आहे! भीमद्रौपदीचीं भाषणें त्यांच्या स्वभावाला शोभण्यासारखीं होतीं. त्यांना दोष देतां येत नाहीं, पण धर्मराजाचें भाषण मात्र सत्वधीर वीराला साजण्यासारखेंच आहे. स्वतः धृतराष्ट्र भीमार्जुनांच्या बाहुबळापेक्षां धर्मराजाच्या पुण्यबळाला फार भीत होता व अशा हरएक प्रसंगीं अर्जुन सुद्धां भीमाला 'धर्माचा उपमर्द करूं नकोस, धर्म ह्मणजे आपल्या पक्षाचें यश आहे' असें सांगून त्यास वारंवार आवरीत असे. भारवीच्या शब्दांनीं बोलायचें ह्मणजे 'व्रजन्ति ते मूढधियः पराभवं भवन्ति मयाविषु येन मायिनः' ही लौकिक नीति द्रौपदीभीमांनीं प्रतिपादिली आहे, तर 'न तितिक्षासममस्ति साधनम्' असें धीरोदात्त धर्मराजाचें सांगणें आहे. मराठी राज्यांतले साडेतीन शहाणे द्रौपदीभीमांचे अनुयायी आहेत व अहल्याबाईही धर्मराजाच्या वळणावर गेली आहे! पंतांनीं आपल्या भारतांत आपला ओढा धर्माच्या नीतीकडे ज्यास्त आहे असें या प्रसंगीं व अन्यत्र दाखविलें आहे! असो. सदर प्रसंग महाभारत वाचतांना अत्यंत विचार करण्यासारखा आहे. 'धर्मन्याय त्यजितां तेजस्वीही तमीं न रविहि टिके!' असा धर्मराजाचा दृढविश्वास असल्यामुळें त्याचें सांगणें आहे कीं:—

**निजहितकर धर्माचें कुशलें विटवूं नयेचि मन कांहीं ।**
**यापरि पोषण-पालन-लालन करिजे न अन्य जनकांहीं ॥ ८४ ॥**

नलोपाख्यानावर पंतांनीं तीनशेंवर आर्या ( वन० ४ ) केल्या आहेत. मराठी वाचकांना रघुनाथपंडिताचें नलोपाख्यान अत्यंत प्रिय झालें आहे, व तें फारच बहारीचें आहे. तसें वर्णन मराठींत अन्यत्र कोठेंही नाहीं. नळाची भेट घेऊन हंस परत येऊन दमयंतीला सांगतो:—

**नररत्न तोचि, तूंचि स्त्रीरत्न, उदंड आडनांवांचीं ।**
**न बुडविति न वा तारिति चित्रें बरवींहि आड-नावांचीं ॥ ३४ ॥**

नळाचें वस्त्र पक्ष्यांनीं उडवून नेलें तेव्हां:—

**वनदेवता न पाहों शकती लज्जानता नलस्याला ।**
**करिति न रोमन्थाला हरिण, मयूरही तदा न लास्याला ॥ १०८ ॥**

द्रौपदीचें सत्व पाहण्यास दुर्वास आले तेव्हां तिच्या थालीवरचें भाजीचें पान खाऊन ढेंकर देणाऱ्या श्रीकृष्णानें तिचें सत्व रक्षिलें त्या प्रसंगाचें ( वन० ८ ) पंतांचें वर्णन फार प्रेमळ आहे. पुढील मनोहर आर्या पहा:—

**त्या पात्राच्या कंठीं स्वल्पचि शाकान्न लागलें होतें ।**
**सत्परिचर्येंचि जडही समयीं सत्वासि जागलें हो तें ! ॥ ३८ ॥**

पांडव मृगयेस गेले असतां इकडे धृतराष्ट्राचा जांवई जयद्रथ ह्या दुष्टानें द्रौपदीस रथांत घालवून पळविलें. हें पांडवांस कळतांच भीमार्जुनांनीं त्याचे पांच पाट काढून त्याला पकडून आणलें पण धर्माच्या आज्ञेवरून ( वन० ९ ) त्यास सोडून देण्यांत आलें. ह्या कथेंत पंतांनीं स्वभाववर्णन मजेचें केलें आहे. धृतराष्ट्राचा जांवई ह्मणजे आपला मेहुणाच या उदार भावानें धर्मानें त्याला सोडून द्यावयास सांगितलें, तथापि ' मारावेंचि नयज्ञें श्रीतें स्त्रीतें बळेंचि हरित्यातें!' असें द्रौपदी भीमाला सांगून चेववीत होतीच. भीमानेंही आपलें बाहुकंडुशमन करून घेण्यास कमी केलें नाहीं. ' बुकली भीम, बुकलिती जैसें यज्ञांत बोकडाला हो ! ' जयद्रथ सुटला खरा, पण दुखवलेल्या सर्पाप्रमाणें पांडवपराभव आपल्या हातून कसा होईल हें चिंतीत तो गेला, हें पाहून पंत ह्मणतात:—

**खल न खलत्व त्यागी, जरि सामें गौरवूनि बोळविला ।**
**लकुच कटुचि, अमृतकरांकरवींही शर्करेंत घोळविला ॥ ६८ ॥**

पुढील तीन अध्यायांत पंतांनीं रामचरित्र गायिलें आहे. पण ह्या पुस्तकांत त्याबद्दल पुष्कळ चर्चा होणार असल्यामुळें येथें विशेष लिहिणें नको. मंत्ररामायणाप्रमाणें यांत ही राम सीतेबद्दल शोक करीत आहेत. त्याप्रसंगीं पुढील सुंदर आर्या आली आहे:—

**बहु लाजवीत होतों करिकेसरिकीरकेकिहरिणा मीं ।**
**हांसत कर्म करावें भोगावें रडत तेंचि परिणामीं ! ॥ ११-८० ॥**

ह्या रामायणांत सेतूवर पंतांनीं स्वप्रतिभेनें ज्या अति बहारीच्या उत्प्रेक्षा केल्या आहेत ( वन० १२ ) त्या वाचकांनीं जरूर पहाव्यात. सीताछळा-

१ हत्ती, सिंह, पोपट, मोर व हरिण ह्यांना अनुक्रमें मंदगमन, कृशकटि, बांकदार नाक, केशपाश, व चंचल आणि पाणिदार डोळे ह्या तुझ्या गुणाबद्दल मी हिणवीत असें.

मुळें क्षुब्ध झालेल्या भूमीचा लंकेला पाण्यांत बुडविण्याकरितां दूर केलेला बाहू, वानरसेनासमुद्रांतून राक्षसरूप बेडकांना खाण्याकरितां बाहेर पडलेला काळसर्प, लंकाटवी जाळूं पाहणारा रामप्रतापाग्निपथ, इत्यादि उत्प्रेक्षा पंतांनीं सेतूवर केल्या आहेत त्या विशाळ व उदात्त आहेत. पुढील मनोरम उत्प्रेक्षा स्त्रीस्वभावानुरूपच आहेः—

**सेतु न तो यत्पतिनें स्वसुता नेली वृकें जशी एणी ।**
**त्या लंकेची श्रीभूदेवीनें ओढिली असे वेणी ! ॥ ११ ॥**

सीता भूदेवीची कन्या. तिला लंकेच्या पतीनें हरण केलें. त्यावर सूड उगवायची बुद्धि भूदेवीला सहजच झाली. पण स्त्रीनें परपुरुषावर सूड कसा उगवावा? म्हणून तिला लंकेची वेणी ओढणें प्राप्त झालें! ह्या आर्येत स्वभावोक्ति, उपमा, उत्प्रेक्षा, अपन्हुति हे अलंकार आहेत. तेराव्या अध्यायांत सावित्रीआख्यान आहे तेंही ठीक आहे.

१२ विराटपर्वांत कीचकवध व उत्तरगोग्रहण हे दोनच प्रसंग ठळक आहेत व ह्यावरील पंतांच्या आर्या सुंदर आहेत. कीचक द्रौपदीच्या अंगाला झोंबूं लागतांच 'झिडकारिला सतीनें सिंहीनें दुष्टबुद्धि जंबुकसा.' शुद्धचित्त व पावनचरित सतीच्या अंगीं विलक्षण सामर्थ्य असतें, व बलाढ्य दुष्टाचें बळही त्यापुढें लटपटतेंः—

**कर आसुडितांचि पडे धडधड वात्यासवें जसा विटपी ।**
**कैचें बल तेज तशा दुर्वृत्तीं जो सुरारसा विट पी? ॥ १—६५ ॥**

कीचकापासून आपणास एकटा भीम सोडवील हें द्रौपदीस माहीत होतें, व भुजबळ आणि वृत्तिसाधर्म्य यामुळें तिचें भीमावर ज्यास्त प्रेमही होतें; या कारणांस्तव तिनें भीमाची एकांतांत गांठ घेउन 'निजला काय मृतापरि व्हा जागे, सिंहसे उठा, राहो' याप्रमाणें त्याला खवळाविलें. द्रौपदी भीमास म्हणालीः—

**हे स्त्री नव्हे प्रतिष्ठा तुमची, जरि ईस सोडितां पाणी ।**
**'धर्मेंचार्थेंच' असें वदला कां प्रथम जोडितां पाणी ? ॥ १०३ ॥**

भीमानें द्रौपदीचें सांत्वन केलें व नृत्यशाळेंत संकेतस्थानीं द्रौपदी म्हणून तो जाऊन निजला. कीचक रात्रीं नटून उल्हासानें आला व अंधार पाहून डौलानें भीमाला द्रौपदी समजून म्हणाला, 'असता दीप तरि सुमुखि ! मानुनि मज मूर्त मदन रमतीस !' यावर

**हळुच ह्मणे भीम, ' तुह्मीं सुमहागुणनदनदीप ! काशाला ।**
**दीप ? प्रकाशली कीं पाहुनियां वदनदीपका शाला ! ' ॥ १३१ ॥**

भीमानें लवकरच स्वस्वरूप प्रकट केलें व कीचकाला यथेच्छ बुकलून नरकग्रामाच्या वेशीकडे हांकून दिलें ! जयद्रथ व कीचक यांच्यापासून द्रौपदीला त्रास झाला. ह्या दोन्ही कथा सांगितल्यावर ' मेले दशाननादिक, तरि वश होतात नीच कामातें!' याचें पंतांना आश्चर्य वाटलें. उत्तर आणि बृहन्नडा ( अर्जुन ) यांची कथा सर्वश्रुतच आहे. अर्जुनाला सारथ्य देऊन गोहरण करणाऱ्या कौरवांबरोबर युद्ध करण्यास उत्तर निघाला खरा, पण

**कुरकटकासि पहातां तो उत्तर बाळ फार गडबडला ।**
**स्वपरबळाबळ नेणुनि बालिश बहु बायकांत बडबडला ॥३-३९॥**

अर्जुनानें महत्प्रयासानें उत्तराला थोपवून धरिलें व कौरवांसह एकाकी युद्ध आरंभिलें. गाई घेऊन जाणाऱ्या दुर्योधनाला रणांत गांठून अर्जुनानें गाई सोडविल्या. त्या प्रसंगींच्या पुढील दोन बहारीच्या आर्या पहाः—

**खळबळजळनिधिमग्ना धेनु उसळल्या, अलाबु जाल्या हो ।**
**हांसुनि विजय मनिं ह्मणे, ' कां गोपसख्या मला बुजाल्या हो! ' ॥**
**गेल्या पळोनि गाई, पृष्ठावरि पुच्छभार वाहोनी ।**
**राहोनि निश्चल क्षण विजय निवे त्यांकडेचि पाहोनी ! ॥४-८९॥**

१३ उद्योगपर्वांत भारतीयुद्धाला प्रारंभ होण्यापूर्वींच्या मसलती आल्या आहेत. पंतांच्या एका मित्रानें ह्मटल्याप्रमाणें ' सर्वां पर्वांत पर्व उद्योग ' कांहीं बाबतींत अधिक सरस आहे. युद्धावांचून सुईच्या अग्राइतकाही भूभाग मी पांडवांस देणार नाहीं असें दुर्योधनानें जाहीर केल्यावर उभयपक्षीं युद्धाची तयारी होऊं लागली. अर्जुन व दुर्योधन साह्य मागण्यास कृष्णाकडे द्वारकेस गेले. कृष्ण ह्मणाले ' दहा कोट यादव एकानें घ्यावे व युद्धांत शस्त्र न धरणाऱ्या मला एकानें घ्यावें. ' यावरः—

**पार्थ ह्मणे, ' गोविंदा! न्यस्तायुध तूंचि पाहिजेस मज ' ।**
**मागे सैन्य सुयोधन, वरहि वरायासि पाहिजे समज ! ॥ १-४१ ॥**
**बहु मेळवूनि बल्लव अज्ञ पळत जाय कृष्ण सोडून ।**
**अधन शिशु जसा टाकुनि चिंतामणि बहु कपर्द जोडून ! ॥१-४९॥**

ह्याप्रमाणें योगेश्वर कृष्ण व धनुर्धर पार्थ जेव्हां एक झाले तेव्हांच भीष्मद्रोणादिकांनीं ह्या महायुद्धाचा शेवट काय होणार याचा कयास केला. धृतराष्ट्राला श्रीकृष्णविदुरादिकांनीं पुष्कळ बोध केला पण ' रमतें मन उपदेशीं,

पुत्रस्नेहासवें पुन्हां भ्रमतें' ह्याप्रमाणें त्याची द्विधा होत असे. राज्य-श्रीमदिरेचें पान करून दुर्योधन उन्मत्त झाला होता, पांडवांना छळण्यांत त्याला पुरुषार्थ वाटूं लागला होता. 'जे प्रभु नरनारायण ते अर्जुन वासुदेव अवतरले' ( ४-२५ ) असें त्यास भीष्मानें सांगितलें, 'धर्माला उचित पद द्या' असें द्रोणानें सांगितलें, 'धर्मन्यायविरोधें कोणाचेंही न इष्ट साधेल' हा श्रीकृष्णाचा निरोप त्यास संजयानें सांगितला, 'न करी दुराग्रह अरे वत्सा! हो सावधान रे शम रे' असें धृतराष्ट्रानेंही सांगितलें, पण पालथ्या घागरीवर पाणी घातल्याप्रमाणें हे सर्व उपदेश फुकट गेले! शकुनिकर्णांचा सल्ला दुर्योधनास अधिक रुचला. धर्मराज पुण्यप्रतापी आहे, त्याच्याशीं वैर करून कोणी यशस्वी होणार नाहीं, असें त्यास भीष्मानें व धृतराष्ट्रानें बजावलें. 'मेरुहि खचेल राया श्रीधर्माच्या उठोन कोपानें' [ ४-२९ ] असें भीष्म ह्मणाले. 'उलतिल युधिष्ठिराच्या उष्णकटाहें कडे हिमाद्रीचे' [ ३-२८ ] असें धृतराष्ट्रही ह्मणाला. कर्णानें भीष्माची निंदा केली, धर्म पांचाळिकांच्या जोरावर उड्या मारतो ह्मणून त्याचाही त्यानें उपहास केला.

**निजबाहुबळें तरला मारुति कीं अब्धिला अलाबुबळें ? ।**
**होय भला इष्टार्थग्रह उपनेत्रेंचि कीं भला बुबळें ? ॥ ३-१३ ॥**

दुर्योधनाला श्रीकृष्णानें समक्ष येऊन पुष्कळ बोध केला, पण त्यालाही 'खळ न वळेल झिजविला—जरि करितां बोध—काय सामास' हाच अनुभव आला. गांधारीनेंही सांगितलें ( अ.९ )कीं:—

**राज्यार्ध पांडवा दे, तूं घे राज्यार्ध, बहु तुला बा हें ।**
**साम करीं, यश रुसलें मुरडुनि तुज पाहतें मुला! बाहें ॥ ७१ ॥**
**कामें कोपें लोभें नागविले अमित यांस जे भुलले ।**
**यांच्या कुदृष्टिपातें तेजस्वी पुरुषहीरही उलले ॥ ७२ ॥**

कुळासाठीं एका दुर्योधनाचा त्याग कर असें कृष्णविदुरानींही धृतराष्ट्राला सांगितलें पण त्या अंधाला पुत्रमोह सुटला नाहीं. पंतांनींच एके ठिकाणीं ह्मटलें आहे:—

**भावि प्रबळ भ्रमतो सर्वहि बालिश असो असो सुकवी ।**
**होणार सत्पथींही दिवशींही डोळसासिही चुकवी ! ! ॥ १ ॥**

काळगति प्रबळ आहे हें भारती कथेंत वारंवार सांगितलें आहे. पंत-भारतांत दैववादाच्या खरेपणाबद्दल जागोजाग पुष्कळ विचारार्ह सिद्धांत सांगितले आहेत. मौसलपर्वांत ( अ. १-८३ ) पंत ह्मणतात:—

**अनुकूळ काळ होतो तेव्हां बळ बुद्धि तेज यश देतो,**
**प्रतिकूळ तोचि होऊनि माघारें दत्त सर्वहि घेतो !।**

काळ ह्मणा, दैव ह्मणा, प्रभुसत्ता ह्मणा, कीं परमेश्वरी नेमानेम ह्मणा, पण अशी कांहीं अमानवी शक्ती विश्वांत आहे कीं जी आपल्या इच्छेप्रमाणें लहान थोर सर्व व्यक्तींना व राष्ट्रांना खेळवीत असते. ही गोष्ट भारतवाचनानें जशी मनावर बिंबते तशी कोणत्याही अन्यग्रंथवाचनानें मनांत बिंबणार नाहीं. पांडवपत्नीची व कृष्णसखीची काय बिटंबना व्हावी ? पांडवांना काय वनवास भोगणें कपाळीं यावें ? अर्जुनानें ब्रहन्नडा बनावें, भीमानें वरणभात घाटाया लागावें; पुण्यपुंज धर्माला महदुःख भोगणें प्राप्त व्हावें, भीष्मद्रोण विदुरासारख्या महाज्ञानी पुरुषांच्या बोधाचा दुर्योधनावर कांहीं परिणाम न होतां एकट्या कर्णाची मोहनी त्याला पडावी व असंख्य वीर काळानळांत भस्म व्हावें हें आहे काय? ही सारी प्रभुलीला आहे असें ह्मणून 'आला भागासी तो करी वेवसाय । परी राहो भाव तुझ्या पायीं ' या तुकोक्तीप्रमाणें वागण्याखेरीज मनुष्याच्या हातीं कांहीं रहात आहे काय? काळाचा अप्रतिहत वाहणारा प्रवाह पाहून ज्ञानी पुरुष निश्चय करितो ( अ० ५-१०२ ) कीं:-

**रक्षील धर्म समयीं, धरिती त्याचाचि भरंवसा सुकवी,।**
**आर्जविला असतां तो स्वजनव्यसनासि निश्चयें चुकवी॥सभा.**

असो. सामानें कार्य होत नाहीं असें पाहून रक्तस्राव टाळण्याची मनःपूर्वक खटपट करणाऱ्या श्रीकृष्णानें कौरवपक्षांत भेद करण्याचा प्रयत्न केला. दुर्योधनाला मुख्य बळ होतें कर्णाचें. तेव्हां त्याला जर फोडतां आलें तर पहावें ह्मणून श्रीकृष्ण कर्णाकडे गेले. कर्णानें कृष्णास जें उत्तर दिलें त्यावरून त्या महावीराच्या मानीपणाची व कृतज्ञतेची चांगलीच कल्पना होते. ( अ ० १० ) तूं खरोखर कुंतीचा ज्येष्ठ पुत्र आहेस, पांडवांकडे आलास ह्मणजे तुला त्यांचा राजा करूं, पांच पांडव तुझ्या आज्ञेंत राहतील, असें कृष्णानें सांगितल्यावर कर्ण ह्मणाला कीं 'तूं ह्मणतोस तें खरें, पण राधेनें माझे बाळपगापासून संस्कार करून मला लहानाचा थोर केलें व दुर्योधन माझ्याशीं अकृत्रिम स्नेहानें वागत आहे त्यांचा विश्वासघात मीं कसा करूं ?:-

**दुर्योधन नांवाचा, राजा मी, सर्व राज्यभोग मला ! ।**
**मूर्त नरक नर कविच्या हृदयाला जो कृतघ्न तो गमला ॥ ८३ ॥**
**संस्कार विवाहावधि केले माझे यथोक्त सूतानें ।**
**निर्मळपणें निघावें रक्तपटांतूनि कोविं सूतानें ? ॥ ८४ ॥**

कृष्णाची योग्यता कर्ण आळखून होता व त्याचा पाठिंबा पांडवांस असल्या-मुळें कौरवनाश निश्चित आहे हेंही त्यास माहीत होतें, तथापि एकदां धरलेला पक्ष व अंगिकारलेलें व्रत सोडायचें नाही असा त्यानें निश्चय केला. आपला प्रयत्न निष्फळ झाला असें पाहून कृष्णानें कुंतीला त्याच्या भेटीस पाठविलें. तिनें त्याला तूं माझा कानीन पुत्र ( कुमारावस्थेंत झालेला ) आहेस हें सांगितलें व ह्मणाली:--

मुग्धत्वें त्यजुनि तुला चुकल्यें, मातां स्वबंधु रक्षावे. ।
साधो! धर्मजें त्वां मनुज स्वतनुजसमान लक्षावे ॥ १२ ॥

कर्णानें कुंतीला दोष लाविला व 'जन नीच मज न ह्मणेल, मजला कां नख न लाविलें जननी!' असें उद्वेगपूर्वक ह्मणाला. 'अर्जुनवधप्रतिज्ञा केली ती कसि दहांत मोडावी!' असें सांगून "स्वस्थ रहा, पांच तंस सुत मार्जुन कीं सकर्ण उरतील" असा आपला कृतनिश्चय कळवून कर्णानें कुंतीस परत लावून दिलें.

१४ कुंतीनें श्रीकृष्णाबरोबर पांडवांस विदुलेची गोष्ट सांगून पाठविली व 'कृष्णा! मन्मत हें कीं यश रक्षावें, न आग लोकांहीं' हा निरोप सांगितला. विदुलेची गोष्ट पंतांनीं उत्कृष्ट वर्णिली आहे. ( अ० ९० ) विदुला ही वीर-पत्नी होती. तिचा पुत्र लढाईंतून पळून आला तेव्हां तिनें त्याचा कठोर शब्दांनीं धिक्कार केला:—

विदुला ह्मणे 'अहा रे ! क्लीबा ! मंदा ! कसा पळालास ?
कां वांचलासि? अयशस्कर ऐसा कां न तूं गळालास ? ॥ २५ ॥
मघोवन, संजय हें निजनामहि, बुडविलें तुवां वगडे ।
झगड यशोर्थ, अरिरथचक्रांहीं स्पष्ट लोहला रगडे ' ॥ २७ ॥

विदुला चवताळली व 'मरण विहित, न पलायन, भीती धर्मज्ञ राजकन्या या!' असें ह्मणाली, तेव्हां 'पुत्राच्या इच्छितांस कां मरणा ! रडसील सस्नुषा मी मरतां' असें संजयानें विषादपूर्वक विचारिलें. अपकीर्ति करणारें पोर अस-ण्यापेक्षां निसंतान काय वाईट!' असा तिनें संतप्त होऊन उद्गार काढला. यामुळें चेव येऊन संजय लढाईस गेला व शत्रूस पादाक्रांत करून विजयी होऊन परत आला. मोरोपंत आपला भारतग्रंथ बारामतीस बसून लिहीत होते तेव्हां सारा महाराष्ट्र वीरपुरुषांच्या पराक्रमकथांनीं दणदणून गेला होता. पानपतचा घनघोर संग्राम भारतीयुद्धासारखाच लोकोत्तर होऊन गेला. पेशवे

होळकर, शिंदे, विंचूरकर, पटवर्धन इत्यादि घराण्यांत एकामागून एक वीर निर्माण होत होते. भारतीयुद्ध होत असतांना व्यास विदुलेची कथा कुंतीच्या तोंडांत घालीत होते, इकडे महाराष्ट्रांतही पानपतच्या युद्धप्रसंगाच्या सुमारास तीच विदुलेची कथा पंत मराठभाषेंत गात होते! विद्यमान स्त्रीपुरुषांचीं चरित्रें गावयाची पंतांना बुद्धि झाली असती तर मराठ्यांच्या गोटांतच त्यांना कुंती आणि विदुला प्रत्यक्ष आढळल्या असत्या!! इ० स० १७६०मध्यें अहमदशहा अबदाली दुराणी याच्या फौजेशीं तरुण शिंदेवीरांनीं जो सामना केला त्याची हकीकत मराठ्यांच्या बखरींतून दिलेली आहेच. या सामन्यांत बयाजी शिंदे ठार झाला, दत्ताजीचा शिरच्छेद झाला व जनकोजी घायाळ होऊन परत आला. दत्ताजीची अवस्था जनकोजीस ठाऊक नव्हती. ह्मणून आपल्या डेऱ्यांत आल्यावर अंमळ शुद्धीवर येतांच जनकोजीनें 'काका' कोठें आहेत? ह्मणून रडून प्रश्न केला. बायकांस दत्ताजीची हकीगत कळली नव्हती व ती जनकोजीकडून कळेल अशी त्यांस आशा होती. पण जनकोजीचा वरील प्रश्न ऐकून भागीरथीबाईस पुरतें समजलें कीं पाटील पडले. "तथापि दुःखाचा उभडा आला तो विषासारखा घोंटून जनकोजी शिंदे यास तिणें जाबसाल केला कीं, 'बाबा! तूं रांडेसारखा रडतोस! जयाजी शिंदे यांचे पोटीं चौघी लेकी जाहल्या तैशीच तूं एक आणखी जाली असतीस तरी आणिक एक जांवई येता! पाटील काय घेऊन गेले ? दुनिया,दौलत, महाल,मुलूख,खाजिना हत्ती, घोडे, सर्व तुह्मांपाशीं ठेवून गेले. तुह्मीं हिंमत धरून त्याचें सार्थक करावें. आतां रडून होणें काय ?' ह्मणोन हिंमत देऊन बोलतांच जनकोजी शिंदे उगेच राहिले." शिंद्यांच्या डेऱ्यांत ही भागीरथीबाई जशी वीरपत्नी ह्मणून निवडून आली, त्याप्रमाणें होळकरांच्या डेऱ्यांत खुद्द मल्हारराव होळकरांची स्त्री गौतमाबाईही महातेजस्वी ह्मणून प्रकटली. शिंद्यांची दुःखदायक बातमी ऐकतांच मल्हारराव परतले व "डेरियांत जाऊन शोक करिते झाले! ते समयीं त्यांची स्त्री गौतमाबाई इणें त्यांचा निषेध केला कीं, 'सुभेदार! तुमचें वृद्धपण जालें. शिंदे यांचीं मुलें ह्मणजे काय ? त्यांचें तोंडचें जार वाळलें नाहीं! त्यांनीं एवढा पराक्रम करून मारतां मारतां मेले. एरवीं हा मृत्युलोकच आहे. जाला प्राणी वांचत नाहीं. परंतु इहलोकीं कीर्त करून परलोक साधन करणें हेंच दुर्लभ. हें मूल जनकोजी शिंदे, याणें एवढा पराक्रम केला. तुमचे दिवस समीप आले. तरी हिंमत धरून मारतां मारतां

मरावें. हा प्रलाप स्त्रीजातीनें करावा ! असें पुरुषास बोलिलें नाहीं, ' ह्मणोन बोलतांच वृद्धास विषाद येऊन गौतमाबाईस बोलिले कीं, ' तुझे चित्तांत आह्मीं मरावें असें आहे' यावर गौतमीबाईनीं उत्तर केलें कीं, ' सुवासिणी असतां वैधव्याची आस्था धरील अशी कोण चांडाळीण असेल ? अहेवपणें ( अविधवापणें ) हळदकुंकुममंडित मरावें. परंतु जैसें पूर्व आचरण असेल तैसें घडेल. आपले पदरीं लौकिक भारी. तुह्मीं आपलें घोंगडी विणावयाचें स्वकर्म करीत असतां तरी सहजच वाचावयाची आस्था धरावी. वाण सतीचें घेतलें तैसे सांभाळावें, तैसेंच धर्मशास्त्र आहे. ' बाईचें वचन ऐकून तैसेच रागास येऊन घोडियावर स्वार झाले. या स्वारींत मल्हारराव अपजय खाऊन आले. " वरील दोन्ही उतारे ' भाऊसाहेबांची बखर ' ह्या पुस्तकांतून घेतले आहेत. ही बखर पानपतची लढाई झाल्यानंतर लवकरच स्व० थोरले माधवराव पेशवे यांच्या कारकीर्दींत लिहिली असून तिची अस्सल प्रत मला राजापूर येथेंच मिळाली आहे. वरील कथेंत विदुला इची उपमा गौतमाबाईस पूर्णत्वें साजते किंबहुना विदुलेहून गौतमाबाईची योग्यता मलाअधिक वाटते. विदुलेनें आपल्या मुलाचे तरी कान उपटले, पण गौतमाबाईनें आपल्या पतीची त्याच्या तोंडावर हेळना करण्यांस कमी केलें नाहीं ! वीरश्रीच्या काळांत स्त्रियांतही वीरश्री कशी आढळून येते तें यावरून समजतें. विदुलेचे उद्गार व गौतमाबाईच्या तोंडचे शब्द यांची तुलना करून पाहण्यासारखी आहे.

१५ पंतांना भक्तिरसाच्या बरोबरीनें वीररसाची भट्टी साधते असें मागें एकदां मीं ह्मटलें होतें. ह्या गोष्टीचें प्रत्यंतर कोणास पाहावयाचें असेल तर त्यानें पंतभारतांतील भीष्मपर्व, द्रोणपर्व व कर्णपर्व हीं पर्वें जरूर वाचावींत. मागें मंत्ररामायणाची चर्चा करितांना त्यांतून वीररसाचीं कांहीं उत्कृष्ट उदाहरणें दाखविलीं होतीं. पंतांनीं भारतांतही वीररस मूर्तिमंत ओतला आहे. मंत्ररामायणांत वीररसवर्णनाला कठोरव्यंजनांची व रूपकदृष्टांतादि कांहीं ठळक अलंकारांची तरी पंतांना मदत घ्यावी लागली, पण महाभारतांत कोणत्याही आगंतुक साधनांचा उपयोग केल्याशिवाय नेहमींसारख्या सहज होणाऱ्या आर्यांत त्यांना वीररस मूर्तिमंत उभा करितां आला आहे ! रणरसाची गोडी चाखीत व चाखवीत असतांना पंत इतर सर्व रसांना पार विसरतात. ' अत्यद्भुत रणरस हा नसता तरि रासिक सर्व कां भुलता ? ' ह्मणजे भक्तिरसादि रसपान करणारे सुद्धां ह्या रणरसाला भुलतात ! ' वीररसा बहु भुलले

सेवित होते तदन्य सुरसा जे ' ( भीष्म. ९ ) किंवा ' ज्याच्या वीररसाहुनि रसिकांसि गमे रसांतर क्षुद्र ' ( हरिवंश. ४८ ) असे उद्गार त्यांच्या ग्रंथांत जागोजाग सांपडतात. ' वीररसांचीं श्रवणें थोडीं, नेत्रें उदंड चव कळती ' ( द्रोण. १२ ). पंतांच्या भारतरचनाकालीं कुरुक्षेत्र युद्धभूमि होऊन पानपतावर यवन-हिंदूंचा घनघोर संग्राम चालला होता. पंतांनीं जन्मांत एखादी तरी लढाई डोळ्यांनीं पाहिली असेल असें वाटत नाहीं! तथापि महाराष्ट्रवीरांना ज्या दैवी प्रेरणेनें तेव्हां समरभूमीवर लढायला लावलें होतें, तीच प्रेरणा महाराष्ट्राच्या बुद्धींत आविष्करून वीररसाचीं शब्दचित्रें निर्माण करीत होती! वीर, मुत्सद्दी व कवि हे एकाच वेळीं परमेश्वर उत्पन्न करीत असतो. **वीर हे राष्ट्राचे बाहु होत, मुत्सद्दी हे डोकें होत व कवि हे हृदय होत!** परमेश्वरी प्रेरणा सर्व देहाला एकदमच होत असते. बाहूला स्फुरण चढतांना डोकें थंड रहात नाहीं, व डोकें काम करीत असतांना हृदयांत जडत्व असत नाहीं! राष्ट्रपुरुष जेव्हां जागा होतो, तेव्हां त्याच्या सर्वावयवांत चैतन्य उत्पन्न होतें, व जेव्हां तो निजतो तेव्हां त्याचे सर्व अवयव थंड पडतात. शिवाजीमहाराजांच्या वेळीं वीर, मुत्सद्दी व कवी यांचा महाराष्ट्रावर एकदम पाऊस पडला. व गेल्या शतकांत तिघांचाही ठणठणाट झाला होता! सांगावयाचें तात्पर्य एवढेंच कीं पंतांनीं स्वतः जरी लढाई पाहिली नसली, तरी त्यांच्या वाणीला राष्ट्रपुरुषाच्या पराक्रमाचें दिव्य स्फुरण चढलें होतें. लेखक, वक्ते, उपदेशक, इत्यादिकांच्या वाणींत राष्ट्राच्या कर्तबगारीचें प्रतिबिंब पडलेलें असतें. कवींची वाणी ही राष्ट्राचे अंतर्गत विचार सांगणारी नाडी होय! पंतांच्या भारतांत त्यांच्या वीररसप्रधान कालांत कृतीनें प्रकट होणाऱ्या वीररसाचा उत्कर्ष झालेला दृष्टीस पडतो.

१६ महाभारतांतलीं प्रमुख पात्रें माझ्या मतें तीन आहेत; एक श्रीकृष्ण दुसरें भीष्माचार्य व तिसरें धर्मराज. भीष्म, कृष्ण व धर्म ह्मणजे करारीपणा युक्ति आणि पुण्याई यांच्या केवळ मूर्ति होत. श्रीकृष्णाबद्दल ह्या ग्रंथांत जागोजाग पुष्कळ लिहिलेंच आहे. श्रीकृष्ण ह्मणजे भारतीयुद्धांतले मुख्य सूत्रधार होत. पांडवांचा सत्पक्ष होता ह्मणून त्यांचा अखेर विजय व्हावा ह्यासाटीं श्रीकृष्णानें अनेक उपाय योजले, व भरतखंडांतील सर्व दुष्टांचा संहार करून शेवटीं धर्मराज्य स्थापित केलें. श्रीकृष्णाचें पांडवांवर अत्यंत प्रेम असून त्यांतही अर्जुन व द्रौपदी यांच्यावर विशेष प्रेम होतें. द्रौपदीवस्त्रहरण व दु-

वासगर्वखंडन हे प्रसंग कृष्णाचें द्रौपदीवर किती प्रेम होतें याची साक्ष देतात, व भीष्मप्रतिज्ञेचा प्रसंग कृष्णाची पार्थभक्ति व्यक्त करितो. भीष्मानें पार्थावर बाणांचा वर्षाव केला तेव्हां:—

**जो मातृस्नेहाचा चित्तीं स्नेहें निजें विसर घाली ।**
**तो भीष्मावरि कोपें-लुमधुहराउपरि जेविं सरघाली ॥ भीष्म०४-३९**

आपलें मधेचें पोवळें हरण करणाऱ्यावर मधमाशा जशा संतापतात त्याप्रमाणें श्रीकृष्ण पांडवांच्या शत्रूंवर संतापत असत! श्रीकृष्ण ह्मणजे पांडवांचें कवच होय! श्रीकृष्ण आपल्या भक्तांचा माउली होय. "भक्तां राखे पायापाशीं। दुर्जनांशीं संहारी;" हाच त्याचा अनेक युगांचा धंदा आहे! असो. पांडवांवर श्रीकृष्णाचें अत्यंत प्रेम होतें; व्यास धौम्यप्रभृति ऋषि, मुनि, तपस्वी व ब्राह्मण त्यांचें शुभ चिंतीत; भीष्मद्रोणादि महावीरांच्या पोटांतही पांडवांचें कल्याणच होतें व धृतराष्ट्रही भीमाच्या गदेपेक्षां व पार्थाच्या गांडीवापेक्षां युधिष्ठिराच्याच कोपाला जास्त भीत असे. या सर्वांचें मुख्य कारण पांडवांच्या बाजूला अजातशत्रु, विमलबुद्धि व पुण्यपुंज असा धर्म होता हेंच होय! धर्म ही पांडवपक्षांतील पुण्याई व पांडवांची नैतिक शक्ति होय. धर्मराजाची योग्यता जाणून श्रीकृष्णही त्यास फार पूज्य मानीत. राजसूययज्ञप्रसंगीं साम्राटपद श्रीकृष्णांनीं सर्वमतानें धर्मराजासच दिलें. एकदां द्रौपदी व दोनदा भीम हे आपत्तीनें त्रस्त झाल्यामुळें धर्मराजाशीं त्रासिकपणानें वागले खरे, पण धर्माज्ञा मोडण्यास कोणीही तयार झाला नाहीं. भीमार्जुनांनीं धर्माज्ञापरिपालन करण्यासाठीं हव्या त्या मानखंडणा व हालअपेष्टा सोसल्या. धर्म सद्धर्माची केवळ मूर्ति होती. 'प्राणांस तुह्मांसहि मी त्यजिन, न धर्मासि पळहि सोडीन.' (वन० २-८२) असा त्यानें भीमास खडखडीत जबाब दिला होता. भीष्मप्राणावसरीं सर्व प्रकारचे आपद्धर्म भीष्मास पुसावयाची सर्वांचीच इच्छा होती, पण पुढें कोणी होईना, तेव्हां श्रीकृष्णांनीं धर्मराजासच पुढें केलें. धर्मराज ह्मणजे पांडवांचा किंबहुना सत्पक्षाचा मूर्तिमंत धर्मच होत असें श्रीकृष्णांनीं कर्णास 'धर्म' शब्दावर श्लेष करून स्पष्ट सांगितलें:—

**रक्षावा धर्म असा करिसी उपदेश तरि असे मान्य, ।**
**रक्षितसों धर्मातें, आह्मांला धर्म ठाउका नान्य! ॥ कर्ण ०४९-१६ ॥**

श्रीकृष्ण आणि धर्म ह्यांपेक्षांहि भारतकथेंत भीष्माचार्यांचें महत्व अधि-

क आहे. भीष्माचार्यांचा दृढनिश्चय, करारीपणा, शौर्य, अविप्लुत ब्रह्मचर्य, राजनीतिनैपुण्य व श्रीकृष्णभक्ति हे गुण महाभारतांत पहावयास सांपडतात. पंतभारताच्या आदर्शांतच हा महापुरुष कसा दिसतो तें पाहूं. गंगा आणि शांतनु यांच्या पोटीं भीष्म जन्मले ह्मणून त्यांस गांगेय आणि शांतनव असेंही ह्मटलें आहे. भीष्माची जन्मकथाच ( आदि० १३ ) रम्य आहे. हा गुरु-शुक्र ह्मणजे देवदानव यांच्या नीतिशास्त्रांत कुशळ व भटपति ह्मणजे प्रचंड योद्धा होईल असें गंगेनेंच याचें जातक वर्तविलें होतें. गंगा ह्मणाली:—

**शास्त्रनिपुण, धर्मात्मा, पितृभक्त, ब्रह्मचर्यपर, महित, ।**
**होइल लोकीं जोडुनि कीर्ति, कुलाचें करील परम हित॥१३-५६॥**

शांतनु राजा सत्यवतीस भुलला तेव्हां ' माझ्या पुत्रांस राज्यपद मिळावें ' ही तिची अट पाळण्याकरितां ऐन तारुण्यांत ह्या सत्पुत्रानें आजन्म ब्रह्मचारी राहण्याची प्रतिज्ञा केली.

**दिधली सुदुर्लभा त्या सत्पुत्रें[१] त्या पित्यासि सत्यवती**
**'स्वच्छंदमृत्यु हो'असि आशी तातेंहि त्यासि सत्यवती[२]॥१३-१००**

सत्यवतीस दोन पुत्र झाले, पण ते एकामागें एक आटोपले, तेव्हां सत्यवतीनेंच भीष्मांस वंशवर्धनास्तव विवाह करण्यास सांगितलें, त्या प्रसंगीं भीष्म ह्मणाले:— ( आदि० १९ )

**म्यां ब्रह्मचर्यसुव्रतनियम[३] स्वमुखें त्वदर्थ जो केला ।**
**देह त्याज्य परि न तो त्याज्य, न सेवील सुज्ञ ओकेला ॥ ६ ॥**
**उष्णत्व त्यजिल दहन, मर्यादेतेंहि सिंधु सोडील ।**
**धर्मपर धर्मराजहि सद्धर्मप्रीतिलाहि तोडील ॥ ८ ॥**
**परि हा शांतवन तुझा सुत केवळ कृपण मान, सत्य जितां[५] ।**
**मेल्याहि न टाकील ! प्राणांसि न भीतमानस त्यजितां ॥ ९ ॥**

भीष्मांचा हा करारीपणा, ही तेजस्विता, हें सत्यप्रेम त्यांच्या शीलाचें मुख्य द्योतक आहे. एकदां केलेली प्रतिज्ञा कालत्रयीं मोडावयाची नाहीं, एकदां गेलेलें वचन फिरवावयाचें नाहीं एवढा निग्रह ज्याच्यापाशीं आहे तो सर्व जगाला—सर्व पक्षांला—भीष्म वाटेल यांत नवल नाहीं ! कौरवपांडव लहान असतांना त्यांना अस्त्रविद्या शिकविण्यासाठीं गुणज्ञ भीष्मानें द्रोणा-

१ आशीर्वाद २ खरी होणारी ३ ब्रह्मचारी राहण्याची प्रतिज्ञा. ४ आंम. ५ जिवंत असून सत्य सोडणार नाहीं.

चार्यांस राजवाड्यांत सन्मानपूर्वक आणून ठेवलें ( आदि० १३ ) कौरव पांडवांना द्रोणाचार्यांनी धनुर्विद्या व अस्त्रविद्या शिकविल्यानंतर त्यांच्या वैमनस्य माजत चाललें. पुढें द्रौपदीनें वस्त्रहरणप्रसंगीं ' मी जिता व अजिता ह्मणून विचारितां ' धर्म परम सूक्ष्म असे, धर्मात्मा धर्मसुत न चुकला ' (सभा० ५-११) एवढेंच भीष्म बोलले. ' बोला हो बोला हो ! ह्मणून विकर्णानें पुष्कळ अट्टहास केला व द्रौपदीनें विनवणी केली, तथापि ' खळलय होणाराचें, मग नय वुडवावें किमर्थ सांचावेंनें ! ' ( सभा० ६ १३३ ) हा विचार करून भीष्मानी मौन धरिलें. ' धर्मगति सूक्ष्म आहे धर्मपथ अत्याज्य आहे ' एवढेंच त्यांनी निर्णय सांगितलें. द्रौपदी अजित आहे असें ह्मणतांच ' जातीने कौरवांचे अन्नावर गात असतां युद्ध ह्मणून ते स्वस्थ बसले. द्रौपदी पण तर शापानें कौरवनाश करील, पण ' उरनात उद्दंड दुष्ट यासम जे ' त्यांचा नाश करण्याचा मार्ग सुटून जाईल, असा दूरवरचा विचार मनांत आणून विकर्ण व द्रौपदी यांचा बोलणं सोसूनही धोरणी व दूरदर्शी असे भीष्माचार्य अशा नाजुक प्रसंगी मौन धरिते झाले! भीष्माचार्यासारख्या धोरणी मुत्सद्याला विकर्णासारख्या उदार मनस्क पण अल्लड तरुणाचें उपहासपर भाषण सभेपुढें ऐकून घ्यावें लागलें. विकर्णाची स्पष्टोक्तीबद्दल सभासदांनी वाहवा केली, व आपलें अंतिम साध्य डोळ्यांपुढें ठेवून तत्सिद्ध्यर्थ झटणाऱ्या भीष्मासारख्या राजकार्यधुरंधराला तरुण सभ्यांच्या दृष्टीनें कमीपणा पत्करावा लागला! राजकारणी माणसाचें मुख्य धोरणाकडे लक्ष असल्यामुळें उच्छृंखळ तरुणांकडून त्यांना पुष्कळदां अपमान सोसावा लागतो. भीष्मासारख्या खऱ्या मुत्सद्याचे निंदास्तुति, व यशापयश इत्यादिकांची पर्वा ठेवून भागत नाहीं. राजकारणी मनुष्य संयमी-वशी-असावा लागतो. तसे भीष्म होते. कौरव व पांडव ह्यांच्यांत युद्ध सुरू झालें 'तेव्हां पुरुष अर्थदास ' असल्यामुळें भीष्माला कौरवांच्या तर्फेनें पांडवांशीं युद्ध करावें लागलें. पहिल्या प्रथम कौरवांनीं सेनापतित्वाचा अधिकार भीष्मासच दिला. ( उद्योग० ११ ) विदुर द्रोण व भीष्म यांनीं दुर्योधनास सामाचा सल्ला दिला, पांडवांच्या पराक्रमाचें भय दाखवून पाहिलें, कृष्णकवच त्यांचें रक्षण करणार आहे ह्मणून सांगितलें, मनांतून पांडवांवर आमचेंही प्रेम आहे असें सांगितलें, तथापि त्या दुर्बुद्धिमंदिरावर त्याचा कांहीं परिणाम झाला नाहीं. दुर्योधनानें विदुराची यथेष्ट निंदा केली व कर्णानें भीष्माची

केली, तथापि थोर ते थोरच. रक्तपात टळावा ह्मणून कृष्ण, विदुर व भीष्म यांनीं आपली शिकस्त करून पाहिली, पण होणार गोष्टी कोणालाही टाळतां येत नाहींत! 'अर्जुनसम वीर नसे मागें, आतां पुढें न व्हायाचा' (उद्योग. १२-८३) असें भीष्मानें दुर्योधनास सांगितलें; 'होऊनि वज्रपंजर रक्षितसे वासुदेव कीरा या' (उद्योग १२-८४) याप्रमाणें श्रीकृष्ण त्याचें सर्वस्वी रक्षण करील अशी भीति घातली; 'स्वहित पुसतील पांडव तरि सांगुनि संकटांत तारीन' (उद्योग. ११-९२) अशी स्पष्ट प्रतिज्ञा केली; तथापि 'शरणागता न सांडावें' असें दुर्योधनानें प्रार्थून भीष्माचार्यास लढाईस उद्युक्त केलें! नंतर भीष्मानें शिखंडीची गोष्ट सांगून ती स्त्री आहे असें प्रकट करून ह्मटलें:—

**यास्तव ह्मणतों आह्मीं हाणूना बायकोस हातेरें।**
**करिती सर्वस्वाचें परि न यशाचें कुबुद्धि मातेरें ॥उद्योग१३-२३१**

भीष्मांनीं दहा दिवस घनघोर युद्ध करून सारी पृथ्वी दणाणून सोडली:-

**युद्धें जिकडे तिकडे शोणितगंधें समस्त भट भुलले।**
**स्वपरक्षतजोक्षित ते जेंवि वसंतीं पलाशतरु फुलले॥ भीष्म०२-९**

दोन दिवस युद्ध झाल्यावर भीष्माचें पांडवपक्षपातित्व पाहून दुर्योधन केविलवाण्या स्वरानें भीष्मास ह्मणाला:—

**जिकडे वपु तिकडे मन युक्त, न शोभेल अन्यथा नातें।**
**पायें अनन्य लोटुनि लावावें काय अन्य थानातें? भीष्म०४-५॥**

भीष्मांनीं तिसऱ्या दिवशीं असें युद्ध केलें कीं 'पार्थ मृदु व भीष्म उग्र' वाटून श्रीकृष्णाला प्रतिज्ञाभंग करून पार्थसंरक्षणार्थ हातीं शस्त्र धरावें लागलें! युद्धवर्णनाबद्दल पुढें विशेष प्रकारानें लिहावयाचें असल्यामुळें येथें त्याचा विस्तार करीत नाहीं. शिखंडीला पुढें करून पार्थाला भीष्माशीं युद्ध करून त्याला पाडावें लागलें, याच एका गोष्टीवरून पार्थाहून भीष्म किती पटीनें पराक्रमी होते हें दिसतें.

**पडतांचि भीष्म पडले रडले कुरुवीर, भूप, सुर सगळे।**
**जाणों तो परमातुरहस्तीचा अमृतरूप सुरस गळे॥भीष्म ११-११७**

भीष्म पडल्यावर त्यांना अर्जुनानें बाणांची उशी दिली व भीष्म बाणां-

---

१ हत्यारानें, शस्त्रानें. २ आपल्या व शत्रूच्या क्षतजानें ह्म. रक्तानें माखलेले. ३ योग्य. ४ हातांतून.

च्या शय्येवर श्रीकृष्णध्यान करीत स्वस्थ पहुडले. कर्णानें मुद्दाम शोक केला तेव्हां भीष्मांनीं शूर पुढाऱ्याचें कर्तव्य काय आहे हें त्यास सांगितलें:—

**व्हावें शस्त्रेंचि रणीं वीरांचें गलित वपु, न रोगानें ।**
**सकळां मर्त्यजनांतें सुख द्यावें नित्य नव पुरोगानें ॥ भीष्म१२-६१**

भीष्म पडतांच कौरवपक्षीयांची अर्धी शक्ति नष्ट झाली, व भरतभू शून्य झाली. 'भीष्म पडतांचि गेले सर्वांचेही पळांत आवांके' ( द्रोण० १-४ ) गांधारी भारतीयुद्धसमाप्तीनंतर रणभूमीवरचा देखावा वर्णन करितांना भीष्मास पाहून ह्मणते:—

**भीष्म प्रभु शरतल्पीं निजला आहे जसा कुसुमतल्पीं ।**
**हें शौर्य वीर्य न सुरीं, कैसें मनुजीं असेल मग अल्पीं ? ॥ ३० ॥**
**यामागें धर्माचें पांडव पुसतील तत्व कोणातें ? ।**
**हा राजनीति विधवा झाली ! बैसेल धरुनि कोणातें !! ॥ ३३ ॥**

स्त्रीपर्व अ० ५

शांतिपर्वांत श्रीकृष्ण धर्मास भीष्माकडे ज्ञानबोधार्थ नेतांना ह्मणाले:—

**ज्ञानें अस्ता जातिल होता तो भीष्मभानु[३] अस्तमित ।**
**दिसतो तसा नव्हे बा ! तेजस्वी सूर्य काय हस्तामित[४] ॥ ६—४१**

विदुर, अर्जुन, कर्ण, कृष्ण, नारद इत्यादिकांनीं भीष्माचें जें वर्णन केलें आहे त्यावरून भीष्माची अद्वितीयता स्पष्ट होते. भीष्मभानूपुढें श्रीकृष्णाशिवाय इतर सर्व वीर नक्षत्रांसारखे आहेत व ह्या राजनीतिपर्ताचे इतर सर्व पुरुष शिष्य आहेत असें पंतभारतांत तरी स्पष्ट दिसतें. भीष्मांचें सर्वज्ञपण भारतांत जागोजाग प्रतीत होतें. उत्तरायण सुरू होतांच धर्मादिकांस आपद्धर्मादि अनेक धर्म शिकवून व श्रीकृष्ण परमात्म्याची:—

**कश्मल जडत्व गेलें, आलें सर्वज्ञपण तुझ्याच वरें ।**
**करुनि प्रसाद लाविसि रंकावरिही उडावया चवरें ॥शांति७-१००**

याप्रमाणें स्तुति करून भीष्माचार्य परमात्मस्वरूपीं लीन झाले.

१७ महाभारत हा वीररसाचा समुद्र आहे, व भीष्म, द्रोण, कर्ण, अर्जुन, भीम, अश्वत्थामा हे त्यांतले प्रचंड मकर आहेत. यांच्या पराक्रमांचीं हजारों कवींनीं अत्यद्भुत वर्णनें केलीं आहेत. हे वीरपुरुष हिंदुसमाजाच्या डोळ्यां-

१ पुरोग ह्म. पुढारी. २ कोपऱ्यांत मुळुमुळु रडत बसेल. ३ भीष्मरूपी सूर्य. ४ हाताइतक्या प्रमाणाचा.

पुढें आज हजारों वर्षें वावरत आहेत. मोरोपंती महाभारतांत, मुख्यतः भीष्म, द्रोण व कर्ण ह्या तीन पर्वांत वीररसाला प्रचंड भरती आलेली दिसते. पंतांच्या वाणींत भारती योद्ध्यांच्या शस्त्रास्त्रांची चमक दिसते. ह्या पर्वांतल्या निरनिराळ्या प्रसंगांचें विस्तृत वर्णन देण्यास स्थलावकाश नाहीं, ह्मणून कांहीं ठळक प्रसंगांतल्या उत्तमोत्तम आर्या पाहूनच वाचकांस आपली तृषा भागविणें प्राप्त आहे. पंतांच्या भारतांत खणाखणीचीं रणवर्णनें, वीरांचीं वीरश्रीचीं भाषणें इत्यादि प्रकार पुष्कळ ठिकाणीं अप्रतिम साधले आहेत. 'झालीं युद्धें शतशः सर्व प्रेक्षकमनोहरें सरसें ' आहेत.

त्यामुळें रणभूमि ही रक्तकमळांनीं फुललेल्या माणिक्यभूमीवरील सरोवरासारखी दिसूं लागली ! भीष्मपर्वांतले ८।९।१० हे अध्याय वाचकांनीं जरूर वाचावेत, ह्मणजे उभयपक्षीय वीर कसे 'कोपावेशें झाले कल्पांतींचे समुद्रसे उतते ' ( भीष्म ९-२६ ) हें त्यांस समजून येईल. त्रिगर्त देशाचा राजा सुशर्मा यानें हजारों बाणांनीं अर्जुनाचा रथ आच्छादून टाकल्यानंतर अर्जुनानें तें शरपटल दूर करून सुशर्म्याला दूर उडवून दिलें व त्याच्या फौजेची दाणादाण केली या संबंधाच्या पुढील मोरोपंती आर्या फारच सुंदर आहेतः—

**उडवी शरपटलासह पार्थ सुशर्म्यात्रिगर्तपातें, जी ।**
**होय अवस्था त्याची ती अंधा रात्रि गर्तपातें जी ॥ १३ ॥**
**शरपटलांतूनि निघे घनपटलांतूनि अर्यमा साच ।**
**रिपुवाहिनींत तरतां भासे तो वीरवर्य मासाच ! ॥ १४ ॥**

भीष्मपर्व अ० ८

वरील आर्येतले दोन्ही दृष्टांत फार फार सुंदर आहेत. अर्जुनाची स्वयंसिद्ध तेजस्विता व शत्रुपराजयसौकर्य हे सूर्य आणि मासा ह्यांच्या दृष्टांतानें उत्तम प्रकारें व्यक्त झाले आहेत. द्रोणपर्व अध्याय ३ मध्यें अभिमन्युपराक्रमाची दिव्य कथा दिली आहे. सोळा वर्षांच्या बाळानें कसलेल्या कौरववीरांना रणभूमीवर कसें लीलेनें घोळविलें, त्याला सर्वांनीं विरथ करून कपटानें कसें मारलें व अर्जुनानें त्यासाठीं केवढा शोक केला ह्याचें हृदयद्रावक वर्णन पंतांच्या द्रोणपर्वांत आलें आहे. डोहीं जसा मतंगज किंवा गजयूथीं हरिपोत शिरतो त्याप्रमाणें अभिमन्यु चक्रव्यूहांत शिरला. उभय पक्षाचे वीर

१ त्रिगर्त देशाचा पति. २ खळग्यांत पडल्यानें. ३ सूर्य. ४ शत्रुसेनारूप नदींत.

एकमेकांवर तुटून पडले. ' रथ भडकले, भडकले हय, शस्त्रजवनिंह भडकले वरते ! ' असा तो घोर संग्राम झाला. अभिमन्यु हा एकेका वीराचा समाचार घेत चालला.

**भेदुनि शरें उरःस्थळ चळचळ बळजळधि कर्ण कंपविला ।**
**मूर्छित करूनि मद्रप सौभद्रें तत्प्रताप संपविला ॥ ३-५३ ॥**
**एकें सुषेण वधिला, बाणें एकेंचि दीर्घलोचन हो ! ।**
**एकेंचि कुंडभेदी, गमले ते घूक तो विरोचन हो ! ॥ ३-५४ ॥**

अभिमन्यूचा पराक्रम पाहून द्रोणानें आनंदानें त्याची स्तुति केली:--

**हर्षवितो मज पुत्राहूनि, नव्हे हा कुमार सामान्य ! ।**
**धन्या सती सुभद्रा नंदन जीचा कुमारसा मान्य ॥ ३-५९ ॥**
**मज भंगुनि हि सुखविता बा ! हा सामान्य काय गा बाळ ! ॥**
**उतरुनि सांडावा यावरुनी सर्वस्व काय गाबाळ ! ॥ ३ ११५ ॥**

वीर अभिमन्युही धन्य व त्याच्या शत्रुपक्षाचा सेनापति गुणज्ञ द्रोणही धन्य ! अर्जुनाच्या बाणांनीं विव्हळ झालेल्या भीष्मानें ज्याप्रमाणें ' विजया वीरा भला भला बा हूं; बाहूंस तुझ्या दृष्टि न लागो ' ह्याप्रमाणें आपल्या प्रतिपक्षाच्या शौर्याचें कौतुक केलें होतें, ( भीष्म० १०-८६ ) त्याप्रमाणेंच ह्या ठिकाणीं द्रोणानेंही कौरवसेना जीर्णपटासारखी फाडीत जाणाऱ्या बालवीराचीही योग्य तारीफ केलेली आहे! शत्रुही उदार व गुणग्राही भेटणें ही मोठ्या भाग्याची गोष्ट आहे. अश्वत्थाम्याहून सौभद्र मला प्रिय वाटतो, त्यानें माझा भंग केला आहे तरी तो मला सुखवितो, व त्यावरून हा माझा तुच्छ देह ओवाळून टाकावासा वाटतो, असे उद्गार द्रोणाचार्यांच्या तोंडून निघालेले पाहून त्या वीर महात्म्याची धन्यता कोणास वाटणार नाहीं ? कौरवांचा असत्पक्ष खरा, पण भीष्मद्रोणच काय पण कर्णदुर्योधनादि पुरुषही कांहीं सामान्य कोटींतले नव्हते असें भारतवाचनानंतर खास वाटतें. ' अरिच्याहि सद्गुणांतें प्रेमें वाखाणितातिं सुज्ञानी ' हा सिद्धांत तरी पंतांना भीष्मद्रोणांच्या चरित्रावरूनच सुचला आहे. द्रोणपर्वांत ' वृकोदर रुद्र ' व ' प्रळयाग्नीचा लोळ असा अश्वत्थामा ' यांच्या पराक्रमांचें नामी वर्णन आहे. ' ह्या वीरांनीं ' रुधिरनदी खळखळाट वाहविली ! ' अर्जुन तर सर्वत्र आहेच. जाउनि धनंजयावरि झाले भट सर्व शलभसे नाहीं. ' ( द्रोण १८-८३ )

येथें धनंजयावरील श्लेष उघडच आहे. दिवसभर योद्धे युद्ध करीत व रात्रीं एक प्रहरभर हत्तींच्या हौद्यांतच विश्रांति घेत, ह्याबद्दल पंत विनोदानें ह्मणतातः—

**स्त्रीकुचलीन तरुणसे क्षत्रिय गजकुंभलीन ते गमले!!।**
**रमले मुहूर्तपरिमित, निद्रेसी सर्व जीव विश्रमले. ॥ द्रोण०२०--७७**

द्रोणपर्वांतील २१।२२ हे दोन अध्याय प्रत्येकानें वाचावेत. द्रोणानें पांडवपक्षांतील वीर मारायचा सारखा तडाखा लावलेला पाहून 'धर्म सोडून जयाविषयीं हवें तें करा.' अशी कुटिलनीति कृष्णानें पांडवांस शिकविली. ती भीमास तात्काळ रुचली, धर्म केवळ कृष्णभक्तीमुळें कष्टानें तिला कबूल झाला. गुरुभक्त वीरमणी अर्जुनास अशी कपटनीति मान्य होणार नाहीं ह्मणून कृष्णानें ती त्यास कळविलीच नाहीं. 'नरो वा कुंजरो वा' ह्मणून धर्मानें कानांवर हात ठेवले व अश्वत्थामा मेला असें सांगून हताश झालेल्या द्रोणाला पांडवांनीं मारलें! ही गोष्ट पार्थास कळतांच त्यानें धर्मादिकांची उघड निंदा केली व मोठा शोक केला. पार्थ म्हणालाः—

**बहु वय सरलें, उरलें थोडें, तों काय कर्म ओढवलें?।**
**सिंधु बहु तरुनि शेषीं केंसें बा सत्व-उडुप फोडवलें? ॥२०॥**
**स्वर्गपद ब्रह्मपदहि किंबहुना मोक्षपदहि सोडावें।**
**श्रीगुरुपदाचि ह्मणति कवि सर्वस्वार्पण करूनि जोडावें ॥ १५ ॥**
**राज्यपद अनर्थास्पद केवळ त्याच्या धरूनि लोभातें।**
**गुरुपद गमाविलें कीं गेलें घेऊनि सत्य शोभा तें ॥ १६ ॥**

—द्रोण० २२

ही अर्जुनाची गुरुभक्ति, हा उदारपणा व हा निर्भीडपणा पाहून त्याच्या शौर्याची किंमत ज्यास्तच वाटते. भीमही कांहीं कमी प्रतीचा योद्धा नव्हता, पण तो केवळ आडदांड होता. अर्जुनाची सत्वसंशुद्धि त्याच्या ठिकाणीं नव्हती! भीमानें द्रोणाची केलेली निंदा ( द्रोण० २१ ) व अर्जुनानें द्रोणास्तव केलेला गुरुशोक ( अ० २२ ) हे दोन प्रसंग पाहिले म्हणजे प्राकृत वीर आणि सुसंस्कृत वीर ह्यांच्यांतला भेद लक्षांत येतो. पांडवांचा सत्पक्ष असला तरी भीष्म, द्रोण व कर्ण ह्या शत्रुपक्षीय बलाढ्य वीरांचे वध त्यांनीं कपटानें, अन्यायानें व क्रूरपणानेंच केले आहेत, व ह्याला सर्वसाक्षी श्रीकृष्णाची संमति होती हें पाहिलें म्हणजे 'धर्मगति सूक्ष्म आहे' असेंच म्हणून स्वस्थ बसावें लागतें! सत्पक्षांतही दोष आहेत व असत्पक्षांतही गुण आहेत, किंबहुना

त्रिगुणांमधले सर्वच पुरुष व त्यांचीं कार्यें दोषमय आहेत ही गोष्ट व्यासांनीं आपल्यापुढें ठळकपणानें मांडली आहे, याबद्दल त्यांचे धन्यवाद गावेसे वाटतात!! कर्णार्जुनांच्या युद्धाचें वर्णन कर्णपर्वांत चांगलेंच आहे, पण भीमसेनाच्या भीमपराक्रमाचें व वीरश्रीचें वर्णनही यांत नामी आलेलें आहे. भीमाच्या उसळीला तोफेच्या गोळ्याचा दृष्टांत किती तरी शोभतो:-

**भीम रथावरुनि उडी टाकुनि गुरुयश करावया गोळा।**
**धांवे, यंत्रापासुनि वेगानें जेविं उसळला गोळा! ॥द्रोण०११-८३**

भीमाच्या आरोळीचा प्रताप पहा:—

**भीमाच्या सिंहरवें भ्याले बहु एक ही न पर परते।**
**जे शूर मंदांध द्विप हगले बलधैर्यहीन परपर ते! ॥ द्रोण०११-११०**

भीमसेनाची गदा ह्मणजे द्रौपदीनें केलेली कौरवनाशाची आज्ञा होय असें सुंदर रूपक करून त्या गदेनें कौरवसेनेंत घातलेल्या फुगडीचें पंतांनीं सुंदर वर्णन केलें आहे:—

**ऐसें मनांत आणुनि पांडव टाकी उडी रथावरुनी।**
**दयितेची मूर्तिमती कुरुहननाज्ञा गदा करीं धरुनी॥ १॥**
**कुरुसेनेसी घाली जेव्हां समरांगणीं गदा फुगडी।**
**तें काळदृष्टि झडकरि पक्ष्मकपाटें पहावया उघडी! ॥ ३॥**

—कर्ण० अ० ३३.

भीमसेनानें दुःशासनाचा वध केला त्या प्रसंगींच्या पंतांच्या आर्या (कर्ण० ४५) सर्वोत्कृष्टच आहेत. वीर, भयानक आणि रौद्र ह्या तीन रसांचें तें खमंग मिश्रण आहे. द्रौपदीच्या वस्त्रहरणाचा सव्याज सूड भीमानें येथें उगवला आहे. 'धांवति अन्योन्यावरि ते दोघे आठवूनि अपकार.' पुढील आर्या लोकप्रसिद्धच आहेत:—

**गरुड जसा गगनांतुनि वेगें उतरोनि पन्नगा झडपी।**
**तैसा भीम बळानें दुःशासनकंठ अंघ्रिनें दडपी॥ ११॥**
**मग कंठनाल चरचर तो सत्य करावया बिरुद कापी।**
**मिटक्या देउनि मटमट घटघट त्या स्वाहितासृगुदका पी॥ १४॥**
**रिपू शूर दूर तेथुनि तें दारुण कर्म पाहतां पळती।**
**किति पडती, किति दडती, कितिएकांचीं धृतायुधें गळती ॥१८॥**
**जाणों त्या अत्युग्रा मूर्त श्रीनारसिंहमंत्रास।**
**पाहोनि पावले ते रिपुभट भूपाळ भूत संत्रास॥ १९॥**

**ह्मणति 'मनुष्य नव्हे हा राक्षस कीं काळ हा खवळला हो।**
**कीं आमुची कराया मूर्त प्रळयाग्नि राख थळला हो!' ॥ २० ॥**

हें भीमाचें शब्दचित्र किती बहारीचें आहे! द्रौपदीच्या वस्त्रहरणापासून भीमाच्या मनांत जो तडफडाट चालला होता तो या वेळेस दुःशासनरक्ताची अंजली भरून व मागील त्याच्या सर्व दुष्कृत्यांचा पाढा वाचून भीमानें ओकून काढला. वाचकांच्याही मनाच्या वृत्ति भीमाच्या वृत्तीसारख्याच होऊन जातात, व 'शत्रुरुधिरदिग्धपाणिमुख' असा भीम जेव्हां 'प्रकट महाभैरवसा नाचत गेला जयाच्युतानिकट' तेव्हांच्या त्याच्या उग्रमूर्तीचें ध्यान प्रेमादरास्पद वाटल्यावांचून राहत नाहीं!! दुःशासनाच्या पापाची उत्तम प्रकारें फेड झाली, जशास तसें झालें ह्यांत शंका नाहीं. ह्या घोरकर्मांत दया दिसत नसली तरी न्याय झाला असें वाटतें. भीमाचा संबंध गदापर्वांत आणखी एकवार आला आहे. गदापर्व अ० २।३ हे जरूर पाहावेत. भीष्म, द्रोण, कर्ण, शल्य व गदा हीं पांच पर्वें ह्मणजे वीररसाचा पंचनद आहे! पंतांच्या वाणीलाही ह्या ठिकाणीं वीरांच्या पराक्रमाचा तिखटपणा आला आहे. कर्णपर्वांत भीमाच्या पराक्रमापुढें कर्णार्जुनांचा सामनाही फिका पडतो. कर्णही असामान्य योद्धा होता. कर्णाच्या औदार्याची कल्पना डोक्यांत सारखी खेळत असल्यामुळें पंतांनीं:—

**दशशतबाणांनीं तो एकैकातें रणांगणीं हाणी।**
**न करीच पंक्तिभेद श्रीकर्णाचा उदारवर पाणी! ॥ कर्ण० ३०-६०**

ह्याप्रमाणें वीररसाला विनोदाची पुष्टि दिली आहे. 'ते दोघेही झाले श्राद्धपर्ताचे तुझ्या गुणें अतिथी!' किंवा 'धर्मसहाय स्वर्गीं झाले देवांस जांवई व्याही!' (कर्ण० ४) अशा प्रकारचा विनोद, 'स्त्रीकुचलीनतरुणसे क्षत्रिय गजकुंभलीन ते गमले' अशा प्रकारचा शृंगार, भीष्मभीमांचा काळकल्प पराक्रम पाहून 'जे मदमत्त मतंगज हगले मदसेकहीन परपर ते' अशा प्रकारचा बीभत्सपणा; किंवा 'भस्मचि करी धनंजय लीलेनें तीं समस्त घनपटलें' अशा प्रकारचे श्लेष वीररसवर्णनांत पंतांनीं वारंवार आणून वाचकांना एकाच रसाचा फार ताण पडूं नये ह्मणून सावधानता ठेविली आहे! कोठें उपमादृष्टांतही भिन्नजातीय योजून रसवृद्धि केली आहे. उदाहरणार्थः—

**त्यांच्याचि क्षतजनधा त्यांतेंचि रणांगणांत वाहविती ।**
**निजविषयवासना बहु खवळोनि जसें न धैर्य राहविती ॥ ५९ ॥**
**त्यांचेंचि रक्तपूर क्रूर सुदुस्तर तयांसि बुडवीती ।**
**जैसे कुपुत्र गजहि न आवरिति पदेंकरूनि तुडवीती ॥ ६० ॥**
कर्ण० अ० ११.

वरील पांचही पर्वांत पंतांनीं मुख्य कथाभागावर नजर ठेवून अवांतर कथा व उपकथा सर्व गाळून टाकल्या आहेत. मात्र एके ठिकाणीं त्यांनीं विस्तार केला आहे आणि तोही फार हृदयंगम वठला आहे, आणि तें ठिकाण ह्मणजे कर्णशल्यांचें भांडण आणि त्यांत ओघानें प्राप्त होणारें हंसकाकीय कथानक हें होय.

१८ दुर्योधनानें महत्प्रयासानें शल्याला कर्णाचें सारथ्य दिलें. कर्ण हलका व मी राजकुलोत्पन्न असा शल्याला अभिमान होता, तेव्हां सारथीची योग्यता मोठी आहे व कर्ण असामान्य योद्धा आहे असें सांगून दुर्योधनानें त्याचें आर्जव केलें. दुर्योधन ह्मणतोः—

**अरुण रवीचा सारथि, दहनाचा वायु, यत्न कीं विधिचा, ।**
**सारथि हो तूं तैसा कर्णाचा धैर्यबळपयोनिधिचा ॥ कर्ण०२१-१२**
**हा दीर्घभुज सकुंडलकवच उपजतांचि बाळभास्करसा ।**
**प्रसवे न यासि राधा, प्रसवेल दिवाकरासि काय रसा ? ॥**
**कर्ण० २२—३४ ॥**
**अजि सिंधुशुक्तिगर्भीं मौक्तिक उपजे, नदींत ही असती ।**
**पुष्कळ सिंप्या, परि तीं त्यांच्या उदरीं न मौक्तिकें वसतीं ! ॥**
**कर्ण० २२—३५ ॥**

कर्णाचा तेजोभंग करायचें काम पांडवांनीं शल्याला सांगितलें असल्या- मुळें शल्य फितुरी अतएव निंद्यच ठरतो, व कर्णाबद्दल वाचकांच्या मनांत सहानुभूति उत्पन्न होते. कोणताही वीर युद्धकर्मास प्रवृत्त झाला असतां त्याचा उत्साहभंग करणें हें नीचपणाचें कर्म शल्य करीत होता व कर्ण वीरपुत्र असून त्याला सूतपुत्र ह्मणून घ्यावें लागत असे हें त्याचें दुर्दैव होय. दुष्टपक्षाकडे असल्यामुळें ज्या कर्णाची अशा प्रकारें मानखंडना झाली, तोच कर्ण पांडवपक्षाकडे असता तर त्यानें पांचांसही दिपविलें असतें, एवढा उदार व शूर तो होता ही गोष्ट भारतावरून उघड दिसते. असो. शल्यकर्णांच्या भांडणांत पंतांनीं ५।६ अध्याय खर्चिले असून त्यांचीं भाषणें अत्यंत समर्पक अशींच दिलीं आहेत. थोडा नमुना पहाः—

शल्यः--

**नरवर अर्जुन कोठें, पुरुषाधम! सूतपुत्र तूं कोठें ?।**
**वाचाळा! नाचावें सत्स्तवनीं न स्ववर्णनीं ओठें! ॥ २५--१८॥**
**पार्थ पयोधर गर्जे, स्पर्धा मंडूक तूं वृथा करिशी।**
**त्याच्या पुढें टुरुटुरू टरीं टरीं शब्द हे किती करिशी! ॥ २७--९॥**
**श्वान स्वपोषकाच्या सदनाच्या आश्रयें उभा राहे।**
**जिकडे वनांत गर्जे शार्दूळ तया दिशेकडे पाहे! ॥ २७--१० ॥**
**आखु-बिडाळ, श्वान-व्याघ्र, शृगाल-द्विपारि, शशक-करी,।**
**विष-अमृत, सत्य अनृतहि-तूं-पार्थ-तयां तुझ्यां नसोचि सरी ॥**

कर्णः–

**शस्त्रातें अस्त्रातें जिष्णूच्या त्याहि दिव्य चापातें।**
**क्रोधातें वीर्यातें शल्या! मी जाणतों प्रतापातें २७—१६**
**मारीन त्यासि अथवा त्याच्या हातें मरेन, हो भावी,।**
**कोणा तरी प्रकारें सत्कीर्ति जगत्रयांत शोभावी ॥२९--१६ ॥**

कर्ण अर्जुनाच्याच तोलाचा योद्धा होता. ' विंध्यासि मेरु, मेरुसि विंध्यचि जाणे, न अन्य खग नीच ' हें कर्णाचेंच ह्मणणें बरोबर होतें. ह्या प्रसंगाच्या पंतांच्या आर्या फारच सुलभ, सरळ व जोरकस आहेत व ह्याच ओघांत पुढें आलेलें हंसकाकीय कथानक ह्मणजे शल्यानें सांगितलेली–एकगति जाणणाऱ्या हंसाची स्पर्धा करून फजीत पावलेल्या मी शतगति जाणतों ह्मणून डौल मिरवणाऱ्या कावळ्याची कथा ( कर्ण. २८ ) फारच मनोरम व बोधप्रद असून पंतांच्या आर्या सहज धांवणाऱ्या नदीप्रवाहाप्रमाणें फारच आल्हादक आहेत, किंबहुना पंतांच्या आर्यावृत्ताचा उत्कर्ष झालेला ह्या ठिकाणीं दिसतो असें ह्मटलें तरी चालेल. पंतभारतांतील कर्णपर्व पहिल्यापासूनच लोकप्रिय आहे. पंतांनीं आपल्या भारतांत अवांतर कथा आणल्या नाहींत, पण ही जी कथा आणली आहे ती ( आर्या १३–७९ ) अप्रतिमच साधली आहे. ह्यांतील वेंचक आर्या देण्याच्या प्रयत्नांत माझी तारंबळ उडत आहे! सर्वच आर्या सारख्या गोड आहेत. ' न दिसे अग नग, मग तग गगनीं खग नीच काय काढील ? ' हा आर्यार्ध प्रसिद्धच आहे.

**ऐसें वदे रडे बहु खाय गटकळ्या जळांत करि ' का का । '**
**धांवे मराळ चरणीं कवळुनि काढी क्षणांत वरि काका ॥७०॥**

आपली हेळणा करणाऱ्या कावळ्याला हंसानें संकटांत तारिलें ह्यांत कांहीं नवल नाहीं; ' पाहों नयेचि आंगीं बळ असतां दीन जंतुचा अंत ' हा न्यायच आहे.

१९ भारतीयुद्ध समाप्त झाल्यानंतर रणभूमीवर जी रडारड झाली व हुडाकिति शवें पहा! पतिसुत वळखायासि बायका सारीं ' हा हृदयविदारक देखावा दिसूं लागला त्याचें करुणारसानें ओथंबलेलें व पाषाणासही रडवणारें वर्णन पंतभारतांत ( स्त्रीपर्व अ० ४।५ ) पहावयास सांपडतें. अभिमन्यु पडल्यावर अर्जुनानें जो अपार शोक केला ( द्रोण,७ ) तो प्रसंग व सदरचे दोन अध्याय केवळ करुणारसाचे समुद्र आहेत. स्त्रीपर्वांत पंतांनीं पुत्रशोक, पतिशोक वगैरेचे निरनिराळे प्रकार वर्णिले आहेत. सारे पुत्र मेलेले पाहून आधीं गांधारीच्या ' पोटीं बहु भडभडले, गडबडलें चित्त, जें विमळ मळलें. ' पतिसुतशोकार्त झालेल्या स्त्रिया ' मुख हुंगिती मृतांचें पतिवरि कर फिरविती, पहावेना! ' मुख्यतः उत्तरेनें अभिमन्यूसाठीं केलेला शोक फारच हृदयद्रावक आहे:--

**अंकीं मस्तक घेउनि ती बाळा उत्तरा पहा पतितें ।**
**चिबुक धरुनि बोलविते, " लिहिलें ऐसें कसें महापतितें? ॥४-४१**
**हा जन सखीसमाजीं तुमचा सोडूनि काय पद रमला ? ।**
**चुकल्यें, क्षमा करावी, पसराया उशिर काय पदर मला ? ॥४३॥**
**हा सातवा परिचया मास पहा! गणुनि लोटले साच ।**
**इतुक्यांत कसे विटलां ? साधु ह्मणति सख्य साधुशीं साच "**
**आयांतें दायांतें ह्मणते, " मज लाविली बळेंच सवे ।**
**कां मोडितां तुह्मींच ? क्षण आतां स्वपतिवेगळें नसवे ॥५८॥**
**पतिजवळुनि कां नेतां नेउनि हितबोध करुनि खोलींत ।**
**तुमच्याहि असें अंतर कां गे पडलें क्रियेंत बोलींत ? " ॥५९॥**

कर्णाचें प्रेत पाहून कर्णपत्नी व कर्णमाता ह्यांनीं फार शोक केला आहे. कर्णाची स्त्री पृथ्वीनें रथचक्र गिळिलें ह्मणून तिच्यावर चरफडून ह्मणते:--

**ब्रह्मण्य, शूर, दाता, बुध सर्वांगोपभोग जो कर्ता ।**
**हर्ता शत्रूपद्रव दुष्टे महि ! मारिला कसा भर्ता ? ॥ ५--११ ॥**
**मज कां गिळिले नाहीं ? पापे ! रथचक्र गे कसें गिळिलें ? ।**
**दे उत्तर, ऐकों दे ! कां न वदासि ? तोंड काय गे खिळिलें ? १२**

स्त्रियांच्या मनोवृत्तीला व भाषापद्धतीला अत्यंत अनुरूप असें हें वर्णन आहे हें सांगणें नकोच.

२० मोरोपंती भारताचें स्वरूप एवढ्यावरून वाचकांच्या ध्यानांत येईल असें वाटतें. राष्ट्रीय दृष्टीनें महाभारतग्रंथाइतका उपयुक्त ग्रंथ दुसरा नाहीं. भारतांतील सर्वच व्यक्ति असामान्य आहेत. त्यांच्यांत एक प्रकारचा निश्चयीपणा, करारीपणा, बाणेदारपणा आहे. भीष्मद्रोणादि पुरुष तर लोकोत्तर आहेतच, पण कर्ण, दुर्योधन, दुःशासन, घटोत्कच इत्यादि व्यक्तींच्या अंगीं मुद्दां विलक्षण प्रकारची चिकाटी दिसून येते. भारतीयुद्धांत चमकणारे सर्वच वीर—मग ते सत्पक्षीय असोत वा असत्पक्षीय असोत. जिवंत व्यक्ति आहेत. तीं जिवंत माणसें आहेत, मेलेलीं नाहीत. त्यांच्या ठिकाणीं मनाचे कोमळ विचार दिसून येत नाहींत असें नाहीं, पण यशापेक्षां ते कांहींही अधिक प्रिय मानीत नसत. कुंतीनें पांडवांस सांगितल्याप्रमाणें ' यश रक्षावें, न आंग लेकांहीं ' असाच बोध त्या वेळच्या आया आपल्या मुलांस करीत. 'आत्माहि उपेक्षावा परि रक्षावाचि बोल संतांनीं ' हें तत्व भीष्मद्रोणकर्णादि पुरुष आपल्या आचरणानें पुढील पिढीस शिकवीत. हा लोक कालोपद्रुत आहे, व देह पाण्याच्या बुडबुड्यासारखा क्षणभंगुर आहे ही गोष्ट तेव्हां आबालवृद्धांच्या व स्त्रीपुरुषांच्या मनावर ठसल्यामुळें ते कसल्याही संकटांना व आपत्तींना धैर्यानें तोंड द्यायला भीत नसत. पांडवांच्या अंगीं दोष नव्हते किंवा कौरवांच्या अंगीं गुण नव्हते अशांतला प्रकार मुळींच नाहीं. पांडवांची नीति सरळ व अकपट होती असेंही नाहीं, किंबहुना कौरवपक्षाकडेच सरळपणा जास्त दिसतो. भीष्मद्रोण हे कौरवांकडेच पहिल्यापासून होते ह्मणून त्यांना पांडवांशीं युद्ध करावें लागलें. भीष्म अर्जुनाला भारी होते, द्रोण अर्जुनाला भारी होते, कर्ण निदान अर्जुनाच्या बरोबरीचा होता. प्रतिपक्षांतले योद्धे असे बलाढ्य असल्यामुळें स्वभक्तरक्षणार्थ श्रीकृष्णाला कपटनीति स्वीकारावी लागली ! धर्मालाही एकदां ' नरो वा कुंजरो वा ' ह्मणून अधर्माला प्रवृत्त व्हावें लागलें ! उलटपक्षीं कर्णाला पांडवांकडे ओढण्यासाठीं श्रीकृष्णानें व कुंतीनें जो उपाय केला त्यानें प्राकृत मनुष्य तेव्हांच हुरळून जाता, पण धन्य कर्णाच्या औदार्याची कीं त्यानें एकदां धरिलेला पक्ष व पत्करिलेलें दुर्योधनाचें मित्रत्व संभाळण्यासाठीं पांडवांचा मुख्य होऊन द्रौपदीची व राज्याची प्राप्ति होण्याचा मोह सर्वथैव जिंकला ! अनाया-

सें वाढून आलेलें पंचपक्वान्नाचें ताट दूर सारून मित्रार्थ व स्वव्रतपरिपालनार्थ जाणून बुजून तो काळाच्या स्वाधीन झाला! विश्व काय आहे, परमेश्वर कसा आहे, मी कोण आहें, माझें कर्तव्य काय आहे ह्या चार प्रश्नांचा आपल्या बुद्धीनें ज्यानें उलगडा केला व आपला वर्तनक्रम ठाम ठरविला तोच पुरुष वीराच्या पदवीस प्राप्त होतो. त्यांचीं कर्मे बरीं आहेत कां वाईट आहेत हें ठरविण्याचे भानगडींत दुसऱ्यानें सहसा पडूं नये हें बरें! 'सर्वारंभाहि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः' हा सिद्धांत लक्षांत ठेवावा. पंतांनीं कर्णपर्वांत ह्मटलें आहे:—

**जातीनें अधम असो, घातकहि असो, असो महा घोर।**
**जो काय कृतप्रज्ञ प्राज्ञमतें पुरुष तो जगीं थोर! ॥ कर्ण० ४१-४४ ॥**

ही थोर मनुष्याची व्याख्या अत्यंत व्यापक आहे. हा सिद्धांत खरा आहे व विचारी माणसें तो लक्ष्यांत ठेवतीलच. पण प्रश्न असा निघेल कीं आबालवृद्धांना पांडवांबद्दल प्रेम वाटतें व कौरवांबद्दल नैसर्गिक द्वेष कां वाटतो? याचें कारण उघडच आहे कीं मूळापासूनच कौरवांचा पक्ष खोटा होता. धृतराष्ट्र अंध असल्यामुळें त्यानें धर्मराजाला युवराज केलें. कौरव पांडवांचा द्वेष, छळ व मत्सर करूं लागले; त्यांनीं कपटद्यूत खेळून पांडवांना वनवासांत पाठविलें. दुःशासनानें द्रौपदीचें सभेंत वस्त्रहरण करावयाचा प्रयत्न केला इत्यादि प्रकारांवरून कौरव द्वेष्य झाले. धर्माची नीति चांगली असल्यामुळें व पांडव परोपकारी असल्यामुळें ते लोकांना प्रिय झाले, भीष्म, व्यास, द्रोण, विदुर, धौम्य इत्यादि ज्ञानी व तपस्वी पुरुष त्यांच्यावर प्रेम करूं लागले, व सर्वांत मुख्य मुद्दयाची गोष्ट ही कीं, श्रीकृष्णपरमात्म्यावर त्यांची अढळ निष्ठा होती व उलट कृष्णानें त्यांना आपले ह्मटलें होतें! कर्मे दोषरूप असणारच, व पांडवांचीं सर्व कर्मे निर्दोष नाहींत, तथापि धर्मसंस्थापनार्थ अवतरलेल्या प्रभूला त्यांनीं आपल्या हृदयमंदिरांत निरंतर ठेवलें होतें. 'ज्याचा सखा हरि। त्यावरि विश्व कृपा करी,' हा नित्यनियम आहे, ह्मणून सर्व भावें श्रीकृष्णपरमात्म्याला शरण जाऊन कालकर्मानुसार होणारीं बरीं वाईट सर्व कर्मे त्याला अर्पण करीत असावें हेंच सर्व भारताचें सार आहे. मूळ भारताचें रहस्य पंतांना उत्तम प्रकारें समजलें होतें, व त्यांतील मुख्य धोरण त्यांनीं

आपल्या भारतांत आणलें हें पाहून मला फार आनंद होतो. महाभारताशीं प्रथम परिचय करून देणाऱ्या महाकवि मोरोपंतांना भक्तिपूर्वक शतशः प्रणाम करून व महाभारत ग्रंथाच्या व भारतीयोद्धयांच्या जन्मभूमींत ह्मणजे भरतखंडांत जन्म दिल्याबद्दल श्रीकृष्णपरमात्म्याचें मदानंदितांतःकरणानें सप्रेम स्मरण करून मी मोरोपंती महाभारताची रजा घेतों.

---

# प्रकरण सोळावें.



## संतवर्णनपर प्रकरणें.

**भक्तांसि ख्याति नको, परि आपण पांडुरंग वाढवितो ।**
**प्रेरुनि भक्त यश जगीं संसारांतूनि जीव काढवितो ॥ ४९ ॥**

पांडुरंगदंडक.

१ 'संत होवोनीयां संतांसीं पहावें.' २ पंतांचें संतपण. ३ पंतांचीं संतवर्णनपर प्रकरणें. ४ त्यांचें वर्गीकरण. ५ त्यांचा रचनाकाल व पंतांचें उत्तरवय. ६ पंढरपूर, पुंडलीक व पांडुरंग. ७ संतमहिमा. ८ सन्मणिमाला. ९ हिंदुस्थानी संत. १० ज्ञानेश्वर. ११ नामदेव. १२ एकनाथ. १३ तुकाराम. १४ रामदास. १५ महिपती. १६ अलीकडची तुलनापद्धति. पंतांची रामदास व तुकाराम यांशीं तुलना कां होत नाहीं ? १७ पंतांची भूमिका. १८ पंत आणि पंडितः सादृश्य. १९ पंत आणि पंडितः वैसादृश्य. २० पंतांचा पंडितांच्या कवितेवर अभिप्राय. २१ पंत आणि मुक्तेश्वर.

१ मोरोपंतांनीं अर्वाचीन साधुसंतांवर जीं प्रकरणें रचिलीं आहेत तीं फार महत्वाचीं आहेत. त्या प्रकरणांवरून पंतांचा मराठी कवितेवर केवढा जबर व्यासंग होता, त्यांनीं पूर्व कवींचीं काव्यें किती मार्मिकपणानें, श्रद्धेनें व निर्मत्सरबुद्धीनें वाचलीं होतीं, व त्यांनीं दिलेले अभिप्राय किती यथार्थ आहेत हें कळून येतें. एका कवीचा दुसऱ्या कवीविषयीं काय अभिप्राय होता हें जाणण्याची इच्छा मनुष्यमात्रांत असते. समविद्य, समरसिक, समाधिकारी पुरुषांचे परस्परांविषयीं असलेले ग्रह समजण्याची सामान्य जनांस आवड असते, याचें कारण उघडच आहे कीं, ते जसे एकमेकांची वास्तविक योग्यता जाणूं शकतात तशी प्राकृतजनांस ती कळत नाहीं. एका मल्लाचें डावपेंच दुसरा मल्लच जाणूं शकतो. सिंहाचें सामर्थ्य सशास कळणार नाहीं, वीराचा पराक्रम भ्याडास समजणार नाहीं, बृहस्पतीची योग्यता मूढास ओळखतां येणार नाहीं, कवीची परीक्षा कवीवांचून इतरास होणार

नाहीं, संताला संतावांचून कोणी जाणणार नाहीं ! " विंध्यास मेरु, मेरुसि विंध्यचि जाणे, न अन्य खग नीच " ( कर्णपर्व २७-१७ ) हेंच तत्व सर्वत्र लागू पडतें. ह्यासाठीं थोर पुरुष एकमेकांविषयीं काय ह्मणतात हें प्राकृतजन कुतूहलबुद्धीनें ऐकतात.

२ मिल्टन कवीनें शेक्स्पीअरचें जें स्तोत्र गायिलें आहे, किंवा वर्डस्वर्थनें मिल्टनचें स्तवन केलें आहे, त्याचें महत्व इंग्रज लोक याच दृष्टीनें फार मानतात. संस्कृत कवि बाणभट्ट यानें पूर्वकवींची केलेली स्तुति अशीच महत्वाची लेखतात. एकनाथानें ज्ञानेश्वरांच्या ओवीला 'अमृताचें ताट' ह्मटलें आहे, मुक्तेश्वरानें ज्ञानेश्वराला प्राकृत कवीश्वराचार्य ही पदवी देऊन त्याच्या 'अगाधसिंधूसारख्या बुद्धिगांभीर्याची' महती गायिली आहे, तुकारामानें एकनाथास 'बसवंत खेळिया' ह्मणून त्यानें 'अनंत लोक खेळकर केले' ( परमेश्वरभजनीं लाविले ) ह्मणून त्याची स्तुति केली आहे, वामन पंडितानें तुकारामाच्या वाणींत 'शुद्ध वेदांत' भरला आहे ह्मणून त्याच्या अभंगाचें गौरव केलें आहे, होनाजी बाळानें 'फंदी अनंत कवनांचा सागर' ह्मणून अनंतफंदीचे गुण गाइले आहेत. ह्याप्रमाणें बरोबरीचे लोक जेव्हां एकमेकांविषयीं आपले अभिप्राय प्रकट करितात, तेव्हां त्यांची योग्यताच कांहीं निराळी असते. ह्या तत्वाप्रमाणें स्वतः दांडगे कवि, परम रामभक्त, निस्सीम विद्याव्यासंगी व उत्तम रसिक असे जे मोरोपंत त्यांनीं पूर्व मराठी कवि व संत यांच्याविषयीं जे उद्गार काढले आहेत ते तसेच महत्वाचे मानले पाहिजेत. शिवाय ह्या संतप्रकरणांत मोरोपंतांनीं साधुसंतांचीं निव्वळ स्तवनेंच केलीं आहेत असें नाहीं, तर त्यांच्या चरित्रांतील ठळक गोष्टी, त्यांच्या काव्यांतले व आचरणांतले विशेष इतक्या स्पष्ट तऱ्हेनें व मार्मिकपणानें सांगितले आहेत कीं, या प्रकरणांतली प्रत्येक आर्या अर्थपूर्ण अशीच उतरली आहे. कोणाचें ज्ञान, कोणाची भक्ति, कोणाचा योग, कोणाच्या सिद्धि, कोणाचें कवित्व, कोणाचें पांडित्य, याप्रमाणें प्रत्येक साधूचे विशिष्ट गुण, प्रसंगीं सोपपत्तिक व सोदाहरण सांगून ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, कबीर, तुकाराम, रामदास, वामनपंडित, महिपति वगैरे परम विख्यात साधूंचीं कार्यें पंतांनीं निर्भेळपणानें व पृथक्त्वानें सांगितलीं आहेत ! हीं सर्व प्रकरणें फार बारकाईनें वाचून पहावीं ह्मणजे मोरोपंतांच्या गुणदोषविवेचनसामर्थ्याचें व

शोधकपणाचें पराकाष्ठेचें कौतुक वाटल्यावांचून राहणार नाहीं. पंतांनीं को-णाचे दोष उघड केले नाहींत, कारण कठोर टीकाकारांच्या मालिकेंत पड-ण्याची त्यांची इच्छा नव्हती. फक्त गुणाकडे दृष्टी ठेवून स्वोन्नत्यर्थ त्यांनीं हीं संतस्तोत्रें गायिलीं आहेत. त्यांनीं मधुकरवृत्ति पत्करल्यामुळें प्रत्येकाचे विशिष्ट व उत्कृष्ट गुण तेवढा वर्णिले आहेत. उत्कृष्ट भक्ति, रसिकता व अस्सल मा-धुत्व या तीन श्रेष्ठ गुणांनीं त्यांची मधुर मूर्ति विधात्यानें घडविली होती. 'साधु दोष असतांही आत्मानुभवें राममय सृष्टि' पहातो असें त्यांचें मत (नामरसायन ११५) असल्यामुळें त्यांनीं कोणाच्या दोषांकडे लक्ष दिलें नाहीं, इतकेंच काय पण सर्व कवींस व संतांस आत्माधिक मानून स्वतःकडे अत्यंत लघुत्व घेण्यास ते नेहमीं तत्पर असत. 'हरिदासातें निंदिति हरि-दास–नव्हे नवीच हे रीति' (रामगीति ५२) हें व्यवहारांतलें तत्व त्यांना माहीत होतें. एकाच धंद्यांतले व एकाच पेशाचे लोक प्रायः परस्परमत्सरी असतात. एक हरिदास दुसऱ्या हरिदासाची निंदा करितो, एक पुराणिक दुसऱ्या पुराणिकाची नालस्ती करितो, एक शिक्षक दुसऱ्या शिक्षकाची कुचे-ष्टा करितो, एक लेखक दुसऱ्या लेखकाची टवाळी करितो, एक वक्ता दुस-ऱ्या वक्त्यास मोडतो, असा साधारण नियम आहे. पण हा नियम साधूंस मात्र लागू नाहीं. मत्सरपिशाच प्रवृत्तिपरांस पछाडते, निवृत्तिपरांवर त्याची मात्रा चालत नाहीं. बाजीराव व श्रीपतराव, नाना व सखारामबापू, संताजी व धनाजी हे परस्परनाशास टपलेले असतात; प्राकृत लेखकही एकमे-

१ मोरोपंतापूर्वीपासून साधुसंतांचीं पवित्र चरित्रें अनेक कवींनीं गाइलीं आहेत. ना-मदेवानें रचलेले ज्ञानेश्वराची आदि व समाधि यावरचे अभंग; एकनाथकृत ज्ञानेश्वर-स्तव; अमृतरायकृत दामाजीपंतांचा रसद; उद्धवचिद्घनकृत भक्तचरित्रें; रामदास, ज-यरामस्वामी वगैरेंच्या बखरी; देवदासकृत संतमालिका; अनेक कवींनीं ज्ञानेश्वर, तुका-राम, एकनाथादि कवींवर प्रसंगोपात्त रचलेलीं स्तोत्रें; निरंजनमाधवकृत ज्ञानेश्वरवि-जय, व प्रख्यात संतचरित्रकार महिपतीबोवा यांचीं भक्तविजय, संतविजय, वगैरे संतचरित्रें हीं सर्व मोरोपंतांच्या संतस्तवनापूर्वीं रचलेलीं आहेत. हीं पंतांच्या पहाण्यांत आलीं असावींत असें वाटतें. पंतांनीं संतस्तवनें दोन हेतूंनीं केलीं. एक तर साधुचरित्र-गानानें त्यांनीं आपली चित्तशुद्धि केली व ज्यांचे ग्रंथ त्यांनीं जन्मभर वाचले त्यांचें स्तवन करून आनृण्य जोडलें व दुसरें 'अद्भुत सुकृत न गातां साधूंची रीत आळसें बुडते' या न्यायाप्रमाणें साधुचरित्रांचा जनांपुढें किस्सा निरंतर रहावा म्हणून तीं रचिलीं.

यांच्या कार्यामध्यें विघ्नें आणतात; पण ज्ञानेश्वर नामदेवास, तुकाराम रामदासास, मोरोपंत महिपतीस आपल्यापेक्षां अधिक मानून गौरवितात. निव्वळ प्रापंचिक व शुद्ध पारमार्थिक पुरुषांत हा भेद आहे. हा भेद लक्षांत आणला ह्मणजे साधुसंतांचें वर्णन परम विनयानें, भक्तीनें, व उदारपणानें करणारे मोरोपंतही साधुकोटींतलेच होते हें कोणाच्याही लक्षांत येणार आहे.

३ मोरोपंतांची संतांवर किती प्रकरणें आहेत व तीं कोणतीं याचा प्रथम विचार करूं. काव्यसंग्रहांत वामनरावजी ओक यांनीं या सदराखालीं २० प्रकरणें छापलीं आहेत. त्यांचा तपशील:—

१ सन्मणिमाला ११०. २ ज्ञानदेवस्तव १२. ३ चांगदेवस्तव. ४ नामदेवस्तव १३. ५ कबीरस्तव १०. ६ नरसीमेहतास्तव १२. ७ एकनाथस्तव १६. ८ नाथस्तव २४. ९ रामदासस्तव ११. १० वामनपंडितस्तव १३. ११ तुकारामस्तव ३१. १२ तुळसीदासस्तव १४. १३ माधवदासस्तव १७. १४ महिपतीस्तव १३. १५ वामनादिकीर्तन ४. १६ साधुस्तव ८. १७ सत्संगस्तव ६०. १८ साधुरीति ५०. १९साधुसत्कार ३९. २०सद्वर्णन२९.

हीं सर्व प्रकरणें पंतांच्या हस्ताक्षरांत मीं पंढरपुरीं पाहिलीं, पण तेथील संग्रहांत दुसरा 'नाथस्तव' नाहीं. तो पंतांचा नसून त्यांचा पुतण्या बाळाजीपंत आप्पा याचा आहे. हा दुसरा स्तव बराच नीरस आहे व कांहीं व्याकरणाच्या चुकाही त्यांत आहेत, तरी तो टाकाऊ नाहीं. 'श्रीएकनाथसदनीं माधवजी सर्व काम हें करितो' ही लोकप्रसिद्ध आर्या या दुसऱ्या प्रकरणांतली आहे, अर्थात ती बाळाजीपंतांची आहे. तसेंच 'शुकाचार्य योगालाबू पोटीं धरून तरले, पण नाथ तर भवप्रस्तर धरून तरले. तस्मात् त्यांची योग्यता अधीक आहे' या अर्थाची मनोहर आर्याही याच प्रकरणांतली आहे. असो. हें प्रकरण पंतांचें नसल्यामुळें तें वगळलें पाहिजे. तें वगळलें ह्मणजे १९ प्रकरणें ( ग्रंथसंख्या ४७० ) या सदराखालीं काव्यसंग्रहांत छापलीं आहेत. मला वाटतें संतप्रकरणें यापेक्षां अधिक आहेत. पंत स्वर्गवासी

१ पुष्ट करावें अन्य ग्रंथा सुरसें जसे सुता रोडा।
ऐसा हरिहरभक्तांवांचुनि विश्वांत पाहतां थोडा!॥
रामरीति १७

झाल्यावर लौकरच विठोबा ताहारावादकर यांनीं बाळाजीपंतांस एक पत्र लिहिलें आहे, त्यांत ते ह्मणतात ' श्रीमहाराजांहीं सहस्र आर्या संतांवर केल्या ह्मणोन ऐकिलें त्यास तें प्रकरण आह्मांकडे आलें नाहीं. स्वामी पाठविणार होते.' यावरून पंतांनीं संतांवर हजार आर्या केल्याची प्रसिद्धि फार मागची आहे हें उघड आहे. काव्यसंग्रहानें तर ४७८ आर्या सदर मथळ्याखालीं छापल्या मग बाकीच्यांची वाट काय? बाकीच्या, मला वाटतें कांहीं गैरसमजानें भलतीकडे छापल्या आहेत व कांहीं उपलब्ध झाल्या नाहींत. असो. माझ्या मताप्रमाणें खालील प्रकरणें संतप्रकरणांत गोवलीं पाहिजेत:—

१ पंढरीमाहात्म ८०. २ पांडुरंगदंडक ५६. ३ विठ्ठलप्रणिधि ४२. ४ विठ्ठलस्तोत्र १२. ५ विठ्ठलस्तुति ९. ६ विठ्ठलविज्ञापना ६७. ७ विठ्ठलपदपद्मस्तुति ६. ८ इष्टिकास्तुति ११. ९ विठ्ठलभक्तस्तुति १२. १० पुंडरीकप्रार्थना ३७. ११ महद्विज्ञापना १४५. १२ स्मरणी १३. १३ विठोबादादांवर आर्या ८.

या तेरा प्रकरणांपैकीं नववीं ' विठ्ठलभक्तस्तुति ' हें विठोबादादाचें स्तवन आहे हें मागें ' मित्रमंडळ ' प्रकरणांत सांगितलें आहे. पहिल्या आठ प्रकरणांत श्रीविठ्ठलाची व पंढरीची स्तुति आहे, तरी अर्वाचीन संत ज्ञानेश्वरतुकारामादिक यांचेंही वर्णन त्यांत फार वेळ येतें ह्मणून व संतांचें मुख्य आराध्यदैवत पांडुरंग आहे ह्मणून हीं प्रकरणें संतवर्णनपर प्रकरणांतच घालणें योग्य आहे. दहावी पुंडरीक प्रार्थना ही संतप्रकरणांतच घ्यायला पाहिजे, कारण पुंडरीक हा अर्वाचीन संतांचा मुकुटमणि आहे. अकरावी ' महद्विज्ञापना ' या प्रकरणांत प्रल्हाद, नारद, ध्रुव, व्यास, वाल्मीकी हे प्राचीन संत व पुंडरीक, ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ वगैरे अर्वाचीन संत या उभयतांची विज्ञापना केली आहे व सन्मणिमालेच्या ११० व्या आर्येप्रमाणें या प्रकरणांतही पंतांनीं प्राचीन व अर्वाचीन संत यांचा मिलाफ केला आहे. या दोन कारणांमुळें हेंही प्रकरण संतप्रकरणांतच घेतलें पाहिजे. (मागें पृष्ठ २९१–२९३ पहा.) बारावें प्रकरण ' स्मरणी.' ह्या स्मरणींतही संतस्तवन आहेच. पंतांनीं संतांची स्मरणी (जपमाळ) कंठीं धारण केली होती.

४ याप्रमाणें हीं संतवर्णनपर प्रकरणें ३२ आहेत व सर्व मिळून पद्यसंख्या जवळ जवळ एक हजार आहे. ही संख्या अगदीं नियत आहे असें कोणी समजूं नये. अद्याप अनुपलब्ध अशीं आणखी कांहीं संतप्रकरणें असूं शकतील. मोरया गोसावी यांजवर कोणी रचलेल्या ३५ आर्या पंतांच्या ह्मणून

एकानें मजकडे पाठविल्या आहेत. पण त्या पंतांच्या नाहींत असें मला निभ्रांत वाटत असल्यामुळें मी त्यांचा या यादींत समावेश करीत नाहीं. मोरोपंतांचा जन्म मोरेश्वरप्रसादानें झाला असून ' दूर्वासहस्रादि ' मोरेश्वरस्तवनपर त्यांचीं कांहीं प्रकरणें आहेत, बारामतीहून चिंचवड दूर नाहीं, व बहुतेक तीर्थें व देवस्थानें यांच्या दर्शनास पंत जात यामुळें पंतांचें मोरयावर एक स्वतंत्र प्रकरण असेल हें मात्र संभवनीय आहे. तसेंच पंतांनीं आपले गुरु गणेशपाध्ये यांजवर एक प्रकरण केलें असून तें कोल्हापुरीं एका गृहस्थानें प्रत्यक्ष पाहिल्याबद्दल मला सांगितलें आहे. याप्रमाणें ज्या ज्या गृहस्थाकडे जें जें प्रकरण पंतांनीं पाठविलें तें तें त्याकडे तसेंच राहिलें असण्याचाही पूर्ण संभव आहे. पंतांच्या सन्मणिमालेंत बहुधा एकेका साधूला एकेक आर्या दिली आहे, त्या मणिमालेंतले जे लोकोत्तर तेजाचे मोठाले मणि पंतांना आवडले त्यांवर त्यांनीं पृथक तेरा स्तोत्रें केलीं आहेत. निबंधमालेच्या ८७ व्या अंकांतल्या एका पत्रांत वामनरावजी ओक लिहितातः 'मोरोपंतांनीं सन्मणिमालेंत अनेक साधूंचीं वर्णनें केलीं आहेत. त्याशिवाय तुळशीदास, नामदेव, रामदास, तुकाराम, एकनाथ इत्यादिकांचीं स्वतंत्र वर्णनेंहीं केलीं आहेत......मोरोपंतांनीं ' बृहत्सन्मणिमाला ' या नांवाचा एक विस्तृत वर्णनपर ग्रंथ केला असून तो ग्रंथ त्यांच्या वंशजांकडे पंढरपुरीं आहे व तो येथील ( नागपूरस्थ ) एका गृहस्थानें स्वतः पाहिलाही आहे. ' ही वर नामकरण केलेली बृहत्सन्मणिमाला पंढरपुरीं पंतांच्या दप्तरीं नाहीं, चातुर्मास यांच्याही दप्तरीं नाहीं, अन्यत्रही कोठें माझ्या पाहण्यांत किंवा ऐकण्यांत नाहीं. वर जीं ज्ञानेश्वरादि तेरा संतांचीं पृथक स्तोत्रें सांगितलीं त्यांनाच नागपूरस्थ गृहस्थानें बृहत्सन्मणिमाला हें नांव दिलें असेल. कसेंही असो. त्यानेंच सुचविलेलें नांव ' बृहत्सन्मणिमाला ' या तेरा प्रकरणांना द्यायला कांहींच हरकत दिसत नाहीं. या एकंदर ३२ प्रकरणांचें वर्गीकरण केलें तर तें असें होईल:—

( क ) संतदैवत पांडुरंगपर. ८ ( ख ) संतनगरी पंढरीपर. १
( ग ) संताग्रणी पुंडरीकपर. १ ( घ ) संतमाहात्म्यपर ५
( च ) सन्मणिमाला व स्मरणी. २ ( छ ) बृहत्सन्मणिमालांतर्गत संतस्तवनें १५

याप्रमाणें संतप्रकरणांचें नियमन झालें. आतां पंतांनीं साधुसंतांवर काय काय अभिप्राय दिले आहेत याचा विचार करूं.

५ या भागांतील बहुतेक प्रकरणें पंतांनीं उत्तरवयांत लिहिलीं आहेत. पंतांचें मंत्रभागवत चाललें होतें तेव्हां ' विठ्ठल विज्ञापना ' हें सुरस स्तोत्र पंतांनीं लिहिलें आहे असें या स्तोत्रांतल्याः—

**शुकसा मोरहि तुझे लागला यश गावया ।**
**जाणोनि दुर्लभतरा या काळवशगा वया ॥ ६५ ॥**

या श्लोकावरून वाटतें. तसेंच ' मंत्रभागवत ' पुरें झाल्यावर ' तुकारामस्तुति ' केली असें 'प्रभुचा प्रसाद अद्भुत बहुमत केला शुकापरिस मोर ' या स्तोत्रांतील आर्याधावरून वाटतें. विठ्ठलस्तुतिपर व संतवर्णनपर बहुतेक सर्वच प्रकरणें या उत्तरवयांत पंतांनीं केलीं आहेत. पंताच्या पद्धतीप्रमाणें विठलस्तुतिपर प्रकरणें त्यांनीं पंढरीस विठलासन्निध राहून केलीं आहेत. त्यांनीं संस्कृत पांडुरंगस्तोत्रांत ' भो श्रीमद्विठ्ठल ! श्रीपतिमतिथिरहं त्वामुपेतो स्मि, ' ' को ब्रूयात्साक्षिणस्ते पुर इह वितथं ' असे उद्गार काढले आहेत. त्यावरून हें स्तोत्र पंतांनीं श्रीविठ्ठलासमोर रचून ह्मटलें हें स्पष्ट होतें. यांतच ' मह्यं देहि प्रभो ! स्वस्तवकवनवरं स्वस्य च प्रीतिहेतुं ' असा विठ्ठलापाशीं वर मागितला आहे. पंत पंढरीस कीर्तनें करीत व कीर्तनप्रसंगीं स्वकृत आर्या वगैरे ह्मणत असें ' भक्तमंजरीमालाकार ' ही ह्मणतातः-

**असो पंढरीस मोरोपंडित । कीर्तन केलें स्वकाव्योक्त ।**
**वाळुवंटीं अनेक संत । बैसले समस्त श्रवणार्शीं ॥ १ ॥**
**तये कथेचा अधिक रंग । कीर्तनीं उभे रमारंग ।**
**वक्तृत्वाचा रस अव्यंग । धन्य भाग्य त्या श्रोत्यांचे ॥ २ ॥**

६ महाराष्ट्रांतील संतांचें आदिपीठ पंढरपूर होय. श्रीपंढरीचें वर्णन पंत करितातः—

**पंढरि ! तुजमाजि सदा भगवत्कीर्तनमहोत्सव व्यक्त ।**
**भक्तस्त्रीशूद्रजनहि बहु अंत्यज यवनही तदासक्त ॥ १ ॥**
**वीणातालमृदंगध्वनि विठ्ठलरामकृष्ण हा घोष ।**
**तोष श्रवणीं देशी श्रीपंढरी ! हरिसि सर्वही दोष ॥ २ ॥**

पंढरीला ' भक्तिसुखनि, ' ' साधुसभेचें माहेर ' ह्मणून पंतांनीं प्रेमानें वानिलें आहे. ' अवशीं रात्रि पहाटे प्रातःकाळीं दिसा सदा सांज ' विठ्ठलनामाच्या जयघोषानें पंढरी दुमदुमलेली असते. ज्यांच्या कंठीं तुळसीमाळा भाळीं बुक्का व मुखीं ' विठ्ठलरखुमाई 'चा घोष असे देवरूप वारकरी यांचे

तोंडून संतांचे अभंग दरक्षणीं ऐकूं येतात, भरतखंडांत पंढरीसारखें भक्ति-सुख प्रसवणारें अन्य क्षेत्र नाहीं, अशा प्रकारें पंतांनीं पंढरीचें स्तवन केलें आहे. पांडुरंग अठरापगड जातींचा व भाळ्याभोळ्यांचा कैवारी आहे, व त्याच्या पायांवर मस्तक ठेवून कृतार्थ होण्याचा हक्क सर्व आर्यांस आहे. बारा महिने अठरा काळ पंढरीस परमेश्वराचें भजन होत नाहीं असा एक क्षणही सांपडणार नाहीं. आषाढीकार्तिकींत तर दोनदोन लाखयात्रा वाळवंटांत भजनानंदांत मग्न होऊन गेलेली दृष्टीस पडते. क्षणैक तरी देहगेहादिकांची विस्मृति सर्वांस पडते. वारकऱ्यांचे ताफे रंगांत येऊन नाचाउडायला लागले कीं पाखांडीही विरघळून जातो. मोठमोठ्या वक्त्यांचें वक्तृत्व, उत्कृष्ट गायकांचे आलाप, नामांकित नटांचे हावभाव हे सर्व एकत्र केले तरी पंढरीस दिसून येणाऱ्या उल्हासाच्या, भक्तीच्या, व एकात्मतेच्या पासंगालाही ते पुरणार नाहींत असें मी स्पष्ट ह्मणतो ! पंत पंढरीस दहा पांच वेळां तरी येऊन गेल्याचा दाखला सांपडतो, कदाचित दरसालही ते पंढरीस जात असतील. स्वानुभवामुळें पंतांनीं पंढरीचें वर्णन यथार्थ केलें आहे. पितृभक्त पुंडलीकाचें दर्शन घेऊन पांडुरंगाचे दर्शनास जावें, ह्मणजे महाद्वार ओलांडतांच प्रथम चोखामेळ्याची समाध व नामदेवाची पायरी लागते. मंदिरांत जातांच चित्त प्रसन्न होतें ! ' ऐसें स्थळ नाहीं कोठें । उभाउभी विठ्ठल भेटे ' हें तुकोबांचें वचन सत्य आहे. देवदर्शन होतांच भाविकाचें चित्त तल्लीन होतें. पुंडलीकानें पितृभक्तीच्या जोरावर २८ युगें विटेवर उभी केलेली भगवन्मूर्ति ती हीच ना? नामदेवाबरोबर जेवणारा, जनाबाईला दळायला लागणारा, चोख्यामेळ्याची केळें खाणारा, एकनाथाच्या घरीं बारा वर्षे कावडीनें पाणी वाहणारा, नरहरीसोनाराला करगोटा लावतांना हरिहरांची एकात्मता शिकविणारा, तुकारामाच्या वह्या उदकांत रक्षणारा, रामदासास ' राम विठ्ठल एक ' असें सप्रत्यय सांगणारा, कान्हूपात्रेस निजपदीं वास देणारा, संसारतापदग्ध अशा लक्षावधि जीवांस दर्शनानेंच पावन करून कृतार्थ करणारा त्रैलोक्याचा नाथ, साळ्याभोळ्यांची वात्सल्यकथा प्रेमानें पिणारा जगत्पिता, दुर्वासनासंचयाची होळी करून भक्तिरसाचे कल्लोळ हृदयांत उत्पन्न करणारा दीनबंधु; असंख्य जीवांची माय; मातापिता, बंधुभगिनी, गुरुमित्र, पुत्रकलत्र इत्यादिकांचें निर्मळ प्रेम ह्मणजे ज्याच्या दयासागराचा एक बिंदु असा, वेदांनीं स्तविलेला, ऋषींनीं गाइलेला, योग्यांनीं ध्यायिलेला, भक्तांशीं खेळणारा, भगवान् पांडु-

रंग तो हाच ना? असे विचार 'भक्तीचा जिव्हाळा जाणणाऱ्या देवाच्या पुतळ्या'च्या मनांत येऊन विठ्ठलाला पाहतांच त्याचा देहभाव हरपून जातो, त्याचें मन आनंदतें, त्याचे लोचन प्रेमानें पाझरतात! अशा अनुपम आनंदाचा ठेवा पैदा करून देणारा महात्मा तरी कोण बरें! पंत ह्मणतातः—

**पुंडलिकानें केला ऐसा कोणींहि धर्मनय नाहीं।**
**कीं दीनबंधु घेती भेटुनि पाहोनि शर्म नयनांहीं! ॥ १ ॥**
**भूतदया याचीच, प्राणी तरतात याचियाच वरें।**
**पंढरि! शुद्ध यशाचीं उडति शिरीं फार याचिया चवरें, ॥ २ ॥**

जड जनतेच्या उद्धारासाठीं पुंडलीकानें उभा केलेल्या पांडुरंगाचा दंडक तरी काय? पंत सांगतात:—

**जरि बोबडे पित्याचें मोहावें मन तथापि तोकानें।**
**प्रभु साळ्याभोळ्याची वात्सल्यकथा तथा पितो कानें ॥ २॥**
**भक्तयशःस्वयशांतें गाऱ्याच्या ठाकतो पुढें मागें।**
**डोलतसे परमसुखें डोलावें सुस्वरें जसें नागें ॥ २ ॥**
**नमनें स्मरणें स्वयशःश्रवणें निःशेष दोष वारावे।**
**हा पांडुरंगदंडक! जीव जड प्राज्ञ सर्व तारावे!! ॥ ३ ॥**

याप्रमाणें संतनगरी पंढरी, संतदैवत पांडुरंग, व संताग्रणी पुंडरीक यांविषयीं पंतांनीं लिहिलें आहे. आतां पंत सामान्यतः संतांविषयीं काय ह्मणतात हें आधीं सांगून मग विशिष्ट संतांविषयीं पंतांचे अभिप्राय काय आहेत तिकडे वळूं.

७ संतसंगाची महती सर्वच मराठी कवींनीं फार प्रेमळपणानें गाइली आहे. बहुतेक मराठी कवी स्वतः संत होते व खऱ्या संतांच्या संगाचें सुख सर्वांना अनुभवायला सांपडलें होतें, यामुळें त्यांना सत्संगाची थोरवी वर्णितां आली. गेल्या पांच सहाशें वर्षांत महाराष्ट्रांत संतांचा पाऊस पडला होता! संत ह्मणजे ज्यांनीं तनुमनधन भगवंताला वाहिलें असून जे हरिरूप होतात व सर्व ब्रह्मांड ज्यांना हरिरूप दिसतें ते होते. या संतांचा जन्म परार्थ असतो व जीवांची आत्मिक उन्नति व्हावी यासाठीं हे झटतात:—

---

**१ जो जाणेल भगवंत। तया नांव बोलिजे संत।**
**जो शाश्वत आणि अशाश्वत। निवाडा करी ॥**

रामदास.

**साधु, प्राणी पाहुनि संसारीं तापले, असुख पावे ।**
**व्हावें जग मुदित, ह्मणे, ' तद्दुःखें आपुले असु खपावे ' ॥ १ ॥**

भगवंतावर पुरी श्रद्धा असल्यामुळें लोकनिन्देला ते भीक घालीत नाहींत. 'निस्सीम छळ सोशी, पोसी सत्यासि, संकटीं धीट ' असे परोपकारी व धैर्यवान् पुरुष ह्मणजे संतच होत. संत परम दयाशील असतात. ' संतांच्या करुणा वसे सदा आंत बाहेर. ' अशा संतांचा शेजार मिळाला तर जन्ममरणाख्य महाव्यसन जीवांस बेजार करीत नाहीं. संतांचे दर्शनच पापराशिनाशक आहे. ' हरितां दर्शनमात्रें सर्वांच्या पापतापदैन्यांतें. ' संत भवतमाचा संहार करून आत्मरूपाचें दर्शन करवितात. संतांचें नामही पापनाशक असतें ह्मणून त्या नामांनही मंत्रसामर्थ्य येतें. पंत ह्मणतात कीं सदनुग्रहावांचून भगवंताचा अनुग्रहच होत नाहीं:--

**न भागवत भेटतां न घडतांहि सत्संगती**
**न अन्नहृदयें तशीं नव यशोरसीं रंगती ॥ केका. ११६**

तीर्थांनाही तीर्थरूपत्व साधूंच्या संगानें येतें. साधुसंग जीवांना इहपरलोक कसे साधावेत हें शिकवितो. ' परमार्थव्यवहारीं करितो पटु साधुसंग हा पंत ' हा जाड्य हरितो, सद्बुद्धीचा मोड वाढवितो; ईश्वरप्राप्ति करून देतो. साधूंच्या संगतीनें ' अघ शमतें, सुख गमतें, मन रमतें जीवि दिव्यसंगीनीं. ' याप्रमाणें सत्संगाचें वर्णन पंतांनीं नामीं केलें आहे. आणखी ते ह्मणतात:--

**सत्संगमींच नाना दुःखार्त तथापि चित्त रंगतसे ।**
**जलनिधितरंग वातें, सत्संगें उठति चित्तरंग तसे ! ॥ १ ॥**
**सत्संग असें ह्मणतो कीं ' जो बालक करील 'आ' स्यां तें ।**
**धावें अमृत, प्राशुनि जें न पुन्हां आदरील आस्यातें! ' ॥ २ ॥**
**आह्मां बाळांसि बळें स्वहित तुह्मीं संत पंत पढवीतां ।**
**आत्मपदीं कर धरुनि प्रेमें आग्रह करूनि चढवीतां ॥ ३ ॥**

या तीनही आर्या अर्थपूर्ण आहेत. " सत्संगांत दुःखिताचेंही चित्त रमतें, सत्संगानें हृदयांत ज्ञानलहरी उठतात, सत्संग असें अमृत ( मोक्षरूप ) पाजतो कीं जीव पुन्हां मातृस्तनाचा स्वीकार करणार नाहीं, ( पुन्हां जन्मास येणार नाहीं; ) संत जीवांना खरें स्वहित सांगतात व योग्यता नसतांही आत्मपदीं ( आपल्या योग्यतेस अगर आत्मस्वरूपप्राप्तीस ) चढवितात. "

पंतांनीं शेंकडों आर्यांत सत्संगाचें स्तवन केलें आहे व या सर्वच आर्या अतिप्रेमळ व गोड आहेत. यांचा विस्तारानें विचार करायला अवकाशच नाहीं. मुमुक्षूनें त्या वारंवार वाचाव्यात ह्मणजे संतस्वरूपाची थोडीशी ओळख त्यास होईल. पंतांनीं केकावलींत ईश्वराजवळ वर मागतांना 'सुसंगति सदा घडो; सुजनवाक्य कानीं पडो' असें प्रथम मागितलें आहे. असो. आतां विशिष्ट संतांकडे वळतों.

८ प्रथम सन्मणिमाला या चिमुकल्या पण मनोहर काव्याचा विचार करूं. यांत पंतांनीं भरतखंडांतल्या अनेक संतांचा नामोच्चार व त्याबरोबर त्यांचे विशिष्ट गुण यांचें फार खुबीनें वर्णन केलेलें आहे. यांत ज्ञानेश्वरपंचायतन; रामदासपंचायतन; एकनाथ वामन, मुक्तेश्वर, श्रीधर वगैरे ब्राह्मण संत; मुक्ताबाई, जनाबाई, कर्माबाई, मिराबाई, वगैरे स्त्रीकवी; नामदेव, तुकाराम, सांवता-माळी, गोरा कुंभार, सेना नाहवी, नरहरी सोनार, चोखामेळा, रोहिदास चांभार, वगैरे ब्राह्मणेतर संत; कबीर, कमाल, बाजिदा पठाण, शेखमहंमद वगैरे यवन संत; नरसी मेहता, धना जाट, नर माधवदास, नानक, बिहारीलाल, वगैरे महाराष्ट्रेतर प्रांतांतील संत; रामानंद, हर्त्ताराम, मलुदास बैरागी, मानपुरी गोसावी वगैरे भिन्नपंथीय संत; फार काय पण निंद्यव्यवसायी कान्हुपात्रा, व सजणा कसाई यांसारखे संत—या सर्व जातींतल्या, सर्व धंद्यांच्या, सर्व पंथांच्या संतांची ही माळ रचून पंतांनीं आपल्या मनाची समता, निरभिमानता, व्यापकता व अस्सल साधुता व्यक्त केली आहे!! यांत पंतांनीं आपले समकालीन अमृतराय, शिवदिनकेसरी व प्रल्हाद बडवे यांसही घातलें आहे! 'हृदयास्मर त्यासि, असो श्री भगवद्भक्तजाति भलती बा' या एका अर्धावरून त्यांच्या मनाची किंबहुना आर्यसमाजाच्या मनाची उदारता व्यक्त होते. 'विभूतिमत्' सत्व तेवढा ईश्वरांश, या गीतावचनाप्रमाणें संतांची जातकुळी पहाण्याचें कारण नाहींच. संत 'विप्र गो कुंजर कुतरे घेड सम पाहतात' हें खरें आहे. या माळेंत मुकुंदराजाच्या योगसिद्धि; अमृतरायाची कीर्तनपद्धति; दासोपंताची दुस्तर गीताटीका; उद्धवचिद्घनाची काव्यमाधुरी, मोरया गो-

१ वस्तुतः संतस्वरूप अनिर्वचनीय आहे. संतांचें दर्शनही दुर्मिळ आहे. खऱ्या संतांचें दर्शन झाल्याशिवाय किंवा स्वतः संत झाल्याशिवाय संतस्वरूप कळणार नाहीं.

**बा संत देव, संतचि बांधव, गुरु संत, संत हे प्राण, ।**
**किंबहुना दाशार्हा ! विश्वात्मा मीच संत हे जाण ! ॥**
( मंत्रभागवत स्कंध ११–५४६ )

साळ्यांचे साक्षात्कार, आनंदतनयाचें यमकप्राचुर्य, विठ्ठलबीडकरांचीं चित्रकूटें, चोखामेळ्यानें महारांत भक्ति उत्पन्न केली तो प्रकार, योगीश्वरचर्पटानें परस्त्रीसौंदर्यानें भूललेल्या नेत्रांना अंध केलें ती गोष्ट, वगैरे प्रकार फार मार्मिकपणानें वर्णिले आहेत. टळक साधुकवींवरही यांत चांगल्या आर्या आहेतः—

**१ श्रीरामदाससेवारत तो भरतावतार कल्याण ।**
**दुर्वारकामसिंहीं ज्या वीरें घातलेंचि पल्याण ॥ १ ॥**
**उद्धवचिद्धन केवळ, मी मोर तयासमोर हर्षानें ।**
**तांडव करितों होउनि गतताप तदीयसूक्तिवर्षानें ॥ २ ॥**
**पुण्यश्लोकशिखामणि विठ्ठलपदभक्त बोधला गावा ।**
**ऐशा प्रेमळ साधुस्मरणें निजवस्तुशोध लागावा ॥ ३ ॥**
**जो भक्तिसरित्पूरीं षडरींची सर्व वाहवी सेना ।**
**रुचला मनास बहुतचि तो भगवद्भक्त नाहवी सेना ॥ ४ ॥**
**लाजविलेंचि निजयशें दुग्धाब्धितरंग रंगनाथानें ।**
**भक्तिज्ञानें ज्याची मति पोषी जोवि अंगना थानें ॥ ५ ॥**
**हरिविजयग्रंथातें मग आधीं श्रीधरासि वंदीन ।**
**शिववंदनकामांहीं लंघावा प्रथम देवनंदी न ॥ ६ ॥**
**साधु ह्मणावें ह्मणती नर माधवदास साधु याला जे ।**
**अतिसारीं पट ज्याचे न रमाधव दाससा धुया लाजे ॥ ७ ॥**

अंखेरच्या आर्येंत प्राचीन व अर्वाचीन सर्व संतांचा गुरु नारद यास सन्मणिमाळेचा मेरु ह्मणून अर्वाचीन संतांची

१श्रीधरावरच्या आर्येचे आजवर कित्येक पाठ लोक घेत असत. कोणी 'आधीं मग असा पाठ घेत, कोणी ' मग आधीं ' असा पाठ घेत. 'आधीं' नंतर ' मग ' घेतल्यानें पुढें जोडाक्षर असल्यामुळें गवर दोन मात्रा येतात त्या नको आहेत यामुळें पहिला पाठ सदोष ठरतो. तसेच कोणी ' लंघावा ' पाठ घेत; कोणी ' वंदावा ' घेत; कोणी ' देवनदीन ' असा एक शब्द घेत, कोणी द्वितीयार्धापुढें प्रश्नचिन्ह घालीत! या आर्येच्या अशा चिंधड्या उडवायचें आतां कारण नाहीं. कारण वर खुद्द पंतांच्या हातची आर्या लिहिलेली आहे तशीच दिली आहे. तेव्हां पाठभेदाकडे लक्षच द्यायला नको. आर्यार्थ स्पष्टच आहे. २ माधवदासावरच्या आर्येवर खुद्द पंतांची टीप अशी आहेः "माधवदास नर असे जे साधु ह्मणती ते साधु ह्मणावे. अशा सत्पुरुषास नर कसें ह्मणावें हा विचार ज्यास नाहीं ते साधु ह्मणावे जसे मढांस राजे ह्मणावे. अथवा ' नर ' नारायणसखा हाही अर्थ आहे."

ही सांखळी आदिसंत नारदापर्यंत भिडविण्यांत पंतांनीं जें चातुर्य प्रकट केलें आहे तें तर भारीच आल्हादप्रद आहे! या भिन्न वर्णांच्या व जातींच्या अष्टोत्तरशत मण्यांची माळ गुंफून 'रामसुत मोरानें थोर उल्हासानें प्रभुच्या कंठांत' घातली आहे. थोर पुरुषांस नैसर्गिक अशा विनयामुळें पंत स्वतःस या मणिमालेंत कसें गोंवतील? पण अखेरच्या आर्येंत त्यांनीं न कळत आपणास गुंतविलें आहे! अशा मण्यांची माळ प्रभूच्या कंठांत घालायचा अधिकार सामान्य मनुष्यास कसा असेल!! राजाशीं लडिवाळपणा किंवा सलगी राजपुत्राशिवाय दुसरा कोण करील? सन्मणिमाला प्रभूच्या गळ्यांत घालणारा पुरुष प्रभूच्या सलगींतला व प्रीतींतला ह्म० त्याचा भक्तच असला पाहिजे!!! हा अभिप्राय मनांत आणून परशुरामपंत तात्या ह्मणतात.

**घाली प्रभुच्या कंठीं सन्मणिमाला रचोनि जो भावें।**
**तेणें ही त्या सत्तममालेंतचि तन्समान शोभावें!॥ १ ॥**

९ कबीर, माधवदास, तुळसीदास, नरसीमेहता यांच्या स्तवनांवरून यांची कविता पंतांनीं खास वाचली होती असें वाटतें. कबीराच्या रामानंदानुग्रहाचें, त्याच्या उत्कट रामभक्तीचें, व त्याच्या 'परम चमत्कारवती साधुमता, श्रुतिसमा उक्तींचें'—त्याच्या लोकमान्य दोहऱ्यांचें—वर्णन पंतांनीं चांगलें केलें आहे. कबिराच्या दोहऱ्यांची पंतांना किती गोडी लागली होती. हें मराठींत अश्रुतपूर्व अशा त्यांनीं केलेल्या या वृत्ताच्या अनुकरणावरून उघड दिसतें. पंतांचीं दोन दोहारामायणें आहेत. दोहावृत्त मराठीभाषेंत पंतांनींच आणलें आहे. 'महाराष्ट्र भाषेंत हीं दोहागीति नवीच रची मयूरेश्वर इला मनीं धरील कवीच' [ विठ्ठलस्तुति ९ ] तुळशीदासाच्या रामायणाची प्रसिद्धि उत्तरहिंदुस्थानांत फार आहे, किंबहुना वाल्मीकिरामायणाच्या इतकें महत्वाचें तें मानतात व त्याचे पाठकही हजारो लोक आहेत तेव्हां त्याचीही पंतांनीं स्वतंत्र प्रकरणांत स्तुति करावी हें रास्त आहे. नरसीमेहता या नागर ब्राह्मणाचेंही पंतांनीं स्वतंत्र प्रकरण केलें आहे. याच्या मुलाच्या लग्नप्रसंगीं व मुलीच्या फलशोभनप्रसंगीं भगवान् स्वतः जपले असें सांगून पंतांनीं याच्या 'केदारगची' स्तुति केली आहे. आतां ज्ञानेश्वरादि मराठी संतकवींवर पंतांचे काय अभिप्राय आहेत तें पाहूं.

१० '**श्रीज्ञानेश्वर** साक्षात् भगवान् वैकुंठनाथ अवतरला' या प्रमाणें ज्ञानोबा विष्णूचा अवतार आहेत असें सांगून पंतांनीं ज्ञानोबांनीं

रेड्याकडून वेद बोलविला व जड भिंत योगबलानें चालविली या सर्वप्रसिद्ध गोष्टींचा उल्लेख केला आहे. त्यांच्या ज्ञानेश्वरी–अमृतानुभव या लोकमान्य ग्रंथांचें स्तवन करून 'त्यांच्या ओव्या विश्वास प्रिय आहेत व त्यांची योग्यता वेदतुल्य आहे' असें ह्मटलें आहे. ज्ञानेश्वरीसंबंधानें पंतांचा अभिप्राय असा आहे:—

**श्रीमद्भगवद्गीता व्याख्या केली जगासि ताराया ।**
**सारा या सद्ग्रंथा सेविति संसारताप साराया ॥ १ ॥**
**भाषाग्रंथीं याची तुळा नये आणिकासि या लोकीं ।**
**प्रतिभा धरूं करांतें ! कविधर्महि सर्व किंकरचि हो कीं ! ! ॥ २ ॥**

भगवद्गीतास्तुति–प्रकरणांत पंतांनीं शंकरमधुसूदनादि टीकाकार गीतेचे सचिव आहेत, वामनपंडित हा तिचा युवराज आहे व ज्ञानेश्वरी ही तिचा प्रतिनिधि आहे असें ह्मटलें आहे. अष्टप्रधानापेक्षां प्रतिनिधीची पायरी वरची आहे. याप्रमाणें आचार्यांचें भाष्य किंवा मधुसूदनी टीका यापेक्षांही ज्ञानेश्वरीची योग्यता जास्त आहे असा पंतांचा स्पष्ट अभिप्राय आहे. संस्कृत पंडितांस हा अभिप्राय सर्वस्वी मान्य होणार नाहीं. तथापि पंतांस भाष्याहूनही ज्ञानेश्वरी अधीक आवडत असे हें मात्र निर्विवाद आहे. ज्ञानेश्वरीसंबंधानें 'झाली विश्वख्याता हे कार्यी बहु जनांचिया आली' हा पंतांचा अभिप्राय किती खरा आहे ! पंत आणखी ह्मणतातः—

**नेती तिकडे जासी भगवति ! बहुमत इचें तुला उक्त ।**
**ज्ञानेश्वरीस जन जे अनुसरले त्यांसि करिसि तूं मुक्त ॥ १ ॥**

या आर्येच्या प्रथमार्धांत ज्ञानेश्वरी गीतार्थ यथार्थ प्रकट करणारी आहे असें सांगितलें आहे. ज्ञानेश्वरीवरचा पंतांचा अभिप्राय राष्ट्रसंमत झालेला आहे. 'भाषाग्रंथांत ( प्राकृत ग्रंथांत ) ज्ञानेश्वरीची सर अन्य मराठी ग्रंथास येणार नाहीं ! ज्ञानेश्वरांच्या पुढें प्रतिभा हात जोडून उभी आहे व सर्व कविधर्म त्यांचे दास आहेत' हें पंतांचें ह्मणणें मार्मिक व योग्य आहे व तें कोणास मान्य होणार नाहीं ? काव्यदृष्टीनें, तत्वज्ञानाच्या दृष्टीनें, धर्मदृष्टीनें, भाषादृष्टीनें–कोणत्याही दृष्टीनें पाहिलें तरी–ज्ञानेश्वरी जसा मराठी भाषेंतला आद्य ग्रंथ आहे तसाच तो सर्वश्रेष्ठही आहे. मराठी वाङ्मयांत ज्ञानेश्वरी–वारकऱ्यांची 'आई'–नेहमीं अग्रस्थानींच रहाणार. ज्ञानेश्वरीची प्रत्येक ओवी अमृतरसानें थबथबलेली आहे. इतका गोड ग्रंथ जगांतल्या सर्व ग्रंथांतही विरळच साप-

डेल. ज्ञानेश्वर हे विष्णूचा अवतार असल्यामुळें त्यांच्या वाणीस श्रुतिरूप सहजच येतें.

**११ नामदेवानें** शतकोटि अभंग मुखानें ह्मटले, यानें बाळपणींच विठ्ठलास जेवविलें, यानें ज्ञानोबाबरोबर तीर्थयात्रा केल्या, यानें हट्ट घेतला ह्मणून निर्जल देशांत देवानें आड भरला, यानें यवनपतिहता धेनु उठविली व पंढरीस देवाच्या प्रथम पायरींत हा गुप्त झाला; याप्रमाणें पंतांनीं नामदेवाचें चरित्र संक्षेपानें सांगितलें आहे. ' यानें प्रसिद्ध केलें विठ्ठल हें भव्य नाम देवाचें ' ही पंतांनीं दिलेली माहिती मात्र विचार करण्यासारखी आहे. विठ्ठल हें देवाचें नांव नामदेवानें प्रसिद्ध केलें, असें पंत ह्मणतात. ' विदा ज्ञानेन ठान् शून्यान् लाति गृण्हाति विठ्ठलः ' ( ज्ञानशून्यांचा प्रतिपाल करणारा ) अशी पंतांनीं विठ्ठल शब्दाची व्युत्पत्ति दिली आहे. विठ्ठल हें नांव नामदेवापूर्वी प्रचारांत असलें तरी त्यानें तें प्रसिद्ध केलें खास. कीर्तनाची पद्धतही आपल्याकडे नामदेवानें पाडली असें ह्मणतात. या गोष्टीचा शोध होणें जरूर आहे. नामदेवाच्या भक्तिबद्दल पंत ह्मणतातः—

**भक्तिप्रताप लोकीं अत्युद्भुत याचि नामदेवाचा ।**
**परम प्रिय भक्त सखा कीं आत्मा आप्तकाम देवाचा ॥ १ ॥**

नामदेवाचे अभंग अतीच गोड आहेत व त्याची भक्तिही केवळ लोकोत्तर आहे. तुकाराम महाराज तरी नामदेवाचाच अवतार होत. या वरील आर्येत पंतांनीं सारालंकार साधून अर्थाची मौज केली आहे. ते ह्मणतात नामदेव हा देवाचा अत्यंत लाडका भक्त होय. पण दास्यभक्तीपेक्षां सख्यभक्ति अधीक वरची वाटून त्यांनीं त्यास पुढें देवाचा सखा ह्मटलें. पण हीही स्तुति कमीच वाटून आत्मनिवेदन करून ज्यानें देवाची सायुज्यता मिळविली व तद्रूप झाला तो नामदेव आप्तकाम देवाचा आत्माच होय असें ह्मणून स्तुतीची गति खुंटविली ! अखेर ' या नामदेवा ! तुझें देवाचे ठायीं जें अनुपम प्रेम होतें त्याचा लेश वास मला दे ' असें पंतांनीं विनयानें मागितलें आहे.

**१२ एकनाथावर** पंतांच्या आर्या बऱ्याच आहेत. नाथांचे ग्रंथ भागवत व रामायण यासंबंधीं पंत ह्मणतातः—

**ग्रंथ श्रीभागवत श्रीरामायण करी सुविस्तर ते ।**
**जरि न रचिता दयानिधि केवळ जड जीव तरि कसे तरते ? ॥१॥**

एकनाथी भागवत व भावार्थ रामायण हे ग्रंथ खरोखरच सुविस्तर ( अ-

त्यांत (विस्तृत) आहेत. (पहिल्यांत वीस हजार व दुसऱ्यांत चाळीस हजार ओंव्या आहेत!) हे ग्रंथ रचून नाथांनीं जडजीवांच्या उद्धाराचा मार्ग फार सुलभ केला आहे. नाथांची भाषा ज्ञानेश्वरीपेक्षां फार सुलभ व अर्वाचीन असल्यामुळें पुष्कळांस त्यांचे ग्रंथ सहज वाचतां येतात. भागवत ग्रंथ ही एक अनुपम देणगी आहे. ग्रंथ सगुणभक्तिपर असून भक्तिरसानें ओतप्रोत भरलेला आहे. नाथांच्या चरित्रांत जी जादू भरली आहे ती तर केवळ असामान्य आहे. पंतांनीं नाथांच्या चरित्रांतल्या अनेक गोष्टी एकेका आर्येंत दिल्या आहेत:--

**भूताराधनयज्ञीं समदर्शी एक परम हा रमला।**
**द्रवुनि ह्मणे, 'पितृान्नें भोज्य, जगत्प्रिय पर, महार मला'॥ १॥**

**भोजन दे चोराला, आदर आग्रह करी स्वयें मोठा!।**
**साधु प्रसन्नचित्तें बांधुनि लागे वहावया मोटा॥ २॥**

**अंत्यजतोक कडे घे उष्णीं ज्या फार लाळ शेंबुड तें!।**
**अद्भुत सुकृत न गातां साधूंची रीति आळसें बुडते॥ ३॥**

'शांतिजलधि, 'भूतसुहृद' 'समदर्शी' हीं विशेषणें पंतांनीं नाथांस लावून त्यांत त्यांचें सर्व लोकोत्तर चरित्र सांठविलें आहे. त्यांची प्रायश्चित्त घेण्याची तयारी, देवानें त्यांचे घरीं चवदा वर्षे चाकरी केली ती गोष्ट, त्यांची गुरुभक्ति, याबद्दलही पंतांनीं प्रेमळ उद्गार काढले आहेत. नाथांच्या संबंधीं पंतांची आणखी एक आर्या देतों:—

**भूतदया संसारीं एकोपंतास निरुपमा घडली।**
**जडली आंगासींच क्षांति सदा, शांति तों गळां पडली!॥ १॥**

१३ **तुकारामाच्या** स्तुतींत पंत प्रथमच ह्मणतात कीं 'विष्णुयशाचें वाली बाया अमृता त्रपा दुकान तुका' अमृताला (अमृतरस अगर मोक्ष) लाजविण्यासाठीं तुका वाण्यानें विष्णुयशाचें दुकान घातलें, या ह्मणण्यांतली मार्मिकता उघड सांगण्याचें कारण नाहीं. ज्ञानांबुधि, अतितरा, विमद, वैराग्यशील वगैरे विशेषणें तुकोबास देऊन पंतांनीं तुकारामाचा स्वात्मानुभव जनकाच्या तोडीचा व कीर्तनरस नारदाच्या तोडीचा होता असें सांगितलें आहे. व 'भक्तिरसाचि मूर्त' ह्मणून त्याचें योग्य गौरव केलें आहे. आबालवृद्धांच्या तोंडीं झालेल्या तुकोबाच्या अभंगासंबंधानें पंत ह्मणतात:--

**साधुसभाप्राणप्रिय, ज्याचे निर्दोष युक्तिमदभंग।**
**भगवज्जनेतराचा करिती ज्यांतील युक्ति मदभंग! ॥ १ ॥**
**ज्याचे अभंग लागति खळहृदया जेंवि बाण रामाचे।**
**ज्या परवाद न मोहिति शर जैसे ईश्वरास कामाचे ॥ २ ॥**
**श्रीनामदेव तुकया तदभंग प्रभुसि गोड घांस तसे।**
**गहिंवरतसे परिसतां नाचतसे, पांडुरंग हांसतसे! ॥ ३ ॥**

तुकारामाचे अभंग साधुसंतांना प्राणप्रिय आहेत, भगवज्जनेतर ह्मणजे नास्तिक पाखांडी यांचा मदभंग करण्याचें त्यांत सामर्थ्य आहे, खळहृदयांना रामाच्या बाणासारखे ते लागणारे आहेत. (रामाचे बाण शत्रुहृदय विदीर्ण करितात पण अंतीं मोक्ष देतात, तसे याचे अभंग खळांना मर्मभेदक वाटतात पण अंतीं त्यांना गतिदायकच होतात!) ज्या तुकोबाला परवाद मोहीत नाहींत, ज्याचे अभंग नामदेवाच्या अभंगांप्रमाणें ऐकून परमात्म्याला गहिंवर येतो' हा पंतांचा अभिप्राय अक्षरशः खरा आहे. तुकोबाचे अभंग शंभर वर्षांत इतके लोकमान्य झाले कीं, पंतांच्या वेळीं त्यांच्या अभंगांवांचून कथाच होत नव्हती. पंत ह्मणतातः—

**ज्याच्या होय अभंगावांचुनि होऊनि हरिकथा नाहीं।**
**श्रोत्यांसि अभंगांहीं ती दे जसि माय हरिख थानांहीं! ॥ ४ ॥**

तुकोबा योगसिद्धीच्या बळावर सदेह वैकुंठास गेले व असा भक्त पृथ्वीवर पुन्हां होणार नाहीं असें सांगतांना पंत ह्मणतातः—

**कर जोडितों सुटाया तनुरूपा तापहेतु कारा मीं।**
**कीं सतनु मुक्त झाला. योगाची सिद्धि हे तुकारामीं! ॥ ५ ॥**

**भगवद्भक्ति कराया बहु जडजीवांसि जो तुका शिकवी।**
**त्याच्या दुसरा धरणीवरि येइल कोण हो तुकासि कवी? ॥ ६ ॥**

जे कुलज व संस्कृतभाषाभिमानी पंडित तुकोबाचा द्वेष करीत, त्यांच्या संबंधानें पंत ह्मणतात कीं, 'सीतादेवी जशी राक्षसांच्या वनांत सांपडली होती तशी या पंडितांची विद्या (सीतेसारखी पूज्य खरी पण) अभिमानरूप राक्षसाच्या तडाख्यांत सांपडली असल्यामुळें अनुकंपनीय आहे'!

१४ **रामदासांच्या** चार पांच आख्यायिका पंतांनीं एकेका आर्येंत एकेक याप्रमाणें ग्रंथित केल्या आहेत. समर्थांनीं मृत पक्षी उडविला, रंगनाथास कारागृहांतून सोडविलें, वटशाखेवरून पडलेल्या शिष्याचा कल्याण केला व

हुरडा खाल्ल्यामुळें ज्या पाटलानें समर्थांस चाबकाचा मार दिला त्यास इनाम करून दिलें वगैरे गोष्टी समर्थांच्या बखरींत सांपडतात. पंतांनीं मराठी साधुसंतांचे ग्रंथच वाचले होते असें नाहीं, तर त्यांचीं चरित्रें ही त्यांनीं ऐकलीं व वाचलीं होतीं, यामुळें या संतांच्या चरित्रांतल्या गोष्टी व त्यांच्या ग्रंथांतले विशेष हे त्यांना नीट सांगतां आले. नाथ, रामदास व इतर कांहीं संत यांच्या बऱ्याच आख्यायिका पंतांच्या संतवर्णनपर प्रकरणांत संगृहीत केलेल्या आहेत. नाथांवरच्या अशा कांहीं आर्या वर दिल्या आहेत, आतां समर्थांवरच्या पहा:—

**द्विज 'सावधान' ऐसें सर्वत्र विवाहमंगलीं ह्मणती।**
**तें एक रामदासें आयकिलें! त्या असो सदा प्रणती॥१॥**
**हुरडा घेतां ताडी, पाडी देवूनियांहि जो गाळी,।**
**साधु इनाम करुनि दे शेत, सुता तातसा तया पाळी!॥२॥**

रामदास हे 'कामजयें रघुवीरप्रेमें' समान असल्यामुळें मारुतीचा अवतार होत. त्यांनीं रामनवमीच्या उत्सवाचा प्रघात पाडून रामोपासना चालविली व शिवराजास परमार्थज्ञानबोध केला याबद्दल पंतांच्या आर्या:—

**सर्वत्र रामनवमी परमोत्सव परमधर्म चालविला,।**
**द्विजतर्पण-संकीर्तनयोगें कलिकाल दूर घालविला॥३॥**
**शिवराजास ज्ञानद जो जैसा याज्ञवल्क्य जनकास।**
**तरले भवार्णवीं बहु दृढतर ज्याची धरूनि जन कास॥४॥**

'रामदासपुण्यें बायका रामनवमीचें व्रत' करूं लागल्या असें पंत ह्मणतात; यावरून इतकेंच समजायचें कीं रामनवमीचा ह्मणजे रामजन्माचा उत्सव पूर्वीपासून भरतखंडांत जो चालला होता त्यास समर्थांच्या बोधामुळें उत्तेजन येऊन रामोपासना महाराष्ट्रांत अधिक फैलावली.

१९ **महिपतबावा ताहराबादकर** हे पंतांचे समकालीन असल्यामुळें त्यांजवर पंतांनीं जो अभिप्राय दिला आहे तो विशेष महत्वाचा आहे. पंतांची व महिपतबावांची भेट झाली असावी. महिपतबावांचे पुत्र विठोबा यांची व पंतांची मैत्री किती होती व विठोबा पंतांस किती पूज्य मानीत हें त्यांच्या पत्रांवरून 'मित्रमंडळ' या प्रकरणांत दाखविलें आहेच. संतदर्शनाविषयीं पंत किती भुकेले होते हें सिद्धेश्वर बावांची हकीकत ऐकतांच ते त्यांच्या दर्शनासाठीं नरसिंहपुरास गेले या एका गोष्टीवरूनच दिसते. समकालीन थोर पुरुष प्रायः परस्परगुणाकृष्ट असतात, व 'लोकांत गुणी जन

ते सुगुण ज्ञाते स्वयेंचि हुडकीती ' ( हरिवंश अ. ३५ ) या पंतांच्याच उक्तीप्रमाणें पंत महिपतीबावांच्या भेटीवांचून राहिले असतीलसें वाटत नाहीं. ' त्या महिपतितें पाहुनि ऐकुनि सच्चित्त कां न लोभावें !' या पंतांच्या वाक्यावरूनही पंतांनीं त्यास पाहिलें असावेंसें वाटतें. महिपतीबावांच्या संतचरित्राची प्रसिद्धि हां हां ह्मणतां झाली, ती संतांचे ग्रंथ व चरित्रें हुडकणाऱ्या पंतांच्या कानीं आल्याशिवाय खास राहिली नाहीं. ' जो पसरला जगांत स्नेहाचा सत्सरीं जसा बिंदु ' असा पंतांनींच महिपतबावांच्या भक्तचरित्राच्या शीघ्रप्रसिद्धीबद्दल अभिप्राय दिला आहे. या वर दिलेल्या सर्व कारणांवरून पंत व महिपतीबावा यांनीं परस्परांस पाहिलें असावें असें निश्चयानें वाटतें. महिपतीबावांवरच्या आर्या पंतांनीं विठोबांनीं आठवण केल्यामुळें केल्या असें पंत एका आर्येंत ह्मणतात. पंतांनीं बहुतेक संतांवर आर्या केल्या व आपल्या थोर पित्यावर कांहीं केल्या नाहींत हें पाहून विठोबांनीं पंतांस आपल्या बापाचें स्मरण दिलें. यावरून पंतांच्या आर्यांची किंमत विठोबास फार वाटत होती इतकेंच नव्हे तर तत्कालीन सज्जनांसही वाटत होती असें दिसतें. या स्तवनावरून पंत किती निर्मत्सरबुद्धीनें व विनयानें समकालीन पुरुषांचे ग्रंथ वाचीत हें उघड दिसतें. त्यांतून महिपतिबावा ह्मणजे सामान्य ग्रंथकार नव्हत. नाभाजी व उद्धवचिद्धन यांनीं लिहिलेलीं भक्तांचीं चरित्रें वाचून व त्यांत नाहींत अशा आणखी कित्येक महाराष्ट्रांतील लहानमोठ्या संतांचीं चरित्रें त्यांच्या वंशजांच्या गांठी घेऊन व त्यांचे ग्रंथ व कागदपत्र पाहून महिपतीनें स्वतंत्रपणानें ग्रथित केलेलीं आहेत !! या संतचरित्रांची महती वर्णावी तितकी थोडीच होणार आहे. महिपतबावांचा दीर्घोद्योग, त्यांची भक्ति व निष्ठा अतुल आहेत. शिवाय ते मोठेसे व्युत्पन्न पंडित नसूनही त्यांनीं जो प्रचंड उद्योग केला तो पाहून प्रत्येक रसिकास परमावधीचें कौतुक वाटल्याशिवाय राहणार नाहीं. वारकरी संप्रदायांत असा एकही पूज्य झालेला संत नाहीं कीं ज्याला महिपतीनें वर्णिलें नाहीं. महीपतीच्या तोलाचा संतचरित्रकार पृथ्वीच्या पाठीवर विरळाच सांपडेल. गीतेचा प्रसार ज्ञानेश्वरीनें केला, रामायण व भागवत यांची सामान्य जनांस ओळख एकनाथांनीं करून दिली, महाभारत मुक्तेश्वरानें वर्णिलें व भरतखंडांतल्या आठशें वर्षांतल्या अनेक जातींच्या व पंथांच्या संतांचीं चरित्रें महाप्रयासानें गोळा करून तीं भगवद्भक्तीचा प्रसार होईल अशा गोड पद्धतीनें महिपतीनें

गायिलीं, यामुळें या चौघांचे उपकार मराठ्यांवर कांहीं विशेष आहेत. महिपतबावांचे श्रम व योग्यता पूर्णपणें जाणून पंत ह्मणतात:—

**श्रीहरिभक्तजनांचीं जीं श्रीहरिभक्तिसत्सुखभरितें ।**
**चरितें गातां जेणें आयुष्य क्षण पडों दिलें न रितें ! ॥१॥**
**ज्ञानोबाचीं जैशीं एकाबाची सुधा जशी वाणी ।**
**कीं मुक्तेश्वरकविची महिपतिची सेविती तशी प्राणी ॥ २ ॥**

तुकोबारायानें महिपतीबावांवर स्वप्नांत अनुग्रह केला हें जगमान्य आहे. व पंतांनींही ही गोष्ट सांगितली आहे व ह्मटलें आहे ' खरेंच ! सदनुग्रहावांचून असे सारभूत उद्गार कोणास काढतां येणार ? ' महिपतबावांचीं संतचरित्रें वाचून विषयीजनांची विषयांवरची गोडी उडून जाते व त्यांचीं मनें भगवद्भक्तीनें ओथंबतात हें सांगतांना पंत ह्मणतात:—

**महिपतिच्या वाणीतें सेवुनि तरतात जेंवि गंगेतें ।**
**विषयांत रंगलें जें जनमानस सद्यशींच रंगे तें ॥ ३ ॥**

सहस्रावधि लोकांनीं आजवर हीं संतचरित्रें वाचलीं आहेत, वाचतात व पुढेंही वाचतील. प्रत्येक थोर पुरुषांचा जन्म कांहीं विशिष्ट हेतूसाठीं असतो. महिपतीच्या जन्माचा हेतु पंत सांगतात:—

**साधूंचें यश गाया, प्रेमें देवूनियां सुभा केला ।**
**निःसंशय ताराया जड, महिपति विट्ठलें उभा केला ॥ ४ ॥**

याप्रमाणें महिपतबावांवर पंतांनीं थोडक्यांत पण फार मार्मिकपणानें व विनयानें आपला अभिप्राय दिला आहे. अठराव्या शतकांतल्या मराठी कवींत मोरोपंत व महिपती ह्मणजे गुरुशुक्रांचीच जोडी होय.

१६ येथवर ज्ञानेश्वरादि संतांवर पंतांच्या ज्या आर्या आहेत त्यांचा विचार झाला. आतां राहिले दोन. ते वामन व मुक्तेश्वर हे होत. या दोघांकडे वळण्यापूर्वी एका महत्वाच्या मुद्याचा विचार करायचा आहे. अलीकडच्या कांहीं लोकांना तुलनात्मक यंत्रांतून पाहण्याची संवय झाली आहे. ही पद्धत कांहीं वाईट नाहीं, पण दोन कवींची तुलना करण्यापूर्वी त्यांच्या काव्यांत, हेतुंत व रचनेंत कांहीं साम्य असलें पाहिजे. साम्याशिवाय भेद नाहीं व भेदाशिवाय तुलना होऊं शकत नाहीं. दोघेही ग्रंथकार आहेत एवढ्यावरच त्यांची तुलना होत नाहीं. प्रो. परांजपे यांनीं केकावलीच्या प्रस्तावनेंत मोरोपंतांची कांहीं कवींशीं तुलना केली आहे. ' कालिदास व मोरोपंत, तुकाराम व मो-

रोपंत, रामदास व मोरोपंत' हीं सदरें पाहतांच मला हसूं आलें! मोरोपंतांचें कोणत्या तऱ्हेचें साम्य तुकाराम व रामदास यांच्याशीं आहे कीं ज्यामुळें प्रो. परांजप्यांना त्यांची तुलना करावीशी वाटली? अधिकार, हेतु, भाषापद्धती व विषयांची निवड या चारही बाबतींत मोरोपंत तुकारामरामदासांपेक्षां इतके विलग आहेत कीं कोणत्याही मुद्यावर त्यांची तुलना होऊं शकत नाहीं! रामदास व तुकाराम हे वैराग्य, ईश्वरनिष्ठा, व ब्रह्मज्ञान या गोष्टींत अगदीं एका अधिकाराचे असून त्यांचीही तुलना होणें कठिण आहे. समर्थांचा मुख्य हेतु ब्राह्मणमंडळ्या व संतमंडळ्या मेळवाव्या; प्रपंचांत राजकारण व परमार्थांत पंचतत्वविवरण त्यांस शिकवून प्रपंचपरमार्थ दोन्ही साधायची पात्रता त्यांत आणावी; ब्राह्मण्य रक्षून मराठा तेवढा एक करावा व कष्ट करून म्लेंच्छांवर बसरावें; उदंड कष्ट करून इहपर साधावें, सकळ लोक राजी राखून, बहुतांचें मनोगत हातीं घेऊन तणाव्याचे समुदाय करावे व रामोपासना अखंड गाजवावी. समर्थांनीं बारा वर्षें तपोनुष्ठान व बारा वर्षें भरतखंडभर तीर्थयात्रा करून स्वतःचें आत्मतेज इतकें वाढविलें होतें कीं 'असाध्य तेंचि साधण्याचें' सामर्थ्य त्यांनीं अंगीं आणलें होतें. राष्ट्राचा इहपर साधून देणारा खरा नायक समर्थांसारखा विरळाच सांपडेल. समर्थांचें कर्तव्य व सामर्थ्य असें व्यापक असल्यामुळें त्यांच्या भाषेला अर्थात् अलंकारादिकांनीं नटायला मुळीं सवडच नव्हती. त्यांचा जबाब साधा, रोकडा व टणटणींत. समर्थांनीं कविता ह्मणून ग्रंथ रचले नाहींत, यामुळें साहित्यशास्त्राचा गंधही त्यांच्या ग्रंथांला येत नाहीं. ते राष्ट्रीय शिक्षक होते व त्याप्रमाणें त्यांनीं आपले ग्रंथ कर्म व उपासना यांची राष्ट्रांत वृद्धि होईल अशाच हेतूंनीं लिहिलेले आहेत. तर समर्थांचा अवतारहेतु इतका रेखल्यासारखा भिन्न असल्यामुळें त्यांची विषयांची निवड व भाषापद्धतीही त्याला अनुसरूनच आहे. अशा पुरुषाची मोरोपंतांशीं तुलना कशी होणार? तशीच गोष्ट तुकारामाची आहे. तुकारामानें आपल्या लोकोत्तर वैराग्यशीलतेनें व तीव्रतम मुमुक्षेनें एका जन्मांत सिद्धि मिळविली. त्यांच्या अभंगांचें ओज कांहीं असामान्य आहे, याचें कारण हें कीं, चित्तवृत्तींच्या लाटांबरोबर ते बाहेर आलेले आहेत, व त्यांच्या सर्व अवस्थांचा प्रकाश त्यांच्या अभंगदर्पणांत पडला आहे. तुकोबांच्या सर्वाधिक लोकप्रियतेचें कारणही हेंच आहे कीं प्रत्येक मुमुक्षूला आपल्या चित्तवृत्ति पडताळून पहायला त्यांचे अभंग हे उत्तम साधन

आहे. अवघ्या दृश्य सृष्टीचा पूर्ण विसर पडला आहे, ' विटंबो शरीर होत कां विपत्ती । परी राहो चित्तीं नारायण ' अशा दृढ संकल्पामुळें विठ्ठलभजनाशिवाय जाणारा प्रत्येक क्षण ज्याला टोंचीत आहे, अखंड हरिस्मरणानें पांडुरंगाची सायुज्यमुक्ति प्राप्त झाल्यावर ज्याला परमानंद झाला आहे, ' हो कां पुत्र पत्नी बंधु, यांचा तोडावा संबंधु ' असें अत्यंत कळवळ्यानें ईश्वरप्राप्तीसाठीं जो जनांस ओरडून सांगत आहे, आत्मसिद्धि झाल्यावर ' उजळावया आलों वाटा । खरा खोटा निवाड; ' ' धर्म रक्षावयासाठीं करणें आटी आह्मांसीं, ' असा आपला अवतारहेतु ज्यानें उघड सांगितला आहे, व नामस्मरणाशिवाय एक क्षण घालविणें ह्मणजे महत्पाप करणें असा ज्याचा निर्धार व उपदेश आहे त्या तुकारामासारखा विठ्ठलास पाहतांच देहभाव हरपणारा व सर्वकाळ सात्विक अष्टभावांनीं व्याप्तकाय असा भगवद्भक्त दुसरा कोठें आढळणार ? त्याचें लक्ष रसालंकारादि बाह्य लक्षणांकडे व भाषा नटविण्याकडे कसें जाणार ? अशा पुरुषाशीं मोरोपंतांचें साम्य कोणत्या बाबतींत होणार ? काव्यालंकारांनीं व साहित्यशास्त्रानें संस्कृत झालेल्या बुद्धीनें व निसर्गतः प्रेमळ व सात्विक चित्तानें ईश्वरकथा व भक्तकथा स्वचित्तशुद्धीसाठीं गाणारा मोरोपंडित या वरच्या दोन्ही संतांपेक्षां अगदीं निराळा नव्हे काय? बरं, ज्ञानेश्वरादि ईश्वरनिष्ठ पुरुषांचीं स्तवनें तरी पंतांनीं किती भाविकपणें व विनयानें केली आहेत! ज्ञानेश्वर, एकनाथ, रामदास, तुकाराम, असल्या मुक्त झालेल्या महात्म्यांशीं पंत, बाळक मातेशीं तशी, लगट करितात. ते त्यांचे अधिकार ओळखून होते, व आपली पायरी जाणून होते. त्यांच्याशीं ते आपली तुलना करण्याच्या भानगडींत पडले नाहींत. तुकोबांचे कित्येक भक्त अनेक वेळां मला विचारितात कीं "काय हो! तुकोबापेक्षां मोरोपंत कमी दर्जाचे नव्हते काय ? " माझें त्यांना एकच उत्तर आहे 'स्वतः मोरोपंत जर तुकोबास अत्यंत पूज्य समजतात तर आपण त्यांची तुलना कां करावी ? एवढें खरें आहे कीं, भगवद्भक्त ह्मणून तुकोबा जर पंतांच्या वरचे आहेत, तर भाषा कमावणारे व शुद्ध व सरस बृहद्ग्रंथ प्रसवणारे कवि ह्मणून पंतांची योग्यताही मराठी कवींत असामान्यच राहणार ! मोरोपंतांचें भारत ह्मणजे १८ हजार आर्यांचा एक ग्रंथ आहे. तुकोबांनीं जर असा एक विस्तृत ग्रंथ केला असता तर त्यांची व पंतांची तुलना झाली असती. मोठा ग्रंथ करायला बुद्धि लवचीक असावी लागते, तिला तणा-

वा फार बळकट असावा लागतो, तो मोरोपंतांत होता. भाषादृष्टीनें तर पंतांनीं मराठीवर फारच उपकार केले आहेत. अभियुक्त भाषेंत जे गुण असावे लागतात ते गुण मराठीला मिळवून देण्याच्या कामीं पंतांचेंच कार्य अधिक महत्वाचें झालें आहे. भक्त ह्मणूनही पंतांची योग्यता कांहीं कमी नव्हे. त्यांच्या केकावल्या व अनेक स्फुट प्रकरणें भक्तिरसानें थबथबलेलीं आहेत. पंत तुकोबापेक्षां भक्त ह्मणून जर जरा कमी असले तर त्यांच्यांतला भेद ह्मणजे सिंह व हत्ती यांच्याच भेदासारखा आहे. त्यांचें बलाबल आह्मां अल्पजीवांना कसें कळावें? शिवाय रसिकतेच्या दृष्टीनें पाहिलें तरी वस्तूवस्तूंत निरनिराळी गोडी असते. जिलबी, लाडू, व साखरभात यांपैकीं प्रत्येक पदार्थाची गोडी कांहीं निराळी आहे. आंबा व द्राक्षें यांच्या रसांतला भेद कोण सांगेल! आम्रफलाची गोडी निराळी, द्राक्षाची गोडी निराळी. तसाच तुकोबांच्या अभंगाचा नाद निराळा, मयूराच्या केकेचा नाद निराळा. रसिकाला प्रत्येक ग्रंथकाराच्या ग्रंथाचें मर्म समजायला व त्याचा रसस्वाद घ्यायला त्याच्या त्याच्याशीं तद्रूप झालें पाहिजे. एकाच रसिकास निरनिराळ्या रसांची गोडी कळली पाहिजे. " आपल्याकडे एकदेशीपणा पहिला आहेच व नवीन मंडळींतही तो उत्पन्न होत आहे! सामान्य वारकरी रामदासांचें नांव निघालें कीं कपाळाला आठ्या घालतो, व रामदासीही वारकरी पंथास नांवें ठेवतांना दृष्टीस पडतो. मला उभय प्रकारच्या लोकांशीं बोलायचे प्रसंग अनेक आले होते. एकदां रामदासांचा श्लोक वारकरी जेवावयाला बसले असतां एकानें ह्मटला तों सारे वारकरी उठून चालते झाले! तुकोबांनीं रामदासास संतांत गोविलें नाहीं, रामदास राजाचे गुरु झाले व गुरुदक्षिणा वगैरे घेतली, असलीं कांहीं कारणें ते सांगतात. रामदासांचे विशेष अभिमानी वारकऱ्यांनीं कर्ममार्ग सोडला ह्मणून त्यांस नांवें ठेवितात! अलीकडचे एक नवीन 'राष्ट्राभिमानी' समर्थांची महती वाखाणणारे पंडित वारकरी संतांवर फारच घसरतात. काव्येतिहासशोधनपटु असे रा. राजवाडे हे तुकाराम "मानसिक सुख:दु:खांचे जाळें विणीत बसणारा कोणी निरुपयोगी मनुष्य होता व वारकरी पंथानें राष्ट्रकार्य न केल्यामुळें तो 'पंगु' आहे" असें ह्मणतात! केवढा विलक्षण एकदेशीपणा हा!! शरीरांतल्या षड्रिपूंसीं झगडायला ज्यानें शिकविलें व शिवरायानें पेरणी करण्यापूर्वी ज्यांनीं जमीन भाजून नांगरून ठेविली होती ते संत पंगु होते असें ह्मणणें मूर्खपणाचें व कृतघ्नपणाचें आहे. महिपतींचीं संतचरित्रें पाहिलीं ह्मणजे एकदेशीपणा-

ला त्यांनीं कसें हद्दपार केलें होतें हें समजतें. पंतांचाही ओढा पंढरीकडे व विठ्ठलभक्तांकडे होता, तरी सर्व संतांचें योग्य गुणवर्णन त्यांनीं केलें आहे. महिपती व मोरोपंत यांच्यांतला सर्वदेशीपणा जाऊन राजवाड्यांच्या एकदेशीपणाला सांप्रत ऊत आला आहे, याचें कारण खऱ्या रसिकतेची व गुणैकपक्षपातित्वाची वाण होय! प्रत्येक थोर पुरुषाचा जन्म कांहीं विशिष्ट हेतुसाठीं असतो व तो हेतु सफल होईल अशीच परिस्थिति ईश्वर त्याला देतो. प्रत्येकानें कोणता मार्ग रेखला आहे, त्यांनीं आपली इतिकर्तव्यता कशी ठरविली आहे, हें पाहून आपला उद्दिष्ट हेतु त्यानें सिद्धीस नेला कीं नाहीं एवढेंच पाहण्याचें आपलें काम असतें. रामदास काय, तुकाराम काय, किंवा दुसरा कोणी बलिष्ठ संत काय, सर्व परम ईश्वरभक्त होते व सायुज्यमुक्ति त्यांना मिळाली होती. एवढ्यानेंच ते समाधिकारी झाले. सोन्यांतला हिणकसपणा जाऊन तें बावन्नकशी झालें कीं त्याचें काम झालें, मग त्याचा कोणताही अलंकार करा, मग गोफ व सरी यांची तुलना करणें वेडेपणाचें काम आहे.

१७ असो–**पंतांची भूमिका** व त्यांचे हेतु लक्षांत घेऊन मग त्यांच्या काव्याची परीक्षा करायला हवी. त्यांनीं वरच्या दोन साधूंप्रमाणें कोठेंही आपल्या अवताराचा अमुक हेतु आहे असें जरी सांगितलें नाहीं, तरी त्यांच्या ग्रंथांच्या स्वरूपावरून त्यांची भूमिका सहज कळते. स्वचित्तशुध्यर्थ देवकथा व संतकथा गाव्या एवढाच मुख्य हेतु त्यांच्या काव्यरचनेच्या मूळाशीं आहे, व 'वाङ्मन पूत कराया' त्यांनीं रामकृष्णादि अवतारांच्या प्राचीन व अर्वाचीन संतांच्या व तीर्थांच्या कथा वर्णिल्या आहेत; व हें कार्य करायला लागणारी सामुग्री मिळविण्याचा उद्योग त्यांनीं सारा जन्म केला. साहित्यशास्त्र व छंदःशास्त्र यांत पंत पुरे निष्णात होते, व ईश्वरप्रसादाला पात्र असें प्रेमळ हृदय त्यांना ईश्वरानें दिलें होतें. यामुळें त्यांच्या काव्यांत भक्तिरस जरी ओतप्रोत भरला आहे तरी इतर अनेक रसही त्यांनीं बहारीनें उठवून दिले आहेत. व्यासवाल्मीकिशुकप्रभृति प्राचीन मुनींच्या कृतींशीं त्यांचा अहोरात्र परिचय होता, यामुळें रामायण, भारत, भागवत, हेच ग्रंथ मराठींत आणण्याकडे त्यांनीं आपली बुद्धि वेंचिली. पंत आपणास संतदास समजत, तरी आपणावर ईश्वरी कृपा आहे, ईश्वराचा आपणावर प्रसाद झाला आहे असें त्यांस वाटे. तर पंतांची ही भूमिका व हेतु लक्षांत आणून त्यांची इतर कवींशीं तुलना करावयास पाहिजे. पंत इतके मार्मिक आहेत

कीं, संतस्तवनांत त्यांनींच आपली साम्यता दोघांशीं मात्र सुचविली आहे. वामन व मुक्तेश्वर यांची व पंतांची कांहीं अंशीं तुलना होऊं शकेल. प्रथम वामन घेऊं.

१८ **मोरोपंत व वामन पंडित** हे दोघेही जाडे पंडित होते. दोघेही संस्कृत भाषेंत निष्णात होते; दोघांसही मराठी भाषेचा मोठा अभिमान होता; व दोघांनींही भारतभागवतांतलीं स्फुट आख्यानें सोप्या व सरळ मराठी भाषेंत वर्णिलीं आहेत; वामनाचा श्लोक व मोरोपंतांची आर्या जरी सर्वत्र सारखी गाजली आहे तरी अनेक मात्रागणवृत्तांत यमकप्रासादि शब्दचमत्कार साधून आपलीं काव्यें दोघांनींही रचिलीं आहेत; सगुणोपासनेवर दोघांचाही भर आहे; पंडित कृष्णभक्त होते व ' भागवतधर्मानुयायास जी गति मिळते ती मला मिळाली आहे ' असें ते सांगतात; पंत रामभक्त होते व ' रामचरण-पद्मप्रसाद मजवर झाला ' असें तेही सांगतात ! असें आहे तरी दोघांनींही ' वाङ्मन पूत कराया ' काव्यरचना केली आहे. दोघांचेंही बुद्धिवैभव सारखें असून दोघांचीही ग्रंथसंपत्ती पुष्कळ आहे. मराठी भाषेवर संस्कृतांतले अलंकार चढवून तिला अभियुक्तता आणण्याचें श्रेय दोघांसही आहे. वामनी श्लोक व मोरोपंती आर्या हरिदासांस सारख्याच प्रिय झाल्या आहेत व रसिकांनीं पंतपंडितांस एका सिंहासनावर शेजारींशेजारीं बसविलें आहे !

१९ पंतपंडितांतलें हें सादृश्य जसें उघड आहे तसें त्यांच्यातलें वैसादृश्यही उघड आहे. पंडितांचा भर अध्यात्म विषयांवर जास्त आहे. त्यांची यथार्थदीपिका, निगमसार, ब्रह्मस्तुति, कर्मतत्व वगैरे ग्रंथ लोकमान्य झालेले आहेत. पंडितांना वेदांताची ह्म. आत्मविद्येची गोडी परमावधीची असल्यामुळें ते वर्ण्य विषयाशीं केवळ तादात्म्य पावतात. वेदांतासारखा रुक्ष वाटणारा विषय सोपा करण्यासाठीं त्यांनीं भाषाही फार सरळ व सोपी घातली आहे. केवळ अध्यात्मपर असा पंतांचा एकही स्वतंत्र ग्रंथ नाहीं, पण इतिहासपुराणग्रंथांत पंतांची बुद्धि जशी दिव्य दिसते तशी पंडितांची दिसत नाहीं. भारतरामायणादि ग्रंथांत पंतांची प्रतिभा जशी चमकते तशी इतर ग्रंथांत फारशी चमकत नाहीं. यामुळेंच पंतांना सुसंगत कथानकें वर्णन करितांना स्वभाववैचित्र्य हृदयंगमपणें जसें दाखवितां येतें तसें तें पंडितांना येत नाहीं. पंडित नांवाप्रमाणेंच पंडित होते ह्मणजे न्यायमीमांसादि शास्त्रांत त्यांचा हात धरणारा पुरुष त्यांचे काळीं साऱ्या भरतखंडांत कोणी नव्हता; वेदार्थ यथार्थ

जाणणारा, अनेक मतवाद्यांचे ग्रंथ उत्तम तऱ्हेनें समजणारा, वेदांत विषय सुलभतेनें प्रतिपादन करणारा वामनासारखा महापंडित मराठी भाषेला दुसरा कोणी लाभलेला नाहीं. मोरोपंतांनीं वामनाप्रमाणें वेदांचें व षड्शास्त्रांचें अध्ययन केलेलें नव्हतें, तरी साहित्यशास्त्रांत पंत परम निपुण होते. यामुळें पंतांनीं जितक्या वृत्तांचा व रसांचा अवलंब केला आहे तितक्या वृत्तांचा व रसांचा पंडितांनीं केला नाहीं. निरनिराळ्या रसांचीं पोषक अशीं वृत्तें योग्यप्रसंगीं योजण्याचें चातुर्य पंतांत आहे, अनेक प्रकारच्या अलंकारांची गर्दी पंतांनीं आपल्या काव्यांत उडवून दिली आहे, व विलक्षण कल्पनाचातुर्यानें संशयरत्नमाला, सन्मनोरथराजि, केकावली वगैरे काव्यें परमावधींचीं मधुर व आल्हादप्रद करून सोडलीं आहेत. अशी चमत्कारिक कल्पना प्रसविण्याची शक्ति मोरोपंतांसारखी पंडितांत दिसत नाहीं. तरी कांहीं पंडित 'वामनांत रसिकताच नव्हती व तो रुक्ष वेदांती होता' असें ह्मणतात तें मात्र खरें नाहीं. अत्यंत कोमळ कल्पनांशीं पंत खेळत, तसे वेदांतविचाराशीं पंडित खेळत, पण प्रसंगीं पंडितांनींही लोकोत्तर रसिकता प्रकट केली आहे. त्यांनीं शृंगारपर विषयावर राधाविलास, भामाविलास व रुक्मिणीविलास अशीं तीन लहान काव्यें केलीं आहेत तीं व द्वारकाविजय, वेणुसुधा, भीष्मयुद्ध व भरतभाव हीं तीन अशीं सहा काव्यें त्यांनीं फारच सरस केलीं आहेत. हीं सहा काव्यें वाचणाऱ्यांस पंडितांच्या भाषेंतली रसवत्ता चांगलीच कळून येईल. राधाविलासांत शृंगार जरा ज्यास्त आला आहे, हा नसता तर बरें झालें असतें. पण एवढ्यावरून प्रो० श्रीधरपंत परांजपे वामनास 'रंगेल' ह्मणतात ही मात्र अती मोठी चूक आहे. वामनासारख्या श्रेष्ठ कृष्णभक्तास व आत्मविचारांत सर्वदा निमग्न असणाऱ्या भागवतास 'रंगेल' हें विशेषण लावणें मोठ्या अरसिकतेचें लक्षण आहे! पंडितांचा भामाविलास तर मराठींतल्या अत्यंत सरस काव्यांपैकीं एक आहे. पंडितांच्या भाषेंत विलक्षण माधुर्य व प्रसाद आहे. पंतांनीं भाषेच्या ठाकठिकीकडे लक्ष दिलें आहे तसें पंडितांनीं दिलें नाहीं यामुळें छंदोभंग, यतिभंग, च्युतसंस्कृति वगैरे दोष त्यांच्या कवितेंत फार आढळतात व संस्कृत कविता वाचणाऱ्या रसिकाच्या कानाला ती जरा कठोर लागते. पंडित महाविद्वान् असूनही त्यांनीं व्याकरणशुद्धीकडे लक्ष दिलें नाहीं, याचें कारण ते नेहमीं वर्ण्यवस्तूशीं तादात्म्य पावत. पंतांची व्याकरणशुद्धता सर्वमान्य आहेच, व प्रसाद आणि माधुर्य हेंही

गुण त्यांच्या कवितेंत आहेत, तरी पंडितांच्या कवितेंतला प्रसाद पंतांपेक्षांही कधीं कधीं अधिक आल्हादकारक असतो. पंडितांचा आणखी एक लोकोत्तर गुण सांगायचा आहे. भाषांतर करण्याची कला पंडितासारखी आजवर कोणासही साधली नाहीं. भगवद्गीतेची समश्लोकी, गंगालहरी, भर्तृहरीचीं शतकत्रयाचीं भाषांतरें हीं इतकीं उत्तम साधिलीं आहेत, कीं मूळ व वामनी श्लोक जवळ ठेवून बारकाईनें पाहिल्यास मूळ कोणतें व भाषांतर कोणतें हेंही कळण्यास मारामार पडेल! समश्लोकांत मूळार्थाला ढका न लावतां भाषांतर करणें किती कठिण आहे याची कल्पनाही कित्येकांस येणार नाहीं. भाषांतर करावें वामनानेंच. मूळांतला सगळा अर्थ—भाषा अत्यंत सोपी, सरळ व मोहक योजून—अन्य भाषेंत आणणें ह्मणजे अत्यंत कौशल्याचें काम आहे व या कामीं वामनाच्या तोडीला कोणीही बसणार नाहीं. वामनाला शांतरस फारच सुरेख साधला आहे. क्वचित शृंगार व वत्सल या दोन रसांची छटा आहे. पंतांनीं बहुतेक सारे रस चांगले साधले आहेत, पण भक्तिरस, वीररस व वत्सलरस हे मुख्यत: त्यांना उत्तमच साधले आहेत. पंडित व पंत उभयतांही भगवद्गुणवर्णनांत तल्लीन होतात, दोघेही मोठेच सगुणोपासक आहेत, पण स्वानुभवाच्या दृष्टीनें पंडितांची पायरी पंतांच्या वरची दिसते. पंडितांचा पूर्व वयांतला मद पार उतरून गेल्यावरचीच त्यांची काव्यरचना आहे, तरी पंतांइतके ते कधींही वांकले नाहींत. रसिकतेचा उत्कर्ष जसा पंतांत दिसतो तसा पांडित्याचा उत्कर्ष पंडितांत दिसतो. पंतांनीं इतक्या कवींवर व संतांवर आर्या केल्या, पण कोणावरही कोठेंही चुकून सुद्धां दोषारोपाचा भासही होऊं दिला नाहीं; व सर्व लहानथोर संतकवींचा चरणरज आपणास ह्मणवून घेतलें आहे. पंडितांनीं यथार्थदीपिकेंत पुष्कळ गीताटीकाकारांवर प्रहार केले आहेत. 'गीतार्थ अन्यथा वाणी। मज नावडे ती थोरांची वाणी' असें ह्मणून प्रथम सामान्य आक्षेप केले आहेत व २।३ ठिकाणीं ज्ञानेश्वरांचा अर्थ चुकीचा आहे असें मोघम ह्मणून ' ' जगीं मिरवोनिया केली सिद्धी। आपल्या टीकेची प्रसिद्धी ' असा गुप्त आक्षेप त्यांजवर केला आहे! ज्ञानेश्वरांचा योगाकडे विशेष ओढा होता, पंडितांचा सगुणभक्तीकडे होता. यथार्थदीपिका हा ग्रंथ फारच योग्य आहे व गीतार्थाचें रहस्य समजून घेण्यास मुमुक्षूंनीं त्याचीच प्रथम कास धरावी. माधुर्य, प्रसाद, ओज, कोमलता, हे गुण सामान्यत: दोघांच्याही काव्यांत आहेत, एकंदरींत पंत व

पंडित यांपैकीं श्रेष्ठ कोण हें ठरविणें फार कठिण आहे, महाराष्ट्रकाव्योदधींतलीं ही दोनही अत्यंत तेजस्वी अशीं मौक्तिकें आहेत एवढें मात्र खरें !

२० पंतांनीं वामनाविषयीं जागोजाग फार प्रेमोद्गार काढले आहेत. पंडितांचे ग्रंथ पंतांस वाचावयास मिळाले होते व एका अर्थानें पंडित पंतांना गुरुतुल्यच आहेत, किंबहुना पंडित पूर्वी झाले नसते व त्यांनीं केली आहे तीं व तशी काव्यरचना केली नसती, तर पंतांचींहि जीं काव्यें आज आपणास मिळालीं आहेत तीं तशीं उतरलीं नसतीं असें मला वाटतें. यमकानुप्रासांचे चमत्कार करून भिन्नभिन्न गणवृत्तांत अनेक स्वतंत्र आख्यानें रचण्याचें चातुर्य पंतांस कांहीं अंशीं पंडितांच्या काव्यांपासूनच प्राप्त झालेलें आहे. पंडितांनीं ज्या पद्धतीचा उपक्रम केला त्याच पद्धतीचा उत्कर्ष पंतांनीं केला. इंग्रजी कवी ड्रायडन व पोप यांचा जसा अन्योन्य संबंध आहे तसाच पंडित व पंत यांचाही आहे. पंतांनीं आपल्या गुरूचें ऋण त्यांची योग्य स्तुति करून फेडलें आहे. पंतांनीं पंडितांच्या कृष्णभक्तीचें व साधुत्वाचें फार प्रेमानें वर्णन केलें आहे. 'श्रीपतिभक्तिरसज्ञ वामनस्वामी' 'श्रीपतिभक्तोत्तम' 'बहुतजन्मसिद्ध' वगैरे विशेषणें पंतांनीं पंडितांस लावलीं आहेत. शिवाय ते स्पष्ट ह्मणतात:—

**काम न वामनचित्तीं मोक्षाचा कृष्णभक्तिवांचून ! ।**
**भगवद्भजनचि केलें अनुदिन, किमपि न तदन्य वाचून ॥ १ ॥**

पंडितांना पंतांनीं 'ख्यात झाल्या जनांत हा शुकसा' असें ह्मटलें आहे. पंडितांना भक्तमंडळांत घालायला अलीकडे कांहीं पंडित कां कचरतात, तें मला समजत नाहीं. त्यांच्या ग्रंथांवरून त्यांची अलोट कृष्णभक्ति व स्वानुभव अगदीं स्पष्ट दिसत आहे, व पंतांसारख्या पुरुषानेंही त्यांचें वाजवी असेंच वर्णन केलें आहे. पंत कारकून होते व कारकून जसा पैपैशाची चूक होऊं नये ह्मणून जपतो, तसे पंतही योग्य विशेषणें अगदीं बेताबातानें योजूनच संतकवींची स्तुति करणार आहेत. त्यांनीं भरमसाट कांहीं तरी लिहिलें नाहीं.सतप्रकरणांतच काय, पण पंतांच्या एकंदर कवितेंत वायफळ, निरर्थक किंवा अप्रयोजक एकही शब्द त्यांनीं वापरला नाहीं. पंडितांच्या कृष्णभक्तीचें गौरव पंत उगीच करायचे नाहींत. वामन हा महापंडित होता, ह्मणून त्याला श्रीपतिभक्तोत्तम ह्मणायला कोणची हरकत आहे ? भक्ति आणि पांडित्य यांचा विरोध पुष्कळ वेळां दिसतो, हें खरें. तुकोबांनींही आ-

पल्या अभंगांत बऱ्याच वेळां असें सांगितलें आहे कीं, देव भोळ्याभाविकांचा आहे, त्याला पांडित्याचा कंटाळा आहे व तो पंडितांपासून फार दूर असतो. पण वामनपंडित हे या सामान्य सिद्धांताला मोठाच अपवाद आहेत! ते जसे अद्वितीय पंडित होते तसे ते श्रीकृष्णाचे परम भक्त होते. पंतांचा वर दिलेला अभिप्राय अक्षरशः खरा आहे, याविषयीं पंडितांच्या-ग्रंथांशीं ज्याचा चांगला परिचय आहे त्याला क्षणभरही शंका येणार नाहीं. पंडितांची यथार्थदीपिका व गीतेची समश्लोकी या दोन ग्रंथांची पंतांनीं फार वाखाणणी केली आहे. समश्लोकीच्या उपोद्घातांत 'श्रीज्ञानदेव, वामन पटु ! ऐसा अन्य मानवचि नाहीं' असें त्यांनीं ह्मटलें आहे, व वामनस्तुतींत खालील आर्या आहे:—

**केली श्रीगीतेची व्याख्या, बहु भक्ति जींत गाजविली, ।**
**साजविली साधुसभा; भाषाकविकथनशक्ति लाजविली! ॥ २ ॥**

या आर्येतल्या 'बहु भक्ति जींत गाजविली' या चरणांत पंडितांनीं आपल्या टीकेचा मुख्य कटाक्ष सगुणभक्ति गाजविण्याकडे ठेवला आहे. असें पंतांनीं स्पष्ट सांगितलें आहे. समश्लोकीबद्दल 'रीति समश्लोकींची अतुला, साधेल काय नव्यास ?' हा पंतांचा शेराही खरा आहे. समश्लोकीची तऱ्हा खरोखरीच अतुल आहे. वामनाच्या समश्लोकीची तऱ्हा पंतांस इतकी आवडली कीं त्यांनींही गीतेची समश्लोकी स्वतंत्रपणें केली आहे. दोन्हीही टीका निर्यमक आहेत, मात्र पंतांनीं आपली टीका वामनाच्या मूळाला धरून आर्यावृत्तांत केली आहे. वामनानें आपल्या यमकांनीं अन्यकवींची गर्वहानि केली, या पंतांच्या मताचा विचार अन्यत्र केला आहे. यामुळें येथें त्याची द्विरुक्ति नको. वामनाचीं कवनें अत्यंत रसभरीत आहेत असें पंतांनीं निरभिमानतया सांगितलें आहे. 'भक्तिज्ञानरसभरित यत्कवन, जयांत एक न वच रितें' या आर्यार्धांत पंडितांची योग्य स्तुति पंतांनीं केली आहे. आणखी एकच आर्या पहा:—

**वाटे सूक्तिश्रवणें मस्तक वाल्मीकिनेंहि डोलविला ।**
**प्रभुनें, भुलवाया मन, वामन हा वेणुसाचि बोलविला ॥ ३ ॥**

याप्रमाणें पंडितांच्या 'सद्रसभवन कवनांची' पंतांनीं फार तारीफ केली आहे. स्वतः पंत पंडितांच्या प्रसादयुक्त रसभरित काव्यांना फार भुलले होते असें दिसतें. आणि कोण नाहीं भुलणार ? जुन्या काळच्या घराण्यांत संग्रह

केलेल्या कवितेंत वामनी श्लोकांचा भरणा फार सांपडतो, यावरून त्यांच्या लोकप्रियतेची साक्ष पटते. वामनाची कविता हरिदासांला फार प्रिय होती असें पंत ह्मणतात. तुकोबाचे अभंग व वामनाचे श्लोक पंतांच्या वेळीं कीर्तनांत हरिदास ह्मणत असत, याविषयीं पंतांचाच दाखला आहे. आपल्या आर्याही अशाच कीर्तनप्रसंगीं हरिदास ह्मणतील अशी पंतांना खात्री होती. असो. सन्मणिमालेंत खालील आर्या आहे:—

**नमिला साष्टांग श्रीपतिभक्तिरसज्ञ वामनस्वामी।**
**रसभवना तत्कवना मानी या तेंवि वाम न स्वा मी ॥ ३ ॥**

या आर्येंत पंत स्पष्ट ह्मणतात: 'पंडितांच्या रसभरित कवनांना मी जसा मानतों तसा मी आपल्या स्वतःच्या कवनांसही मानीत नाहीं. मला माझ्या कवितेपेक्षां कृष्णभक्तिरसज्ञ वामनाची कविता अधीक आवडते!' हा पंतांचा अभिप्राय जसा पंडितांना भूषणावह आहे, तसाच तो पंतांनाही भूषणावह आहे. आपल्याकडे हीनता घेऊन पूर्वकवींविषयीं पंतांनीं इतक्या निरहंकारबुद्धीनें लिहावें, यावरून त्यांच्या मनाची निरतिशय शुद्धता व्यक्त होत नाहीं काय? येथें स्तव्य आणि स्तोता दोघेही आपल्या स्तुतीस पात्र आहेत.

२१ **मुक्तेश्वराच्या** भारतानंतर मोरोपंती भारतशंभर वर्षांनीं झालें. मुक्तेश्वराचें सगळें भारत उपलब्ध नाहीं. मुक्तेश्वरही वामनासारखा महापंडित होता. त्यानें अनेक शास्त्रांचें चांगलें अध्ययन केलें होतें; साऱ्या भरतखंडभर कान व डोळे उघडे ठेवून त्यानें प्रवास केला होता; नाथांच्या सहवासामुळें उत्कट ईश्वरभक्ति व जाज्वल्य नीतिमत्ता त्याचे ठायीं उत्पन्न झाली होती; व सृष्टयवलोकनाच्या संवयीमुळें उत्तम प्रतीची रसिकता त्याला प्राप्त झाली होती. मुक्तेश्वराचें भारत महाराष्ट्र उदयोन्मुख झालें त्या वेळचें असल्यामुळें एकनाथ–शहाजींच्या काळीं महाराष्ट्रांतल्या कर्त्या पुरुषांच्या हृदयांत ज्या उच्च मनोवृत्ति उचंबळत होत्या त्यांचें प्रतिबिंब त्याच्या भारतांत पडलें आहे! राष्ट्रीयत्वाची कल्पना मुक्तेश्वरी भारतांत सुव्यक्त आहे. मुक्तेश्वराच्या वाणींत जें अद्भुत ओज आहे त्याचें कारण सभोंवारच्या परिस्थितीकडे व समाजघटनेकडे राष्ट्रीय अभिमानानें पाहण्याचें अदभुत सामर्थ्य त्याच्या अंगीं होतें हें होय. हा विशेष लक्षांत ठेवला ह्मणजे मुक्तेश्वर व मोरोपंत यांच्या भारतांची तुलना करितां येते. मुक्तेश्वरी भारतांत पोर्तुगीज, इंग्रज, रूमशाम, हबशान, अर्बस्तान, पठाण, जावी लोक वगैरेंचा उल्लेख येतो. गोवधदेवब्राह्मणावज्ञा करणाऱ्या म्लेंच्छांना आर्य राजानें जिंकावें, अमात्य कोश जमवून किल्ले बांधावे,

झुंजार बळी यांचे संघ करून त्यानें शत्रूवर कोसळावें, शेतकी साठीं कालवे बांधावे, परद्वीपींच्या अमोल्य वस्ता घेऊन स्वदेशपरदेशांचा व्यापार वाढवावा, वगैरे प्रकारें खऱ्या आर्य राजांचें वर्णन मुक्तेश्वरी भारतांत आहे! तालमींतल्या कुस्त्यांतले डावपेंच; भोजनशास्त्रांतल्या विविध चटण्या व भाज्यांचीं कृतीं-सह वर्णनें; रात्र, प्रभातकाळ, वर्षाकाल, राजा, प्रबळ मल्ल, तेजस्वी तपस्वी, रूपवती पतिव्रता, कुलटा, निर्झरोदकाचे पाट, व गिरिकंदरें, या सर्वांचीं अत्यंत चित्तवेधक, ठसठशीत व अप्रतिम वर्णनें मुक्तेश्वरी भारतांत येतात. मुक्तेश्वरी भारतांच्या स्वरूपाहून मोरोपंती भारताचें स्वरूप थोडेंसें भिन्न आहे. वीररस दोन्ही भारतांत उत्तम प्रकारें वर्णिला आहे, तरी मोरोपंत हे भारतीकाळांत जितके डुबून जातात तितका मुक्तेश्वर जात नाहीं. त्याचें लक्ष भूत व वर्तमान काळाकडे फार आहे. मुक्तेश्वरांत कालविपर्यासाचा दोष होऊं शकतो तसा तो मोरोपंतांत व्हायला कारणच नाहीं. कवि विलक्षण प्रतिभावान् असला, पूर्वकाळच्या थोर पुरुषांच्या कृति वर्णन करितांना स्वकालीन लोक सुधारणेची त्याची उत्कंठा जागरूक असली, उज्वळ प्रतिभेमुळें व विशाल कल्पनाशक्तीमुळें पूर्वकालीन लोकांशीं, त्यांच्या परिस्थितीशीं, त्यांच्या आचारविचारांशी त्याला पूर्ण तादात्म्य पावता येत असलें, की कालविपर्यासाचा दोष होणें अपरिहार्य आहे. हा दोष पुराणकथा, इतिहास व स्वकालीन लोकस्थिति या त्रिवेणींत पोहणाऱ्या मुक्तेश्वर किंवा शेक्सपीयर सारख्या कवींत मात्र आढळायचा. सामान्यतः मुक्तेश्वरी भारतांत राष्ट्रीय नीतितत्वें विखुरलीं आहेत, मोरोपंती भारतांत कौटुंबिक नीतितत्वें पसरलीं आहेत. मराठींतल्या सर्व भारतग्रंथांत मुक्तेश्वरी भारतच सर्वप्रकारें श्रेष्ठ आहे. मुक्तेश्वराची प्रतिभा, कल्पना, वर्णनचातुर्य, सृष्ट्यवलोकन, बुद्धीची व्यापकता, व राष्ट्रीयत्व हे गुण अनन्यसाधारण असल्यामुळें मुक्तेश्वराच्या जातीचा कवि साऱ्या मराठी कविमंडळांत मुक्तेश्वरच होय.

२१ पंत आणि मुक्तेश्वर या दोघांनींही रामायण, महाभारत व भागवत यांवर ग्रंथ लिहिल्यामुळें व हरिदासांच्या आख्यानांला मुक्तेश्वरी ओवी व मोरोपंती आर्या या दोघांनींही रंग चढत असल्यामुळें यांची तुलना करून पाहण्यासारखी आहे. मुक्तेश्वराचें भागवत अनुपलब्ध आहे, रामायण अगदीं किरकोळांतलें आहे, पण त्याच्या भारताचीं जीं पांचच पर्वे उपलब्ध झालीं आहेत, त्यां-

वरून पाहतां कवित्वाच्या दृष्टीनें मुक्तेश्वराची बरोबरी कोणताही मराठी कवि करूं शकणार नाहीं असें मला वाटतें. मुक्तेश्वराच्या वाणींत लोकोत्तर प्रसाद, दिव्य ओजस्विता व सृष्टिसौंदर्यवर्णनाची अनुपम शोभा, दृष्टीस पडतात. मुक्तेश्वरानें प्रबळ मनोवृत्तींच्या प्रचंड प्रवाहाबरोबर भारती आख्यानांची महानदी 'खळखळाट वाहविली' आहे; पंतांनीं दुतर्फा मनोहर घांट बांधून व जागोजाग उपवनांचे रम्य देखावे निर्माण करून त्या महानदीचा ओघ दोन्ही पात्रांमधून अचूक सोडून दिला आहे! मुक्तेश्वराची कविता एखाद्या खेडवळ पण कुलीन देशस्थ ब्राह्मणाच्या मुलीसारखी साधीभोळी, काळीसांवळी, पण ठसठसीत, मोकळ्या मनाची व सशक्त अशी आहे; व मोरोपंताची कविता ही सुस्वरूप, टापटिपीची, व सुगरण अशा नगरवासी कऱ्हाड्याच्या मुलीसारखी आहे! दोन्ही संपन्न, शुचि व ईश्वरपरायण आहेत. पहिली

१ नलाचें वर्णन करितांना 'होता नल तेजस्वी भास्करसा, इंदुसा, अनलसा व, याप्रमाणें पंतांनीं त्याचे तेजस्विता, लोकरंजकता व पावनता हे गुण व्यक्त केले आहेत. याबसंबंधीं मुक्तेश्वराची ठसठसीत ओवी पहाः—

**सुरमंडळीं सहस्रनयन । ग्रहमंडळीं सहस्रकिरण ।**
**पाताळभुवनीं सहस्रवदन । तैवीं तो मान्य भूतळीं ॥ १ ॥**

या ओवींत मुक्तेश्वरानें इंद्रासारखें राज्यकारभारांतलें कौशल, सूर्यासारखें अप्रतिम राजतेज, व शेषासारखी वाग्मिता या नलगुणांचें वर्णन केलें आहे, पण पंतांच्या आर्येपेक्षां मुक्तेश्वरी ओवी अधिक ओजस्वती दिसते. 'भास्करसा' आणि लगेच 'इंदुसा' ह्या उपमा कशाशाच वाटतात! 'सहस्र' शब्दाच्या त्रिवार आणि साभिप्राय उच्चारामुळें मुक्तेश्वरी ओवी तेजस्वी दिसते. उलटपक्षीं पंतांचें कल्पनाचातुर्य लोकोत्तर असल्यामुळें त्यांच्या कवितेची गोडीही असाधारणच आहे. दमयंतीला टाकून जातांना नळाच्या मनाचें जें आंदोलन झालें, त्याच्या वर्णनप्रसंगीं मुक्तेश्वरापेक्षा पंतांनींच हृदयंगम कल्पनाचातुर्य व्यक्त केलें आहे. दोघांच्याही उक्ति पहाः—

**त्यागूनि जाय परता । परत ये मागुता ।**
**सात पांच वेळ चित्ता । संशयचक्रीं सूदलें ॥ १ ॥**

—मुक्तेश्वर.

**कलि दमयंतीप्रेमा दोघेही ओढिती नळाला हो, ।**
**प्रेम्याला त्याचें मन सांपडलें! देह त्या खळाला हो!! ॥ १ ॥**

—मोरोपंत.

वाटेल त्याला भुलविते, दुसरीला भुलणारा सुविद्य, रसज्ञ, नागरीकच पाहिजे! पहिलीच्या अंगावरचीं वस्त्रें उंचीं आहेत, पण तीं कशीं तरी घेतलीं आहेत, दुसरीच्या वस्त्राभरणांत नीटनेटकेपणा विशेष आहे. पहिली आपल्या काळ्या पाणीदार डोळ्यांनीं व सहज विलासांनीं मोहील, दुसरी आपल्या नानाविध चेष्टांनीं जिंकील. पहिलीची धिटाई व दुसरीची मर्यादशीलता, पहिलीचें अकृत्रिम हास्य व दुसरीचें मंदस्मित, पहिलीचें सहजप्रेक्षण व दुसरीचें कटाक्षक्षेप, पहिलीचा दांडगेपणा व दुसरीचा संभावितपणा—दोन्हीही आपापल्या परीनें मनमोहकच आहेत !! तथापि मुक्तेश्वरी भारती व मोरोपंती भारती यांचा विचार करितां 'दूरीकृताः खलु गुणैरुद्यानलता वनलताभिः' या दुष्यन्ताच्या उक्तीचें स्मरण होतें! असो. मोरोपंत स्वतः फार मार्मिक होते. त्यांना मुक्तेश्वराची कविता पाहून फारच समाधान झालें. 'मुक्तेश्वराच्या कवितेच्या तोलाची कविता आपणास उत्पन्न करितां येणार नाहीं असें वाटून मराठी कवि हतगर्व झाले,' असें त्यांनीं ह्मटलें आहे:—

**मुक्तेश्वरकृत भारत आवडतें विठ्ठलास, कीं पर्वे ।**
**सर्व श्रवणें हरितें आशा कविच्या, अशेषही गर्व! ॥ १ ॥**

मुक्तेश्वराची कविता वाचणारे व त्याची स्तुति करणारे 'बंदी ( भाट ) लक्षावधि' आहेत असें सांगतांना पंत ह्मणतात:—

**श्रीमुक्तेश्वर कविवर, यातें कोण न शुभेच्छु वंदील ? ।**
**बंदी लक्ष जयाचे, ज्याचें यश भव्य जेंवि मंदील ॥ २ ॥**

मुक्तेश्वर व पंत हे दोघेही महाकवीच आहेत. त्यांना व सर्व अर्वाचीन संतांना एकात्मतेच्या भावानें वंदन करून व त्यांचा प्रसाद मागून हें प्रकरण मीं पुरें करितों.

———

# प्रकरण सतरावें.



# भागवती प्रकरणें.

शुकसा मोरहि तुझें लागला यश गावया
जाणोनि दुर्लभतरा या काळवशगा वया ॥ ६५ ॥

विठ्ठलविज्ञापना.

| काव्याचें नांव. | कोठून घेतलें | पद्यसंख्या |
|---|---|---|
| १ नारदाभ्युदय | स्कंध १ अ० ५।६ | आर्या ४७ |
| २ भीष्मभक्तिभाग्य | ,, अ० ९ | आर्या १९८ |
| ३ अवतारमाला | स्कंध २ अ० ७ | आर्या ३१० |
| ४ कलिगौरव | स्कंध ३ अ० २५ | श्लोक ६ |
| ५ ध्रुवचरित्र | स्कंध ४ अ० ८।१२ | साक्या १०७ |
| ६ ,, स्फुटार्या | ,, ,, | आर्या ६ |
| ७ अमृतमथन | स्कंध ८ अ० ५।९ | आर्या १५८ |
| ८ वामनचरित | स्कंध ८ अ० १५।२३ | आर्या १९९ |
| ९ अंबरीषाख्यान } | स्कंध ९ अ० ४।५ | साक्या ४० |
| १० भक्तभूषण } | ,, ,, | विविधश्लोक ११ |
| ११ सुदामचरित्र | स्कंध १० अ० ८०।८१ | विविधश्लोक ८५ |
| १२ पृथुकोपाख्यान | ,, ,, ,, | साक्या ८८ |
| १३ भृगु चरित्र | ,, अ० ८९ | श्लोक ४७ |
| १४ मंत्रमय भागवत | दशमस्कंध | आर्या १०९ |

अगदीं स्वतंत्र.

| | |
|---|---|
| १५ गोपीप्रेमोद्गार | आर्या ११ |
| १६ नवदानकेली | ,, ४७ |
| १७ गोपीगोडवा | आर्या ६९ |
| १८ मुरलीपंचक | आर्या ५ |
| १९ मुरलीनवरत्नमालिका | ,, १० |

एकूण प्रकरणें १९ पद्यसंख्या. १६५२

४९—५०

**१ नारदाभ्युदयः**—दासीपुत्र असून केवळ सत्संगानें मी भगवद्भक्त कसा झालों हें नारदानें व्यासास सांगितलें, तो भाग या काव्यांत वर्णिला आहे. भगवत्प्राप्तीस्तव जीवानें पायरीपायरीनेंच गेलें पाहिजे. पहिली पायरी महत्सेवेची. महत्सेवा करितां करितां महत्कृपा होते. महत्कृपेनें श्रद्धा उपजते, श्रद्धेनें भगवत्कथाश्रवण होतें, नंतर भगवंतीं रति उपजते, भगवत्प्रेमानें स्थूलसूक्ष्मदेहांचा विवेक घडतो, या विवेकानें अंतरींचा मोह झडतो, मोहनाशानंतर विमल ज्ञान होतें, ज्ञानानें ईश्वराची दृढभक्ति होते, नंतर भगवत्तत्वाचें यथार्थ ज्ञान होतें, व अखेर भगवंताचे सर्वज्ञत्वादि सारे अतुल गुण प्रकट होतात!! याप्रमाणें भगवत्पदाला नेणारा सोपान या काव्यांत दाखविला आहे. 'प्रभुचीं नामें गात प्रेमभरें आदरीत नटनातें' याप्रमाणें त्रैलोक्यांत स्वेच्छ संचार करणाऱ्या नारदाची ही आत्मकथा मुमुक्षूंस फार बोधप्रद आहे.

**२ भीष्मभक्तिभाग्यः**—प्रस्तुत काव्याची मूळ पंतलिखित प्रत मला पंतांच्या एका भक्ताच्या घरीं सांपडली, ती माझे संग्रहीं आहे. तिला पंतांनीं पोर्तुगीज कागद वापरला आहे, यावरून दीडशें वर्षांपूर्वी स्वराज्याच्या ऐन भरभराटीच्या काळींही पाश्चात्यांच्या व्यापारानें आमची मानगुटी कशी धरिली होती तें दिसतें! असो. प्रस्तुत काव्य ह्मणजे भागवताच्या प्रथमस्कंधाच्या नवव्या अध्यायाचें मराठी रूपांतर होय! मूळांत ४९ श्लोक आहेत, पण पंतांनीं विषयानुरोधानें त्यांचे दोन अध्याय करून पहिल्यांत १२० व दुसऱ्यांत ७० आर्या करून शिवाय ८ श्लोकांचा उपसंहार जोडला आहे. याशिवाय छापील प्रतींत शेवटीं दोन संस्कृत श्लोक दिले आहेत. त्यांतला पहिला श्लोकः—

**यस्याः स्नुषा रत्नगर्भा सपत्नी चामरावती।**
**तस्याः श्रीगोपिकादेव्याः किमपीदं कृते कृतम्॥ २॥**

या श्लोकावरून प्रस्तुत काव्य पंतांनीं माधवराव पेशव्यांची आई गोपिकाबाई इच्या सांगण्यावरून शके १६८२–१६९४ च्या दरम्यान केव्हां तरी रचिलें होतें असें काव्येतिहाससंग्रह व काव्यसंग्रह या उभय मासिकांच्या संपादकांनीं लिहिलें आहे, पण पंतलिखित पोथींत हे दोन्ही श्लोक नाहींत, तेव्हां ते प्रमाण मानतां येत नाहींत. शिवाय सदर काव्य रचायलाही कोणीं संतानें पंतांना सुचविलें होतें असें 'भगवद्भक्तानुज्ञा कीं गाव्या सत्कथा यथामति तें, स्वीकारिलें स्वहित म्यां' (१–७) या पंतोक्तीवरून स्पष्ट दिसतें.

प्रस्तुत विवेचनांत ज्या आर्या किंवा आर्यार्धे उद्धृत केले जातील ते अगदीं पंतलिखित पोथीप्रमाणें शुद्ध आहेत असें समजावें. प्रस्तुत काव्य–मूळाचें पदशः भाषांतर असूनही पंतांनीं असें रंगविलें आहे कीं मूळ अध्यायाच्या दसपट रंग पंतांच्या या काव्यांत भरला आहे असें कोणासही कबूल करावें लागेळ. मीं मूळकृति व पंतांचीं मराठी प्रतिकृति यांची पद्यशः तुलना करून पाहिली आहे, त्यावरून ' वाणी मयूरवदनीं जी न शुकातें द्विजोत्तमा यावी ! ' असा जो रसिककविवर रामजोशीबोवा यांनीं अभिप्राय दिला होता, त्यांत बिलकूल अतिशयोक्ति नाहीं अशी माझी खात्री झाली ! अहो ! मयूरदूषकांनो ! पंतांचें प्रस्तुत काव्य मूळ अध्यायाशीं एकवार ताडून पहा ! ह्मणजे असें भाषांतररूप काव्य स्वप्रतिभाबळानें त्यांनीं किती खुलवून कसें रमणीय केलें आहे याची तुह्मांस कल्पना येईल! प्रत्येक आर्येत नवीन खुबी, प्रत्येक आर्येत नवा रस ! पंतांच्या शब्दघटनेची कां रसाविर्भावाची कां युक्तिवादाची, कां विषयमांडणीची–कशाची तारीफ करावी हेंच मला कळत नाहीं ! साखर सर्वत्र गोड, आंत गोड बाहेर गोड, तशी पंतांची कविता शब्द व अर्थ या दोन्ही बाजूनें कशी गोड आहे ! पंतांनीं आपली आर्याप्रीति पुढील प्रमाणें व्यक्त केली आहे:—

**आर्या आर्यांसि रुचे, ईच्या ठायीं जशी असे गोडी ॥**
**आहे इतरा छंदीं गोडी परि यापरीस ती थोडी ॥ अ.१-१० ॥**

भारती युद्धांत ' गुरुबंधु स्वजन मित्र ' यांचा वध झाला त्याबद्दल धर्मराजास खिन्नता आली होती, ती घालविण्याकरितां श्रीकृष्णांनीं आसन्नमरण झालेल्या भीष्माचार्यांकडून त्याला बोध करविला तो प्रकार प्रथमाध्यायांत पंतांनीं वर्णिला आहे व भीष्मकृत श्रीकृष्णस्तुति द्वितीयाध्यायांत वर्णिली आहे. ही भीष्मकृत भगवन्नुति मूळ भागवतीं पुष्पिताग्रा वृत्तांत ११ श्लोकांत आली आहे, पण पंतांनीं तिच्या ९१ आर्या केल्या आहेत. पंत ह्मणतात ' माझ्या मनांत पुष्पिताग्रा वृत्तांतच मराठी पद्यें करायचीं होतीं, पण असें समवृत्तांत भाषांतर करणें कठिण पडूं लागलें ह्मणून तो नाद मला सोडून द्यावा लागला ! ' पंतांचेच शब्द पहा:—

**भीष्मकृतश्रीकांतस्तुतिच्या टीकेसि वृत्त जरि तेंचि ।**
**अवलंबावें तरि तें अडचण कांहीं तरीहि करितेंचि ॥१-११९॥**

पंतांसारख्यांना समवृत्त भाषांतराची इतकी अडचण वाटली, यावरून वामन पंडितांनीं भर्तृहरीचीं जीं तीन शतकें इतक्या शिताफीनें मराठींत आणि-

लीं त्याबद्दल त्यांची अधिकच धन्यता गावीशी वाटते! प्रस्तुत काव्यांत भी-ष्माच्या श्रीकृष्णविषयक भक्तीचा उत्कर्ष वर्णिला आहे ह्मणून याला 'भीष्म भक्तिभाग्य' हें पंतांनीं अन्वर्थक नांव दिलें आहे. आतां प्रस्तुत काव्यांत काय अद्भुतपण आहे तें मूळ व्यासकृति व पंतकृति यांची तुलना करीत करीत पाहूं ह्मणजे रूपांतर करतांना पंत आपलें धोरण कसें सांभाळीत हें-ही आपल्या लक्षांत येईल.

'भारतयुद्धीं वधिलें गुरु, बंधु, स्वजन, मित्र, शूर, हित' याबद्दल धर्म-राजाला विमनस्कता प्राप्त झाली. युद्धारंभीं कृष्णानें जसा पार्थाला बोध केला तसा त्याला धर्मालाही करतां आला असतां, पण कृष्णाचें धोरण मोठें! सर्व धर्मज्ञ भीष्माचार्य आसन्नमरण झाले होते, तेव्हां ज्या कृष्णानें 'पार्थ धर्मा-च्या चित्तीं अविवेक जगद्धितार्थ वाढविला,' त्यानेंच 'कुरुगुरु कवि रवि-तेजा संप्रति करणार देहसंन्यास' हें जाणून त्याच्याकडूनच सर्व धर्मोपदेश करविला. शरपंजरीं पडलेल्या भीष्मदर्शनार्थ पांडव, व्यासधौम्यादि मुनि, देव, व ब्राह्मण सर्व जमले:—

देवर्षि, ब्रह्मर्षी, राजर्षी, तेथ तेधवां आले।
त्या भरतनायकातें देखाया सर्व एकवट झाले ॥ १.३६ ॥

त्या सर्व देवमुनिब्राह्मणांना त्या धर्मज्ञानें 'स्वदृक्कमळांनीं' पूजिलें. श्री-कृष्णही आले.

१ मूळ:—

कृष्णं च तत्प्रभावज्ञ आसीनं जगदीश्वरम्।
हृदिस्थं पूजयामास माययोपात्तविग्रहम् ॥ १० ॥

पंत:—

मायावेगें मानववेष धरुनि भार भूमिचा हरिला।
ज्या जगदीशें कृष्णें, पूजी हृदयांत भीष्म त्या हरिला ॥ ४२ ॥

हें भाषांतर पदशः झालें असून पंतांनीं 'तत्प्रभाव' याचा अर्थ 'भूमिभा-रहरण' असा मार्मिकपणानें केला आहे. पांडवांना भीष्म ह्मणतातः—

२ मूळ:—

अहो कष्टमहोऽन्याय्यं यद्यूयं धर्मनंदनाः।
जीवितुं नार्हत क्लिष्टं विप्रधर्माच्युताश्रयाः ॥ १२ ॥

पंत:—

भीष्म ह्मणे 'पुत्रकहो! परिसा मद्वाक्य धर्मनंदन हो ॥
कां म्लानवदन झालां? जो होतो तो विवेक मंद न हो ॥४५॥

जें हें झालें, याच्या तापें निजजीवितीं तुह्मीं विटलां, ।
निर्मळविवेकमानसहंस कसे शोककर्दमें किटलां ॥ ४६ ॥
यावरि वांचावें हें योग्य नव्हे आपणांसि लोकांत ।
ऐसें मनांत आणुनि सुत हो! झाला निमग्न शोकांत ॥ ४७ ॥
भूदेव, धर्म, अच्युत, हे कीं आश्रय तुह्मांसि आहेत ।
या चिंतारत्ना जो पूर्ण नव्हे, कोण तो वदा हेत ? ४९ ॥

मूळ एका श्लोकाचें पदशः भाषांतर पंतांनीं चार सरळ आर्यांत केलें आहे. पांडवांना विवेकमानसहंसांची व विप्रधर्मकृष्णांना चिंतामणिरत्नांची दिलेली उपमा या दोन्ही समर्पक आहेत. या केवळ पंतप्रतिभानिर्मित आहेत.

३ मूळः—

संस्थितेऽतिरथे पांडौ पृथा बालप्रजाः वधूः ।
युष्मत्कृते बहून्क्लेशान्प्राप्ता तोकवती मुहुः ॥ १३ ॥

पंतः—

बहु कष्ट तुह्मां बाळांकरितां त्या पांडुमृत्युपासून ।
अद्यापि पावती ती, माझी सुगुणामृतप्रपा, सून ॥ ५५ ॥
आपण शिरोनि शोकीं, करितां माता वृथा वृथा कष्टी ।
तीचा अवलंब तुह्मी, अंधाची सर्वशक्ति जी यष्टी ॥ ५६ ॥
मातेचें मन, असतां संसारीं सुत उदास, कळकळतें ।
गंगेच्या वात्सल्यावरूनि असें मज बुधा ! सकळ कळतें ! ॥५७॥

येथें वस्तुतः मूळ श्लोकाचें भाषांतर पहिल्याच आर्येंत येऊन गेलें आहे. त्यांतही कुंतीला 'माझी सुगुणामृतप्रपा सून' ह्मणून भीष्मांनीं आपलें वात्सल्य व्यक्त केलें आहे. पुढच्या दोन आर्या तर पंतांच्या पदरच्याच आहेत. 'तुह्मी कष्टी राहून माता वृथा कष्टवितां !' याप्रमाणें या श्लोकाचा मागील श्लोकांशीं संबंध जोडला आहे. 'मातेचें मन, असतां संसारीं सुत उदास, कळकळतें !' यांत संसारांत सर्वांच्या नित्य प्रत्ययास येणारें तत्व पंतांनीं किती मार्मिकपणानें सांगितलें आहे. भीष्मांनीं हें सांगून पुढें लगेच आपल्या आईच्या प्रेमाचें उदाहरण दिलें आहे ! ! कालिदासादिकांनीं प्रणयिजनांचीं हृद्गतें जाणलीं, शेक्स्पीअरप्रभृतींनीं मनुष्यस्वभावाच्या भिन्नभिन्न छाया दाखविल्या, पण कुलीन हिंदु कुटुंबांतल्या भिन्न भिन्न व्यक्तींच्या निरनिराळ्या मनोवृत्ती मोरोपंतांनीं जशा व्यक्त केल्या आहेत, तशा त्या व्यक्त करणारा अन्य कवि कोणी झाला असेलसें मला वाटत नाहीं. 'सर्वं कालकृतं मन्ये' वगैरे ४ श्लोकांचें पंतांनीं सुंदर भाषांतर केलें आहे:—

४ मूळः—

**यत्र धर्मसुतो राजा गदापाणिर्वृकोदरः ।**
**कृष्णोऽस्त्री गाण्डिवं चापं सुहृत्कृष्णस्ततो विपत् ॥ १५ ॥**

पंतः—

**जेथें नृप धर्म, गदाधर भीम, महास्त्रशस्त्रपटु जिष्णु, ।**
**गांडीवचाप अद्भुतशक्ति, सखा कृष्ण हा स्वयें विष्णु ! ॥ ६१ ॥**
**ऐसें अत्यंताद्भुत, पुण्यशरीरास्त्रशस्त्रदैवबळ ! ।**
**तेथेंहि विपत्ति अशी दावी, हा काळ सर्वथा प्रबळ ! ! ॥ ६२ ॥**

५ मूळः—

**तथाप्येकांतभक्तेषु पश्य भूतानुकंपितम् ।**
**यन्मेऽसूंस्त्यजतः साक्षात्कृष्णो दर्शनमागतः ॥ २२ ॥**
**भक्त्यावेश्य मनो यस्मिन्वाचा यन्नाम कीर्तयन् ।**
**त्यजन्कलेवरं योगी मुच्यते कामकर्मभिः ॥ २३ ॥**

पंतः—

**जे निरुपाधिक सेवक, देव करी त्यांवरीच फार कृपा ।**
**आला मरणावसरीं मज भेटाया पहा ! मुकुंद, नृपा ! ॥ ७९ ॥**
**भक्तीनें मन, ज्याच्या पदपद्मीं, मधुप करुनियां, योगी ।**
**ज्याचें गातां नाम, त्यजुनि तनु भ्रमहि, मुक्तिपद भोगी ॥ ८० ॥**

येथें दोन संस्कृत श्लोकांचें दोनच मराठी आर्यांत बरोबर भाषांतर केलें आहे! पदपद्मीं मनोभ्रमर गुंतविल्याचें रूपक पंतांच्या पदरचें असल्यामुळें व 'भ्रमहि' या पदांत स्वारस्य असल्यामुळें पंतांच्या आर्येंतच भक्तिभावाचा जास्त उठाव झाला आहे. 'स देवदेवो भगवान्प्रतीक्षतां कलेवरं यावदिदं हिनोम्यहं' (२४) या भीष्मोक्तीवरील पंतांची मुरस आर्या पहाः—

**जेव्हां मानेल मना तेव्हां टाकीन या शरीरा हो ।**
**तोंवरि मदग्रभागीं हा गीतामृतनिधी उभा राहो ! ॥ ८४ ॥**

'गीतामृतनिधी' या पदाची गोडी सद्भक्तच जाणतील! अत्यंत समर्पक विशेषणें, अर्थ अधीकच खुलविणारे उपमारूपकादि अलंकार, व हृदयांतला शुद्ध भक्तिप्रेमाचा प्रवाह या सर्वांचा उत्कृष्ट परिपाक करून पंत वाल्मीकिव्यासशुकादि सत्कवींच्या मनांतला भाव इतक्या उत्कृष्ट तऱ्हेनें व्यक्त करितात कीं मूळ कोणतें हें जाणण्याची सुद्धां पंचाईत पडते ! येथें ज्ञानोबारायांच्या पुढील उक्तीची मला आठवण होतेः—

**मूळग्रंथीचिया संस्कृता । वरी मऱ्हाठी नीटें पाहतां ।**
**अभिप्राय मानिलियां चित्ता । कवण भूमि हें न चोजवे ४३ ॥**
**जैसें आंगाचेनि सुंदरपणें । लेणिया आंगचि होयें लेणें ।**
**तेथ अळंकारिलें कवण कवणें । हें निर्वचेना ॥ ४४ ॥**
**तैसी देशी आणि संस्कृत वाणी । एका भावार्थाच्या सुखासनीं ।**
**शोभती आयणी । चोखट आइका ॥ ४५ ॥**

—ज्ञानेश्वरी अध्याय. १०

यानंतर भीष्मांनीं धर्मादिकांस राजधर्म, आपद्धर्म; मोक्षधर्म, स्त्रीधर्म, भगवद्धर्म, वगैरे शिकविले, पण त्यांचा विस्तार भारतांत केला असल्यामुळें व पंतांनीं प्रस्तुत काव्यासाठीं पुढें ठेवलेल्या भागवताच्या अध्यायांत ते नसल्यामुळें 'विस्तरसंक्षेपकुशल' पंतांनीं त्यांचा येथें उल्लेख करण्यापलीकडे कांहीं केलें नाहीं. पंतांमध्यें असें तारतम्य मूळचेंच होतें व येथें तर 'भीष्मभक्तीचें भाग्य' वर्णन करायचा त्यांचा हेतु असल्यामुळें या मुख्य हेतूचा परिपोष होईल असेंच धोरण त्यांना ठेवणें होतें व तें त्यांनीं संभाळलें आहे. असो, भीष्मांनीं श्रीकृष्णस्तव केला त्याचें भाषांतर करण्यापूर्वी पंतांनीं जो उपोद्घात केला आहे, त्यांतल्या गोड आर्या पहा:—

**प्रभुदृष्टि माय, भीष्मा वत्साला, होय भव्य धारा हे ।**
**आलिंगी करुणार्द्रा, देहीं कांहींच न व्यथा राहे ॥ १०८ ॥**

**देहत्यागावसरीं भीष्म प्रेम प्रभूत मागाया ।**
**श्रीचरणीं स्थिर चित्त स्थापुनि लागे प्रभूत्तमा गाया ! ॥ ११० ॥**

**सेउनि संतत पाला, संत तपाला यदर्थ करितात ।**
**तो पी या स्तवना कीं यास्तव नाकींहि हेंचि वरितात ! ॥ ११७ ॥**

भीष्मकृत ईशस्तुतीच्या आर्या सर्वच सुंदर आहेत. मुख्यः भीष्मार्जुनयुद्धप्रसंगीं पार्थरक्षणार्थ कृष्णानें स्वप्रतिज्ञात्याग केला पण भीष्मप्रतिज्ञा खरी केली त्याप्रसंगाचें हृदयहारी वर्णन पंतांनीं केलें आहे, तें मूळांतच वाचलें पाहिजे. भीष्मनिर्याणसमयीं:—

१ बरोबर तोलून. २ खरा अर्थबोध झाल्यावर. ३ मूळ कोणतें (व भाषांतर कोणतें) हें कळणार नाहीं. आणि असें होईल तरच तें भाषांतर खरें ! ४ या ज्ञानोबांच्या उक्तीशीं 'अन्योन्यशोभाजननाद्भूव साधारणो भूषणभूष्यभावः' ही कालिदासाची उक्ति ताडून पाहण्यासारखी आहे. ५ प्रेमानें, आवडीनें.

६ मूळ:—

**कृष्ण एवं भगवति मनोवाग्दृष्टिवृत्तिभिः ।**
**आत्मन्यात्मानमावेश्य सोऽन्तःश्वास उपारमत् ॥ ४१ ॥**

पंत:—

**ऐसें स्तवितां भीष्म स्वमनोवाग्दृष्टिवृत्तिहीं प्रवण ।**
**आत्मा करूनि, मिसळे श्रीकृष्णीं, जेंवि सागरीं लवण ॥ अ.२.५३ ॥**
**भगवान् कृष्णचि साक्षात् ब्रह्म, ह्मणुनि भीष्मराय तो यांत ।**
**मिसळे, असें नभ नभीं, कीं तेजीं तेज, तोय तोयांत ! ॥ २-५४ ॥**

भीष्माला श्रेष्ठतम अशी सायुज्यमुक्ति मिळाली तेव्हां:—

**'अगड्ड धों अगड्ड धों धों धों' वाजविती देव दुंदुभी शतशा ।**
**वरि कुसुमवृष्टि करिती, झाल्याचि धरातळीं कधीं न तशा ॥ ५८ ॥**

याप्रमाणें पंतांनीं श्रीभागवतांतला प्रथम एक अध्याय घेऊन त्यावर भाषांतररूप प्रस्तुत काव्य केलें. हें चांगलें साधलें असें वाटल्यावरून पंतांनीं हाच क्रम पुढें चालविला.

**३ अवतारमाला:**—हें प्रकरण मूळ भागवत स्कंध २ अध्याय ७ मधून घेतलें आहे. मूळांतल्या ५३ श्लोकांवर पंतांनीं ३१० आर्या केल्या आहेत. पंतांचे मित्र जगन्नाथपंत यांच्या सांगण्यावरून पंतांनीं 'हरिजनांना प्रिय झालेल्या' आर्यावृत्तांत भगवंताचे २४ अवतार वर्णिले आहेत. निम्या अधिक आर्या राम व कृष्ण यांचीं चरित्रें गाण्यांतच गेल्या आहेत. सर्वप्रसिद्ध दशावताराशिवाय यांत, यज्ञ कपिल, दत्त, नरनारायण, कुमार, पृथु, ऋषभ, हयग्रीव, व्यास वगैरे चवदा अवतार संक्षेपानें वर्णिले आहेत. कपिलमुनींनें आपल्या आईला ब्रह्मविद्या शिकविली याबद्दल पंत परिवृत्ति अलंकारानें ह्मणतात, 'दे देवहूतिला स्तनरस सेवुनि आत्मवित्त कपिलाख्य !' धन्वंतरीवर पंतांची आर्या:—

**धन्वंतरि होय प्रभु, आयुर्वेद प्रवर्तवी लोकीं ।**
**जेसी दयावती मति याची, माता तसी नये तोकीं ॥ ९१ ॥**

रामकृष्णावतारीं प्रभूनें जीं त्रिभुवनमंगल चरितें केलीं तीं अत्यंत प्रेमानें पंतांनीं गायिलीं आहेत. आपल्या जिव्हेस पंत वारंवार विचारीत कीं 'वर्णिसि हरिस न, रसने ! कलिला येईल न काय गे ! हाय ! ' व्यासावताराबद्दल पंतार्या:—

**भव्य महाभारत हा रचिला इतिहास, पांचवा वेद; ।**
**याच्या श्रवणें न उरे अज्ञान, तदुत्थ सर्वही खेद ॥ २७३ ॥**

बुद्ध व कल्कि यांवरील आर्या ऐतिहासिकदृष्ट्या मनन करण्यासारख्या आहेत. वेदधर्मविरोधी बुद्धालाही देवावतारांमध्यें आमच्याकडील गुणज्ञ व विचारी पुरुषांनीं गणलें आहे. पंत ह्मणतात:—

**असुर श्रुतिच्या मार्गीं सुदृढा निष्ठा सदैव ही धरिती ।**
**सुतपोनुष्ठानें ते निजविजयप्राप्तिकारणें करिती ! ॥ २७५ ॥**
**प्रभु होय वेदनिष्ठा त्यांची उडवावया स्वयें बुद्ध ।**
**शुद्ध श्रुतिपथ दूषी, बुडवी असुरांसि न करितां युद्ध ! ॥ २७७ ॥**

असुर ह्मणजे कोण ? वेदधर्माची व चातुर्वर्ण्याची टवाळी करणारे अश्रद्ध पुरुष कीं काय? किंवा आसुरी संपत्तीनें उन्मत्त झालेले व वेदधर्मांत असूनही त्याची विटंबना करण्यास व वर्णाश्रमपद्धतीचा उच्छेद करण्यास उद्युक्त झालेले अहंकारी पुरुष ? पंतांचा मतलब असा दिसतो कीं वेदधर्मीय द्विजातींना तपोनुष्ठानादिकांनीं जसें सामर्थ्य प्राप्त होतें, तसें सामर्थ्य आपणांस प्राप्त व्हावें ह्मणून झटणाऱ्या, पण त्यांच्या सारख्या आत्मिक उन्नतीच्या उच्च पदवीस न पोंचलेल्या व तपोजन्य सामर्थ्याचा व्यय जगत्कल्याणार्थ करावयाची रीति न जाणणाऱ्या ' असुरांची ' वेदमार्गाविषयीं अश्रद्धा व्हावी एतदर्थ प्रभूनेंच बुद्धाचा अवतार घेतला व पाखांडधर्म प्रचलित करून त्यांचें तेज वाढूं दिलें नाहीं !

कल्यवताराविषयीं मूळ व पंतांचें विस्तृत भाषांतर पहा:—

**यर्ह्यालयेष्वपि सतां न हरेः कथाः स्युः**
**पाखंडिनो द्विजजना वृषला नृदेवाः ।**
**स्वाहा स्वधा वषडिति स्म गिरो न यत्र**
**शास्ता भविष्यति कलेर्भगवान्युगांते ॥ ३८ ॥**

**होतिल पाखंडी द्विज, सर्व भ्रमतील जेधवां कलिनें ।**
**मलिनें कर्में रुचतिल, जेविं अलिकुलासि विकसितें नलिनें[1]॥२८३॥**
**सर्वस्व हरुनि राजे शूद्र भ्रमद प्रजांसि होतील, ।**
**घटज जसा जळनिधिजळ, खळजन परधन मुखांत ओतील॥२८४॥**

१ मलिन कर्मांना विकसित कुसुमांची उपमा दिली आहे ती विरुद्धार्थद असल्यामुळें अप्रशस्त आहे.

संतांच्या ही सदनीं कृष्णकथा पावतील लोपातें ।
कीं अपराधावांचुनि खल करितिल विघ्न धरुनि कोपातें ॥ २८५ ॥
जेव्हां नच करिजेल श्रवण 'स्वाहा,' 'स्वधा,' 'वषट्' कानें ।
राहों दिजेलें लेशहि शत्रूंच्या साधुगुण न षट्कानें ॥ २८६ ॥
तेव्हां कलिशास्ता प्रभुवर्य अवतरेल, शंभलग्रामीं ।
जो नामें विष्णुयशा ब्राह्मणसत्तम, तयाचिया धामीं ॥ २८७ ॥

**४ कलिगौरव**:—पंतांना स्वहस्तानें लिहिलेलें एक पृष्ठ एकदा माझ्या पाहण्यांत आलें त्यांत 'प्रसंगमिति' या तिसऱ्या स्कंधांतल्या श्लोकांवर पंतांनीं सहज पांच सहा श्लोक लिहिलेले आढळले. २।३ श्लोक खालीं देतों:—

ह्मणतसे जन 'कांकरभाजन । प्रकट हा कळि पातकभाजन !' ।
परि गुणज्ञ रसज्ञ सभाजन । करिति या कळिचेंचि सभाजन ॥१॥
तेचि या कलियुगांत कृतार्थ । स्तुत्य ते नर सभाग्य यथार्थ ।
रामनाम सतत स्मरणारे । तेथ सादर जना करणारे ॥ ३ ॥
कळी हा दोषांचा निधि परि गुणज्ञीं निर्वाडिला
असे येथें मोठा गुण विगुण जेणें दवडिला ।
सुखें तारी सर्वा त्वरित हरिचें कीर्तन खरें
तुटेना वज्रें तो सहज तुटतो बंध नखरें ॥ ४ ॥

मंत्रभागवताच्या अकराव्या स्कंधांत पुढील आर्या आहेत.

मोठा कलिचा गुण हा, कीं केशवकीर्तनेंचि सर्व तरे ।
राजा ! हरिचरिताचें गाणें हें वज्र, पाप पर्वत रे ॥ ११२ ॥
गर्व कृतादियुगांचा हरिला बा ! याचि सद्गुणें कालिनें ।
कर्पूरचंदनांचा स्वसुवासें जेंवि मृगमदें मलिनें ॥ ११४ ॥

दुसरी आर्या फारच मार्मिकपणाची आहे. ह. प. काशीनाथबोवा मसूरकर यांनीं एकदा पुणें मुक्कामीं कीर्तनप्रसंगीं तिचा अर्थ सांगितला तो येणेंप्रमाणें:—"कृत व द्वापार या युगांपेक्षां कलियुगाची महती अतिशय आहे, कारण या युगांत हरिकीर्तनानें सहज सर्व तरतात. मलिन ह्म. कृष्णवर्ण, काळी अशी जी मृगमद ह्म. कस्तुरी हिचा सुवास शुभ्र कापरापेक्षां किंवा रक्तवर्ण चंदनापेक्षां अधिक आहे. हा दृष्टांत पंतांनीं फारच चातुर्यानें योजि-

१ शत्रूंचें षट्क ह्म. सहा रिपु, ते साधुगुण राहूं देणार नाहीत. दिजेल, करिजेल बोलिजेल असे कर्मणी प्रयोग पंतांच्या कवितेंत पुष्कळ येतात. २ कांकर, कंकर ह्म. लहान खडे. ३ पूजन, स्तवन.

ला आहे. कृतयुग सत्वगुणप्रधान आहे व सत्वाचा रंग शुभ्र असा वर्णिला असल्यामुळें तत्सूचक कर्पूर असा शब्द पंतांनीं योजला आहे. तसेंच द्वापारयुग रजोगुणप्रधान आहे व त्याचा रंग रक्त असल्यामुळें तत्सूचक चंदन शब्द योजला आहे व 'स कलिस्तामसःस्मृतः' या वचनाप्रमाणें कलियुगाचा वर्ण तें युग तमोगुणप्रधान असल्यामुळें काळा आहे व ह्मणून पंतांनीं मलिन ह्म. काळा, सपाप, असा मृगमद शब्द योजला आहे! पंतांच्या चातुर्याची धन्य खरी!"

५ **ध्रुवचरित्रः**—भागवताच्या चवथ्या स्कंधांत ८ते१२ या पांच अध्यायांत ध्रुवाचें चरित्र वर्णिलें आहे. पंतांनीं त्याच्या आधारें १०७ साक्या रचिल्या आहेत. उत्तानपाद राजाच्या सुनीति व सुरुचि या दोन स्त्रियांपैकीं वडील पण नावडती जी सुनीति तिचा पुत्र ध्रुव होय. सावत्र आईनें त्याला राजाच्या मांडीवरून ढकलून दिलें, त्यामुळें वैराग्य उत्पन्न होऊन मातृवचनानुसार तो हरिप्रसादप्राप्तीसाठीं रानांत गेला, तेव्हां 'संसृतिपारद परमविशारद भेटे श्रीनारद या' नारदानें त्याला भगवद्भजनाचा मंत्र सविधि शिकविला. सहा महिने ध्यानरत झाल्यावर हृदयास्थित परमात्मा साक्षात् सगुणरूपानें भेटला व ध्रुवाला त्यानें अढळपद दिलें. ही एकंदर कथा आहे. ही कथा मूळांतच फार मधुर आहे. मराठींत अमृतरायांनीं या कथेवर एक कडाका छंदांत सुरस काव्य रचिलें आहे व चिंतामणिकृत दिंडीवृत्तांतलें ध्रुवाख्यान आपल्या वृद्धस्त्रियांच्या तोंडीं आहे. पंतांनीं ह्या गोड कथेवर हें स्वतंत्र साकीबद्ध काव्य रचिलें आहे. नारदध्रुवांचा संवाद, ईश्वर ध्रुवांचा संवाद, ध्रुवकृत ईश्वरस्तुति, ध्रुवाचा आजा स्वायंभूव मनु यानें ध्रुवास केलला बोध हे भाग मूळ भागवतांत अत्युत्कृष्ट आहेत, पण पंतांनीं केवळ कथाभागावर नजर देऊन हे सरस भाग सोडून दिले आहेत किंवा एक दोन साक्यांत आणले आहेत. ध्रुवानें 'योंतःप्रविश्य मम वाचमिमां प्रसुप्तां' यथून प्रारंभ झालेल्या बारा श्लोकांत जी ईश्वरस्तुति केली आहे ती उत्तमांतल्या उत्तमांत गणण्याइतकी सर्वोत्कृष्ट आहे, ती तरी पंतांनीं गाळायला नको होती.

हृदिस्थ परमात्मा सगुणरूपानें प्रकटला तेव्हां ध्रुवाची गडबड उडाली त्या प्रसंगाचें पंत वर्णन करितातः—

राहे पुढें उभा परमेश्वर परि तो ध्रुव पाहेना ।
कीं अंतःस्फुरितप्रभुमूर्तिवियोग[1] क्षण साहेना ॥ ५२ ॥
हृदयीं भगवन्मूर्ति न दिसतां पावे व्युत्थानातें[2] ।
ध्रुव गडबडला चुकला शोधी बाळ जसा थानातें ॥ ५४ ॥
नेत्रें उघडी घाबरला तो ध्रुव सहसा जों पाहे ।
तों आंत जसी तसि बाहेर प्रभूमूर्ति उभी आहे ॥ ५५ ॥

ध्रुवाच्या गालाला प्रभूनें दयेनें शंखस्पर्श केला व तात्काळ त्याला प्रभु-स्तुति करण्याची स्फूर्ति झाली याबद्दल पंतांच्या साक्या मूळापेक्षांही सरस आहेत:—

मूळ:—

कृतांजलिं ब्रह्ममयेन कंबुना
पस्पर्श बालं कृपया कपोले ।
स वै तदैव प्रतिपादितां गिरं
तं भक्तिभावोऽभ्यगृणादसत्वरम् ॥ १ ॥

पंत:—

ध्रुवमतिजाड्य, ब्रह्ममय दरें स्पर्शुनि गाल, हरी[3]; तें ।
वात्सल्य असें परिसुनि जन हो ! हर्षुनि माल हरीतें ॥ ५८ ॥
जागविली निजली होती त्या बाळाची जी वाचा ।
बोध दिला ऐसा व्हावा ज्या महिमा जीवाचा ॥ ५९ ॥
बाळमुखींचीं जरि अव्यक्तें अक्षररूपें साधीं ।
केवळ अमृतचि होतीं वत्सल गुरुजनकर्णीं आधीं ! ॥ ६१ ॥
परमानुग्रह करुनि शिकविलें प्रभुनें भाषण मग तें ।
किति वर्णावें ? अमृत कसें हो त्या सूक्तिपुढें तगतें ? ॥ ६२ ॥
वाजविला वेणु तसा किंवा बहु शिक्षित हा शुकसा ।
प्रभुला प्रमुदित मग न करील ध्रुव बाळक आशु कसा ! ॥ ६३ ॥

हें वत्सलरसाचें किती सुंदर उदाहरण आहे? हें पंतांच्या पदरचें आहे. श्लोककेकावलींत ६२-६५ या चार श्लोकांत पंतांनीं ध्रुवाची महती वर्णिली आहे. त्यांत पुढील केकार्ध आहे:—

किती वय ? कसें तप ! प्रखर काय विश्वास तो !
ध्रुव ध्रुव खरा ! स्तवा उचित होय विश्वास तो ।

---

१ हृदयांत स्फुरणाऱ्या प्रभुमूर्तीचा वियोग. २ प्रतिरोध, समाधींतून जागें होणें. ३ हरण करी.

६ पुढील चार **स्फुट आर्या** स्फुट आर्या एका चिठोरीवर पंतांनीं स्वहस्तानें लिहिलेल्या आहेत. त्यांतील कल्पना मूळांत नाहीं. ध्रुवमाता सुनीति आपल्या पतीवर संतापून त्वेषानें ह्मणते:—

**'हाय!' ह्मणे मन्य, सुता। काय तुझा सायसा मुलायम हा।**
**काय करूं? अय वत्स, राय नव्हे तात हा मुला! यम हा!**
**वोढें अफाट वोढेंक वाटेंतचि फांटतील पाय तेंनें।**
**दाटेचि ढुंढका मज, कांटे रुततील, घाल पायतनें, ॥ २ ॥**
**गिरिदरित करिहरिहारिण फिरति करिति रव वनांत त्या चिमण्या।**
**बाळा! लहान कीं तुज लागेल तहान भूक ही चिमण्या! ॥ १६ ॥**
**रायासि बायको मी सांपडलें जेंवि गाय गा! यवना।**
**दीनावना मनामधिं जाउनियां ध्याय पाय गाय वना ॥ ४ ॥**

यांतील अनुप्रास गोड आहेत. पंतांनीं सतींचीं स्तवनें व वर्णनें जागोजाग केलीं आहेत, पण त्यांच्या कवितेंत सती कोणत्याही कारणानें इतकी पतीवर चरफडल्याचें उदाहरण नाहीं. प्रत्यक्ष सुनीति आपल्या पतीवर इतकी संतापली नसेल, पण पंतांसारख्या प्रेमळ सुजनास सुनीतिछलानें इतका त्वेष आला कीं त्यांच्या मुखावाटे तो वरीलप्रमाणें सहज बाहेर पडला! संत नेहमीं शांत असतात खरे, पण सच्छल त्यांच्यानें पाहवत नाहीं व ऐकवतही नाहीं! मंत्रभागवतांत प्रस्तुत आख्यान पंतांनीं आर्यांत वर्णिलें आहेच. त्यांतील पुढील दोन आर्या उत्कृष्ट आहेत:—

**वय पांचा वर्षांचें, अतिकोमलकाय नव लहान, पण।**
**सा मासांतचि मतिचा हरि तो मळ, काय हा लहान पण? ॥८२॥**
**बालमनोरथ पुरवी श्रुतिमयशंखें शिवोनि गल्ल हरी।**
**उठवी स्तुतिसूक्ति जसा अनिल क्षीरार्णवांत सल्लहरी ॥ ८७ ॥**

**७ अमृतमथन:**–आठव्या स्कंधांत अ. ५–९ या पांच अध्यायांत समुद्रमंथनाची साग्र कथा वर्णिली आहे, तिच्या आधारें पंतांनीं प्रस्तुत प्रकरण रचिलें आहे. समुद्रांतून निघालेलें हालाहल विष शंकरांनीं जगत्कल्याणार्थ प्राशन केलें, या गोष्टीचें मर्म पंतांनीं खुबीनें सांगितलें आहे. लोकनायकांनीं शंकरास गुरुस्थानीं ठेवून त्यांची अवश्य पूजा करावी. जगास जाळीत सुटणारें विष स्वत: भक्षुन शंकरांनीं स्वत:वर आपत्ति ओढून

१ दुधाच्या साईसारखा मृदु देह. २ ओढे. ३ तृणानें, गवतानें.

घेतली व प्राण्यांच्या कळवळ्यामुळें त्यांना क्लेशमुक्त केलें. 'कृपया भृशपीडितः' यावर पंतांची आर्याः—

**तत्काळचि करुणार्णव देव वतंसीकृतेंदुकळे वळला।**
**तें विश्वप्राणहर व्यसन विलोकूनि फार कळवळला ॥ ५५ ॥**

थोर असेच दयाळू असतात. पंत ह्मणतातः 'प्राणादि सर्व वेंचुनि आर्तांचें करिति संत रक्षण हो!' शंकर पार्वतीस ह्मणतातः—

**जग, जगदीश्वरि! वांचो, त्वदधरमधुसेंचि सेवितों विष मी।**
**तो आप्तोत्तम कामा ये जो धांवोनि अवसरीं विषमीं ॥ ६२ ॥**

ही सुंदर आर्या अगदीं स्वतंत्र आहे. पार्वतीच्या अधरामृतपानासारखेंच विषपान शंकराला वाटलें. जगत्कल्याणासाठीं संत जे आघात सोसतात, ते दुःखाकष्टानें नव्हे तर संतोषानें, आनंदानें व निरपेक्षतेनें सोसतात, हें पंतांना येथें सांगावयाचें आहे.

**८ वामनचरितः**—हें प्रकरण आठव्या स्कंधांतील अध्याय १५–२३ या नऊ अध्यायांच्या आधारें लिहिलें आहे. यांत १९९ आर्या आहेत. प्रभूनें वामनावतारीं कश्यपभार्या अदिति इच्या पोटीं जन्म घेतला व बळिराजापासून त्रिपादभूमि मागून घेऊन त्याच्या मस्तकीं पाय ठेवून त्याला पाताळीं घातला, ही मनोरम कथा पंतांनीं या प्रकरणांत सांगितली आहे. वामनाचें बटुवेषानें बलियज्ञप्रसंगीं आगमन, वामनाला त्रिपादभूमिदान द्यावें कीं नाहीं याबद्दल बळिराजा व त्याचे गुरु शुक्राचार्य यांच्यांत झालेला संवाद, बळीचें औदार्य व भगवंताची दयाशीलता हे प्रसंग पंतांनीं फारच बहारीनें वर्णिले आहेत. पंतांची वळणदार व सुंदर आर्या या काव्यांत दृष्टीस पडते भाषा सुलभ असून यमकांची गर्दी नाहीं. उन्नतविचार व भक्तिभाव यांनीं काव्याला फार माधुर्य आलें आहे. बळिराजाचें औदर्य, त्याचा आजा प्रल्हाद याविषयीं त्याची भक्ति, त्याची गुरुभक्ति, वंशाची कीर्ति कायम राखण्याविषयीं व वचनपरिपालन करण्याविषयीं त्याची परमोत्कंठा, त्याची अतुल भगवद्भक्ति व अप्रतिम शालीनता या गुणांचा स्पष्ट

---

१ शिरोभूषण केली आहे चंद्रकला ज्यानें. हें विशेषण साभिप्राय आहे. विषयाचें मारक औषध जवळ होतें. हा परिकरालंकार आहे. २ संकट. ३ 'स सुहृद् व्यसने य स्यात्'

बोध व्हावा इकडे मुख्य कटाक्ष ठेवून पंतांनीं सदर सुंदर काव्य रचिलें आहे. सर्व काव्य उत्कृष्ट नीतितत्त्वांनीं विणून काढलें आहे. वामनावताराचें रहस्य समजून घेण्यासाठीं प्रत्येकानें एकवार तरी सदर काव्य अवश्य वाचावें.

बटुवेषधारी वामन बलीच्या यज्ञमंडपांत आले तेव्हां सर्व सभा त्यांच्या दैवी तेजानें दिपून गेली. याबद्दल 'सऋत्विजो यजमानः सदस्या हतत्विषो वामनतेजसा नृप' याप्रमाणें मूळांत वर्णन आहे. यावर पंतांच्या आर्या पहा:—

**मखमंडपांत येतां वामन, धाम न मुनिव्रजीं राहे, ।**
**तेजें धर्षित झाले ! ग्रह कोण असा रवीस जो साहे ! ॥ ३८ ॥**
**भार्गव सशिष्य उठले, सभ्यजनहि, अग्निहि, स्वकुंडांत, ।**
**देहांत सर्व सात्विक भाव !, 'नमस्तेऽस्तु' सर्व तुंडांत ! ॥३९॥**

या आर्या किती ओजस्वी आहेत. उठले यावरचा कारकदीपकालंकार सुंदर आहे. वाचकांनीं मूळ व पंतकृति यांची तुलना करून पहावी ह्मणजे पंतांची करामत व चातुर्य त्यांना समजून येईल. बळीनें वामनाचा सत्कार व स्तव करून त्याला दान मागायला सांगितलें. त्यानें त्रिपाद भूमि मागितली तेव्हां बळीला आश्चर्य वाटलें. यावर वामनानें संतोषवृत्तीची महती सांगितली:-

**जो त्रिपदमहीलाभें संतुष्ट त्रिभुवनेश्वरा ! नाहीं ।**
**होइल न सनववर्षद्वीपेंही पूर्णकाम तो कांहीं ॥ ६२ ॥**
**जो संतुष्ट यदृच्छालाभें ब्राह्मण सदैव ही असतो ।**
**वाढे तत्तेज, असा बहुतेजस्कर नव्हे सुधारस तो ॥ ६७ ॥**

बळीनें भूदान द्यायला उदक सोडलें तों शुक्राचार्यांनीं 'विष्णुच वामनरूपानें देवकार्य साधायला आले' हें जाणून दैत्यरक्षणार्थ बळीला प्रवृत्तिमार्गाचा ह्मणजे व्यावहारिक नीतीचा बोध केला व 'विष्णूनें द्यावाभूमि दोन पायांनीं आक्रमून टाकल्यावर तुझें राज्य कोठें राहील ? वृत्तिरक्षण कसें होईल ? संसारांतल्या अनेक जीवांच्या योगक्षेमासाठीं प्रसंगीं असत्य बोलून व प्रतिज्ञा सोडूनही सुज्ञानें वृत्तिरक्षण करावें' याप्रमाणें उपदेश केला. शुक्राचार्य ह्मणतात:—

**असुरश्रेष्ठा ! ज्यांत होतो संपूर्ण वृत्तिचा अंत, ।**
**ज्यांत विचार नसे, त्या दानातें न प्रशंसिती संत ॥ ८१ ॥**

कीं बुद्धिमान् पुरुष जे, त्यांसि घडे दान, यज्ञ, तप, कर्म, ।
बुडतां वृत्ति बुडे जन, जोडावा व्याकुळें कसा धर्म ? ॥ ८२ ॥
केवळ सत्यें रिक्तचि जन, निंद्यचि केवळानृतें होय, ।
कांहीं हें, कांहीं तें ! हित धरितां वृद्धनीतिची सोय ॥ ८७ ॥
अनृत वदावें राया ! निःशंकचि वृत्तिसंकटीं, नर्मीं ।
गोविप्रपरित्राणीं, जेंवि विवाहीं, न दोष या कर्मीं ! ॥ ८८ ॥

नंतर 'वृत्तिलोभानें विप्राला नकार देऊन प्रऱ्हादयशाला मी डाग लावणार नाहीं, अपयशापेक्षां सर्वस्वहानि झालेली पत्करली' असा बळीनें निर्धार केला. बळी ह्मणाला:—

नरक, दरिद्रत्व, पदभ्रंश, मरण, असुखसिंधु हो मी तों ।
यापासुनि भीत नसे, जैसा बहु विप्रवंचना भीतों ! ॥ ९३ ॥
गुरुजी ! धनादि जें जें तें तें सर्वहि मृता जना सोडी ।
सोडूं नये स्वयें कां ? बा ! त्यांची सांग काय गा ! गोडी ? ॥९४॥

गुरुवचन मोडून बळीनें शेवटीं स्ववचन सत्य केलें. वामनानें दोन पादांनीं भूलोक व स्वर्लोक आक्रमिले. तिसरा पाय ठेवायला जागा नाहीं ह्मणून वामन कोपले. पंत ह्मणतात 'मेघ परमोदार असून क्वचित ज्वाळाही वितो !' बळीनें सांगितलें कीं 'मच्छिरीं पाद ठेवा.' बळी सामान्य कोटींतला नव्हे. 'नरकादिकांस नाहीं भीत जसा मी असाधुवादास !' असें ह्मणणाऱ्या महावीरांतला तो प्रमुख ! प्रभुपाद मस्तकीं पडतांच बळीला परमानंद झाला व 'नसतों भक्तकुळज तरि, नच होतों या अनुग्रहा पात्र !' याप्रमाणें तो नाचूं लागला. इतक्यांत प्रऱ्हाद प्रगट झाला त्यानें ईशस्तुति केली:—

प्रभुला प्रऱ्हाद ह्मणे, 'दिधलें होतें तुवांचि पद यातें ।
हरिलेंहि तुझेंचि तुवां, केवळ कारुण्य होय सदया ! तें ॥ १३५ ॥
भुलवी ज्ञात्यातें ही राजश्री स्पष्ट होय हाला हो ।
प्रभुजी ! आतां बळि अळि या पदपद्मासवासि हा लाहो !'॥१३६

नंतर बळीपत्नी ह्मणाली:—

राज्ञी बोले 'प्रभुजी ! तुमचेंचि तुह्मांसि काय अर्पावें ? ।
कैसें जी ! जल-दानें जलदानें सागरासि तर्पावें ? ॥ १३८ ॥

यानंतर जगत्प्रभूची ब्रह्मदेवानें प्रार्थना केली:—

स्वात्मार्पण केलें कीं श्रीचरणीं या स्वधर्मसत्वरतें ।
प्रभुनें दावावें जें दीनजनीं वत्सलत्व सत्वर तें ॥ १४१ ॥

देवानें बलिच्छलाचा शुद्ध हेतु काय होता तो याप्रमाणें सांगितला:—

**करितों अनुग्रह मनांतूनि जयावरि दयाभ्र मीं हरि, तों ।**
**त्याच्या सर्वार्थांतें, न पडों द्याया तया भ्रमीं, हरितों ! ॥ १४५ ॥**
**अर्थीहीं मद होतां होय पुरुष बहु अनम्र बा धात्या ! ।**
**अवमानितो जनातें मातें ही, ती पिशाचबाधा त्या ! ॥ १४६ ॥**
**ऐशा गर्वाचा क्षय माझ्याचि अनुग्रहें अगा धात्या !**
**मदनुग्रहेंचि तरले यासि, जसे सेतुनें अगाधा त्या ॥ १४८ ॥**

यापुढें प्रभूनें बळीवर प्रसाद करून त्याला पाताळलोकींचें राज्य दिलें:–

**निश्चिंत रहा सुतळीं, रक्षीन सदा तुला सपरिवारा, ।**
**माता आपण भागे, लागोंचि न दे मुलास परि वारा ! ॥१५९॥**

बळीनें गहिंवरून देवाची प्रेमभरानें स्तुति केली तेव्हांची एक आर्या:—

**या हस्तमस्तकांहीं तादृक्सद्भक्तिभाग्यहीनाहीं ।**
**प्रभुच्या श्रीचरणाला केला सम्यक्प्रणामही नाहीं ॥ १६३ ॥**

भक्तराज बळि व भक्तप्रिय प्रभु यांचा प्रेमळ संवाद वाचण्यालायख आहे. प्रभूनें बळिच्छळ केला, त्याचें कारण पंत सांगतात. ईश्वर दयाळू आहे ह्मणूनच तो ' करितो, अहित पदार्थ त्यजवाया, स्पष्टजन कपट तोकीं ' द्रव्यस्त्रीपुत्रादिकांतून चित्त काढण्यासाठीं प्रभु भक्तांवर प्रथम संकटें आणतो, व त्याच्या संसाराचा घातापात करतो. तुकोबारायांनीं ह्मटल्याप्रमाणें ' देव भक्तालागीं करू नेदी संसार । अंगें वारावार करूनि ठेवी ! ' दुसरी गोष्ट-प्रभूनें बळीच्या डोक्यावर पाय ठेवला ह्मणजे त्यावर परमानुग्रह केला. प्रभु-पदरजाची महती पंतांनीं ' अहल्योद्धार ' या प्रकरणांत वर्णिली आहे. आपल्या स्थूलदृष्टीला आपत्तीमुळें प्रभुकोप झालेला दिसतो. पण ती आपत्ति प्रभु केवळ दयाळुत्वामुळें आपल्या भक्तावर आणतो ! स्थूलदृष्टीला प्रभुकोप कोणता व प्रभुप्रसाद कोणता याचें ज्ञान नसतें. भक्ताला याचें ज्ञान असतें ह्मणूनच त्याची भक्ति अचळ राहते. वामनचरित्राचें रहस्य हेंच आहे.

९ **अंबरीषाख्यान.** (साक्या ४०) व १० **भक्तभूषण** ( विविध श्लोक ११० ) या नांवाचीं दोन सुरस काव्यें पंतांनीं नवम स्कंध, अ. ४।५ यांच्या आधारें रचिलीं आहेत. दोहींचा विषय एक, वर्णनपद्धती एक, मतलब एक. अंबरीष राजाला साधनद्वादशीचें व्रत होतें. दुर्वास ऋषीला त्यानें भोजनास बोलाविलें. ते स्नानाला गेल्यामुळें वेळेवर आले नाहींत व राजानें

पुरोहितानुज्ञेनें जलपान करून पारणें सोडलें. दुर्वास आले तों आपला अपमान झाला असें समजून परम संतप्त झाले, व आपल्या जटेंतून एक दसोडी काढून त्यांनीं राजाच्या अंगावर टाकिली. पण राजा होता विष्णुभक्त. त्याच्या रक्षणार्थ सुदर्शनचक्र धांवलें. चक्रानें त्या दसोडीपासून उत्पन्न झालेल्या कृत्येचा तात्काळ नाश केला. व तें भक्तद्वेषी दुर्वासामागें लागलें. दुर्वास पुढें व चक्र मागें! अशा रीतीनें एक वर्षभर दुर्वास भयभीत होऊन हिंडले. ब्रह्मदेव, शंकर व अखेर विष्णु यांना ते शरण गेले, पण त्यांनीं कानांवर हात ठेवल्यामुळें शेवटीं दुर्वासाला अंबरीषालाच शरण यावें लागलें. ही सुरस कथा या प्रकरणांत आहे.

**( अ ) अंबरीषाख्यानाच्या** साक्या फार गोड आहेत. देव ह्मणतातः—

**मज बहुमत संतचि, न हर, न विधि, न बहुमता हे कमेला।**
**किंबहुना न बहुमता माझी मज हे मूर्तिहि अमेला॥ २४॥**

आत्मरक्षणासाठीं ब्रह्मादि देवांची याचना करून भागलेले दुर्वास जेव्हां अंबरीषालाच शरण आले, तेव्हां पंतांना समुद्रांत भ्रमण करकरून थकल्यामुळें डोलकाठीचा आश्रय करणाऱ्या पक्षाची जी उपमा सुचली ती अत्युत्कृष्ट आहेः—

**शरणार्थी संवत्सरभरि तो मुनि सर्वत्र भ्रमला।**
**गेला साधुप्रति, नौदंडाप्रति खग, तैसा गमला!॥ २९॥**

**( ब ) 'भक्तभूषण' काव्य** पंतांच्या पहिल्या प्रतींतल्या सुरस काव्यांपैकीं एक आहे. पंतांनीं भक्त किंवा संत यांची महती जागोजाग उत्तम प्रकारें गायिली आहेच, पण पंतांनीं आपला संतविषयक प्रेमा या काव्यांत जसा सामग्र्यानें व्यक्त केला आहे तसा तो अन्यत्र कोठेंही व्यक्त झाला नाहीं. दुर्वासांनीं अंबरीषाचा छळ कां केला याबद्दल पंत सांगतातः—

**दुर्वासा भगवान् करि छळ बळें, हें तत्व दावी जनीं**
**कीं 'माझीहि अशी दशा हरिजनद्वेषें! धरा हें मनीं'॥**

सामान्य जनांप्रमाणें दुर्वासानें गर्वानें, द्वेषानें, किंवा खऱ्या कोपावेशानें अंबरीषाचा छल केला नसून भक्तच्छल केला ह्मणजे कशी कुदशा प्राप्त होते हें जनांस स्वानुभवानें शिकविण्यासाठीं तो केला!

१ लक्ष्मी. २ निर्दोष. या साकींत सारालंकार आहे.

दुर्वासासारख्या पुण्यपुंज तपस्ग्याची निंदा पंतांसारखा सज्जन कशी करील ? महापुरुषाच्या दोषाकडे गुणदृष्टीनें पाहून त्याचें मर्म ओळखायला एक प्रकारची भावसंशुद्धि लागते ती निःसंशय पंतांत होती. कामाकिंकर झालेला विश्वामित्र, क्रोधाभिभूत झालेला दुर्वास, किंवा मत्सराभिनिविष्ट झालेली कैकेयी यांच्या दोषांचीं कवि म्हणून पंतांनीं वर्णनें उत्कृष्ट केलीं आहेत, पण त्याचबरोबर त्यांच्या विषयींची पूज्यबुद्धि कायम ठेविली आहे, व त्यांना अग्नीची उपमा देऊन त्यांचा प्रभाव व हितबुद्धि याबद्दल प्रेमादर राखला आहे ! ! असो, प्रस्तुत प्रकरणांत प्रथम अंबरीषाचें वर्णन दिलें आहे तें फार सुंदर आहे. धर्मानें राज्य करणारा, संगरांत सिंहासारखा शत्रुकंदन करणारा, साधुसमागमानें संसार निःसारसा समजून भगवद्भजनांत रंगणारा, सविधि व बहुदक्षिण असे यज्ञ करून विप्रादि संतर्पण करणारा, असा हा आर्यरंजक राजा प्राचीन काळच्या हिंदु राजांचा एक उत्कृष्ट नमुना आहे. या आरशाकडे पाहून अर्वाचीन काळच्या आमच्या राजेरजवाड्यांनीं आपला वर्तनक्रम ठेवला तर किती मौज होईल ? अंबरीष राजा आणखी कसा होताः—

**तो भूतीं समदृष्टि, साधुभजनीं राबे, सदा सांवरी**
**आंगें दृग्विकळांदिकांसि, भर हा टाकी न दासांवरी ।**
**सेवेवांचुनि आपल्या न विषयीं याचें शरीर क्षण**
**श्रीशें जाणुनि हें सुदर्शन दिलें याचें करी रक्षण ॥ ७ ॥**

राजाच्या चित्तशुद्धीचें वर्णन करितांना पंतांनीं ‘ स्वच्छत्वें नृप जाहला सुमणिचा जैसा नवा दर्पण ’ ही सुंदर उपमा योजिली आहे. राजानें द्विजाज्ञेवरून जलपान केलेंः—

**तों दुर्वासा करूनि स्नपन जप बृहद्ध्यान तत्काळ आला,**
**त्याला भूपाळ पाणी त्यजुनि अतिथिला यास्तव क्रुद्ध झाला ! ।**
**अत्युष्ण श्वास टाकी, अहि खवळविला मांत्रिकें, तेंवि डोले**
**तोले कल्पांतरुद्रासम, मग भगवान् तो असें त्यास बोले ! ॥१९॥**

दुर्वासांच्या क्रोधाचें उत्कृष्ट चित्र पंतांनीं काढलें आहे. त्यानें रागानें कांबळीच्या दशेसारखी जटा उपटून टाकिलीः—

**जटा तोडुनि हुंकारसुमहानाद सोडिला,**
**तोडावें जेंवि लीलेनें कंबलाच्या दसोडिला ॥ २४ ॥**

**सुलभा भारभूता जी त्यजिली ते जटा किती ? ।**
**कोपी दुर्लभ कष्टेंही जोडिलें तेज टाकिती ! ॥ २५ ॥**

दुर्वास श्रीविष्णूला शरण गेले व विष्णूंनीं आपली भक्तवशता व देवभक्तांचें अन्योन्य प्रेम उघड करून दाखविलें, त्याप्रसंगाचें वर्णन ( श्लोक ५०-७६ ) इतकें उदात्त, रसभरित, व तल्लीन करून मन पिसाट करणारें आहे कीं त्यापुढें खचितच अमृत ह्मणून दुसरा कांहीं पदार्थ असेल असें बिलकुल वाटत नाहीं. प्रत्येक श्लोक, प्रत्येक पद, आनंदरूप आहे. त्यांतला कोणता श्लोक उत्कृष्ट ह्मणून निवडून दाखवूं ! अर्थ व शब्द दोन्ही सारखेच रसमय आहेत. दुर्वासानें देवाला:—

**क्षमाशीला देवा ! वद न कवणा मोह चुकवी ?**
**असें जो जाणोनि प्रभु करि कृपा तोचि सुकवी ! ॥ ५५ ॥**

असें ह्मटलें आहे. मोह मोठा कठिण आहे, अज्ञ जीव दुबळेपणानें चुकतात, घसरतात, ह्मणून त्यांच्यावर कोप न करावा, तर उदारपणानें मोठें मन करून दयेनें विरघळून जाऊन त्यांना आपलेंच ह्मणावें ! अहाहा ! हें दयेचें खरें लक्षण. हे किती उदात्त आहे ! श्रीविष्णूंनीं दुर्वासाला ' सर्वस्व मी सज्जनाचें माझें सर्वस्व सज्जन ' हें गुह्य सांगितलें. हें दिसतें उघडें, पण गुह्य उकलेल तो भाग्यवंत ! पुढील गोड घनाक्षरी पहा:—

**ते न जाणती मदन्य । मीहि न जाणें तदन्य ।**
**वर्णूं किती तैसे धन्य । तेचि एक पाहिले ॥**
**त्यांच्या गुणां नसे अंत । भक्तिज्ञानभाग्यवंत ।**
**दयाक्षमानिधी संत । माझ्या मनीं राहिले ॥**
**मी ही नव्हे त्यांचें मोल । संतसिंधु बहु खोल ।**
**त्यांहीं निंदकांचे बोल । तसे म्यां न साहिले ॥**
**साधू बाप साधू माय । साधू मंदारांचे[1] राय ।**
**साधूंचे पवित्र पाय । आह्मीं माथां वाहिले ! ॥ ६८ ॥**

श्रीविष्णूंनीं दुर्वासाला अंबरीषाकडे जायला व त्याचे पाय धरायला सांगितलें:-

**त्वां केला अभिचार[2] साधुपुरुषीं जो तो तुला बाधला**
**कोणालाहि निजेष्ट लाभ न सदुच्छेदोद्यमें[3] साधला ! ।**
**पाषाण स्वशिरीं पडेचि गगनीं मित्रासि[4] जो हाणिला**
**कीं पाय ज्वलनीं जळेचि, हृदयीं हा भाव कां नाणिला ? ॥७२॥**

१ ' मन्दारः कल्पवृक्षश्च, इत्यमरः २ परनाशार्थ केलेलें हिंसात्मक कर्म. ३ साधूच्या नाशाच्या उद्योगानें. ४ सूर्य.

प्रस्तुत संतचरित्र मूळाहून किती तरी सरस आहे ! ब्राझिल देशाच्या किनाऱ्यावर मृणिमश्रित सुवर्णकण अमित सांपडतात, पण ते गोळा करून अग्निसंगानें शुद्ध करून त्यांचा केलेला बहुमोल अलंकार, राज्ञीच्या मस्तकावर जसा शोभतो, त्याप्रमाणें पंतांनीं विमल भक्तिप्रवाहांत शुद्ध केलेलें भक्तयश महाराष्ट्रशारदेच्या मुकुटावर झळाळत आहे ! किंवा पतीनें संपादिलेल्या, कणिक, साखर, तूप वगैरे पदार्थांच्या योग्य योजनेनें त्याच्या सुगरण भार्येनें स्वादिष्ट पक्वान्न तयार करावें त्याप्रमाणें पंतांची कृति झाली आहे ! पंतांचीं अशीं मूळावर ताण करणारीं प्रकरणें पाहून व्यासांना हर्ष झाला असेल ! स्वसंपादित संपत्तीचा विस्तार करून आत्माधिक मान्यता मिळविणाऱ्या पुत्राला पाहून जसा पित्याला परमानंद होतो, तसा व्यासवाल्मीकि इत्यादि कवींना पंतकृति पाहून खास होत असला पाहिजे.

११।१२ **सुदाम चरित्रें**:--दशमस्कंधांत अ. ८०।८१ मध्यें ही कथा वर्णिली असल्यामुळें पंतांच्या कृष्णविजयांत विस्तारानें व मंत्रभागवतांत संक्षेपानें ही आली आहे हें सांगावयास नकोच. पण ही गोष्ट (कथा) पंतांना इतकी आवडली कीं त्यांनीं ती आणखी दोन वेळां स्वतंत्र प्रकरणें करून गायिली आहे. विविधश्लोकबद्ध पृथुकोपाख्यानांत सुदामा व त्याची स्त्री यांचा संवाद आहे, व वर्णनही बरेंच विस्तृत आहे. याशिवाय पंतांनीं एक साकीबद्ध पृथुकोपाख्यान रचिलें आहे. हें सर्वांच्या शेवटीं रचलेलें आहे, व सर्वांमध्यें उत्कृष्ट आहे. सुदामा व श्रीकृष्ण यांच्या बाळपणच्या लीला पंतांसारख्या मित्रप्रिय सज्जन गृहस्थाला आवडल्या, हें खुद्द पंतांच्या चरित्राचें बारीक निरीक्षण करणारांस सहज व योग्यच वाटेल. एकच कथा, भिन्न भिन्न वृत्तांत गायिली तरी मजकूर व वर्णनपद्धती एकच आहे, एकांत एका मुद्याचा विस्तार आहे तर दुसऱ्यांत दुसऱ्याचा आहे. कृष्णविजयांतल्या कथेंत गुरूनें उपदेश केला त्याचें विस्तृत वर्णन आहे, तर श्लोकबद्धकथेंत इंधनानयनार्थ गेलेल्या रात्रिप्रसंगाचें सुरस वर्णन आहे. एकच कल्पना भिन्नभिन्न वृत्तांत कशी दिसते तें पहा. एखाद्या अव्याजमनोहर सुंदरीनें सकाळीं जांभळें, दुपारीं काळें, व सायंकाळीं तांबडें वस्त्र परिधान केलेलें पाहून तिच्या पतीला जशी मौज वाटेल, तशीच सुदामकथेनें पंतगृहीं आर्या, श्लोक व साकी हे निरनिराळे छंद घेतलेले पाहून रसिकास मौज वाटते!

उदाहरण:--

मूळः—

**पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति ।**
**तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः ॥ १ ॥**

आर्याः—

**जळ दळ फळ पुष्पहि जो देतो मज भक्तिनेंचि जें त्याचें ।**
**साचें प्रेमार्पित तें सेवितसें मी विशुद्धचित्तांच ॥ २ ॥**

साकीः—

**पत्र पुष्प फळ जळ जें मजला भक्त सादरें अर्पी ।**
**तें विश्वात्म्याला मज बंधो! सुधारसाहुनि तर्पी ॥ ३ ॥**

श्लोकः—

**पत्र पुष्प फळ तोयहि जो कीं**
**भक्तिनेंचि मज दे जन लोकीं ।**
**ते स्वभक्त्युपहृताखिल सेवीं**
**मी सुतृप्तहि सुधारस जेवीं ॥ ४ ॥**

यापैकीं आर्या अक्षरशः भाषांतर आहे, साकींतला ' विश्वात्म्याला' हा शब्द व श्लोकांतला ' सुतृप्तहि ' हा शब्द हे दोन्ही रसवर्धक आहेत. सुदामदेवाची ब्रह्मज्ञता, श्री कृष्णाची भक्तवत्सलता, व पंतहृदयांत वाहणारा शुद्धसत्वगुणाचा प्रवाह यामुळें हीं तीनही प्रकरणें व मुख्यतः अत्यंत सरस असें साकीबद्ध प्रकरण—हीं भक्तिरहस्य जाणणाऱ्या सज्जनाला परमाल्हाद दिल्यावांचून राहणार नाहींत. सांदीपनि गुरूनें कृष्णादि शिष्यांस बाळपणीं बोध केला तोः—

**कर्मीं वसा, नसो परमर्मीं लोचन, असा दयाधर्मीं ॥**
**नर्मींहि मृषोक्ति[१] न यो, शर्मीं नांदा, शिरा क्षमावर्मीं[२] ॥ ६९ ॥**

श्रीकृष्णाचा प्रेमादर आठवून सुदामदेव ह्मणतोः—

**परिचय बाळपणांचा, त्यांत असा नीच मी दरिद्र ! मला ।**
**आत्मप्रजापरिसहीं मानुनि गुरु आप्त तो हरि द्रवला ॥ १ ॥**

श्लोकबद्ध सुदामचरित्रांत गुरुगृहीं कृष्ण विद्याभ्यासार्थ होते तेव्हांचा एक प्रसंग उत्कृष्ट वर्णिला आहे. त्यांत अंधाऱ्या गडद रात्रीचें वर्णन तर बहारीचें आहेच. ' कालावांचून आला जलधर, सुटला वात, अंधार झाला; '

---

१ मिथ्या भाषण. २ क्षमाकवचांत.

नंतर विजांचा कडकडाट झाला, गारांची वृष्टी होऊन मुसळधार पाऊस पडला, तेव्हां ' वर्षे कांकडलों, जळांत पडलों, झाला क्षणें दिग्भ्रम ! ' नंतर

**तो निम्नोन्नतभूविभाग न कळे सर्वत्र झालें वनें**
**आह्मां काळमुखासमान गमलें सर्वांस ही तें वन ! ।**
**आंधारीं धरुनी परस्परकरीं स्वाध्वभ्रमा पावुनी**
**प्रत्यूषावधि हिंडलों, मग परामर्शासि आला मुनी ॥**

द्वारकेहून परततांना सुदामदेवाला कोणकोणते कृष्णगुण वर्णनीय वाटले ते त्यांनीं स्वस्त्रीस सांगितले:--

**एवं श्रीहरिची स्वदाशवशता, ब्रह्मण्यता, मित्रता,**
**भक्तीं वत्सलता, वदान्यवरता, भावज्ञता, आप्तता, ।**
**विज्ञता, प्रभुता, मनोज्ञगुणता, सानंदता, सेव्यता,**
**चित्तीं आणुनि मीं सुखें प्रियतमे ! झालों पथीं चालता ॥**

श्रीकृष्णचरित्रांतल्या या गुणांचें चिंतन व ध्यान करीत मनुष्य जर या संसाराटवींतून मार्गक्रमण करीत आयुष्याचा वेंच करील, तर त्याचें देहबुद्धीचें कुचैल नाहींसें होऊन तो दैवीसंपत्तीचें भाग्य भोगील, त्याच्या बुद्धिराज्ञीचें दारिद्र्य नष्ट होऊन ती सत्वगुणालंकारांनीं मंडित होऊन आत्मपतीस हर्षानें सामोरी जाईल व त्याला 'हृदयांतील स्वानुभूतिरूप सोन्याची नगरी' प्राप्त झाल्याविना राहणार नाहीं ! श्रीकृष्णनगरीला जायला सुदामदेवाच्या साध्वी पत्नीनें त्याला प्रवृत्त करण्यापूर्वी त्याचें मुमुक्षुत्व कसें होतें? पंत ह्मणतात:--

**हरिचा सखा सुदामा ब्राह्मण, निस्पृह, आत्मज्ञानी, ।**
**होता गृही, यदृच्छालाभें परमसुखातें मानी, ॥ १ ॥**

स्त्रीनें द्वारकेस जायला सांगितलें तेव्हां:--

**स्त्रीस ह्मणे आनंदें तो द्विज, ' जातों सखा पहाया. ।**
**तच्चरणावरि निजतनुमन ही पुष्पांजळी वहाया, ॥ १० ॥**

श्रीकृष्ण रुक्मिणीच्या पलंगावर सुखानें पहुडले होते तों सुदामा तेथें प्राप्त झाला. या मित्रभेटीचें अत्यंत प्रेमळ वर्णनः--

**झडकरि उठला दयाळु माधव, वस्त्रादिक नावरितां ।**
**धांवत आला पुढें, रमेला सांडुनि, दासांकरितां ॥ २३ ॥**

---

१ उंचसखल. २ पाणी. ३ मार्ग चुकून ४ पाहटेपर्यंत.

**मित्रांगस्पर्शानें झाला सुखी दयेचा सिंधु ।**
**लोचनपद्मांपासुनि गळती प्रेमाश्रूचे बिंदू ॥ २५ ॥**
**जळ घाली रुक्मिणी पदांवरि मणिकनकाच्या पात्रें ।**
**प्रक्षाळण केलें श्रीनाथें सुखरोमांचितगात्रें ॥ २७ ॥**
**शंभुशिरीं ज्याचें चरणोदक, वेद जयाचे बंदी, ।**
**तो तीर्थरूप तीर्थांचाही, मुनिपादोदक वंदी ॥ २८ ॥**
**कृष्ण सख्यातें करीं धरुनियां सांगे गोष्टी गोड ।**
**त्यांशीं सर्वरसाधिक परि तें अमृत न पावे जोड ॥ ३२ ॥**

श्रीकृष्णानें उपायन मागितलें तेव्हां सुदामा:—

**संकोचला, अधोमुख बसला, विप्र न बोले कांहीं ।**
**बुडतचि होता मुनि तो केवळ लज्जानदीप्रवाहीं ! ॥५२॥**

कृष्णानें पोह्यांची मोटली सोडून एक मुष्टि खाल्ली व दुसरी खाणार तों रुक्मिणीनें पुढें होऊन कृष्णाचा हात धरला व विनोदानें ह्मणाली:—

**द्यावा प्रसाद हा सर्वांला भक्षूं वांटेकोडें, ।**
**सेवन करितां तुह्मांला तों हें ब्रह्मांडहि थोडें ! ॥ ५७ ॥**
**पोहे नेले हिरोनि भगवत्पर पद्मजासतीनें ।**
**प्रार्थुनि, रिझवुनि, हंसवुनि, रमवुनि, निजपतिला सुमतीनें ५९**

भोजनोत्तर सुखनिद्रा झाली व सुदामदेव परतले तेव्हां श्रीकृष्णानें आपल्याला द्रव्य कांहीं दिलें नाहीं हा विचार मनांत येऊन तो विरक्त ब्राह्मण ह्मणतो:—

**दरिद्र मी वित्ताच्या लाभें होइन मत्त उद्दंड ।**
**आतांचे परि मग न घडेल प्रभुचें स्मरण अखंड ॥ ६८ ॥**
**यास्तव करुणानिधिनें दुर्लभ दर्शन देउनि मातें ।**
**धन न दिलें हें बरवें केलें दीनजनांच्या तातें ॥ ६९ ॥**

सुवर्णनगरीची प्राप्ती होऊन आनंदीआनंद झाल्यावर सुदामदेव श्रीकृष्णापाशीं मागतात:—

**सौहृद, मैत्री, सख्य, दास्य त्या देवाचेंचि असावें ।**
**जन्मोजन्मीं तद्भजनाचें प्रेम मनांत वसावें ॥ ८३ ॥**

१३ **भृगुचरित्र**:—दशमस्कंधाच्या८९व्या अध्यायांत हें चरित्र वर्णिलें आहे. हें काव्य विशेष सरस दिसत नाहीं. शब्दरचना सहज नसून काव्यांत प्रसाद नाहीं. मूळ कथा सरस आहे, पण पंतांचा यावेळीं नाहीं लागला

सूर ! ऋषींच्या सांगण्यावरून ब्रह्मा, विष्णु, महेश यांत श्रेष्ठ कोण याची परीक्षा करण्यासाठीं भृगु निघाले, व विष्णूनें भृगुपदाहती शांतीनें सहन केल्यामुळें त्याची थोरवी गात भृगु गेले एवढी गोष्ट यांत आहे. 'सरस्वत्यास्तटे राजन् ऋषयः सत्रमासत' या श्लोकार्धाचें पंतांनीं भाषांतर कसें केलें आहे तें पहाः—

**जी सुखप्रद सरस्वती धुनी । सेविली सतत सर्व साधुंनीं ।**
**तत्तटीं करिति सत्र सन्मुनी । जे स्वकर्मरत नित्य जन्मुनी ॥ १ ॥**

**१४ मंत्रमय भागवतः**—यांत १०९ आर्यांत पंतांनीं दहावा स्कंद सारा आणला असून प्रत्येक आर्येंत 'नमो भगवते वासुदेवाय' हा मंत्र साधला आहे! मंत्ररामायणाशिवाय पंतांनीं जसें मंत्रमय रामायण रचिलें तसें मंत्र भागवताशिवाय त्यांनीं हें मंत्रमय भागवत रचिलें आहे. कृष्णविजयाला 'बृहद्दशम' जर ह्मणायचें आहे तर याला 'लघुदशम' ह्मणायला कांहीं हरकत नाहीं. यांत दशमांतल्या कथा अनुक्रमवार संक्षेपानें सांगितल्या आहेत. आर्या अंमळ कठिण आहेत. प्रत्येक आर्येंत ११ अक्षरांचा मंत्र साधून सारें कथानुसंधान ठेवणें ह्मणजे कठिण काम आहे. अशाही काव्यांत कांहीं आर्या पुष्कळच सोप्या आहेत. मासल्याकरितां २ आर्या पुढें देतोंः—

**मन मोहीं गोपींचें भरलें, गडबडति, तेधवां रडती ।**
**वाटे असुप्रयाणचि, देश दवानलचि, कायभर पडती ॥ ३४ ॥**
**नमुनि प्रमोदवि पृथुक भक्षुनि गहिंवरुनि तेधवां परते ।**
**वाड्वसखा सुदामा, त्या दे वासार्थ हेममय पुर तें ॥ ७४ ॥**

**१५-१७ गोपीः**—मंत्रभागवतांत गोपींच्या श्रीकृष्णप्रेमाबद्दल फारच बहारीचें वर्णन केलें आहे तथापि तेवढ्यानें संतोष न वाटतां पंतांनीं गोपीप्रेमोद्गार, नवदानकेली, व गोपीगोडवा अशीं तीन स्वतंत्र प्रकरणें केलीं आहेत.

( १५ ) **पहिल्यांत** गोपी कुब्जा व कृष्ण यांवर रागावल्याचें वर्णन आहे. गोपी प्रणयकोपानें ह्मणतातः—

**कुब्जेच्या भाग्याचा भारी भर, आजि आमुचा सरला ।**
**सरला असोनि आह्मीं वक्रा, वक्रा असोनि ते सरला ! ॥ ७ ॥**

( १६ ) **नवदानकेलींत** राधाकृष्णांचा मजेचा संवाद दिला आहे. या आर्यांची शब्दरचना चांगली झालेली नाहीं. कृष्ण राधेला ह्मणाले 'मन-

कामना सफळ व्हाया मला दान दे,' ' यावर राधा ह्मणे, ' तुज शठा! गोपाळा दानपात्रता नाहीं!' पुढें कृष्णांनीं कायदान ( देहार्पण ) तिजपाशीं मागितलें तेव्हां:—

**राधा ह्मणे, ' यश नसे जें दुर्लभ वस्तु तदभिलाखांत, ।**
**एकहि नसेल धर्मन्यायरहित पूर्णकाम लाखांत ' ॥ १२ ॥**

या संवादांत वरवर पाहणाऱ्यास शृंगार दिसेल, पण वस्तुतः हा परमार्थपर आहे. राधा म्हणाली, 'तुह्मीं अनय करूं नका, मीं अशानें तुमची मुरली हिसकून घेईन.' यावर:—

**श्रीकृष्ण ह्मणे ' मुरली टाकूनि दिली हिरोनि कुंजांत ।**
**दे हुडकूनि ' शिरे नच एकाकी मूर्ति तिमिरपुंजांत ! ॥ २५ ॥**

राधा ह्मणाली' तुह्मांला दाव्यानें बांधून टाकणारी आई घरीं आहे कां? यावर.

**श्रीकृष्ण ह्मणे, ' मजला बांधावें चित्त याचि जरि कामीं ।**
**तरि बांध या भुजांहीं पाहे राहे रुसोनि न रिकामीं ! ' ॥ ३१ ॥**

मुरली हुडकण्यासाठीं 'श्रीराधा होय पुढें, ब्रह्म घनश्याम काय मागेल.

**१७ गोपी गोडवा** हा वरच्या दोन्ही प्रकरणांहून गोड आहे. श्रीकृष्णाला कुब्जेनें स्ववश केलें व ह्मणून तो गोपींना दुर्लभ झाला; तेव्हां सवतीमत्सरामुळें व वियोगदुःखामुळें त्यांना राग आला व त्या रागाच्या भरांत त्यांनीं हे 'गोडवे' गायिले. प्रेमाशिवाय रुसवा नाहीं व ह्मणून हे गोडवे मोठे प्रेमळ आहेत. यांत गोपींनीं प्रेमातिशयानें कृष्णाला सभ्य, ( औपरोधिक ) द्राविड, ब्राह्मण, घुबड, सर्प वगैरे शेलकीं विशेषणें लाविलीं आहेत ! गोपींचा मत्सर, राग, निराशा व प्रेम या चार मनोवृत्तींच्या झगड्याचें उत्कृष्ट चित्र या काव्यांत पंतांनीं काढलें आहे. यांत व्यवहारचातुर्यही फार प्रगट केलें आहे. गोपी ह्मणतात, ' उद्धव मुद्दां मेला कृष्णासारखाच बोलतो, कोण मेला लबरा आहे पहा! आश्रितजन आपल्या आश्रयदात्या सारखेच बोलत असतात '!! हा भावार्थ पंतांनीं ' उद्धव कीं अनुसरला ! सखि ! आश्रित आश्रया न विटवीतो ' या आर्यार्धांत प्रकट केला आहे. गोपी ह्मणतात, ' आह्मी एकतों तें खरेंच कां ? कृष्ण कुब्जेशीं रतला हें खरें ? पण मोठ्यांना कोण नांवें ठेवणार ? त्यांना सगळें शोभतें हो!'

१ तिचा अभिलाष करण्यांत.

**बाई ! सत्य वदसि हें ? प्रभु जन असतां कलंक ही शोभे ! ।**
**चंद्राचि पहा, जरिहि हा सक्षय सकलंक, दृष्टि ही लोभे ! ॥ ७ ॥**

पंतांनीं या सुंदर आर्येत ४ मनोवृत्तींचा नकाशा काढला आहे ! ' बाई ! ' यांत आश्चर्य; ' सत्य वदसि हें ? ' यांत प्रेममूलक संशय; ' प्रभु जन असतां कलंक ही शोभे ' यांत संशयनिवृत्तीनंतरचा कोप; व उत्तरार्धांत ' मोठ्या नांवाखालीं कसलेही दोष लपून जातात ही जगराहाटीच आहे ' हें कळल्यानंतर उत्पन्न होणारी त्वेषजन्य निराशा ! ! एखादी नीटनेटक्या वेषांत सजलेली गोरटी आपल्या पतीच्या आचरणाबद्दल संशय उत्पन्न करणाऱ्या स्त्रीस, तो संशय खरा ठरेल अशा भयानें घेरली जाऊन किंचित् घोगऱ्या पण हलक्या स्वरानें वांकून विचारीत आहे ' बाई ! सत्य वदसि हें ? ' तिच्या स्तब्धतेमुळे निवृत्तसंशय होऊन आपण स्त्रिया प्रतिकाराला असमर्थ[1] अतएव दुबळ्या आहोंत असा भाव मनांत येऊन निराशेनें ' प्रभु जन असतां कलंकही शोभे ! ' असें ह्मणून टप टप टिपें गाळीत आहेत, साऱ्या जगांत जिकडे पहावें तिकडे हा प्रकार दिसतो ह्मणून निराशेची काळीकुट्ट कांबळी पुढें आल्यामुळे ती हताश झाली आहे, तथापि क्षणार्धांत वीज चमकावी त्याप्रमाणें अत्यंत प्रियपतीची मनोहर मूर्ति पुढें येतांच निराशेचे ढग पार वितळून जाऊन तेथें ' दृष्टि ही लोभे ' अशी स्थिति झाली आहे. अशा प्रकारचें अत्यंत मनोहर चित्र पंतांनीं वरील आर्येत काढलें आहे. कवीश्वर हे किती उत्तम चित्रकार असतात ! चितान्याहून अधिक मनोवृत्तींच्या छाया कवीला एकदम दाखवितां येतात ! असो. कृष्ण कुब्जारत झाले ही बातमी ऐकून गोपी ह्मणते, ' मेला विधि ऐकवितो, सखि ! जें स्वप्नींहि नायकावेंच. ' आपला भोळेपणा प्रकट करून गोपी ह्मणते, ' टाणटोणे शिकतो, तरि सखि देतोचि तीस उडवून ! ' कृष्ण व कुब्जा यांचा संगम अत्यंत द्वेषार्ह वाटून तुच्छताबुद्धीनें गोपी ह्मणते:—

**दासी असो नसो परि जन कुब्जा ह्मणति, काय ती कुबडी ! ! ।**
**विदरीहि कामुका स्त्री, घुबडाला काय नावडे घुबडी ! ! ! ॥ २२ ॥**

कुब्जेबद्दलचा मत्सर शेवटीं विसरून कृष्णसंगतीनें तीही पावन झाली अशा भावनेनें गोपी ह्मणते ' तीर्थचि तीर्थीं मिळतां जो गांवांतील दुष्ट ख-

[1] समर्थ

ळमळ तो.' कुब्जेनें महदाश्रय केला याबद्दल तिची तारीफ करून गोपी ह्मणते, 'महदाश्रय कीर्तिप्रद नसता तरि झटुनि कां गुणीं वरिते?' कुब्जेचें भाग्य पाहून गोपीची मोठी लटपट उडाली आहे. क्षणात् ती 'वाटे श्रीसही दुर्लभ पावे ती रूपभाग्य जें विदरी' असें ह्मणते, व क्षणांत 'सखि ती सुखी असो गे! श्रीकृष्णासी करूनि केलीला' असेंही ह्मणते! बायकांना अन्यस्त्रीविषयक मत्सर फार असतो. ज्या गोपी 'सोडुनि पति, सुत, गुरु, गृह, अशन, वसन, धर्म, नीति, भी, लज्जा' अनन्यभावानें खरें आत्मसमर्पण करून श्रीकृष्णपरमात्म्याला शरण गेल्या, त्यांनीं श्रीकृष्ण मथुरेस गेल्यावर ते कुब्जेवर प्रेम करूं लागले व आपणांस विसरले असें वाटून 'रमवुनि, रिझवुनि, खिजवुनि, विरह तुझा फार बायका गांजी,' ह्मणून शोक करावा हें साहजिकच आहे. गोपीला तिच्या मैत्रिणीनें अखेर 'सर्प जसा सदनांतुनि, चित्तांतुनि वैरभाव हा जावा' असा बोध केला. प्रस्तुत काव्य फार रसाळ, विचित्रपणानें मनोहर व विविध मनोवृत्तींच्या मिश्रणानं रमणीय असें झालें आहे व त्याच्या नांवाप्रमाणें तें गोड झालें आहे. गोपींचा उद्दाम श्रृंगार प्रेमरसाला पोषक असल्यामुळें घुबड, विदरी, लुबरा असे शेळके शब्दही रसहानि बिलकूल करीत नाहींत, इतकेंच काय पण गोपींचा कृष्णाविषयींचा दृढ, निकटचा व आतुर प्रेमा त्यामुळें अधिकच प्रकट झाला आहे! या काव्यांत विप्रलंभश्रृंगाराच्या मिषानें उद्दाम भक्तिभाव प्रकट झाला आहे.

१८ व १९ **मुरली**:—जिच्या मधुरनादानें गोपगोपींनीं वेडावून जावें, जिचा मंजुलरव कानीं पडतांच गोपींनीं शेजेचा पती दूर मारून घराबाहेर पडावें व जिची नादसुधा 'या ब्रह्मांडघटीं भरोनियां उरली' त्या कृष्णप्रिय मुरलीला पंत कसे विसरतील? त्यांनीं '**मुरलीपंचक**,' व '**मुरलीनवरत्नमालिका**' हीं दोन स्वतंत्र प्रकरणें मुरलीची माधुरी वर्णायास्तव लिहिलीं आहेत.

**विरहीं व्रजबालांहीं जीवरि मृदुलांगुलीतती चुरली।**
**वंशप्रभवा सरला चुंबिसि तं हे मनोरमा मुरली॥ १॥**
**श्रीकृष्णा! गोपींतें बहु भुलविसि वाजवूनि मुरलीतें।**
**मुनिचित्तवृत्तितेंही वश करिशि समाधिमाजि मुरलीतें॥२॥**

---

गोपी. २ कोमल अंगुलींचा (बोटांचा) समूह.

# प्रकरण अठरावें.



## मंत्रभागवत.

**श्रीमद्भागवत मला निजपूर्वजपुण्यचरितसें वाटे।**
**तत्कथितात्मनिधानालाभें कंठ क्षणक्षणीं दाटे ॥ ६५ ॥**

रामरीति.

१ 'नमो भगवते वासुदेवाय' या मंत्रांत गुंफलेल्या भागवताच्या तीन माळा. २ वर्णनसंक्षेपाचीं चार कारणें:—( १. ) विस्तृत मराठी काव्यें वाचणारे लोक नाहींत. ( २ ) स्वतः कवि विस्तरभीरु आहे. ( ३ ) 'वाचा शुद्ध कराया थोडेंही अर्पिलें पुरे यश तें.' ( ४ ) 'मंत्रवर्ण अडविति.' पंतांचें संक्षेपचातुर्य. ३ भगवद्यशवर्णन हेंच परम श्रेयस्कर होय. ४ पहिले नऊ स्कंध. ५ दहावा स्कंध:—यशोदेचें व गोपांचें भाग्य ( कृष्णाच्या बाळलीळा ). ६ रासक्रीडेच्या आर्या. ७ रासक्रीडेचें रहस्य. ८ सुदर्शन व शंखचूड. ९ गोपी व मुरली. १० अक्रूर व गोपी. ११ अक्रूर व श्रीकृष्ण. १२ कुंतीचें वैधव्य. १३ अक्रूराचा धृतराष्ट्रास बोध. १४ उत्तरार्धाचा संक्षेप. १५ भागवताची गोडी. १६ एकादशस्कंधांतला संक्षेप. १७ पद्याला पद्य असें सुंदर भाषांतर:—मूळ व भाषांतर. १८ भाषांतराची योग्यता. १९ वेदांतभक्तिपर आर्या. २० कलिवर्णन. २१ कृष्णकीर्तनाचें तारकत्व. २२ पंतांचे स्वतःबद्दलचे धन्योद्गार!

१ मूळ भागवतांतील वेंचक प्रकरणें घेऊन पंतांनीं त्यावर स्वतंत्र काव्यें केलीं तो प्रकार मागील प्रकरणांत वर्णिला आहेच. यानंतर पंतांनीं संपूर्ण भागवतावर आर्या करावयाचा विचार केला, त्याप्रमाणें त्यांनीं सारें भागवत सुमारें ३६०० आर्यांत आणलें व तें ३३३ नाममंत्रांत ओवून त्याला 'मंत्रभागवत' असें नांव ठेविलें! उपोद्घाताच्या ११ आर्यांत 'नमो भगवते वासुदेवाय' हा मंत्र सहा वेळ साधला आहे; दशमस्कंधाच्या उपोद्घातांत 'श्रीमानुरुगायो मुकुंदो जयति' हा मंत्र व बाकी सर्वत्र 'नमो भगवते वासुदेवाय' हा मंत्र साधला आहे. याप्रमाणें सर्व भागवत वासुदेवपर करून या मंत्रमण्यांच्या

पंतांनीं तीन माळा कल्पिल्या आहेत. पहिली माळ पहिल्या नऊ स्कंधांचीं, दुसरी माळ दशमस्कंधाची, व तिसरी माळ शेवटच्या दोन स्कंधांची. पहिल्या माळेंत भगवंताच्या अनेक अवतारांच्या, भक्तांच्या, देवदानवयुद्धांच्या, सृष्टयुत्पत्तीच्या, वर्णाश्रमधर्माच्या नानाविध कथा आहेत; दुसऱ्या माळेंत श्रीकृष्णाच्या अवतारकथा आहेत; व तिसऱ्या माळेंत श्रीकृष्णांनीं उद्धवाला केलला वेदांतादि बोध आहे. पंतांनीं पहिल्या नऊ स्कंधांचा फारच संक्षेप केला आहे, पण दशमाचा विस्तार केला आहे. भागवताचा गाभा ह्मणजे दशमस्कंध होय, व पंतांच्या वाणीच्या माधुरीचा उत्कर्षही तेथेंच झाला आहे. एकादश केवळ वेदांतभक्तिपर आहे; तोही उत्कृष्ट आहे.

२ पहिल्या माळेंत पंतांचें संक्षेपचातुर्य पाहण्यासारखें आहे. मुख्य कथाभागाचा दोरा न सुटूं देतां, आवश्यक व केवळ वर्णनस्तवनपर श्लोक व अध्याय गाळून, अतिविस्तृत कथाभाग त्यांनीं संक्षेपांत आणले आहेत. उदाहरणार्थ. पहिल्या स्कंधांतले पहिले चार अध्याय सूतशौनकप्रश्नोत्तररूप आहेत, ते पंतांनीं एका ह्मणजे पहिल्याच आर्येंत आणले आहेत. ती आर्या ही:—

**नलिनाक्ष क्षेत्र श्रीनैमिष, तेथें सदुक्तिपूतातें ।**
**शौनक पुसे परम हित, सादर बहु गौरवूनि, सूतातें ॥ १ ॥**

तिसऱ्या स्कंधांत कपिल महामुनींनीं आपल्या आईला बोध केला तो दिला आहे. तो मूळांत २५–३२ अध्यायपर्यंत वर्णिला आहे, पण पंतांनीं त्यावर अवघ्या तीन आर्या केल्या आहेत !

पांचव्या स्कंधांतल्या २६ अध्यायांवर पंतांनीं अवघ्या ६६ आर्या केल्या आहेत. तो स्कंध मूळांत बहुधा गद्यरूप असून त्यांतील ऋषभ व जडभरत यांच्या तेवढ्या कथा पंतांनीं वर्णिल्या आहेत व बाकीचा भाग पार उडविला आहे. या स्कंदाच्या शेवटच्या बारा अध्यायांत जें भूगोलवर्णन आहे—सप्तद्वीपें, लोकालोकपर्वत, अंतरिक्षांतील नवगृह, पाताललोक, नरक लोक—यांचीं विस्तृत वर्णनें—हीं सर्व पंतांनीं गाळलीं आहेत. वर्णनसंक्षेपाचीं पंतांनीं चार कारणें सामान्यतः जागोजाग सांगितलीं आहेत: ( १ ) मराठी काव्यें अतिविस्तृत केलीं तर वाचक कंटाळतात. ( २ ) कवि स्वतः विस्तरभीरु आहे. ( ३ ) ‘ वाचा शुद्ध कराया थोडेंही वर्णिलें पुरे यश तें ’ (स्कंद९) सोन्याचा गुण जो एका तोळयांत आहे, तोच एका वालांत आहे, किंवा अ-

मृताच्या सरोवरांतील जळांतले सारे गुण एका बिंदूत येतात, या न्यायानें ' अल्पहि बहुफळ होतें कृष्णार्पित, चुकवितें हि कष्ट महा ' (स्कंध ८.) ४ मंत्र साधायला कोठें कोठें अडचण पडते. प्रस्तुत ठिकाणीं पंतांनीं कशी खुबी केली आहे ती पहा. शुकांनीं एवढा भूगोलाचा विस्तार कां केला? पंत ह्मणतातः--

**भव्य सविस्तर कथिला भूगोल शुकें अशेष जाणाया।**
**याच्या ध्यानें हृदयीं सूक्ष्म प्रभुचें स्वरूप बाणाया! ॥ ५८ ॥**

असें जर आहे तर पंतांनीं त्याचा विस्तार कां केला नाहीं? पंत ह्मणतात एक तर, बहुमान्य होईल असें वर्णन शुकासारखें मला करतां येत नाहीं. दुसरें, शुकांनीं जे पदार्थ वर्णिले आहेत, ' ते जरि पदार्थ इतरें वर्णावे, ग्रंथ बहु न कां वाढे ? ' कोणी ह्मणेल, ' ग्रंथ वाढेना कां तुह्मीं कां भितां ? ' यावर पंतांचें उत्तर 'रसिकहि निरलस सादर साधु सदा स्वस्थ थोडके गाढे!' (६१). —रसिक असून निरलस, शांत, संततें श्रवण—वाचन ठेवणारे वाचक कोठें आहेत? ते जर मिळतील तर वर्णन करायला माझें काय जातें? तिसरें पंतांनीं ह्मटलें आहे, त्यां ' वानावी पाताळें सम ' हें योग्य आहे, ' परि मंत्रवर्ण अडविति, आदरिले गुरु कसे न मानावे? ' मंत्रवर्णांचा एकदां स्वीकार केला, आतां त्याचा त्याग करितां येत नाहीं. गुरूचा अनादर क्षेमकर नाहीं. या स्कंधाच्या शेवटीं मूळांत नरकाचें वर्णन आहे, पण पंतांनीं तें वगळलें आहे. पंत कारण मजेनें सांगतातः—

**देवाच्या कीं गाती सद्भक्ताच्या यशास नर! कां तें।**
**हर्षद सोडुनि वर्णूं तापद जे त्या कशास नरकातें!! ॥ ६४ ॥**

मूळ भागवताच्या सातव्या स्कंधाच्या शेवटीं वर्णाश्रमधर्मांचें वर्णन पांच अध्यायांत, केलें आहे पण पंतांनीं तें समग्र गाळलें आहे. याप्रमाणें आपलें मुख्य धोरण डोळ्यांपुढें ठेवून पंतांनीं मंत्रभागवताची रचना केली आहे. अंबरांत वावडी उडविणाऱ्याचें लक्ष जसें हातीं असणाऱ्या दोरीकडे असतें, त्याप्रमाणें नानाविध कथा, वर्णनें, स्तवनें, आख्यानें वर्णायला पुढें असतांना पंतांनीं मुख्य अनुसंधान कोठेंही चुकूं दिलें नाहीं. मोठमोठीं विस्तृत आख्यानें किंवा अध्यायचे अध्याय दहा पांच किंवा चार दोन आर्यांत आणणें ही कला कांहीं सामान्य नाहीं! पंतांनीं स्वतंत्र काव्य कोठें केलें आहे? असें ह्मणणारांनीं पंतांनीं जें कार्य, जसें व जितक्या चातुर्यानें केलें आहे तें प्रथम नीट शिकून

घ्यावें, व मग टीका करायला धांवावें! कांहीं एक न करितां मोठ्या माणसावर टीका करणें सोपें आहे, पण तत्सम कार्य प्रत्यक्ष करायला लागावें ह्मणजे मोठ्याच्या मोठेपणाचें बीज कोठें आहे हें समजून येतें. तुकोबा ह्मणतात, 'संत होवोनीयां संतांसी पाहावें,' तसेंच कवि होऊन कवीला पहावें! पंतांचें मंत्रभागवत व स्वतंत्र प्रकरणें मूळाशीं ताडून पाहतांना कोणत्या धोरणावर व कोणत्या पद्धतीनें पंतांनीं हीं कामें केलीं हें जेव्हां मी बारकाईनें पाहूं लागलों तेव्हां त्यांच्या बुद्धिमत्तेची व मनःस्थितीची मला अधिक कल्पना आली व त्याजविषयींचा प्रेमादर अधिकच वाढला! संक्षेपाकडे लक्ष देतांना पंतांनीं मूळकथाभागांची गोडी जाऊं दिली नाहीं, इतकेंच काय पण ती उलट वाढविली. पहिल्या नऊ स्कंधांत ठळक ठळक कथा ज्या आहेत त्यांपैकीं कोणतीही पंतांनीं गाळली नाहीं. दुसऱ्या स्कंधांतले देवावतारांचें वर्णन चवथ्यांतल्या दक्ष, ध्रुव, वेन, पृथु, व पुरंजन यांच्या कथा; पांचव्यांतली जडभरताची कथा; सहाव्यांतलें अजामीळाख्यान; सातव्यांतलें प्रऱ्हादचरित; आठव्यांतला गजेंद्रमोक्ष, समुद्रमंथन व वामनचरित; नवव्यांतल्या अंबरीष, सगर, राम, दुष्यंत वगैरे राजांच्या कथा--हे सारे भाग मूळांत उत्कृष्टच आहेत, पण पंतांनींही त्यांचें उत्कृष्टपण आपल्या मंत्रभागवतांत कायम राखलें आहे. भीष्मनिर्याण, वामनचरित वगैरे प्रकरणें विस्तारानें स्वतंत्रपणेंच रचलीं असल्यामुळें मंत्ररामायणांत केवळ त्यांचा अतिसंक्षेप केला आहे. आतां प्रथम या पहिल्या माळेंतील कांहीं पाणीदार आर्यारत्नांकडे आपण पाहूं.

२ प्रथम व्यासांनीं भागवत केव्हां रचिलें तें पहा. जगाला धर्मरहस्य शिकविण्यासाठीं व्यासांनीं महाभारतादि ग्रंथ प्रथम रचिले, तथापि त्यांच्या मनाची तळमळ गेली नाहीं. तेव्हां त्यांनीं नारदाला विचारिलें, 'सांग मनीं अप्रसन्न कां वा मी!'

**ते प्रार्थना तयाची परिसुनि तो मुनि ह्मणे, "तुवां कांहीं।**
**प्राधान्यें श्री भगवन्महिमा अद्यापि वर्णिला नाहीं! ॥ ६ ॥**
**वाखाणावें प्रेमें भगवद्यश, मुनिवरा! तुवां आतां।**
**हृदय प्रसन्न होतें प्रभुचा महिमाचि आदरें गातां" ॥ ७ ॥**

या नारदवचनाप्रमाणें व्यासांनीं भागवत रचून तें शुकास पढविलें, व शुकांनीं तें परीक्षित राजास सांगितलें. भगवद्यश ज्यांत नाहीं तो ग्रंथ काव्यगुणमंडित असला तथापि सुजनसेव्य नाहीं, व एखादा ग्रंथ अबद्ध

(काव्यशास्त्रनियमरहित) असला तथापि हरियशोंकित असेल तर तो सुतरां सेव्य आहे. हें रहस्य मूळ भागवतांत सांगितलें आहेच. पंत ह्मणतात:—

**सुयश न जयांत हरिचें, चित्रहि गुणभवन कवन तें अशुची।**
**त्यांत सुमति नर न रमति पळही, बहु मानिती तया पशुची! ॥८॥**
**देवाचीं ज्यामध्यें नामें सुयशोंकितें प्रतिश्लोकीं।**
**अघ नुरवीच अबद्धहि असतां तो वाग्विसर्ग या लोकीं ॥ ९ ॥**

वरील तत्व प्राकृतकवीश्वराचार्य श्रीज्ञानेश्वर यांनीं प्रथम मान्य करून भक्तिरसाला पट्टाभिषेक करून तक्तावर बसवून नवरसांला त्याचे मंत्रि बनविले होते. पूर्वी कालिदासादिकांच्या अमलांत शृंगाररसाला प्रमुख स्थान मिळालें होतें, पण ज्ञानोबारायांनीं ज्यामांच्या संमतीनें ही क्रांति घडवून आणली व गेल्या सहाशें वर्षांत महाराष्ट्रांत जे प्रमुख संत कवि झाले त्यांनीं ती मान्य केली. पंतांनाही ही गोष्ट सर्वस्वी मान्य झाली ह्मणून त्यांनींही हरियशोगानीं आपलें बुद्धि सर्वस्व वेचिलें. दशमस्कंधांत पंतांनीं ह्मटलें आहे:—

**वर्ण्यचरित्र प्रभुनें यदुचें सत्कुळ असें यशासहित।**
**वाढविलें तें गावें, ध्यावें, कविनें दुजें कशास हित? ॥ ११८२ ॥**

एकादशाच्या अंतीं याच अर्थाच्या २१४ आर्या आहेत.

४ असो. दुसऱ्या स्कंधांत शुकाचार्य परीक्षितीस सांगतात:—

**नरवर्या! यज्ञतपोयोग असे मार्ग मुक्तिचे फार।**
**परि बा! कृष्णीं होतो ज्यामार्गें भक्तियोग तो सार! ॥ १२ ॥**
**गळतो गर्व हरियशःश्रवणें, अघराशि सर्व ही जळतो,।**
**पळतो श्रम, किंबहुना भगवान् येणेंचि सर्वथा वळतो ॥ १५ ॥**

चवथ्या स्कंधांत पार्वती शंकराज्ञा मोडून दक्षयज्ञास गेली व अपमान पावली, त्या प्रसंगींच्या आर्या सुंदर आहेत.

**भगवत्कथित समस्तहि जातांचि प्रत्यया तिच्या आलें।**
**कीं होय तिचें दर्शन दुःसह शिवशत्रुलोचनीं आलें! ॥ ४७ ॥**

डोळ्यांत तात्काळ पाणी आणणाऱ्या तिखट आल्याचा दृष्टांत साधा पण समर्पक आहे. बापाची निंदा करूं नये, पण पतिद्वेषी बापाची निर्भर्त्सना करून सतीनें अग्नींत उडी घातलीच. सती आपल्या बापास ह्मणते:—

**ते पाय सुमंगळ, तुज काय खळशिरोमणीस हातनया।**
**हा! तनया मी तव, हें वपु अघ, लावूं महेश हात न या! ॥५०**

**सुटका पापापासुनि भक्षित पापान्न ओकितां आहे ।**
**भवदुत्पन्न तसें हें वपु पाप! त्यजिल मग न कां या हे?॥ ५२ ॥**

पांचव्या स्कंधांत जडभरताचें वर्णन मजेचें केलें आहे. गायत्रीमंत्राचे चोवीस वर्ण कांहीं त्याला येईनात! याच्या मठ्ठपणामुळें त्याचे आईबाप दुःखानें मेले, तरी यानें आपला घुमेपणा सोडला नाहींः--

**देवीचे वर्ण न धरि घोकवितां चार मास चोवीस ।**
**तो वीसहि नुच्चारी, भरत ह्मणे, 'तूं मनींच होवीस!' ॥ ४२ ॥**
**बाप अलब्धमनोरथ वृद्ध गृहींच त्यजूनि तनु जाय ।**
**माय सहगमन करि, तरि न ह्मणेचि मुखें करूनि जड हाय!॥४३**

जडभरत बाह्यतः वेडा दिसे, पण अंतर्यामीं फार जागृत होता. रहूगणराजानें हा धटिंगण पाहून पालखीस जोडला, त्या प्रसंगासंबंधानें पंत ह्मणतातः--

**वाहे स्कंधीं, बाळ न जाणुनि भलतेंचि जरि वदे काय ।**
**स्वसुखामृतें तयातें निववी, सत्पुरुष कां नव्हे माय? ॥ ४४ ॥**

साहव्या स्कंधांत अजामीळाचें पूर्वचरित्र वर्णिलें आहे तें असेंः—

**वरकुळज कान्यकुब्जीं विप्र अजामिळ असे महादोषी**
**दासीपति पितृधर्मस्त्रीनय सोडुनि तिलाचि तो पोषी![1] ॥ ५ ॥**
**ते दासी केवळ तनु, तत्सुत दश तेहि केवळ प्राण, ।**
**त्यांचे करि परघातद्यूतस्तेयादिकें परित्राण[2] ॥ ६ ॥**
**वार्धक केवळ आलें, जरि अष्टाशीति लोटलीं वर्षें[3] ।**
**दासीच्या पोरांचें लालन पालन करी सदा हर्षें ॥ ७ ॥**

येथपर्यंतचें वर्णन ज्यांना पदशः लागू पडेल असे प्रतिष्ठित अजामीळ सभ्याच्या काळीं किती तरी सांपडतील! अजामिळाला नारायण नामक कनिष्ठ पुत्राचा लळा लागला तो असाः—

**देतां, घेतां, पीतां जळ, खातां अन्न, जागतां निजतां! ।**
**लुब्धाचें प्रेम धनीं, त्याचें नारायणीं तसें झिजतां! ॥ ९ ॥**

यमदूत व विष्णुदूत यांच्या मधील लढा वाचण्यालायख आहे. सदर कथा महाराष्ट्रांत लोकप्रिय करण्याचें श्रेय वामनपंडितांच्या''नामसुधा' या

१ पितर, धर्म, स्त्री व नीति यांचा त्यानें त्याग केला. २ रक्षण. ३ अठ्यायशीं वर्षें.

उत्कृष्ट प्रकरणाकडे आहे. 'उष्णांत नारायण खेळताहे........नारायाणीं रंगलि विप्रवाणी' हा श्लोक आबालवृद्धांस माहीत आहेच. अजामीळास्तव प्रभूनें स्वनामगुण उघडे केले. सातव्या स्कंधांत 'वध गोद्विजवर्यांचा, उच्छेद श्रुतिमखादिधर्मांचा' करणाऱ्या हिरण्याक्षप्रभृति दैत्यांचें, पण मुख्यत: प्रऱ्हादाच्या पुण्यचरित्राचें, पंतांनीं पुन्हां विस्तारानें वर्णन केलें आहे तें सर्वोत्कृष्ट साधलें आहे. त्यांतही प्रऱ्हादानें असुरपुत्रांस जो बोध केला तो सुंदर साधला आहे. पंतांनीं प्रऱ्हादकथा 'प्रऱ्हादविजय,' ग्रंथांत पूर्वीच सांगितली होती. आठव्यांत मोहिनीरूपाचें सुंदर वर्णन आहे, तिनें देवांना अमृत पाजून दैत्यांना फसविलें याबद्दल पंत ह्मणतात:—

**भक्तांसि सुधा पाजी, देणारी सेवि त्यांसि भद्रा श्री।**
**पर भुलविले स्मितरसें बसली घोटीत लाळ तद्रांजी॥ ६९॥**

मोहिनीरूप पाहून मदनांतक शंकराचीही त्रेधा उडाली:—

**न शिवासंकोच उरे, हृदयीं तैसें स्वभानही न टिके।**
**घटिकेमाजि अनीश्वरसा झाला, गुणहि सत्य ते लटिके! ॥ ८९॥**
**मोडुनि धांवोनि गळां त्या स्त्रीच्या कामकाळही पडला!।**
**जड लागे पाठीला जैसा, दृष्टांतही तसा घडला॥ ९०॥**

नऊही स्कंधांत हिंदुसमाजांत सर्वांना पूज्य झालेल्या देवकथा वर्णिल्या आहेत, त्यांतील प्रऱ्हादध्रुवादिकांचीं चरित्रें सर्वांस माहीत आहेतच. हीं चरित्रें वाचतांना 'देवचरित्रें ह्मणों नये खोटीं' (स्कं. ६–१८७) हा पंतांनीं सध्याच्या लोकांना मुद्दाम इषारा दिला आहे तो विसरूं नये.

५ रुक्मिणी व देवकी यांच्या उदरीं बळराम व कृष्ण जन्मास आले त्याबद्दल पंत ९ व्या स्कंधाच्या अखेरीस ह्मणतात:—

**ते रामकृष्ण आले त्यांच्या पोटासि, [४]भाग्य-अर्णव तें।**
**न चतुर्मुखासि वदवे, कैसे एका मुखासि वर्णवतें ? ॥ ३६९॥**
**वाराया भूमीचा भर, शरणागत अशेष ताराया,।**
**माराया दैत्यांतें, अवतरला श्रीनिवास[५] बा! राया॥ ३७३॥**

दशमस्कंधांत श्रीकृष्णाचा जन्म; बाललीला; पूतना, तृणावर्त, प्रलंब, कालीय वगैरे दैत्यांचा वध; यासंबंधाचीं वर्णनें चांगलीं साधलीं आहेत. पूतनेला मूळांत 'तीक्ष्यांतराकोशपरिच्छदासिवत्' याप्रमाणें तरवारीची उपमा

१ त्या परांचा म्ह. दैत्यांचा समुदाय २ पार्वतीची भीति. ३ अस्वतंत्र, परांधीन. ४ भाग्यसमुद्र. येथें पंतांनीं अवश्य असून हा संधी केला नाहीं. ५ लक्ष्मीपति.

दिली आहे ती पंतांनीं 'वरि बरवी, अत्युग्रा अंतरिं, कोशांत जेंवि तरवारी' याप्रमाणें स्पष्ट करून सांगितली आहे. पूतनेबद्दलः—

**भव्य स्वरूप घेउनि कपटें तों पूतना व्रजीं आली।**
**व्यालीपरीस उग्रा जी केवळ मृत्युची स्वयें आली ॥ ११२ ॥**

तिची श्रीकृष्णानें कशी दशा उडविली पहाः—

**नयनें फिरवी, झाडी करचरण, ह्मणे 'पुरे,' रडे, तदपी।**
**न करी पुरे, न सोडी, गोडी आणूनि असुंहि मास्पद पी ॥१२२॥**
**मोठा शब्द करूनि क्षितिवरि सौकोस पूतना पडली।**
**कांपविली भू, चुरिली अटवी जी स्वपतनांत सांपडली ॥ १२३ ॥**

श्रीकृष्णानें बाललीला करून यशोदेला कसें भुलविलें व सुखविलें याबद्दल पंतांनीं अत्यंत सरस वर्णन करून, वत्सलरस भक्तिरसाशीं मिसळून देऊन जो अद्भुत मेवा तयार केला आहे त्याचा थोडासा मासला आतां दाखवितों.—

**वासी वदन प्रभु तो, त्यांत ब्रह्मांड पाहती झाली! ।**
**त्यांत व्रज, त्यामध्यें आपणही—हें विलोकितां भ्याली ॥ १६१ ॥**
**वामनपणीं अदितिला, कौसल्येला न जें नृपाळपणीं।**
**तें सुख गोपीला दे शतदा दिवसांत देव बाळपणीं! ॥१६४॥**
**भरली वरि आनखशिख नंदवधू शुद्धमणिगणें हेमें।**
**आंतहि पुत्रीभूतब्रह्माच्या दिव्यगुणगणप्रेमें! ॥ १६८ ॥**
**गळती नेत्रांतूनि प्रेमाश्रुजळें, फुलें शिराहूनीं।**
**ऐसें मंथन करितां श्रीकृष्ण धरी रवासि बाहूनीं ॥ १६९ ॥**
**बसवी बळेंचि तीस स्तन्यार्थी देव तो धरूनि रवी।**
**शिशुपण तिच्या न केवळ उद्धारा आमुच्याहि तें मिरवी!॥१७०॥**
**यष्टि उगारी जों कर धरूनि करें तों तदश्रुतनुकंपा।**
**पाहे, राहे ताडण, वारी त्या गोपिकेसि अनुकंपा! ॥ १७६ ॥**

१ भेत्रीण. २ लक्ष्मीनिवास जो कृष्ण त्यानें दुधासह तिचे प्राणही पिऊन टाकले! ३ मूळांतही 'त्रिगव्यूति' असेंच ह्मटलें आहे. या आर्येचें मूळः—

**पतमानोपि तद्देहस्त्रिगव्यूत्यंतरद्रुमान्।**

**चूर्णयामास राजेंद्र महदासीत्तदद्भुतम्॥**

४ आपादमस्तक. ५ पुत्ररूपानें पोटीं आलेल्या भगवंताच्या दिव्यगुणप्रेमानें आंत शोभली. ६ त्याचें रडणें व थरथर कांपणें. ७ प्रेम, दया.

या अमृतोपम मधुर आर्यांची नांवाजी शब्दांनीं काय करावी? यशोदेचें बाह्यांग सुवर्णकांतीनें खुललें तसें तिचें अंतरंग श्रीकृष्णाच्या दिव्यगुणप्रेमानें खुललें, ही एकच कल्पना ह्मणजे एक काव्य आहे! डोळ्यांतून टपटप गळणाऱ्या प्रेमाश्रूंना डोक्यावरून गळणाऱ्या पुष्पांची जी उपमा सांनिध्यानें ध्वनित केली आहे ती तरी किती मनोहर आहे! गवळ्यांच्या मुलांबरोबर गुरें राखावयाचें काम श्रीकृष्णानें केलें त्या वेळचें वर्णनही सुंदर आहे. वनभोजनसमयीं:—

**देती मिटक्या, दाविति अन्योन्य स्वस्वभोज्यरुचि, रमती।**
**हांसति भोजन करितां, हांसविति प्रभुसि गोप रुचिरमती॥२१८॥**

६ रासक्रीडेच्या पंचाध्यायीबद्दल (अ. २९ ते ३३) पंतांनीं ३० आर्या केल्या आहेत (३७६-४०७), व या सर्व फार सरस आहेत. गोपींना श्रीकृष्णगुणांनीं असें मोहून टाकलें कीं त्यांना घरदार, स्वदेह, पति, व आपलें सर्वस्व त्यांवरून ओंवाळून टाकावें असें वाटे! कृष्णानें त्यांला पातिव्रत्यधर्म सांगितला पण ज्या 'वाहों आल्या तनु मन हरिचरणीं' व ज्या 'गमलें गृह गोपींतें गहन, गहन गेह, वेणुच्या पानें' त्या काय त्याला बधतात? त्यांचा निर्धार व आत्मसमर्पण पाहून:—

**दे अभय दयासिंधु, क्रीडे त्यांसी परोपरी रानीं,।**
**पूजिति पाय प्रभुचे पुष्पांनीं तेवि या शरीरांनीं॥ ३८३॥**

पुढें त्या गोपी सौंदर्यमदानें फुगल्या, तेव्हां त्यांच्यांत अहंकृतिलेश अद्याप आहे हें पाहतांच श्रीकृष्णानें:—

**मोकलिल्या तत्काळ, प्रभु झाला गुप्त, दुर्गुणें विटला।**
**स्त्रीजन विरहीं टाकी, जैसा अग्नींत दिव्य पट किटला!॥ ३८७॥**

मग त्या गोपींनीं रानांत स्थिरजंगमास कृष्णगति विचारली तेव्हां त्यांनां श्रीकृष्णपदांसह एका स्त्रीचीं पदेंही दिसलीं! त्यांचा मत्सराग्नि पेटला. श्रीकृष्णासह एकटी राधा पळून गेली होती. पण:—

**वाटे तिस ही ऐसें कीं 'ललनारत्न मीं, तरीच मला।**
**गोपी टाकुनी आला घेउनि, मजशीं परोपरी रमला'॥ ३९२॥**
**सुदती ती प्रभुसि ह्मणे, 'मज तों मार्गीं न चालवे स्पष्ट।**
**जाणें तिकडे न्यावें हरि! मी न शकेंच, पावलें कष्ट!॥ ३९३॥**

१ आपापल्या शिदोरीची चव. २ सुबुद्ध. सुजाण.

**देव ह्मणे, स्कंधीं ये ' गोपी गेलीच जों बसायास ।**
**तों गुप्त होय भगवान्! स्वातिक्रम मानतो कसा यास! ॥३९४॥**

अहंकारापाशीं माझा वास नाहीं हें तत्व त्या गोपींना शिकवून त्यांच्या वैषयिक मनोवृत्तींचीं सर्व वस्त्रें काढून घेऊन त्यांना नग्न करण्यासाठीं श्रीकृष्ण अंतर्धान पावले, तेव्हां:—

**नक्षत्रें इंदुविणें, स्त्रीरत्नें प्रभुविणें तशीं गमलीं ।**
**स्वसुखनिधान करींचें जातां त्यांचीं मनें बहु भ्रमलीं ॥ ३९७ ॥**
**मोहेळ कृष्ण सुरसमय, गोपी सरघाचि, त्यासि त्या चुकल्या ।**
**काय क्लेश वदावा? सुकल्या शोकें, स्वजीवना मुकल्या ॥ ३९८ ॥**

यानंतरः—

**भक्तीनें आळवितां गातां गुण चिंतुनी मनीं मूर्ती ।**
**प्रकटे गोपींत प्रभु होतां तद्बुद्धि निर्मळा पूर्ती! ॥ ३९९ ॥**
**गलदंजनाश्रुमलिनें वदनें त्यांचीं पुशी स्वपाणीनें ।**
**सांत्वन करी प्रियांचें परमेश्वर अमृत मधुरवाणीनें! ॥ ४०० ॥**
**वनितांसह मग तितुक्या मूर्ती धरुनि स्वयें करी रास ।**
**गोपी चुंबिति, हुंगिति, आलिंगिति सुंदरा शरीरास ॥ ४०१ ॥**
**ते बाहुगुणग्रथित, श्यामप्रभ, गौर, देह अति रुचिर ।**
**रासीं शोभति, हारीं शुचि मरकतकनकमणि तसे सुचिर ॥ ४०२**
**वाद्यें वाजविती सुर गोपींसीं गाय जें हरी रासीं, ।**
**स्वर शोभला स्वरासीं, जसेंचि शरीर तच्छरीरासीं! ॥ ४०३ ॥**
**देउनि पद्मादुर्लभ सुखराशी त्या जळीं स्थळीं रमवी! ।**
**अस्खलितवीर्य भगवान् गोपींचा कामताप तो शमवी!! ॥ ४०४ ॥**

---

१ या राधेच्या प्रेमाचें व फजीतीचें मूळांत पद्यशः असें वर्णन आहे:—

**साच मेने तदात्मानं वरिष्ठं सर्वयोषिताम् ।**
**हित्वा गोपीः कामयाना मामसौ भजते प्रियः ॥ ३०—३७ ॥**
**ततो गत्वा वनोद्देशं दृप्ता केशवमब्रवीत् ।**
**'न पारये ऽहं चलितुं नय मां यत्र ते मनः' ॥ ३८ ॥**
**एवमुक्तः प्रियामाह स्कंध आरुह्यतामिति ।**
**ततश्चांतर्दधे कृष्णः सा वधूरन्वतप्यत ॥ ३९ ॥**

२ मधाची पोळी. ३ मधमाशा. ४ आपलें सर्वस्व जो श्रीकृष्ण त्याला ५ काजळ.

७ रासक्रीडेचें वर्णन संपलें. या परममंगल आख्यानाकडे शुद्धभावानें पाहण्याची योग्यता ज्यांना प्राप्त झाली आहे त्यांना गोपीप्रेमाहून वरचढ प्रेम आढळणार नाहीं, व ते उद्धवाप्रमाणें गोपींना धन्यवादच देतील! जगन्मोहक मुरलीधर, प्रभुरूपाला पाहून गोपी आपलें सर्वस्व जें पतिरूप धन त्यालाही तुच्छ मानायला तयार झाल्या, तेव्हांच त्यांना भगवत्पदप्राप्ति झाली. सर्वस्वार्पण करावें, इतर सर्व प्रेमबंध तोडून टाकावे, अहंवृत्तीचा पूर्ण लय करावा तेव्हांच प्रभुप्राप्ति होते. जगद्व्यवहार चालायला नीति अवश्यमेव पाहिजे, पण भगवत्प्रेमाची पायरी तिच्याही वरची, तिच्या प्राप्तीसाठीं सर्वस्वत्यागच झाला पाहिजे. 'नारायणीं जेणें घडे अंतराय । हो कां बापमाय त्यजावीं तीं' या अभंगाचें तरी सारस्य हेंच! गोपीप्रेमाचें वर्णन करतांना बाळलीलेच्या अभंगांत तुकोबांनीं ' मनें हरिरूपीं गुंतल्या वासना । उदास या सुना गौळियांच्या ' याप्रमाणें त्यांचें गौरव केलें आहे. अर्वाचीन काळची मंडळी आपल्या पापमय चष्म्यानें या रासक्रीडेकडे पाहतात. वामनदाजी ओकांसारख्या रसिक पंडिताला सुद्धां रासक्रीडेच्या आर्यांवर टीपा देतांना संकोच वाटावा व इंग्रजांच्या बॉलचें स्मरण व्हावें हें कशाचें लक्षण आहे? शुक्राचार्य, एकनाथ, तुकाराम, शिवकल्याण, मोरोपंत असे संत ज्या रासलीलांचें वर्णन करितांना प्रेमानें विरघळून जातात त्यांचें नांव निघाल्याबरोबर आमची सोंवळीं (?) माणसें भयविव्हळ होतात!! थिऑसफीच्या विचारपद्धतीनें विचार करणारे कित्येक पंडित हें सारें रूपक आहे ह्मणून सांगतात. भगवंताच्या साऱ्याच कथांत रूपकें असतात, पण रूपक हा मुख्य कथेच्या आश्रयानें राहणारा एक भाग आहे. अस्सल सोडून, साप साप ह्मणून दोरीला झोडपणाऱ्या कुतर्कवाद्यांचा प्रस्तुतचा काळ आहे. पंतांनीं मंत्रभागवत लिहिलें तेव्हां त्यांचें मन कचरत नव्हतें, तर साऱ्या भगवद्भक्तांप्रमाणें या इतिहासावर त्यांचा पूर्ण भरंवसा होता, व ह्मणूनच त्यांनीं परीक्षित राजानें ' धर्ममर्यादांचा उपदेष्टा श्रीकृष्ण असें जुगुप्सित कर्म कसें आचरता झाला ' हा प्रश्न विचारला व त्यावर श्रीशुकांनीं ' तेजीयसां न दोषाय वन्हेः सर्वभुजो यथा ' हें उत्तर दिलें, हा भाग सुद्धां अगदीं गाळला आहे! अनीश्वर पुरुषानें असें कर्म मनानें देखील करूं नये, शंकर विष प्याले ह्मणून भलताच प्राणीही विष पिऊं लागेल तर तो तत्काळ मरेल! 'न देवचरितं चरेत ' या ह्मणीचें रहस्यही असेंच आहे. असो.

८ पशुपतीच्या यात्रोत्सवप्रसंगीं श्रीकृष्णानें सुदर्शनास मोक्ष दिला तेव्हां तो ह्मणालाः—

**सुगतिप्रदपदपद्मा[1] ! पद्मासद्मा[2] ! तुझ्या पदा नमन।**
**वर दे वरदेशा ! हा, माझें विसरो तुला कदा न मन ॥ ४१५ ॥**

पुढील एका आर्येंत एक कथा आहे व तींत विषम व अर्थांतरन्यास बा दोन अलंकारांचा चांगला संकर झाला आहे, ही आर्या शंखचूड राक्षसाबद्दल आहेः—

**मोहें प्रभुचीं ललनारत्नें हरितां स्वमूर्धरत्नातें।**
**हारवि; असेंचि बुडति व्यसनीं दुर्मति करूनि यत्नातें ! ॥ ४२० ॥**

९ गोपी प्रेमभरानें हरिमूर्ति व मुरली यांच्या गुणांला गात तल्लीन होतः—

**ते प्रेमोद्गार मधुर, मधुरतर मुकुंदयशहि आधीं तें ॥**
**गात्यांच्या, श्रोत्यांच्या दूर करित तत्क्षणींच आधींतें ! ॥ ४२४ ॥**
**वाहों नये जलांनीं, डोलावें फण करूनि उरगांनीं, ।**
**अश्रूंनीं देवींचें नित्य भिजावें सवस्त्र उर गानीं ॥ ४२२ ॥**

१० कंसानें रामकृष्णाला नेण्यासाठीं अक्रूराला पाठविलें. अक्रूर कृष्णभक्त होता. श्रीकृष्णाला पाहतांचः—

**सुटला दांव्यापासुनि वत्स स्तन्यार्थ जेंवि गाईला।**
**धांवे, अक्रूर तसा भेटाया कडकडूनि आईला ! ॥ ४८१ ॥**

कृष्णवियोगाबद्दल गोपींना कोण दुःख झालें? त्या ह्मणतातः—

**'यमदूतशतक्रूर स्वमुखें अक्रूर ह्मणवितो मेला, ।**
**आला गांव वधाया ! परि, बाई, हा न लेश कोंमेला' ॥ ४९५ ॥**
**भवनें कारागारें, काय महाभार, हार ते साप, ।**
**पति अतिखळ, विषतरुचीं फुलें मुलें गमति ! पावल्या ताप॥४९८**

कंसाच्या दरबारीं रामकृष्ण शिरले तेव्हां ते सर्वजनदृष्टि वेधते झालेः—

**'वसुदेवपुत्र होते नंदगृहीं, जेष्ठ राम जो गौर, ।**
**श्यामलकाय ललिततनु कृष्ण,' असें कथिति, दाविती पौर! ५४४**
**ते प्रभु चुंबकमणिसे, चुंबिति जनदृष्टि त्यांचि दोघांतें, ।**
**धांवति यात्रा गंगायमुनांच्या जेंवि भास्वेंदोघातें ! ॥ ५४५ ॥**

---

१ उत्तम गति देणारें आहे पदकमळ ज्याचें अशा. २ लक्ष्मीनिवासा. ३ तो प्रभूचीं स्त्रीरत्नें चोरायला गेला व झालें भलतेंच, तो आपलेंच मस्तकरत्न हारवून बसला; असा अर्थ येथें आहे ह्मणून हा विषमालंकार झाला आहे. ४ दोन्ही उपमा सुंदर आहेत.

दुसरी आर्या किती सुंदर आहे! गंगा गोरी व यमुना काळी, तसा बळिराम गोरा व कृष्ण काळा. तेव्हां रामकृष्णांना गंगायमुनौघांची दिलेली उपमा किती साजरी आहे! उद्धव श्रीकृष्णभक्त खरा, पण गोपींची भक्ति पाहून केवळ लज्जित होऊन गेला:—

**सुज्ञ शिरोमणि उद्धव बहु त्यांचें प्रेमभाग्य वाखाणी।**
**त्यांसि ह्मणे " बाई हो! अमृताची प्रेमभाव ही खाणी ॥ ६०२ ॥**
**देहीं गेहीं झालें चित्त उदासीन कृष्णगुण गातां।**
**झालां कृतार्थ जन्मुनि! उरलें कर्तव्य काय हो आतां?" ॥६०३॥**
**भर बहु सगुणचरित्रीं गोपींचा, नित्य तेंचि आठविती।**
**पढवुनि भक्ति, बहु दिवस ठेवुनि, मग उद्धवासि पाठविती!॥६०८॥**

गोपींच्या प्रेमाची वाखाणणी करिताना पंतांनीं, ' अन्य, स्पष्टचि, सगुणप्रमावांचूनि पंडितंमन्य ' ह्मणजे सगुणप्रेमहीन पुरुष केवळ पंडितंमन्य आहेत असें ह्मटलें आहे. पंत स्वतः मोठे सगुणभक्त होते, ह्मणूनच रामकृष्णादिकांचीं अवतारचरित्रें गाण्यांत त्यांनीं आपला जन्म घातला. त्यांनीं वेदांतावर कांहीं ग्रंथ केले नाहींत याचेंही कारण हेंच होय. त्यांच्या सारख्या तैलबुद्धि पंडिताला वेदांतविषय कांहीं अगम्य नव्हता. त्यांनीं एकादश स्कंधांतल्या आर्यांत स्पष्ट दाखविलें आहे, कीं वेदांतविषयही त्यांना आरशासारखा सुलभ झाला होता, पण ' नको ब्रह्मज्ञान आत्मस्थितीभाव। मी भक्त तूं देव ऐसें करी ' या तुकोबांच्या वचनाप्रमाणें त्यांचाही भाव होता. अक्रूरानें श्रीकृष्ण, कुंती व धृतराष्ट्र यांच्या भेटी घेतल्यावर त्यांचा जो संवाद झाला तो पंतांनीं सुरेख वर्णिला आहे. श्रीकृष्णदर्शनोत्तर अक्रूर ह्मणाले:—

**' गटक्या भवाब्धिमध्यें खातां, हे पायनांव सांपडली '।**
**अक्रूर ह्मणे, ' माता बाळाच्या दृष्टि बहुदिसां पडली ॥ ६२० ॥**
**वणव्यामधेंचि जळतां, अमृताची प्रचुर जाहली वृष्टी,।**
**उद्धरले मत्पूर्वज सकळहि, पडतांचि पाय हे दृष्टी ' ॥ ६२१ ॥**

श्रीकृष्णांनीं अक्रूराचा गौरव करून त्याच्यासारख्या संताची योग्यता वाखाणिली व ह्मणाले:—

**सुटलें सत्संगेंचि व्यसनापासूनि जीव साधूंनीं।**
**दिधलें रंकासहि, निजपद धरितां, मुक्तिपथहि साधूनी ॥ ६२४ ॥**
**देती फळ बहु दिवसां देव शिलाकाष्ठमृण्मय प्रणतां,।**
**जळमय तीर्थेंहि तशीं, संतचि फळती 'नमोस्तु' ते ह्मणतां!॥६२५॥**

१२ नवरा मृत झालेला, पोरवडा मागें, नातलग नाशास टपलेले, अशा स्थितींत हिंदु विधवेची कशा दशा होते, याचे नमुने बहुधा प्रत्येकानें पाहिलेच असतील. पांडवांच्या बाळपणीं कुंतीची अशीच दशा झाली होती:—

**भगिनी पृथा ह्मणे, ' या विटल्यें दुर्जीवितास दादा ! मी ।**
**दैवें अहर्निश मला चिंतेच्या बांधिलें सदा दामीं ॥ ॥ ६४१ ॥**
**गर्हित वैधव्य, मुलें लघु, चिंतिति नित्य पाप दायाद, ।**
**गेहांत भोगितें मन, जैसें जाळ्यांत आपदा याद ' ॥ ६४२ ॥**

१३ अक्रूरानेंही कुंतीची दुःस्थिति मनांत आणून धृतराष्ट्राला पुष्कळ बोध केला व सांगितलें कीं 'वर्तावें सम, जैसे शत तैसे पांच पांडुचे मानी,' पण त्या अंधावर कांहीं त्याचा परिणाम झाला नाहीं. अक्रूर ह्मणाला:—

**गति उत्तम होय असें वर्तावें, धर्मनीति रक्षावी ।**
**चित्तांत पूर्वजांची नित्य स्थिति रीति शांति लक्षावी ॥ ६५३ ॥**

या अक्रूरागमनप्रसंगाचें मूळांत फारच गोड वर्णन आहे, पण पंतांनीं विस्ताराचा संक्षेप थोडक्या आर्यांत करून पुन्हां गोडी कायम राखिली, इतकेंच काय पण वरील सारख्या अत्युत्कृष्ट पद्यांनीं मराठी भाषेस भूषविलें.

१४ येथपर्यंत दशमाचा पूर्वार्ध ह्म. ४९ अध्याय झाले. उत्तरार्धाच्या आर्यांहून पूर्वार्धाच्या आर्या फारच सरस वठल्या आहेत. उत्तरार्धांत नरकासुर, जरासंध, शिशुपाल, शाल्व इत्यादिकांच्या युद्धकथा वार्णिल्या आहेत, व रुक्मिणीविवाह, रुक्मिणीविनोद, सुदामचरित्र, सुभद्राविवाह, व भृगुचरित या पांच गोष्टींवरील आर्या जरी उत्तम आहेत तरी यांचा विशेष विस्तार कृष्णविजयांत व अन्यत्र पूर्वी केला होता व तोही उत्कृष्ट प्रकारें केला होता ह्मणून त्याबद्दल येथें कांहीं लिहीत नाहीं. कृष्णविजयांत ज्या कथा विस्तारानें लिहिल्या आहेत त्यांपैकीं येथें कांहींचा तर एक एक आर्येंत संक्षेप केला आहे. उदाहरणार्थ दोन प्रसंग घेऊं. कृष्णविजयांत ६९ व्या अध्यायांत नारदानें सोळा हजार स्त्रियांच्या घरीं श्रीकृष्णानें जो गृहस्थधर्म भोगून दाखविला त्याचें विस्तृत वर्णन आहे, पण येथें त्यावर एकच आर्या केली आहे:—

**सुरमुनि एका समयीं प्रभुचें कौतुक पहावया आला ।**
**सोळासहस्रसदनीं नव नवलीला विलोकितां धाला ॥ ८९९ ॥**

त्याचप्रमाणें कृष्णस्त्रियांनीं आपापल्या विहाहकथा द्रौपदीस सांगितल्या, त्याचें विस्तृत वर्णन पंतांनीं कृष्णविजयाच्या ८३ व्या अध्यायांत २१०

आर्यांत केलें आहे, पण या गोष्टीचें स्मरण ठेवून त्यांनीं येथें मंत्रभागवतांत त्या प्रसंगावर एकच आर्या केली आहे. ती ही:—

**मोठा आदर तीचा जाणुनि त्या रुक्मिणीप्रमुख सर्वा।**

**स्वविवाहकथा कथिती, ज्या स्वरसें नुरविती सुधागर्वा ॥१०१४॥**

एकंदरींत पाहतां असें स्पष्ट दिसतें कीं दशमस्कंध पंतांनीं उत्कृष्टतऱ्हेनें मराठींत आणला आहे. मात्र दशमाचा पूर्वार्ध मंत्रभागतांत व उत्तरार्ध कृष्णविजयांत अत्यंत सरसपणें वर्णिला आहे असें मला वाटतें.

१५ दुसरी माळ श्रीकृष्णचरित्ररूप आहे. ही अत्यंत सरस, केवळ प्रेमामृतरसमय आहे. आधीं देवचरितें अत्यंत मंगल, त्यांत पूर्णब्रह्म श्रीकृष्ण-परमात्म्याच्या अवतारलीला अत्यंतात्यंत मंगल, त्यांतही श्रीकृष्ण व गोपी यांच्या शुद्ध प्रेमाच्या कथा निरतिशय मंगल! श्रीकृष्णकथांची गोडी जाणणारे परम भाग्यवंत होत. अर्वाचीन काळीं श्रीकृष्णचरित्रावर अमंगळ आरोप करणोरे व मुख्यत: रासक्रीडेचा विपरीतार्थ करणारे कांहीं अभागी प्राणी उत्पन्न झाले आहेत. त्यांना कृष्णचरिताची माधुरी कळणें तूर्त शक्य नाहीं, अशा अभाग्यांसाठीं भागवत ग्रंथ नाहीं, पंतासारख्यांचीं काव्येंही नाहींत, व माझा प्रस्तुत ग्रंथही नाहीं! आर्यसंस्कृतीचीं निष्काम ईश्वरप्रेमाचीं रहस्यें ज्या हृदयभूमीवर रुजलीं नाहींत, त्या कठिण व रुक्ष माळजमीनीवर व्यर्थ वाहून जाण्यासाठीं संतांनीं आपल्या काव्यामृताचा वर्षाव केला नाहीं. 'नि-र्मोह झालेल्या जीवन्मुक्तांनींही भागवतांत रमावें' असें पंत ह्मणतात तें यथार्थ आहे. रामायण भारतांपेक्षांही भागवताची गोडी निराळी आहे. भग-वद्भक्तीची अनुपम गोडी लावणारा असा दुसरा ग्रंथ भूलोकीं नाहीं. दुसऱ्या स्कं-धांतलें देवावतारांचें वर्णन; चवथ्यांतलें ध्रुवाख्यान; सहाव्यांतली अजामीळाची कथा; सातव्यांतलें प्रल्हादचरित; आठव्यांतल्या गजेंद्रमोक्ष, अमृतमथन, वामनावतार वगैरे कथा, नवव्यांतल्या अंबरीषहरिश्चंद्रययातिप्रभृतींच्या कथा, दशमांतल्या नितांतमधुर, परमपावन अशा कृष्णलीला, एकादशांतला सगु-णभक्तिप्रतिपादक वेदांत—या सर्वच प्रकारच्या कथा अद्भुतप्रेमरसानें थब-थबलेल्या आहेत. व्यासांनीं गायिलेल्या, शुकांनीं ऐकिलेल्या, नाथांनीं प्रतिपादिलेल्या, संपूर्ण साधुसंतांनीं अखंड प्रेमानें नित्यश: चिंतलेल्या या भागवतसंहितेची बरोबरी करणारा भक्तिमार्गप्रकाशक अन्य ग्रंथ भूलोकांत नाहीं असें मीं स्पष्ट ह्मणतों! मुख्यत: दशमस्कंध ह्मणजे नुस्तें अमृताचें

सरोवर आहे. आधीं देवचरितें मंगल, त्यांत पूर्णब्रह्म श्रीकृष्णाच्या अवतारकथा परममंगल, त्यांतही श्रीकृष्ण व गोपगोपी यांच्या अन्योन्यप्रेमाच्या कथा निरतिशय मंगल आहेत! त्यांची पूर्ण गोडी शुकनाथांसारख्यांनींच घ्यावी. श्रीकृष्णचरित्रावर अमंगल शंका घेऊन पापकर्दमांत डुबणाऱ्या पाप्यांची कींवच करावी. पण ते जर लेखनव्याख्यानादि व्यवसायांनीं जनसमूहाच्या श्रद्धेला धक्का लावण्याचा यत्न करीत असतील तर पंतांच्या शब्दांनीं बोलायचें ह्मणजे ' त्यांला राक्षस ह्मणतों मीं सन्मार्गांत विघ्न करित्या तें ! ' भागवताच्या एकादश स्कंधावर परमभागवत श्रीएकनाथ महाराज यांनीं मराठींत अत्युत्कृष्ट टीका केलेली सर्वसंमत आहेच. त्यांत सगुणमहिमान फारच सुंदर वर्णिलें आहे. नाथांच्या परंपरेंतले संत कृष्णदयार्णव यांनीं नाथाज्ञेनें दशमस्कंधावर ' हरिवरदा ' नामक ५१ हजार ओव्यांचा विस्तृत, प्रौढ, व सरस टीकाग्रंथ रचलेला आहे. तुकोबांनीं शेंकडों भक्तांना ' गीताभागवतादि ग्रंथांनीं भगवत्प्रेम शिकविलें, भागवत ग्रंथाच्या सेवनानें अमृतरायासारखे राजयोगी कृतार्थ होऊन ' वाचा एकोवाचा भागवत अध्यारे बापांनो ! अखंड हरि हरि वदा ! ' असा जीवांना बोध करून गेले. भक्तिमार्गाचे मुख्य आधारस्तंभ गीता व भागवत हे दोन ग्रंथ. व त्यांतही भगवंताच्या सगुणलीलांची गोडी भागवतामुळें जीवांना ज्यास्त लागली. असो. अशा भागवताकडे व त्यांतही दशमस्कंधाकडे पंतांनीं ज्या भक्तिप्रेमानें पाहिलें, त्याच भक्तिप्रेमानें पंतचरित्राच्या वाचकांनींही पंतांच्या भागवताकडे पाहिलें तरच त्यांना त्याची खरी योग्यता कळण्याचा संभव आहे.

११ अकरावा स्कंध पंतांनीं काळजीपूर्वक तयार केला आहे. यांत श्रीकृष्णांनीं उद्धवास उपदेशिलेला वेदांत आहे. एकादशाची वास्तविक योग्यता मराठी वाचकांना नाथांच्या अत्यंत प्रेमळ व प्रासादिक टीकाग्रंथावरून टाऊक आहेच. नाथांची योग्यता व त्यांच्या टीकेचे बहुमोल गुण यांची नावाजी म्यां पामरानें काय करावी ? व्यासवचनाचें मर्म जाणून व त्यांत आपल्या स्वानुभवाची भर घालून नाथांनीं तो ग्रंथ जडजीवोद्धारास्तव निर्माण केला आहे. पंतांनीं एकादशाचा केवळ संक्षेप केला आहे. मूळाचें मर्म नाथांच्या ग्रंथांतच पहावें. पण एकादशाचा सारांश पंतांनीं ६९० आर्यांत ज्या पद्धतीनें आणला त्या पद्धतीचें सूक्ष्म अवलोकन केल्यावर पंतांचाही धन्यवाद गायिल्याशिवाय मला राहवत नाहीं. पंतांनीं वेदांतावर ग्रंथ केले नाहींत.

पण या स्कंधांतील त्यांच्या वेदांतपर आर्या पाहिल्या ह्मणजे त्यांचें वेदांतग्रंथावलोकनही सामान्यप्रतीचें नव्हतें असेंच वाटत. त्यांचा मुख्य भर सगुणलीलावर्णनाकडे असल्यामुळें भगवच्चरितें वर्णून प्रेमरंगांत रंगून गेल्यामुळें त्यांनीं वेदांतादिशास्त्रांच्या गहन विवेचनांत आपलें चित्त शिरकाविलें नाहीं. वेदांतादिशास्त्राभ्यास त्यांना अगम्य होता असें नाहीं, तो त्यांनीं केला नाहीं असेंही ह्मणवत नाहीं, मात्र ते हाडाचे भगवद्भक्त असल्यामुळें आपल्या अंतर्वृत्ति भगवत्प्रेमानें निरंतर आर्द्र राहतील असाच काव्यव्यासंग त्यांनीं केला. एकादशांतील नारायणकथा, ऐलकथा, हंसगीत, भिक्षुगीत वगैरे कथा त्यांनीं संक्षेपांत आणल्या आहेत. दत्तात्रेयाच्या चोवीस गुरूंची मनोहर कथा त्यांनीं यथासांग वर्णिली आहे व भगवद्भक्तांचें स्पष्टीकरण, पूजाविधीचें वर्णन वगैरे भक्तिवर्धक प्रकार यथासांग वर्णिले आहेत! यावरून पंतांचें मुख्य धोरण लक्षांत येण्यासारखें आहे. वैराग्यादि गुण वाढावेत, शास्त्राभ्यासांतून चित्त निवून तें भगवत्पर व्हावें अशा मुख्य धोरणावर त्यांनीं हा स्कंध तयार केला आहे. उदाहरण १९ व्या अध्यायांत सिद्धींचें वर्णन ३६ श्लोकांत असून नाथांनीं त्यांचें सविस्तर वर्णन केलें आहे, पण पंतांनीं त्यांचा निष्कर्ष पुढील दोन आर्यांतच काढला आहे:—

**तव्हां विघ्न कराया, अणिमामहिमादि सिद्धि ज्या आठ ।**
**अन्याहि पंच, दश, वा योग्यांचा पुरवितात त्या पाठ ॥ ३५८ ॥**
**वाहविति सिद्धि, करिती माझ्या प्रमींत अंतरायांतें, ।**
**प्रथमचि विदित असावें त्यांचें अहितत्व संतरायांतें ॥ ३५९ ॥**

गीतेच्या ११ व्या अध्यायांत जसा विभूतिविस्तार सांगितला आहे तसाच या स्कंधांतल्या १६ व्या अध्यायांत ४४ श्लोकांत तो सांगितला आहे. पंतांनीं त्यावर पांचच आर्या केल्या आहेत, पण त्यांतील शेवटची खुबीदार आर्या पहा:—

**न घडे विभूतिकथन प्रभुसाचि, अजि कीं तया नसे अंत ! ।**
**तेज श्री अकरा गुण यावरुनि विभूति जाणती संत ॥ ३६४ ॥**

मूळांत अ. १७।१८ मध्यें ४ युगांतले ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यास या चारही आश्रमांचे धर्म १०६ श्लोकांत उत्कृष्ट तऱ्हेनें सांगितले आहेत, ते पंतांनीं ४ आर्यांत नुस्तेच उच्चारून सोडून दिले आहेत. हा विषय

गाळण्यासारखा नव्हता असें मला वाटतें. निदान पुढील सारखीं उत्कृष्ट रत्नें तरी उपेक्षणीय खास नाहींत:—

**अहिंसा सत्यमस्तेयमकामक्रोधलोभता ।**
**भूतप्रियहितेहाच धर्मोयं सार्ववर्णिकः ॥ १७-२१ ॥**

ब्राह्मणांबद्दल व्यासांनीं ह्मटलें आहे:—

**ब्राह्मणस्य हि देहोयं क्षुद्रकामाय नेष्यते ।**
**कृच्छ्राय तपसे चेह प्रेत्यानंतसुखायच ॥ १७-४२ ॥**

क्षत्रियांनीं हवें तें करावें, पण 'न श्ववृत्त्या कथंचन' ह्मणजे नीचसेवा कधींही करूं नये, वैश्यांनींही आपत्ति आली तर कांहीं काळ मात्र आपद्धर्म ह्मणून सेवा करावी, 'पण कृच्छ्रान्मुक्तो न गर्ह्येण वृत्तिं लिप्सेत कर्मणा' ह्म० आपन्मुक्त झाल्यावर त्या निंद्य वृत्तीला चिकटून बसूं नये. असो. हे दोन अध्याय अत्यंत महत्वाचे असून पंतांनीं ते वगळले आहेत हें मला वाटतें ठीक झालें नाहीं. अध्याय २१ मध्यें गुणदोषव्यवस्था, कर्ता, कर्म, फळ यांचें विवेचन वगैरे कठीण भाग आहेत. त्यांना पंतांनीं अजिबात फांटा दिला आहे व फांटा देतां देतां खुबी केली आहे:—

**ते गुण, दोष, नियम, विधि बहुतचि, यांची प्रवृत्ति संकुचिता ।**
**करुनि निवृत्तिच द्यावी, येथें तात्पर्य कीं न ती उचिता ! ॥ ४४६ ॥**

जो भाग आपण गाळला तो कमी योग्यतेचा ह्मणून नव्हे असें सांगण्याच्या हेतूनें पंत ह्मणतात, 'वाढेल ग्रंथ बहु, प्रणति करुनि सोडिलाचि म्यां गातां !'

१७ संक्षेपाकडे पंतांचा ओढा होता ह्मणून सांगितलें, तथापि जे श्लोक पंतांना फार सरस व महत्वाचे वाटले ते त्यांनीं न गाळतां भाषांतररूपानें जसेच्या तसे घेतले आहेत; व अशा प्रकारें मूळ श्लोक व पंतांचें भाषांतर हीं दोन्ही पुढें ठेवून पंतांची कारागिरी पाहिली ह्मणजे मौज वाटते. महत्वाचा भाग वाटला तेथें पंतांनीं विस्तारही चांगला केला आहे. अ. १४।१९।२९ वगैरे मध्यें जेथें जेथें भक्तिरसाचा संबंध आला तेथें तेथें पंतांनीं श्लोकचे श्लोक भाषांतर करून सोडले आहेत, व कोठें कोठें तर श्रीधरी टीकेचा अर्थ घेऊनही स्पष्टीकरण केलें आहे. उतारे देऊं लागलों तर विस्तार फार होईल. अ. १४ व १९ मधील विविध मतवाद्यांनीं सांगितलेले कल्याणमार्ग, भक्तिसाधनें व शमादि लक्षणें यांवर पंतांनीं श्रीधरी टीकेच्या आधारानें विस्तार केलेला अव-

श्य पहावा. पंतांचें संक्षेपविस्तारचातुर्य पाहणें असल्यास सदर स्कंध मूळाशीं ताडून पहावा ह्मणजे झालें.

१ मूळ:—

शाब्दब्रह्मणि निष्णातो न निष्णाया त्परे यदि ।
श्रमस्तस्य श्रमफलो ह्यधेनुमिव रक्षतः ॥ ११-१८ ॥

पंत:-

भरला शाब्दब्रह्मीं, न परब्रह्मीं भरे, तरि श्रमला ।
श्रमला पहूनि घोकुनि, आत्मज्ञाला न सूज्ञ तो गमला ॥ २४५ ॥

२ मूळ:—

मत्कामा रमणं जारमस्वरूपविदोऽबलाः ।
ब्रह्म मां परमं प्रापुः संगाच्छतसहस्रशः ॥ अ० १२—१३ ॥

पंत:—

वारिधिमाजि नद्याशा प्रेमें मजमाजि गोपिका भरल्या ।
मजला जार समजल्या, न ब्रह्म असें, तथापि त्या तरल्या ॥२८५॥

३ मूळ:—

रजस्तमोभ्यां यदपि विद्वान्विक्षिप्तधीः पुनः ।
अतंद्रितो मनो युंजन्दोषदृष्टिर्न सज्जते ॥ अ० १३-१२ ॥

पंत:—

तेजस्वी स्वमना जरि होतो विक्षेप मोह आवरितो ।
विषयीं दोष पहातो, अनळस होउनि विरक्तिला वरितो ॥ ३१४ ॥

४ मूळ:—

एतद्विद्वान्पुरामृत्योरभवाय घटेत सः।
अप्रमत्त इदं ज्ञात्वा मर्त्यमप्यर्थसिद्धिदम् ॥ अ०-१४ ॥

पंत:—

या अर्थसिद्धिकर, परि नश्वर हें नरशरीर जाणोनी ।
मोक्षार्थ मृत्युपूर्वी यत्न करावा मनांत आणोनी ॥ ४१७ ॥

५ मूळ:—

मनोवशेऽन्ये ह्यभवं स्म देवा
मनश्च नान्यस्य वशं समेति ।
भीष्मोहि देवः सहसः सहीयान्
युंज्याद्वशे तं स हि देवदेवः ॥ अ० २३-४८ ॥

पंत:—

भजति सकळ देव मना, मन कोणाच्याहि हें नसे भजनीं ।
भीष्म मनोदेव बळी, या वश करि तोचि देवदेव जनीं ॥ ४७६ ॥

६ मूळ:—

किं विद्यया? किं तपसा? किं त्यागेन? श्रुतेन वा? ।
किं विविक्तेन मौनेन? स्त्रीभिर्यस्य मनो हृतम् ॥ अ० २६-१२ ॥

पंत:—

भरचि तप, श्रुत, विद्या, एकांत, त्याग, मौन हें सर्व: ।
ज्याचें मन स्त्रियांहीं हरिलें, तेणें करूं नये गर्व ॥ ५२८ ॥

७ मूळ:—

तस्मात्संगो न कर्तव्यः स्त्रीषु स्त्रैणेषु चेंद्रियैः ।
विदुषां चाप्यविश्रब्धः षड्वर्गः किमु मादृशाम् ॥ अ० २६-२४ ॥

पंत:—

गटकाळि देतो मोहीं, करितोचि विवेकशक्तिचा भंग ।
म्हणऊनि इंद्रियांहीं स्त्री–स्त्रैणाचा करूं नये संग ॥ ५३२ ॥
वस्तुज्ञालाहि नव्हे क्षणही षड्वर्गशत्रु विश्वास्य ।
मग मजसारिखियांची काय कथा? वर्णितेंचि विश्वास्य ॥५३३॥

८ मूळ:—

संतो दिशन्ति चक्षूंषि बहिरर्कः समुत्थितः ।
देवताः बांधवाः संतः संत आत्माहमेव च ॥ अ० २६-३४ ॥

पंत:—

तेजस्वी संतचि हे नेत्र देतात आंत बाहेर ।
तुज दिव्य दृष्टि देउनि, म्हणतिल कीं 'चिद्विलास बा हेर' ॥५४५॥
बा! संत देव, संतचि बांधव, गुरु संत, संत हे प्राण, ।
किंबहुना दाशार्हा! विश्वात्मा मीच संत हे जाण ॥ ५४६ ॥

९ मूळ:—

परस्वभावकर्माणि न प्रशंसेन्न गर्हयेत् ।
विश्वमेकात्मकं पश्यन् प्रकृत्या पुरुषेण च ॥ अ० २८-१ ॥

पंत:—

देहादि द्वैत मृषा जाणोनि, परस्वभावकर्मांतें ।
जो न स्तवी, न निंदी, पावतसे तोचि सुख शर्मातें ॥ ५५९ ॥

१० मूळ:—

सत्वाद्धर्मो भवे द्वृद्धात्पुंसो मद्भक्तिलक्षणः ॥ अ० १—३२ ॥

पंतः—

**नयनींचा मळ झडतां जैसा अर्थप्रकाश बहु होतो. ।**
**तैसा विवृद्धसत्वें धर्महि मन्त्रकिरूप गुरु जो तो ॥ २९८ ॥**

१८ भाषांतरकार या नात्यानेंही पंतांची योग्यता केवढी मोठी आहे हें यावरून कळून येईल. पंतांना संस्कृत व मराठी दोन्ही भाषा करतलामलकवत होत्या, मूळ व्यासादि ग्रंथकारांशीं ते समवृत्ति होते, व वर्णनीय विषयांशीं ते तादात्म्य पावत ह्मणून त्यांना इतकीं सरस भाषांतरें करितां आलीं. भाषांतराचेंही काम सोपें नाहीं. प्रसंगीं अगदीं स्वतंत्र ग्रंथ रचणें सोपें आहे, पण मूळांतला रसभंग न होऊं देतां किंबहुना तो खुलवून सरळ भाषांतर करणें हें काम अत्यंत बिकट आहे. त्यांतही प्रस्तुत ग्रंथांत पंतांना आर्येच्या आद्यंताकडे लक्ष देणें जरूरीचें होतें. प्रथम मंत्रांतलें नेमकेंच अक्षर साधायचें व शेवटीं यमक साधायचें! शिवाय नानाविध अलंकार, अद्भुत कल्पना, मधून मधून आहेतच. इतक्या अडचणींतून मूळ कथानुसंधान कायम राखून संक्षेपाकडे निरंतर लक्ष ठेवून अगदीं सहज वाटणारा अस्खलित कवितासरितेचा प्रचंड ओघ सोडून देणें हें काम मोरोपंतांनींच करावें! असा सरस्वतीदेवीचा लाडका पुत्र दुसरा भूलोकीं झाला नाहीं व पुढेंही होणार नाहीं! मूळांतला अर्थ, मूळांतला रस, मूळांतले अलंकार, मूळांतली तेजस्विता, मूळांतलें गांभीर्य, मूळांतले यच्चावत प्रधान गुण पंतांच्या कृतींत उतरले आहेत. व्यासांचे ग्रंथ नित्यशः समवृत्तीनें वाचून पंतांची मनोभूमि अशी तयार झाली होती कीं, प्रत्येक प्रसंगीं व्यासांच्या विचारांचें अगदीं हुबेहुब प्रतिबिंब पंतांच्या विचारांत पडे. किंबहुना व्यासकृत भागवत व पंतकृत भागवत यांकडे वारंवार प्रमादरपूर्वक अवलोकीत असतां मला कालिदासाच्या पुढील श्लोकाची आठवण होते:—

**रूपं तदोजस्वि तदेव वीर्यं तदेव नैसर्गिकमुन्नतत्वम् ।**
**न कारणात्स्वाद्बिभिदे कुमारः प्रवर्तितो दीप इव प्रदीपात् ॥**

१९ वेदांतभक्तिपर ५।६ आर्या आतां नमुन्याकरितां दाखवितों:—

**देती दुःखचि धनसुतदारसदनआप्त, जाति सोडून,**
**हें प्रथम विचारावें कीं लाभ अशांसि काय जोडून? ॥ ४२ ॥**

**सुख असक्त असुनिही प्रकृतींत जसा जळांत बा! सविता ।**
**दीपक अलिप्त जैसा अरि सर्वां सर्व अर्थ भासविता ॥ २३९ ॥**

बाहेरि निघे विद्वान् सर्वहि संशय समूळ तोडून।
स्वप्नांसि जसा जागृत, हा देहादिप्रपंच सोडून॥ २४१॥
वस्तुविचार दृढ करुनि देहाद्यध्यास करिल जो दूर।
सर्वगतीं चिद्रूपीं मन अर्पिल तोचि निश्चयें शूर॥ २४७॥

देहादि सर्व मिथ्या, साक्षी ब्रह्मस्वरूप हा जीव।
येतें असें अनुभवा द्रवतां गुरुराजपादराजीव!॥ ३२८॥

श्रीकृष्ण उद्धवास भक्तिसाधन सांगतातः—

भक्तिसुखार्थ मन मला अर्पावें, सर्व काम सोडावे।
जे मद्भजनविरोधी सुखभोग तयांसि हात जोडावे॥ ३७७॥
वाहत जावीं कर्में, मजला मन चित्त मजचि अर्पावें।
माझ्या यशोमृतानें साधुजना आपणांहि तर्पावें॥ ५६८॥
मोदितचित्त असावें, फार दिसावें प्रसन्न बाहेर।
गंभीरतेसि अभ्यंतर तों केवळ मुलीस माहेर!॥ १७८॥
मोह झडे, काळ दडे, निर्मळ मद्भक्तिरूप धर्म घडे।
मग मत्प्रसाद होतां जें परमज्ञान तें गळांचि पडे॥ ३१०॥

२० बाराव्या स्कंधांत भागवतसंहितेचा उपसंहार केला आहे. त्यांत मुख्यतः कलिप्रभाववर्णन पाहण्यासारखें आहे. अध्यात्मरामायण, भागवत वगैरे संस्कृत ग्रंथांत, व नामदेव, तुकाराम, श्रीधर, महीपति, इत्यादि मराठी संतांच्या उद्गारांत जागोजाग कलिराजाच्या लीला वर्णिल्या आहेत. साधुमतांनीं आपापल्या काळच्या लोकस्थितीचें चित्र आपापल्या ग्रंथांत वठविलें आहे. सध्यांची स्थिति पूर्वस्थितीहूनही भयंकर झाली आहे. गेल्या शंभर वर्षांत आमच्या आर्यसमाजाची हरएक बाबतींत जी अधोगती झाली आहे ती प्रत्यक्ष पाहून व भरतखंडांतल्या प्राचीनकाळच्या स्थितीशीं तिची तुलना करून पाहतांना दुःखावेगानें ज्याला जबर मूर्छा येणार नाहीं तो यतिपति किंवा पशुपति असला पाहिजे! साधुसंतांनीं वर्णिलेल्या गोष्टी ह्मणजे धर्मग्लानी, नीतिभ्रष्टता, विषयैकपरता, वर्णाश्रमधर्महानि, वगैरे वाढत्या प्रमाणावरच आहेत, पण याशिवाय कित्येक गोष्टी—की ज्या त्यांच्या ध्यानींमनींही आल्या नसतील—त्या आज राजरोस प्रत्यक्ष दिसत आहेत! वरिष्ठजातींतही मद्यमांसाचें बंड राजरोस वाढत आहे, ब्राह्मण आपल्या उच्चतम स्थितीपासून घसरगळले आहेत व अन्यजाती त्यांचा द्वेष व मत्सर करीत आहेत, सर्वच वर्ण शूद्रप्राय झाले आहेत, ब्राह्मणांचा

बडेजाव होत आहे, कपटविद्या फैलावत् आहे, निर्मळ शुचिता विलयास जाऊन दांभिकपणाचा डौल करण्याचें कसब वाढत आहे, अठरापगड जाती कुलजातिधर्मविमुख होऊन आंतून कीड लागल्यासारख्या दिसत आहेत, सांप्रदायिक व परंपरागत आचारविचारांची व आहारविहारांची टीप व शुद्धता मोडत चालली आहे:—पण मीं हें काय लिहीत आहे! पंत कलियुगवर्णनांत स्वतः काय ह्मणतात तेंच पाहूं या:—

**तेव्हां महत्वकारण वित्तचि, बळ तेंचि धर्मनयहेतु, ।**
**दांपत्यकारण रुचिच होईल, मोडेल सर्वही सेतु ॥ २८ ॥**
**वाडवपण तें सूत्रचि, पंडितपण फार बोलणें मात्र, ।**
**साधुत्वहेतु दंभचि, अधनत्व नया पराभवा पात्र, ॥ २९ ॥**
**सुरुचिरता केशांचें धारण, तें तीर्थ दूर जें तोय, ।**
**पुरुषार्थ उदरभरणाचि, धृष्टत्वचि सत्य कलियुगीं होय ॥ ३० ॥**
**वार्ता धर्मनयांची न रुचेलचि, होतिल प्रजा दुष्टा, ।**
**रुष्टा, लुब्धा, क्षुद्रा, ज्यांची न असेल मति कधीं तुष्टा ॥ ३२ ॥**
**नष्टायु अर्ध जगतिल जन वर्षे वीस फार कीं तीस ।**
**क्षीणा प्रजा, बुडवितिल दुर्भिक्ष, व्याधि, चोरटे, तीस ॥ ३४ ॥**
**देहनशोधनपोषण, कपटव्यवहार सर्व ही उलटा ।**
**मुल टाकितिल, पतिकथा किति मग? बहु होतिल स्त्रिया कुलटा ॥'५२**

२१ अशी अवनति कोठपर्यंत चालणार? शंभलग्रामीं धर्मस्वजनत्राणार्थ प्रभूचा अवतार होईल व

**तेजानें, सत्तेनें, प्रभुदेहाच्या सुपुण्यगंधानें, ।**
**होतील शुद्ध चित्तें सर्वजनांचींहि तदनुसंधानें ॥ ३९ ॥**
**वारि जसें पंकातें, अमृतकराचें जसेंचि तापातें, ।**
**रविचें जेंवि तमातें, प्रभुचें दर्शन हरील पापातें ॥ ४० ॥**
**सुख व्हाया जीवाला वर्णाश्रमधर्म जो जसा पहिला ।**
**सर्व प्रवर्तवाया, न्यायें पाळावया पुन्हा महिला ॥ ४१ ॥**

हें पुढें होईल खरें, पण तेथपर्यंत लोकांना तारण काय? या भवसागरांतून मुमुक्षूंना परतीरीं नेणारी नौका कोणती? पंत ह्मणतात:—' भस्मचि होती कळिचे दोष सकळ कृष्णकीर्तनें जाण!' जन्ममृत्यूवर रामबाण औषध म्हणजे भगवद्यश होय. त्या भगवद्यशाची महती गाण्यासाठीं भागवतसांप्रदायाचा अंगीकार आमच्या साधुसंतांनीं केला, नामस्मरणाचा **महिमा वाढविला, पंढरी, आळंदी, देहू, सज्जनगड, पैठण वगैरे क्षेत्रीं भक्ति-**

पंथाच्या पताका उभारून, व कळिकाळाला दरारा उत्पन्न करण्यासाठीं हरियशाचा डांगोरा पिटून, जीवमात्राला आनंदविण्यासाठीं भगवन्नामाचा जयजयकार केला! संत ह्मणजे प्रत्यक्ष भगवंत. गेल्या आठशें वर्षांत साधुसंतांनीं कळिप्रभावाला अवरोध करण्यासाठीं नामप्रताप गाजविला. अशा भयंकर कळिप्रतापाला दाबून टाकण्यासाठीं ज्या संतांनीं कंबर बांधिली, विस्कळित होणाऱ्या आमच्या समाजाला सांवरून धरिलें व पंढरीनाथाच्या कृपाछत्राखालीं भक्तिमार्गाची भव्य व अभंग इमारत बांधली ते संतच आह्मां पतित जीवांचे मायबाप, गुरु, धर्म,—सर्वस्व आहेत. भगवंता! हा भागवतधर्मसेतु अखंड सुखरूप राहो!!

२२ कोणत्याही सत्कार्याला मनुष्यानें हात घातला कीं त्याला विलक्षण उल्हास वाटत असतो. ही उत्साहवृत्ति कार्यारंभापासून कार्यसमाप्तिपर्यंत सारखी असते. फार काय, पण सत्कार्याच्या स्फूर्तीबरोबरच उत्साह, उल्हास, आनंद, उत्पन्न होतात व सत्कार्य तडीस गेल्यावरही बहुत काळपर्यंत त्या उल्हाससागराच्या लाटा हृदयतटावर येऊन आदळत असतात. मनुष्यानें नेहमीं सत्कृत्य कां करीत असावें या प्रश्नाचें उत्तर यांतच आहे. सत्कृत्य करीत राहिल्यानें मनाला निरंतर उल्हास वाटत असतो; शुद्ध व उदात्त विचार मनांत नेहमीं खेळत असल्यामुळें कुकल्पनांना वावच मिळत नाहीं, अंतर्यामीं एका अद्भुत पण केवळ अनुभवगम्य अशा अमृतमय सुखाचा नित्य झरा वाहत असतो, व एकंदरीनें सत्कार्यांत सदा दंग राहिल्यानें आयुरारोग्याची सौख्यावरोबरच वाढ होते! पंतांच्या मनांत आपण आपल्या आयुष्याचा सद्व्यय करीत आहोंत असा उत्साहजनक विचार नित्य येत असे. सद्ग्रंथसेवन, सद्ग्रंथग्रथन, व भगवत्पादार्चन यांत त्यांचें सारें आयुष्य गेलें. काव्यरचनाप्रसंगीं भगवंत अंतर्यामीं राहून आपणास शुभ प्रेरणा करीत आहे, त्यानें आपल्या दयेचा शेला आपल्याला पांघुरविला आहे, त्याचा प्रसाद आपणावर झाला आहे, अशा प्रकारचा पंतांचा दृढविश्वास होता व तो वयोपरत्वें दृढ होत जाऊन आपल्या देहाचें सार्थक होऊन आपण लोकत्रयांत धन्य झालों असें त्यांना वाटलें. असा आत्मप्रत्यय सर्व थोर पुरुषांना पुढें पुढें येत असतो. पंतांनीं महाभारताचें मराठी रूपांतर केल्यावर त्यांना धन्यता वाटून आपल्या आईबापांचें व्यासांच्या आईबापांशीं बरोबरीचें नातें लावून त्यांनीं पर्यायानें आपण व्यासासारखी कामगिरी बजावली असें सुच-

विलें आहे! आणि खरेंच आहे. मनुष्याला एखादें लहानसें काम तडीस गेल्यावरही कृतकृत्यता वाटते. मग एक लक्ष ग्रंथाचा सारांश मराठींत १८००० आर्यांत आणल्यानंतर त्यांना धन्यता कां वाटूं नये? पण ही धन्यता ज्या प्रकारची आहे त्यापेक्षां अगदीं निराळ्या प्रकारची धन्यता त्यांना भागवतग्रंथसमाप्तीनंतर वाटली. पहिल्यांत थोडी तरी लोकेषणा होती, पण दुसऱ्यांत शुनिर्मल भगवद्यश वर्णून भगवद्दयापात्र झाल्याबद्दल त्यांना परम हर्ष झाला आहे. भागवतरचनाकालीं पंतांची बुद्धि परिणत झाली होती, ती सर्व ऐहिक विकारांपासून निर्मुक्त झाली होती, खुद्द व्यासांचीं—वेदांतसूत्रें व महाभारत रचल्यावरही—अवशिष्ट राहिलेली तळमळ भागवतानंतर नाहींशी झाली. असाच प्रकार पंतांचाही झाला आहे. श्रीकृष्ण अद्भुतलीला करणार व श्रीव्यास त्या गाणार! मग त्यांची गोडी काय वर्णावी? पंतांना भागवतरचनाकालीं व नंतर जी प्रसन्नता व जो आनंद झाला तसा पूर्वी कधींही झाला नव्हता. श्रीकृष्णयश गातां गातां त्यांना वारंवार परमानंदाच्या उकळ्या येत. कृष्णविजय रचीत असतांना 'भक्तभूषणांत' पंत ह्मणतात:—

**शुकद्विज सुबुद्धि तो पढविलें भलें बोलतो**
**तदुक्तिरस सेवितां रसिक सर्वही डोलतो।**
**नव्हे नवल तें जगीं, नवल हें मयूरद्विजां**
**दिली सुकविता पहा! सदय साधुंनीं हे निजा॥ १०५॥**
**केलें मला अलंकृत शुद्ध स्वयशें करूनि संतांनीं।**
**जैसें श्रीमत्पितर स्वविभूषण अर्पिती स्वसंतांनीं!॥ ११०॥**

'गोपीप्रेमोद्गारांत' कृष्णाला रमाधिक कुब्जा आवडली ही गोष्ट सांगतांना पंत ह्मणतात:—

**आवडलें कुब्जोर क्रीडाया जेंवि तेंवि न रमोर।**
**शुकदेव यश कथाया आधीं, मग लाविलाचि नर मोर!॥११॥**

ही आर्या अत्यंत सरस आहे. कृष्णानें कुब्जेला स्वीकारिलें तसें मलाही प्रभूनें पदरांत घेतलें आहे, हें पंतांना येथें सांगायचें आहे! 'रमा कोठें व कुब्जा कोठें? तसे शुकदेव कोठें व मी नर मोर कोठें? असें असून प्रभूनें माझा स्वीकार केला आहे.' 'अभय दिधलें आहे, वाहे शुचि प्रतिभा झरा!' अशी त्यांना अंत:प्रेरणेवरून खात्री वाटे, व तेव्हां सुद्धां 'मानी सर्व मनोरथद्रुम

फळीं ओथंबले आपुलें ' याप्रमाणें बाल्यापासून उभारलेल्या मनोरथांची सिद्धि होत आहे हें पाहून त्यांना धन्यता वाटे! पंतांनीं प्रथम भागवतांतील निरनिराळीं प्रकरणें घेऊन भीष्मभक्तिभाग्य, वामनचरित्र, अवतारमाला, ध्रुव-चरित्र वगैरे स्वतंत्र काव्यें रचिलीं व हीं सर्व झाल्यानंतर संपूर्ण भागवत स्वतंत्रपणें मंत्रांकित करण्याची त्यांना इच्छा झाली. पहिल्याच स्कंधांतल्या नवव्या अध्यायाच्या आधारें त्यांनीं 'भीष्मभक्तिभाग्य' रचिलें त्यांत त्यांनीं ह्मटलें आहे, ' शुक भाषणानुकार प्रेमें करितो मयूर, हें चित्र ! ' याच सुमारास त्यांनीं विठ्ठलविज्ञापना केली तींतही ' शुकसा मोरहि तुझें लागला यश गावया ' याप्रमाणें त्यांनीं आश्चर्य प्रकट केलें आहे! मंत्रभागवताचा प्रथम स्कंध होतांच 'दिसतें दयाघना ! बा मोराचें भाग्य या जनीं मोठें!' असें त्यांना वाटलें. या आनंदाश्चर्यांच्या उद्गारांवरून पंतांना भागवताची किती महती वाटत असे व शुकाचार्यांबद्दल त्यांचा किती पूज्यभाव होता या गोष्टी स्पष्टच दिसतात. पण याशिवाय एवढ्या महत्कार्याला आपण ' सूतउवाच ' केलें आहे याबद्दलच त्यांची त्यांना परमधन्यता वाटलेली दिसते! पंतांनीं भागवताच्या पहिल्या नऊ स्कंधांची एक माळा केली, दशमाची दुसरी व पुढच्या दोन स्कंधांची तिसरी—याप्रमाणें तीन माळा केल्या. या प्रत्येक माळेच्या अखेरीस आनंदोद्गार आहेत ते फारच सुरस आहेत. प्रभूच्या यशोगुणांत गोंवलेली आपली माळा, पंत ह्मणतात ' श्रीकृष्णें स्वगळां स्वयेंचि धरिली, वक्षस्थळीं शोभली. ' भागवतसमाप्तीच्या वेळीं पंत परमोल्हासानें ह्मणतात:—

**देउनि उत्साह मला श्रीभागवतार्थ वदविला साचा।**
**आनंद यापुढें तो तुच्छ ब्रह्मादिपदविलासाचा ! ॥ १ ॥**
**श्रीराम द्रवुनि स्वयेंचि करवी ऐसी नवी योजना,**
**सामग्री अधनासि दे करि धनी त्याच्या गृहीं भोजना ! ।**
**हें काय प्रभुला अशक्य ? हृदया ! कां चित्र भासे तुला ?**
**क्रीडार्थ प्लवगांसि योजुनि रची सिंधूंत हा सेतुला ! ॥ २ ॥**

दयाघनाच्या सगुणलीलांच्या निरतिशय माधुरीपुढें पंतांना ब्रह्मादिपदविलास तुच्छ वाटला हें आमच्या भक्तमंडळींच्या सांप्रदायाला अनुसरूनच आहे. ' नको ब्रह्मज्ञान आत्मस्थितिभाव ! मी भक्त तूं देव ऐसें करीं ' अशी

तुकोबाचीही उक्ति आहे. एकनाथ महाराजांनींही ' सगुणनिर्गुण दोन्ही समान । न्यून पूर्ण असेना ' हा सिद्धांत प्रथम स्पष्ट करून ह्मटलें आहे:—

**विघुरलें तें तूप होये । थिजलें त्यापरीस गोड आहे ।**
**निर्गुणापरीस सगुणीं पाहे । अतिलवलाहे स्वानंदू ॥ १ ॥**

वरील श्लोकांत पंतांनीं धानिक धन्याचा जो दृष्टांत घेतला आहे तो किती हृदयंगम आहे ? ' प्रभूनें प्रतिभा, प्रेम, स्फूर्ति माझ्या हृदयांत उत्पन्न करून माझ्या तोंडून आपल्या लीला आनंदानें ऐकिल्या, मला निमित्तमात्र केलें ' असा या श्लोकार्धाचा भावार्थ आहे. पंतांना वारंवार आश्चर्य वाटे कीं शुकमुखोदित भागवत आपल्या हातून पूर्ण झालें तरी कसें? 'हृदया' कां चित्र भासे तुला ?' असें ते स्वतःशीच बोलतात, व आनंदातिशयानें उचंबळणाऱ्या मनोवृत्ति क्षणभर आंवरून ' वानरांकरवीं सेतू रचणाऱ्या प्रभूला अशक्य काय ?' याप्रमाणें विवेक करितात ! या श्लोकांत ईश्वरी प्रेरणेनें हें महत्कार्य मजकडून झालें, व याबद्दल मला साश्चर्य परम धन्यता वाटत आहे ! ' असें पंतांनीं सांगितलें आहे.

भागवतानंतर पंतांनीं ' तुकारामस्तुति ' केली, तींत ' प्रभुचा प्रसाद अद्भुत, बहुमत केला शुकापरिस मोर ' (१७) असा उद्गार काढला. यावरून पंतांच्या वेळीं सुद्धां पंतांच्या मंत्रभागवताची योग्य किंमत झाली होती व चोहोंकडून पंतांचा जयजयकार होत होता असें दिसतें. ' बहुमत केला शुकापरिस मोर ' ही उक्ति गर्वमूलक आहे असें कोणास वाटेल, पण ती गर्वमूलक नाहीं, केवळ भूतार्थव्याहृति आहे. पंतांचे मित्र रसिकवर्य रामजोशी यांनीं ' वाणी मयूरवदनीं जी न शुकातें द्विजोत्तमा यावी ' अशी पंतांची स्तुति केली आहे, व वामनरावजी ओकांनींही आपल्या टीपांतून जागोजाग असेच उद्गार काढले आहेत. यांत थोडीशी अतिशयोक्ति आहे असें मला चार पांच वर्षांमागें वाटे, पण पंतांनीं भागवतांतून जीं प्रकरणें वेगळीं काढलीं तीं व मंत्रभागवत मूळ भागवताशीं पद्यशः ताडून पाहतां मला असें आढळून आलें कीं, रामजोश्यांचा अभिप्राय अगदीं बरोबर आहे ! मूळ भागवताची योग्यताच फार मोठी आहे, पण पंतांनीं पुष्कळ ठिकाणीं मूळावरही ताण केली आहे, बहुतेक ठिकाणीं मूळांतील अर्थ सुबोध व सरस करून अधिक खुलवून दिला आहे, व एकंदरींत मूळ व पंतकृति यांत चढाओढ

लागेल असाच तिचा उत्कृष्ट परिपाक करून सोडला आहे. प्रस्तुत ग्रंथ रचीत असतांना पंतांना जसा अनुभव आला कीं दीनदयाळ प्रभु ' उत्साह प्रेम देतो, स्वयश जडमुखें आदरें बोलवीतो, ' तसाच—अल्पांशानें कां होईना—पण अनुभव मलाही प्रस्तुत ग्रंथ लिहीत असतांना वेळोवेळ आला, ह्मणून पंतांप्रमाणें ' वाचेनें, चित्तानें देहानें, नित्य हरिपदा नमन,' करून हा भाग संपवितों ! !

---



# प्रकरण एकोणिसावें.



## मोरोपंती रामायणें.

नामातें प्रभुच्या मयूर विनवी, " चित्ता भरीं या भरीं,
श्रीरामायण गाइलें तरि पुन्हां गावेंचि ऐसें करी ! ।
पापाचा परिहार फार बरवा व्यापार हा साधुनी
गावायासि सदैव या मम मुखीं बापा ! रहा साधुनी " ॥ १ ॥

—रम्य मंत्ररामायण.

१ अष्टोत्तरशत रामायणें.
२ मंत्रबद्ध रामायणें ( १–३१ )
३ निरूपणात्मक रामायणें ( ३२–३४ )
४ चित्र रामायणें ( ३५–४४ )
५ विशिष्टनामक रामायणें ( ४५–५९ )
६ विविधवृत्तात्मक रामायणें ( ६०–७४ )
७ अस्थानप्रकाशित रामायणें ( ७५–७७ )
८ अप्रसिद्ध रामायणें ( ७८–८८ )
९ मोरोपंती रामायणांवर विद्वानांचे अभिप्राय.
१० उपसंहार.

---

## १ अष्टोत्तरशत रामायणें.



प्रस्तुत प्रकरणांत पंतांच्या रामायणांबद्दल विचार करावयाचा आहे. हीं रामायणें 'अष्टोत्तर शत' आहेत अशी पंतांच्या वेळेपासूनच सर्वांची समजूत झालेली आहे, पण तीं नक्की किती आहेत याचा विचार मात्र कोणीं केला नाहीं. पंतांचे समकालीन मित्र रामबडवे यांनीं पंतस्तवनांत ' अष्टोत्तरशत केलीं जेणें रामायणें पृथग्रस तीं ' असें ह्मटलें आहे. खुद्द पंतांनीं मैराळबुवांस लिहिलेल्या एका पत्रांत ' भारतांतील मुद्दा लहान मोठी याद पाठवावी.

अष्टोत्तरशत संख्या जाहली पाहिजे ' असें ह्मटलें आहे, यावरून दोन गोष्टी स्पष्ट दिसतात. एक, पंत रामायणें लिहीत गेले व त्यांच्यापाशीं त्यांची मोजदाद नव्हती; मात्र पुष्कळशीं रामायणें लिहून गेल्यानंतर ही संख्या अष्टोत्तरशत ह्मणजे १०८ असावी असें त्यांस वाटूं लागलें. दुसरें, ही संख्या पुरती व्हावी ह्मणून त्यांनीं भारतांतील सुद्धां लहानमोठ्या रामायणांची त्या संख्येंत गणना करण्याची परवानगी दिली. आतां ही संख्या निश्चित किती आहे हें पाहूं. निबंधमालेच्या ६२ व्या अंकांत मोरोपंती ह्मणून ९४ रामायणांची एक याद एका गृहस्थानें प्रसिद्ध केली होती. त्या विचित्र यादींत व्यासवाल्मीकांचीं रामायणें व आनंद-रामायणासारखीं दुसरीं संस्कृत रामायणें सुद्धां जमेस धरिलीं आहेत ! असो. मोरोपंतांचीं आलीं गेलेलीं पत्रें, मेराळबोवांच्या यादी, पंतांच्या घरच्या १८५५ च्या विभक्तिपत्रांतल्या यादी, काव्येतिहाससंग्रह, मयूरकवि, काव्यसंग्रह, वगैरे मासिकांत छापलेलीं रामायणें व त्यांवर आजपर्यंत झालेल्या चर्चा यांचा कसोशीनें विचार करून मीं पंतरामायणांचा विचार केला आहे. आजपर्यंत एकंदर ७४ रामायणें छापलीं आहेत, त्याबद्दल पुढें विशेष विवेचन करण्यांत येईलच. या ७४ रामायणांशिवाय आणखीही कांहीं रामायणें छापून निघालीं आहेत, पण तीं चुकीनें काव्यसंग्रहकारांनीं भलतीकडेच छापलीं आहेत. काव्यसंग्रहांत स्फुटप्रकरणांत आर्यागीतिमुक्तामाला, रामप्रार्थना व मुक्तामाला ( संस्कृत ) हीं तीन प्रकरणें स्फुट ह्मणून छापलीं आहेत, पण तीं पंतयादी व चातुर्मास्ययादी यांवरून व आंतील मजकुरावरून निःसंशय रामायणेंच ठरत आहेत. ह्मणजे एकंदर ७७ रामायणें आजवर छापलीं आहेत. याशिवाय पंतांच्या व चातुर्मास्यांच्या दप्तरीं १० रामायणें आहेत, पण तीं आजवर प्रसिद्ध होण्याचा योग आला नाहीं. तीं हीं ( १ ) स्रग्विणी रामायण ( २ ) दंडकरामायण. ( ३ ) श्रीरामनामाष्टोत्तरशत रामायण. ( ४ ) श्रीरामायण उर्फ शिखरिणीरामायण. ( ५ ) तन्वी रामायण. ( ६ ) मंच

१ पंतांनीं ' भारतांतील वगैरे लहान मोठ्या रामायणांची ' ही गणना करण्यास परवानगी दिली आहे, त्याप्रमाणें अवतारमालांतर्गत रामायण, सीतागीत उर्फ अभंग रामायण, भारत-वनपर्व रामायण ( अ० १०।११।१२ ) व भागवत नवमस्कंध रामायण हीं आणखी चार रामायणें पाहिजे तर जमेस धरावीत ! पण हीं दांतकोरणीं केल्याशिवायही इष्ट संख्या भरते आहे !

रामायण. ( ७ ) प्रहर्पणरामायण. ( ८ ) मंजु रामायण. ( ९ ) छंदो-रामायण. ( १० ) एकपदी रामायण व ( ११ ) याचें नांव नाहीं. हें त्रुटित आहे. हीं अकरा रामायणें छापलीं गेल्यास ८८ रामायणें काळाच्या तडाख्यां-तून आज वांचलीं असें ह्मणतां येईल. आणखी कांहीं रामायणें पंतांनीं रचिलीं याबद्दल पत्रें व चित्र्याचपाध्यांवरून शंकाच वाटत नाहीं, पण दुर्दैवाची गोष्ट ही कीं तीं बहुधा यापुढें सांपडण्याचा संभव नाहीं. मैराळबावा चातुर्मासे हे ( पृ-१२४-१३५ ) पंतांच्या हातच्या रामायणांच्या अस्सल प्रती नकला करून घेण्यासाठीं अनव्यास जात होते. अजिंठ्याच्या घाटांत चोरांनीं त्यांस गांठले व लुटलें. चीजवस्त नेली व दप्तरें उधळून घाटाखालीं टाकून दिलीं. त्यांत कांहीं पंतरामायणें गेलीं. मैराळभाऊंनीं दुसऱ्या दिवशीं घाटाखालीं उतरून फार तपास केला कांहीं पत्रें सांपडलीं व कांहीं अज्ञात सागरांत कायमचीं बुडालीं! या गोष्टीला मैराळभाऊंच्या व पं-ताच्याही पत्रांत आधार आहे. दोघांसही याबद्दल फार दुःख झालें. वृद्धपणीं केवळ श्रीरामपदपद्मप्रसादार्थ पंतांनीं रामचरित्रें विविध छंदांत अने-कवार गाण्याचा विलक्षण उद्योग केला. महाराष्ट्रभाषेंत नाथांचें भावार्थ-रामायण अगोदरच लोकमान्य झालेलें होतें व श्रीधराचा रामविजय खेडो-पाडीं लोकांच्या वाचण्यांत येत होता. समर्थकृत रामायणाचीं तीन कांडें शिवरायांच्या वेळेपासून महाराष्ट्रांतल्या सर्व किल्ल्यांवर लढवय्ये लोक वा-चीत असत. तुळशीदासाचीं सात रामायणें उत्तर हिंदुस्थानांत प्रसिद्ध आ-हेतच. वारकरी सांप्रदायांत नाथांचें भावार्थरामायण वाचण्याचाच फार प्रघात आहे. रामकथा आधीच गोड, तशांत ती हाडाचे रामभक्त गाऊं लागतात तेव्हां गोडच गोड होऊन जाते. ग्रहगणांत जसा सूर्य, नक्षत्रांत जसा चंद्र, पु-ष्पांत जसें कमळ, वृक्षांत जसा कल्पवृक्ष, तसें काव्यांत रामायण होय! रा-जनीति व धर्मनीति यांची ती केवळ खाण आहे. दशरथ, कौसल्या, राम, भरत, शत्रुघ्न, लक्ष्मण, बिभीषण, सुग्रीव, अंगद, हनुमान्, व सीता यांच्या चरित्रांत समाजनीति व कुटुंबनीति कशी चोखट दिसते. सत्यप्रतिज्ञत्व, पितृ-भक्ति, एकपत्नीव्रत, बंधुप्रीति, स्वामिभक्ति, लोककल्याणकारित्व इत्यादि लो-कोत्तर व दिव्य गुणांचे धडे ह्या परमपवित्र ग्रंथांत जसे घ्यावयास सांपड-तात तसे अन्यत्र कोठेंही सांपडत नाहींत. ' पीयूषाहुनि शतगुणें रामाचें यश गोड ' असें पंत ह्मणतात तें खरें आहे. पंत हाडाचे सगुणोपासक,

त्यांत रामोपासक. रामप्रसादार्थ त्यांनीं एकच रामकथा भिन्न भिन्न तऱ्हेनें गाऊन रामकथेंतील नीतितत्वें अगदीं स्पष्ट करून दाखविलीं आहेत व रामकथा गातां गातां चित्तशुद्धि होऊन जो दिव्य आनंद होतो तोही स्वानुभवावरून त्यांनीं सांगितला आहे. पंतांच्या रामायणांचे सोईसाठीं त्यांचे सात वर्ग मीं करितों. ( १ ) मंत्रबद्ध रामायणें. हीं ३१ आहेत. यांत राममंत्र बऱ्याच रामायणांत साधले असून बाकीच्यांत देव, तीर्थ, व संत इत्यादिकांचीं नांवें गुंफलेलीं आहेत. विष्णुसहस्रनामावळीच्या प्रत्येक शंभर नामांत एकेक रामायण साधलें आहे! ( २ ) निरूपणात्मक रामायणें. हीं तीन आहेत. रामलक्ष्मणादिकांनीं जनकादि गुरुजनांस सांगितलेलें गुरुरामायण, सीतेनें आपल्या बहिणींस सांगितलेलें सीतारामायण व हनुमंतानें अंजनीस सांगितलेलें हनूमद्रामायण. ( ३ ) चित्र रामायणें. हीं दहा आहेत. परंतु रामायण, ओवीरामायण, लघुरामायण, दीर्घरामायण, लघुदीर्घ असें सौम्यरामायण, मात्रारामायण, निरोष्ठरामायण, अश्वधाटीवृत्तांतलें कविप्रिय रामायण, विचित्र रामायण, व डामररामायण अशीं दहा रामायणें ह्या सदरांत येतात. ह्या सर्वांच्या रचनेंत विचित्रपण असून त्यामुळें हीं कांहींशीं चित्रकाव्यांत अर्थात् अधमकाव्यांत मोडावीं लागतील. ( ४ ) विशिष्टनामक रामायणें हीं १२ आहेत, ह्यांच्या नांवांचें औचित्य लक्षांत येत नाहीं. ( ५ ) विविधवृत्तांतलीं रामायणें १५ आहेत. ( ६ ) अस्थानप्रकाशित रामायणें ३ आहेत. हीं वस्तुतः रामायणें असून काव्यसंग्रहकारांच्या नजरचुकीनें भलतीकडे लावलीं गेलीं आहेत. ह्याशिवाय पंतगृहीं व चातुर्मासे बोवांच्या वाड्यांत अस्तित्वांत असलेलीं पण आजवर छापलीं न गेलेलीं अशीं ११ रामायणें आहेत. ह्मणजे पंतांच्या अष्टोत्तरशत रामायणांपैकीं आज मित्तीस ८८ रामायणें विद्यमान आहेत. बाकीचीं बहुधा काळानळांत भस्म झालीं आहेत व इतउप्पर उपलब्ध होण्याचा संभव फारच कमी आहे. पुण्याच्या मराठी शालापत्रकांत ( इ. स. १८९१चा नोव्हेंबरचा अंक ) नागपूरच्या कै० हरि माधव पंडित ह्या नामांकित मयूरभक्तानें मोरोपंती रामायणांच्या नांवांची शहानिशा करण्यासाठीं एक मार्मिक लेख लिहिला होता. त्यांत ते ह्मणतात. " नामकरण हा संस्कार आनंदाचा सर्व देशांत मानला गेला आहे. गुणानुरूप नामकरण करण्याची जेथें सवड असते त्या ठिकाणीं तर नांव ठेवणाराचें मार्मिकत्व, दूरदर्शित्व व सहृदयत्व हीं दृष्टिगोचर होतात. हा नामकरण विधि जनकजननी-

कडेच सर्वदा असतो असें नाहीं. बहुधा तो आप्त, इष्ट, व सुहृद् यांजकडे च करण्याचें येतें. " ह्याप्रमाणें उपोद्घात करून पंडितांनीं असें प्रतिपादन केलें आहे कीं " १०८ रामायणांना निरनिराळीं नांवें ठेवण्याची पंचाईत पंतांना पडली असावी व त्यांच्या रसिक मित्रांनीं तीं नांवें ठेवलीं असवींत! इ. स. १८९१ सालापर्यंत पंतांचीं ७५ रामायणें छापलीं होतीं, त्यांपैकीं १५ वर मात्र पंतांनी स्वत: नांवें दिलीं आहेत व ४४ रामायणांवर अनुष्टुप् श्लोकानें केलेले नामनिर्देश पंतांचे स्वतःचे नसून दुसऱ्या कोणी मागाहून घुसडले असावेत. पंतांसारखा काटेकोर, खुबीदार, व प्रचंड ग्रंथ लिहिणारा कवि असा एकच चमत्कृतिहीन श्लोक करून संतुष्ट राहिला असेलसें संभवत नाहीं " पण मला वाचकांस कळविणें योग्य दिसतें कीं पंतलिखित पोथ्यांत सदर अनुष्टुपी श्लोक खुद्द पंतांनींच रचून लिहिलेला आहे. सर्वच रामायणांत हा नाहीं, एकाद्या रामायणांत पंतांचें नांव दोनदोनदां आलें आहे. पण ह्या प्रकारावरून कसलेंही अनुमानें काढायला धांवणें युक्त नव्हे. कवीलाही कांहीं तब्येत असतेच कीं नाहीं! ते पुष्कळदा लहरी असतात. पंतांच्या रामायणांची संख्या ८८ झाली आहे खरी, तथापि पंतांनीं रचलेलीं असूनही नष्ट झालेलीं कांहीं रामायणें जमेस धरलीं पाहिजेत. चिठ्याचपाट्यांत व पत्रांत कोठेंही न छापलेल्या अशा हरामायण, कडव्यांचें रामायण, दिंडी रामायण दास रामायण, सत्य रामायण, हव्य रामायण, धन्य रामायण, धर्म रामायण, इत्यादि अनेक रामायणांचा वारंवार उल्लेख आढळतो. एकंदर पंतांनीं रामायणांची सांगता रामप्रभूच्या चरणकमळांवर वाहिली यांत कांहीं शंका नाहीं.

---

## २ मंत्रबद्ध रामायणें. ( १–३१ )

मोरोपंतांनीं पस्तिशीच्या सुमारास प्रथम (१) **'मराठी मंत्र रामायण'** रचिलें, तेव्हां आपल्या हातून पुढें रामायणांची अष्टोत्तरी निर्माण होणार आहे याची त्यांना कल्पनाही नसेल! मंत्ररामायणाबद्दल मागें १२व्या प्रकरणांत विवेचन केलेंच आहे. त्याच नमुन्यावर सातही कांडांत चढत्या अक्षरांत त्रयोदशाक्षरी मंत्र साधून ( वाल्मीकिप्रमाणें ) आपणही संस्कृत भाषेंत एक रामायण रचावें अशी त्यांना पुढें ७८ वर्षांनीं इच्छा झाली.

हें (२) **संस्कृत मंत्ररामायण** पंतांचें दुसरें होय. नामरसायनांत (आर्या ११६) अनंत पाध्ये यांना आपली कविता दाखविल्याबद्दल पंतांनीं उल्लेख केला आहे, व अनंत पाध्ये हे शके १६९६ मध्यें कैलासवासी झाल्या-बद्दल पाध्ये प्रकरणांत सिद्ध केलें आहे. यावरून शके १६९६ च्या पूर्वी कांहीं वर्षें—चार दोन तरी—पंतांचीं काव्यरचना नामरसायनापर्यंत आली होती असें ठरतें. नामरसायनानंतर लागलीच ह्म. शके १६९३ च्या सुमारास पंतांच्या ४२ व्या वर्षी—पंतांनीं संस्कृत मंत्ररामायण रचिलें असावें. नामरसायन रचतांनाच संस्कृत मंत्ररामायण रचण्याविषयीं पंतांच्या मनांत विचार घोळत होते, असें रसायनांतल्या दोन तीन आर्यांवरून वाटतें. "रुचि रघ्वीश्वरचरितीं सतत असो' सुवर दे असा रुचिर" (७४) असा पंतांनीं आर्यीं मारुतीजवळ वर मागितला आहे; पुढें 'प्रिय तन्नामचि मज जरि, तरि चिंतित कार्य एकदा साधो" (८०) असें ह्मटलें आहे; व या चिंतित कार्याचा खुलासाः—

**श्रीवाल्मीकिमुनीश्वर वाखाणी विजय तो जसा देवा।**
**तच्छिष्य मीहि भावें वर्णीन तुह्मांसि, हे घडो सेवा॥ १०२॥**

या प्रमाणें केला आहे. या तीन उल्लेखांवरून पंतांनीं नामरसायनानंतर लवकरच संस्कृत मंत्ररामायण हें दुसरें रामायण रचिलें असावें असें वाटतें. या संस्कृत मंत्ररामायणावरून पंतांचें संस्कृत भाषानैपुण्य चांगलेंच सिद्ध होतें. हें अर्थात् अनुष्टुभ् वृत्तांत रचिलें आहे. याची श्लोकसंख्या जवळ जवळ चार हजार आहे! पंतांनीं पद्यसंख्या बरोबर मोजूनच दिली आहे. 'अक्षिबाणांकशिखिभिर्विज्ञेया श्लोकसंमितिः' यावरून 'अंकानां वामतो गतिः' या न्यायानें ही संख्या ३९५२ होते. यालाही गोड उपोद्घात व उपसंहार आहेत. मंगलाचरणांत राम, सीता व वाल्मीकि यांना नमन केलें आहे:—

**श्रीरामं मुदिरश्यामं वंदेहं देवनायकम्।**
**सदा वदान्यप्रवरं प्रणतेप्सितदायकम्॥ १॥**
**राकापतिमुखीं देवीं वंदे सीतां महासतीम्।**
**यस्याः सद्व्रतसामर्थ्याच्छमिता अमिता द्विषः॥ २॥**
**मनोज्ञं रामचरितं येन गीतं सविस्तरम्।**
**वाल्मीकिं तमहं वंदे मंदेष्टशतसाधकम्॥ ७॥**

पंतांनीं संस्कृत काव्यांतही मराठीप्रमाणें सफाईनें शब्दचमत्कार साधले आहेत. हा ग्रंथ सुबोध पण प्रौढ, काव्यरूप पण भक्तिपर असा आहे.

संस्कृतज्ञ भाविक लोक वाल्मीकिरामायण, अध्यात्मरामायण, आनंदरामायण वगैरे प्राचीन काव्यांवर आपली तृषा भागवितात; पण पंतकृत रामायणाकडे कां पहात नाहींत कोण जाणे. हें पंतकृत मंत्ररामायण वस्तुतः संस्कृतज्ञांना आवडावें, कारण हें बहुधा वाल्मीकिमुनीच्या शब्दांनीं रचलेलें असून शिवाय मंत्रघटित आहे. पंत जाडे संस्कृत पंडित होते, तरी बुद्धिबळाच्या खेळाडूंना रंजविण्यासाठीं व त्यांची वाहवा मिळविण्यासाठीं त्यांनीं लेखणी हातीं धरली नाहीं. स्वचित्तशुद्धिद्वारा भगवत्प्रसाद जोडणें हाच प्रधान हेतु मनीं धरून पंतांनीं काव्यरचना केली आहे. पंतांनीं शेवटच्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें 'आद्यकवि वाल्मीकिनिर्मित जें सत्काव्योपवन' त्यांत मुखानें संचार करितांना जीं 'अतिरम्य पद्यकुसुमें' त्यांना सांपडलीं तीं वेंचून त्यांची राममंत्ररूपी सूत्रांत माळ ओवून ती जगद्‌गुरु श्रीरामाच्या पदकमळांवर त्यांनीं समर्पण केली आहे! वस्तुतः माळ प्रभुकंठांत घालायची; पण पंतांनीं ती प्रभुपदाब्जांवर वाहिली आहे! यांत औचित्यभंग झाल्याची शंका वामनरावजी ओकांस आली! मला वाटतें हा औचित्यभंगच मोठा भक्तिरसोत्पादक झाला आहे. श्रीविठ्ठलमूर्तीला पाहतांच देहभान विसरून चोखामेळ्यानें चुकून केळांचीं टरफलें प्रभूच्या मुखांत घातलीं, व प्रभूनेंही औचित्यानौचित्याचा पळभरही विचार न करितां प्रेमभरानें व प्रसन्न हृदयानें तोंड पुढें ओढवून तीं खाल्लीं; किंवा शबरीनें आपल्या शुद्र दांतांनीं चावलेलीं उच्छिष्ट फळें श्रीरामप्रभूच्या मुखांत घातलीं व त्यानेंही तीं अत्यादरानें भक्षिलीं; त्याप्रमाणेंच प्रभुदर्शनोत्सुक व निरंतर प्रभुपादार्पितदृष्टि अशा भक्तमयरानें तीनशें चार मंत्रमय गीर्वाणसुमनांची माळ प्रहर्षातिशयामुळें धादलीनें नित्यध्यायिलेल्या प्रभुपदांवर वाहिली व प्रभूनेंही तिचा यथायोग्य स्वीकार केला!! पतिप्रथमसंगमीं नवयुवति सतीची त्रेधा उडून जाते व अनभिज्ञतेमुळें तिच्या हातून प्रमाद होतो, तथापि तो रसोत्कर्षक असल्यामुळें पतिहृदयाला आनंदवितो, त्याप्रमाणें प्रभुदर्शनसमयीं देहभावाला विसरणारा प्रभुभक्त क्वचित् अनुचित क्रिया आचरतो, तथापि प्रभूच्या संतोषांत किमपि न्यून होत नाहीं! असो, पंतांनीं वाल्मीकिरामायणांतलीं कांहीं पदें, श्लोकार्ध किंवा संपूर्ण श्लोक घेऊन व टीकेंतलीं कांहीं पदें घेऊन, तीं मंत्रांत गुंफून प्रस्तुत सरस संस्कृत ग्रंथ निर्माण केला आहे. हा ग्रंथ अर्थात् वाल्मीकिरामायणाइतका सुलभ झाला नाहीं, तथापि कृष्णविजयाच्या

पूर्वार्धापेक्षां पुष्कळ सुलभ आहे! कथावर्णनाचा ओघ व थाट थेट मराठी मंत्ररामायणासारखाच असल्यामुळें व कांहीं नवीन सांगायचें नसल्यामुळें उतारे देऊन ज्यास्त जागा अडवीत नाहीं. या संस्कृत मंत्ररामायणाहून पंतांचें मराठी मंत्ररामायण भाषा, वर्णनशैली व मनोहारित्व या दृष्टीनें विचार करितां अधिक सरस उतरलें आहे असें मला वाटतें. पंतांना बाबापाध्यांनीं संस्कृत काव्यें करण्याविषयीं प्रोत्साहन यानंतर दिलें, तथापि पंतांनीं आधींच संपन्न असलेल्या गीर्वाणवाणीच्या प्रसाधनार्थ आपलें बुद्धिवैभव खर्चे न करितां गरीब बिचाऱ्या महाराष्ट्रवाणीच्या अभ्युदयार्थ तें खर्चायचा निश्चय कायम ठेवला हें चांगलें झालें. हा मार्ग मराठी भाषा व मोरोपंत या उभयतांच्या क्षेमवृद्धीस व कीर्तिप्रसारास अत्यंत पोषक झाला यांत संशय नाहीं. मोरोपंतांमुळें मराठीभाषेची योग्यता वाढली व मराठी भाषेंत काव्यरचना केल्यामुळें पंताच्या बुद्धिवैभवाचें सार्थक झालें.

संस्कृत मंत्ररामायणानंतर मध्यें १२।१५ वर्षांचा काळ लोटला. ह्या अवधींत पंतांचा अत्यंत लोकप्रिय राष्ट्रग्रंथ महाभारत याची रचना झाली, पंतभारतांतलीं कित्येक स्फुट आख्यानें सर्व महाराष्ट्रभर पसरून पंतांचा कीर्तिपरिमळ दरवळून राहिला, गांवोगांवच्या हरिदासांनीं कथाप्रसंगीं पंतांच्या आर्या लावावयाचा प्रघात पाडला. पंतांनीं भारतानंतर भागवत रचिलें. याप्रमाणें मंत्ररामायण, महाभारत व मंत्रभागवत, या तीन ग्रंथांतल्या निरनिराळ्या प्रसंगावरचीं स्फुटें, अनेक प्रकारचीं देवतांचीं व संतांचीं स्तोत्रें या या प्रकारचे बहुमोल अलंकार अंगावर घालून पंतांनीं महाराष्ट्र शारदेला सजविलें, तिचें पूर्वीचें दारिद्र्य पार काढून तिला सुसंपन्न केली, तिजसंबंधीं आपलें कर्तव्य आपण बजावलें व आपल्या जन्माचें सार्थक केलें याबद्दल त्यांना धन्यता वाटली. येथपर्यंतचीं काव्यें रचतांना त्यांना कोणा इष्टमित्रांकडून वेळोवेळीं सूचना झाल्या होत्या, तीं काव्यें बाबा पाध्ये किंवा चातुर्मासे बावा यांना दाखवून त्यांच्या पसंतीची पंतांना थोडीबहुत तरी अपेक्षा होती, निर्मल हरियश गातांना 'मद्ग्रंथ असावा बहुमत' अशी कीर्तीची थोडी तरी लालसा होती, पण मंत्रभागवतसमाप्तीनंतर याही उच्चतर वृत्ति मावळल्या व रामपदांबुजीं जडलेलें चित्त त्याचेंच यश पुनः पुनः गाऊन त्याच्याच स्वरूपांत विरघळून जावें व भक्तिसुखलीन होऊन जीवन्मुक्त व्हावें एवढीच वासना त्यांजपाशीं राहिली, व ह्या वासनेच्या आधीन होऊन केवळ

भगवत्प्रीत्यर्थ पंतांनीं अष्टोत्तरशत रामायणांची सोमवती तयार करून रामप्रभूच्या पायीं वाहिली!

'श्रीराम जयराम जयजयराम' हा त्रयोदशाक्षरी मंत्र पहिल्या कांडांत पहिल्या अक्षरांत, दुसऱ्या कांडांत दुसऱ्या अक्षरांत, याप्रमाणें सातव्या कांडापर्यंत चढत्या अक्षरांत मंत्र साधला आहे. असें **मंत्ररामायण** मराठी एक व संस्कृत एक या प्रमाणें दोन रचल्याबद्दल वर लिहिलेंच आहे. अगदीं त्याच नमुन्यावर, तोच मंत्र, तसाच साधून पंतांनीं आणखी पांच रामायणें लिहिलीं आहेत. मराठी मोठ्या मंत्ररामायणाप्रमाणेंच पण लहानसें ह्मणून ( ३ ) **बालमंत्ररामायण** असें नांव दिलेलें एक आर्याबद्ध सप्तकांडात्मक रामायण आहे. यांत प्रत्येक कांडांत तीन मंत्र ह्मणजे ३९ आर्या आहेत. प्रत्येक कांड—मग तें लहान असो वा मोठें असो—बरोबर ३९ आर्यांत, वरील प्रमाणें राममंत्र साधून, आणलें आहे, हाच या रामायणाचा विशेष आहे. मंत्रबद्ध व संख्यापरिमित असूनही हें चांगलें साधलें आहे. कौसल्येनें रामाबरोबर सीतेसही वनांत धाडण्यासाठीं वल्कलें पुढें आणून टाकलीं. त्या संबंधानें लिहितांना पंत ह्मणतात:—

**पय देणारी विष दे, नेसाया वल्कलें पुढें ठेवी।**
**लोभें भ्रमली बहुतचि, अतिकठिना राक्षसीच ती देवी॥ १॥**

असेंच दुसरें ( ४ ) **मंत्रगर्भ साकीरामायण** आहे. प्रत्येक कांड एका मंत्रांत ह्म. १३ श्लोकांत आणलें आहे. याचें वृत्त साकी आहे. हें रामायण फार गोड आहे. 'भावें सद्यश रामाचें। गावें जगदभिरामाचें' हें याचें ध्रुवपद आहे. राम युवराजपदाला योग्य झाला तेव्हांचें त्याचें वर्णनः—

**रात्रिंदिवस सद्गुण रामाचे वर्णिति हर्षें पौर।**
**श्यामलमूर्ति परी यश प्रसवे हरहासाधिक गौरें[1]॥ १॥**
**महदायक[2] राम लहानांतें तेंवि जसा थोरांतें।**
**चंद्र चकोरांतें कीं, जैसा घन चातकमोरांतें॥ २॥**

शबरीसंबंधीं पुढील साकी:—

**उदय होय भाग्याचा, पाहे प्रभुतें, पूजी, शबरी,।**
**भगवत्प्रसाद[3]पात्र न होतां उत्तम जातिहि न बरी॥ ३॥**

१ विरुद्ध कारणापासून कार्याची उत्पत्ति झाली कीं विभावना नामक अलंकार होतो. येथें श्यामल मूर्तिपासून गौर यश निघाल्याचें वर्णिलें आहे ह्मणून हा अलंकार झाला आहे. २ आनंददायक. ३ परमेश्वराच्या कृपेला पात्र.

असेंच तिसरें ( ५ ) **रम्यमंत्ररामायण** आहे. याचा उपसंहार उत्कृष्ट आहे. याचें प्रत्येक कांड एका मंत्रांत ह्म. १३ शार्दूलविक्रीडित श्लोकांत आणलें आहे. उदाहरणार्थ एकच श्लोक पहा:—

**पंपा मन्मथपावकास धमनी झाली प्रभूच्या तदा,**
**त्यातें लक्ष्मण मेघ होय अथवा सद्वैद्य जैसा गदा. ।**
**श्रीरामेंचि अरण्यकांड तिसरा थोड्यांत हा आणिला,**
**लीलेनेंचि भवप्रपंचविटपी ज्याच्या यशें खाणिला ॥ १ ॥**

असो. असेंच चवथें ( ६ ) **मंत्रिरामायण** साधलें आहे. हें अनुष्टुब् वृत्तांत रचिलें आहे. हें अत्यंत मधुर आहे, अमृत आहे. मारुतीच्या समुद्रोल्लंघनप्रसंगाचे दोन श्लोक:—

**निजसामर्थ्य कळतां उत्साहें कपि दाटला ।**
**शतयोजन पाथोधि स्पष्ट गोष्पद वाटला ॥ १ ॥**
**चिंतूनि तो श्रीरामातें महेंद्रा ढांसळी, उडे: ।**
**फुटले तों राक्षसींचे, सीतेचे दाटले चुडे ! ॥ २ ॥**

याचा उपसंहार पहा:—

**सत्यप्रतिज्ञत्वयश प्रभुनें निज रक्षिलें, ।**
**भक्षिलें वन्य, वेदोक्त गुरूक्त सम लक्षिलें, ॥ १ ॥**
**भक्तकल्पद्रुमारामें रामें रंजविलें जग ।**
**एकादशसहस्राब्द, पुर उद्धरिलें मग, ॥ २ ॥**
**चरित्रीं विश्व रमलें, शमलें सर्व पातक, ।**
**श्रीराम मेघ गमला, भक्त ते मोरचातक ॥ ३ ॥**

असेंच पांचवें ( ७ ) **सप्तमंत्ररामायण** आहे. हेंही अनुष्टुब् वृत्तांत रचिलें आहे. यांतला एकच गोड श्लोक पहा:—

**प्रजा सर्वाहि विमळा विमानामाजि वाहिल्या ।**
**नेल्या स्वर्लोका ताराया, कथा श्रोत्यांसि राहिल्या ! ॥ १ ॥**

दोन मोठीं व हीं पांच मिळून सात रामायणें झालीं. यांपैकीं प्रत्येकांत त्रयोदशाक्षरी मंत्र कांडक्रमानुसार चढत्या अक्षरांत साधला आहे. आणखी तीन रामायणें अशीं आहेत कीं, ज्यांतल्या प्रत्येक पद्यांत सबंध तेरा अक्षरें आणलीं आहेत ! ( ८ ) **त्रिःसप्तमंत्ररामायण** शार्दूलविक्रीडित छंदांत रचिलें आहे. यापैकीं एक श्लोक:—

**श्रीभर्ता चतुरा मरुत्तनुभवा धाडी पुढें सत्तम;**
**भेटे तो जवन; प्रभु प्रियगुहा वारावया तच्छ्रम, ।**
**हर्षे सानुज निर्मलाशय निजश्रेयस्करार्यागमें,**
**प्रेमें त्या नमि वानरा भरत तो, नाचे महासंभ्रमें ॥ १९ ॥**

असें दुसरें ( ९ ) **सत्स्वरामायण** ह्मणून एक याच वृत्तांत रचलेल आहे. भेद एवढाच कीं, मागचें रामायण २१ श्लोकांत आणलें असून हें १३ च श्लोकांत आणलें आहे.

असेंच (१०) **मंत्रमयरामायण** आहे. याच्या प्रत्येक आर्येंत तेर वर्ण साधले आहेत. पहिलीच आर्या पहा:—

**श्रीमान् राजशिरोमणि दशरथ, जो निजयशें बरा महित[१] ।**
**द्विजसेवक, यज्ञनिरत, जनभयहर्ता, धरा[२]निकामहित, ॥१॥**

यानंतर मात्र पंतांचें पंतांनाच आश्चर्य वाटूं लागलें. मयासुरानें अद्‌भुत सृष्टि निर्माण केली खरी, पण या अद्‌भुत शब्दसृष्टि रचणाऱ्यापुढें त्याचें कौशल्य फिकेंच पडेल, अशा भावानें पंत ह्मणतात:—

**चोविस आर्यांचें हें रामायण, यासि नाम मंत्रमय ।**
**अंतर्गतारि[३]मारक, सार[४], कवि रचिल असे न यंत्र मय! ॥१५॥**

( ११ ) **नामांकरामायण**:—यांत पूर्वार्धाच्या आरंभीं 'रा' व उत्तरार्धाच्या 'म' याप्रमाणें प्रत्येक आर्येंत रामनाम साधलें आहे. १२९ आर्या रा व म याच वर्णमण्यांनीं गुंफणें किती कठिण आहे याचा प्रत्येकानें विचार करावा ह्मणजे पंतांचें शब्दसृष्टीवर केवढें स्वामित्व होतें याची त्याला कल्पना येईल.

**[५]राईचा गिरि, गिरिची राई करि, त्या दशास्य[६] तो काय ? ।**
**महिमा अरिसहि देतो ज्याच्या हृदयांत आपले पाय[७] ॥ १०० ॥**
**राष्ट्रचि न, राम निववी देउनि धर्मार्थकाममोक्ष[८] मही ।**
**मत अनुसरे प्रजांचें [९]अक्षमसा, रामराज तो क्षमही ॥ १२८ ॥**

---

१ प्रसिद्ध, पूज्य. २ पृथ्वीला अत्यंत कल्याणप्रद असा. ३ आंतील कामक्रोधादि जे रिपु त्यांचा नाशकर्ता. ४ सारभूत, श्रेष्ठ. ५ ही प्रसिद्ध मराठी ह्मणच आहे. ६ दशमुख, रावण. ७ अन्वय जरा क्लिष्ट आहे. ज्याच्या हृदयांत आपले पाय आहेत ह्म. जो आपल्या पायांचें नित्य ध्यान करितो त्या शत्रूलाही तो राम महिमा देतो. यांत पर्यायोक्त अलंकार आहे. ८ चतुर्विध पुरुषार्थ देऊन केवळ आपलें राष्ट्रच नव्हे तर संपूर्ण पृथ्वी रामानें निववीली. ९ असमर्थासारखा

( १२ ) **प्रथमशिवरामायण**:—यांत प्रथमार्धांत कोठें तरी 'शि' व द्वितीयार्धांत कोठें तरी 'व' याप्रमाणें हे वर्ण साधून हें शिवनामांकित केलें आहे. सीताविवाहप्रसंगीं दीपकालंकारानें प्रकाशित करून पुढील आर्या पंतांनीं लिहिली:—

**सीता प्रभुला, अतुला प्रीति श्रीकौशिकाहि, कीर्ति बरी ।**
**रविवंशाला, जनका चिंता उडवूनि दूर शांति वेरी ॥ १६ ॥**

( १३ ) **द्वितीयशिवरामायण**:—यांत 'श्रीकंठो वरदःशर्वः' वगैरे श्लोकांतील शिवाचीं १०८ नामें, प्रत्येक आर्येंत एकनाम याप्रमाणें साधून, संग्रहीत केलीं आहेत. 'भव' नामांकित आर्या पहा:—

**साकेतीं नृप लावी पौरांला रामभद्रयश गाया ।**
**झाल्या प्रजा समग्रा वृद्धनृपापरिस फार वशगा या ॥८॥**

'देव देव' नामांकित आणखी एक आर्या पहा.—

**देउनि पिंड पित्यांतें राम वदे, ' तातधर्म रक्षावा, ।**
**वत्सा ! भरता ! त्वां म्यां वेदसमचि गुरुनिदेश लक्षावा ॥२८॥**

( १४ ) **उमारामायण**:—यांत प्रथम शिवरामायणाप्रमाणें उ व मा या वर्णांनीं मंडित प्रथम व द्वितीय आर्यार्ध आहेत.

**उत्क्रमण प्राणाचें राजाच्या कां न होय सुतशोकें ? ।**
**मालिन्य पुरें राष्ट्रें वरिलें, केवळ न याचिया ओकें ॥ २० ॥**

याचप्रमाणें ( १५ ) **काशीरामायण**, ( १६ ) **प्रयागरामायण**, ( १७ ) **गंगारामायण** हीं तीन रचिलीं आहेत. प्रत्येकांत रामकथा साग्र वर्णिली असून प्रत्येक आर्येंत तें तें पवित्र नाम आणलें आहे.

( १८ ) **तीर्थरामायणांत** पुष्कर, सरयू, गंडकी वगैरे तीर्थांचीं नांवें साधलीं आहेत; त्यांत बारामतीची ब्रह्ममंडलु नदीमुद्धां गोविली आहे.

( १९ ) **ऋषिरामायणांत** काश्यपपराशरादि प्राचीन ऋषींचीं नांवें आणलीं आहेत. ( २० ) **राजरामायणांत** नहुषप्रभृति पुराणांत प्रसिद्ध असलेल्या पवित्र राजांचीं नांवें साधलीं आहेत. यांत मुख्यतः पुष्पकविमानांतून परत येतांना रामानें सीतेला तीं तीं स्थळें दाखवितांना त्याचें जें वर्णन केलें तें साधलें आहे.

---

१ दीपकालंकार. ' वरी ' यामुळें. २ घरानें, राजघराण्यानें

**शोकार्त भरत येथें विनवी नगवर्य चित्रकूट पहा ! ।**
**देतो प्रयाग गंगायमुनासंगमहि लोचनांसि महा ॥ ७६ ॥**
**दयिते ! नीट पहा ! तें दिसतें साकेत पदक वसुधेचें ।**
**रघुकीर्तिचें, रुचे हें पात्र रसज्ञासि जेविं न सुधेचें ॥ ७७ ॥**

प्रयाग व तेथील गंगायमुनासंगमाचा रमणीय देखावा कोणाच्या नेत्रांस मह ( आल्हाद ) देत नाहीं ? त्याचप्रमाणें साकेताम ह्म० अयोध्येस रामानें ‘ वसुधेचें पदक ’ व ‘ रघुकीर्तिचें पदक ’ ह्मणावें हें तरी किती साहजिक आहे! आपली राजधानी पृथ्वीला ललामभूत झाली आहे असा अभिमानाचा उद्गार रामाच्या तोंडीं घालून कवीनें त्या नरदेहधारी परमात्म्याची कोमलमनस्कता व्यक्त केली आहे. त्याप्रमाणें अयोध्या दिसतांच तिची कीर्ति त्रिभुवनांत फांकणारा सूर्यवंशाचा दीपक आपला पूर्वज जो रघु त्याचें रामाला साभिमान स्मरण झालें हें तरी किती योग्य आहे हें पात्र ह्म० शरयूनदीचें पात्र.

( २१ ) **सन्नामगर्भरामायणः**—हें रामायण बरेंच महत्वाचें, सुंदर व खुबीदार आहे. यांत भरतखंडातल्या अर्वाचीन संतांचीं नांवें साध-लीं आहेत. नारदप्रल्हादादि कांहीं प्राचीन संतही यांत आहेत. सन्नामें ह्मणजे भगवद्भक्तांचीं नामें असाच येथें पंतांचा भाव दिसतो. पंतांचें सन्म-णिमाला ह्मणून जें एक गोड प्रकरण आहे त्यांतील बहुतेक संत यांत आले आहेत. शिवाय पंतांचे गुरु केशव व गणेश पाध्ये, मित्र विठोबादादा व बाळकृष्णबाबा, यजमान बाबूराव सदाशिव, पंतांच्या काव्यांत ज्याचा कोठें-ही नामोच्चार नाहीं तो ‘काळिदास,’ वगैरेंचींही नांवें यांत आहेत. महाराष्ट्र-संत तर बहुतेक आणले आहेतच. कांहीं नांवें साधतांना पंतांनीं एक खुबी केलेली सहज एकदां माझ्या ध्यानांत आली.

**नायक सद्विप्रांचा आचार्य वसिष्ठ धीरमणि वेद-।**
**शास्त्रें पढवी, करि ते स्वसम, न देतां न पावतां खेद ॥ ७ ॥**
**सुखपुंज पुत्र दे असुदानाहुनि जड पडे, तथापि कवी ।**
**रघुकुळरीति निरुपमा, रसिकजनमनोहरा कथा पिकवी ॥ १० ॥**

पहिल्या आर्येंत ‘ नारद ’व दुसरींत‘ पुंडरीक’ हीं नांवें साधलीं आहेतच, पण त्यांतील प्रकृत विषय जे आहेत तत्संबंधीच—तीं नांवें हीं आणून—अप्रकृत विषयही युक्तीनें सूचित केले आहेत ! वसिष्ठानें वेदशास्त्रें पढवून आपल्यासारखेच रामादिकांस आत्मपर केले हा प्रकृत विषय, पण हा वर्णि-तांना ज्या नारदाचें नांव साधलें आहे त्याच्याही चरित्राला तीच आर्या अनुरूप

आहे हें चाणाक्ष वाचकांस सहज कळणार आहे. दुसरींत विशेष नाहीं, तथापि पुंडरीकाचें नांव साधतांना त्याला व रामाला उभयतांना शोभणारें एक पद 'सुखपुंज पुत्र' त्यांत साधलें आहे. या रामायणांतील आर्याही चांगल्या साधल्या आहेत. आनंदमूर्ति व रंगनाथ यांचीं नांवें ज्या दोन आर्यांत साधलीं आहेत त्या आर्या आणखी देतों. रामाच्या पादुका घेऊन नंदिग्रामीं राहून रामाच्या नांवानें भरतानें राज्यशकट कसा हांकला याबद्दल पंत लिहितातः—

**आला परतुनि नंदिग्रामींच वसे, क्षुधा तृषा दवडी[1] ।**
**मूळफळें पूर्ति करी, राज्यांतिल घे न एकही कवडी ॥ ३२ ॥**
**बहु रंजवि प्रजा त्या गतलोभ, महामना पथ न सोडी ।**
**प्रभुपादकांसि कर तो, स्थापुनि भद्रासनीं[2], सदा जोडी ॥ ३३ ॥**

या आर्या किती सुंदर आहेत? महासागरांतून एरवीं पोहत जाणेंही दुर्घट कार्य आहे; मग मोठाले दगड कंबरेला बांधून सागरोल्लंघन करणाऱ्या महावीराला जगानें डोक्यावर घेऊन नाचावें यांत काय आश्चर्य आहे? अशी सहज सरळ, प्रासादिक काव्यरचना करणें हेंच लोकोत्तर बुद्धिमत्तेचें व भगवत्प्रसादाचें लक्षण आहे; मग मूळ कथाभागाला यत्किंचित धक्का लागूं न देतां, सहज व सरळ आर्या करून, शब्दार्थालंकारांचे थाटमाट यथास्थित साधून, छंदःशास्त्र व साहित्यशास्त्र यांच्या नियमांचें उल्लंघन न करितां, जर कवीनें नानाविध मंत्रही आपल्या काव्यांत साधले तर त्याची धन्यता किती गायला पाहिजे?

**२२-३१ विष्णुसहस्रनाम रामायणः**—याला एक रामायण ह्मणावें कां दहा रामायणें ह्मणावीं यावद्दल दोन मतें होणें शक्य आहे. विष्णुसहस्रनामांतलीं भगवंताचीं सहस्र नामें साधतांना रामकथा दहा वेळ गायिली गेली आहे एवढें खरें आहे. असो यांत नामार्थाकडे लक्ष देऊन सर्व नाममंत्र साधले आहेत असें नाहीं, कोठें कोठें तर नामाचे पदच्छेद असे केले आहेत कीं तेणेंकरून मूळ शब्दाच्या अर्थाचा कोठेंच पत्ता लागत नाहीं! उदाहरणार्थ 'संधाता' हें नाम घ्याः—

**श्रीकांत करी सत्या संधा[3] तापद दशास्य माराया ।**
**वाराया संकट [4]नयधर्मत्राणें सुरर्षि ताराया ॥ १ ॥**

१ उदरनिर्वाह. २ सिंहासनावर. ३ प्रतिज्ञा. ४ नीति व धर्म यांच्या रक्षणानें.

यावरून एवढेंच दिसतें कीं विष्णुसहस्रनामांतलीं सर्व अक्षरें–सर्व दिव्य व पावन अक्षरें–या रामायणांत आणावींत एवढाच पंतांचा हेतु असावा तथापि जेथें नामें वर्ण्यकथानुसंधानानें साधलीं आहेत त्या ठिकाणीं पंतांचें अद्भुत चातुर्य लक्ष्यांत येतांच मला अत्यंत आनंद झाला. सातव्या स्तोत्ररामायणाकडे पहा:—

**सुग्रीवें पाठविले श्रीच्या अन्वेषणार्थ[1] कपि वीर ।**
**त्यांत** महाक्रम **मारुति लंघी शतयोजनांबुनिधि धीर ॥७–६०॥**
**श्रीस अशोकवनीं दे मुद्रा, वन [2]बळ मर्थी, न धरि शंका ।**
**सांपडुनि** महाकर्मा **धिक्कारी अरिस, भस्म करि लंका ॥७–६१॥**

यांतील ‘ महाक्रम ’ व ‘ महाकर्मा ’ हीं नामें साभिप्राय आहेत. महाक्रम ह्म. मोठा आहे आक्रम ह्म. पादक्षेप ज्याचा तो. मारुति महाक्रम होता ह्मणूनच त्याला शंभर योजनें समुद्र उल्लंघितां आला. महाकर्म ह्म. थोर आहे कर्म ज्याचें. मारुति महाकर्मा होता ह्मणूनच त्यानें शत्रूला डवचून मारिलें. त्याने आपल्याला सांपडविलें, आपण होऊन शत्रूच्या स्वाधीन झाला, नंतर दरबारांत उभें राहून त्याचा उघड धिक्कार केला व अखेर लंकाच जाळून टाकली. पंतांनीं वर्णनाचा वरील ओघ अशा अद्भुत चातुर्यानें आणला आहे कीं मारुतीच्या या पराक्रमांचें वर्णन करायचा प्रसंग प्राप्त झाला, तों ‘ महाक्रम ’ व ‘महाकर्मा हीं पदें पुढें हात जोडून उभीं ! मारुती लंकेंत गेल्यावर लौकरच रणयज्ञ सुरू होऊन रामरावणांचें युद्ध जुंपलें. पंतांपुढें यज्ञसंबंधीं नामें दत्त ह्मणून उभीं राहिलीं तों पंतांनीं त्यांचें उत्कृष्ट रूपक बनवून सोडलें ! पहा:–

**श्रीराम** [3]महायज्वा, **जें राक्षससैन्य तें विपुळ [4]सर्पी, ।**
**उग्र प्रतापपावककुंडीं संतत [5]शरस्रुवें अर्पी ॥ ६५ ॥**
**ज्यांत घटश्रुति तत्सुत [6]घनरव जे हें [8]**महाहवि **प्राज्य[9] ।**
**पूर्णाहुति दशमुख, अवभृथ[10] जें दिधलें बिभीषणा राज्य ॥ ६७ ॥**

एवढाले रामाचें पराक्रम पाहून त्याची स्तुति करण्याची सर्वांना प्रेरणा कां न व्हावी ?

स्तोत्र **प्रभुचें करिती या कारुण्येंकरूनि सुर साचें ।**
**वात्सल्य हेंचि, भुलवी रसिकां माधुर्य याचि सुरसाचें ॥ ७० ॥**

१ सीतेच्या शोधार्थ. २ वन व राक्षससेना. ३ मोठा यज्ञकर्ता. ४ तूप, घृत. ५ बाणरूप पात्रानें. ६ कुंभकर्ण. ७ इंद्रजित, ८ हवनीय द्रव्य. ९ पुष्कळ. १० यज्ञसमाप्तीनंतरचें स्नान.

**स्तुति केली शतधृतिनें, स्तोता प्रभुचा महेश्वरहि झाला ।**
**मग त्या बिभीषणाच्या अभिषेकें शोकपावक विझाला ॥७१॥**

आठव्या स्तोत्ररामायणांत 'सुलोचन' व 'अर्क' हीं नामें आलीं त्यावरच्या सुंदर आर्या पहा. त्यांनाही प्रसंग योग्य साधला आहे. राज्याभिषेकोत्सवानंतरः—

**ज्या ज्या कडे सुलोचन करुणामृत सिंधु राम तो पाहे, ,**
**राहे त्याचा न भ्रम, नित्य नवें सुख बहु प्रजा लाहे ॥ ७२ ॥**
**अर्क जसा पद्मांतें, कुमुदांतें चंद्र, तात तोकांतें, ।**
**लोकांतें हर्ष तसा प्रभु दे, स्पर्शों न मोहशोकांतें ॥ ७३ ॥**

नवम स्तोत्ररामायणांत 'सीताविरहानें राम कृश होऊन शोक करितां करितां पंपासरोवराजवळ आला इतका कथाभाग आला; तों 'सुपर्णो वायुवाहनः । धनुर्धरो धनुर्वेदो ' हा नामपरंपरा आली! वाचकांनीं पुढील आर्या न पाहतां अशा प्रसंगीं कथौघ सारखा चालू ठेवून हीं नामें साधण्याचा आधीं यत्न करावा व मग पंतांच्या पुढील आर्या वाचाव्या ह्मणजे त्यांस पंतांच्या चातुर्याची व कवित्वस्फूर्तीची खरी कल्पना येईल !:—

**श्रीराम ह्मणे, ' असतों, ' [1]सुर्पण कीं वायुवाहन, रहातों ।**
**पळहि न, चकोर चंद्रा मी तोंवि प्रियतमामुख पहातों ' ॥ ५१ ॥**
**लक्ष्मण ह्मणे, ' धनुर्धर तूं आर्या ! जाणसी धनुर्वेद ।**
**खेद करिसि कां ? देवी आणसिल करूनि [2]असदुरोभेद ॥ ५२ ॥**

विस्तारभयास्तव आणखी आर्या देतां येत नाहींत. समग्र रामायण चतुर व रसिक वाचकांस विलक्षण आल्हाद दिल्याशिवाय राहणार नाहीं, अशी माझी खात्री आहे. प्रस्तुतसारख्या सरस काव्यास चित्रकाव्य ह्मणून तुच्छ मानणाऱ्या पंडितांच्या रसिकतेची कींव करावी हेंच योग्य !

---

## ३ निरूपणात्मक रामायणें. ( ३२–३४ )

( ३२ ) **श्रीगुरुरामायणः**—श्रीरामराज्याभिषेकोत्सवानंतर अयोध्यानगरी आनंदमय झाली होती, अशा वेळीं श्रीरामाचें ऐश्वर्य पाहून आपल्या डोळ्यांचें पारणें फेडण्यासाठीं जनकराजाची स्वारी अयोध्येंत प्राप्त झाली. प्रधानादि त्याला 'आडवे गेले,' वसिष्ठानें त्याला ' समालिंगिलें, ' रामादि

१ पक्षी. २ शत्रूच्या वक्षस्थलाचा भेद.

भ्रातें व मातादि स्वसा-जाया यांहीं तो 'नमस्कारिला व पूजिला,' व कौसल्यादिकांहीं 'गौरविला फार सज्जन ज्याहीं.' जनक, वसिष्ठ, शतानंद, कौसल्या, सुमित्रा, कैकेयी, वगैरे गुरुजन एकत्र जमले, व त्यांच्या सभोंवार श्रीराम, लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न, सीता व इतर दशरथस्नुषा, सुग्रीव, अंगद, बिभीषण, हनुमंत यांनीं, वत्साप्रमाणें त्यांना 'परिवेष्टिलें!' अशा या प्रेमाच्या व विश्रामाच्या थोर विभूतींचा खाजगी संवाद प्रस्तुत रामायणांत दिला आहे. वसिष्ठजनकादि गुरुंस रामलक्ष्मणहनुमंतादि कनिष्ठांनीं शिळोप्याच्या, आनंदाच्या वेळीं रामचरित्रांतल्या ठळक गोष्टी आपल्याकडे लघुत्व घेऊन व परमगुणाचें गौरव करून सांगितल्या आहेत. प्रत्येकजण आपापल्याकडे लघुत्व घेऊन दुसऱ्याच्या गुणांचे गौरव मोठ्या प्रेमानें, निर्मत्सर व निर्मळ मनानें करीत आहे. 'परगुणपरमाणून्पर्वतीकृत्य नित्यं निजहृदि विकसन्तः सन्ति सन्तः कियन्तः' या श्लोकार्धाचें रहस्य प्रस्तुत रामायण वाचून प्रत्येकास फारच चांगलें समजेल. एका कुटुंबांतलीं किंवा एकचित्ताचीं उदारचरित कुलीन माणसें आपत्कालल्यानंतर आनंदानें एकत्र जमावीं, नुकत्या ओसरलेल्या भयंकर आपत्तींसंबंधानें त्यांच्या सुखदुःखाच्या गोष्टी मोकळ्या मनानें चालाव्या, महत्कार्य केल्याचें श्रेय प्रत्येकानें आपल्यावर न येऊं देतां दुसऱ्यावरच प्रेमादरानें लोटावें, सर्वांनींच भगवत्प्रेमोल्हासानें आनंदरूप होऊन उन्नतचित्तत्वाचा, विमल प्रेमाचा, सविनय परोत्कर्षोत्साहाचा दिव्य परिमळ सभोंवार पसरावा याहून संसारांत अधिक भाग्याचा प्रसंग कोणता येणें शक्य आहे? ही भाग्याची, आनंदाची, प्रेमाची, उन्नतत्वाची परमावधी झाली. पंतांना असा वर्णनप्रसंग सुचावा हें त्यांच्या चित्तवृत्तीची ओळख होण्यास पुरें नाहीं काय? गृहस्थाश्रमाची गोडी पंतांसारखी जाणून चाखून वाखाणणारा अन्य कवि भूतलावर झाला नाहीं असें मीं निभ्रांत ह्मणतों. प्रस्तुत रामायणांत संगतवार हकीकत अर्थातच आली नाहीं, पण सर्व हकीकत एकंदरीनें येऊन गेली आहे. चौदा वर्षांत ज्या ऋषींनीं, वानरांनीं व भ्रात्यांनीं आपणांस परोपकारानें साह्य केलें त्यांचें गौरव करून राम लक्ष्मणाबद्दल ह्मणतातः--

**वदे राम, "स्वामी! [1]सुमति [2]धृति दे हा, [3]समवन**
**प्रभो! नित्य प्रेमें करि, गमवि गेहासम[4] वन।**

१ बुद्धि, योग्य सल्ला मसलत, मंत्र. २ धैर्य, धीर. ३ रक्षण. ४ घरासारखें.

**न सौमित्री भ्राता, 'सकळगुरुसुस्नेह सजला !**
**प्रवासीं रक्षाया द्रवुनि मजला स्पष्ट भजला " ॥ २३ ॥**

लक्ष्मणानें सुग्रीवहनुमंतांचे पराक्रम वर्णिले, तेव्हां बिभीषण सुटला गेला हें पाहून स्वतः रामरायानें ' चिंतार्णवांत बिभीषणरूप बेट आह्मांस भेटलें ' ह्मणून त्याचें गौरव केलें. वानराधिप सुग्रीव यानें जेव्हां पाहिलें कीं सर्वांच्याहून अधिक गौरव मारुतीचें व्हायला पाहिजे, तेव्हां त्यानें इंद्रजिद्वधाची व औषधीनगाची गोष्ट सांगितली. सर्वांचें हृदय मारुतीविषयीं प्रेमार्द्र झालें व सुग्रीव, राम, वसिष्ठ, भरत, सचिव, या सर्वांनीं श्रीमारुतीरायावर स्तुतिस्तोत्रांचा वर्षाव केला. प्रथम सुग्रीव ह्मणतो:--

**' प्रसवे पुत्र विश्वाच्या वाराया अंजना भया।**
**देऊं सदग्रण्यत्वख्याति 'श्रीकंजनाभ या' ॥५३ ॥**
**वदे राम, ' हा मारुती प्राणदाता । निवारी स्वलीलालवें सर्वघाता ' ।**
**'कुळाचार्य त्यातें ह्मणे, 'सत्य. ताता !' स्तवी साश्रु होऊनि वैदेह वाता**
**शत्रुघ्न भरत वदले, याचे आह्मी खरे ऋणी आर्या ! । '**
**सचिव ह्मणति, ' फेडावें ऋण याच्या करुनि कोणत्या कार्या?'५५**

या पद्यांची योग्यता काय वानावी ? विश्वभय वारणारा पुत्र अंजना प्रसवली हें ह्मणण्यांत सुग्रीवानें केवढा उदात्तपणा व्यक्त केला आहे ? विश्वभयनिवारकत्व हें जन्मसाफल्याचें खरें लक्षण होय असें सुग्रीवाचें सांगणें आहे. कृतार्थतेचें अधिक सुंदर लक्षण दुसरें काय देतां येईल ? ' मारुतीनें आपल्या सहज लीलेच्या लवानें ( अल्पांशानें ) आमचे सर्वघात ( प्राणसंकट ) निवारले ' असें ह्मणून रामानें त्याच्या पराक्रमाची केवढी थोरवी गायिली आहे ! रामलक्ष्मणांचें भ्रातृप्रेम पाहून बिभीषणानें ' न बंधुपण पाहिलें, परिशिलेंहि अन्यत्र गा ! ' असा जो उद्गार काढला आहे तो साऱ्या जगाला मान्य झाला आहे ! अखेर एकदा राम ह्मणालेः—

**ऋक्षाधीश, सुषेण, अगंद. नळ, स्नेही भले भागले,**
**हे सुग्रीव बिभीषण, प्रियकर भ्राते खरे मागले. ।**
**हा वातात्मज, हे गजादि सकळ प्लवावळे आगळे,**
**देणारे जय यांपुढें परबळ त्रासें करी आ गळे ॥ ८१ ॥**
**यांहीं दिला विजय साधुनि आर्य हो या,**

१ यांत अपन्हुती अलंकार आहे. २ देवो. ३ सज्जनांचा अग्रणी ही प्रसिद्धी. ४ रान. ५ वसिष्ठ. ६ जनक.

**हे हेतु सिद्ध अतिदुर्घट कार्य होया ।**
**हा दाससा सतत लक्ष्मण वत्स माझ्या**
**देहा जपे बहु, जसा शिव सत्समाजा !॥ ८२ ॥**

यावर लक्ष्मणानें बहार केली:--

**सौमित्रि ह्मणे, ' आर्या ! गुर्वाशीर्वाद सतत तुज जपला ,।**
**निष्फळ होइल कैसें सानुज ससचिव भरत जें तपला ? ,॥८३॥**

ही कृतज्ञताव्यक्ति संपल्यावर वसिष्ठादि गुरुजनांनीं 'वंशीं त्वत्सम तूंचि या द्युमणिच्या वत्सा ! जगा तारिता ' याप्रमाणें रामगौरव केलें व ही गुणी-गुणज्ञांची सभा बरखास्त झाली !

( ३१ ) **सीतारामायणः**—भरत, लक्ष्मण, शत्रुघ्न यांच्या स्त्रिया. सीतेच्या 'स्वसा जावा.' यांनीं सीतेला 'वृत्त सर्व सति ! सांग आपलें ! सूक्तिनें निविव चित्त तापलें' याप्रमाणें प्रेमानें विनविलें, तेव्हां त्यांना 'आलिंगुनि, कुरवाळुनि, हुंगुनि शिर, चुमुनि लोचनें पदरें' सीतादेवीनें सारें निजवृत्त सांगितलें, तें सीतारामायण होय! हें गुरुरामायणाप्रमाणेंच फार खुबीदार व रसाळ आहे. सर्व रामकथा यांत आली आहे; पण ती सांगणारी सीतादेवी आहे, ही गोष्ट पंत क्षणभरही विसरले नाहींत; यामुळें ज्या गोष्टी सीतेच्या दृष्टीनें अत्यंत महात्वाच्या होत्या त्यांचाच यांत विस्तार झाला आहे! यांत खणाखणींचीं युद्धवर्णनें नाहींत. भरद्वाजाश्रमांत अनुसूयेनें प्रेमानें शिकविलेली सुरीति, शूर्पणखेचें वर्णन व तिची फजिती, सीतेनें लक्ष्मणास आश्रमांतून घालवितांना केलेलीं दुरुत्तरें, रावणानें सीतेशीं केलेला लवळपणा व तिनें दिलेलें तेजस्वीपणाचें उत्तर, सीतेनें केलेलें दिव्य व दशरथानें केलेला सीतेचा गौरव हे प्रसंग या रामायणांत अत्यंत सरस वर्णिले आहेत. हें रामायण स्त्रियांनीं अवश्य वाचावें. पंतांच्या उत्तम रामायणांपैकीं किंबहुना त्यांच्या उत्कृष्ट काव्यांपैकीं हें एक आहे इतकें सांगितलें ह्मणजे पुरे. हें रामायण गात असतांना पंतांनीं सीतादेवीच्या हृदयवृत्तींचा आदर्श पुढें ठेवला होता, व कुलीन वधूंनीं त्या आदर्शांत वारंवार पाहून आपला आचार ठेवावा असें धोरण राखलें होतें. विस्तारभयास्तव यांतून पाहिजे तितके श्लोक उद्धृत करितां येत नाहींत याचा खेद वाटतो.

( १ ) **तद्भार्या अनुसूया मजवरि करि सासु-मायसी माया ।**
**स्वकरेंचि अलंकारी, आहे प्रेमासि काय सीमा या ? ॥ १२ ॥**

**वेणी घालुनि, लोचनीं निजकरें ती लेववी कज्जळ,**
**लावी चंदन सुव्रता, मज गमे गंगाचि तें तज्जळ, ।**
**गुंफी सत्कुसुमें शिरीं, सुरुचिरा माळा गळां अर्पुनी,**
**प्रेमें धर्म कथी, सुधाधिकरसें सूक्तें मला तर्पुनी ॥ १३ ॥**

हिंदुसमाजांतल्या कुलीन सासूसुनांच्या अन्योन्यप्रेमाचें हें चित्र किती आल्हादक आहे बरें! आपल्या सुनेच्या कपाळीं कुंकु लावायचें, तिच्या अंगाला प्रेमानें चंदनादिकांची उटी लावायची, तिच्या वेणींत फुलें व गळ्यांत माळा घालून तिला आपल्या घरांतली लक्ष्मी मानून तिच्यावर मुलीहून अधिक प्रेम करायचें व वेणीफणी करीत असतांना तिला सतींच्या गोष्टी व सदाचार अमृतमधुर वाणीनें शिकवायचें हें भाग्य सुशील व सुजाण सासूच जाणूं शकेल! या सासूच्या महावात्सल्याची थोरवीही जाणायला सीतेसारखी सून व ती वानायला मोरोपंतासारखा सत्कविच पाहिजे.

**( २ ) चालति माझ्या मागें लक्ष्मणजो काननीं, पुढें स्वामी ।**
**धामीं तशीच हर्षें चालें, पाहोनि आपुल्या स्वा मी ॥ ९ ॥**

या आर्येची गोडी किती वानावी? 'आपलें स्व. ह्म. धन, सर्वस्व जो श्रीराम त्याकडे पाहून कानन मला राजवाड्यासारखें वाटलें' हा त्या सतीच्या ह्मणण्याचा भावार्थ.

**( ३ ) माया सुवर्णमृग राक्षस त्या खळानें**
**जो धाडिला परमरम्य, विशृंखळानें ।**
**तो वाटला निरखितां, मजला धरावा**
**न्यावा पुरा स्वजन सर्व सुखी करावा ॥ ४९ ॥**
**देऊनि चाप भाते, वदल्यें, लांबेल मृग, धरा, जाच ।**
**ठेवुनि लक्ष्मणजीतें गेले, स्त्रीचा नव्हे बरा जाच ॥ ५१ ॥**

( ३४ ) **हनूमद्रामायण**:—हें हनुमंतानें आपल्या आईस ह्म. अंजनेस सांगितलें आहे. आपल्या पराक्रमाची फुशारकी न मारतां, विनयपूर्वक हें रामचरित्र हनुमंतानें कथिलें आहे. जेथें जेथें आत्मगौरवाचा प्रसंग आला तेथें तेथें खरी हकीकत सांगून हा रामप्रभुप्रसाद आहे किंवा हें तुझ्या धन्य दुग्धाचें सामर्थ्य आहे असें मारुतीनें ह्मटलें आहे व आपलें धन्यत्व वर्णिलें आहे. शेवटीं मात्र मातेची स्तुति करितांना 'स्तन्य तुझें कौसल्या स्तन्यसम स्तुत, असें नसे अन्य' असें ह्मणतांना मारुतिराय–किंवा खरें

ह्मटलें तर कविराय-थोडे घसरले आहेतसे दिसतात! कारण, यांत मारुतीनें आपली योग्यता रामाच्या इतकी आहे असें ध्वनित केल्याचा भास होतो. 'भक्तीं प्रभुचें अतुल प्रेम कृतज्ञत्व भव्य थोरपण' याप्रमाणें रामरायाचे गुण गाणाऱ्या रामभक्ताच्या तोंडीं असली व्यंग्योक्ति शोभत नाहीं! तथापि आत्मगुणगानाच्या प्रसंगींही मारुती प्रत्यक्ष आत्मस्तुति करीत नसून युक्तीनें स्वमातृभक्ति उत्कर्षानें व्यक्त करीत आहे असें समजल्यास कवींची तारीफच करावी लागेल! आपल्या वज्रदेहाची आठवण होऊन मारुती ह्मणतातः—

'तुझिया धन्यें स्तन्यें माते! माझ्या पर्वीङ्ग्यें बळ लोमीं;

---

## ४ चित्रविचित्र रामायणें. (३५—४४)



(३५) **परंतुरामायणः**—हें रामायण सप्तकांडात्मक असून यांतील प्रत्येक आर्येंत 'परंतु' हा शब्द कोठें तरी आणला आहे. मात्र प्रत्येक आर्येंत तो उगीच घुसडला आहे असें कोठेंच वाटत नाहीं. सर्वत्र या विरोधदर्शक शब्दाची सार्थकताच वाटते. पहिलीच आर्या पहाः—

**श्रीरामचरित करितें मुक्त, सकृत् किमपि सेवितां भांव ।**
**पार न लागे दशशतवदनाहि, परंतु वाटतें गावें ॥ १ ॥**

आणखीः—

**वाइट कैकेयीतें, स्त्रैण ह्मणे दशरथासही पुर तें,**
**न विटे परंतु चित्त प्रभुचें, कीं शांतिसद्गुणें पुरतें! ॥ २ ॥**

(३६) **ओवीरामायणः**—पंतांनीच सांगितल्याप्रमाणें 'आर्या ओवींत दिसत दिसे, ओवी आर्येंत पाहतां नीट' हाच या रामायणाचा विशेष होय. उदाहरणः—

**आर्याः**—

**ताताचा सत्यव्रत धर्म त्वां रक्षिला त्यजुनि राज्य ।**
**शर्म. सुदुष्कर केलें कर्म स्वीकारुनि श्रम प्राज्य ॥ १० ॥**

**ओवीः**—

**ताताचा सत्यव्रत धर्म । त्वां रक्षिला त्यजुनि राज्य (व) शर्म ।**
**सुदुष्कर केलें कर्म । स्वीकारुनि श्रम प्राज्य ॥ १० ॥**

१ वज्रानें ही स्तुति करण्यास योग्य असें. २ एकवार. ३ थोडेंही. ४ हजार मुखांच्या शेषालाही. ५ स्त्रीलंपट.

( ३७ ) **मात्रारामायणः**—अ पासून ज्ञ पर्यंत जे वर्ण आहेत त्यांस मात्रा असें ह्मणतात, या मात्रा अनुक्रमानें आर्यारंभीं योजल्या आहेत ह्मणून यास 'मात्रारामायण' असें नांव दिलें आहे. ॠ, ऌ, ॡ, ङ, ञ, ळ, या वर्णांनीं ज्यांचा आरंभ होतो असे शब्द भाषेंत नसल्यामुळें या सहा वगळून बाकीच्यां ४६ मात्रांत ४६ आर्या पंतांनीं केल्या आहेत. यांतील क व ड या वर्णांनीं आरंभ झालेल्या सुंदर अर्थांतरन्यासांत गुंफलेल्या दोनच आर्या पहाः—

**कवळी कबंध राक्षस भक्षाया जो, तयाहि दे सुगती ।**
**ऐसें नसोनि, गर्वें आपणाचि प्रभु ह्मणोनि कां फुगती ? ॥ १४ ॥**
**डसुनि भुजंग कधीं तरि गरुडाला ह्मणवितील ' हा ! ' काय ? ।**
**पेटवितां पुच्छ, उडे, जाळी लंकापुरी, महाकाय ? ॥ २४ ॥**

आपल्या नाशार्थ यत्न करणाऱ्या शत्रूलाही उत्तम गति देण्याइतकें सामर्थ्य व औदार्य ज्याच्या ठिकाणीं असतें, त्या रामरायासारख्यालाच प्रभु ही पदवी शोभते हा पहिल्या आर्येचा अर्थ आहे, व नीचांनीं उच्चाच्या नाशार्थ यत्न केला तरी त्या योगें उच्चाचें रतिभर वांकडें न होतां अखेर नीच मात्र नाशाप्रत जातात ही गोष्ट दुसऱ्या आर्येंत सामान्य व विशेष अशीं दोन्हीं प्रकारचीं उदाहरणें देऊन सिद्ध केली आहे.

( ३८ ) **लघुरामायणः**—यांत लघु ह्मणजे एकमात्रक अक्षरांचीच योजना केलेली आहे; यांत अनुप्रास बरे साधले आहेत, पण शब्दरचनेकडे कवीचें सारें लक्ष्य वेधल्यामुळें याला गोडी तादृश नाहीं. पहिली आर्याः—

**दशमुखवधमति विधिसुरनुतपद जगदधिप अजित वरद हरि ।**
**परमकरुण ह्मणवुनि दशरथनरवरतनुज मनुजपणहि धरि ॥ १ ॥**

( ३९ ) **दिव्यरामायणः**—लघुरामायणांत प्रत्येक आर्यार्धांत अक्षरें २९ आहेत. या दिव्य रामायणांत प्रत्येक गीत्यर्धांत अक्षरें १६ आहेत. त्यांपैकीं २ लघु व १४ गुरु आहेत. हें रामायण चांगलें गोड वठलें आहे तथापि 'दिव्य' शब्दाची सार्थकता समजत नाहीं. राम रावणवधानंतर पुष्पक विमानांत बसून अयोध्येंत परत आले तेव्हांः—

**विप्र, भ्राते, माता, पौर, श्रीवल्लभासि पाहूनीं, ।**
**बाहूंनीं आश्लेषा[1] देती रोमांचभार वाहूनीं ॥ १२० ॥**

१ आलिंगनातें.

**स्तोत्रांच्या, पुण्यांच्या, आनंदाच्याहि, वृष्टि लोंजांच्या, ।**
**ते भाग्याची वेळा, ती झाली प्राप्त दृष्टिला ज्यांच्या ॥ १२१ ॥**
**श्रीराम स्वामी दे सर्वांला सर्व अर्थ साधूनी ।**
**त्यातें गावें भावें केला हा सूपदेश साधूंनीं ॥ १२२ ॥**

या दोन्ही रामायणांसंबंधानें काव्यसंग्रहकार वामनरावजी ओकांनीं ह्मटलें आहे; " लघुरामायणाला मुखरामायण असेंही अन्य नांव आढळतें. दीर्घरामायणांत भरत, त्रिजटा इत्यादि नांवें सुलभ रीतीनें आणतां आलीं नाहींत, तीं आणण्यासाठीं केवढा खटाटोप करावा लागला आहे हें गीति ४, ९३ ह्या पाहिल्या असतां सहज कळून येईल. तसेंच दशरथ हा लघुवर्णत्रय शब्द कोणत्याही प्रकारानें दीर्घरामायणांत योजतां आला नाहीं. ह्मणून त्याचा पर्याय शब्द 'दिक्कंठ,' 'दिग्रथ' योजावा लागला आहे. एतावता या रामायणांत दीर्घ अक्षरें योजण्याचा पंतांचा कटाक्ष जबरदस्त होता असें सिद्ध होतें." वामनरावजींचें हें ह्मणणें बरोबर आहे पण यावरून त्यांनीं जें अनुमान काढलें आहे कीं, 'या रामायणाला पंतांनीं 'दिव्यरामायण हें नांव दिलें नसून 'दीर्घरामायण' असें नांव दिलें असलें पाहिजे' हें मात्र खोटें आहे. पंतांच्या पोथींत याला दिव्यरामायण असेंच ह्मटलें आहे. मात्र वामनरावजी पंतांच्या वेळीं हयात असते तर पूर्वोक्त कारणामुळें त्यांची मार्मिक सूचना पंतांनीं खास मान्य केली असती असें मला वाटतें! लघुरामायणाच्या जोडीला बसविण्यासाठीं तद्विसदृश अशा गुरुवर्णांनीं युक्त असें दीर्घरामायण पंतांनीं रचलें असावें ही वामनरावजींची सूचना मान्य करून मी आणखीं असें सुचवितों कीं, यांच्या जोडीला तिसरेंही एक —पुढील सौम्यारामायण—रामायण बसवावें.

( ४० ) **सौम्यारामायण**:—लघुरामायणांत सर्वच वर्ण लघु आहेत, दिव्यरामायणांत १६ पैकीं १४ वर्ण दीर्घ आहेत, पण सौम्यारामायणांत पहिल्या अर्धांत सर्व वर्ण दीर्घ व दुसऱ्यांत सर्व वर्ण लघु आहेत! सौम्या नांवाचें एक वृत्त आहे व त्याच्या पूर्वार्धांत सोळा अक्षरें गुरु असतात, व उत्तरार्धांत ३२ अक्षरें लघु असतात! सीता रावणानें पळवून नेल्यावर रामाचा शोकः—

१ लाह्यांच्या. २ उत्तम उपदेश.

**शोकाग्नीचें वाटे शोची लागे, बाष्पें दाटे, शोची, ।**
**हुडाकि आजित घने ' अहह ' ह्मणत वन, खग मृग मुनिजन रडवि,**
**भुलवि मन ॥**

हीं तीनही रामायणें पाहून व सारस्वताच्या आखाड्यांतल्या या ( मोरोपंत ) आद्वितीय मल्लाचे हे अद्भुत कसरतीचे खेळ अवलोकन करून कोण रसिक आश्चर्यानें थक्क होऊन जाणार नाहीं ? पैलवान सगळें अंग वांकडें तिकडें हवें तसें रबरासारखें वळवून चमत्कार करून दाखवितो, त्याप्रमाणें पंतांनीं भाषादेवीला आपल्या इच्छेप्रमाणें वाटेल तशी नाचविली आहे व आपल्या भाषा प्रभुत्वाचें प्रदर्शन सकल जगन्नाटकी जो श्रीराम त्याच्या पुढें उघडून त्याच्यापासून बिल्ला मिळविला आहे !

( ४१ ) **कविप्रियरामायणः**—हें अश्वधाटी छंदांत रचिलें असून याच्या प्रत्येक चरणांतील अक्षरसंख्या २२ आहे, व २।७।१९ हीं अक्षरें सर्वत्र एकच आहेत यामुळें याचा एक बांध होऊं शकेल.

**न्हावें कृतार्थ जनु, जावें लयासि अघ. यावें महागति मना. ।**
**ध्यावें विशुद्ध यश, मावें जगीं न तरि, भावें दशास्यदमना ।**
**ध्यावें, स्वतत्व उमंगावें, असेंचि शुचि. ठावें असें गुरुमुखें. ।**
**पावें, प्रभो ! ह्मणुनि नांवें सदा जपत गावें चरित्रचि सुखें ॥**

( ४२ ) **विचित्ररामायणः**—हें नांवाप्रमाणें विचित्र आहे खरें ! याचें वृत्त जलोद्धतगति आहे. पहिलाच श्लोक कसा अनुप्रासखचित आहे पहाः—

**भवाब्धिं सुकवी. कविप्रियं करी, करीशतम हा महादय हरी ।**
**सुकीर्ति परमा रमापं मिरवी रवीडित महा महास्पद नवी ॥१॥**

( ४३ ) **दामरामायणः**—दाम ह्मणजे फुलांचा हार. फुलें एकांत एक गुंतवून जसा त्यांचा हार गुंफतात, त्याप्रमाणें या रामायणांत प्रत्येक आर्यार्धाच्या शेवटचीं दोन, तीन, किंवा चार अक्षरें ( बहुधा तीन ) दुसऱ्या आर्यार्धाच्या प्रारंभीं आणलीं आहेत व यामुळें एक आर्यार्ध दुसऱ्या आर्या-

१ ज्याला. नपुसकलिंगी शब्द, संबंध ' शोकाग्नीचे. २ दाट, गर्द ( वन ) ३ जन्म. ४ रावणरिपुला. ५ आत्मस्वरूप. ६ भवसागर शोषून टाकतो. ७ कवींना गाण्यासारखें यश करितो. ८ हा दयाळू राम गजेंद्राचें अज्ञान संकट दूर करितो. ९ उत्तम यश. १० रमापति. ११ रवीनें स्तवन करण्यासारखा प्रताप ज्याचा. १२ आनंदाचें स्थान असा.

यांत अडकविला गेला आहे. याप्रमाणें या रामायणांतल्या ९० आर्या साऱ्या एकमेकांशीं लगटलेल्या आहेत. हें रामायण रचण्यांत बहुत चातुर्य प्रकट झालें आहे. यांतील आर्या ह्मणतांना मोठी मौज वाटते व आर्याही सुरस वठल्या आहेत. उदाहरणः—

**श्रीपति झाला दशरथसुत राम दशाननासि माराया, ।**
**मा राया जनकाची होय सुता त्रिजगदाधि[2] साराया ॥ १ ॥**
**सारी या प्रभुची हे लीला गाती सदैव ही सुकवी, ।**
**सुकवी [4]भवजलनिधितें, निरुपम सुख रसिकजनमनीं पिकवी,॥२॥**
**पिकें वीतबाध[6] कवि या चरिताम्रवनांत कूजिती, सुरस ।**
**सुरसद्मींचा लाजे, यश हें श्रीशिव ह्मणे 'शिवे ! परिस ॥ ३ ॥**

( ४८ ) **निरोष्ठरामायणः**—मोरोपंतांचे मित्र रामजोशी यांच्याविषयीं लिहितांना 'पंतांचें मित्रमंडळ' या प्रकरणांत या निरोष्ठरामायणाविषयीं एक मजेची आख्यायिका दिली आहे (पृ.१९६). ओंठाला ओंठ लागणारे जे पांच वर्ण ह्म. प, फ, ब, भ, म ते गाळून हें रामायण रचिलें आहे ह्मणून याला 'निरोष्ठ' ह्मटलें आहे. पंतांच्या कवितेवर इ० स० १९०० च्या मे महिन्यांत पुण्याच्या वसंतव्याख्यानमालेंत मीं जें पहिलें व्याख्यान दिलें होतें, तें ता. ५।६।१९०० च्या केसरींत प्रसिद्ध झालें होतें. त्या व्याख्यानप्रसंगीं वरील आख्यायिका मीं सांगितली होती. तिच्यावर केसरींतच वादविवाद होऊन या रामायणाविषयीं सुरेख निर्णय झाला आहे. रा. महादेवराव जोशी, गोपाळराव ओगले व देशपांडे या तिघांचीं तीन पत्रें वाचण्यासारखीं होतीं. त्यांत रा. देशपांडे यांनीं तर स्पष्ट उलगडा केल्यामुळें मीं येथें बहुधा त्यांच्याच विचारसरणीनें सांगणार आहें. 'रघुनाथचरित लिहित आहे' असें पंत ह्मणाले, तरी नित्याचा 'राम' सोडून रघुनाथ शब्द उच्चारण्यांत कांहीं खरा निरोष्ठपणा साधला नाहीं, कारण 'उ, हा ओष्ठ्यवर्ण आहे. 'उ' चा उच्चार करितांना ओंठांस चलन मिळून ते जवळ जवळ येतात. पण एवढ्याचसाठीं 'रघुनाथ' शब्द दुष्ट मानायचा असेल, तर याच रामायणांत आर्या ३१ मध्यें 'अंगुलिचा' हा शब्द आला आहे, तोही दुष्ट मा-

---

१लक्ष्मी. २ तीनही लोकांचें दुःख. ३ उत्तमा, सारभूता. ४ संसारसागरातें. ५ कवि याच कोकिला. ६ संसारतापांपासून मुक्त होत्साते, निर्बाध. ७ रामाच्या चरित्ररूपी आम्रवनांत. ८ देवांचें स्थान—स्वर्ग तेथील सुरस ह्म. अमृतरस लाजे.

नावा लागेल. बरें एवढ्यानेंच भागत नाहीं. आर्या १४ मध्यें 'तों' व आर्या ५७ मध्यें 'चरणनतहितोद्देशें' हे दोन शब्द आले आहेत व हे यांतील 'ओ' कंठोष्ठ आहे; त्याचप्रमाणें आर्या २१ मध्यें 'त्वां' हा शब्द आला आहे, त्यांतील 'व' तर दंतोष्ठ आहे. हे सर्व शब्द अपपाठ ह्मणावे तर तसेही ह्मणतां येत नाहीं. कारण अपपाठ हे बहुतेक नेहमींच अर्थापहार किंवा अर्थभ्रम होण्यास कारण होतात. तसा प्रकार येथें मुळींच नाहीं. शिवाय पंतांच्या पोथीप्रमाणें हे पाठही बरोबर आहेत. तेव्हां 'अंगुलिचा' 'तों' 'त्वां' हे कांहीं अपपाठ नाहींत, हे शब्द दुष्ट नाहींत, तसा वरील आख्यायिकेंतील 'रघुनाथ' शब्दही दुष्ट नाहीं. रघुनाथ साधूंचें परित्राण करणारा, व दुष्टांचा अग्रणी असतांना 'रघुनाथ' शब्द तरी दुष्ट कसा ठरेल! असो. वरील विवेचनाचें तात्पर्य एवढेंच कीं, सदर रामायण रचितांना पंतांच्या मनांत फक्त प वर्गातील पांच वर्ण गाळायचे होते. सबंद रामायण ओठास ओठ न लागूं देतां ह्मणतां यावें एवढाच हेतु मनांत धरून पंतांनीं हें निरोष्ठरामायण रचिलें आहे. माझ्या एका पोक्त रसिक मित्रानें एकदां मला सहज सुचविलें कीं दांतपडक्या ह्मातार्‍या मनुष्यांस ह्मणतां यावें ह्मणून पंतांनीं हें मुद्दाम त्यांच्या साठीं रचिलें असावें! या रामायणांत रावण शब्दाचे पर्याय शब्द 'दिक्कंठ' दिक्कंधर,' 'दिग्रथ' 'राक्षसराजा,' 'लंकेश,' 'आशाकंठ' वगैरे पंतांनीं योजले आहेत. त्यावरून पंतांचें शब्दभांडार केवढें अपरिमित होतें, हें स्पष्ट होतें. रा. देशपांडे मार्मिकपणानें आणखी ह्मणतात:—"अपवर्ग (मोक्ष) साधण्यासाठीं पंतांनीं येथें केवळ प वर्गाचा त्याग केला असावा. ज्या मयूर कवीनें महाभारत, भागवत अशा मोठमोठ्या काव्यांनीं महाराष्ट्रभाषेस अलंकृत करून स्तोत्ररामायण, लघ्वक्षररामायण, दामरामायण, दिव्य (दीर्घ) रामायण, परंतुरामायण, इत्यादि कितीक रामायणें कविस्फूर्तिजनित हर्षभरांत केवळ लीलेनें रचून आपलें रचनाचातुर्य दाखविलें, व ज्यानें केवळ आपला प्रतिज्ञाभंग होईल ह्मणून दंती, उत्सव, राक्षस, भरत इत्यादि शब्द सुचविण्यासाठीं 'दंपतीच अपकार,' 'उत्पूर्व सव' 'सांत जे राक्ष,' 'भव्या रत्नातत्वा आधींचे तीन वर्ण तन्नाम' (दिव्यरामायण) असलाले चमत्कारिक व कांहीं रसिकांस किंचिद्विषादक असे शब्दप्रयोग करून व 'परंतु' 'शिव,' 'गंगा,' काशी,' 'उमा' वगैरे शब्द विशेष एकेक रामायणाच्या प्रत्येक आर्येंत आणून आपलें भाषाप्रभुत्व प्रकट केलें—त्या मयूरकवीस प्रकृत काव्य वाटतें तसें 'निरोष्ठ' करण्यास कांहीं श्रम पडले असते, किंवा

जे पडते ते हत्तीस आपल्या शुंडादंडावर पुष्पमाला खेळविण्यास जितके पडतात त्याहून ते यत्किंचितही निराळे असते असें कोणाही रसिकास वाटणार नाहीं." हें सारें रामायण तोंड उघडें ठेवून ह्मणतां येतें! यांतील २।३ आर्या पहाः—

**श्रीहरिदशरथनंदन झाला दशकंठसंक्षय कराया।**
**दर शेषचक्रही जनि घेती जगदखिलसंकट हराया॥ १॥**
**सकनिष्ठ सदार निघे चरणगति, तयासि तात रथ धाडी।**
**सारथि गंगा तरतां, त्यजि, अजि! न विषाद खेदही झाडी॥ ८॥**

---

## ५ विशिष्टनामक रामायणें. (४५–५९)

---

(४५) **प्रियरामायणः**—हें रामायण वैतालीय किंवा वियोगिनी उर्फ सुंदरी या वृत्तांत रचलें असून शेवटीं कांहीं भिन्नवृत्ताचेंही श्लोक यांत आहेत. हें रामायण उत्तमांपैकीं एक असून कवीनें काळजीपूर्वक रचिलें आहे. याची भाषा प्रौढ व प्रेमळ आहे. वैतालीयवृत्त करुणरसपोषक असल्यामुळें कांहीं ठिकाणीं अत्यंत गोडी आली आहे. सरळ व लहानलहान पण पूर्ण वाक्यें जागोजाग आल्यामुळें या काव्याला पुष्कळ सुबोधता आली आहे. सीताहरणप्रसंगाचे कोमल श्लोक पहाः—

**हरि कामसहाय हा यती। वदली शापुनि 'हाय! हाय! ती।**
**अजि! राघव वीररायजी!। करुणा ती त्यजिलीच काय जी?'॥३॥**
**अवलोकुनि गृध्रपा वटीं। यश घ्याया अतिभव्य शेवटीं।**
**वदली, 'निरवा दयारसें। अजि मामाजि! पहा, उठा' असें॥२५॥**
**करितो अरितापहानितें। समरा त्या सुरवृंद वानितें।**
**रथ भंगुनि सून सोडवी। परि त्याचे विधि पक्ष तोडवी॥ २६॥**

यांत आर्या ७२–७६ पर्यंत यमकानुप्रासांची मौज केली आहे. एका आर्येंत पहिल्या व तिसऱ्या चरणांत, दुसरींत पहिल्या व दुसऱ्या चरणांत, तिसरींत दुसऱ्या व चवथ्या चरणांत चवथींत मध्येंच याप्रमाणें चतुर्विध यमकें सहजगत्या साधलीं आहेत! कसलेल्या पैलवानानें जसें जातां जातां सहज-

---

१ यतिवेष घेणारा तो कामी रावण. २ जटायु. ३ राघवाचा सीतालाभरूप आनंदाचा भंग. ४ ब्रह्मदेव.

लीलेनें पद्याचे हात करावेत त्यांतलाच हा प्रकार आहे! मारुतीचें गौरव करतांना पंत म्हणतात:—

**बहु पुत्रवती तयांत एक त्रिजगीं एकचि अंजना भला वी[1]।**
**निगमस्तुत[2] ही स्तवा जयाच्या निजजिव्हेप्रति कंजनाभ[3] लावी! ॥१०३**

'पुत्रवती जगांत पुष्कळच झाल्या आहेत, व होतील. पण त्या सर्वांत अंजना श्रेष्ट होय, कारण कीं तिनें भल्या पुत्राला जन्म दिला. त्या पुत्राच्या भलेपणाचें सर्वोत्कृष्ट प्रमाण एवढेंच सांगायचें कीं वेदस्तुत जो परमेश्वर राम त्यानेंही त्याच्या गुणगणांचें गौरव करण्याकडे आपली जिव्हा लाविली!' असा या श्लोकाचा अर्थ आहे. साक्षात् परमेश्वराला आपल्या गुणांनीं प्रसन्न करून आपले गोडवे गायला जो लावतो तोच भला, व अशा पुत्राला प्रसविणारी तीच पुत्रवती खरी. असा उदात्त भाव या सुंदर श्लोकांत पंतांनीं प्रकट केला आहे! परमेश्वराला संतोष देण्याइतकें व त्याला हर्षभरानें मान डोलवायला लावण्याइतकें उदात्त चरित्र ज्यानें करून दाखविलें त्यानेंच जननीच्या कुशीला जन्म घेऊन तिला कष्टविल्याचें सार्थक केलें हें तत्व पंतांनीं या श्लोकाच्या द्वारें जगाला सांगितलें आहे! अशीं सुंदरतत्वें ज्या रामकथागंगेंत बुड्या मारतांना पंतांच्या हातीं लागलीं तिचें पावनत्व काय वर्णावें? रामकथा वारंवार गातां गातां मनाचे चंचलत्वादि व्यापार सारे खुंटले व मन शांत आणि स्थिर झालें असा स्वानुभव पंत शेवटीं सांगतात:-

**प्रभुच्या चरणीं मयूर भावें।**
**'प्रिय रामायण, हें नमूनि वाहे।**
**यश हेंचि सुखें सदैव गावें**
**स्थिरता याचि रसीं मनासि आहे ॥ १०८ ॥**

(४६) **सद्वित्तरामायण**:—पंतांवर अर्वाचीन देशाभिमान्यांचा एक आक्षेप आहे कीं पंतांनीं आपल्या समकालीन किंवा किंचित्पूर्वकालीन योद्ध्यांचीं व मुत्सद्द्यांचीं चरित्रें गायचें सोडून देवस्तुति करण्यांतच आयुष्य वेंचलें! पण पंत ह्मणतात, 'प्रभूच्या अवतार चरित्रांत प्रतिपदीं जीं उदात्त तत्वें आढळतात, सगुणावतारांत जीं सूक्ष्म कोडीं उलगडतात व योग्यादिकांना दुर्लभ असा जो परमानंद होतो तो सोडून 'क्षुल्लक मानवांचीं बरीं वाईट कृत्यें वर्णून आह्मांस व जगास काय फायदा?' ह्मणून पंत जरा टा-

---

१ प्रसवली. २ वेदांनीं स्तविलेला. ३ कंज ह्म० ब्रह्मदेव ज्याला नाभिकमलापासून झाला तो विष्णु.

म्हणून सांगतात कीं, '**मनुष्यलीला प्रभूचीच गावी**' असा आमचा तर संकल्प आहे! पुष्पक विमानांत बसून श्रीराम अयोध्येस परत आले तेव्हां 'प्रमोद भारी भरतासि झाला.' त्या भरतभाग्याचें वर्णन पंत करितातः—

**न त्या महाला त्रिजगांत जोडा। असे समाधींत परंतु थोडा!**
**अन्योन्य योगी ह्मणते 'न सोडा!'। दुराग्रहें हें जनहो! न खोडा ॥११८॥**

भरताला व अयोध्यावासी जनांना परब्रह्ममूर्ति रामदर्शनाचा जो परमानंद झाला तसा आनंद कोणालाही कोठेंही होणें नाहीं! समाधिसुख त्यापुढें वापुडें आहे! योगीजन जर तेथें समक्ष असते तर ते एकमेकांला ह्मणते कीं, 'आतां योगाभ्यास सोडून द्या, पण हा सगुण ब्रह्मानंद सोडूं नका!' पंत आपल्या सोबत्यांस कळवळ्यानें सांगतातः-'हें माझें मत खोडूं नका! दुराग्रहानें फसाल. पंतांची सगुणभक्ति किती जाज्वल्य होती हें अशा उद्गारांवरून स्पष्ट दिसतें. या रामायणांत सर्वमान्य सिद्धांत बरेच गोंवले गेले आहेत. लक्ष्मणावर सीता वृथा कोपली तेव्हां पंत ह्मणतात, 'बरोबरच आहे, '**कोपोदयीं सत्व नुरे विवेकीं**' ह्म. क्रोधाचा उदय झाला कीं, विवेकांत बळ राहत नाहीं, कोपोदयीं विवेक पांगळा होतो. बिभीषण रावणास बोध करितांना ह्मणतो, '**सर्वस्व होतें अनयें परावें**' ह्म. नीति सोडली कीं, आपलें सर्वस्व परक्याच्या हातांत जातें. हा सिद्धांत व्यवहारांत व राज्यशास्त्रांत मुद्दां किती खरा आहे! रामराज्य प्रजेला किती तरी सुखाचें गेलें!

**करी प्रजा भावुनि रंजनातें। मानी प्रजा भाउ निरंजनातें ॥१२०॥**

ह्म. राम प्रजेला मुलांसारखें सुखवूं लागला व प्रजा त्या मूर्तब्रह्माला आपला भाऊ मानूं लागली. असो. हें रामायण याप्रमाणें गूढतत्वप्रकाशक आहे.

( ४७ ) **गद्यरामायणः**—हें रथोद्धतावृत्तांतलें रामायणही बहुत गोड आहे. भगवंताचींच अवतारचरित्रें गावींत असें पंतांनीं मागील रामायणांत सांगितलें आहे. यांत पंतांनीं सांगितलें आहे कीं, '**शुद्धरीति कविबुद्धि मोहरी,**' ह्म० महाजनपंथ किंवा सत्पद्धती हिचाच कविबुद्धीनें पुरस्कार करून तीच लोकांपुढें मांडावी. जनतेला चांगला मार्ग लागावा या हेतूनें कवीनें काव्यरचना करावी. सत्कवि असतात ते सज्जनांचा मार्ग जनतेला दाखवीत असतात. हें धोरण पुढें ठेवूनच पंतांसारखे जगत्कवि काव्यरचना करितात. याच रामायणांत जटायूला रामानें पितृसख ह्मणून जो आदर दाखविला, बापाचा मित्र ह्मणजे आपल्याला बापासारखाच पूज्य

होय असें कुलीन तरुणाला भूषणास्पद होण्यासारखी 'शुद्धरीति' दाखविली त्याचें वर्णन करितांना पंत प्रेमभरानें ह्मणतात:--

**जो स्वतातसख त्या जटायुतें । तो नमी प्रभु शिरें जटायुतें ।**
**पीति यांचि कवि साधुरीतितें । जी सुधा न असि माधुरी तितें ॥३४॥**
**पुत्रसाचि करि राम तत्क्रिया । तातसाचि वरि गृध्र सत्क्रिया ।**
**गाति या सुकवि रामरीतितें । जी सुधा ह्मणति पामरी तितें ॥५५॥**

(४८ **सुरामायण**:--हें भुजंगप्रयात वृत्तांत रचिलें आहे. यांत विशेष सांगण्यासारखें कांहीं नाहीं. रचनाप्रवाह चांगला आहे. रावणाचे बंधुपुत्रादि सर्व मेल्यावर त्याची वृत्ति फार चंचल झाली, त्याचा संताप शिगेस चढला, सूडाच्या बुद्धीनें त्याचे डोळे लाल झाले. इकडे रामपक्षीयांत जयश्रीनें सर्व वानरवीर तर्र होऊन गेले होते, अशा वेळची रावणसुग्रीवांची शब्दांची खणाखणी तर पहा:---

**' वधा राम, सुग्रीव, सौमित्रि, भक्षा,**
**ह्मणे राक्षसांतें, ' निघा, राज्य रक्षा[1] ।**
**उठा, दाव[2] व्हा शत्रुच्या सैन्यकक्षा[3] ।**
**भिडा, जानकीचें जडो वक्ष वक्षा ! ' ॥ ९१ ॥**
**करी रावण क्रव्यभुक्[4] सर्व गोळा,**
**ह्मणे, ' हूं ! वधा, वीर हो ! शत्रु घोळा ' ॥**
**वदे त्यांसि सुग्रीव, ' धूळींत लोळा, ।**
**रणीं भग्न व्हा, दांत खा, हात चोळा ! ! ' ॥ ९४ ॥**

याच्या शेवटल्या श्लोकांत पंतांनीं सांगितलें आहे कीं, 'रामगुणगायनाशिवाय आतां मला दुसरें कांहीं आवडत नाहीं; आत्महिताचा याहून दुसरा मार्ग नाहीं.

( ४९ ) **श्रीहररमणीय रामायण**:--याचें वृत्त तोटक आहे. हें बहुमधुर आहे:--

**प्रभुचें यश सेव्य सुधासरसें । भुलवी अबुधांस, बुधांस, रसें ।**
**पशु[5] पी रघुपाळकथा नरसा । [6]वरि सोडुनि वाळक थानरसा! ॥८०॥**

( ५० ) **सद्भक्तसर्वस्व रामायण**:--हें रामायण वसंततिलका वृत्तांत असून यमकप्रचुर व संस्कृतशब्दमय आहे तथापि क्लिष्ट नाहीं. यांतील

१ रावण. २ शत्रुसैन्यारूप गवताला तुह्मीं वणवा होऊन जाळून टाका. ३ उरःछाती. ४ मांसभक्षक. ( रक्षक ). ५ वानर, मारुति. ६ सेवी, स्वीकारी.

यमकें सहासहा अक्षरीं आहेत. सीतेनें लक्ष्मणाचा धिक्कार करून त्याला रामशोधार्थ पाठविलें तेव्हां:—

**रामाकडे रडत तो धृतताप गेला,**
**सोडी तिला-खग जसा कलुषापगेला, ।**
**तों ये दशानन, बळें हरि एकलीला,**
**इच्छी गतायु उरगीसह भेक लीला! ॥ ४५ ॥**

नित्यशांत पण क्षणभर क्षुब्ध झालेल्या सीतेला गढूळ झालेल्या गंगेचा दृष्टांत किती तरी शोभतो! रावणानें सीतेला पळविलें खरें, पण त्याचें परिणामाकडे लक्ष गेलें नाहीं, हें सुचविण्याकरितां व गर्वानें फुगलेल्या रावणाला पातिव्रत्यानलांत होमून टाकण्याचें सीतासामर्थ्य दर्शविण्याकरितां दिलेला बेडुकसर्पिणीचा दृष्टांत तरी किती समर्पक आहे! पुढील एका श्लोकांत किती वाक्यांचा समावेश झाला आहे. रावणास राम ह्मणतात:—

**दे जानकी, शरण ये मज, जोड पाणी,**
**कीं राज्यजीवितकुळांप्रति सोड पाणी, ।**
**लोकेश्वरासि भज तूं, अभयार्थ जा गा,**
**जागा मिळेल न जगीं तुज, होचि जागा ॥ ९४ ॥**

अशींच आणखी कित्येक रामायणें आहेत. (५१) **वरदरामायण** वृत्त प्रतिमाक्षरा (श्लो. ६७) आहे. (५२) **श्रीरमणीरामायण** याचें वृत्त सारंग (श्लो० ८०) आहे. (५३) **भावरामायण** याचें वृत्त मंदाक्रांता (श्लोक० ११९) आहे (५४) **सच्छ्लो० रामायण** याचें वृत्त हरिणी (श्लो० ८१) आहे. (५५) **श्रवणामृत रामायणाचें** वृत्त नर्दटक (श्लो० ९५) आहे. (५६) **सत्कीर्तिरामायणाचें** वृत्त स्रग्धरा (श्लो० २१) आहे. (५७) **कल्याणरामायणाचें** वृत्त पज्झटिका (श्लो० ७९) आहे. (५८) **रामायणपीयूषाचें** वृत्त मालिनी (श्लो० १०९) आहे. 'स्वजन न उरला हो! एकहा या सहाय,' 'प्रभुयश कवणाचें चित्त आकर्षिना तें'! असे कित्येक बिंदु पीयूषांत आहेत. (५९) **सद्रत्नरामायण.**

———

## ६ विविधवृत्तात्मक रामायणें. ( ६०–७४ )

( ६० ) **अनुष्टुब्रामायणः**—हें सप्तकांडात्मक रामायण फारच सरळ, सोपें व चित्ताकर्षक आहे.

**श्रीसत्यधर्म रक्षाया सोडिली सत्वर क्षिती ।**
**कीं साधुपुत्र ताताचें सर्वस्वें सत्व रक्षिती ॥ १५ ॥**

सीतात्यागानंतर रामानें विलाप केला त्या प्रसंगाचा 'चैतन्यारोप' पहाः—

**वनीं विलाप प्रभुचा ज्याचिया श्रवणीं पडे, ।**
**रडे खग, मृग, व्याघ्र, द्रुम, वल्ली–असें घडे ॥ ५१ ॥**

भरतभेटीनंतरचा 'सारालंकार' पहाः—

**मोठा उत्सव भेटीचा, प्रवेशाचा तयाहुनी, ।**
**भारी राज्याभिषेकाचा, ऐसें वाखाणिती मुनी ॥ १४८ ॥**

( ६१ ) **आद्यार्या रामायणः**—याचें वृत्त सर्वप्रसिद्ध आर्येसारखेंच आहे. मात्र चवथ्या चरणांत तीन मात्रा कमी असल्यामुळें ह्मणायला जरा जड जातें. शूर्पणखा रामलक्ष्मणांकडे आली तेव्हांच्या दोन आद्यार्या पहाः—

**मायारूपवती ती प्रभुसि ह्मणे; 'मीच सार सत्य. जुनी ।**
**स्त्री न बरी, कुटजें[2]कुसुम चुंबि न अळि सारस त्यजुनी' ॥ ३७ ॥**
**लक्ष्मणहि ह्मणे, 'वेड्ये ! त्यजुनि प्रभु वांछितीस कां दास ? ।**
**प्रतिबिंबास चकोरी न भजे सांडुनि चांदास !' ॥ ३९ ॥**

हें वृत्त पंतांनींच प्रथम मराठींत आणलें. तेच ह्मणतात, 'आद्या आर्या, कवीड्या[3], अतितर मधुरा–प्राकृतीं हे न आली.' ही आद्यार्या कवीड्या आहे, कारण हिचें पंतांनींच गौरव केलें आहे, पण ही अतितर मधुर आहे असें मात्र मला वाटत नाहीं !

(६२)**पहिलें दोहारामायण** व(६३)**दुसरें दोहारामायणः**-वरील वृत्ताप्रमाणें दोहावृत्तही पंतांनींच प्रथम मराठींत आणलें आहे, व हें त्यांना चांगलें साधलें आहे. त्यांनीं या वृत्तांत कित्येक लहान लहान स्तोत्रें रचिलीं आहेत व तीं फार नामी आहेत. पहिल्या दोहारामायणांत पहिला व तिसरा आणि दुसरा व चवथा असे चरण यमकांनीं बांधले आहेत व तीं

१ श्रेष्ठ. २ कुड्याचें फूल. ३ पंडितांनीं स्तवन केलेली.

यमकेंही बरींच लांबट आहेत. दुसऱ्यांत ही यमकाधीनता सर्वत्र दृष्टीस पडत नाहीं, ह्मणूनच कीं काय कोण जाणें तें पहिल्याहून ज्यास्त सरस आहे. पहिल्यांतलें उदाहरण:--

**लंकाराज्य बिभीषणा प्रभु दे नमितां पाय।**
**कनकाचळचि[1] करी कणा, कृपा वदावी काय ! ॥ ६३ ॥**

दुसऱ्यांतले दोहे:--

**श्रीरामाचें वारितें पातक सारें नाम।**
**सकृदुच्चारें[2] तारितें सर्व पुरवितें काम ॥ २ ॥**
**पीयुषाहुनि शतगुणें रामाचें यश गोड।**
**याचें उदारपण ह्मणे मंदारा[3], कर जोड ॥ ४ ॥**
**शबरीस बरी भेट दे, सद्गति कीर्तिहि राम।**
**बदरें पदरें घे तिचीं ज्याचें अमृतचि नाम ॥ ३६ ॥**
**शंका हरुनि बिभीषणा रंका संगरधारें[4]।**
**पंकापहगुणसिंधु[5] दे लंका श्रीरघुवीर ॥ ६५ ॥**
**अरि वधिल्यावरि आणवी सीतेतें बाहेर।**
**करुनि प्रेम न आठवूं दिलें जिला माहेर[6] ॥ ६६ ॥**

( ६४ ) **सूरारामायण**:—' सूरा या हिंदुस्थानी वृत्तांत हें रामायण रचिलें असून फार गोड आहे.

**सीतासती राहेल कां ? श्रीस्वामिची ती सावली।**
**सौमित्रिच्या तो मानसीं हे-बाप तो, ती मावली[7] ॥ २४ ॥**

रामाबरोबर वनांत जायला सीता व लक्ष्मण तयार झाले तेव्हाचा हा गोड श्लोक आहे.

( ६५ ) **पंचशती रामायण**:--हें साकीबद्ध असून पंतांच्या उत्तमांतलें आहे. यांत पांचशें साक्या आहेत. वर्णनविस्तार, कथासंदर्भ, भाषासौंदर्य या गुणांत हें पहिल्या मंत्ररामायणाशीं कांहींशी स्पर्धा करील. यांत ह्मणी, लोकोक्ति, अर्थगौरवाचे विविध प्रकार, शुद्ध मराठी शब्दरचना यांची रेलचेल असून भाषादृष्टीनें विद्यार्थ्यांकडून एकदां वाचून घेण्याची

---

१ मेरुपर्वत, सुवर्णगिरि. २ एकवार उच्चारल्यानें. ३ कल्पवृक्षास. ४ युद्धांत शूर. ५ पापनाशक अनेक गुणांचा सागर. ६ सदय पति आपल्या भार्येला माहेरचा विसर पडेल इतकें सुख देतो. ७ आई.

खबरदारी पालकांनीं जरूर घ्यावी. सरळपणा मात्र सर्वत्र सारखा नाहीं. याचे थोडे मासले पहाः—

**बळकट सुतशोकव्याघ्र धरी नृपहरिणाचें नरडें[1]।**
**आलें फार अयोध्येला परि कैकेयीला न रडें[2] ॥ ४६ ॥**
**ब्रह्म[3] स्वीकारी पुत्रत्व प्रेमें दे पिंड वित्या[4]।**
**क्षाळीं नयनजळें तत्कर्मा संसारीं हिंडवित्या[5] ॥ ६७ ॥**

युद्धानंतर रक्तनद्या इतर नदांना न मिळतां थेट समुद्राला मिळायला गेल्या. उघडच आहेः—

**कीं लोकीं प्रायशः स्त्रियांचें सक्त न मानस दीनीं ! ॥ ३४२ ॥**

स्त्रिया बहुधा दरिद्री भ्रताराचा अव्हेर करितात, निदान त्यावर अत्यंत अनुरक्त तरी नसतात असा मुक्तेश्वराप्रमाणें मोरोपंतांचाही अभिप्राय दिसतो. रावणाबद्दल पंतांचा विनोदः—

**निश्चय करि, ' नरकपि मारावे कीं आपणाचि मरावें ? ।**
**तद्दैव ह्मणे, ' जें शेवटिलें चिंतित तेंचि करावें ! ' ॥ ३६५ ॥**

( ६६ ) **पंचचामर रामायणः**—ह्या रामायणांत भरतभेटी-पासून पुढचा प्रसंग अत्यंत बहारीनें वर्णिला आहे. रामभरतांची भेट, रामाचा अयोध्याप्रवेश व पौरजनांचा आनंद हे प्रसंग या रामायणासारखे अन्यत्र कोठेंही वर्णिलेले आढळणार नाहीत. भरताची रामभेटीची उत्सुकता, पौरांची लगबग व दुंदुभिध्वनींची गर्दी हे सर्व व्यक्त करण्यासारखे-च धांवतें वृत्त या प्रसंगाला लाधल्यामुळें दुधांत साखर पडल्यासारखें झालें आहे ! प्रत्येक चरणांत आठ टेके देऊन घाईघाईनें पुढील चार श्लोक वाचावेत, ह्मणजे त्यांची माधुरी कळेल व कविता व गानकला यांचा येथें मिलाफ झाला आहे हें समजून येईल !!

**सानुज[6] प्रभूत्तमासि जाय चिंतीत क्षण[7] ।**
**प्रेक्षितां दिसे विमान भव्य पुण्यलक्षण ।**
**वाटला विलोकित्यांस गाय वत्सल क्षण[8]**
**श्रीनिवास, तोहि साधुराय वत्सलक्षण ॥ ७० ॥**

१ सुतशोक हाच कोणी वाघ त्यानें दशरथरूप हरिणाचें नरडें बळकट धरिलें. २ हा रूपकालंकार आहे. ३ सगुण ब्रह्म जो राम. ४ विणारा, जन्म देणारा जो दशरथ त्याला. ५ संसाराच्या फेऱ्यांत हिंडविणाऱ्या त्याच्या कर्माला. ६ शत्रुघ्न सह भरत. ७ भेटीच्या वेळेचें चिंतन करीत. ८ क्षणभर राम गाय व भरत वासरू वाटलें.

लेववूनि पादुका, पदाब्जयुग्म[1] पाहिलें
साधुनें, तयावरि स्वशीर्षराज्य[2] वाहिलें ।
हुगतां शिरीं, [3]दयासमुद्र अश्रु वर्षला,
भेटला सुतासि तात, तेंवि राम हर्षला ॥ ७१ ॥
वृद्ध जे गुरु प्रधान ते सुखांत घातले,
पातले समस्त पौर, दर्शनेंचि [4]मातले, ।
भेटले बिभीषण, प्लवंगराज[5] सज्जन
सानुजास, पावले सुधासमुद्रमज्जना[6] ॥ ७२ ॥
वासवादि नंदनोत्थ पुष्पवर्ष वर्षले,
देवगायक प्रभूसि गाति, फार हर्षले, ।
नाचल्या वराप्सरा, मृदंग वेणु वाजले,
दिव्य दुंदुभिध्वनींस मेघनाद लाजले, ॥ ७४ ॥

( ६७ ) **विबुधप्रियरामायण:**—हें वृत्तही पंतांच्या आवडीचें आहे व रामायणही चांगलें आहे. हें 'वंदुनि प्रभुच्या पदांवर मस्तकासह वाहिलें' आहे, तेव्हां तें मधुर कां असणार नाहीं ?

धुंडितां विपिनें पुन्हांहि, कबंध राक्षस मारिला, ।
तारिला शबरी महामति जी तिचा भव सारिला; ।
वारिला हनुमन्मनोगद[7]; तो सुकंठहि पाळिला;
वाळिला निवटूनि तत्सुत[8] राघवें कुरवाळिला ॥ ३४ ॥

अंगदाचें युद्धकौशल्य व रणधीरता पहा:—

अंगदें गगनीं उडोनि महाबळें भुज झाडिले; ।
पाडिले मदमत्त चार, यमाकडे जड धाडिले; ।
आंतबाहिर वीर वीररसें निरंतर रंगले,
अंग[9] लेखिति ते तृण, त्यजिती न संगर भंगले[10] ॥ ५५ ॥

( ६८ ) **पृथ्वीरामायण; ( ६९ ) सवाईरामायण; ( ७० ) विद्युन्मालारामायण[11]; ( ७१ ) पुष्पिताग्रारामायण[12]; ( ७२ ) मत्त-**

१ दोन्ही पादकमलें. २ मस्तक व राज्य दोन्हीं वाहिलें यावरून भरताचें बंधुप्रेम व राजनिष्ठा दिसतात. ३ राम. ४ दर्शनानंदानें माजले. ५ सुग्रीव. ६ बुडी. ७ मारुतीचा चिंतारोग. ८ अंगद. ९ देह तृणासारखा लेखिती. १० हात पाय तुटले तरी. ११ यालाच पंतांनीं 'कथासुधा रामायण' असें ह्मटलें आहे. १२ याला पंत रामायण कल्पलता म्हणतात.

**मयूररामायण**; ( ७३ ) **घनाक्षरीरामायण**; व ( ७४ ) **एकश्लोकी रामायण.**

---

## ७ अस्थानप्रकाशित रामायणें (७५–७७)



काव्यसंग्रहांत चुकीनें तीन रामायणें स्फुट प्रकरणांत छापलीं गेलीं आहेत. काव्यसंग्रहकारांचें त्यांच्या रचनेकडे नीट लक्ष गेलें नाहीं. अंतर्बाह्य प्रमाणांवरून हीं निःसंशय रामायणेंच ठरतात.

( ७५ ) **रामप्रार्थना रामायण**:—हें अनुष्टुप् वृत्तांत आहे. पद्यसंख्या ४०. यांत रामाची प्रार्थना करितां करितां रामायणकथा अतिप्रेमळ वाणीनें गायिली आहे. हें नित्य गाण्यासारखें प्रभुस्तोत्रच झालें आहे:—

> **जे कामक्रोध लोभादी, यांहीं मोडूनियां बळें ।**
> **कर्में करविलीं, त्यांचीं भोगावीं लागतीं फळें ॥ २ ॥**
> **दिली गति तुवां, होतां पातकाकुळ ती सती. ।**
> **रामा! करी जी, जोडूनि हात, काकुळतीस ती ॥ १० ॥**
> **निर्भिमी निववाया भूकन्यकामनसेतुला ।**
> **रामा ! भक्तप्रियाहूनी अन्य काम नसे तुला ॥ २७ ॥**

या लहानग्या गोड काव्यांत अतिशय प्रसाद व प्रेम आहे. 'त्वदंश जीव मग कां अविद्या यांस भाजिती?' अशा गूढ प्रश्नांनीं पंतांचें मन गोंधळून गेलें होतें, तथापि संशयाच्या खोड्यांत त्यांनीं त्याला भरकटूं दिलें नाहीं. रामभजन व नामस्मरण याशिवाय अन्य तरणोपाय नाहीं असा त्यांचा निश्चय झाल्यामुळें 'रामा या मन्मुखीं स्थापीं नामा, आनंदवी मना' अशी त्यांनीं रामाची प्रार्थना केली आहे. (७६)**आर्यागीतिमुक्तामाला** याचें वृत्त आर्यागीति—ह्मणायला क्लिष्ट व रचायला बिकट असें आहे. (प. १०९) याच्या मूळ प्रतींत पंतांनीं मागाहून स्वहस्तानें कांहीं पाठभेद घातले आहेत. रावण काळग्रस्त झाल्यामुळें उपदेशाला अपात्र झाला हें सांगतांना पंत ह्मणतात:–

> **चोरास सुगम तिमिरीं धन, ' खळकर्णासि हितवचें गमात मिरीं '।**
> **अहिताचि होतें हितसें ज्या, त्याला शिकवणें अहो तेंहि तसें ॥ ४० ॥**

हें काव्य पुन्हां वाचतां पंतांनाच वाटलें कीं तिखट मिऱ्यांचा संबंध कर्णाकडे लावण्यापेक्षां डोळ्यांकडे लावणें अधिक इष्ट आहे. ह्मणून त्यांनीं स-

मासांत ' हितकर दुष्ट लोचनां गमति मिरीं ' असा अन्य पाठ दिला आहे.

(७७) **मुक्तामाला ( संस्कृत )** पंतांच्या संस्कृत काव्यांतलें उत्कृष्ट काव्य ह्मणजे त्यांची मुक्तामाला होय. हें काव्य मंत्ररामायणाच्या नंतर व बृहद्दशमाच्या पूर्वीं ह्मणजे पूर्ववयांतच रचिलें गेलें होतें. हें पंतांचें पंतांनाच किती आवडलें होतें हें 'नामरसायनां' तील पुढील प्रसिद्ध आर्येवरून व्यक्त होतें:–

**आर्या मुक्तामाला दाविन परि जरि तुह्मीं न मागाल, ।**
**लागाल प्रभुकंठीं घालूं, फुगवील कीं रमा गाल ! ॥ १०९ ॥**

या आर्येंत पंत मारुतिरायास विनोदानें ह्मणतातः " मीं आपली सरस मुक्तामाला तुह्मांला लांबून दाखवीन, पण तुह्मीं मागतां कामा नये! ती जर तुमच्या हातांत पडली तर तुह्मीं तिच्या परिमळानें मोहून जाल व परम रामभक्त असल्यामुळें असली उत्तम वस्तु रामाला अर्पण करायला धांवाल! तुह्मीं ती रामाच्या गळांत घालाल व प्रभुकंठाची मिरासीण जी सीताबाई ती सवतीमत्सरानें वेडावून संतप्त मात्र होईल!' कै. विष्णुशास्त्रीबोवांनीं निबंधमालेच्या दुसऱ्या वर्षाच्या अंकांतून सारी मुक्तामाला सुरेख मराठी अर्थासह छापून काढली आहे. मुक्तामालेंतल्या चार दोन मुक्ता व त्यांना मालाकारांनीं दिलेलीं कोंदणें पहा:—

**पंकेरुहदृशमध्वनि तं केवलमंगनानुजानुगतम् ।**
**शंके धावितमीक्षितुमंके विस्मृत्य शिशुमपि स्त्रीभिः ॥ ११ ॥**

अर्थः—" अंगना ( सीता ) आणि अनुज ( लक्ष्मण ) हींच दोवें ज्याच्या मागें काय तीं आहेत अशा त्या कमलाक्ष रामाला मार्गस्थ होतांना पाहण्यास नगरांतील स्त्रिया मांडीवरील मुलांसही विसरून धांवत आल्या असतील असें मला वाटतें. "

**' नंदनवनं व्रजेति त्वमवोचः सत्यमजकुलोत्तंस ।**
**स तु वनमगात्तमीक्षितुमविचार्य गतोऽसि नंदनं हंत ॥१८॥**

अर्थः—" हे अजकुलभूषणा दशरथा ! ' नंदना ! वनाला जा ' असें तूं बोललास तें खरें च बोललास; पण तुझ्या व त्याच्या अर्थग्रहणांत विपर्यास पडला. तो ' नंदना ! वनाला जा ' असें समजून मार्गस्थ झाला; आणि ' ( इंद्राच्या ) वनाला जा ' असा अर्थ मनांत आणून तूं विचार न करतां त्याच्या शोधार्थ तिकडे गेलास ( स्वर्गवासी झालास ) ! '

**नीता शुनाऽशुनाशायात्मन एवासि पुत्रिके मोहात् ।**
**हास्यति नो निधनमृते न मृते स्वयमस्य किं तवोत्कर्षः ॥**

अर्थः—" हे पुत्रिके ( सीते ) तुला रावणरूप श्वानानें आपल्याच नाशार्थ मोहवश होत्साता हरण केली; हें श्वान मरणाखेरीज तुला टाकणार नाहीं. आणि तें जर आपोआप मेलें नाहीं, तर तुझा महिमा तो मग काय !"

---

## ८ अप्रसिद्ध रामायणें. ( ७८–८८ )

( ७८ ) **छंदोरामायणः**—या रामायणाला दोन्ही हस्तलिखित पोथींत 'वृत्तरत्नमयरामायण' व 'साररामायण' अशीं पर्याय नांवें दिलेलीं आहेत. पंत छंदःशास्त्रांत निष्णात होते, हें त्यांनीं निरनिराळ्या रामायणांत निरनिराळीं वृत्तें योजिलीं आहेत यावरून स्पष्टच होतें. तथापि एकाच रामायणांत सारें छंदःशास्त्र ओतावयाचा किंवा रामकथामृतानें छंदःशास्त्र पावन करावयाचा विचार करून त्यांनीं हें रामायण रचिलें. याचीं दोनच कांडें मिळालीं असून त्यांतल्या ५४८ श्लोकांत ४०।४५ वृत्तें आलीं आहेत ! हें रामायण इतकें उत्कृष्ट आहे कीं, पंतांनीं छंदःशास्त्र, साहित्यशास्त्र यांचें आपलें सर्व ज्ञान खर्ची घालून व कवित्वशक्तीचें सर्वस्व वेचून हें 'सार' रामायण निर्माण केलें आहे. याचीं पुढचीं पांच कांडें मिळालीं नाहींत यावद्दल मला फारच वाईट वाटतें. मुक्तेश्वराचें संपूर्ण भारत आपल्या आयुष्यांत एकवार तरी वाचावयास मिळावें ह्मणून माझ्या जीवाला जशी तळमळ लागून राहिली आहे, तशीच पंतांच्या 'छंदोरामायणा'बद्दलही लागली आहे ! हें रामायण संपूर्ण सांपडल्यास पंतांच्या अष्टोत्तरशत रामायणांत यासच पहिलें स्थान द्यावें लागेल, इतकेंच काय पण पंतांची 'केकावलि' जशी जगन्मान्य होऊन बसली आहे तसेंच हें 'छंदोरामायण' ही जगन्मान्य होऊन बसल्याशिवाय राहणार नाहीं. पंतांच्या कवित्वाचा व भक्तिभावाचा उत्कर्ष जसा केकावलींत झाला आहे तसा तो या छंदोरामायणांतही झाला आहे. अष्टोत्तरशतरामायणांपैकीं हें शेवटचें रामायण असावें व यानंतर पंतांनीं 'केकावली'कडेच आपलें चित्त वळविलें असावें. पंतांचे प्रतिभा, प्रज्ञा व प्रेम हे तीनही गुण प्रकर्षास पावल्यानंतरच अल्पावकाशांत त्यांनीं छंदोरामायण व केकावलि हीं अत्यंत सरस काव्यें निर्माण केलीं असावीत असें या काव्यांच्या दिव्यगुणांवरून मला वाटतें. दुर्दै-

त्रांची गोष्ट कीं हें छंदोरामायण संपूर्ण उपलब्ध झालें नाहीं व केकावलीची पंतलिखित प्रतही आढळत नाहीं. मैराळबोवांना चोरांनीं अजिऱ्याच्या वाटांत गांठून लुटिलें तेव्हां हीं दोन उत्कृष्ट काव्यें नाहींशीं झालीं असावींत. छंदोरामायणाचीं कांहीं पृष्ठें सांपडलीं व केकावलि मुळींच नाहींशी झाली असावी. कसेंही असो. पंतलिखित केकावलि आजवर मला पाहण्यास मिळाली नाहीं व छंदोरामायणाचीं पहिलीं दोनच पत्रें सांपडलीं आहेत. या रामायणांत लहान लहान सर्ग निरनिराळ्या छंदांत रचून वृत्तवैचित्र्याची पंतांनीं कमाल करून सोडली आहे. भाषा सरळ, साधी व पराकाष्ठेची गोड; सहज साधलेले अनुप्रासादि शब्दचमत्कार; उदात्त विचारांचा व रामभक्तीचा कळस, आणि प्रयासावांचून आलेले विविध रस व अलंकार, यामुळें चित्तवृत्तींचा अद्भुत प्रकारानें विकास होऊन वाचकांस आपण साक्षात् रामराज्यांतल्या भाग्यवंत रामपरिजनांपैकीं आहोंत असें वाटल्याशिवाय व कलियुगाचा कांहीं काल तरी विसर पडल्याशिवाय राहत नाहीं. असो, छंदोरामाणाशीच वाचकांची आतां ओळख करून देऊं ह्मणजे झालें. या रामायणांतले किती उतार देऊं आणि किती नाहीं असें मला झालें आहे! सर्वत्र सारखें अमृत भरलें आहे. दशरथस्त्रियांबद्दल पुढील श्लोक पहा:--

**भार्या आर्या दशरथनृप प्रीतिनें नित्य लक्षी,**
**चित्तें वित्तें करुनि सुखवी सर्वतः प्रेम रक्षी, ।**
**सर्वा गर्वासह न धरिती लेश अन्योन्य दावा,**
**कांत स्वांतप्रिय गुण असा काय त्यांचा वदावा ? ॥ सर्ग१-५॥**

कौसल्यादिकांच्या गर्भारपणाचें वर्णन ( सर्ग. ५ ) पहा:--

शालिनीः—

**अंतर्वत्नी[1] त्या तिघी भूपजाया। जाल्या आधीं दोहदें पांडुकाया ।**
**दानीं त्राणीं पूजनीं मात्र गोडी। अन्नीं पानीं भाषणीं प्रीति थोडी॥१॥**
**जाली त्यांच्या अद्भुता दीप्ति[2] देहीं। होती सारे दीप विच्छाय[3] गेहीं।॥**
**भूपालस्त्री यद्यपि स्वल्पभूषा। तेजस्तोमें जिंकिती चंद्रपूषा[4] ॥ ३ ॥**
**प्रीत्युत्कर्षें जें परामर्षकाजा। जाय स्त्रींच्या नित्यगेहासि राजा।**
**तेव्हां प्रत्युत्थान देतां निवारी। हस्ताधारें ऊठतां यत्न भारी ॥ ५ ॥**
**जों जों होती गर्भसंस्थूळ पोटें। तों तों भूपाच्या मनीं सौख्य मोठें।**
**आनंदाची वृद्धि गर्भोपरीस। राजस्वांतीं[5] जाहली रात्रिदीस ॥ ७ ॥**

---

१ गर्भार. २ कांति. ३ निस्तेज, हतत्विष. ४ चंद्रसूर्यांना. ५ चित्तीं.

रामाच्या 'बाललीले' चे १६ श्लोक व राम वनवासास निघाले तेव्हां कौसल्येनें व अयोध्यावासी जनांनीं केलेल्या विलापांपैकीं २१ श्लोक 'मोरोपंतीं वेंचे' या पुस्तकांत मीं घेतले आहेत ते वाचकांनीं जरूर वाचावेत, ह्मणजे उत्तम कवित्व व अस्सल प्रतीची भक्ति यांचा मिलाफ सत्कवीला कसा करितां येतो हें चांगलें समजून येईल. रामाच्या बाललीला (सर्ग ६) पहा:-

**इंद्रवज्राः—**

**पीतां स्तनातें क्षणमात्र राहणें, । महादरें मातृमुखासि पाहणें, ।**
**वक्त्रांत तें दुग्ध तसेंचि वाहणें, । येणेंचि फूत्कार करूनि नाहणें!॥सर्ग**

हा 'स्वभावोक्ति' किती तरी हृदयंगम आहे!

**मुखांतुनी दुग्ध गळे सुनिर्मळ । उरावरी ये अतिशुभ्र वोगळ ।**
**मंदाकिनीचा गगनीं प्रवाह तो । चंद्रप्रभापांडुर काय वाहतो!॥सर्ग६·३**

श्यामवर्ण रामाच्या मुखांतून उरावर वाहणाऱ्या 'दुधाच्या वोगळावर' नीलवर्ण आकाशांतल्या आकाशगंगेच्या पट्ट्याची केलेली उत्प्रेक्षा किती तरी उदात्त आहे!

**बैसोनि हर्षे जननीचिया कडे । विलोकुनी तन्मुखनीरजाकडे[1] ।**
**स्मितामृतापूरित[2] बोल वोबडे । बोले तदा ब्रह्मसुख स्वयें दडे॥**
**धात्री जई रामकरांबुजाप्रती । धरूनियां चालीवती स्खलद्गती[3] ।**
**चुंबी धरा ती प्रभुपादनीरजें[4] । अलभ्य ज्यांची दिविषज्जनीं रजें[5]॥**
**पित्यापुढें रत्नविराजिकंकणें । करें नमस्कार करूनि ठाकणें ।**
**धात्र्युक्त[6] सारें निजवृत्त सांगणें । अशा गुणें तो करि नाक[7] ठेंगणें॥**

हें वर्णन किती तरी सहज व मधुर आहे! 'रघू'च्या तिसऱ्या सर्गांतल्या २।३ श्लोकांची जरी या वर्णनांत छाया पडलेली आहे, तरी त्यांतल्या कवित्वांत पंतांनीं भक्तिशर्करा मिश्रित करून हा चपक गोड केला आहे. रामलक्ष्मणांच्या बंधुप्रेमाचें वर्णन नित्यसंबद्ध अशा तनु--छायेच्या दृष्टांतानें किती सुरेख केलें आहे तें पहा:—

**छाया तनूची तनुला न सोडी । त्या बंधुची एक तशीच जोडी ।**
**परस्परीं त्यांसि अपार गोडी । त्या मित्रभावा उपमाचि थोडी॥१६॥**

विश्वामित्राच्या स्वाधीन रामास करण्याचें दशरथानें नाकारिलें तेव्हां संतप्त झालेला तो मुनि 'वक्रोक्तीनें' ह्मणतो:-

**१ मुखकमलाकडे. २ मंदहास्य हेंच अमृत त्यानें भरलेले. ३ अडखळत. ४ कमलें. ५ देवांनाही जी धूळ दुर्मेळ ६ दाईनें शिकविलेलें. ७ स्वर्ग.**

**मणिमाला:—**

**जो काम तो जाला नृपा ! हो कामना तूझी तरी !**
**लोकनिंदा[1] यांचा[2] अशी शोकावहा[3] नोहे बरी ।**
**तोकासि तूं देऊं नको, धोका[5] नसो चित्तांतरीं**
**ओकासि[6] जातो, कां करूं स्तोकामुळें[7] धी[8] बावरी?॥**
**राया मला केला बरा सत्कार ! तूं साधू खरा !**
**जालों कृतार्थ क्ष्मावरा ! आतां सुखें जातों घरा ! ।**
**पुत्रासवें पाळीं धरा, धाकों नको दिक्‍ंधरा**
**विप्रावनीं चिंता जरा पीडा नसे विश्वंभरा ॥ स० ११-४ ॥**

विश्वामित्रगुरुहस्तीं रामचंद्रास देतांना दशरथ त्यास सांगतो:—

स्वागता:—

**आत्मतेज मुनि हा तुजमाजी**
**ठेवुनी मथिल राक्षसराजी ।**
**चंद्रमंडळि जसा स्वकरांशीं**
**स्थापुनी रवि निशातम नाशी ॥ स० १३-११ ॥**

'अंधकाराचा निरास—आपला प्रकाश चंद्रावर पाडून—सूर्य ज्याप्रमाणें करितो, त्याप्रमाणें विश्वामित्रमुनि आपलें तपस्तेज तुजमध्यें ठेवून तुजकरवीं राक्षसांचा संहार करील !' हा या श्लोकाचा अर्थ आहे. उपमा तर सर्वोत्कृष्टच आहे, पण या श्लोकांत दोन तत्वें ग्रथित केलीं आहेत. सूर्यप्रकाशाच्या परावर्तनानें चंद्राला प्रकाश प्राप्त झाला आहे हें ज्योतिषशास्त्रातलें सर्वमान्य तत्व येथें सांगितलें आहे, त्याचप्रमाणें क्षत्रियतेजाला मुख्य बळ ब्रह्मतेजाचें आहे हेंही ध्वनित केलें आहे. सर्ग १९।२०।२१ यांमध्यें उदीच्यवृत्ति, प्राच्य वृत्ति, चित्रा, शिखा, रुचिरा वगैरे १९ वृत्तें २२ श्लोकांत आणलीं आहेत ! येथें बालकांड संपलें ! कैकेयी वर मागते त्याबद्दल पुढील सहा अक्षरी चरणाची 'तनुमध्या' पहा:—

**चित्तेच्छित सांगे । ऐसा वर मागे ।**
**स्वार्थी बहु सज्जा । जाली गतलज्जा ॥ स० २३-५ ॥**

कैकेयीस राम ह्मणतात:—

**ह्मणे राम, "तातार्थ मीं प्राणदान**
**करीन क्षणें, हें मनीं सत्य मान ।**

---

१ दुसऱ्यांस पीडा देणारी. २ याचना. ३ दुःख देणारी. ४ मुलाला. ५ भय. ६ घरीं. थोडक्यासाठीं. ८ चित्त.

त्यजीन स्वयें राज्य-दारा-धनांतें
स्वमातांचिया ही पदाराधनातें ॥ सर्ग० २५-२३ ॥
करी जो अनुज्ञेविना तातकार्य
जनांमाजि तो धन्य सत्पुत्र आर्य ।
दुजा बोलिला मध्यम प्राक्तकारी
न वर्ते नियोगेंहि जो तो भिकारी " स० ॥२५-२४ ॥

वनवासांत ताताज्ञेनें जाण्याचा निश्चय रामानें कौसल्येस सांगितला तेव्हांचा ' वि-ल्लेखा[2] ':—

ऐकोनी हे वार्ता, जाली ते शोकार्ता ।
रामाची ही वाणी, लागे वज्रावाणी ॥ सर्ग २५-३८ ॥

कौसल्येचा विलाप, लक्ष्मणाचा संताप, दशरथाचा आक्रोश, रामाचा निश्चय, अयोध्यावासि जनांचा गोंधळ याचें २६ व्या सर्गांत ' विबुधप्रिया ' वृत्तांत कवीनें जे हृदयद्रावक वर्णन केलें आहे तें विबुधांनाच काय पण अबुधांनाही अत्यंत प्रिय वाटल्याशिवाय राहणार नाहीं. ते सर्व येथें देण्यास अवकाश नाहीं.

कौसल्या ह्मणत्ये:—

' वासरा ! तुज वास राजसुता ! वनीं रुचला कसा ?
कां कठोर करूनि मानस टाकिशी मज लोकसा'? ॥ २ ॥

यावर राम ह्म०:—

' अंब ! तूं नगरीं असें, मम तात वृद्ध सचिंत हा,
सेवनें सुखवीं, मनीं धरिं धीर, मीं नमितों पहा, ' ॥ ७ ॥

'मी स्त्रीजित दशरथाला बांधून कैदेत टाकतो व तूं राज्यारूढ हो, असें लक्ष्मणानें रामास सुचविलें तेव्हां:—

लक्ष्मणासि धरूनियां हृदयीं ह्मणे रघुराज तो,
हें यथार्थ, परंतु बा ! समयीं पराक्रम साजतो ! ।
पूर्ण हो जननीमनोरथ, सत्यसंध पिता असो,
दंडकांत चतुर्दशाब्द तपोधनीं जन हा वसो ' ॥ ६ ॥

१ हा श्लोक अध्यात्मरामायणांतील ' अवाज्ञप्तोऽपि कुरुते पितुःकार्यं स उत्तमः ( अयोध्या० सर्ग ३ ) या श्लोकाचें सरळ भाषांतर आहे. २ वीज चमकावी त्याप्रमाणें सुखस्वप्नांत लोळणाऱ्या त्या सतीला या वार्तेनें धक्का दिला हें दर्शविण्यासाठीं आमच्या चतुर कवीनें येथें ' विद्युल्लेखा ' चमकावली आहे हें उघडच आहे !

पुढें:—

वंदुनी जननीजनांप्रति रामचंद्र निघे तदा
ने मलाहि ह्मणोनियां धरि लक्ष्मण प्रभुच्या पदा।
मायबापहि टाकिले, परि बंधुरत्न न सांडिलें,
स्नेहबंधन सज्जनें भुवनत्रयींहि न तोडिलें ! ॥ ९ ॥

या श्लोकाच्या उत्तरार्धातला अर्थांतरन्यास परमावधीचा रमणीय आहे. नागरिकांनीं केलेल्या विलापांतले ४।५ श्लोक देऊन हें प्रकरण पुरें करूं.

जेधवां प्रभु तो निघे सहसा वनाप्रति जावया
पौर ते रडती, समस्तहि टाकिती द्रविणालया।
त्या रथासह धांवती पडतीं पथीं किति कश्मळें
'हा!' असें वदती मुखें, नयनांतुनी गळती जळें ॥ २६ ॥
लोक सर्वहि शोकविव्हळ ओक टाकुनि धांवले,
कीं तृषाकुळ सर्व ते अमृताशयाप्रति पावले,।
रोधिती रथमार्ग, पाहति रामचंद्रमुखाकडे,
बर्हिवेष्टित विद्युदंबुदसाम्य तैं प्रभुला घडे ॥ २७ ॥
लोक ते कर जोडुनी ह्मणती, 'वियोग न साहवे,
स्पष्ट संयमनीसमान पुरीस आज न पाहवे।
त्वत्पदांकित काननीं विचरूं जसे सुरनंदनीं
सर्व सौख्य असे त्वदास्य विलोकनीं पदवंदनीं ॥ २८ ॥
त्वद्वियुक्त मनासि तोष नसेचि षड्रसभोजनीं,
गायनीं, शयनीं, धनीं, वसनीं, सुरूपवधूजनीं,
स्यंदनीं तुरगीं, गजीं, भुवनत्रयीं, स्वकळेवरीं,।
ने वनास जनास या रघुनायका! करुणा करीं ॥ ३१ ॥
यापरी वदती रथासह धावती अनिवारित,
कोटियज्ञ पदोपदीं अखिलाघसंचय सारित,।
पावले तमसातटाप्रति लोक तों रवि मावळे
काय पौरकथा वदों, नगरासि टाकिति कावळे! ॥ ३३ ॥

हें सारें रामायण प्रसादगुणानें फार सुलभ व रमणीय झालें आहे.

( ७९ ) त्रुटितरामायणः—या अपूर्ण रामायणांत रामाच्या विवाहकालाबद्दल, वाल्मीकिरामायणाच्या अनुरोधानें पंत ह्मणतातः—

सा वर्षांची भूमिकन्या विवाहीं
होतीं अब्दें पंधरा राघवाही।

**साकेतींही स्त्रीसवें वास बारा**
**वर्षें झाला रामचंद्रासि सारा ॥ १ ॥**

ह्मणजे राम व सीता यांच्या वयांत ९ वर्षांचेंच अंतर होतें व वनवासारंभीं सीतादेवींचें वय अवघें १८ वर्षांचें होतें. रामाचा विवाह बालपणीं झाला होता असें भवभूतीनेंही उत्तररामचरितांत 'शैशवात्प्रभृति पोषितां प्रियां' इत्यादि पद्यांत सांगितलें आहे. भवभूति व मोरोपंत यांसारखे जगत्कवि 'आधारावांचून काहणी' सांगण्यास प्रवृत्त होत नाहींत. याच रामायणांतला भरतकैकेयी यांचा मजेचा संवाद मागें दुसऱ्याच प्रकरणांत (पृष्ठ ३७) दिला आहे. देवर ह्म. दीर लक्ष्मण यास सीतादेवी जें बेडेवांकडें बोलली त्या प्रसंगींचा सुंदर अर्थांतरन्यास पहा:—

**ऐसें ऐकुनि देवरोक्त मग ती बोलों नये तें वदे,**
**'दुष्टा! तूं उटजास सोड, उठ जा,' आज्ञा अशी त्यास दे।**
**येतां आत्मविनाशकाळ न रुचे सद्बुद्धिही मानसा**
**शोकक्रोधभयात्त बुद्धिस गमे जो आप्त तो शत्रुसा! ॥ २ ॥**

(८०) **एकपदीरामायण** हें मला चातुर्मासे बोवांच्या दप्तरीं सांपडलें. हें रामायणांच्या पोथ्यांत दिलें नव्हतें, तथापि हें रामायण आहे असें खास वाटतें.:—

**पद.**

**धणी तो माझा रघुवर धणी।**
**जो मुनीस दे सुखधणी ॥ धृ० ॥**
**मथुनि ताटिका कौशिकमुनिमख रक्षुनि लेंकुरपणीं।**
**भर्गचाप भंगूनि जानकी प्रणिली दुस्तर पणीं ॥ १ ॥**
**जनकाज्ञेहुनि राज्यरमाही मानुनियां ठेंगणी।**
**सपत्नीक सानुज विपिनातें नृपधानीसें गणी ॥ २ ॥**
**खरप्रमुख नक्तंचर खरतर शरें वधुनियां रणीं।**
**शिवागृध्रबलिभुग्गादिकांची घडवी जो पारणी ॥ ३ ॥**
**युवतिचोर दशवदन थोर जो प्रबळ सकळ खलमणी!**
**मथुनि पुत्रमित्रांसह जेणें सोडविली स्वरमणी ॥ ४ ॥**
**ज्याची पदयुगली जनशोकद्रुम आमूलहि खणी।**
**मयूराशि घन चकोराशि विधु अशि सुखदा देखणी ॥ ५ ॥**

(८१) **रामनामाष्टोत्तरशतरामायणम्**:—हें रामायण संस्कृतांत रचलेलें आहे. ३० श्लोकांतल्या १०८ विशेषणांत सारी रामकथा गुंफली आहे ! एकच श्लोक पहा:—

**महेश्वरधनुर्भंगा जानकीप्राणवल्लभः ।**
**जामदग्न्याहंकृतिघ्नः पितृचित्तप्रसाधकः ॥ ६ ॥**

(८२) **मंत्ररामायण**:—याचें वृत्त मोठें आहे. प्रत्येक चरण २५ अक्षरांचा आहे. श्लोकसंख्या ६३ आहे:—

**मारुति कोपे रावण लोपे सुटुनि रजनिचर बहु शत निवटी**
**तें पुर जाळी सद्‌गृह पाळी खळखळनम हरिउजळुाने दिवटी ।**
**'हाय' ह्मणाया लावुनि सारे त्रिजगद्‌हितकर निशिचर परते**
**तो अतिपून श्रीपतिदूत क्षितिजनिस नमुनि पुनरपि परते ॥२३॥**

(८३) **स्रग्विणीरामायण**:—हें स्रग्विणीवृत्तांत रचिलें असून याची श्लोकसंख्या ९४ आहे. पंतांच्या अनेक सरळ काव्यांप्रमाणें हेंही धांवत्या भाषेत लीलेनें सहज लिहिलेलें आहे. श्रम अणुमात्र कोठेंही नाहीं.

**ती ह्मणे देवरा, 'आर्यपुत्रा ! वना**
**धांव बा ! वाटतो घात माझ्या मना'।**
**तो वदे, 'त्या मृगें राक्षसें दाविली**
**भीति मिथ्या, खरी त्वां कसी भाविली ?' ॥ २९ ॥**
**'हाय !' बोले, निघे जाय रामाकडे**
**तों फळ श्रीस त्या बोलण्याचें घडे ।**
**एकटी राहतां रावणा सांपडे**
**संकटीं न छळें साधुच्या कां पडे ? ॥ ३१ ॥**

(८४) **श्रीरामायण**:—याचें वृत्त शिखरिणी असून श्लोकसंख्या ५१ आहे. यांत शब्दचमत्कारांकडे लक्ष ठेवूनही पंतांनीं सरलत्वाची कोठेंही हानी होवूं दिली नाहीं. यांत संस्कृत शब्दांचें प्राचुर्य आढळतें, पण तेणेंकरून कोठेंही रसभंग झाला नाहीं:—

**महीजा शोधाया सुगळ बहु जो पाठवि हरी—**
**हरासे तेजस्वी-परि ह्मणति शाकें 'हरि हरी,' ।**
**हरो तो संगाती सकळकपिचिंताब्धिलहरी**
**हरीष्टार्थी सिंधु श्वसनज उडे, हर्षवि हरी ॥ १७ ॥**

---

१ सर्वकवींचा चिंतासमुद्र त्यानें आटविला. २ रामाचें इष्ट साधण्याकरितां. ३ मारुती.

असे शब्दचमत्कार साधूनही पंतांना इतका सरळपणा कसा ठेवतां आला याचें कौतुक प्रत्येक मर्मज्ञास वाटल्यावांचून राहणार नाहीं. रामानें राक्षसभार मारायचा सपाटा चालविला तेव्हां:--

म्हणे काळ क्रोधें, 'मजहि न असें शीघ्र मथवे!'
थवे देवर्षींचे नवल करिती, तें न कथवे।
वधी कोटी कोटी बळ न भरतां चार घटिका
टिकों श्रीचा पाडी दशवदनसंकल्प लतिका॥ ३५॥

(८५) दण्डकरामायण:—हें ३०।३१ अक्षरी चरणांच्या दण्डकवृत्तांत रचिलें असून चांगलें सरस उतरलें आहे. याची श्लोकसंख्या शंभरावर आहे. पहिलाच श्लोक पहा:--

दशरथ नृप सूर्यवंशीं अयोध्यापति ख्यात
लोकीं प्रतापें यशें शक्रसा शोभला।
परम अमरनाथ ज्याच्या गुणा भृग पद्मास
कीं मानसा हंस तैसा सदा लोभला॥
शतमखरिपु पाहतां संगरीं त्यावरी
श्रीशसा श्रीमहाभद्रसा तो प्रभु क्षोभला।
सकळ सुकवि बोलिले 'हा जसा साधु
न प्रार्थनापूरक स्वर्गशाखी तसा तो भला!'॥ १॥

ह्या रामायणाचें वृत्त मोठें असूनही त्यांत प्रसाद, साधेपणा व गोडी अनुपम आहे. श्रम कोठेंही नाहींत व रुळावरून धावणाऱ्या अग्निरथाप्रमाणें वाचक पहिल्या श्लोकावरून सुटला कीं अनायासानें अखेरपयत मजेनें जातो!

(८६)प्रहर्षणरामायण:—ह्याची श्लोकसंख्या ८९ आहे. श्लोकांची धाटणी धोपटमार्गाची आहे. रामराज्याभिषेकोत्सवानंतर:—

हर्षौघीं शिशुमुख सर्व पौर वाहे
केले जे द्विज गुरु पात्र गारवा हे।
श्रीराम पितृपद फार शोभवीले
वात्सल्यें पशुखगचित्त लोभवीलें॥ ७८॥

१ कदन करितां येत नाही. २ तिलक. श्रीचा म्ह० सीतेचा सौभाग्यतिलक अर्थात् राम होय.

(८७) तन्त्रीरामायण:—ह्याचीही श्लोकसंख्या ८५ असून वृत्त मोठें व अपरिचित आहे. रावणवधानंतर राम अयोध्येस परत आले तेव्हां:—

**प्राण शरीरीं रघुतिलक निजीं तेंवि पुरीं सुखकर शिरला हो,**
**त्या अभिषेक प्रभुसि गुरु करि, ' सांग ' ह्मणे, ' जग सुख चिर लाहो!'।**
**हर्षवि माता द्विज पुरजन ते गौरवि वानर निशिचरभर्ते**
**स्वव्यवहारीं निजजनक तसा धर्मनयासि अनुसरुनि वर्ते ॥ ८० ॥**

(८८) हें काठें गहाळ झालेलें आहे.

---

## ९ विद्वानांचे अभिप्राय.



हें रामायणांचें प्रकरण आंखडतां आंखडतां बरेंच लांबलें आहे. रामचंद्र बडव्यासारख्या पंतांच्या समकालीन रसिक मित्रांनीं पंतांनीं अष्टोत्तरशत रामायणें 'पृथग्रम ह्मणजे भिन्नभिन्न प्रकारची गोडी देणारीं' रचल्याबद्दल पंतांची वाहवा केली होती. प्रत्येक रामायणांत कांहीं निराळी खुबी आहे, निराळा रंग आहे, निराळी व अनुपम गोडी आहे असें मलाही वाटतें. पंतांचें मंत्ररामायण हरिदासांचें फारच आवडतें आहे, बाकीचीं कांहीं कांहीं रामायणें कुणाकुणाच्या पाहण्यांत असत. ७९ रामायणें प्रथम थोडीं अव्यवस्थेनें जेव्हां छापलीं गेलीं, तेव्हां अर्वाचीन पंडितांनीं बिचाऱ्या मयूरकवीवर आक्षेपांचा भडिमार केला. डॉ. विल्सनप्रभृति लोकांचें ह्मणण असें पडलें कीं; 'पंतांनीं शब्दचित्रें रचण्यांत व यंत्रें बांधण्यांत आपल्या बुद्धीचा अपव्यय केला!' निबंधमालाकारांनीं ह्या आक्षेपाचें सुरेख खंडण (अंक ५२) केलें आहे. ह्या रामायणांत वैचित्र्य आहे, पण कृत्रिमपणा बिलकूल नाहीं. बहुतेक रामायणें निरनिराळ्या वृत्तांत निरनिराळे मंत्र साधून रचिलीं आहेत एवढाच त्यांचा विशेष आहे. परंतुरामायण, निरोष्ठ रामायण, विचित्ररामायण, दीर्घरामायण, इत्यादि ७।८ रामायणांत विशेष करामत आहे खरी, पण ' हीं साधण्यासही आमच्या कर्वीचे श्रम झटले ह्मणजे हत्तीस आपल्या शुंडादंडावर पुष्पमाळा खेळविण्याचे जितके श्रम तितकेच बहुधा होत!' प्रस्तुत रामायणांबद्दल मालाकार आपल्या वक्तत्वपूर्ण व कवित्वमय वाणीनें ह्मणतात:—"पंतांच्या रामायणांस तरफदारीची ही जरूर नाहीं. वरील रामायणें ही आमच्या कवीच्या वाग्देवतेचा केवळ स्वतंत्र लीला आहे. होमरच्या महाकाव्यांतील वीर युद्ध आटपल्यावर जसें

रंगयुद्धांत परस्पर झगडले व नाना तऱ्हेच्या कसरती करून त्यांनीं करमणूक करून घेतली, किंवा चितार्‍यानें मुख्य चित्र तयार झाल्यानंतर जशी भोंवताली नक्षी व वेलबुट्टी काढण्यांत आपली करामत खर्चावी, त्याप्रमाणेंच आमच्या कवीनें भारतादि मोठमोठ्या ग्रंथांनीं आपल्या जन्मभाषेस अलंकृत करून शेवटीं आपल्या उपास्यदेवतेच्या प्रीत्यर्थ आपल्या सरस्वतीचा ओघ जलयंत्रोद्वारांप्रमाणें चित्रविचित्रतेनें प्रगट केला आहे! यास्तव राजमंदिराच्या भोंवतालीं कारंज्यांचीं शोभा केली असल्यास कारागिरास नांव ठेवणें जसें शोभणार नाहीं, व जलतुषाराचें वैचित्र्य पाहून तटस्थ राहणाराच्या अंगींहा विशेष रसिकता मानण्याची गरज नाहीं, त्याप्रमाणेंच प्रसंगवशात कृत्रिमतेचा प्रकार केल्यानें व वाहिल्यानें कवि व रसिकही दोषास पात्र होतो, असें आह्मांस वाटत नाहीं." पण ह्याशिवाय आणखीही एका गोष्टीचा विचार झाला पाहिजे. पंतांचें भारत रचून झाल्यानंतर त्यांना लौकिकाची व कीर्तीची चाड राहिली नव्हती. भागवती प्रकरणें किंवा मंत्रभागवत रचतांना पंतांच्या चित्ताची काय अवस्था होती याचें मागील प्रकरणाच्या शेवटीं विवरण झालेंच आहे. ही रामायणांची रत्नमाळा तयार होतांना रामप्रभूच्या प्रसादाशिवाय आपल्याला कोणा मर्त्याकडून वाहवा मिळावायची आहे अशी पंतांचा यत्किंचित् कल्पना होती असें मला वाटत नाहीं. पंतांची लोकेषणा भारतसमाप्तीनंतर तृप्त झाली. संतप्रकरण त्यांनीं संतांविषयीं कृतज्ञतेचा प्रेमादर व्यक्त करण्यासाठीं रचिलीं. भागवताला हात लावण्यापूर्वीं पंतांची मुमुक्षा परा कोटीला पोंचली होती, तेव्हां भागवत, हीं रामायणें, व केकावलि केवळ रामप्रीत्यर्थ त्यांनीं रचिली यांत तिळमात्र शंका नाहीं. एकही रामायण त्यांनीं कोणाच्या सांगण्यावरून रचिलें नाहीं. रामावांचून माझ्या कानामनाला दुसरें कांहीं प्रिय राहिलें नाहीं, रामयश निरंतर गाणें हाच प्रभुचरणीं चित्त स्थिर करण्याचा सुलभ उपाय आहे, रामाचे अनंत उपकार फेडून कांहींसें उत्तीर्ण होण्याचा मार्ग हाच आहे, रामचिंतनार्थ हा व्यासंग मीं आपल्या बुद्धीला लावून दिला आहे, 'कायादि सर्व रघुराया समर्पुनि' हा तच्चरित वर्णनाचा मीं आपल्या जिव्हेला ध्यास लावला आहे, रामयश गातां गातां दुर्बुद्धि नष्ट होऊन चित्ताला अनुपम उल्हास व दिव्य आनंद यांची प्राप्ति होते इत्यादि स्वानुभवाच्या गोष्टी पंतांनीं रामायणांच्या उपसंहारादि अनेकप्रसंगीं स्पष्ट सांगितल्या आहेत, यावरून लोकेषणेचा धूप प्रभूपुढें जाळल्यानंतरच त्यां-

नीं हीं रामायणें रचिलीं असून रामप्रसादाशिवाय दुसरा कसलाही हेतु त्यांच्या मनांत नव्हता. लोकेषणाच जर ठिकाणावर राहिली नाहीं, तर कृत्रिम काव्यें रचून त्यांना कोणापासून शाबासकी मिळवायची होती ? आधीं बरींच रामायणें मंत्रबद्ध आहेत. त्यांपैकीं कांहीं रामायण रामनामांकित आहेत. कांहीं तीर्थें, संत व विष्णुसहस्रनामावलि यांत गुंफलेलीं आहेत. कांहींना श्रीप्रिय, हररमणीय, सद्गीत, सच्छ्राव्य, इत्यादि गोड नांवें दिलीं आहेत. कांहींना त्या त्या वृत्तांचीं नांवें दिलीं असून ७८ रामायणें मात्र विशेष चमत्कृतिजनक अशीं आहेत. सर्वच रामायणांमध्यें सरळपणा व प्रेमभाव उघड आहेत. कोठें कोठें थोडासा दूरान्वय, थोडीशी क्लिष्टता, थोडेंसें काठिन्य दृग्गोचर होतें, पण ह्यामुळें कर्त्याच्या रामप्रीतीस थोडाही उणेपणा येतो असें मला वाटत नाहीं.

---

## १० उपसंहार.



" परंतुरामायण, निरोष्ठरामायण, विचित्ररामायण, अशीं चमत्कृतिजनक रामायणें रचण्याचें किंवा सगळीं रामायणें नानाविध–सोप्या व कठिण–छंदांत रचण्याचें पंतांना काय प्रयोजन होतें ? आपल्या लाडक्या आर्यावृत्तांत सरळपणानें त्यांनीं १०८ नाहीं तर १००० रामायणें रचलीं असतीं तरी आमची हरकत नव्हती ! पण मुद्दाम आपल्या पांडित्याचें प्रदर्शन करायचें त्यांना प्रयोजन नव्हतें ! " असाही आरोप पंतांवर कोणी घेत असतात. यावर एकच उत्तर देतां येण्यासारखें आहे. ज्ञानेश्वरमहाराजांनीं स्वधर्माचरणाचें रहस्य असें सांगितलें आहे:––

**हें संपत्तिजात आघवें । हवन द्रव्य मानावें ।**
**मग स्वधर्मयज्ञें अर्पावें । आदिपुरुषा ॥ ज्ञानं० ३–१३० ॥**

आपली सकलसंपत्ति हवनद्रव्य मानून परमात्म्याला अर्पण करणें हेंच स्वधर्माचरण होय. पंतांची संपत्ति ह्मणजे त्यांची सुसंस्कृत झालेली बुद्धि होय. पंतांनीं आपलें पांडित्य, आपलें भाषाप्रभुत्व, छंदःशास्त्र, साहित्यशास्त्र, व्याकरणशास्त्र इत्यादि शास्त्रांचें दीर्घव्यासंगानें प्राप्त झालेलें ज्ञान,–ही सर्व बुद्धिसंपत्ति आपल्या सत्वसंशुद्ध झालेल्या प्रेमळ मनोवृत्तींसह आपल्या उपास्य देवतेला समर्पण करण्यासाठीं हीं १०८ रामायणें रचलीं असें

मानण्यास आक्षेपकांनीं कां तयार नसावें ? सुजनांचें चरित्र कळायला कांहीं सौजन्य लागत नाहीं काय ? पंतांनीं आपलं बुद्धिसर्वस्व, आपलें गीर्वाण व प्राकृत भाषांचें विशाळ ज्ञान, व उभय भाषांवरचें आपलें स्वामित्व रामाला प्रसन्न करून घेण्यासाठीं रामायणें रचून या प्रकारें सत्कारणी लावलें याबद्दल प्रत्येक सज्जन त्यांचे धन्यवादच गाईल. “ वेडें वांकुडें गाइन। परि मी तुझा ह्मणवीन ”, अशी सद्भक्ताची शुद्ध भावना असली तथापि एकाद्या गायनकुशळ भक्तानें हातीं वीणा घेऊन प्रभुसंतोषार्थ मधुर आलाप काढले तर त्याच्या भक्तीचा कमीपणा मानण्याचें जसें कांहीं कारण नाहीं, त्याप्रमाणेंच विविधशास्त्रविशारद अशा पंतांसारख्या महापंडितानें आपल्या पांडित्याचा पूर्ण उपयोग प्रभुयश गाण्यांत केला तर त्याच्याही भक्तिभावांत उणपणा आहे असें मानण्याचें बिलकूल कारण नाहीं ! या रामायणांत भाषासाम्राज्यवैभव भोगणाऱ्या पंतकवीनें जर कोठें कोठें बुद्धिकौशल्य दाखविलें असेल तर तें लाडक्या लेंकरानें आपल्या जनकापुढें त्याला रंजावण्यासाठीं विविध चेष्टा कराव्यात त्या प्रकारचेंच आहे. त्याच्या सहज चेष्टांत जसा कृत्रिमपणाचा लवलेश नसतो, तसा पंतांच्या प्रभुप्रसादार्थ रचलेल्या या पुण्यकारक कृतींतही नाहीं.

---



# प्रकरण विसावें.



## अखेरचीं काव्यें.

**ह्मणोनि कवितासुता तुज समर्पितों; साजरी**
**नसे बहुतशी गुणी कनकपीतवासा! जरी, ।**
**तरी न इतरा वरी, हरि! करी इला किंकरी,**
**मयूरहि निजात्मजाग्रहविमुक्त जैसा करी. ॥ ३२ ॥**

—केकावलि.

१ हरिवंशाचा रचनाकाल. २ कृष्ण आणि गोप. ३ शृंगाररसाचा उत्कृष्ट मासला. ४ शंकरोपासनेचें तत्व. ५ ब्राह्मणमाहात्म्य. ६ गीतार्या. ७ भगवद्गीतास्तुति. ८ अहल्योद्धार. ९ केकावलीची लोकप्रियता १० केकावलीचें अतंःस्वरूप. ११ केकावलीचें टीकाकार १२. अवशिष्ट काव्यें व उपसंहार.

**१ हरिवंश:**—श्रीव्यासांनीं महाभारत ग्रंथ रचल्यानंतर त्याचें परिशिष्ट ह्मणून हरिवंश रचिला. महाभारतांत श्रीकृष्णाचीं राजकारणें जागोजाग वर्णिलीं आहेतच, पण श्रीकृष्णचरित्र प्रमुखत्वानें त्यांत आलेलें नसल्यामुळें त्यासाठीं हा स्वतंत्र ग्रंथ यांस रचावा लागला. भागवतांतही कृष्णचरित्र वर्णिलें आहेच व भागवत ग्रंथ अत्यंत सरस असाच झाला आहे. सूर्यापुढें चंद्र जसा फिका पडतो त्याप्रमाणें भागवतापुढें हरिवंश फिका पडला आहे. दोनही ग्रंथांत श्रीकृष्णचरित्रच मुख्यत्वें वर्णिलें आहे, पण भागवतांत जो रसपरिपाक उतरला आहे तो हरिवंशांत उतरला नाहीं. भागवतांत केवळ अमृत भरलें आहे व श्रीकृष्णचरित्रामृत जगाला पाजण्याचें काम भागवतानेंच केलें आहे. पंतांनीं भारत मराठांत आणलें, भागवत आणलें, पण त्यांचे धाकटे यजमान पांडुरंगराव नाईक यांनीं हरिवंश मराठींत आणण्याविषयीं त्यांना असकृत् ह्म. वारंवार सांगितल्यामुळें त्यांनीं हा ग्रंथ मंत्रभागवतानंतर लिहिला:—यांत कृष्णचरित्राच्या उत्तरार्धाचें व मुख्यतः द्वारकावासाचें विस्तृत वर्णन केलें आहे.

**श्रीपांडुरंगरायें असकृत्प्रेमें करूनि सांगावें ।**
**भगवन्निदेश जाणुनि सुयश यथाबुद्धि मग न गावें ? ॥ २ ॥**
**श्रीमंत्रभागवत या नामानें ग्रंथ जो तयांत करी ।**
**निजचरिताचा संग्रह, कांहीं येथेंहि करिल तोचि हरी ॥९॥**

मंत्रभागवतांत ज्या कृष्णकथा वर्णिल्या आहेत त्या व कांहीं त्यांत थोडक्यांत आणलेल्या कथा यांत पंतांनीं विस्तारानें सांगितल्या आहेत. या ग्रंथाचे ५४अध्याय असून आर्या ५४००वर आहेत! हा एवढा विस्तृत ग्रंथ थोड्यांच्याच वाचण्यात येत असेल. हा ग्रंथ कांहीं नीरस नाहीं, पण यांतील बहुतेक कथाभाग कृष्णविजय व मंत्रभागवत या ग्रंथांत येऊन गेल्यामुळें व त्या ग्रंथांसारख्या टापटिपीच्या आर्या यांत नसल्यामुळें हा बराच मागें पडला आहे. काव्य या दृष्टीनेंही या ग्रंथाची मातब्बरी विशेष नाहीं, यांतील आर्यांत भारती आर्यांसारखी तेजस्विता नाहीं व भागवती आर्यांसारखा प्रेमळपणाही नाहीं. तथापि ४।२ आख्यानें यांतही सरस अशीं आहेत. 'रसिकांना व साधूंना रंजविणाऱ्या आणि सुकुमारबुद्धि वक्त्यांश्रोत्यांत वाचनप्रीति उत्पन्न करणाऱ्या कथा' या ग्रंथांत मी संक्षेपानेंच सांगणार आहें असें पंतांनीं प्रथमच सांगितलें आहे. हरिवंशाच्या पंतलिखित मूळ प्रतीच्या मुखपृष्ठावर पंतांनीं मागाहून एक आर्या लिहिली असून शेवटच्या पृष्ठावर एक सुंदर श्लोक लिहिला आहे. ती आर्या व तो श्लोक येणेंप्रमाणें:--

**कवि ह्मणति कवन तैसें बहु उद्योगेंहि धन जसें मिळतें ।**
**जितुकेंचि मिळायाचें अधिक मिळेनाचि एकही तिळ तें ॥१॥**

**सजल जलदश्यामा रामा मनीं सुख वाटतें**
**चरितचि तुझें भावें गावें असें मज वाटतें ।**
**जनकतनयाकांता शांताकृते रघुनायका**
**पुरिव सदया कामा या माधवा वरदायका ॥ १ ॥**

या श्लोकांवरून हरिवंशानंतर पंतांचें चित्त बहुविध रामायणांकडे वेधलें असावें, असें अनुमान काढतां येतें. भारतानंतर भागवत, भागवतानंतर हरिवंश हा क्रम निर्विवाद आहे. पंतांचा हरिवंश रामायणकालीनच आहे असें वाटतें.

२ दुसऱ्या अध्यायांत ब्रह्मदत्त राजा व चिमणी यांची चटकदार गोष्ट सांगितली आहे. 'जेथें विरोध तेथें न वसावें' हें त्या गोष्टीचें तात्पर्य आहे. तिसऱ्या अध्यायांत पुढील सुभाषितरूप उत्कृष्ट आर्या सहज आली आहे:-

**चुकल्या जनांसि कोणी सांगुनि निजहितपथासि जो लावी।**
**धनदेंहि उपकृतीसी त्याच्या निजसंपदा न तोलावी ॥ ८२॥**

अकराव्या अध्यायांत राजाच्या कर्तव्याबद्दल ४१९ आर्याच आल्या आहेत त्यांत पुढील आर्या पहाः—

**जो शुभ निजप्रजांचें, देशाची वृद्धि, इच्छितो राजा।**
**तेणें पर जिंकावे, न उपेक्षावे कदापि या काजा! १३॥**

तेराव्या अध्यायांत कृष्णबलरामांच्या बालक्रीडा वर्णिल्या आहेत. एकच आर्या पहाः—

**हांसति, बहु हांसविती, परमधुर वदति बोबडे बोल!**
**वाजाविति पर्णवाद्यं श्रुतिसुखं, जन करिति सर्वहि लाल ॥ २२॥**

गोपांना श्रीकृष्णानें गोवर्धनाची पूजा सांगितली होती, पण गोवर्धन व गाई यांना सोडून गोप शक्राची पूजा करावी असें इच्छूं लागले, तेव्हां श्रीकृष्णानें त्यांना सुरेख नीति सांगितली. ती अशी कीं:--

**ज्याची जी वृत्ति असे, त्याची ती देवता-तिची सेवा।**
**जे वाद सांगातिल ते सांगोत, भजों नये परा देवा ॥ ३६॥**

त्यानंतरः—

**प्रभु गोपजनांसि ह्मणे, ' घालूं गोवर्धनाद्रि उजवा या।**
**कारती तैसेंचि जसें सांगे श्रीकृष्ण जन्म उजवाया ॥ ५८॥**
**वाजत, गाजत, साजत, त्या गोधनगोपगोपिकांसहित।**
**गिरितें प्रदक्षिण करी, कविरूपा आम्र जो पिकांस हित ॥ ५९॥**
**गोपी सुस्वर गाती, वाजविती रामकृष्ण मुरलीला,।**
**वेडचि लाविति सन्मुनिमतिला सुसमाधिमाजि मुरलीला!!॥६०॥**

या आर्या किती तरी गोड आहेत! 'विश्व मोहरे लावण्या'साठीं ज्या प्रभूचा अवतार झाला, त्यानें गोपगोपिकांना त्यांची जी वृत्ति-तिचा देव तो गोवर्धन-त्याची पूजा करावयास शिकविलें व आपणही महत्तम असून त्यांच्या बरोबरीनें लघुत्व घेतलें हें योग्यच झालें! थोरांची रीतच कांहीं निराळी असते! अध्याय १६।१७ मध्यें रामकृष्णांना अक्रूरानें धनुष्योत्सव पाहण्याच्या मिषानें कंसनगरींत नेलें व तेथील महारंगप्रेक्षणार्थ जमलेल्या पौरांसमक्ष कृष्णानें चाणूरादि राजमल्लांना मारिलें तो प्रसंग पंतांनीं चांगला वर्णिला आहे. या ग्रंथांत सुभाषितांची रेलचेल उडून गेली आहे. पंतांच्या

१ पावा. २ कर्णमधुर. ३ उदरनिर्वाहाचें साधन. ४ सफल करण्यास्तव.

भारतादि ग्रंथांत सुभाषितें पुष्कळच आहेत, पण हरिवंशांतील सर्व सुभाषितें एकत्र केलीं तर त्यांत पंतांचें राजनीतिनैपुण्य चांगलेंच दिसणार आहे. पुढील दोनच आर्या पहाः—

**नीति असी कीं-अबळें प्रबळासि रणीं कधीं न हटकावें ।**
**दैवें विरोध घडतां बळहीनें त्यजुनि मान सटकावें, ॥ २०-३ ॥**
**बहुतांचें संकल्पित जें तें होतेंचि निश्चयें कार्य ।**
**बहुजनहितार्थ मृत्युहि जयाचि, असें ह्मणति सर्वही आर्य ॥२३-४८॥**

३ या ग्रंथांत वीररस व शृंगाररस चांगले साधले आहेत, पण वीररसाचीं उदाहरणें मागें कुशलवचरित, मंत्ररामायण व महाभारत यांचें वर्णन करितांना दिलीं असल्यामुळें येथें आणखी जागा अडवीत नाहीं. शृंगाररसाचीं उदाहरणें पंतांच्या कवितत फारशीं नाहींत व जीं आहेत त्यांत शुद्धशृंगाराचीं दोन्ही उदाहरणें याच ग्रंथात आहेत! अ० ३५।३६।३७ मध्यें प्रभावती व प्रद्युम्न यांच्या विवाहाची कथा सांगितली आहे, व अ० ४१ मध्यें उषा व अनिरुद्ध यांची विवाहकथा वर्णिली आहे. पहिली पूर्ण विस्तारानें वर्णिली आहे. आपल्या कवितेंत शृंगाररसाची नीट बूज राहिली नाहीं असें वाटूनच कीं काय कोण जाणे पंतांनीं वार्धक्यांत रचलेल्या या ग्रंथांत प्रद्युम्नविवाहकथा विशेष विस्तारानें सांगितली आहे! प्रद्युम्न हा कृष्णसुत होता, व प्रभावती ही वज्रनाभाची कन्या होती. प्रद्युम्नाचे गुण तिच्या कानांवर घालताना तिची सखी हंसी ह्मणत्येः—

**कामोपभोगतुल्या प्रीति जगीं स्त्रीजना नसे दुसरी ।**
**पतिच्या संगावांचुनि सर्व स्त्रीच्या वृथा कळाकुसरी ! ॥ ६१ ॥**
**सुंदरि ! सुंदर वेर वर येतां प्रद्युम्न जरि पहातीस ।**
**श्रीविष्णुला जशी श्री, त्याला सर्वस्व तूं वहातीस ॥ ६२ ॥**
**सर्व जगत्सार करुनि एकत्र अनंग जो सुचिर काय ।**
**केला सांग प्रभुनें तो जैसा आपुला रुचिर काय[२] ॥ ६६ ॥**

असें प्रद्युम्नाचें सौंदर्यगुणवर्णन ऐकून प्रभावतीचें मन त्यावर लुब्ध झालें. शेवटीं महत्प्रयासानें हंसीनें त्यांची एकांतांत गांठ घालून दिली. ( अ. ३६ )

१ श्रेष्ठ, उत्तम. २ आपल्या मोहक देहाप्रमाणें.

प्रद्युम्नातें पाहुनि वाढे सहसा प्रभावतीकाम ।
विधुतें विलोकुनि जसा सागर, अद्भुत तसेंचि तें धाम ॥७०॥
राजात्मजा सलज्जा होवूनि उभी अधोमुखा राहे ।
साहे तज न बाळा मदनानन तिर्यगीक्षण पाहे ! ॥ ७१ ॥
"स्पर्शे स्मर देखाया मुख वदवाया प्रभावतीहनुतें ।
रोमांचरूप[6] कंचुक तो त्याचा स्पर्श लेववी तनुतें ! ॥ ७२ ॥
" करुनि अधोमुख मुख सखि! मजसी कांहींच तूं न कां वदसी?।
या वादाची उक्ति स्वीकारीं, काय चंद्र घे न दशी ? ॥ ७३ ॥
भीरु! भय त्यागावें, हा दास तुझा मिळो अनुग्रह या ।
प्रेमेंचि करिति कुलजा वश, सुख-लीनें[7] जसें अनुग्र हया " ७६

यानंतर उभयतांचा गांधर्वविवाह झाला, व:—

दक्षिण कर धरुनि स्मर शयनीं नें बैसवी तिला अंकीं ।
चुंबी मुख, आलिंगी, मदनीं बहु सुख धनें जसें रंकीं ॥ ८२ ॥
रमवी प्रद्युम्न बहु प्रेमें पाहोनि तदधिकार तितें ।
करि सुरत नवोढेसीं जें दे तन्मतिस तदधिका रतितें ॥ ८३ ॥
प्रेमें वेडचि लावी प्रद्युम्नास प्रभावती राया ।
त्या रसतरंगिणीचा लागो दे न प्रभाव तीरा या ॥ ८८ ॥

प्रभावतीच्या चंद्रवती व गुणवती अशा दोन चुलतबहिणी होत्या; त्या एके दिवशीं तिच्या भेटीस आल्या तों ' पुरुषवर प्राप्त तिला झाला हें इंगितें तयां कळलें, ' मग त्यांनीं तिला खोदून खोदून पुष्कळ विचारलें, तेव्हां तिनें सर्व वृत्तांत त्यांना सांगितला व त्या बरोबरच ' वरपुरुषसंग बाई! ब्रह्मानंद स्त्रियांसि जाणावा ' हा आपला ताजा अनुभवही त्यांस कळविला! प्रभावतीचे सुखविलास पाहून तिच्या उपवर झालेल्या बहिणींच्याही तोंडांस पाणी सुटलें! तेव्हां प्रद्युम्नानें गद व सांब यांना द्वारकेहून आणविलें व गदाचा चंद्रवतीशीं व सांबाचा गुणवतीशीं विवाह करून दिला. याप्रमाणें प्रभावती, चंद्रवती व गुणवती या अनुक्रमें प्रद्युम्न, गद व सांब या यादव-

---

१ कर्दम. २ तज. ३ मदनाच्या तोंडाकडे. ४ कटाक्षक्षेपानें. ५ तिचे मुखकमल पाहण्यासाठीं व तिला बोलवण्यासाठीं तिच्या हनुवटीला कोमलस्पर्श केला. ६ त्याच्या स्पर्शानें तिच्या अंगावर रोमांचरूप कंचुकी चढविली! ७ लगामानें. ८ शृंगाररसाची नदी; प्रेमरसाची नदी.

वीरांशीं रत झाल्या व 'आनंदाच्या परा कोटीला' प्राप्त झाल्या! त्या तिघींनाही पुत्र झाले. प्रभावतीला हंसकेतु, चंद्रवतीला चंद्रप्रभ व गुणवतीला गुणवान् असे पुत्र झाले. तिसऱ्या पुत्राबद्दल पंत ह्मणतात ( अ० २७ ):—

**जन्मींच तरुण जो तो सुत सर्वेहि सांग वेद पाठ वदे !**
**अभ्यास सुदृढ पहिला जाणों समयीं तयासि आठव[1] दे ॥ ॥१७॥**

आपल्या मुलींचें हें सर्व कपट वज्रनाभास कळलें व आपले शत्रु जे यादववीर त्यांच्यापैकीं तिघांशीं आपल्या मुली रमल्या हें त्या असुरपतीनें ऐकिलें तेव्हां त्याच्या तळव्याची आग मस्तकास गेली व कन्याहर्म्याला राक्षसांचा त्यानें वेढा घातला. हें पाहून तिघीजणी फार भ्याल्या व रडूं लागल्या तेव्हां:—

**हांस प्रद्युम्न ह्मणे, " रडतां कां ? वेड लागलें काय ? ।**
**हाय ह्मणावें न तुह्मीं वृष्णींचा रक्षितां सुखी राय ॥ २४ ॥**
**आह्मीं तुमचे नाथ स्वस्थ अजित अजितसंश्रयें आहों ।**
**पाहों शकें ब इकडे काळहि, ताडूनि भुज पुढें [2]राहों ! ॥ २५ ॥**
**आह्मांतें मारावें या अहितांच्या मनांत हा हेत ।**
**तुझिया संबंधें तों सर्वेहि हे मान्य पूज्य आहेत ! ॥ २७ ॥**

सत्वगुणप्रधान यादवांचा हा दयाळूपणा तामस राक्षसांशीं वागतांना योग्य नाहीं हें पाहून:—

**सुमति प्रभावती दे प्रद्युम्नकरीं कराल करवाल ।**
**ती त्यासि ह्मणे, " वांचा, वांचोनि यशें करवाल करवाल ॥ २९ ॥**
**जीर्णे साधु निवावें ती ठावी या न दानवां चाल ।**
**अहितजनां करुनि कृपा, शस्त्र न धरितां, कदा न वांचाल " ॥३०**

यानंतर यादववीरांचें व राक्षसांचे तुमल युद्ध झालें, श्रीकृष्ण द्वारकेहून आपल्या पुत्ररक्षणार्थ धांवून आले, व:—

**प्रभु निजपुत्रासि ह्मणे, " प्रद्युम्ना पातलों पहायाला ।**
**हूं मार वज्रनाभा, अनुचित वध संगरीं न हा याला " ॥ ५६ ॥**

---

१ वर्डस्वर्थनामक इंग्रजी कवीनें 'आत्म्याचें अमरत्व', ह्या काव्यांत "our birth is but a sleep and a forgetting; the soul that rises with us our life's star hath had elsewhere its setting" असेंच ह्मटलें आहे ! २ शृंगाररसानंतर ही वीररस फार शोभतो.

पित्राज्ञेनें प्रद्युम्नानें युद्ध केलें, वज्रनाभ रणांत पडला व त्याचें राज्य कृष्णानें प्रद्युम्न, गद व सांब या तिघांत वांटून दिलें. याप्रमाणें या प्रभावतीविवाहकथेंत संभोगश्रृंगार व वीररस हे दोन्ही रस पंतांनीं चांगले साधले आहेत. संभोगश्रृंगारही योग्य मर्यादेचें अतिक्रमण न होऊं देतां पंतांनीं जसा वर्णिला आहे तसा तो थोड्याच कवींना वर्णितां येतो.

४ श्रृंगाररसाचें आणखी एक उदाहरण अ. ४१ मध्यें उषा व अनिरुद्ध यांच्या संबंधाचें आहे. वर्णनप्रकार बहुधा वरीलसारखाच आहे. अ. ४५-४६ मध्यें पुष्कर व वाराह या प्रादुर्भावांचें वर्णन अतिसंक्षेपांत आणलें आहे. ज्यांचें गाळायचे असतील ते अध्याय एकेका आर्येंत आणून सोडतात. विस्तार त्यांना आवडत नाहीं किंवा करितां येत नाहीं असें नाहीं, 'पारि बहु विस्तर होतां भाषाग्रंथीं न गोड लागावा' एवढीच अडचण त्यांना वारंवार नडते. विस्तृत ग्रंथ लिहिला पण तो वाचणारे लोक कोठें आहेत? शेवटच्या ३।४ अध्यायांत शिवमहिमा वर्णिला आहे. श्रीकृष्ण शंकरास कां भजत. याचें उत्तर देतांना व्यासांचें मतच पंत ( अ. ४९ ) सांगतातः—

> **हरिहर हे सर्वोत्तम एकचि बा ! यांत लव नसे भेद ।**
> **वेद प्रमाण येथें, याचि ज्ञानें नृपा ! सरे खेद ॥ ४ ॥**
> **कोठें ईश्वरता हे, कोठें धरितात जीवता राया ।**
> **भजती अन्योन्यांतें, लीलेनें दास जीव ताराया ॥ ५ ॥**

पंतांनीं कैलासाच्या बहारीच्या वर्णनांत ( अ. ५० ) म्हटलें आहे:—

> **येथें सिंह-गज, मृग-व्याघ्र सहज वैरभाव सोडूनी ।**
> **क्रीडति एकत्र सुखें शाश्वत अन्योन्य सख्य जोडूनी ॥ ४ ॥**
> **जेथें गंगादि नद्या उत्पन्ना सागरंगमा झाल्या ।**
> **तप करुनि साधकांच्या येथें बहुकोटि निजसुखें ध्याल्या ॥ ५ ॥**

शंकरानें श्रीकृष्णस्तुति केली आहे तींत, " शं-सुख-याचा कर्ता म्हणून शंकर; हरिसी सर्व प्रलयीं म्हणून हरी; मा-विद्या तिचा पति म्हणून माधव; अशा भगवन्नामांच्या कांहीं व्युत्पत्ति दिल्या आहेत व ( अ. ५४ ) मध्यें त्रिपुरासुर शंकराच्या स्वरूपाचा नामी उलगडा केला आहे. श्रवण, मनन आणि निदिध्यास हे तीन डोळे ज्याला आहेत तो त्र्यक्ष किंवा त्रिनेत्र होय. स्थूल, सूक्ष्म व कारण हे तीन देह म्हणजे त्रिपुर, याचा उच्छेद त्रिनेत्राकडूनच होतो हें सुजाण वाचकांस कांहीं सांगावयास नकोच. पुढील आर्या पहा:—

**शंकर ह्मणजे बोध, श्रवण-मनन तीन साधनें शूळ, ।**
**कामक्रोधादि असुर, देव शमादि, श्रुतीच या मूळ ! ॥ ६ ॥**

त्रिपुरनगरींत इंद्रियाश्व व मनोरथरूपी रम्य गृहें बहुत आहेत ! कामादि असुर हे आपल्या तृष्णादि स्त्रियांच्या संगतींनें बेहोष होऊन सुरांना ताप देतात, व पुरातन धर्मपंथ मोडतात. वैराग्यरूपी महापर्व पातलें तरी मायाबळें हे असुर हृदयाकाशीं वासनारूपें लीन होऊन राहतात. ह्मणून जीवानें सावध रहावें. हा 'शंकर ह्मणजे सुखकर कथिला प्रणतांसि ईश्वरें बोध' त्या आत्मज्ञानमार्तंडास शरण जावें ! हा ५४ वा अध्याय शंकरोपासनेचें मर्म जाणूं इच्छिणारांनीं मुद्दाम मननपूर्वक वाचावा.

५ **ब्राह्मणमाहात्म्यः**—या ओवीबद्ध प्रकरणास '**दुर्वासभिक्षा**' असेंही ह्मटलें आहे. ( ओवीसंख्या २३६ ) 'जे जे ब्राह्मणांचे दास । ते ते जयलक्ष्मीचे निवास' हें सिद्ध करण्यासाठीं हें प्रकरण लिहिलें आहे. हें प्रकरण अनुशासन पर्वांतून घेतलें आहे. सहस्त्रार्जुन मदोन्मत होऊन ब्राह्मणांची हेळणा करूं लागला, व मी सर्वांचा आश्रयदाता असल्यामुळें सर्वश्रेष्ठ आहें असें मानूं लागला, तेव्हां पवन ऋषीनें त्याला सांगितलें:-

**शोभा, पराक्रम, जीवन, । लोकांत जैसें मस्तकाधीन ।**
**तैसें नसतां ब्राह्मणभजन । अमंगळ वर्ण सर्वही ॥ २८ ॥**

नंतर पवन मुनीनें त्याला काश्यप, वसिष्ठ, अत्रि, च्यवन या ब्राह्मणांच्या पुण्यकथा सांगून ब्राह्मणांची योग्यता त्याच्या निदर्शनास आणली तेव्हां तो ब्राह्मणभजक झाला. हा संवाद भीष्मानें धर्मराजास कथन केला व त्या प्रसंगीं श्रीकृष्णही समक्ष होते. दुर्वास ऋषीनें द्वारकेस गेल्यावर कृष्णरुक्मिणींला स्वरथ ओढायला लावलें व श्रीकृष्णानें जगाला कित्ता घालून देण्यासाठीं तें सर्व परमानंदानें सोसलें. ही गोष्टही त्या ब्रह्मण्यदेवानें सभेत सांगितली व 'ब्राह्मणापेक्षां मायबाप । मजला अधिक न गमती' असें आपलें हृद्गत सांगितलें. ब्राह्मण हे बुद्धि, यश व आत्मसुख देणारे आहेत, क्षत्रियांनीं त्यांशीं विरोध न करितां भक्तिपूर्वक त्यांना सत्कारावें ह्मणजे सर्व राष्ट्राचें कल्याण होतें असा हा काव्याचा मथितार्थ आहे. क्षत्रिय बाहुवीर्यवान् आहेत व ब्राह्मण वाग्वीर्यवान् आहेत. बाहुवीर्य व वाग्वीर्य यांचा पवनाग्नीप्रमाणें समागम झाला ह्मणजे दुष्टांचा विनाश हां हां ह्मणतां होऊन सर्व राष्ट्राचें कल्याण होतें. सहस्त्रार्जुनाच्या मताचे अनुयायी सध्या भरतखंडांत

फार बोकाळले आहेत, त्यांनीं व षट्कर्माधिकारी ब्राह्मणांनीं आपापले वृथाभिमान विसरून व देशकालवर्तमान आणि आपल्या राष्ट्राच्या परंपरा लक्ष्यांत आणू-न परस्पर प्रेमादर ठेवावा व वसिष्ठरामदासादि तपोनिष्ठ निस्पृह ब्राह्मणांचा कित्ता ब्राह्मणांनीं गिरवावा व गोब्राह्मणप्रतिपालक रामशिवरायादि ब्रह्मण्य देवांचा कित्ता प्रस्तुतच्या राजांनीं गिरवावा व दोघांनीं एक होऊन राष्ट्रो-द्धार करावा, अशी बुद्धि या काव्याच्या वाचनानें उत्पन्न होते.

६ **गीतार्या:—**‘ पंत काशीयात्रेस गेले तेव्हां तेथें मुक्काम असे तों-पर्यंत ते प्रत्यहीं गीतेचें आर्यामध्यें भाषांतर करून तें ब्राह्मणास देत व या-प्रमाणें त्यांनीं गीतेचीं एकशें आठ भाषांतरें केलीं ’ अशी एका गृहस्थानें परंपराप्राप्त ह्मणून एकदा मला एक आख्यायिका सांगितली होती. त्याच्या ह्मणण्यांत असें आलें कीं, पंतांनीं जशीं एकशेंआठ रामायणें रचिलीं, तशा एकशें आठ गीताटीकाही रचिल्या होत्या. पंतांच्या घरीं व दप्तरांत या आ-ख्यायिकेला प्रमाण मानायला कांहीं आधार मिळाला नाहीं. पंतांच्या गीतेवर निर्यमक अशा ७१८ आर्या आहेत, त्यांपैकीं पहिल्या अठरा उपोद्घातरूप आ-हेत. पंचरत्नीगीतेंत सयमक आर्या दिल्या आहेत त्या पंतांच्या आहेत असें कोणी ह्मणतात, पण त्या पंतांच्या नसून त्यांच्या पश्चात् त्यांच्या कोणी तरी भक्तानें केल्या आहेत. पंतांच्या या गीताटीकेपूर्वी मराठींत ज्ञानेश्वरी व यथार्थदी-पिक या मोठ्या टीकाग्रंथाशिवाय पांच पंचवीस लहानमोठ्या टीका झाल्या होत्या. पण पंतांना त्या सर्वांत वामनाची समश्लोकी फारच आवडली. पंतांचा वा-मनपंडितांविषयीं जो पूज्यभाव होता त्याबद्दल ‘ संतवर्णन प्रकरणांत ’ (पृ० ३७९-३८१) लिहिलेंच आहे. गीतेवर मोठी टीका करावी तर ‘श्रीज्ञानेश्वर वामन पटु ऐसा अन्य मानवाचे नाहीं ’ हें पंतांना कळून चुकल्यामुळें त्यांच्या टीकाग्रंथासारखी आपल्या ग्रंथाची मान्यता होणार नाहीं व आपल्या आर्या-बद्ध गीताटीका पाहून ‘ मंदज्ञानिच सरतिल मागें, कीं ठाउकें नसे छंद !’ याप्रमाणें पंतांनीं विचार केला व पूर्वसंतांच्या ग्रंथांतच संतोष मानला! त्यांनीं गीतेवर या ७०० आर्या केल्या त्यासुद्धां वामनपंडिताच्या श्लोकांच्या आधारेंच केल्या आहेत, किंबहुना वामनी अनुष्टुबांचे मोरोपंती आर्या हें केवळ अन्य रूप आहे! पंतांनीं त्यांत पदरचें कांहीं एक घातलें नाहीं. वामनपंडितच गीतार्थ पंतांच्या मुखांतून बोलत आहेत असें प्रतिपदीं वाटतें. पंतांनाच सांगितलें आहे:—

**श्रीमद्वामनविरचित गीता टीकोत्तमा समश्लोकी ।**
**आर्याटीका तेचि, छंद निराळे, विचित्र हे लोकीं ! ॥ १ ॥**

मराठींत यथार्थ, सुगम, रसाळ व शुद्ध असें भाषांतर करण्याची हातोटी वामनपंडितासारखी कोणासही साधली नाहीं. त्यांतही लहानमोठ्या दरोबस्त वृत्तांत समवृत्त–भाषांतर करण्याच्या कामांत तर वामन पंडित केवळ अग्रगण्य आहेत. वामनाचा हा गुण जाणून पंतांनीं स्वतंत्र रचना करण्याच्या भरीस न पडतां त्यांच्याच श्लोकाची आर्या बनवून जगापुढें ठेविली आहे. समुद्रमंथनसमयीं श्रीविष्णूनें मोहिनीचें रूप घेतलें, त्याप्रमाणें जो गीतार्थ पंडितगृहीं अनुष्टुब्रूपांत होता त्यानेंच पंतगृहीं आर्येचा वेष घेऊन मराठी वाचकांस क्षणैक मोहून टाकलें! तज्ज्ञ लोकांना माहीत होतें कीं विष्णु तोच मोहिनी व मोहिनी तीच विष्णु, त्याप्रमाणें अनुष्टुब तोच आर्या व आर्या तीच अनुष्टुब ! या ह्मणण्याची प्रतीती वाचकांस यावी ह्मणून दोन चार उदाहरणें देऊं:—

१ पंडितः—

**धर्मक्षेत्रीं करुक्षेत्रीं मिळाले युद्धकामुक ।**
**माझे आणखि पांडूचे संजया ! वर्तले कसे ? ॥ १ ॥**

पंतः—

**धर्मक्षेत्रीं कुरुच्या क्षेत्रीं जे युद्धकामुक मिळाले ।**
**माझे अणि पांडव ते प्रवर्तले संजया ! कसें सांग ॥ १ ॥**

२ पंडितः—

**असमर्थ तयांचें तें, समर्थ बळ आमुचें ।**
**जें सैन्य रक्षिलें भीष्में, त्यांचें तों भीम रक्षिता ॥ १० ॥**

पंतः—

**असमर्थ तयांचें तें, समर्थ बळ आमुचें मला वाटे ।**
**जें सैन्य रक्षिलेसे भीष्में, त्यांचेंहि भीम तो रक्षी ॥ १० ॥**

३ पंडितः—

**पिळती सर्वही गात्रें, दुःखें मुखहि वाळतें, ।**
**शरीरीं कांप सुटतो, आंगीं रोमांच ऊठती ॥ २९ ॥**

पंतः—

**पिळतीं सारीं गात्रें, दुःखानें मुखहि वाळलें माझें, ।**
**सुटला कांप शरीरीं, आंगीं रोमांच ऊठती भारी ॥ २९ ॥**

४ पंडितः—

**न दुःखीं मन उद्विग्न, न सुखाची स्पृहा जया ।**
**कामक्रोधभयातीत स्थितधी मुनि बोलिजे ॥ २-५६ ॥**
**जसा कांसव सर्वांगें इंद्रियें विषयांतुनी ।**
**आवरूनी असे तेव्हां त्याची प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ २-५८ ॥**

पंतः—

**उद्विग्नमन न दुःखीं, स्पृहा सुखाची नसे जया, विजया ! ।**
**स्थितधी तो मुनि, कामक्रोधभयांतूनि वेगळा सरला ॥**
**कांसव अंगांसि जसा, विषयांपासूनि इंद्रियांस तसा ।**
**आवरुनि बसे जेव्हां तेव्हां त्याची प्रतिष्ठिता प्रज्ञा ॥**

अनुष्टुबानें जरा हातपाय पसरले कीं आर्या होते! 'असमर्थ तयांचें तें समर्थ बळ आमुचें' हा अनुष्टुब्, यानें पाय पसरले ह्मणजे 'मला वाटे' हे दोन शब्द ज्यास्त घेतले कीं आर्या होते. पंडित व पंत या दोघांच्याही टीकाग्रंथांत गोडी सारखीच आहे, पण पंडितांचा श्लोक मध्यम बांध्याचा, देखणा, व गुटगुटीत दिसतो; पंतांची आर्या उंच, वाळलेल्या कैकेयीसारखी दिसते. श्लोकाचा आकार पाहून समाधान वाटतें. त्याचे सर्व अवयव रेखीव, ठसठसीत दिसतात व एकंदरीनें वामनी श्लोक मोठा बाळसेदार दिसतो. त्याला पाहून मन मोह पावतें. 'मी उद्भव समस्तांचा, मजपासूनि सर्वही' (अ. ९–८) हा श्लोकार्ध 'मीं उद्भव सर्वांचा, मजपासुनि सर्वही प्रवर्ते हें' या आर्यार्धापेक्षां जरा गोड लागतो! 'जोडिती कामभोगार्थ अन्यायें धनसंग्रह' (अ. १६–१२) हा वामनी अर्ध 'अन्यायें धनसंग्रह संपादिति, कामभोग साधाया' या मोरोपंती अर्धापेक्षां किती गोंडस दिसतो? वामनी श्लोकांत निष्कारण शब्द यायला जागाच नाहीं, पण अर्ध पुरा करण्यासाठीं पंतांना ते आणावेच लागतात. पंतांनीं आद्यंत आर्यावृत्ताशिवाय दुसऱ्या वृत्ताचें एकही पद्य केलें नाहीं, पंडितांनीं मूळांत जेथें श्लोक मोठा होता त्या ठिकाणीं आपणही मोठेंच वृत्त योजलें आहे. कोठें मूळ श्लोकांतलें पद पंडितांच्या हातून सुटलें गेलें, तें पंतांनींही तसेंच सोडून दिलें आहे. वस्तुतः अशीं पदें सुटूं देणें योग्य नाहीं. उदाहरण अ. १६ यांतील १५ वा श्लोक पहाः—

मूळः—

**आढ्योऽभिजनवानस्मि कोन्योस्ति सदृशो मया ।**
**यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिताः ॥**

९ पंडित:—

**मी समृद्ध, मला भृत्य, कोण हो मजसारिखा ? ।**
**यजीन, सुख घेईन ह्मणती भ्रांत दैत्य हे ॥**

पंत:—

**'मी सधन, भृत्य मजला, आहे मजसारिखा दुजा कोण? ।**
**यजिन, सुखें नांदेनहि देइन मी भ्रांत दैत्य हे ह्मणती ॥**

यांत 'अभिजनवान्' याचा अर्थ 'श्रीमान्' चाकरमाणसें बाळगणारा असा पंडितानीं केला आहे व पंतांनींही येथें त्यांच्याच हाताला हात लावला आहे! या शब्दाचा 'सुकुलवान' असा अर्थ आहे. ज्ञानोबांनीं हाच अर्थ घेतला आहे. 'अज्ञानविमोहिता:' हें पद पंतपंडित उभयतांनींही गाळलें आहे. असो. पंडितांनीं प्रत्येक अध्यायाला उपोद्घात व उपसंहार जोडले आहेत, व अ. ९।१३।१८ यांचे उपसंहार मोठाले आहेत. सर्व ग्रंथाच्या शेवटचा उपसंहार व मुख्यत: त्यांतील 'सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज' यावरील पंडितांचा कोटिक्रम तर फारच बहारीचा आहे. पंतांनीं असे उपसंहार मुळींच केले नाहींत. ज्याला संस्कृत येत नाहीं अशानें पंडितांची समश्लोकी मुखोद्गत करावी. इतकी सुलभ, लहानशी, चटकदार, यथार्थ व प्रेमळ टीका मराठींत तरी दुसरी नाहीं. पंतांनीं स्वचित्तरंजनार्थ अभिमानरहित होऊन गुरुभावानें वामनाच्या पायीं मिठी मारली व गीतार्थ त्यांच्याच वाणीनें श्रवण केला व आह्मांसारख्यांस कथन केला यांत त्यांच्या मनाचा मोठेपणा दिसतो. पंतांच्या गीतार्थापेक्षां त्यांच्या गीतार्थाची प्रस्तावनाच फार बहारीची उटली आहे. वामनी समश्लोकीची योग्यता पहिल्या प्रतीची आहे. गांवोगांव जुन्या दप्तरांतून तिच्या शेंकडों प्रती सांपडतात, यावरून आज दोन अडीचशें वर्षें तिचा महाराष्ट्रांत किती जयजयकार झाला आहे हें दिसतें. तथापि पंतांची प्रस्तावना—आणि तीही अवघ्या अठरा श्लोकांची—इतकी प्रेमळ व शुद्धभावाची आहे कीं तिचीच किंमत मोठी आहे. पंतांनीं प्रथमच 'विजयरथतुरगरश्मिग्रहणव्यग्राग्रपाणिपद्मातें जलदश्याम ब्रह्मातें' वंदन केलें आहे! गीताटीका करतांना अर्जुनाच्या रथावर बसून त्याच्या घोड्यांच्या दोऱ्या हातांत असलेल्या श्रीकृष्णाचें ध्यान प्रथम त्यांच्या डोळ्यांपुढें आलें हाच केवढा प्रसाद! पंतांना भगवत्प्रसाद झाल्याची प्रतीति यापूर्वी अनेकदां आली होती, व येथेंही पंत ह्मणतात:—

**परि रामचरणपद्मप्रसाद झाला ह्मणोनियां आर्या ।**
**गीताटीका करितों त्याही गीतीच सप्तशत आर्या ॥ ९ ॥**

त्या प्रसादाचें परमलक्षण–परमावधीची लीनता, संतचरणीं अनन्य भाव व अहंकाराचा पूर्ण अभाव–हें त्यांच्या ठिकाणीं स्पष्ट उमटलें होतें असें मानायला याच प्रस्तावनेंत जागा आहे. पुढील भक्तिनम्र स्थितींतल्या आर्या पहा:—

**श्री ज्ञानेश्वर, एकोपंत श्रीरामदास, वामन ही ।**
**श्री मन्मुकुंदराज स्वयशें केली इहीं पवित्र मही ॥ ५ ॥**
**श्री नामदेव, केशवराज, तुकोबा असे महा ज्ञानी ।**
**यांच्या स्वैरालापीं श्रुत्यर्थ विचारिजेत सुज्ञांनीं ! ॥ ६ ॥**
**निःसीम भक्त झाले या लोकीं फार पांडुरंगाचे ।**
**साचे ह्मणुनि जगत्पति कीर्तनसमयीं जयांपुढें नाचे ॥ ८ ॥**
**त्यांचे पाय नमुनि मीं, दीन अति, ज्ञानहीन, परि भावें ।**
**गावें गीतार्थातें, ह्मणवुनि टीका करावया धांवे ! ॥ ८ ॥**

पंतांनीं पुढें गीतेची महती गायिली आहे:—

**मीं तों अगाध गीतासुधानदीमाजिं मारितोंचि बुडी[1]**
**नरजन्मपर्व दुर्लभ, जाणुनि द्यावी कशी न येथ बुडी ? ॥ १२ ॥**
**गीतासुधानदींत स्नानें जातात ताप-मळ सर्व, ।**
**सर्वज्ञत्व सहज ये, गर्व पळे, स्तविति देवगंधर्व ॥ १३ ॥**
**अमृतप्रपा उदारें सदयें कृष्णें विनिर्मिली मोठी, ।**
**घोंटीना तो वेडा, स्वमुखें आकंठ सांठवा पोटीं ! ! ॥ १४ ॥**

पंतांनीं शेवटीं गोड प्रार्थना केली आहे:—

**पुरुषाचा धर्म भ्रम, ह्मणउनि कांहीं पडेल येथ उणें ।**
**पूर्ण करावें शोधुनि भगवत्प्रीत्यर्थ सज्जनें निपुणें ॥ १८ ॥**

७ **भगवद्गीतास्तुति** ह्मणून एक १५ आर्यांचें निराळें प्रकरण पंतांनीं केलें आहे, व त्यांत गीतेची महती गाऊन गीताटीकाकारांबद्दल पंतांनीं आपला अभिप्राय दिला आहे. गीता साक्षाद्भगवन्मुखांतून आलेली, तिची योग्यता साऱ्या जगाला कळून चुकली आहे. गेल्या ८००।१००० वर्षांत भरतखंडांत जो जो महाभगवद्भक्त झाला, त्याला मुख्य प्रेरणा गीता आणि भागवत या ग्रंथांपासूनच झाली आहे. शेंकडों पंडितांनीं व भक्तांनीं गीतेवर आपापल्या

१ पाठभेदः ' घालितोंचि. '

मतीप्रमाणें व्याख्यानें केलीं आहेत व पंतांनीं ‘ सर्वोपनिषत्सारे ! माते ! तुज पाहती तुला न मुनी ’ असें जें ह्मटलें आहे तें यथार्थ आहे. पुढील आर्या पहाः—

**तुज भजल्या संसारीं वसतां गतिलाभ होय जो गीते ।**
**त्यासि न पात्र भ्रमति श्रमति व्यर्थचि तपोनि जोगी ते ॥ ४ ॥**

या मार्मिक आर्येत पंतांनीं स्पष्ट सांगितलें आहे कीं, संसार सोडून दूर राहणाऱ्या योग्यापेक्षां संसारांत राहून गीतेनें उपदेशिलेल्या मार्गानें जाणाऱ्या कर्मप्रवण पुरुषाची योग्यता जास्त आहे. गीतावाचनापासून खरा लाभ होतो तो हा कीं जीव कर्मयोगी होतो. ‘ मामनुस्मर युध्यच ’ हा गीतेचा तात्पर्यार्थ आहे व तो पंतांनीं वरील आर्येत व्यक्त केला आहे. गीताटीकाकारांबद्दल पुढील आर्या पहाः—

**तव सचिव द्वैपायनशंकरमधुसूदनादि योगी ते ।**
**ज्ञानेश प्रतिनिधि ! हें वर्णन तुझिया मनास यो गीते ॥ ७ ॥**

पुढील आर्येत वामनपंडितांना गीतेचा युवराज ह्मणून ह्मटलें आहे. व्यास, शंकराचार्य व मधुसूदन स्वामी हे गीतामहिषींचे सचिव, वामन युवराज, व ज्ञानेश्वर हे प्रतिनिधि आहेत. या रूपकाचें मर्म मर्मज्ञ वाचक जाणतीलच. ज्ञानेश्वरी ही गीतेची प्रतिनिधि आहे, ह्मणजे गीतेचें खरें कार्य करणारी व हृद्गत प्रकट करणारी आहे असा पंतांचा जो भावार्थ तो पुढील आर्यांत त्यांनीं अधिकच स्पष्ट केला आहेः—

**भगवति ! शुचिकीर्ति तुझी सुमति ज्ञानेश्वरी प्रिया आली ।**
**झाली विश्वख्याता हे कार्यो बहु जनांचिया आली ॥ ९ ॥**
**नेती तिकडे जासी भगवति ! बहुमत इचें तुला उक्त ।**
**ज्ञानेश्वरीस जन जे अनुसरले त्यांसि करिसी तूं मुक्त ॥ १० ॥**

पंतांना ज्ञानेश्वरी अत्यंत प्रिय होती. गीतेचें खरें रहस्य ज्ञानेश्वरीनें प्रकट केलें व गीतेचें बहुजनोद्धाराचें कार्यही तिनेंच केलें आहे व ह्मणूनच पंतांनीं तिला गीताप्रतिनिधि ह्मटलें आहे. ज्ञानोबारायांबद्दल पंतांचा परम पूज्यभाव होता ( मागें पृ० ३६९ पहा ), ज्ञानेश्वर हे साक्षात् कृष्ण होत अशी त्यांची श्रद्धा होती.

**८ अहल्योद्धारः**—गौतममुनीची भार्या अहल्या प्रतिरूपधारी इंद्रानें दूषिल्यावर पतिशापानें शिळा होऊन पडली होती. तिचा विश्वामि-

त्राज्ञेनें श्रीरामानें पदरजस्पर्शानें उद्धार केला. या कथेवर पंतांनीं दोन लहान स्फुटें लिहिलीं आहेत. एक साकीबद्ध आहे व दुसरें प्राय: आर्याबद्ध आहे. दोन्ही मिळून ५१ पद्यें आहेत. हीं फारच गोड आहेत. पहिल्यांत विश्वामित्रानें अहल्येची कथा रामास सांगून त्याला तिचा उद्धार करण्यास सांगितलें आहे; व दुसऱ्यांत उद्धार पावलेल्या अहल्येनें रामपदरजाचें माहात्म्य वर्णिलें आहे. हीं दोन्ही प्रकरणें भक्तिरसानें नुसतीं थबथबलीं आहेत व तीं प्रेमळाचे नेत्र आर्द्र केल्याशिवाय राहणार नाहींत. विश्वामित्र रामास ह्मणतो:—

**‘ इंद्रें छळिली सती, पतीनें क्रोधें दिधला शाप, ।**
**झाली शिळा सुशीळा, आतां वारावे संताप ॥ २ ॥**
**प्रायश्चित्तें पापें जळतीं, मूळ वासना राहे ।**
**ते ही भस्म करावी हें बळ तुझिया चरणीं आहे ’ ॥ ३ ॥**

अहल्येला पादस्पर्श करावा कीं नाहीं याबद्दलचा संवाद फार मजेचा आहे:—

**राम ह्मणे, ‘ गुरुराया ! हे कीं साध्वी मुनिची भार्या ।**
**पाय कसा लावावा ? माझी माता तैशी आर्या ! ’ ॥ ५ ॥**
**विश्वामित्र ह्मणे, ‘ वा रामा ! इतें ह्मणसी माय ।**
**माय न सुख लोकीं पुत्राचा जरिही लागे पाय ! ! ’ ॥ ६ ॥**

अहल्येचा उद्धार होऊन ती पूर्ववत् स्त्री झाल्यावर तिनें प्रभुपदरजाचें फार फार गौरव केलें, आपल्याला कलंक लागल्याबद्दल हृदयविदारक शोक केला, व गौतमानें क्षमावान् असून स्वत:ला शापदग्ध केलें याबद्दल शोक करून, तो शोकच रामपदरजप्राप्तीमुळें अखेर अनुग्रहरूप झाला याबद्दल स्वभाग्योत्कर्षानंदानें ती नाचायला लागली:—या सर्व प्रकारांचें पंतांनीं अत्यंत शुद्धभावानें वर्णन केलें आहे. या प्रसंगींच्या कांहीं बहारीच्या आर्या पहा:—

**झाडी केशांनीं प्रभुचरण—ध्याती शिवादि सुर ज्यांतें—।**
**गोळा करूनि पदरीं सादर बांधी नमूनि सु—रजांतें ॥ १० ॥**
**प्रक्षाळूनि प्रभुच्या चरणांतें तीर्थतोय सांचविलें ।**
**माथां वाहुनि केलें प्राशन, पात्रीं न लेश वांचविलें ! ॥ ११ ॥**
**बापा ! पापाचळपविपदरेणो ! मी असी कुधी कुलटा ।**
**विश्वगुरो ! त्वां केला प्रथम नमस्कार मज कसा उलटा ? ॥ १५ ॥**
**तूं बाप आजपासुनि मी कन्या हें तुज्या पदीं नातें ।**
**नांदो दे दाशरथे ! त्वां क्षणहि अव्हेरिलें न दीनांतें ॥ २० ॥**
**रडवाया निजकर्में सर्व सतींची सभा विटाळावें ? ।**

**तें क' चुकेल? कैसें अबळेनें प्रबळ भावि टाळावें! ॥ २२ ॥**
**शाप न, अनुग्रहाचि हा! ह्मणुनिच तुज बा! महायशा! पाहें।**
**तृषित असेल गुरुला दंडा, संकोच काय! शापा हें ॥ २४ ॥**
**ज्याच्या एकेचि रजें मीं धन्या! हे असे जिला पाय।**
**लागति, एका वर्णूं जिव्हेनें भाग्य भूमिचे काय? ॥ ३० ॥**

या ' अहल्योद्धार ' प्रकरणांत प्रभुपदरजाची पंतांनीं जी थोरवी गाइली आहे ती पाहतां त्यांच्या विशुद्ध भावाची कल्पना येते. यानंतर ' सुनिर्मल तुझीं पदें कधीं तरी विलोकीन हो! ' अशी प्रभुपददर्शनाची तीव्र उत्कंठा वाढल्यामुळें त्यांनीं ' सदाश्रितपदास ' वंदन करून आपल्या काव्यशक्तीचें सर्वस्व जें अखेरचें विश्वविख्यात ' केकावली ' स्तोत्र तिकडे मोहरा फिरविला! अहल्येनें ज्या प्रभुपदरजांची एवढी महती गायिली त्याकडेच पंत अखेरीस वळले हें महासुकृताचें फळ होय.

## ९ केकावलि, तिचा रचनाकाल व लोकप्रियता:—

पंतांच्या सर्व काव्यांत अत्यंत प्रसिद्ध, अत्यंत लोकप्रिय व अतिउत्कृष्ट अशा काव्यरूप स्तोत्राकडे आतां आपणांस वळावयाचें आहे. पंतांच्या कवितेचें गुणसर्वस्व त्यांच्या केकावलींत दिसून येतें व ही गोष्ट पूर्णपणें लक्षांत येण्यास त्यांच्या पूर्वकवितेचें संपूर्ण स्वरूप डोळ्यांपुढें असणें अत्यवश्य आहे. स्वोद्धारासाठीं प्रभूला आळविण्यास पृथ्वीछंदच अत्यंत सरस आहे ही गोष्ट ' बृहद्दशम ' रचीत असतांना पंतांच्या प्रथम लक्षांत आली ( मागें पृ० २६७–२६८ पहा ). रामाला त्यांनीं ' आर्या केकावली 'नें प्रथम सद्गदस्वानें आळविल्यामुळें या ' केकी ' ची अगोदरच रामभक्त ह्मणून प्रसिद्धि झाली होती ( पृ० २७९–२८० ). पंतांचा ' **स्तोत्रकलाप** ' पाहिला ह्मणजे पंतांच्या स्वोद्धाराविषयीं आतुर झालेल्या अंतःकरणाची ओळख होते आणि ती झाली व त्यांच्या कवितेचें एकंदर स्वरूप नीट ध्यानांत आलें ह्मणजे येथें मयूराचा टाहो अंतःकरणकपाट भेदून कसा बाहेर पडला आहे हें बरोबर समजतें. पंतांनीं अभेदभावानें परमात्म्याच्या अनेक अवतारांच्या व अनेक संतांच्या कथा गाइल्या होत्या; रामायण, भारत व भागवत यांत प्रतिपादिलेलें देवभक्तांचें अन्योन्य प्रेम त्यांच्या रोमरोमांत भिनून गेलें होतें; प्रभुप्रसादाविषयीं अत्युत्कट आतुरता त्यांच्या हृदयांत उत्पन्न झाली होती; आणि देहपातसमय जवळ येऊन ठेपला, आतां डोळे मिटण्यापूर्वी साक्षा-

द्रामर्शन झालें ह्मणजे गंगेंत घोडे न्हाइले, इतक्या पल्ल्यावर पंतांची स्वारी आली होती, तों त्यांच्या मुखांतून ही केकागंगा प्रकट झाली. केकावलि हें काव्य आहे व स्तोत्रही आहे. हें अप्रतिम काव्य आहे, व अतिप्रेमळ स्तोत्र-ही आहे. यांत पंतांच्या बुद्धिशक्तींचा पूर्ण विकास झाला आहे, व पंतांच्या अंतःकरणवृत्तींचाही पूर्ण प्रकाश पडला आहे. यांत पंतांची विद्वत्ता आणि मुमुक्षा, कवित्व आणि भक्ति, बुद्धिवैभव आणि प्रेम, पापभीरुता आणि आत्मप्रत्यय, व्युत्पन्नता आणि निरहंकारता, देवाविषयीं लडिवाळपणा आणि भय यांचें समसमान व ह्मणून अत्यंत मधुर असें मिश्रण झालें आहे. केकावलि सहस्त्रवार वाचून व वाचतां वाचतां शतशः रोमांचोत्फुल्लकाय होऊनही ती पुनःपुन्हां वाचाविशी–गावीशी–वाटते! एकेका केकेंत किंबहुना प्रत्येक केकेच्या एकेक पादांत इतका अर्थ खेंचून भरला आहे कीं तो पूर्ण लक्षांत येऊन भक्तिसुखानंदानुभव होण्यास चांगलेंच मनन करावें लागतें. केकावलि हें उत्तम प्रकारचें ध्वनिकाव्य आहे. ही ‘ परिणतप्रज्ञाची वाणी ’ आहे. प्रेम, प्रतिभा व प्रसाद हे तिच्यांत आद्यंत परिपूर्ण भरलेले आहेत. “ प्रस्तुत काव्यांत कोणत्याही देवतेचें विशेष वर्णन आहे असें नाहीं व त्यास ‘ स्तोत्र ’ हा शब्दही यथास्थितपणें लागणारा नाहीं ” असें मालाकारांनीं ( निबंधमाला, अंक ५६ ) ह्मटलें आहे, पण तें बरोबर नाहीं. राम, कृष्ण, पांडुरंग, दत्त, शंकर हे सर्व एकच होत असा त्यांचा निश्चय झाल्यामुळें केकावलींत जरी एका विशिष्ट देवतेचें वर्णन नाहीं, तरी रामकृष्णादिकांचा पूर्ण अभेद भावून त्यांनीं जगज्जनकाचें हें स्तोत्र गायिलें आहे. केकावलीला स्तोत्र ह्मणायला मालाकार कां कचरतात हें समजत नाहीं. कदाचित् मीं मागें ह्मटल्याप्रमाणें ( पृ० ४९ ) पंत हे केवळ कवि होते ही मालाकारांची समजूत याला कारण झाली असावी. पंतांनीं हें स्तोत्रः—

**कृतांतकटकामलध्वजजरा दिसों लागली**
**पुरःसरगदासवें झगडतां तनू भागली ।......॥ ४६ ॥**

अशा वयांत साठीं उलटून गेल्यावर रचिलें आहे. पंत काशीयात्रेस शके १७१० च्या कार्तिकांत निघाले व शके १७१२ ची बरसात सुरू होण्यापूर्वीं बारामतीस परत आले, हें मीं मागें ( पृ० १६४–१६५ ) सिद्ध केलें आहे. पंतांनीं श० १७१२ नंतर व शके १७१६ च्या चैत्री पूर्णिमेस त्यांचा वैकुंठवास झाला तत्पूर्वी–केकावलि रचिली असली पाहिजे असेंः—

**मला निरखितां भवत्तरणकन्यका आपगा**
**ह्मणे ' अगइ! ऐकिलेंहि न कधीं असें पाप ' गा!**

ह्या १० व्या केकेच्या पूर्वार्धावरून वाटतें. गंगेनें मला ' निरखिलें ' ह्या ह्मणण्यांतच आपण काशियात्रेहून परत आलों आहोंत असें पंतांनीं सुचविलें आहे. कृतांतकटकाचें पांढरें निशाण 'मुंड पलित' झाल्यामुळें फडकूं लागलें आहे; कृतांतसैन्याच्या पुढें धांवणाऱ्या रोगांबरोबर झगडतां झगडतां शरीर थकून गेलें आहे; अनेक देवतांपुढें 'सदैव नमितां जरी पद ललाट केलें किणें' (केका ११) तरी कोणी दुसरा तारण्यास समर्थ नाहीं अशी खात्री होऊन चुकली आहे; गंगेनें देखील ' मला निरखितांच ' माझ्या पापपर्वतापुढें हात टेकले आहेत—असा मी स्वोद्धाराविषयीं उतावळा झालों नाहीं तर हा स्वरिपु माझा गळा कापील, ह्मणून ' कृतांत शिवला नसे तंव दिसे बरें पावणें ' ( केका ४७ ) एवढेंच पंतांनीं या स्तोत्रांत देवापाशीं कळवळून मागितलें आहे. अशा वयांत, अशा अवस्थेत, असा मनुष्य जनमनोरंजनार्थ नुसतें काव्य करील आणि तेंही कांहीं आक्षेपकांच्या ह्मणण्याप्रमाणें ' कृत्रिमकाव्य ' करील हें मानवी स्वभावाला अत्यंत विसदृश आहे! केकावलि हें दयामृतघनाची स्वोद्धारार्थ याचना करण्यासाठीं रचलेलें करुणास्तोत्र आहे. यांत जागोजाग कोटिक्रम फार बहारीचा केला आहे, अलंकारादिकांची गर्दी उडविली आहे व भाषाप्रौढी व अर्थगौरव हे गुण साधून साऱ्या स्तोत्रांत विलक्षण साधेपणा व प्रसाद ओतला आहे. याचा अर्थ गोड व भाषा सादिक असल्यामुळें हें स्तोत्र अत्यंत लोकप्रिय झालें आहे. केकावलीवर टीका पुष्कळ व सरस झाल्या आहेत हें तिच्या लोकप्रियतेचें निदर्शक आहे. घाणेकर, बोरवणकर, चोणकर वगैरेंनीं केकावलि टीपा देऊन छापिली आहे, पण दादोबा पांडुरंगांची यथार्थदीपिका, परशुरामपंत तात्यांचा केकादर्श, व प्रो. श्रीधरपंत परांजपे यांची अतिविस्तृत केका—टीका हे तीन ग्रंथ ह्यासंबंधानें वाचनीय आहेत. याशिवाय मुंबईच्या मराठी संग्रहालयांत केकावलीवर एका संस्कृत पंडितानें संस्कृत भाषेंत केलेल्या टीकेची हस्तलिखित पोथी मी पाहिली आहे! यशोदापांडुरंगी टीका पाहून मालाकार प्रथम केकावलीला व नंतर पंतकवितावधूला मोहून गेले. जो जो केकावलीकडे एकवार पाहील तो तो तिच्यावर लुब्ध होऊनच जाईल.

१८ **केकावलीचें अंतःस्वरूपः**—आतां केकावलींत काय आहे तें

आपण क्रमानें पाहूं. मयूराच्या वाणीस केका ह्मणतात. आपल्या कवीचें नांव मयूर आहे, यास्तव त्याच्या वाणीस 'केका' ह्मणून त्यांच्या आवलि (पंक्ति) ज्यांत आहेत त्या ग्रंथाचें नांव केकावलि असें ठेवलें आहे. मयूर हा केकी व त्याचा टाहो तो केका. प्रस्तुत स्तोत्रांत पद्यें १२१ आहेत. 'सदाश्रितपदा ...नमस्ते सदा' ह्या पहिल्याच प्रौढ श्लोकांत विष्णुपदकमलाचें ध्यान करून पंतांनीं नमनपूर्वक प्रारंभ केला आहे. पंतांचें लक्ष प्रथमच प्रभुपदाकडे गेल्यामुळें त्या पहिल्या १५ श्लोकांत प्रभुपदाचीच प्रार्थना केली आहे.

**पदाब्जरज जें तुझें सकलपावनाधार तें,**
**अघाचलहि तारिले बहु तुवांचि राधारतें।**
**अजामिळ, अघासुर, व्रजवधू, बकी, पिंगळा,**
**अशां गति दिली, उरे न तृण भेटतां इंगळा ॥ २ ॥**

'तुझें पदरज हें गंगा, संत इत्यादि जे पावन आहेत त्यांनाही पावनत्व देणारें आहे. उपाधींत राहूनही अत्यंत शुद्ध स्वरूपाचा ज्या अजामिळादि पापपर्वतांना उद्धरिलें आहेस, मग मला तूं काय उद्धारणार नाहींस?' ह्या एकाच केकेंत आपलें पतितत्व, भगवंताचें पतितपावनत्व व माझा उद्धार होणें अशक्य नाहीं अशी उत्साहबळ देणारी भावना या तीन कल्पना आहेत. अजामिळादि पांचच अघाचल तूं तारलेस असें नाहीं, तर 'तुझ्या बहुत शोधिलें अघनिधी पदाच्या रजें' (३), असें संत सांगतात तें म्या खरें कसें न मानावें? कसल्याही पाप्यांचा तूं उद्धार करतोस हें सन्मुखानें ऐकून मी तुझ्या पायांपाशीं आलों आहें, हा पहिल्या तीन केकांचा भावार्थ आहे. पुढें 'तसाचि उरलों कसा? पतित मी नसें काय कीं?' येणेंकरून स्वपातित्य सुचवून त्या जगन्नायकाचें सर्वशक्तिमत्व, 'नयन सर्वसाक्षी रवी' या पदानें सर्वसाक्षित्व, व सुरभिदृष्टांतानें दयालुत्व सुचविलें आहे (४). गोवर्धननामालघुपर्वत, कूर्मावतारीं मंदरपर्वत, व वराहावतारीं तर सारी पृथ्वी—याप्रमाणें जडांचा उद्धार तुह्मीं केला असून 'सुदुर्धर तुह्मां कसा पतित हा न कां उद्धरा?' (५) कारणः—

**नतावन धृतव्रत ! ज्वलन तूंचि बाधावनीं;**
**पदप्रणतसंकटीं प्रजव तूंचि बा धावनीं।**

१ 'गदारिदरनंदकांबुजधरा' ह्म. गदा, चक्र, शंख, खड्ग व कमल यांना आपल्या चतुर्भुजांनीं धारण करणाऱ्या–हें पद अर्थात् विष्णुध्यान सुचवितें. पंत गयेहून आले होते, तेव्हां सर्व साधनांचें साध्य जें विष्णुपद तेंच त्यांना प्रथम आठवावें हें योग्य आहे.

**दया प्रकट दाखवी कवण सांग त्या वारणीं ?**
**सती व्यसनवारणीं ? जयजयार्थ त्या वा रणीं ? ॥ ६ ॥**

पांचव्या केकेंत ह्मटल्याप्रमाणें 'गोवर्धन, मंदर व पृथ्वी हे जड मीं उद्धरिले खरे, पण तीं एकट्या दुकट्यावरचीं संकटें नसून सार्वजनिक संकटें होतीं व मोठ्या समाजाला, राष्ट्राला किंवा पृथ्वीला ताप झाला तर मात्र मी धांवतों' असें जर तुह्मीं ह्मणाल तर 'अहो नतावनधृतव्रत! आपण एकट्या दुकट्यासाठीं वायुवेगानें धांवून त्याच्या क्लेशरूप वनाचीं दांगें जाळून टाकल्याचीं उदाहरणेंही मला माहीत आहेत' असें ह्मणून पंतांनीं वरील केकेंत गजेंद्र, द्रौपदी व अर्जुन यांचीं उदाहरणें दिलीं आहेत! तुह्मीं भक्ताच्या धांव्याबरोबर रमेला टाकून अर्जुनाचे खासदार होता! व ज्या हातांनीं प्रियाकुचतटावर पत्रावळी काढायच्या, त्याच कोमल हातांनीं धर्माच्या यज्ञांत उष्टीं सांवडायला येतां! तुमचें भक्तवात्सल्य असें अद्भुत आहे कीं, तुह्मीं दासाकरितां आपलें ऐश्वर्य व सुख सोडून हवीं तसलीं नीच कर्में करायला धांवतां!! (७) असें २।४च नव्हे तर 'असंख्य जन तर्पिले' मग मजसारख्याची उपेक्षा कां बरें करितां? (८)

**अगा! प्रणतवत्सला! ह्मणति त्या जनां पावलां**
**ह्मणोन तुमच्याच मीं स्मरतसें सदा पावलां ...॥ ९ ॥**

पण 'मजपर्यंत येण्यापूर्वी माझा जडोद्धाराचा कार्यभार हलका करण्यासाठीं मीं ज्यांना निर्माण केलें आहे त्यांपैकीं तूं कोणाकडे गेला होतास का?' ह्या प्रभूच्या प्रश्नाची अपेक्षा करून 'मला निरखितां' ह्या श्लोकांत गंगेची गोष्ट सांगितली आहे. गंगेसारखी तर पावन करणारी कोणी नाहीं? विष्णुपदापासून निघालेली व शंकराच्या शिरीं नांदणारी गंगा पण ती सुद्धां माझें पाप पाहून भ्याली, तिची तिरपिट उडाली! (१०) मीं आजपर्यंत एकट्या गंगेलाच विनविलें असें नाहीं तर 'सदैव नमितां जरी पद ललाट केलें किणें'—माझ्या कपाळाला अनेक देवतांच्या पायां पडतां पडतां घट्टे पडले!—तेव्हां देवा! माझा ठाम निश्चय होऊन चुकला कीं 'नसे इतर तारिता मज भवत्पदाब्जाविणें' (११) देवा! तुह्मीं मला सर्वेंद्रियपाटव दिलेंत, मनुष्यत्व दिलेंत, सुवंशीं जन्म दिलांत, बहु अलभ्य असें द्विजत्व दिलेंत, फार काय पण यशःश्रवणकीर्तनहि दिलींत—सर्व खरें, (१२) पणः—

**दिलें बहु बरें खरें, परि गमे कृपा व्यंग ती!**
**अलंकृतिमती सती मनिं झुरे न जों संगती ॥ १३ ॥**

**कराल पुरती दया, तरि असो दिलें पावलें,**
**परंतु हरि ! एकदां त्वरित दाखवा पावलें, ।**
**प्रसाद करणें मनीं जरि नसेल हें आवरा !**
**जया बहु तयास द्या, मज कशास मी हावरा ! ॥ १४ ॥**
**दिलें फिरुनि घेतलें अशि अकीर्ति लोकीं न हो**
**सुनिर्मल तुझीं पदें कधि तरी विलोकीन हो ? ।**

येथें पंतांनी निरुत्तर कोटिक्रम करून देवाला कसा युक्तीनें कोंडला आहे ! तूं आज मला द्विजत्वादि ज्या देणग्या दिल्या आहेस त्या पावल्या—त्याबद्दल मी तुझा आभारी आहें, पण देवा ! सतीला अलंकारादिकांनीं खूप नटविलें तरी साक्षात्पतिसमागम होईपर्यंत तिला त्या अलंकारांचें सुख वाटेल कां हो ? तसेंच अनन्यभावानें शरण आलेल्या मला तुझ्या पाददर्शनाशिवाय यांत कसा बरें आनंद वाटेल ? भगवद्दर्शनाशिवाय इतर सर्व प्रकारचें ऐश्वर्य 'कुंकवावांचुन कपाळ, मंगळसूत्रावांचुन गळा' तसें विशोभित आहे ! तुमच्या मनांत मला दर्शन द्यायचें नसेल तर हें आपलें परत घ्या, मला त्याची किंमत नाहीं ! पण देवानें कृपाळुपणानें दिलेल्या देणग्या परत करण्यांत त्याचा अपमान व आपला उद्धटपणा प्रकट होईल अशी कल्पना करून पंत युक्तीनें ह्मणतात कीं, 'दिलें फिरुनि घेतलें अशि अकीर्ति लोकीं न हो ! ' तुझ्या कीर्तीला आह्मीं जपायचें नाहीं तर कोणीं जपायचें ! ह्मणून दिलेलें कांहीं परत घेऊं नकोस, तें मजपाशीं राहों दे, पण देवा ! 'सुनिर्मल तुझीं पदें कधीं तरी विलोकीन हो ! ' निदान इतकें तरी कर तुझे जे परमप्रिय भक्त आहेत त्यांच्या मला हवालीं करून टाक. ( १५ ) मी सदैव अपराध रचितों, हे आपण मोठेपणानें आपल्या पोटांत जिरवा(१६-१८)

**मदुद्धरण मात्र कां जड तुह्मां दिसे ? वारिती**
**स्वकव्यसन मर्त्यही, न करितीचि सेवा रितीं ॥ १९ ॥**

मर्त्य सुद्धां स्वाश्रितांचें संकट वारितात, सेवा निष्फळ करीत नाहींत, तशी आपण मीं आपली आजवर केलेली उपासना निष्फळ होऊं देऊं नका. अनन्यगतिक भक्तांना पीडा झालेली पाहतांच हे करुणार्णवा ! तुझें मन उमोप द्रवतें ! ( २० ) मला पीडा कोणापासून होते ह्मणून विचाराल तर 'व्रणार्थ पशुच्या शिरावरि उभे काकसे-स्मरादि रिपु' उभे टाकले आहेत, षड्रिपु मला अत्यंत ताप देत आहेत त्यांचा ताप होऊं देऊं नका (२१) तुमच्या बळावर मी भवमहानदी तरून जाईन. तुह्मीं मला संतांना विका,

संतगृहीं राहून सेवाचाकरी करावयाचा मला अभ्यास आहे (२२) नको, पण तुह्मीं स्वगृहीं स्वन्निधच मला ठेवा. तुह्मांपाशीं नारदध्रुवादि भक्तशिरोमणि आहेत खरे, तथापिः—

**धना परिजना घरीं तुमचिया उणें कायसें ?**
**न लाभ मणिहेमभूपतिस जोडिल्या आयसें: ।**
**परि प्रभुहि संग्रहीं सकलवस्तुला ठेविती**
**गुणा न ह्मणतां उणा अधिक आदरें सेविती ॥ २३ ॥**

तुह्मीं स्वीकार केलांत ह्मणजे मी धन्य होईन. 'दिसे ह्मणुनि शाश्वतप्रकृतिरंक मी काय ? हो' (२४) मला रंकाला तुमची स्तुति करण्याचें ठाऊक नाहीं, पण लेंकराला प्रथमच नीट कसें येईल ? तथापि मला भरंवसा आहे कीं माझे बोबडे बोल आपण ऐकून घ्याल (२६) तुझी स्तुति करायला मी धांवतों खरा, पणः—

**'अतर्क्य महिमा तुझा, गुणहि फार बा हे,' विधी**
**श्रुतिब्रहि ह्मणे सदा, स्तविल आमुची केंवि धी ? ।**
**तरी जन यथामति स्तवुनि जाहले सन्मती**
**स्तवार्थ तुझिया तुझ्यासम कवी कधीं जन्मती ? ॥ २७ ॥**

वेद चतुर्मुखानें ह्मणणाऱ्या ब्रह्मदेवालाही तुझी यथार्थ स्तुति करितां आली नाहीं, मग मजसारख्या एकमुख पामरानें ती कशी करावी ? तुला यथामति स्तवावें एवढेंच आमच्याकडे आहे. तुझ्या स्तुतीमुळें आह्मांला सन्मति प्राप्त होते ह्मणजे आमची बुद्धि शुद्ध होते व 'निजस्तुति' तुलाही रुचते (२८) खरें पाहिलें असतां स्तवन हें विष आहे, हें 'सेवितां माजवी व सद्यशोमुख मलिन करी,' तथापि जगत्कल्याणार्थ तूं हें पितोस. शंकर हालाहल एकदांच प्यालें, तूं तर हा स्वस्तवनविषरस सदा पितोस व 'असा रस समर्पित्या अमृत आपुलें ओपिसी!' (३१) या पुढील अतिसरस केकाः-

**कवीश्वरमनः पयोनिधिसुतास्तुतीच्या पते !**
**भले न वरिती स्तुतिप्रति, न जोडिती पाप ते ! ।**
**गळां पडती ज्यांचिया तव गुणैकदेशभ्रमें**
**तिहीं तुजचि दाविता, भजति बा तुला संभ्रमें ॥ ३२ ॥**

कवीश्वरांचें मन हें क्षीरसागरासारखें गंभीर असतें व त्यांतून निघालेली स्तुतिरूप लक्ष्मी हिचा पति तूंच आहेस ह्म. कवीश्वर आपली वाणी तुझ्याच स्तुतींत खर्च करितात. स्तुतीचा पति तूं झाल्यामुळें भले स्तुतीला

आपल्याकडे येऊं देत नाहींत, कारण तसें करणें मात्रागमनीपणाचें होईल! संतांच्या ठिकाणीं तुझेच गुण पाहून स्तुति मात्र आपण होऊन तुझ्या गुणैकदेशभ्रमानें त्यांच्या गळां पडायला जाते, पण ते तिला पिटाळून परत तुजकडेच लावतात!' ही केका फारच बहारीची असून अत्यंत सूचक आहे. ध्वनिकाव्याचें ही केकाच काय पण सारी केकावलि अत्युत्कृष्ट उदाहरण आहे. ह्या पुढील सात केकांत (३३–३९) कवितासुतासमर्पणाचा विधि पंतांनीं मोठ्या युक्तीनें उरकून घेतला आहे! 'अहो कनकपीतवासा! तुमच्या ऐश्वर्याला शोभण्यासारखी माझी कवितासुता नाहीं, तथापि ती तुह्मांलाच वरायचा हट्ट घेऊन बसली आहे. ' तरी न इतरा वरी, हरि करी इला किंकरी ' मी नमस्कृतिपुरस्सर ती तुह्मांला अर्पण करितों. माझ्या अपराधांकडे पाहून तुह्मी तिचा त्याग करूं पहाल तर देवा! मी दुष्कृती आहें खरा पण सत्यभामा व जांबवती यांचे जनक दुष्ट असूनही केवळ त्यांच्या गुणांकडे व प्रेमाकडे लक्ष देऊन तुह्मीं जसा त्यांचा स्वीकार केलांत, तसा मत्कन्येचाही करा! अथवा ' भलें स्मरण जाहलें समयिं ' कंसदासी–' आठां ठायीं रांड वांकडी ' अशी कुब्जा तुह्मीं अंगिकारिलींत आणि मत्कन्येचा त्याग करणार कीं काय? तुह्मी प्रेमवश आहांत हें मला माहीत आहे. सुदामदेवाचे पोहे, विदुराच्या कण्या, शबरीचीं बोरें तुह्मीं प्रेमानें जर ग्रहण केलीं आहेत तर तुह्मीं माझी कवितावधू पदरांत घेतलीच पाहिजे!

**तुह्मां स्वरिपुची तशी बटिक आवडे, मत्कृती**
**नको, न सजवे, असा बहुत काय मी दुष्कृती? ॥ ३७ ॥**

तुझी सदयता सर्वमान्य आहे (४०–४६). 'क्षमस्व भगवन्नजामिलसखोस्मि ' असें ह्मणून मी तुला शरण आलों आहें. मीं कोठें चुकत असेन तर 'प्रभो! चुकतसें तरी करिसि तूंचि संरक्षण' (४१) तुझ्या सदयतेची ख्याति विश्व गात आहे, पण मला उद्धरिशील तेव्हांच मीं तें खरें मानीन! (४२) तुला सर्वभावें शरण येणें एवढेंच आह्मांकडे आहे:—

**प्रभो! शरण आलियावरि न व्हां कधीं वांकडे**
**ह्मणोनि स्तुकेंचि हें स्वहितकृत्य जीवांकडे।**
**प्रसाद करितां नसे पळ विलंब बापा! खरें**
**घनांबु न पडे मुखीं उघडिल्या विना पांखरें॥ ४० ॥**

मी तरी उतावीळ झालों आहें, कृतांतकटकाची ध्वजा फडकूं लागली आहे, रोगांबरोबर झगडतांना तनु भागली आहे, हें सर्व क्षणिक दिसूं लाग-

लें आहे, अशा वेळीं मला 'सहाय दुसरा नसे तुजविणें बळें आगळा' (४६) असा माझा निश्चय झाला आहे! आपण येऊन माझें रक्षण केल्याशिवाय कांहीं आपल्यांला सुटका नाहीं! तर मग उशीर कां लावतां! आह्मीं येऊं, तुझें रक्षण करूं, तुलारे आमची कशाला काळजी पाहिजे? असें (४७-४८) आपण ह्मणाल, तर अहो प्रियतमा! अहो जगज्जीवना:—

**सुखेंचि सुख बाळका प्रकट होय मातेचियों**
**तिला घडति जे श्रम प्रियजनोत्तमा! तेचि या।**
**ह्मणोनि न शिवो पळ क्षणहि कष्ट जीवा! तुला**
**विपज्जलधिसेतुला, सकललोकजीवातुला! ॥ ४९ ॥**
**असोत तुज आमचीं सकलभावुकायुर्बळें!**
**जगोनि बहु काय म्यां सुकृत जोडिलें दुर्बळें?**
**असें प्रियसख्या! सुखी बहुतकाळ; मायातमीं**
**जना सुपथ दाखवी; मुदित सत्तमा! यांत मीं ॥ ५० ॥**

ह्या दोन केका भगवत्प्रेमानें नुसत्या थबथबलेल्या आहेत. यांत प्रेमभरानें पंतांनीं देवाला 'माझ्या जीवा' ह्मणून आळवून आपलें आयुर्बल अर्पण केलें आहे! सूर्याला काडवातीनें उजळणें किंवा सागराला अर्घ्य देणें जसें सद्भाव दर्शवितें, त्याप्रमाणें देवाच्या काळजीनें देवाला आपलें आयुष्य अर्पण करणें व 'सुखी भव, चिरंजीव भव' ह्मणून आशीर्वाद देणें हें भक्तहृदयाचा जिव्हाळा दाखवितें 'मायातमीं जना सुपथ दाखवी' यांत पंतहृदयाची सकललोकहितेच्छा नामी प्रकट झाली आहे!

विषयवासनेचें ह्म० प्रपंचप्रीतीचें दुर्निवारत्व ५२-५४ यांत चांगलें दाखविलें असून विषयवासनारूपी खरीचा भगवंतांनीं कृपेनें स्वतः वध केल्याशिवाय आमची तिच्या झपाट्यांतून सुटका होणें कठिण आहे हें ५५-५७ यांत उत्तम प्रकारें सिद्ध केलें आहे. आह्मांला धनदारादिप्रपंचपाश सुटत नाहींत हें दाखविण्याकरितां स्तनपान करणाऱ्या कृष्णाला दूर सारून दूध उतू जात होतें तिकडे यशोदा धांवली, हा दृष्टांत मोठ्या मार्मिकपणानें ५२ व्या केकेंत दिला आहे! यशोदेचें कृष्णावर प्रेम होतें तथापि मोहाला वश होऊन तिनें दुधासाठीं तुला दूर सारिलें, तद्वत् तुझें गुणश्रवणकीर्तन आह्मांला मनापासून आवडत असूनही अनावर पिशाचिका विषयवासना आह्मांला

१ माता सुखी तरी बाळकासी सुख। नाहीं तर दुःख सर्वकाळ ॥ १ ॥

—तुकाराम.

भुलवीत आहे ( ५३ ) तुझी गुणकथा ही कामधेनु आहे, पण ही रासभी तिला हुंदडून लावते ! ही जशी शुकाला भ्याली तशी कोणालाही भीत नाहीं. मोठमोठे सदंड ( संन्यासी ) इला हांकतात, तथापि ही सर्वांनाच लाथाळते ! ह्मणून देवा ' हिचा वध करावया तुजचि शक्ति आहे खरी. ' तूं रामावतारीं ताटका व कृष्णावतारीं बकी मारलीस, तर त्वज्जनांवरही सत्ता करणाऱ्या ह्या त्रैलोक्यपीडक राक्षसीला तूं कृपा करून मार. ( विषयवासना आह्मांला अनावर आहे, त्वत्प्रतापाशिवाय ही आवरणें दुर्घट आहे हा कवीचा भावार्थ आहे. ) तूं ह्या राक्षशिणीच्या झपाट्यांतून आह्मांला सोडीव व कथाकामधेनूच्या कांसेला लाव. कथासुरभी किती तरी कृपाळु आहे पहा:—

**कथासुरभि या भल्या स्वजननीहुनी वाटती**
**शिशूंस जरठांसही निरखितां रसें दाटती ।**
**दुहोत भलते सदा तरि न लेशही आटती,**
**स्ववत्समल भक्षिती परि न सर्वथा बाटती ॥ ५८ ॥**

भगवत्प्रसादप्राप्तीसाठीं भगवत्स्तवन करायची मला फार आवड आहे ती ध्रुवाप्रमाणें आपण कृपा करून पूर्ण करा, हें ६०-६६ केकांत फार बहारीच्या शब्दांनीं मागितलें आहे. निगमस्तुता तुला मीं वेडें वांकडें गात आहेंच, पण तुमच्या स्तुतींत एकही वर्ण उणा नसावा असें मीं तुला निःशंक केव्हां गाईन बरें ! (६१) ध्रुवानें स्तवनाची आवडी धरली ह्मणून त्याच्या गालाला शंखस्पर्श करून स्वस्फूर्ति देऊन जशी पूर्ण केलीत, तशी माझी पूर्ण करा. असें पंतांनीं (६२) मागितलें आहे. अहो वराभयपरा ! करांबुज शिरीं धरा. त्यास मी पामर पात्र नसेन—आपला वरदहस्त माझ्या शिरावर पडावा एवढें माझें भाग्य नसेल—तर पदांबुज तरी माझ्या शिरीं ठेवा. आपल्या पदकमलाचीही पात्रत माझ्या ठिकाणीं नसेल तर जगत्त्रयास वंदनीय असें आपलें पदाब्जरजही मला पुरें ! (६३) आपणांस योग्य दिसेल तें करा, पण ध्रुवासारखा मजवरा प्रसाद करा एवढेंच माझें मागणें आहे. ध्रुवासारखा प्रसाद करा ह्मणून मीं मागितलें खरें, पण त्यामुळें ध्रुवाची मीं बरोबरी करितों असें मात्र समजूं नका:—

**किती वय ? कसें तप प्रखर ? काय विश्वास तो ?**
**ध्रुव ध्रुव खरा, स्तवा उचित होय विश्वास तो, ।**
**कशी तुळितसां तुह्मीं प्रकट मेरुशीं मोहरी ?**
**प्रसाद करितां उणें अधिक नाठवा हो हरी ! ॥ ६५ ॥**

ह्या केकेंत ध्रुवांशीं आपली बरोबरी होणार नाहीं असें स्पष्ट सांगूनही 'प्रसाद करितां उणें अधिक नाठवा हो हरी ' हा आपला मुख्य मुद्दा पंतांनी सोडला नाहींच! राजकार्यधुरंधर पुरुषाचें चातुर्य ह्यांत पंतांनीं व्यक्त केलें आहे.

**प्रभुत्व तरि हेंच कीं करुनि दे कृपा दान तें**
**स्वसाम्य यदुपार्जनें मिरविजे स्वपादानतें ।**
**प्रसाद मग काय तो जरि निवारिना लाघवा ?**
**कसें दशमुखानुजा विसरलां? अहो राघवा ! ॥ ६६ ॥**

ह्या केकेंत प्रभुत्व आणि प्रसाद या शब्दांच्या व्याख्या अत्यंत व्यापक व सुंदर केलेल्या आहेत. आपल्या दासावर-त्याची योग्यता नसतां-कृपा करून त्याला आपल्या पायरीला आणणारा तो प्रभु व लाघव निवारण होणें हा प्रसाद ! श्रीकृष्णानें सुदामदेवाला द्वारकेसारखी सोन्याची नगरी दिली व स्वसाम्याप्रत पावविलें हा प्रभुप्रसाद! श्रीरामानें बिभीषणाला लंकेचें राज्य देऊन चिरंजीव पद दिलें हा खरा प्रभुप्रसाद! परमात्म्यावांचून ब्रह्मांडांत कोणी प्रभु नाहीं, कारण स्वसाम्य देण्याइतकें ऐश्वर्य कोणाजवळही नाहीं व तितकी कृपाही नाहीं ! परमात्म्यावांचून प्रसाद करण्यास समर्थ कोणी नाहीं, कारण जीवाचें जीवपणाचें दारिद्र्य हरण करून त्याला ध्रुवपदावर चढविणाराही दुसरा कोणी समर्थ नाहीं ! ह्या केकेंत वेदांती व भक्त हे दोघेही रमतील, कारण वेदांत आणि भक्ति ह्या दोहोंची भेट एकाच मुक्कामावर होत असते ! जीव परमात्म्यैक्यरूपी बोहल्यावर वेदांत व भक्ति यांचें लग्न लागलेलें पाहण्याचें भाग्य ज्यांच्या कपाळीं असतें ते धन्य होत ! असो. केका ६७-६८मध्यें मला पचेल असा वर द्या असें सांगून शंकरानें कुपात्रीं दान दिल्यामुळें वृकासुरानें त्याचा कसा पिच्छा पुरविला, व सत्पात्रीं दान दिल्यामुळें उपमन्यूनें त्याचें कसें सार्थक केलें हें सांगितलें आहे व ' उदारपण तें भलें सुखवि तें सुपात्रा सदा' हें उदारपणाचें उदार लक्षण दिलें आहे. ७०-७२ केकांत पंतांनीं हरिहरांचा अभेद वर्णिला असून ७३-७५ या केकांत नामस्मरणाचें महत्व सांगितलें आहे. विषयांकडे ओढणारें मन नामस्मरणानें आवरलें जातें व नामधारकावर कळांचीही मात्रा चालत नाहीं हा सर्व भाविकांचा अनुभवच आहे. पंत ह्मणतात:—

**तुझें कुशळ नाम बा ! हळु हळू मना आकळी**
**दुरत्यय असा महाकळिहि त्यास भी हा कळी ......॥ ७४ ॥**

**तुह्मांसमचि हें उणें, अणु उणें नसे नाम, हा**
**दिसे अधिकंही, तसा गुण तुला असेना महा; ।**
**सदैव भलत्यासही सुलभ, आणखी गायका**
**छळी न, न अधोगति क्षणहि दे जगन्नायका ॥ ७५ ॥**

तुमचें नाम घेण्याचा अधिकार सर्वकाळीं सर्वजणांस आहे. तुमचें नांव 'भलत्यासही सुलभ' आहे, व वामनावतारीं तुह्मीं जसा बळि'छळ' केलांत तसा तें गायकाचा छळ करीत नाहीं! व त्याला 'अधोगति' ही देत नाहीं. 'छळ' आणि 'अधोगति' हे शब्द आठवितांच पंतांस वामनावताराचें स्मरण झालें व पुढील २५ केकांत (७६–१००) पंतांनीं भगवंताच्या दयाशीलतेचें अतिप्रेमानें वर्णन केलें आहे. देव भक्तांचा छळ करितो तो त्यांच्या कल्याणासाठींच करीत असतो, हें तत्व पंतांनीं ह्या ठिकाणीं इतक्या हृदयंगम रीतीनें व्यक्त करून दाखविलें आहे, कीं मला वाटतें तसें अन्यत्र कोठेंही व्यक्त केलेलें आढळणार नाहीं. जीवांचा व देवाचा संबंध जन्यजनकांचा असल्यामुळें देवाच्या मनांत अखिल जीवांविषयीं अत्यंत प्रेम नित्य वसतें ही अत्यंत उत्साहधैर्य देणारी गोष्ट पंतांनीं ह्या ठिकाणीं मनावर बिंबेल अशा मनोहर दृष्टांतासह सांगितली आहे. 'परित्राणाय साधूनां विनाशायच दुष्कृताम्' ह्म० भक्तांच्या रक्षणासाठीं व दुष्टांच्या विनाशासाठीं माझा अवतार होत असतो, अशी साक्षात् भगवंताची उक्ति आहे, पण भगवंताचें खरें मनोगत भगवंतापेक्षांही पंतांसारख्या भगवद्भक्तानें येथें अधिक खरेपणानें सांगितलें आहे असें मला वाटतें! भगवद्वाक्यावर अविश्वास ठेवण्याइतका पतित कोण आहे? तथापि आपल्या भक्तवत्सलतेचें भगवंताला जितकें ज्ञान आहे त्याहून अधिक ज्ञान त्याच्या भक्ताला आहे, असें ह्मटल्यास भगवदुक्तीचा अधिपेक्ष केल्याचा अपराध होणार आहे तथापि तो 'उरीं भृगुपदाहति' सोसणाऱ्या भगवंतांनीं सहन करावाच असें सहस्रप्रणामपूर्वक मीं ह्मणतोंच!! ह्या केका वाचण्यापूर्वी 'दुष्टविनाश' ह्या शद्बाचें इतकें मर्म माझ्या लक्षांत आलें नव्हतें. 'समोहं सर्व भूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः' ह्या उक्तीशीं वरील उक्ति विसंगत आहे असें कधीं कधीं मला वाटे, पण सदरहु केकांनीं ती भासमान होणारी विसंगतता दूर केली आहे! 'विनाशायच

---

१ 'नामा! रामाहुनि तूं सदय,' ही गोष्ट पंतांनीं 'नामार्या प्रकरणांत आर्या १२–२३ मध्यें सुरेख दाखविली आहे.

दुष्कृताम्' ही केवळ लौकिकभाषा असून 'समोहं सर्वभूतेषु' हेंच तत्व अगदीं खरें आहे! हिरण्यकशिपूचा 'विनाश' लौकिकदृष्ट्या भगवंतानें केला हें खरें, तथापि प्रल्हादासारखा परमभक्त त्याच्या पोटीं घालून स्वहस्तांनीं त्याला सद्गति दिली हें भगवंताचें कृत्य अत्यंत सदयतेचेंच होय! हिरण्यकशिपूचा 'विनाश' काय त्याच्या पोटीं प्रल्हादासारखा 'महाभागवत' जन्माला घालून होतो? साधारण पुण्यपुरुष आपल्या ४२ कुळ्या उद्धारतो, मग प्रल्हादासारखा परमभक्त उपजविणारा बाप काय 'दुष्ट' ह्मणावा? मरतांना भगवंताचें नुस्तें नांव मुखांत आलें तर आपण मोठी भाग्याची गोष्ट ह्मणतों, मग साक्षात् भगवंताच्या मांडीवर भगवंताच्या हातांनीं भगवंताचें मुखकमल डोळ्यांपुढें असतांना व सर्वेंद्रियें भगवद्रूप झालीं असतांना ज्याला 'मरण' आलें त्याचें मरण ह्मणजे काय त्याचा 'विनाश' आहे? हा जर विनाश असेल तर देवाच्या कोशांत ह्या शब्दाचा अर्थ भक्तांच्या कोशांतल्या अर्थाहून निराळा आहे असें ह्मणावें लागेल!

**असंख्य खळ संगरीं निजकरीं तुवां मारिले;**
**न निष्ठुरपणें, कृपा करुनि ते भवीं तारिले!।**
**जगज्जनक तूं, मुलें सकल जीव, यां भातुकें**
**दटावुनिहि देशि बा! अमृत नेदिजे घातुकें ॥ ९० ॥**

ही एक केका एक कोट रुपयांच्या किमतीहून भारी आहे. बाप बाह्यात्कारीं मुलाला भय दाखवूनही त्याच्या हातावर खाऊचा पुडा ठेवितो, त्या प्रमाणेंच आमच्या स्थूळ दृष्टीला 'विनाश', 'छळ', 'संकटें', 'आपत्ति', 'क्लेश', ही भगवंताची अवकृपा आहे असें वाटत असतें, पण आमच्या कल्याणासाठींच हें भगवंताचें 'दटावणें' आहे अशी प्रत्येकानें पक्की श्रद्धा ठेवावी. कोणाच्याही घाताची इच्छा अमृत देणाऱ्या देवाच्या ठिकाणीं नाहीं. 'जगज्जनक तूं, मुलें सकल जीव' हेंच देवाचें व आपलें नातें आहे. 'सुविद्य, धन मेळवी' असा मुलगा बापाला आवडतो (९४). आई ही दयामृतरसार्द्रधी आहे व तिचें प्रेम अधिक निरपेक्ष असतें (९५). तथापि एकादे वेळेस आई सुद्धां मुलावर 'कदाचित विटेल बा! (पण) तव दया न दीनावरी' (९६) तस्मात सिद्धांत हाच खरा कीं:—

**कृपाचि जननी तुझी, सकल जीव दायाद; या**
**तिणेंचि उपदेशिल्या करिति सर्व दाया दया!।... । ९७ ॥**

देवा! तुह्मीं दुष्टांचा 'विनाश' करितां त्यांत सुद्धां 'सदयते' शिवाय दुसरें कांहीं एक तुमच्या पोटांत नसतें. आह्मी सर्व जीव तुझी लेंकरें आहोंत, व तुझी दया ही आमची खरी आई व मातृपितृगुरु वगैरे सर्व तिच्या तंत्रानें चालणाऱ्या दाया होत! खळवधांतही जर तुह्मीं सदयता दाखवितां, तर बळीसारख्या भक्तांचा ' छळ ' हा छळ नसून तुमचा मोठाच ' अनुग्रह ' आहे असें स्पष्ट होतें:—

**तुह्मींहि बळि बांधिला, ह्मणुनि आमुची माय जी**
**मनांत सहजा दया, निपट टाकिली काय? जी!।**
**सकोप दिसती गुरु क्षणभरीच, जें तापलें**
**जल ज्वलनसंगमें, त्यजि न शैत्य तें आपलें! ॥ ८८ ॥**

परमेश्वर जीं जीं संकटें व दुःखें आपणावर आणतो, तीं तीं 'दटावण्या' पुरतींच असून आपल्या शुद्ध कल्याणासाठीं असतात हा भाव आपण नित्य अढळ ठेवला पाहिजे. 'तुझ्या मनांतली सहज दया ही आमची माय' आहे हें पळभरही न विसरतां त्याच्या दयाळूपणावर पूर्ण विश्वास ठेवला पाहिजे. आपल्या मनोगतांसाठीं देवावर घडिघडि रागावणाऱ्या चंचल स्त्रीपुरुषांनीं वरील तत्व नीट ध्यानांत ठेवून अनन्य व अढळ भक्ति ठेवावी ह्मणजे 'भावाचा भुकेला' भगवान दूर नाहीं. भगवंताच्या दयाळूपणाचें तत्व ह्याप्रमाणें उलगडून दाखविल्यावर पंतांनीं राम व कृष्ण ह्या अवतारांतील कांहीं कथाभागांचें देवास स्मरण दिलें आहे. बळीचा तुह्मी छळ केलांत, व त्याचा कीर्तिविस्तार करून जगाला तारलेंत, तसा माझा छळ मात्र करूं नका, छळें न करितां दया करा असें पंतांनीं (७६–७९) देवापाशीं मागितलें आहे. सीतेनें तुह्मांला त्रास दिला असून तुह्मीं तिच्यासाठीं " वनोवनिं फिरा पिशापरि, ह्मणा अहोरात्र ' हा, ' " तशीच मजविषयीं दया बाळगा व मला दर्शन देऊन कृतार्थ करा असें पंतांनीं ८०–८४ या पांच केकांत ह्मटलें आहे. मला आवडून घ्या, मी जसा आहें तसा मला पदरांत घ्या असें त्यांनीं यशोदेचा दृष्टांत देऊन पुढें (८५–८७) सांगितलें आहे. मी रजोमलिनकाय आहें, पण अशा तुझ्यावर यशोदा कसें प्रेम करीत होती त्याचें देवा! स्मरण करः—

१ ' सोसाया त्याचे छळ बळ कैसें आज पामरा मातें? ' हें छळ करूं नका असें ह्मणण्याचें कारण होय. मागें पृ० २७५–२७६ पहा.

**न जें प्रिय सदोष तें, प्रिय सदोष ही चांगलें;**
**स्वतोक पितरां रुचे, जरिहि कर्दमीं रांगलें; ।**
**तुलाचि धरि पोटिशीं, कशि तदा यशोदा बरें ?**
**जरी मळविशी रजोमलिन काय तूं अंबरें ॥ ८५ ॥**

भगवंताच्या अशा ज्या प्रेमळ कथा पंतांना भगवद्भक्तीचें रहस्य शिकविल्या झाल्या त्यांजकडे पंत ओघानेंच वळले. 'भुले सुकविवाग्वधू तव गुणा अनर्घ्या नगा' (९९) ह्मणजे कवीश्वरांची वाग्वधू तुझे निरुपम गुण हेच कोणी अलंकार त्यांना भुलते व तुझें यश पुन:पुन्हां गाऊं लागते. तुझी पुण्यकथा ' प्रतिक्षण नवीच दे रुचि शुकाहि संन्यासिया ' (१००). अशा भगवत्कथेची प्रशंसा करण्यास पंत यापुढें सरसावले व त्यांनीं पुढील तेरा केकांत ( १०१–११३ ) भगवत्कथेची प्रशंसा अत्यंत मधुर अशा वाणीनें केली आहे. भगवत्कथेचें सेवन न घडतां 'मतिस गेह भासे वन ' (१०२ ) अशी आतुरता ज्यांच्या ठायीं असेल त्यांनाच ती मोहील. ही मोहिनीपेक्षां अधिक मोहिनी आहे. कारण मोहिनीनें केवळ चंचळ असुर मोहिले, पण 'हिणें भुलविलें किती हो यती ! ' (१०३). ही सुधेपेक्षां अधिक मधुर आहे, कारण सुधा असुरवंचनी आहे व ही ' ठकवुनी हरी संचितें, तरी अमृत दे ! '( १०५ ). आणखी:—

**सुरासुरनरोरगां भुलवुनी कथा न त्यजी**
**न भेद करि पंक्तिचा, अमृत पाजिती सत्य जी...॥ १०४ ॥**

साक्षात् प्रभुमूर्तीपेक्षांही प्रभुकथा अधिक निर्मळ आहे ( १०८ ). कशी ? यमुनेपेक्षां जशी गंगा अधिक विशुद्ध व पावनी आहे तशी! (१०९). तुझी कथा मोहिनीहूनही अधिक मोहिनी आहे याचें आणखी एक प्रमाण:—

**प्रभो ! तुज न मोहिनी भुलवि, मोहिला तोहि ती**
**त्यजी जन; नव्हे तशी, तुज तुझी कथा मोहिती !...॥ ११२ ॥**

देवाचे भक्त शुद्ध प्रेमानें जेथें देवकथा गातात तेथें देव उभा असतो, हें स्मरून पंत देवापाशीं मागतात:—

**सुरर्षिजवळी स्वयें वदसि, ' तत्र तिष्ठामि; ' या**
**तुझ्याचि वचनें ह्मणें तुज कथावश स्वामिया ।**
**जसा स्थिर कथेंत तूं, स्थिर करीं तसें या मना,**
**स्वभक्तसुरपादपा ! सफळ हे असो कामना ॥ ११३ ॥**

कथेंत तूं जसा स्थिर आहेस तसेंच माझें मनही स्थिर कर, अर्थात् तुझी व माझ्या मनाची गांठ पडूं दे ! तुझी कथा अशी मोहिनी आहे खरी, पण तिची ओळख आह्मांला कोण करून देणार ? संतांशिवाय तुझ्या कथेचें मर्म कोण सांगूं शकेल ? ' तुझें चरित सन्मुखें श्रवण जाहलें यास्तव' दासीसुत हेच प्रजापतिसुत ( नारद ) झाले. याप्रमाणें पंतांनीं १३ केकांत भगवत्कथेची महती वाखाणली व भगवत्कथेची गोडी ज्या नारदाला लागली त्याचें उदाहरण पुढील २ केकांत देऊन पंत सहजच सत्संगावर येऊन ठेपले ! भगवत्कथा व भगवद्भक्त यांचा नित्यसंग आहे, ह्मणून पंत ह्मणतातः—

**तुझें यशचि तारितें, परि न केवला तारवे;**
**सहाय असिला असे तरिच शत्रुला मारवे, ।**
**न भागवत भेटतां न घडतांहि सत्संगती**
**न अश्वहृदयें तशीं तव यशोरसीं रंगतीं ॥ ११६ ॥**

भगवंताच्या कथा अमृतोपम आहेत खऱ्या, पण त्या कथांचें रहस्य जाणून भूतहितास्तव ते सर्वांना सांगणारे संत पाहिजेत. पंतांनीं केकावलींत भगवत्पदापासून प्रारंभ केला व ते सत्संगावर येऊन ठेपले, यावरून हेंच समजायचें कीं भगवत्पदप्राप्ति हें साध्य असून सत्संग हें साधन आहे ! भगवत्पदाचें माहात्म्य, स्वतःचें पतितत्व, शरणागति, प्रभुस्तुति, कवितासुतासमर्पण, स्वोद्धाराची उत्कंठा, विषयवासनेचें दुर्निवारत्व, कथासुरभीचें कारुण्य, ध्रुवाप्रमाणें प्रसाद करून लाघव निवारा अशी प्रार्थना, भगवन्नाममाहात्म्य, जीवांचें व भगवंताचें जन्यजनकांचें नातें, भगवंताचें दयाळुपण व भगवत्कथाप्रशंसा इतके विषय अनुक्रमानें केकावलींत आले आहेत. ब्रह्मोत्तरखंड, रामायण, भारत, भागवत व हरिवंश हे ग्रंथ पंतांनीं यापूर्वी मराठींत आणले असल्यामुळें त्यांतील अनेक कथांचेंही त्यांस ' भलें स्मरण जाहलें समयिं ! ' एकट्या केकावलीवरून पंतांची कवीश्वरमालिकेंत गणना झाली पाहिजे. रात्रंदिवस पुराणकथांचा पंतांना व्यासंग असल्यामुळें त्यांतील मनोहर कथांचें त्यांस ' समयिं स्मरण जाहलें ' व यास्तव केकावलींत रसाविर्भाव द्विगुणित झाला आहे. पंतांनीं केकावलीच्या शेवटीं ' सुसंगति सदा घडो, सुजनवाक्य कानीं पडो ' याप्रमाणें देवापाशीं वरदान मागितलें आहे. ते तीन श्लोक तर सर्वांच्या नित्यपाठांत आले आहेत. अखेरचा एक श्लोक पहाः—

**दयामृतघना ! अहो हरि ! वळा मयूराकडे**
**रडे शिशु तयासि घे कळवळोनि माता कडे ।**
**असा अतिथि धार्मिकस्तुतपदा ! कदा सांपडे ?**
**तुह्मां जड भवार्णवीं उतरितां न दासां पडे ॥ १२१ ॥**

केकावलि संपल्यावर पंतांस साक्षाद्रामदर्शन झालें अशी जुन्या लोकांची श्रद्धा आहे. असा कळवळ्याचा टाहो त्या दयामृतघनास भक्तमयूराकडे वळविण्यास पुरेसा आहे यांत शंका नाहीं !

११ केकावलींत काय रंग भरला आहे याची वाचकांस यावरून काहींशी कल्पना येईल. केकावलीसारखें स्तोत्र देवापुढें बसून देवाला नित्य आळविण्यास फार उपयोगाचें आहे. तें सहस्रवेळां ह्मणूनही 'प्रतिक्षणिं नवीच दे रुचि' या प्रकारें निरंतर प्रेमानंदरसानें स्रवणारें आहे. इंग्रजी विद्येच्या प्रसारापासून आमच्या देशांत जी नवीन विचारांची लाट आली आहे तिच्यांत पूर्ण बुडालेल्या कांहीं पंडितांना मात्र मूर्तिपूजकांच्या देशांतल्या सगुणोपासकाच्या ह्या अत्युत्कृष्ट स्तोत्राचा रस यथास्थितपणें चाखतां येईनासा झाला आहे ह्याबद्दल त्यांची कींव करावी तेवढी थोडीच होणार आहे! न्या. माधवरावजी रानडे हे अलौकिक पंडित होते व अंतःकरणाचेही कोमळ होते, तथापि पूर्ववयांत ते प्रार्थनासमाजाच्या फंदांत पडल्यामुळें पुराणकथांविषयीं, मूर्तिपूजेविषयीं, व सगुणोपासनेविषयीं त्यांचे ग्रह काहीं विलक्षण झाले होते. त्यांनीं व मुंबई इलाख्यांतील अत्यंत प्रसिद्ध मिशनरी डॉ. विल्सन यांनीं पंतांच्या कवितेवर कांहीं आक्षेप काढले होते, त्यांचें मालाकारांनीं अंक ५२ व ५४ मध्यें फार मुद्देसूद खंडन केलेलें असल्यामुळें तो जुना वाद येथें मीं पुनः उकरून काढीत नाहीं. केकावलीवर न्या. रानडे यांनीं काढलेल्या आक्षेपांचें मालाकारांनीं फार उत्कृष्ट खंडण केलें आहे. केकावलींत दुहेरी अर्थ आहेत हा न्या. रानड्यांचा पहिला आक्षेप चुकीचा आहे. त्याचप्रमाणें केकावलीला 'कृत्रिमकाव्य' ह्मणून ह्मणणेंही चुकीचें आहे. 'छंदोभंगाचा व व्याकरणभंगाचा अभाव, सुंदर रचना, अलंकारांची ठाकठिकीनें योजना, हीं जर कृत्रिमत्वाचीं अंगें ठरत असतील तर पृथ्वीवरील सर्व भाषांतील हजारों वर्षें जगन्मान्य होऊन राहिलेलीं सारीं मोठमोठीं काव्यें याच वर्गांत येणार !' केकावलीवर रानड्यांचे मुख्य आक्षेप दोन होते. एक 'पंतांनीं देवाशीं फाजील सलगी केली आहे' हा व दुसरा 'अद्वैत मत हें खऱ्या भक्तिभावाचें विध्वंसक असल्यामुळें पंतांच्या भक्तीची दिशा इतर एत-

देशीय सत्कवींप्रमाणें चुकलेली आहे!' हींही दोन्ही मतें विलक्षणच आहेत. न्या. रानड्यांनीं हे आक्षेप पूर्ववयांत काढलेले आहेत व ते प्रार्थनासमाजी मतांचे निदर्शक आहेत हें लक्षांत ठेवलें ह्मणजे त्यांचें खंडण करण्याच्या भानगडींत पडण्याचीही आज अवश्यकता नाहीं. आमच्या राष्ट्रीयपरंपरेचे संस्कार ज्याचे ढिले झाले नाहींत त्याला वरील आक्षेपांबद्दल हंसू मात्र येईल! ज्ञानेश्वर, तुकाराम, नामदेव, एकनाथ, रामदास हे सर्व पूर्ण अद्वैती आहेत व निस्सीम भक्तही आहेत! ह्या वादावरील मालाकारांचें अखेरचें मार्मिक अवतरण घेऊन मीं पुरें करितों. "मनुष्य हा ईश्वरापुढें अत्यंत क्षुद्र हें खरें पण तसेंच हेंही खरें आहे कीं, त्याचा उत्पन्नकर्ता व जनकही तोच आहे. तेव्हां आमच्या कवीनें देवापुढें कितीही 'लुब्रेपणा' केला असला तरी त्याचा अपराध ह्मटला ह्मणजे बापापाशीं मुलानें अल्लडपणा केल्याप्रमाणेंच होय. हा पुत्रजनकभाव कवीनेंही कित्येक पद्यांत सुरसरीतीनें वर्णिला आहे......... ख्रिस्तीधर्म, मुसलमानी धर्म, ब्राह्मणांचा धर्म, प्रार्थनासमाज, या सर्वांतील देवांकडे जितकें सन्निध जावें व तन्मय व्हावें, तितका इकडचा संबंध तुटला, व महाराष्ट्रकवींच्या कृतीवर अभिप्राय देण्याचा तितका अधिकारही कमी झाला! मूर्तिपूजकांच्या काव्यांतील प्रेम इतर धर्मांतील लोकांस कळावयाचें नाहीं व त्यांच्या काव्यांतील रसानुभव मूर्तिपूजकांस घेतां येणार नाहीं, यास्तव ज्यानें त्यानें आपला जितका अधिकार आहे तितकाच सांभाळून राहावें हें बरें!......... जोंपर्यंत हजारों महाराष्ट्रजनांच्या हृदयास आमच्या सरस्वतीप्रिय मयूराचा टाहो भेदून जात आहे, जोंपर्यंत त्याचा सारा पिसारा उभारलेला पाहून त्याच्या अप्रतिम वैचित्र्यानें जनसमूह चकित होऊन राहत आहे, जोंपर्यंत मेघदर्शनजनित हर्षभरांत तो नृत्य करीत असतां वाग्देवीच्या नूपुरांचा मंजुल रव रसिकजनांस त्यांच्या कर्णांची धन्यता वाटवीत आहे, तोंपर्यंत कितीही मुल्लासाहेबांचे, रेवरंड साहेबांचे किंवा रांवबहादुरांचे अभिप्राय त्यास प्रतिकूळ पडले तरी त्यास तिळमात्रही धाक बाळगावयास नको!...आमच्या 'द्विजराजा 'च्या वाणीचा रसानुभव घेण्यास ज्यास समाज आडवा येतो ते एकेश्वरभक्तही अत्यंत अनुकंपनीय मात्र होत!!"

१२ केकावलीच्या समाप्तीनंतर पंतांनीं फारशी कविता लिहिली नाहीं. दहाव्या प्रकरणापासून येथपर्यंत पंतांच्या काव्यार्णवाचें मंथन करून त्याच्या

पोटांत काय काय दिव्य रत्नें आहेत तीं आपण पाहिलीं. पंतांची कविता सरासरी एक लाख पर्यंत झाली. त्यांतला बहुतेक भाग उपलब्ध झाला असून १०।१५ हजार पर्यंत कविता लुप्त झाली असावी असें वाटतें. पंतांनीं आपल्या गुरूवर एक प्रकरण केल्याचें ऐकिवांत आहे, पण तें सांपडलें नाहीं. पंतांनीं गणपतीवर एक हजार आर्या केल्या होत्या, पण त्या मिळाल्या नाहींत. कांहीं कांहीं पंतलिखित प्रकरणें जीं बारामतीहून बाहेर गेलीं तीं परत पंतांकडे आलींच नाहींत. नाशकास एका गृहस्थाच्या दप्तरीं पंतांनीं पंचवटीवर व पंचवटीच्या रामावर केलेल्या ४०।५० सुंदर आर्या मला मिळाल्या. त्या कोठेंही छापल्या नाहींत व पंत किंवा चातुर्मासे यांच्या दप्तरीं नाहींत. पंत नाशकास गेले होते तेव्हां त्यांनीं त्या रचल्या व नाशकासच एका रसिकाच्या दप्तरीं १२५ वर्षें त्या पडून राहिल्या! पंत कांहीं पत्रांतून आर्या लिहीत, अशींही कांहीं पत्रें नष्टप्राय झालीं आहेत. पंतांचीं कांहीं रामायणें आजिंठ्याच्या घाटांत मैराळबोवांना चोरांनीं लुटलें तेव्हां नाहींशीं झाल्याबद्दल मागें लिहिलेंच आहे. पंतांनीं तीन लाख कविता केली असा लोकप्रवाद निबंधमालाकारांनीं प्रसिद्ध केला होता. पण त्यांत कांहीं अर्थ दिसत नाहीं. वरील सारखीं कांहीं स्फुट प्रकरणें, थोडींशीं रामायणें व वैद्यकीवरच्या आर्या मिळून १०।१५ हजारांहून अधिक कविता नष्ट झाली नाहीं. पंतांचा बहुतेक कवितासंग्रह पंढरीस त्यांच्या वंशजाकडे व चातुर्मासे बोवांकडे आजमितीपर्यंत सुरक्षित ठेवलेला आहे. पंतांच्या वृद्धपणीं रचलेल्या ४१२ प्रकरणांचा उल्लेख करून संपवितों. काशीयात्राप्रसंगीं रचलेल्या काव्या'चा विचार पृ० २६८–२७८ मध्यें केला आहे. **अनंतव्रतकथा** ह्या प्रकरणावर १०३ आर्या आहेत. **दत्तचरित्रावर** त्यांनीं ५५ साक्या रचल्या आहेत. पंतांनीं चित्रकाव्यें फार करून रचलीं नाहींतच, पण स्रग्धरावृत्तांत त्यांनीं संस्कृत **अम्लानपंकजमालाबंधपंचक** रचिलें असून दुसरें मराठी **अश्वधाटीदशक** केलें आहे. त्यापैकीं प्रत्येकांतून एकेकच श्लोक उतरून घेतों:—

१

**दाता धाताविता त्वं गृह इह गहने लोकशोकघ्नकर्मा**
**दीनानां नाथ! नान्यो हतनतपतनस्त्वां विना विश्ववृत्तम्।**
**मायेशाये नये त्वामनुनतु मनुजास्तैः कृतं कृत्स्नकृत्यं**
**वाग्विद्यावित्तविघ्नैर्बत हतमतयो राम! वा मद्यमत्ताः ॥ १ ॥**

२

**मी नेणतें बाळ कारुण्यदुष्काळ केला तरी काळ कंठूं कसा ?**
**घेतो पदीं भाळ ठेवूनि सांभाळ पेशी सदा बाळ जैसा पिसा ।**
**लोकैकवीर ! क्षमाधारधी ! रक्ष माधीश ! मी रक्षणार्ह स्वयें**
**तूं आमुच्या पक्षसंरक्षणीं दक्ष, वंदूं तुला लक्षदां निश्चयें ॥ २ ॥**

पंतांनीं चित्रकाव्यांकडे अधिक लक्ष दिलें नाहीं; व आपल्या बुद्धीला ह्याप्रमाणें रामपदकमळीं वांकवून मात्र पाहिलें हें ठीक झालें. पंतांनीं 'जीर्ण झाल्यावर **रामरीति** ह्मणून १०३ आर्यांचें एक खुबीदार प्रकरण रचलें आहे व त्यांत 'लोकरीति,' 'मद्रीति' व 'रामरीति' व्यक्त करून दाखविल्या आहेत ! 'हरिदासातें निंदिति हरिदास' अशी लोकरीति आहे, ह्मणजे एकाच पेशाचे लोक गुणज्ञ कमी पण मत्सरी फार असतात ! 'दिसति ह्मणविति हि भगवद्भक्त, रसिक साधुजन निपट थोडा !' ( १६ ). अन्यग्रंथाला मुरसानें पुष्ट करणारे निर्मत्सर रसिक विरळ आहेत ( १७ ). पंत ह्मणतात माझी रीति अशी आहे कीं ' दुष्काळांत सांपडलेल्याला सर्वच गोड लागतें त्याप्रमाणें सर्वच ग्रंथ मला गोड लागतात. त्यामुळें दुसऱ्यांचे ग्रंथ मी शुद्धभावानें वाचतों व स्वतःचे ग्रंथ केवळ भगवत्प्रीत्यर्थ रचितों ! :—

**श्रीरामा ! बहुगोडचि मजला जैसें दुकाळल्या सर्व ।**
**कोठें मिळतें ? कैची शक्ति ? धरिन कां मनांत मी गर्व ? ॥ ७० ॥**
**त्वत्प्रीत्यर्थ तव सुगुणमयचि कवन करुनि वेंचितों देहा ।**
**उत्साह त्वत्कीर्तनरस चित्ता नवनवेंचि तें देहा ॥ ६८ ॥**

' जो सप्रसाद, यातें नच साहे विप्रसाद या लोकीं ! ' ( ५७ ) ह्मणून. गुणवंताला देखों न शकणें ही लोकरीति आहे. पंतांनीं आपली रीति वर सांगितलीच आहे. रामाची रीति अशी आहे कीं त्याला 'भलतसें पण सद्भावानें केलेलें स्तवन रुचतें व तो स्वभक्तांवर पूर्ण दया ' करितो. पंत ह्मणतात कीं मद्रीति रामास रुचल्यामुळें त्यानें माझे हेतु पुरविले व देव आणि त्याचे भक्त यांचीं चरित्रें गाण्याची सज्जनांकरवीं मला प्रेरणा केली ( ९७ ) आपलें चित्त निरभिमान झालें आहे अशी पंतांची मनोदेवता त्यांस सांगत होती. ' मज अभिमान नसे, म्यां रामपदाच्याच वाहिल्या आणा ! '( ७७ ) आपण भगवंताच्या सगुणलीला वर्णन करण्यांत आयुष्याचें खरें सार्थक केलें असें पंतांना वाटून शेवटीं शेवटीं अत्यंत समाधान झालें ' ज्याची वाणी त्वत्की-

तींची अधीनता पावे ' [ तो निजसार्थक्याच्या चिंतेनें ताप पावत नाहीं ( २७ ). भगवत्पर काव्यरचनेंत ज्या पुण्यपुरुषाचा सारा जन्म गेला त्याला आपण वाङ्मय तप करून ' यत्करोषि ' ह्या भगवद्वचनानुसार वागलों, व आपलें तप अनपार्थ ह्मणजे सफळ झालें असें वाटून अत्यंत समाधान झालें. पंतांचीच उक्ति पहा:—

**तूं ' यत्करोषि ' ऐसें वदलासि, दिलें तयासि मन पार्थें, ।**
**कवि वाङ्मयें तपें तुज अर्पिति, तीं जाहलींच अनपार्थें ॥ २४ ॥**

---



# प्रकरण एकविसावें.

## गुणदोषविवेचन.

**तुमच्या पदप्रसादें फार चमत्कार अर्थयमकांचे।**
**त्यांत प्रभुयश, तद्दशजगदुद्धाधिनेंचि यम कांचे ॥ ६९ ॥**
**—नामरसायन.**

१ विषयप्रवेश. २ यमकरचना. ३ यमकरचनारंभ व बव्हक्षरीयमकरचनेचा इतिहास ४ बहुवक्षरी यमकांचा प्रघात पाडणारे कवि विठ्ठल, नागकवि, आनंदतनय व वामन. ५ त्यांच्या कवितेंतलीं यमकांचीं उदाहरणें. ६ पंतांचें यमकसौकर्य. ७ पंतयमकांचे विविध प्रकार. ८ पंतभारतांतील लांबलांब यमकांचीं, ससंदर्भ व सार्थ उदाहरणें. ९ पंतांच्या यमकांचे गुणदोष. १० अनुप्रासाचीं उदाहरणें. ११ अनुप्रासाचा दुसरा प्रकार. १२ यमकानुप्रासांच्या विवेचनाची समाप्ति. १३ श्लेषरचना; सार्थ उदाहरणें. १४ म्हणींची रचना: या विषयाचें महत्व व म्हणींची उपपत्ति. १५ मराठी भाषेंतल्या म्हणी, पंतांचे म्हणीवजा चरण. १६ म्हणींचा सोपपत्तिक इतिहास तयार करण्याची अवश्यकता. १७ अनुकरणवाचक शब्द. १८ संस्कृत पद्धतीचें पंतांच्या कवितेला लागलेलें वळण. १९ यावनी शब्द. २० पात्रानुरूप भाषा. २१ लोकोक्ति म्हणजे भाषणसांप्रदाय. २२ रस. २३ अलंकार. २४ आर्यावृत्त. २५ दोष. २६ उपसंहार.

१ मागील दहा प्रकरणांत पंतकवितेच्या अंतःस्वरूपाचें विवरण झालें, आतां तिच्या बाह्यस्वरूपाचें आविष्करण या प्रकरणांत करूं. अंतःस्वरूपापेक्षां बाह्यस्वरूपाची मातब्बरी अर्थातच कमी आहे, तथापि ग्रंथाच्या पूर्ततेसाठीं तिकडेही लक्ष पुरवणें जरूर आहे. अर्थदृष्टीनें मागील प्रकरणांत विचार झाला, आतां भाषादृष्टीनें आपण विचार करूं. पंतकवितेचा विषय निघाला कीं लोकांना प्रथम त्यांच्या दीर्घयमकांची आठवण होते, म्हणून प्रथम यमकांकडेच वळूं.

२ **यमकरचना:**—मोरोपंतांच्या भाषेचा अगदी ठळक विशेष म्हटला म्हणजे त्यांनीं यमकबद्ध काव्यरचनेकडे विशेष लक्ष पुरविलें हा होय. त्यांच्या काव्यांत

यमकप्राचुर्य आहे यामुळें कित्येकांची त्यांजवर अतोनात भक्ति आहे, व कित्येकांचा याचसाठीं त्यांजवर मोठा रोष आहे ! या परस्परमतविरोधी पंडितांमध्यें आजवर पुष्कळ वाद झाले आहेत. त्यांचा येथें विचार करण्याचें कारण नाहीं. मोरोपंतांनीं केवळ यमकांकडेच लक्ष पुरविलें असते, व त्यामुळें त्यांच्या काव्यांत प्रसाद, ओज, रसपूर्णता वगैरे गुण नसते तर त्यांना दोष देतां आला असता. पण रसहानि होऊं न देतां जर त्यांनीं शब्दचमत्कारांकडे विशेष लक्ष पुरविलें असलें तर एवढ्याच कारणासाठीं त्यांच्या कवितेचा अधिक्षेप करणें कोणत्याही समंजस मनुष्यास युक्त होणार नाहीं. इंग्रजी भाषेंतली बहुतेक कविता निर्यमक आहे, ह्मणून तिच्या रसवत्तेची कांहीं पंडित अधिक तारीफ करितात, पण ते हें लक्षांत बाळगीत नाहींत कीं संस्कृताइतकी इंग्रजी भाषा प्रगल्भ झालेली नाहीं, संस्कृताप्रमाणें इंग्रजी भाषेचें व्याकरण नियमांकित झालेलें नाहीं, अमर, मयूख, विश्व, यासारखे कोश इंग्रजींत तयार होण्यासारखे नाहींत, संस्कृतांत शब्दांची अनेकार्थता व समासघटना यमकरचनेस जशी अत्यंत अनुकूळ आहे तशी ती इंग्रजी भाषेस नाहीं. हें इंग्रजी भाषेचें वैगुण्य आहे व संस्कृताच्या साह्यानें मराठीला या गोष्टी सुलभ झाल्या आहेत. फ्रेंच वगैरे युरोपांतल्या भाषांत यमकबद्ध काव्यें आहेत, इंग्रजीला सुद्धां त्यांचा अगदीं विटाळ नाहीं असें नाहीं. शेले, साउदे, ॲडिसन यांच्या काव्यांत यमकें साधण्याचा यत्न झालेला आहे. ॲडिसनच्या रोसॅमंड या त्र्यंकी नाटिकेंत 'रोसॅमंडचें' गाणें दिलें आहे तें, किंवा साउदे कवीनें 'जलप्रपाता'चें वर्णन दिलें आहे तें वाचलें ह्मणजे इंग्रजी कवींनीं यमकें साधण्याचा यत्न केलेला उघड दिसतो. इंग्रजी इतिहासांत ॲडिंगटन् व पिट् यांच्या भाषणानंतर एका वक्त्यानें "Pit is to Addington what London is to Paddington" अशा एका सयमक वाक्यानें मोठा हंशा पिकविला व एका मोठ्या व्याख्यानाचें कार्य करून प्रतिपक्षाला चीत केलें अशी गोष्ट आहे ! शब्दचमत्कार रसविरोधक आहेत ही कल्पनाच खोटी आहे. संस्कृत काव्यांतही यमकांचा पुष्कळ आदर केलेला आहे. निबंधमालाकारांनीं मालेच्या ४७ व्या अंकांत "संस्कृतांत पूर्वीपासून यमकाचा मुळीच प्रघात नाहीं, तेव्हां त्याच्या संबंधाचें त्या भाषेंत प्रमाण सांपडणार नाहीं हें उघडच आहे. पण अनुप्रासाविषयीं मात्र पाहिलें तर अगदीं मोठमोठ्या कवीश्वरांपासून तों अर्वाचीन सामान्य कवींपर्यंतही त्याचें प्राबल्य

आढळतें." असें लिहिलें आहे. अनुप्रासांविषयीं मालाकारांचें ह्मणणें बरोबर आहे, पण यमकांविषयीं त्यांनीं जें लिहिलें कीं संस्कृतांत यमकांचा मुळींच प्रघात नाहीं व त्यांचें त्या भाषेंत प्रमाणही सांपडणार नाहीं तें मात्र अगदीं चुकीचें आहे. काव्यप्रकाशाच्या नवमउल्लासांत व साहित्यदर्पणाच्या दशमपरिच्छेदांत अनेक प्रकारच्या यमकांचीं लक्षणें व उदाहरणें दिलीं आहेत; माघ, भारवि वगैरे महाकवींनीं आपापल्या महाकाव्यांत मोठमोठीं यमकें साधलीं आहेत, असें असून मालाकार ह्मणतात कीं, 'संस्कृतांत यमकांचा मुळींच प्रघात नाहीं!' 'कविपंचका'वर सुरस निबंध लिहिणाऱ्या पंडितांच्या हातून अशी चूक व्हावी हें केवढें आश्चर्य आहे!

२ बहुतक सारी मराठी कविता समयक आहे. 'ओं नमोजी आद्या। वेदप्रतिपाद्या। जयजय स्वसंवेद्या। आत्मरूपा।', या मराठी भाषेंतल्या आद्यकाव्यांतल्या आद्य ओंवीपासून तों जोशीबोवांच्या कोणत्याही लावणीपर्यंत यमकबद्ध रचना सर्वत्र आढळते. ज्ञानेश्वरांच्या ३॥ चरणी ओंवींत ३ चरण समयक आहेत, व नाथांच्या चार चरणी ओंवींत ३॥ चरण सयमक आहेत:—

**ज्ञानेश्वरीपाठीं। जो ओंवी करील मराठी।**
**तेणें अमृताचे ताटीं। जाण नरोटी ठेविली॥ १॥**

नामदेव किंवा तुकाराम यांचे अभंगपादही समयकच आहेत. मराठी भाषा जन्मतांच सयमक जन्मली. ज्ञानेश्वरांपासून तों मुक्तेश्वरापर्यंत साडे तीनशें वर्षांत जी मराठी कविता झाली, तींत एकाक्षरी, द्व्यक्षरी किंवा फार तर त्र्यक्षरी यमकेंच सांपडतात. याच्यापुढें यमकाक्षरांची संख्या इतकी वाढत गेली कीं, 'अनलसमाहित साधी' या आर्येंत मोरोपंतांनीं तिचा कळस केला! मुक्तेश्वराच्या काळीं अनेकाक्षरी यमकें कां जन्मलीं याचा आपण प्रथम थोडा विचार करूं.

एकनाथस्वामींनीं (शके १४७०–१५२१) तीनशें वर्षांच्या तिमिरानंतर महाराष्ट्रांत प्रथम धर्मजागृति केली, व त्यांच्याच प्रेरणेनें 'कवीश्वरमनःपयोनिधीस' प्रचंड भरती येऊन त्यांतून मुक्तेश्वर, रामदास, मोरया गोसावी, तुकाराम, जयरामस्वामी, केशवस्वामी, रंगनाथस्वामी, आनंदतनय, वामनपंडित, विठ्ठल बीडकर, निरंजन, शेखमहंमद वगैरे शेपन्नास सत्कविरत्नें एकदम बाहेर आलीं. यांनीं काय काय चमत्कार केले हें बहुधा कोणासही सांगायला नकोत; यांनीं यवनी अमलानें धर्मावर चढलेला गंज

काढून टाकून धर्माला उजाळा दिला; महाराष्ट्रभर उपासनेचा गजर चालवून धर्मजागृति केली; कथा, कीर्तनें, भजनें, पुराणें, ललितें, भूपाळ्या, आरत्या वगैरेंस नवा जोर मिळून तीं समाजांत फैलावलीं; मराठ्यांचा धर्म, मराठ्यांची भाषा, व मराठ्यांचा देश याविषयीं अभिमान जागृत केला; व भगवद्भक्तांचा डांगोरा पिटून कळिकाळासही दरारा उत्पन्न केला. साधुसंतांनीं भक्तिमार्गाचा धोपट मार्ग जडजीवांना घालून दिला. अशा धर्मजागृतीच्या प्रसंगीं धर्मग्रंथांचें पुनरुज्जीवन सहजच झालें. ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत वगैरे ग्रंथांचा प्रसार झाला. तुकाराम, रामदास वगैरे अवतारी पुरुष जागचे जागीं भगवत्प्रसादाच्या जोरावर कविता रचून ह्मणत. त्यांच्या दृष्टीला त्रैलोक्यनायकाशिवाय दुसरी वस्तु कोठून दिसणार ? पण त्यांची अद्भुत काव्यस्फूर्ति सामान्य हरिदासपुराणिकांना कोठून येणार व सर्वत्र तुकाराम व रामदास यांची जिवंत वाणी लोकांना कशी ऐकूं येणार ! यामुळें कीर्तनपुराणादि धर्मसंस्था चालविणाऱ्या हरिदासांसाठीं निराळी कविता निर्माण होणें अवश्य झालें. तेव्हां वामन पंडित, आनंदतनय, विठ्ठल वगैरे कवींनीं लोकाभिरुचीकडे, लोकशिक्षणाकडे व लोकधारणेकडे नीट लक्ष पुरवून सीतास्वयंवर, रुक्मिणीस्वयंवर, अहल्योद्धार, ध्रुवचरित्र, प्रल्हादचरित, मार्कंडेयाख्यान, सुदामचरित, भरतभाव वगैरे रामायणभारतभागवतांतील निवडक कथाभागांवर स्वतंत्र आख्यानें रचून तीं लौकिक हरिदासांच्या स्वाधीन केलीं. धर्मजागृतीला रामदासतुकारामांचा जसा उपयोग झाला तसाच या हरिदासांचाही झाला. तुकारामादिकांची कळकळ त्यांत मुळींच नव्हती असें ह्मणणें योग्य होणार नाहीं. त्यांनाही ईश्वरभक्ति व सन्मार्ग यांची वृद्धि होईल हेंच कर्तव्य होतें. पण लोकांना रुचेल अशा बेतानें तें कार्य त्यांना करायचें होतें. तुकोबांचे कोरडे सोसण्याचें ज्यांत सामर्थ्य आलेलें नाहीं, किंवा समर्थांचा बोध ठसण्याइतकी बुद्धिमत्ता ज्यांत नाहीं, असे लक्षावधि जीव प्रपंचांत गुरफटलेले पण मुक्त होण्याची मंद इच्छा ज्यांना झाली आहे असे होते. त्यांना मधांत औषध घालून देणारे वैद्य पाहिजे होते. मनोरंजनाबरोबर बोध व भक्तिभाव उत्पन्न करणारे उपदेशक त्यांना पाहिजे होते, व ते निर्माणही झाले. दुसरें असें कीं, या काळीं रामायणभारताशिवाय कालिदासादि जे मध्यकालीन कवि झाले त्यांच्याही काव्यांचा अभ्यास जारीनें महाराष्ट्रांत सुरू झाला. पंचमहाकाव्यें, संस्कृतांतील ना-

टकें, अलंकारग्रंथ, छंदःशास्त्रावरचे ग्रंथ यांचाही अभ्यास सुरू झाला. अध्यात्मविद्या व वाङ्मय या दोहींचाही अभ्यास चालू झाला. तुकाराम रामदासादि संत केवळ अध्यात्मविद्यापर होते; वामनआनंदतनयादि अध्यात्म व वाङ्मय या दोहींत निष्णात होते; विठ्ठल, रघुनाथपंडित हे केवळ वाङ्मय-निरत होते. याप्रमाणें त्या वेळच्या कवींत तीन प्रकार दिसतात. मराठी कवि अध्यात्मविद्यापर होते तोंपर्यंत अनुष्टुप्छंदावरून निघालेले ओंवी व अभंग हे दोनच छंद त्यांना पुरे होते. मुक्तेश्वरापूर्वी बहुतेक सारी मराठी कविता याच दोन वृत्तांत होती, पण या काळीं संस्कृतवाङ्मयाचा अभ्यास सुरू झाल्यामुळें संस्कृतांतील गणवृत्तेंही मराठींत सुरू झालीं. मराठी भाषेनें अनेक गणवृत्तांचा आश्रय करितांच तिची मर्यादा वाढली व तिला व्यापकता, प्रगल्भता व प्रौढता आली. रामदास, मुक्तेश्वर, आनंदतनय, वामन, विठ्ठल व नागकवि यांनीं संस्कृतांतलीं लहान मोठीं अनेक वृत्तें मराठींत आणलीं. या काळची मराठी कविता याच कारणानें मोठी जोरदार दिसते. जलसंचयाचा बांध फोडल्याबरोबर आंतलें पाणी जसें उसळून बाहेर पडतें, किंवा वर्षाऋतूंत नद्या जशा खळाळ्या मारीत उड्या घेत जातात, त्याप्रमाणें ही सतराव्या शतकांतील मराठी कविता आहे. या वेळच्या सर्व कवींनीं अर्थासाठीं ऱ्हस्वाचें दीर्घ, दीर्घाचें ऱ्हस्व करून शब्दांचे हातपाय तोडण्यांत किंवा वाढविण्यांत अगदीं कसूर केली नाहीं! तरी या वेळच्या कवितेंत विलक्षण तेज व दिव्य सामर्थ्य आहे. तात्पर्य, या धर्मजागृतीच्या काळीं हरिदासांसाठीं वामनादिकांनीं स्वतंत्र आख्यानें रचिलीं; संस्कृत वाङ्मयाचा, साहित्य व छंदस् या शास्त्रांसह अभ्यास होऊं लागल्यामुळें गणवृत्तें मराठींत आलीं; व गणवृत्तें ही यमकानुप्रासादि शब्दचमत्कारांना अनुकूल असल्यामुळें व वामनादिकांनीं ज्या हरिदासांकरितां आख्यानें रचिलीं त्यांना जनमनोरंजनाची थोडीशी अपेक्षा वाटूं लागल्यामुळें, यमकप्रासांकडे वामनादि तत्कालीन कवींचें विशेष लक्ष वेधलें. असा बहक्षरी यमकरचनेचा पूर्वेतिहास आहे.

४ हा बहक्षरी यमकरचनेचा प्रघात प्रथम कोणीं पाडला याबद्दल निबंधमालाकार व वामनरावजी ओक यांमध्यें जी खडाजंगी उडाली ती वाचकांनीं मालेच्या ६१ व ६२ या अंकांत पहावी. 'यमक्या वामन' या रामदासदत्त पदवीमुळें व अन्यकवींच्या अप्रसिद्धीमुळें हा प्रघात पाडल्याचा मान एकट्या वामनासच मिळणें योग्य आहे असें मालाकारांचें मत आहे;

मुक्तेश्वर, विठ्ठल, वामन व रामदास हे सर्व समकालीन असल्यामुळें व त्यांचे आणि त्यांच्या ग्रंथांचे काळ निश्चित न झाल्यामुळें वामनाच्या प्रसिद्धीवर त्याला एकट्याला हा मान मिळणें अन्याय्य आहे असें वामनरावजींचें मत आहे. माझ्या मतें यमकाच्या वादांत मुक्तेश्वराला व रामदासाला आणणेंच योग्य नाहीं. एक तर यांच्या ग्रंथांत तीन चार अक्षरांपेक्षां अधीक अक्षरांचीं यमकें नाहींत व दुसरें 'सोडवीलें–तोडवीलें' असल्या यांच्या यमकांत विशेष स्वारस्यही नाहीं. चार किंवा चारांहून अधिक अक्षरांचीं यमकें पाहूं जातां आनंदतनय, विठ्ठल व वामन हे तिघेच या मानाचे वास्तविक अधिकारी राहतात. भिन्न भिन्न गणवृत्तें मराठींत प्रथम आणल्याचा मान कदाचित् मुक्तेश्वरास मिळेल, तसें बव्हक्षरी यमकें मराठींत आणल्याचा मान कदाचित् आनंदतनयास मिळेल. पण निश्चयात्मक कालनिर्णय अद्यापि कोणाचेच झाले नसल्यामुळें विठ्ठल, आनंदतनय, वामन व नागजोशी या चौघांसही बव्हक्षरी यमकें मराठींत आणल्याचा मान देऊन हा वाद मिटवावा हें बरें दिसतें. तिघांविषयीं पंतांचे अभिप्राय असे आहेत:—

**आनंदतनय अरणीकर शोभवि फार कवन यमकांहीं ।...७३ ॥**
**विठ्ठलकविच्या भलता लंघूं न शकेचि चित्रकूटांतें ।...। ७४ ॥**
**—सन्मणिमाला.**

**अन्यत्र नसे कवनीं यावे रस सर्व हा नियम कांहीं ।**
**केली भाषाकवि जे त्यांची तों गर्वहानि यमकांहीं ॥ ९ ॥**
**—वामनपंडितस्तुति.**

यांत विठ्ठलकवीच्या विविध कूटांचीच पंतांनीं तारीफ केली आहे, ती मराठींत चित्रकूटें विठ्ठलानेंच प्रथम आणलीं यास्तव योग्य आहे. पंत आनंदतनयाच्या यमकशोभेचें गौरव करितात व वामनानें भाषाकवींची गर्वहानी आपल्या सरस यमकांनीं केली असें ह्मणतात; यावरून **'भाषाकवि'** ह्मणजे **'प्राकृत अगर मराठी कवि'** यांच्या काव्यांत पूर्वी यमकें योजलेलीं होतीं व तदनंतर वामनानें आपल्या काव्यांत अधिक सरस यमकें योजून त्यांना मागें पाडिलें, असा पंतांचा आशय दिसतो. वामनापूर्वीच्या कवींत पांच सहा अक्षरी[१] यमकें विरल होतीं तीं वामनानें शतशः योजिलीं आहेत; त्याची ग्रंथसंपत्तिही इतरांच्या मानानें अधिक व सरस आहे; त्याची विद्वत्ता व कीर्ति

१ विठ्ठलानें 'तैसें म्यां इतुकें कवित्व यमकें आरंभिलें कौतुकें' असें रुक्मिणीस्वयंवरांत ह्मटलें आहे.

इतर कवींस दिपवणारी आहे; त्यानें समर्थांकडून 'यमक्या वामन' हें पद मिळविलें आहे; मोरोपंती यमकांचें मूळही वामनी यमकांतच आहे, या पांच कारणांसाठीं वामनाच्या यमकांची जशी सर्वत्र प्रसिद्धी झाली तशी इतरांच्या यमकांची झाली नाहीं. आतां अनेकाक्षरी यमकें रचणारे जे हे चार कवि त्यांच्या काव्यांतलीं थोडींशीं उदाहरणें देतोः—

९ प्रथम विठ्ठलकवि घेतोः—

**( १ ) वदे भीमकी भूमिदेवा सुदेवा । त्वरें जाउनी पत्र दे वासुदेवा ।**
**नभा एवढें कोण आदान वारी । न जातां तुह्मीं कैंवि ये दानवारी २४**

**( २ ) सुंदरें मंदिरें दिव्य दामोदरें ।**
**वास तेथें किजे नित्यदामोदरें ।**
**लोक संपन्न ते पुत्रदाराधनें ।**
**दास सायुज्यता श्रीपदाऽऽराधनें ॥ ३० ॥**

**—रुक्मिणीस्वयंवर अ. १**

**( ३ ) स्मरशरें भिनले परिसा रथी । गज तुरंगम यापरि सारथी ।**
**वदनमूर्छित ते जगती तळीं । अज परात्पर तेज गती तळीं ॥३३**

**—रुक्मिणीस्वयंवर अ. ४**

आतां आनंदतनय घेऊंः—

**( १ ) वंदीति ज्यासि शिरसा सुरवाड लाडे**
**वंदी भुजेसि करु सासुरवाड लाडें ॥ ८ ॥**

**( २ ) सारीं रूपें स्वस्वरूपासमान**
**द्यावा कैसा एक रूपास मान? ॥ ४३ ॥**

**—नवरसचरित.**

**( ३ ) सखि ह्मणति 'धरीते बुद्धि हे तूज सीते!**
**पुरविल परमात्मा बुद्धि हेतू जसी ते' ॥ ३८ ॥**

**—सीतास्वयंवर.**

**( ४ ) आठवोनि विपदा शिव पूजी**
**अर्पुनी शिवपदासी वपू जी ।**
**आदरेंचि परमा नियमातें**
**जो मनांत पर मानि यमातें ॥ ३७ ॥**

**—मार्कंडेयाख्यान.**

विठ्ठल व आनंदतनय या दोघांपैकीं आनंदतनयाचींच यमकें अधीक साधीं व सरस दिसतात. आनंदतनयाचे समुद्रक यमकाचें एक सुरेख उदाहरण देतोंः—

**पाया नमीं, देइन वंश सारा, । पा यां न मी दे इनवंशसारा ! ।**
**न या वयामाजि भला जना दे । न यावया मा जिभ लाज ना दे ॥२३ ॥**
**—विश्वामित्राभिगमन.**

याचा अर्थ मीं असा करितों:-विश्वामित्र मखरक्षणासाठीं रामास मागावयास आला असतां दशरथ ह्मणतो," मी पायां पडतों (पण रामास मागूं नका), आपल्या सेवेला कुटुंबांतील सारीं माणसें तयार आहेत त्यांपैकीं कोणासही न्या, मी द्यावयास राजी आहें ! पण या सूर्यवंशतिलकास मात्र मागूं नका ! अशा वृद्धावस्थेंत कोणता भला मनुष्य आपल्या गुणी पुत्रास परक्याच्या हवालीं करील ? ह्मणून पुनः सांगतों कीं पुत्रवात्सल्यामुळें 'नाहीं' ह्मणायला माझी जीभ कचरत नाहीं. मी देत नाहीं ह्मणून स्पष्ट सांगतों ! " विठ्ठल छंदःशास्त्रांत व चित्रकाव्यांत निष्णात होता, तो जाडा पंडित होता; पण आनंदतनयाच्या वाणींत प्रसाद व माधुर्य फार अधिक आहे. याचें सीतास्वयंवराख्यान चाललें असतां याचें 'कोण तूझ्या मनासि येतो सांग हो सीते ?' हें पद तालसुरावर गाऊन हरिदास कीर्तनांत कसा रंग भरून देतात व त्यावर श्रोत्यांची कशी मुरकुंडी पडते हें कोणी पाहिलें नाहीं ? तसेंच याचें 'माझा कृष्ण देखिला काय ? कोणि तरि सांगा हो' हें पद दारावर भिक्षा मागणारी एखादी बाई ह्मणतांना ऐकून कोणाची चित्तवृत्ति तल्लीन होऊन जात नाहीं ? तात्पर्य, आनंदतनयाची कविता रसभरित असल्यामुळें ती लवकर लोकप्रिय होऊन सर्वत्र पसरली व त्या प्रसिद्धीबरोबर त्याचीं यमकेंही पसरून कविमंडळांत यमकरचनेची नवी स्फूर्ति उत्पन्न झाली असें मला वाटतें.

**नागकवि** ( नागोजी शिवदेव तोतडे, प्रवरातीरवासी ) यानें शके १६१६ मध्यें सीतास्वयंवरनामक सुंदर काव्य रचिलें त्यांतील यमकें:--

(१) **प्रसन्न जाली जरि हे तुकाई**
**मला जनेसीं तरि हेतु काई ? ।**
**गुरु स्वचित्ताप्रति भाविलासे**
**त्याचे प्रसादें प्रतिभा विलासे ॥ १ ॥**

(२) **आयकाल रचना यमकांनीं**
**नायकाल मग तो यम कानीं ।**

(३) **भूतळीं जनक एक मोहरा**
**जो रणीं फिरवी शत्रु मोहरा ।**
**जो अहर्निश करी नमो हरा**

देत जो बहु बुधांस मोहरा ॥ ३ ॥
(४) ज्याचिया संगतीं संत आसंगती
देव ही रंगती दोष ही भंगती ।
ज्ञान अज्ञानिया सांग जो शीकवी
काय वर्णी तया नागजोशी कवी ? ॥ ४ ॥

वामन पंडितांचीं यमकें प्रसिद्धच आहेत, त्यांचा थोडा मासला पहा:—

(१) आयके बळ हरी नरकाचें । बीज तो परिहरी नरकाचे ॥ ४२ ॥

—भामाविलास.

(२) त्रिभुवनींहि समान वस्तु तीतें । त्यजुनि करी सुरमानवस्तुतीतें २८

—जटायुस्तुति.

(३) काळ हा सुधा लोटला भला । सत्कथासुधालोट लाभला १२४
पेंकिल्या रवरवा यमकांनें । त्या नरा रवरवा यम कां ने ? ॥१३१

—विराटपर्व अ. ८.

(४) स्वयें फेडुनी शीघ्र चोळीस तीच्या ।
कुचाग्रां करें शीघ्र चोळी सतीच्या ।
उरोजीं रतीं सर्वदा हस्त नाचे ।
तिचे नीववी सर्व दाह स्तनाचे ॥ ३७ ॥

—राधाभुजंग.

(५) फिरविते रवितें दधिभीतरीं
मिरविते रवितेज नगांवरी ।
स्वकरिं ते करि चंचलता मनीं
उपरमे परमेश्वरगायनीं ॥ ७ ॥
वाइ म्यां उगवतांच रवीला
दाट घालुनि दही चरवीला ।
त्यांत गे फिरवितांच रवीला
सार काढुनि हरी चरवीला ॥ ८ ॥

—उखळबंधन.

वामनाच्या ६।७ अक्षरांच्या यमकांचीं उदाहरणें सहस्रशः देतां येतील, पण विस्तारभयास्तव तीं येथें देत नाहीं. दिलेल्या उदाहरणांवरूनच वामनाचीं यमकें किती सुलभ, बहुविध व चित्ताकर्षक असतात हें कळून येणार आहे. मोरोपंतांनीं विठ्ठलाचीं यमकें विशेष सरस नसल्यामुळें त्यांविषयीं मौन धरून ज्यांच्या यमकांवरून त्यांनीं यमकरचना उचलली त्या आनंदतनय व

वामन या उभयतांचें यमकसौंदर्याबद्दल स्तवन करून आपली कृतज्ञता प्रकट केली आहे. 'संस्कृतरचना स्वभावतः माधुर्यओजादि गुणांनीं अति मोहक आहे, यामुळें तींतील पद्यांशीं मराठी भाषेंतील पद्यांची तुलना जेव्हां वामनानें करून पाहिली असेल, तेव्हां मराठी भाषेंतील पद्य फिकें आहे असें पंडितांस वाटून श्रुतिमाधुर्यादि चमत्कृतीकरितां त्यांनीं त्यांत प्रासयमकांची योजना केली असावी' असें रा. हंस यांचें ह्मणणें आहे. विठ्ठल, वामन, आनंदतनय यांनीं संस्कृतांतली यमकरचना पाहून ती मराठींत आणण्याचा यत्न केला व मोरोपंतांनीं संस्कृतांतलीं यमकें पाहून व आपल्या पूर्वींच्या मराठी कवींच्या काव्यांतलीं यमकें अवलोकून आपल्या काव्यांत यमकांची गर्दी करून सोडली. जरी मराठी यमकें पंतांनीं मुख्यतः वामनापासूनच उचललीं तरी त्यांनीं आपल्या गुरूवर व परमगुरूवरही ताण केली आहे! मोरोपंती यमकांच्या तोडीचीं यमकें संस्कृतांत व प्राकृतांत कोठेंच सांपडणार नाहींत. यमकरचनेचा उत्कर्ष मोरोपंतांनीं केला.

६ वामनासारखें समश्लोकांत उत्कृष्ट भाषांतर करणारा दुसरा पंडित मराठी भाषेंत आजवर कोणी झाला नाहीं, तथापि त्याला सुद्धां नामसुधेंत 'तथापि श्लोकींचें प्रतिपद न भाषेंत मिरवे' असा उद्गार काढावा लागला. त्यानें भिन्नभिन्न वृत्तांत भाषांतरें करून यमकें साधायचा प्रयत्न करावा हें किती प्रशंसनीय आहे! 'अष्टाक्षरी चरण तो यमकीं न साजे' असें पंडित एकदां ह्मणतात, व एकदां ( वनसुधा अ० ४ ):—

**वर्णरीति यमकीं समजा ते ।**
**तेंचि कीं विषम कीं सम जाते ॥ ३३ ॥**

असें ह्मणतात. याचा अर्थ 'यमकें साधतांना वर्णांची रचना कधीं सम जाते, कधीं विषम जाते ह्मणजे शब्दरचना कधीं सरळ असते कधीं वेडीवांकडी होते.' यावरून वामनांनीं यमकांच्या योजनेंत समता सोडली आहे असें कोणीं समजूं नये. त्यांना जी अडचण कधीं कधीं भासमान झाली ती त्यांनीं येथें प्रकट केलेली आहे. मोरोपंतही बारामतीस आपल्या उठाबसायच्या खोलींत सुचतील तशीं यमकें भिंतीवर लिहीत व मग यथा-

१ मोरोपंतही असेंच ह्मणतातः—

**भीष्मकृतश्रीकांतस्तुतिच्या टीकेसि वृत्त जरि तेंच ।**
**अवलंबावें तरि तें अडचण कांहींतरीहि करितेच ! ॥ ११९ ॥**

**—भीष्मभक्तिभाग्य.**

काल त्यांची योजना आपल्या काव्यांत करीत अशी एक आख्यायिका आहे! फार काय पण स्नानास बसल्यावर मुद्दां जर एखादें सुरेखसें यमक किंवा गोडशी आर्या सुचली तर ते ओलेल्यानें धूळपाटीवर ती लिहून ठेवून पुन्हां स्नानास जात असेंही माझ्या ऐकण्यांत आहे !! पंतांना असें जन्मभर करावें लागत असे असें कोणीं समजूं नये. एकदा यमकांची हातोटी साधल्यावर मग सरळ आर्या पटापट त्यांच्या मुखावाटें बाहेर पडत असाव्यात असा माझा समज आहे. त्यांच्या यमकांत क्वचित् क्लिष्टता आहे, नाहीं असें नाहीं; पण पंतांची कविता लावण्याची मोडणी एकदा कळली ह्मणजे त्यांच्या आर्या वाचतां वाचतां उकलत जातात व यमकादिचमत्कारही अर्थबोधाला विशेषसे आड येत नाहींत. सामान्य बुद्धीच्या व आर्यांशीं अपरिचित असलेल्या मनुष्याला यमकप्रास वगैरे श्रमसाध्य वाटतात पण ते पंतांना सहज साधलेले आहेत. वाचकानें आपल्या ज्ञानावरून कवीच्या ग्रंथांची चिकित्सा करण्याच्या भरीस पडूं नये. सहसा त्याची विद्वत्ता, त्याची प्रतिभा, त्याचा व्यासंग हे सारे लक्षांत घेऊन मग ही गोष्ट कवीला कष्टसाध्य होती कां सुकर होती, हें पहावें. मोरोपंतांची विद्वत्ता, त्यांचा संस्कृत व प्राकृत कवींशीं दृढपरिचय, प्रत्यहीं दीडदीडशें आर्या लीलेनें तयार करण्याचें त्यांचें सामर्थ्य, व त्यांच्या भारतादि बहुतेक सर्व ग्रंथांतला ( बृहद्दशम पूर्वार्ध मात्र वगळला पाहिजे ) वाणीचा अस्खलित प्रवाह ही पाहिली ह्मणजे त्यांना आठ आठ दहा अक्षरांचीं यमकें साधून सरळ प्रसादयुक्त कविता करणें हे कांहीं कष्टप्रद नव्हतें. त्यांना यमकरचना कठिण गेली नसावी याचें दुसरें प्रत्यंतर असें आहे. त्यांनीं आपल्या वयाच्या २३ व्या वर्षी रचलेल्या गीतांत जें यमकसौकर्य दिसतें तेंच ६३ व्या वर्षी रचलेल्या केकावलींत आहे व जें यमकरचनासौलभ्य त्यांच्या आर्यावृत्तांत दिसतें तेंच ओवी, अभंग, दोहा, साकी, पृथ्वी, शार्दूलविक्रीडित वगैरे लहान मोठ्या हव्या त्या वृत्तांत आढळतें ! यमकरचना पंतांना अत्यंत सुलभ नसती तर हें त्यांना साधतेना ! ' महाराष्ट्रकविता ओवी व अभंग या छंदांत असल्यामुळें यमकांच्या रचनेस अर्थातच अवकाश नव्हता ' असें निबंधमालाकारांनीं मालेच्या ५७ व्या अंकांत ह्मटलें आहे. यमकरचना वृत्ताधीन आहे हें जें या वाक्यांतलें तत्व त्याचें सुरेख खंडन वामनरावजी ओकांनीं मालेच्याच ६१ व्या अंकांत केलें आहे. यमकरचनेला कोणतेंही वृत्त अनुकूळ किंवा प्रतिकूळ नसून वाटेल त्या वृत्तांत हे चमत्कार सा-

धणें हें कवीच्या चातुर्यावर अवलंबून असतें हें तत्व मोरोपंतांच्या काव्यवाचनापासून कोणाच्याही ध्यानांत येईल. पंतांनीं भिन्न भिन्न वृत्तांत कशीं सुंदर यमकें साधलीं आहेत हें या पुस्तकांत उद्धृत केलेल्या शेंकडों पद्यांवरून व मुख्यतः कृष्णविजय, भारत, रामायणें यांवरून वाचकांस कळणार आहे.

७ **यमकाचे निरनिराळे प्रकारः**—आदियमक, मध्ययमक, अश्वधाटीयमक, दामयमक, पुष्पयमक, संदष्टकयमक, समुद्गकयमक–या सर्वांचीं उदाहरणें पंतांच्या काव्यांत विपुल आढळतात. अन्त्ययमकाचीं उदाहरणें वाचकांस सहज निवडतां येतील. समुद्गक यमकाचें प्रसिद्ध उदाहरण 'अनलसमाहित साधी' हें होय. दामयमकाचें उदाहरण 'दामरामायण' हें होय. याशिवाय खालील पद्यें पहाः—

**असि साधु साधुपतिसी गांठि पडे, ती जशी** अया परिसा।
यापरि सा**चा हाचि प्रेमळ, याच्याचि या** जया परिसा ॥ ५८ ॥

—**उद्योगपर्व अ. १**

आदियमक व मध्ययमक यांचीं उदाहरणें पहाः—

हारविला सवतीनें **केला हा लक्ष्मणप्रसूनें कीं।**
हार विलासवतीनें **क्षितिनें पुजिला सुरप्रसूनें** कीं ॥ १६ ॥

—**स्त्रीपर्व अ. ४**

**सेवुनि** संतत पाला संत तपाला **यदर्थ करितात।**
**तो प्रिय** या स्तवना कीं यास्तव नाकींहि **तेंचि** वरितात ॥ १७ ॥

—**भीष्मभक्तिभाग्य.**

'वाजत गाजत साजत' (विराटपर्व अ० ६) हें अश्वधाटी यमकाचें उदाहरण आहे. पुष्पयमकाचें उदाहरणः—

**देवांनीं दुंदुभि वा**जविले, **मेघध्वनि ला**जविले।
**आशान्त स्तुतिनीं गा**जविले, **लोक यशें सा**जविले ॥ ३८ ॥

—**पंचशतीरामायण.**

अंत्यपदयमकाचें एक उदाहरणः—

**शिशुच्या न रुचे** शमनास मना! **जन शिक्षि, न तूं** वदना! वद ना।
**वचकें न नि**राशमना! शमना। **वनवृत्ति भजे** भवनाभ वना ॥ ४६ ॥

—**हररमणीयरामायण.**

'मध्यपदयमकाचें उदाहरणः—

**जशाच ज**पतां पतां**प्रति सती सुबाहुद**मना मनांत **भजती।**

**विहारवसनासनाशनगती त्यजूनि** जन ते **न तेथ रमती** ॥ ८ ॥

**—छंदोरामायण. अयोध्यासर्ग २८.**

आदिपदयमकाचें एक उदाहरणः—

हा ! सति ! हासतिर**स्कृतचंद्रे ! तुज विकुनिही न घामेलों ।**

हा ! तनय ! हातनय **मीं जोडुनिहि न या महा अघा मेलों** ॥६५॥

**—हरिश्चंद्राख्यान अ. २**

८पंतांनीं निरनिराळ्या तऱ्हेचीं यमकें कुशलवचरितांत घातलीं आहेत. त्यांच्या मोठ्या ग्रंथांपैकीं हरिवंश व मंत्रभागवत यांत यमकरचना विशेष नाहीं. बृहद्दशम व महाभारत हे ग्रंथ लिहितांना मात्र यमकांच्या टाकठिकीकडे त्यांनीं लक्ष पुरविलें आहे; त्यांतही बृहद्दशम अत्यंत अवघड व ह्मणायला कठिण अशा वृत्तांत रचलेला असल्यामुळें त्यांतलीं यमकें विशेष चित्ताकर्षक नाहींत व सुलभही नाहींत. पंतांच्या भारतांत मात्र यमकें फारच बहारीचीं आहेत. पंतांच्या यमकबद्ध काव्यांत कुशलवचरित व भारत हींच उत्कृष्ट झालेलीं आहेत. आतां दहापासून पंधरा पर्यंत अक्षरांतही १०।१२ यमकें पंतांच्या भारतांतून काढून संदर्भ व अर्थ यांसह खालीं देतोंः—

( १ ) ययाती व शर्मिष्ठा यांचा गुप्त व्यवहार कळल्यावर पतीवर नागिणी-प्रमाणें उसळणारी देवयानी आपलें गाऱ्हाणें पित्यास सांगतेः—

**ताप दिला जेणें तो हा कामी ! तापसा ! हतांस दया ।**

**उठवि तुह्मी, किति मारूं हाका मीं ताप साहतां सदया !** ॥ ५० ॥

**—आदिपर्व अ. ११**

**अर्थः**—'अहो बाबा ! सवत उत्पन्न करून ज्यानें मला ताप दिला तो हा कामांध ययाती पहा ! कचासारख्या मृत माणसासही आपण दयेनें उठवितां, मग हे सदया ! मी अनिवार ताप भोगणारी आपली कन्या 'मला दुःखमुक्त करा' ह्मणून किती कंठशोष करूं !'

( २ ) मध्यरात्रीं दुर्वास ऋषि पांडवछलार्थ आले असतां द्रौपदीनें भक्ति-बलानें तें संकट टाळलें, याबद्दल युधिष्ठिर तिची प्रशंसा करितातः—

**तुजविण न दीपिके ! सति ! कृष्णे ! तरतों नयज्ञहि तमातें ।**

**करितों जऱ्हि तऱ्हि गमता कृष्णेतर तों न यज्ञ हित मातें** ॥ ५४ ॥

**—वनपर्व अ. ८**

अर्थः 'हे द्रौपदि ! तूं माझ्या घरांतली दीपिका आहेस ! मी नीतिज्ञ असू-नही मला तुजवांचून या संकटरूपी तमांतून पार जातां आलें नसतें ! श्रीकृ-

ष्गाची जोड मला तूं करून दिलीस, त्यावांचून अन्य यज्ञ मीं केला असत तर या दुर्गतींतून खास बाहेर पडलों नसतों ! '

**( ३ ) शोभा सोडुनि होता शुद्ध वसंतीं करीरसा पार्थ ।**
**मग मंत्रातें व्हाया उद्भव संतीं करी रसापार्थे ॥ १२३ ॥**

**विराटपर्व अ. ६**

अर्थः—' करीर-नेप्याचा वृक्ष—वसंतांत जसा पल्लवरहित निःश्रीक असतो, तसा अर्जुन स्वतेज लोपवून होता; नंतर सज्जनांना हर्ष देण्यासाठीं पृथ्वीपति जो धर्मराज त्याचें सत्यस्वरूप प्रकट व्हावें म्हणून उत्तराशीं तो मसलत करिता झाला.

**( ५ ) रविला झांकी गगनीं कुरुगुरु बहुशर भरी, तिमिर विखरी ।**
**लीलेंने नरकेसरि लक्ष चिरी, शरभरीति मिरवि खरी ॥ १०३ ॥**

**—द्रोणपर्व अ. १**

द्रोणाचार्यांच्या पराक्रमाचें यांत वर्णन आहे: ' द्रोणाचार्यांनीं शत्रूवर शतशः बाण सोडून त्यांच्या अंधकारानें सूर्याला झांकून टाकिलें, ब्रह्मांड तमानें व्यापिलें व लक्षावधि शत्रुसिंहांना बकऱ्यांसारखें कापलें ! पांडवसैन्यावर ही एक टोळधाडच आली खरी ! ! '

**( ६ ) कुरुसैन्यांत गमे ज्यापरि रंभाकाननांत वारा हो ।**
**त्या विजयश्री देउनि परिरंभा कां न नातवा राहो ॥ ८७ ॥**

**—द्रोणपर्व अ. ३.**

अर्थः—महावात केळीच्या वनांत शिरून जसें तें उध्वस्त करितो, त्याप्रमाणें अभिमन्यूनें कौरवसैन्याची दाणादाण केली. ( संजय धृतराष्ट्रास म्हणतो) अशा या आपल्या पराक्रमी नातवाला विजयश्रीनें गाढालिंगन देऊन तत्सान्निध कां न रहावें ? '

**( ७ ) काय उणे त्या करि सश्रीकृष्णा ज्या निवास विप्राशी ? ।**
**कर्णाहीं स्वस्तुति सश्री कृष्णाजानि वासवि प्राशी ॥ ५ ॥**

**—द्रोणपर्व अ. ९.**

अर्थः—' श्रीकृष्ण ज्याचा सखा व जो ब्राह्मणांच्या आशीर्वादांचें केवळ स्थान—अशा त्या अर्जुनाला काय कमी होतें ? लक्ष्मीनें म्ह. वैभवानें युक्त असा तो द्रौपदीपति इंद्रपुत्र अर्जुन विप्रकृतस्तुतीला कानांनीं ऐकता झाला. '

**( ८ ) नुरवि करुनि परकवचा अगंप तितउ पळसमय मनि भानें ।**
**भीमानें शर गणिले अंगपतित उपळसम यमनिभानें ॥ १०४ ॥**

**—द्रोणपर्व अ. १२**

हें यमक पंधरा अक्षरांचें आहे. कर्णभीमांचें युद्ध चाललें तेव्हां 'अंगदेशाचा पति जो कर्ण त्यानें भीमाच्या कवचाला असंख्य बाण मारून चाळणीसारखें केलें. यमस्वरूपी भीमाला ते बाण अंगावर टाकलेल्या लहान दगडासारखे वाटले!' 'प्रेक्षकांच्या' (हा शब्द पंतांचा) मानिं भानें नुरवि.' पंत टीप:—'यमसमें भीमें देहपतित कर्णशर क्षुद्र पाषाणसे मानिले धैर्यें करून.'

**(९) समुपेक्षिलें ठकविलें पृतनामहिमानका पित्या सहसा।**
**म्यां मारावे खळ ते कृतनामहि मानकापित्यासह सा ॥ ६ ॥**
**—द्रोणपर्व अ. २२**

द्रोणवधानंतर ही अश्वत्थाम्याची उक्ति आहे: 'कौरवसेनेचा प्रताप दिगंत गाजविणारा नगाराच असा जो माझा पिता त्याची म्यां मूढानें ऐन वेळीं उपेक्षा केली, त्याच्या उदरीं जन्मून त्याला अखेर फसविलें. या पापनिष्कृतीसाठीं आतां मला पितृवधकर्ता धृष्टद्युम्न व श्रीकृष्णासह पांच पांडव या सर्व दुष्टांचा निःपात करावयास सज्ज झालें पाहिजे!' 'कृतनाम' याबद्दल 'कृतनमन' असा अन्य पाठही पंतांनीं दिला आहे.

**(१०) कृष्णा त्वत्सम तव कृतवर्णन भाचा परा सुकविता कीं।**
**झाला घालाया धृतवर्ण नभाचा परासु कवि ताकीं ॥ ४१ ॥**
**स्त्रीपर्व अ. ४**

ही आर्या पंतांच्या अति क्लिष्ट अशा आर्यांपैकीं आहे. या आर्येचा अर्थ पंतांनीं स्वतः आपल्या हातांनींच तो आपल्या हस्तलिखित भारताच्या प्रतींत देऊन ठेवला आहे! गांधारी ह्मणते "कृष्णा! त्वत्सम कृतवर्णन कविकृतगुणवर्णन तव भाचा परा अरितें प्रतापें सुकविता शुष्क करिता असा होता कीं तो हा नभाचा धृतवर्ण गगनासारखा श्यामवर्ण सौभद्र स्वाश्रयीं अमृतीं जे कवि होते ते स्ववियोगीं ताकीं नीरसीं पराश्रयीं घालावयासि परासु झाला." गांधारीच्या ह्मणण्याचा भावार्थ असा: 'कृष्णा! तुझ्यासारखा पराक्रमी श्यामवर्ण भाचा शत्रूंस स्वतेजानें असा निस्तेज करणारा होता कीं तत्पराक्रमवर्णनामृत पिणारे जे कवि होते त्यांना स्ववियोगतक्र पाजण्यासाठींच कीं काय तो मृत्यु पावला!'

१ स्वतः पंतांनीं या आर्येवर ही टीप दिली आहे. एवढी मोठी टीप त्यांनीं अन्यत्र कोठेंही दिली नाहीं. यावरून हिची दुर्बोधता त्यांनाही वाटली असावीसें दिसतें. यांत त्रयोदशाक्षरी यमक साधलें असून अर्थ सरळ आला नाहीं व 'अमृतीं जे कवि होते ते

( ११ ) **पाहे प्रणता तोका नव्यासम, हाक विप्र सादास।
विप्राच्या दे, न करी न व्यास महाकवि प्रसादास ॥ ४१ ॥
स्वर्गारोहणपर्व अ. २**

कवि ह्मणतातः ' व्यासचरणीं नम्र झालेला जो मीं त्या मज बालकाकडे ते, बाप जसा नूतन अर्भकाकडे, तसें प्रेमानें पाहत आहेत! मीं त्यांना प्रतिभारक्षणार्थ बोलाविले असतां त्यांनीं माझ्या प्रार्थनेप्रमाणें मद्वांछा पुरविली. व्यासांचा दयाळूपणा काय वर्णावा! महाकवि व्यास प्रणताच्या हाकेसरसे धांवत येऊन त्यावर प्रसाद करीत नाहींत असें कधींच होत नाहीं ! '

पंतभारताच्या मूळ प्रतीबरहुकूम ह्या आर्या येथें दिल्या आहेत. पंतांचीं ' अगा राया–अगारा या, ' अर्णव तो–वर्णवतो, ' ' कराल करवाल–कराल करवाल, ' ' नको चिरडों–नकोचि रडों, ' ' पद नमुनीं–वदन मुनीं '— इत्यादि शेंकडों यमकें ठरीव असून त्यांच्या काव्यांत पुन पुन्हां येतात.

आतां यमकाच्या परमावधींचें एक उदाहरण देऊन हें बरेंच लांबलेलें यमकपुराण आटोपूं:—

( १२ ) **अनळसमीहित साधी राया ! वारा महीवरा ! कामा।
अनळस मी हि तसा धीरा ! यावा रामही, वैराका मा ! ॥**

ही सुप्रसिद्ध आर्या पांडवांचा छळ करण्याकरितां आलेल्या दुर्वासऋषीस द्रौपदीमें श्रीकृष्णाचा धांवा करून संतुष्ट करून परत लावल्यावर धर्मास धीर देण्यासाठीं श्रीकृष्णानें भाषण केलें त्या प्रसंगांतली आहे. अर्थः ' हे गंभीर पृथ्वीपते धर्मा! वारा जसें अग्नीचें वांछित साधतो तसें तुझें साह्य करण्यास मीं सदैव तत्पर आहें. प्रसंग पडला तर बळिरामदादाही येतील. मग आह्मी दोघे आल्यावर रुक्मिणीच काय मोठी आहे ? तीही येईल ! तुझ्या मनोरथसिद्ध्यर्थ आह्मी सर्वजण सर्वदा तत्पर आहोंत. '

९ येथें यमकांची हद्दच संपली ! शिकंदरबादशहाला सर्व जग जिंकल्यावर पुन्हां जिंकायला मुलूख राहिला नाहीं ह्मणून जसें रडूं कोसळलें, तसें

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

स्ववियोगीं ' एवढें गर्भित पद घेतल्याखेरीज अर्थबोध कांहींच होत नाहीं व ही टीप वाचूनही अर्थ मोठासा गोड वाटत नाहीं! तक्रामृताची उपमा पंतांनीं अन्यत्रही घेतली आहे ( बृहद्दशर्म. अध्याय ८५ आर्या ४७ ).

१ क्षुल्लक, हलकी. ' वरा कामा? ' हा पाठ घेतल्यास उत्तम होईल, पंतांनीं वराका मा ' असेंच लिहिलें आहे.

यमकरचनेला आतां पुढें जागा उरली नाहीं ह्मणून आमच्या कवीलाही झालें असेल! ! येथवर दिलेल्या उदाहरणांवरून दहा, बारा, पंधरा अक्षरांचीं यमकें साधूनही ऱ्हस्व, दीर्घ, अनुस्वाराकडेही पंतांनीं किती बारीक लक्ष दिलें होतें, व्याकरणनियमांचें उल्लंघन न होऊं देण्याविषयीं त्यांनीं किती खबरदारी घेतली होती, व सामान्यतः त्यांचीं यमकें कशीं सोपी, अर्थपोषक व चमत्कृतिजनक असतात, याबद्दल वाचकांची खात्री होऊन चुकणार आहे. यमकांसाठीं वारि, शकुनि, राजर्षि, कवि, प्रभु, निधि इत्यादि संस्कृत शब्दांचें अन्त्य व ऱ्हस्व असून त्यांनीं दीर्घ केलें आहे; वाणी मगरी, भाऊ या प्राकृत शब्दांचें अन्त्य दीर्घ असून ऱ्हस्व केलें आहे; क्वचित् 'दूरग' याबद्दल 'दुर्ग' असा अप्रशस्त समास केला आहे, वगैरे कांहीं क्षुद्र दोषांचीं उदाहरणें वामनरावजींनीं मालेच्या ६९व्या अंकांत दिलीं आहेत. यांपैकीं कांहींना दोषरूपत्वही देतां येणार नाहीं. संस्कृतांत ज्यांचें अन्त्य ह्रस्व आहे अशा कित्येक शब्दांचें अन्त्य प्राकृतांत दीर्घ होतें, व पंतांनीं असे शब्द प्राकृत भाषा पद्धतीप्रमाणें जेथें वापरले आहेत तेथें ते निर्दोषच समजले पाहिजेत. समासाच्या पोटांत येणारे शब्द मात्र संस्कृतांत ऱ्हस्व अगर दीर्घ असतील त्याप्रमाणेंच योजले पाहिजेत व पंतांनीं हे नियम बहुधा पाळले आहेत.

१० **अनुप्रास**:—पूर्व मराठी कवींप्रमाणें पंतांनींही अनुप्रास जागोजाग आणले आहेत, पण ते आणण्यांत त्यांनीं फार चातुर्य खर्च केलें आहे. पंत अनुप्रासाची योजना प्रायः उपहास किंवा तिरस्कार दाखविण्याचा असतां, कांहीं चटकदार गोष्ट सांगायची असतां किंवा युद्धवर्णन कर्तव्य असतां कारितात! प्रत्यक्ष युद्धांत रणकर्कशवाद्यें योद्धयांस स्फुरण आणण्यासाठीं जशीं वाजवितात, तसें पंतही युद्धवर्णनप्रसंगीं अनुरूप असेच प्रास योजतात. बाण सुटले कीं, 'सूं सणणण सणणणणण वाजति शरनिकर काय हा निकर' ( भीष्म. ३–९८ ) असा त्यांचा अर्थव्यक्ति करणारा चरण यायचाच ! दुंदुभी वाजूं लागल्या कीं, 'अगड धों अगड धों धों धों वाजविती देव दुंदुभी शतशा' ( भीष्मभक्तिभाग्य २–५८ ) असा चरण त्यांना सहज सुचायचाच! पंतांच्या अनुप्रासाचीं कांहीं मौजेचीं उदाहरणें खालीं देतों:—

( क ) युद्धवर्णनपर:—

नरवर-गरधर-खरतर शर करकर दांत खाउनी सोडी।
फोडी कवच उर-स्थळ वाटे तो तात त्या द्रुमा मोडी ॥ ८४ ॥
शल्यपर्व अ. २

ह्मणती ' हा रजनीचर आचारभ्रष्ट दुष्ट पापिष्ट।
विष्टपकंटक कष्टद शिष्टद्वेष्टा धरा करा पिष्ट ॥ ३२२ ॥
ते गगनग मग अगनगधर खरतर वीर नीरदासारें।
वर्षति अध्वररक्षणदक्षासुरसंघ मस्तकीं सारे ॥ ५७९ ॥
ते दुंदुभि वाजविती धिमिधिमिधिमि देवलोक आनंदे, ।
गंधर्व करिति तननन, तत्थैथैथैय्य अप्सरोवृंदें !! ॥ ५९५ ॥
-मंत्ररामायण युद्धकांड.

( ख ) उपहासनिंदापर:--

वदला यापरि बा परि खापरिला परिस तेवि त्या बोध।
तो धन्य आग्रही बा तैसा न मिळेल केलियां शोध ॥
( उद्योग. ७.७६ )

अर्जुन वर्जुन गर्जुन अर्जुन घे क्षण उगेची थोरपण।
जिंकिन बृहस्पति ह्मणुनि करिलाचि वाचाट चाट पोरपण ॥
( द्रोण० १९-३९)

भ्रमला श्रमला शम लाज मला न मलाधिला ह्मणे हांसे।
स्वकुटुंबपोषणार्थेचि धांवे घेऊनि शरधनू फांसे ॥
( कर्ण. ४१-५३ )

( ग ) सामान्यवर्णनपर:—

तेथ ज्ञानविशारद शारदशशिगौर गौरवार्ह कवी।
दुस्तरभवाब्धिपारद नारद येउनि सुनीतिला शिकवी ॥
( सभा. १-१२ )

नल नृप ह्मणे 'शिवा ! ती नवरी हो ! मन दुजीस न वरी हो! '।
भैमी ह्मणे ' शिवे ! तो नवरा हो ! प्रेम नित्य नव राहो ' ॥
( वन. ४-२२ )

तारा-रमण-मुखीं ते तारारावें रडोनियां, त्यातें ।
तारा ह्मणे ' कपींद्रा ! तारावें दुःखसागरीं मातें ' ॥
मंत्ररामायण. किष्किंधा. ७२

कटु परि पटु हरि बटु वरि अमृताधिक मधुर बोलणें बोले।
पळभरि खळ करि बळ हरि वदला, परि आज कविसभा डोले ॥
( बृहद्राम. ८८-७५ )

तूं समर करुनि न मर भ्रमरसम रघूत्तमांघ्रिनवपद्मीं ।
रम, रस घे अमराचि हो, भ्रमरहित स्वस्थ नांद निजसद्मीं ॥३०६॥
तूज यमक्षयवांछा झाली, ह्मणवूनी धांवलास रणा ।
सरणावर निज निज-जन-सहजांसह जा, नये शिवा शरणा ॥६८१॥
—मंत्ररामायण. युद्धकांड.

हीं उदाहरणें पुष्कळ झालीं. यमकोदाहरणांप्रमाणें यांचा संदर्भ व अर्थ देणें अवश्य वाटलें नाहीं ह्मणून ते दिले नाहींत. एक तर हीं पद्यें सहज वाचतां वाचतां उलगडण्यासारखीं आहेत, व दुसरें प्रास कळण्यासाठीं केवळ अर्थज्ञानाचीच अपेक्षा असते असें नाहीं, यमक नीट जुळलें नाहीं तर आर्या अडूनच राहते, तसें प्रासांचें नाहीं. प्रास साधतील तितके साधावे, साधणें कठीण वाटूं लागतांच आर्या तशीच पुरी करितां येते, यावरून प्रासरचनेपेक्षां यमकरचना साधणें अधिक कठीण आहे हें वाचकांस कळून येईल. वर प्रासरचनेचीं जीं उदाहरणें दिलीं आहेत त्यांवरून पंतांचे प्रास किती चमत्कृतिजनक व सहज साधले आहेत हें दिसून येईल.

११ अनुप्रासाची आणखी एक तऱ्हा आहे ती दाखवितों. एकाच अक्षराची प्रत्येक शब्दाच्या प्रारंभीं आवृत्ति झाली कीं एक वेगळ्या प्रकारचा अनुप्रास होतो. प्रास कर्णमधुर असल्यामुळें मनुष्याला स्वभावतःच आवडतात. ‘ द्रव्य, स्त्री व मद्य ’ हे पदार्थ मादक आहेत असें ह्मणायचें असतां ‘कनक कांता कादंबरी’ हे शब्द एकत्र योजले ह्मणजे मनाला किती चमत्कार वाटतो! “अलीकडे आमच्या समाजांत ‘ वकील-वक्कल-वैद्य ’ या तिघांनीं लोकांना भडावून सोडलें आहे ” हें वाक्य कर्णमनोहर लागतें. असो तर, एकवर्णानें आरंभ झालेल्या तीन किंवा तीनपेक्षां अधिक अक्षरांचा समुदाय एकत्र आला कीं चित्ताला चमत्कार वाटतो, व अशा शब्दसमुदायांतही अनुप्रास साधला आहे असें ह्मणतात. या प्रकारच्या अनुप्रासाचीं उदाहरणें पंतांच्या पूर्वींच्या कवींनीं कोठें योजलेलीं आढळत नाहींत, निदान पंतांनीं याही

१ इंग्रजी भाषेंत या प्रकारचे अनुप्रास स्पेन्सर, मिल्टन, शेले, टेनिसन् यांच्या काव्यांतून बरेच सांपडतात. ‘The bush my bed, the bramble was my bower,’ ‘extensive harvests hang the heavy head’ ‘The lordly lion loves the lonely lair’ असले चरण इंग्रजी जाणणाऱ्यांना सहज सुचतील. वाचकांनीं हवें असल्यास मिल्टनचें ‘Paradise Regained पहावें. ‘ कूजत्क्लान्तकपोलकुक्कुटकुलाः कूले कुलायं द्रुमाः
—भवभूति.

बाबतींत सर्व पूर्वकवींवर ताण केली आहे हें खास आहे. आतां या प्रकारचीं २।४ उदाहरणें खालीं देतोः—

**( १ ) देवि ! दयावति ! दवडिसि दासाची दुःख–दुर्दशा दूर ।**

**( गंगास्तुति ५१ )**

**( २ ) पर्यंकावरि पडला पांडुपृथापुत्र पावला पीडा ।**
**वैरि--विजित--विक्षत--वपु विमुखत्वें वीरवर वरी व्रीडा ॥**

**( कर्ण० ३९--६ )**

**( ३ ) भूषाभुजंग भक्ताभीतिद भव्य प्रभाव तुज भार ।**
**भावी भयें भवार्गाभर्ता भगवान् भुले भला फार ॥ ३७ ॥**

**बृहद्दशम अ. ८८**

या संबंधानें पंतांचें ‘ हरिसंबोधनस्तोत्र ’ हें संस्कृत काव्य पाहण्यासारखें आहे. हें सगळें स्तोत्रच्या स्तोत्र एकेका अक्षरानें आरंभ झालेल्या शब्दांनीं गुंफलें आहे. पंतांचें ‘ विचित्र रामायण ’ ही या संबंधानें पाहण्यालायक आहे. तें सर्व अनुप्रासमय आहे.

१२ हें यमकानुप्रासांचें प्रकरण आतां संपलें. हें फार लांबलें आहे. पण शब्दचमत्कारांकडे पंतांचें विशेष लक्ष होतें, ह्मणून त्यांच्या काव्यांचें निरीक्षण करितांना या मुद्याकडे विशेष लक्ष पुरविणें भाग पडलें. यमकांचा उत्कर्ष पंतांनीं इतका केला आहे कीं, ‘ पंतोच्छिष्टं यमकसर्गं ’ असें ह्मणण्याची वेळ आली आहे ! प्रभुयश गातांना अर्थचमत्काराबरोबर यमकचमत्कारही आपण साधले याबद्दल पंतांना अभिमान वाटत होता. असें त्यांनीं ह्या प्रकरणाच्या मथळ्यावर घेतलेल्या ‘ तुमच्या पदप्रसादें ’ ह्या आर्येत सांगितलें आहे.

“ व्याकरण विघडूं न देतां किंवा अर्थाची हानी न करितां लांबलांब यमकें साधण्याची व प्रासांची सांखळीची सांखळी जुळविण्याची जी या

---

१ हें सारें संस्कृत स्तोत्र पंतांचें भाषाप्रभुत्व किती अनन्यसाधारण आहे हें दाखविण्यास बस्स आहे. यांतला एकच श्लोक पहाः—

**क्षेत्रज्ञ ! क्षमिणांवर क्षितिभरक्षत्रापह क्षोभण**
**क्षुत्तृष्णादि विकार षट्करहित क्ष्मानिर्जरैकप्रिय ।**
**क्षत्तृप्रेमपद क्षताहितमद क्षेमालय क्षौद्रवाक्**
**क्षेत्रेश क्षणदाचरेशदमन क्षोणीपते ! पाहि माम् ॥ ४२ ॥**

कवीची अपूर्व करामत दृष्टीस पडते ती समयाविशेषीं अर्थ खुलविण्यास किंवा निदान नुसता मनास चमत्कार वाटविण्यास फार उपयोगी पडते " हा मालाकारांचा अभिप्राय रसज्ञांस मान्य झाला पाहिजे. रामभाऊ गुंजीकर-ही विविधज्ञानविस्तारांतल्या आपल्या लेखांत ह्मणतात:—" यमकांकरितां किंवा प्रासानुप्रासांकरितां अर्थाची हानि न होईल अशी यमकरचना व प्रास-रचना मोरोपंतानें मात्र आपल्या ग्रंथांत साधली आहे. पंतांनीं ह्या शब्दालं-कारांनीं आपल्या आर्यारूप कवितामुतेस कोशागारांतील भरगच्ची लांबरुंद पाटावें नेसविलीं आहेत. इतर कवींच्या कवितेविषयीं सामान्यत्वें मी ह्मणतों कीं त्यांच्या कवितासुतांस हा महावस्त्राचा लाभ कपिलाषष्ठीचा योग आला असतां त्या महापर्वणीच्या दिवशीं मात्र व्हावयाचा !"

**१३ श्लेष**:—पंतांनीं आपल्या काव्यांत श्लेषाची फारशी योजना केली नाहीं. त्यांच्या आर्येचे दोन दोन चार चार अर्थ होतात हा मालाकारांपूर्वी पुष्कळांचा समज होता. पण त्यांनींच तो समज काढून टाकल्यामुळें पुन्हां त्या वादांत मी पडत नाहीं. अनेकार्थता श्लेषरचनेवरच सर्वस्वीं अवलंबून असल्या-मुळें व श्लेषांची विरलता पंतांच्या काव्यांत अगदीं निर्विवाद असल्यामुळें त्यांच्या आर्येची अनेकार्थताही असंभवदुक्तिकच ठरते. ' सदंड, ' 'धनंजय,' ' द्विजराज, ' ' नल–अनल, ' 'अमृत, ' 'अंबर, ' ' धर्म, ' ' हरि, ' 'मयूर,' ' शुक, ' वगैरे शब्दांवर पंतांनीं जागोजाग श्लेष केले आहेत, पण त्यांचें द्व्यर्थीपण वाचतां वाचतां सहज कळणारे असल्यामुळें त्यामुळें कोठेंही दुर्बोधता येत नाहीं व अर्थहानिही होत नाहीं. कर्णवधप्रसंगीं ( अ. ४९ ) कर्णाप्रत श्रीकृष्णाची ही उक्ति पहा:—

( १ ) **रक्षावा धर्म असा करिसी उपदेश तरि असे मान्य ।**
**रक्षितसों** धर्मातें **आह्माला धर्म ठाउका नान्य** ! ॥ १६ ॥

तशीच ही धर्माची उक्ति पहा:—

( २ ) **वरिली सुयोधनें ती, ज्यांही भावुकपद** क्षमा, **तींत ।**
**नर जे हिला न सेविती दवडिति हित ते अदक्ष मातींत** ॥ ५८ ॥
**—वनपर्व अ. २**

( ३ ) **चापाच्याचि न केवळ, नरवीराच्याहि वांकवी** कोटी ॥ ५० ॥
**—आदिपर्व. अ० १४.**

यांत एकेका शद्बावरच श्लेष आहे. एकाच पद्यांत अनेक शद्बांवर उत्कृष्ट श्लेष केल्याचीं चार पांच उदाहरणें मला आढळलीं तीं खालीं देतों:—

**( १ ) तूं मलिन कुटिल नीरस जडहि पुनर्भवपणेंहि कच साच।**
**धरिला शिरींहि न स्वप्रकृतिगुण त्यजिसि, नाम कच साच! ६३**

ही आदिपर्वांत ( अ. ९ ) खंडितकाम अशा देवयानीची कचाप्रत उक्ति आहे. या प्रसिद्ध आर्येंत मलिन (पक्षीं पापी ), कुटिल ( पक्षीं–कपटी, कार्यसाधु ), नीरस ( पक्षीं–प्रीतीचें स्वारस्य न जाणणारा ), पुनर्भवपणेंहि जड ( पक्षीं पुनःपुनः उठवल्याच्या योगानें मतिमंद झालेला ), इत्यादि विशेषणें कचास ( केसास–पक्षीं गुरुपुत्र कच यास ) लावून देवयानीनें–शिरीं धरिला असतां ही आपला प्रकृतिगुण न सोडल्याबद्दल ( पक्षीं–पूज्य मानला असतांही केसानें गळा कापल्याबद्दल )—जो त्यास दोष दिला आहे तो किती मार्मिकपणानें व्यक्त केला आहे!

**( २ ) जरि शुचिमूर्ति, सुवृत्ता, मान्या श्रवणोचितें गुणें मुक्ता।**
**विद्धा जडा हि ते, हे अगुणाही तीस करि उणे मुक्ता ॥ ४ ॥**

या आर्येंत पंतांनीं मोत्याचें व मुक्ताबाईचें साम्य दाखवून पुनः मुक्ताबाईचें गुणाधिक्य दाखविलें आहे. मोतीं शुभ्र आहे, मुक्ताबाई पवित्रदर्शना आहे; मोतीं वाटोळें आहे, मुक्ताबाई सर्वांगसुंदर अशा आचरणाची आहे; मोतीं कानांत घालण्यायोग्य आहे, मुक्ताबाई श्राव्यगुणा आहे. मोतीं व मुक्ताबाई यांचें साम्य येथवरच आहे, मोत्यांत जे महादोष आहेत ते मुक्ताबाईंत नाहींत. मोतीं जड पाषाण आहे, मुक्ताबाई सचेतन आत्मरूप आहे. मोतीं विद्ध ह्मणजे सच्छेद आहे ह्मणून क्षुद्र अशा गुणाचा-दोराचा-आंत समावेश झाला आहे, मुक्ताबाई कोणत्याही दोषानें कोणत्याही अंगानें विद्ध नाहीं, अपरिच्छेद्य अशी अगुणा–त्रिगुणातीत–परब्रह्माची प्रत्यक्ष मूर्ति आहे! कवीचा भावार्थ असाः ‘ मुक्ताबाई ही अद्वितीय रत्न आहे; ह्मणून जनहो! व्यवहारांत मोठें टप्पोरें पाणीदार मोतीं पाहून तुह्मी त्याला भुलतां व चौकड्यांत वाढून आपल्याला कृतार्थ मानतां, पण किती केलें तरी तो पाषाण आहे. अशा पाषाणांच्या नादीं लागूं नका! तर त्यांजपेक्षां लक्षपट मोलाची, पवित्रदर्शना, गेयचरिता व निस्त्रैगुण्य होऊन परब्रह्म पदाला पोंचलेली अशी जी मुक्ताबाई तिचा आश्रय करा ह्मणजे कृतार्थ व्हाल!!’

**( ३ ) उलटा आंत, स्पष्ट व्यवहार दहांत दाखवी सुलटा, ।**
**मन्मति हो तैशी परपुरुषासक्ता सदा जशी कुलटा! ॥ ४५ ॥**

**—सन्मनोरथराजि.**

'परपुरुषासक्त जारिणी अनेक जारकर्मे करून बाहेरून जसा गरतीचा डौल आणते, त्याप्रमाणें माझी मति परपुरुष जो परमात्मा त्याचे ठायीं दृढ होत्साती अंतर्मुख राहून बहिर्मुख जडजीवांप्रमाणें प्रपंचांतल्या गोष्टीविषयीं वरवर आसक्ति दाखवो!' ही कल्पना ज्ञानेश्वरांनीं (अ. ३) 'जो अंतरीं दृढ। परमात्मरूपीं गूढ। बाह्य तरी रूढ। लौकिक जैसा' या ओवींत स्पष्ट केली आहे.

**(४) तेजस्वींही स्नेहें स्त्रीकरगत मलिनवदन मळवीती।**
**तापवितीही, हें हरिजनगृहमणिदीप तत्व कळवीती॥ ९३॥**
**—बृहद्दशम. अ० ८१**

यांत सश्लेष निदर्शनालंकार आहे 'तेजस्वी पुरुष मुद्दां अत्यासक्तीमुळें बाइलबुद्दे होऊन आपलीं तोंडें अपकीर्तीनें काळीं करून घेऊन कृष्णकर्मे करितात व जगाला ताप देतात' ही गोष्ट, मोठे प्रकाशक खरे, पण तेलाच्या विपुलतेमुळें, ज्यांच्या ज्योतीपासून काजळ वर जातें असे–हरिभक्त जो सुदामा त्याच्या घरांतल्या स्त्रियांच्या हातांतले–मणिदीप, सर्वत्र मलिनपणा उत्पन्न करून व उष्णता प्रकटवून, जगाला शिकवितात.

शेवटचीं दोन उदाहरणें अर्थश्लेषाचीं आहेत. याशिवाय आणखी श्लिष्ट आर्या मला पंतांच्या काव्यांत आढळल्या नाहींत. पंतांचा संस्कृत कवींशीं किती दृढपरिचय होता हें मागें सांगितलें आहेच. नैषध, कादंबरी, वासवदत्ता, राघवपांडवीय वगैरे प्रसिद्ध त्या काव्यांत कवींनीं श्लेषांवर फारच मदार ठेविली आहे. सुबंधु तर 'प्रत्यक्षरश्लेषमय प्रबंध' रचल्याबद्दल अभिमान वाहतो. हे सर्व संस्कृत ग्रंथ पंतांनीं काळजीपूर्वक वाचले असून त्यांचें त्यांनीं म्हणण्यासारखें मुळींच अनुकरण केलें नाहीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे. पंतांना आपलें पांडित्य प्रकट करण्याची जर हौस असती तर त्यांना वरील संस्कृत कवींची पद्धत उचलणें जड गेलें असतें असें बिलकुल मानतां येत नाहीं. श्लेषरचना प्रसादयुक्त काव्यांला नित्य उपयोगी पडण्यासारखी नसल्यामुळें व सामान्यत: मोठीशी रसपोषक नसल्यामुळें पंतांनीं तिचा आपल्या काव्यांत फारसा आदर केला नाहीं, तथापि मधून मधून वर्णनाला खमंगपणा येण्यास्तव क्वचित शब्दांवर वगैरे श्लेष केले आहेत.

**१४ म्हणींची रचना:**—भाषेच्या अभ्यासांत म्हणींचें महत्व फार आहे, पण या विषयाकडे अद्याप आमच्या लोकांचें लागावें तसें लक्ष ला-

गलें नाहीं. एका लहानशा पण चटकदार ह्मणींत किती तरी अर्थ भरलेला असतो! थोड्या शब्दांत पुष्कळ अर्थ आणलेला असून त्याला मनोहर रूप मिळालें कीं ह्मण बनते, व ती सर्व जनांच्या प्रत्ययास येण्यासारखी असली कीं लोकप्रिय होते. पुष्कळ वर्षांचा अनुभव, शहाणपण, व सुरस कल्पना थोड्या शब्दांत ओतणारे पुरुष भाषेचे मोठे उपकर्ते होत. मोठमोठे कवि, तत्ववेत्ते, पंडित व वक्ते आपापल्या ग्रंथांत व भाषणांत ह्मणींची यथायोग्य योजना करून भाषेस जोर व डौल आणतात. कांहीं ह्मणी हजारों वर्षांच्या जुन्या असून अन्य भाषेंतही घुसतात. 'स्वभावो दुरतिक्रमः' ही संस्कृत भाषेंतली फार जुनी ह्मण आहे, पण तीच मराठींत 'स्वभावाला औषध नाहीं' या रूपानें परिणाम पावली आहे. 'जलबिंदुनिपातेन क्रमशः पूर्यते घटः' या ह्मणीपासूनच 'थेंबें थेंबें तळें सांचे' ही ह्मण आली आहे. 'दूरस्थाः पर्वताः रम्याः' या संस्कृत ह्मणीचें रूपांतर 'दुरून डोंगर साजरे' ही मराठी ह्मण होय. संस्कृतांत अशा रूढ झालेल्या अनेक ह्मणी मराठींत अर्थगौरवास्तव आणलेल्या आहेत; कांहीं ह्मणी जात्या चटकदार असूनही प्रासमय असल्यामुळें अधिक मनोहर झालेल्या आहेत. उदाहरणार्थः—चढेल तो पडेल, दाम करी काम, अति राग भीक माग, चोरावर मोर, अर्ता तेथें मार्ता, असतील शितें तर मिळतील भुतें, एकावें जनाचें करावें मनाचें, देणावळ तशी धुणावळ, वगैरे. ह्मणी ह्मणजे साऱ्या उत्कृष्ट नीतितत्वेंच शिकविणाऱ्या असतात असें नाहीं, तर समाजस्थितीचें व समाजांतल्या लोककल्पनांचेंही त्यांत प्रतिबिंब पडलेलें असतें. 'आधीं पोटोबा मग विठोबा' ह्या ह्मणीचाच विचार करा. ही ह्मण ऐहिक सुखाला चटावलेल्यांच्या तोंडींच शोभते. 'ज्याची खावी पोळी त्याची वाजवावी टाळी,' या ह्मणींत 'धन्याशीं इमानानें वागावें' असा जरी गुप्तार्थ असला तरी 'आपली सदसद्विवेकशक्ति सारी गुंडाळून ठेवून ज्याची नौकरी करायची त्याची हरप्रकारानें मर्जी खूप ठेवावी' असाच अर्थ लोक करितात. कांहीं ह्मणी सत्संग, थोरपण, सहिष्णुता वगैरे सद्गुण शिकविणाऱ्या असतात. 'टाकांचे घाव सोसल्यावांचून देवपण येत नाहीं' ही ह्मण मोठेपणाची उमेद बाळगणारांना किती तरी उत्तेजक आहे! कांहीं ह्मणींची याप्रमाणें उपपत्ति पाहूं लागलों कीं समाजस्थिति, धर्मस्थिति, राजकीय स्थिति इत्यादिकांचेंही ज्ञान होतें. 'रडत राउत घोड्यावर बसणें'

किंवा 'चढेल तो पडेल' या म्हणी मराठे वीर घोडेस्वार होऊन भरतखंड-भर विजयार्थ हिंडू लागले तेव्हांच्याच असल्या पाहिजेत. 'तूं मोठा बाजीराव आहेस' ही म्हण तर शंभर वर्षांचीच जुनी आहे, व ईत रावबाजींचें सर्व चरित्र सांठवलें आहे! म्हणींतल्या कल्पना फारच प्राचीन असतात, इतक्या प्राचीन कीं त्यांचें मूळही प्रायः शोधून काढतां येणार नाहीं. पूर्वीचाच एखादी लोकप्रसिद्ध कल्पना किंवा श्लोकार्ध घेऊन एकादा उत्तम ग्रंथकार तिला अशा सुंदर कोंदणांत बसवून देतो कीं तें कोंदणच सर्व-मुखीं होतें व मूळ कालांतरानें लोक विसरतात. जसें:—

**जें माझे भक्त आले घरां। तें सर्व पर्वकाळ आले द्वारां।**
**वैष्णवा तो दिवाळीदसरा। तीर्थे घरा पैं येती॥ १२६६॥**

ही ओवी एकनाथी भागवतांतल्या ११व्या अध्यायांतील आहे. हा ग्रंथ तुकारामबोवांनीं हजार वेळां वाचला होता. या ओवीचा अवजडपणा काढून टाकून तुकोबांनीं 'साधुसंत येती घरा। तोचि दिवाळीदसरा' हा लोकप्रिय चरण तयार केला. लागलींच हें कोंदण लोकांस आवडून त्यांनीं तो म्हणींत ओढला!

१५ याप्रमाणें म्हणींची महती विचार करण्यासारखी आहे. मराठी काव्यांतून जुन्या म्हणी सहस्रशः आलेल्या आहेत, व कांहीं चांगल्या कवींनीं नवीन म्हणी तयार केलेल्या आहेत. तुकोबांचे शेंकडो चरण मराठींत म्हणीवजा झालेले आहेत. 'मोलें घातलें रडाया। नाहीं असूं आणि माया;' 'तुका म्हणे तेथें पाहिजे जातीचें। येरा गबाळाचें काम नाहीं;' 'शुद्ध बीजापोटीं। फळें रसाळ गोमटीं;' 'सुख पाहतां जवापाडें। दुःख पर्वता येवढें;' 'कोणी निंदा कोणी वंदा। आमचा स्वहिताचा धंदा;' 'ऐरावतीं रत्न थोर। त्याशीं अंकुशाचा मार;' वगैरे शेंकडों अभंगपाद आज मराठी म्हणी होऊन बसले आहेत. इतरही अनेक कवींनीं तयार केलेल्या म्हणी कमजास्त मानानें लोकप्रसिद्ध झाल्या आहेत पण या कामांत तुकोबांचा नंबर पहिला लागतो. 'जगीं सर्व सूखी असा कोण आहे। विचारीं मना तूंचि शोधोनि पाहे' हा समर्थांच्या श्लोकाचा अर्ध; 'आकाश अंत न कळोनिहि अंतरिक्षीं। आकाश आक्रमिति शक्त्यनुसार पक्षी' हा वामन पंडितांच्या श्लोकाचा अर्ध; 'विलंबें पुढें नाश कार्यासि होतो' हा अनंत कवीचा पाद; 'रांडा पोरें वंचक चोरें जवळ मिळवितां तंवर थंवा'

हा रामजोशाचा चरण हे मराठींत ह्मणीवजा झाले आहेत. 'फुटलें मोती तुटलें मन । सांधूं न शके विधाता' हा मुक्तेश्वरी ओवीचा अर्ध, 'कठिण समय येतां कोण कामासि येतो' हा रघुनाथ पंडिताचा चरण ह्मणीरूप झाले आहेत. देवीदासाचें व्यंकटेशस्तोत्र हें अत्यंत प्रसिद्ध व लोकप्रिय असल्यामुळें त्यांतलें 'समर्थाचिया घरचे श्वान । त्यास सर्वही देती मान;' 'अन्नासाठीं दाही दिशा । आह्मां फिरविशी जगदीशा;' 'उडदांमाजी काळे गोरे, काय निवडावे निवडणारें?' हे पाद मराठींत ह्मणीवजा होऊन बसले आहेत. मराठींतल्या स्वतंत्र स्तोत्रांचा संग्रह कोणीं केला तर त्यानें हें स्तोत्र शिरोभागीं ठेवण्यायोग्य आहे. तें अती सोपें, फार प्रेमळ व हृदयद्रावक आहे. 'बा तुझा चालता काळ । खायाला मिळती सकळ' या अमृतरायांच्या पदाप्रमाणें शेंकडों मराठी पदांचीं ध्रुवपदें मराठींत ह्मणीसारखीं रूढ झालेलीं आहेत. हा विषय स्वतंत्रपणें विचार करण्यासारखा असल्यामुळें येथें त्याचा विस्तार न करितां मोरोपंतांच्या काव्यांतले असे कांहीं चरण म्हणीवजा झाले आहेत किंवा होण्याच्या लायकीचे आहेत काय याचा विचार करूं. तुकोबाचे असे सहस्रशः चरण ह्मणीवजा झालें आहेत हें त्यांच्या सर्वाधिक लोकप्रियतेचें द्योतक होय. पंतांनाही सारीं शंभरच वर्षे झालीं असून त्यांचेही बरेच चरण लोकप्रसिद्ध झाले आहेत हें त्यांच्याही लोकप्रियतेचें लक्षण मानतां येतें. थोडीशीं उदाहरणें पहा:--

(१) जरि उकिरड्यांत पडला मळला न हिरा तथापि सामान्य ।
(२) अरिच्याहि सद्गुणातें प्रेमें वाखाणिताति सुज्ञामी ।
(३) सत्पुरुषकथा अद्भुत रसदा ह्मणतो ह्लाच सुरमी मी ।
(४) न करील कां पित्याची दुर्गतिची माउली सुरा मातीं ।
(५) प्रार्थुनि मागति पुत्रच्छात्रापासुनि भले परिभवातें ।
(६) हंसें मुक्ता नेली मग केला कलकलाट काकांनीं ।
(७) परि प्रभुहि संग्रहीं सकल वस्तुला ठेविती ।
(८) व्रणार्तपशुच्या शिरावरि वनीं उभे काकसे ।
(९) दुर्गत बंधु पहातां दुःख असें इतरथा न मातें तें ।
(१०) सत्कुलजा वंधि सदा स्वकुलाचाराकडेचि मन वाहे ।
(११) पुरुषें आरंभावें कर्म न पौरुष कदापि सोडावें ।
(१२) खळ न वळेल झिजविला जरि करितां बोध काय सामास ।
(१३) संत ह्मणति सप्तपदें सहवासें सख्य साधुसी घडतें ।

( १४ ) संसारीं पुरुषार्थप्रासादा साधुसंग हा पाया ।
( १५ ) व्यसनीं प्रवृत्ति आवरि धीर जसा सिंधु आवरी लहरी ।
( १६ ) बहुतांचें संकल्पित जें तें होतेंचि निश्चयें कार्य ।
( १७ ) जो शुचि तो स्वप्नींही परदारांच्या विलोकनें विटतो ।
( १८ ) जें मर्यादाविरुद्ध केलें तें हृदयीं कर्म सर्वदा सलतें ।
( १९ ) हंसीं हंस बकीं बक मिसळे जन ओढतो स्वजातिकडे ।
( २० ) आगें काय करावें निपट कपटनिद्रितां जनां अन्यें ।
( २१ ) धर्मन्यायविरोधें कोणाचेंही न इष्ट साधेल ।
( २२ ) मधुनेंचि मूढ पाहे पाहत नाहीं परि प्रपातातें ।
( २३ ) जो मृदु लागे तो तो दृढपी शिशु फार ऊन मातातें ।
( २४ ) चित्त प्रसन्न नसतां उपचाराग्रह नव्हेत जाच कसे ?
( २५ ) बहु अनवाद असावर, वेग निरोधील कोण तोयाचा ? ।
( २६ ) सकळां सभ्यजनांतें सुख व्हावें नित्य नव पुरोगानें ।
( २७ ) संसर्गीही भोगिति, दोषांच न दोष आपुले भोगी ।
( २८ ) पंजरबद्ध व्याघ्राप्रति लोक विशंक मारितात खडे ।
( २९ ) छंदाचा गांनिहंतुहि जो विषकल्पवृक्ष निजहि तो पाय ।
( ३० ) फारच वरी निरयगति परवशता ज्ञात गुणें करी जाच ।
( ३१ ) तो आत्मानंद कामा ये जो धांवोनि अवसरीं विषमीं ।
( ३२ ) घनांबु न पडे मुखीं उघडिल्याविना पांखरें ।
( ३३ ) प्रभुच नरि होंचि कीं करुनि दे कृपा दान तें
स्वसाध्य यदुपार्जनें मिरविजे स्वपाशानतें ।
( ३४ ) उदारपण तें भलें सुखविजे सुपात्रा सदा ।
( ३५ ) प्रकृति मनोहर तेथें वदन धरी कोण आदरा जीव ? ।
( ३६ ) म्हणति 'असाध्य न कांहीं कृत्यनिश्चय जो तया' असें आर्य ।
( ३७ ) कोठें वीर्य असें परि तें परिहरिलें न काळवेगानें[९]
( ३८ ) हांसत कर्म करावें भोगावें रडत तेंचि परिणामीं ।

१ इच्छाशक्तीचें सामर्थ्य यांत प्रकट केलें आहे. २ कष्ट. ३ उपचाराचे आग्रह. Formalities ४ पुढारी. पुढाऱ्याचें कर्तव्य यांत सांगितलें आहे. ५ ' स सुहृद् व्यसने यः स्यात् ' या संस्कृत A friend in need is a friend indeed. किंवा या इंग्रजी म्हणीप्रमाणें ही सुरेख म्हण मराठींत पंतांनीं आणली आहे. ६ God helps those who help themselves या इंग्रजी म्हणीचीही वहांण. ७ ही प्रमन्याची किती सुंदर व्याख्या आहे. ८ आकृति विशेषु आदरः पदं करोति—कालि दास. ९ 'The paths of Glory lead but to the Grave'

**( ३९ ) बलवत्तर विधि देतो थोराला थोरल्याचि तापातें ।**
**( ४० ) मरणाऱ्या रोग्याला काय करिल जाणता भला वैद्य ? ।**

१६ याप्रमाणें आणखीही पुष्कळ ह्मणी बनलेले किंवा होणारे चरण पंतांच्या काव्यांत सांपडतात. पंतांचीं काव्यें जसजसे अधिक लोक वाचींत जातील तसतसें त्यांना त्यांतील उत्तम रत्नें आणखी निवडतां येतील. सर्व मराठी कवींच्या ग्रंथांतल्या ह्मणी एकत्र करून त्यांचें नीट स्पष्टीकरण करण्याचा कोणीं प्रयत्न केल्यास चांगलें होईल. प्राकृत भाषेला अभियुक्त भाषेच्या योग्यतेला चढविणारे असे मोरोपंतांसारखे पंडित वारंवार उत्पन्न होत नाहींत; ते भाषा कमावतात, भाषेंतील व्यंगें नाहींशीं करून नवीन नवीन गुणांची तींत भर घालून तिला सर्वांगपुष्ट करितात, पण या त्यांच्या कार्याची महती सामान्य जनसमूहास सांगणारे नवे नवे भाषाभिमानी विद्यार्थी उत्पन्न झाले पाहिजेत. निरनिराळ्या दिशांनीं एकेका कवीच्या ग्रंथाचें अध्ययन करणारे असे आस्थेवाईक व एकनिष्ठ विद्यार्थी निपजले पाहिजेत. कवींचे ग्रंथ हे उत्तम पक्वान्नांनीं भरलेलीं मोठमोठालीं पात्रें आहेत, पण त्यांतून निरनिराळे जिन्नस परातींत घेऊन असंख्य जनसमूहास ते वाढणारे वाढपी पुष्कळसे तयार झाले पाहिजेत. भाषेचा अभ्यास करतांना ज्या अनेक दिशांकडे लक्ष पुरविणें अवश्य आहे त्यांपैकीं ह्मणींचा संग्रह विषयवार करून त्यांचा यथास्थित ऊहापोह करणें ही एक आहे, इतकें सांगून असा उद्योग करण्याची कोणातरी उत्साही विद्याप्रियाला परमेश्वर बुद्धि देवो अशी इच्छा प्रकट करून हा मुद्दा संपवितों.

**१७ अनुकरणवाचक शब्दांची योजना**:—दादोबा पांडुरंग ह्मणतात:—" या अशा अनुकरणरूप शब्दांचा महाराष्ट्र भाषेंत जितका भरणा असेल तितका मला वाटतें, आणखी कोणत्याही भाषेंत नसेल. तो मराठी भाषेचा केवळ असाधारण जिव्हाळा होऊन राहिला आहे. गति, वेग, मांजुल्य, कार्कश्य, मौंदर्य, परिमिति, इत्यादि क्रियेचे शतावधि प्रयोग दाखवावयाचे असतां त्या त्या अनुकरणरूप शब्दांचा प्रयोग होतो: जसें:-झट्-झट् चालतो, चमचम् लवते, बदबद पडते. इत्यादि." अनुकरणरूप शब्द हे

१ क्वचित् जुन्या ह्मणी त्यांनीं आपल्या काव्यांत योजल्या आहेत:—

**हें सत्य अत्यबाधित तेथें संताप जे स्थळीं व्याप ॥ ९४ ॥**

**—आर्या केकावली.**

क्रियापदें, क्रियाविशेषणें विशेषणें व कधीं कधीं नामेंही असतात. यांच्या योगानें उद्दिष्टार्थाचा बोध शब्दोच्चाराबरोबर होतो, भाषेस व वर्णनास मोठा आवेश चढतो, आणि वर्णनीय विषयच डोळ्यांपुढें मूर्तिमंत उभा राहतो; यांना बहुधा कठोर वर्णांची अपेक्षा असते व एक दोन वर्णांची त्यांतच पुनरावृत्तिही होते.

तेथ तिन्ही लोक डळमळित । मेरुमांदार आंदोळित ।
समुद्रजळ उसळत । कैलासवरी ॥ ५५ ॥

—ज्ञानेश्वरी. अ. १

येथें 'डळमळित,' 'आंदोळित' व 'उसळत' या शब्दांच्या उच्चाराबरोबर त्या त्या अर्थाचा बोध होतो. अनुकरणरूप शब्दांची योजना सामान्यतः वीररस-पोषक असते, आणि म्हणून अशा शब्दांचा भरणा एकनाथ व तुकाराम यांच्या कवितेपेक्षां मुक्तेश्वर, श्रीधर व मोरोपंत यांच्या काव्यांत अधिक सांपडतो. मुक्तेश्वरी भारतांतल्या खालील दोन तीन ओव्या पहा:—

जेथें ज्वाळांचा धडधडाट । वंशकाष्ठांचा तडतडाट ।
लाख जळतां भडभडाट । कुवास व्योमीं दाटला ॥ ४६ ॥
दिवभीतांचे घुघाट । पिंगळियांचे किलकिलाट ।
भालू भुंकती सैराट । टिटवे थोर टिवटिवती ॥ ५८ ॥

—आदिपर्व. अ. ३७

सर्पापरी फुस्कारिती । सिंहापरी हुंकारती ।
वृषभापरी फुंपाटती । उफाळती इसाळें ॥ ३८ ॥

—सभापर्व अ. ६६

असे मुक्तेश्वरासारखे किंवा रामदासासारखे तेजस्वी ग्रंथकार अनुकरणरूप नवीन नवीन शब्द बनवून सहज वर्णन करितां करितां योजतात, त्यामुळें त्यांच्या भाषेत विलक्षण ओज चमकतें. अनुकरणरूप शब्दयोजना करण्यास प्रसाद व चातुर्य लागतें व हीही एक भाषाप्रभुत्वाची कसोटी मानतां येईल. मोरोपंतांच्या काव्यांत व मुख्यतः भारतांत अनुकरणरूप शब्दांची पुष्कळ रेलचेल उडाली आहे. याचीं कांहीं उदहरणें देतों:—

(१) गंधर्वभयें काळिज धडधड उडतें करें पहा! गे! हें[1] ॥ १७८ ॥
(२) टकमक पाहत होते प्रभुमुखचंद्राकडेचि चातकसे[2] ॥ ९८ ॥
(३) झाले उत्पात बहुत तेव्हां चळचळ वसुंधरा हाले[3] ॥ ३८ ॥

१ विराटपर्व अ. १ २ उद्योगपर्व अ. ७. ३ भीष्मपर्व अ. १०.

(४) पळ काढलाचि तुमच्या पाहुनि तें कर्म तडक लेकांहीं ॥
गमला रुद्र वृकोदर धाकें काळीज तडकलें कांहीं[1] ॥ ४४ ॥
(५) मारुनि रात्रिचरकटक रुधिरनदी खळखळाट वाहविली ।
चळचळ घटोत्कटाची मर्मी वेधुनि मुहूर्त राहविली[2] ॥ ११५ ॥
(६) मग कंठनाल चरचर तो सत्य करावया बिरुद कापी ।
मिटक्या देउनि मटमट, घटघट त्या स्वाहितासृगुदका पी ॥ १४ ॥
(७) अंगुलि चुरचुर चोखी तत्पानें तत्क्षुधातृषा धाली[4] ॥ ८० ॥
(८) धांवे अक्रूर तसा भेटाया कडकडूनि आईला ॥ ४८१ ॥
(९) बहु कडकड परशरें, जैसा अतितप्त पाक थेंबानें[6] ॥ ५६ ॥
(१०) त्यातें जिंकाया तूं बहु हुटहुटलासि योग्य अनय न हा[7] ॥ ५७ ॥
(११) रथ थडकले, भडकले हय, शस्त्रजवन्हि धडकले वरते[8] ।
(१२) मंच सकळ डगमगले कंस मुकुटमणि गळोनियां पडला ॥ ४४ ॥
(१४) श्रीचरणपद्म ज्यांचे कीर्तिसुगंधें सदैव दरवळले[10] ॥ १४४ ॥
(१४) मानी सर्व मनोरथद्रुम फळीं ओथंबले आपुले[11] ॥ ५१ ॥

याशिवाय करकरा दांत खाणें, मुळमुळ रडणें, करकरून बांधणें, फरफर ओढणें, खदखद हंसणें, थरथर कांपणें, गदा पडताळणें किंवा भिरकावणें, मस्तक झडझडाविणें, तो वृद्ध चळला, सिंह गुरगुरतो, घोड्यांस चुचकारतो, घोडे फुरफुरतात, हत्तीचे चीत्कार वगैरे शेंकडों अनुकरणरूप शब्द मोरोपंतांच्या काव्यांत प्रसंगोपात्त योजलेले आढळतात. अनुकरणरूप शब्द केवळ क्रियाविशेषणेंच असतात असें नाहीं, ध्वनिमात्रानें उद्दिष्टार्थाची कल्पना प्रत्यक्ष उभी करणारा जो शब्द त्याला अनुकरणवाचक शब्द ह्मणावें.

**१८ संस्कृती वळण**:—मुसलमानी अमलांत अरबी व फारसी भाषांतले कित्येक शब्द मराठींत घुसले होते, ते काढून टाकून मराठी भाषा व मराठी दरबार पुनश्च सोंवळा करण्याच्या हेतूनें श्रीशिवरायानें रघुनाथ पंडिताकडून ' राजव्यवहारकोश ' करविला हें इतिहासज्ञांस माहीत आहेच. कांहीं अंशीं असाच प्रयत्न पंतांनीं संस्कृत भाषेतल्या अनेक तऱ्हा मराठींत आणून केला. प्रौढ शब्दांची योजना; लांबलांब संस्कृत समासांचा, संस्कृत

१ द्रोण. अ. १६. २ द्रोण. अ. १६. ३ कर्ण. अ. ४५. ४ मंत्रभागवत स्कंध ९. ५ मंत्र. स्कंध १०. ६ भीष्म. अ. १०. ७ द्रोण. अ. १७. ८ द्रोण. अ. ३. ९ हरिवंश. अ. १७. १० मंत्र भा. स्कं १२. ११ बृहद्दशम अ. ५५

कर्वीच्या संकेतांचा व अलंकारांचा यथेच्छ उपयोग; संस्कृत वाक्यांच्या धर्तीवर मराठी वाक्यरचना; रूढ मराठींत जे अशुद्ध किंवा अपभ्रष्ट शब्द वापरीत त्यांचा कलंक झाडून त्यांना पूर्वस्थिति प्राप्त करून देण्याची खटपट, वगैरे प्रकारांवरून मराठीला व्याकरणसंस्कारानें पावन करून संस्कृतच्या पदवीला चढविण्याची पंतांना आवड होती असें उघड दिसतें. अशा तऱ्हेनें भाषा कमावण्याचा प्रयत्न पंतांशिवाय दुसऱ्या कोणत्याही मराठी कवीनें केलेला नाहीं.

असि, नाक, स्वप्न, विघ्न, शपथ हे शब्द संस्कृतांत पुलिंगी आहेत, ह्मणून पंतांनींही मराठींत ते त्याच लिंगीं योजिले आहेत. वपु, मित्र, क्षत्र हे शब्द मराठींतही पंत नपुंसकलिंगीं वापरतातः—

**भावंड बुद्बुदांचें वपु अति निस्सार मित्र फेंसांचें ।**

तसेंचः—

**छळिले दशाननें परि झाले प्रभुदार काय कातर ते? ॥ ७१ ॥**

**—विराट. अ. १**

दार शब्द पुलिंगी व अनेकवचनी जसा संस्कृतांत असतो तसाच येथेंही घातला आहे. ' अष्टौप्रहर ' ' रात्रौ ' या शब्दांत संस्कृत रूपेंच कायम ठेविलीं आहेत. 'हा जन सर्वांसमाजीं तुमचा सोडूनि काय पद रमला' (स्त्रीपर्व), किंवा ' हा विषयाकारणें नसे मुजला, ' यांतला ' हा जन '–अर्थात् मीं –संस्कृतांतल्या ' अयं जनः 'त्याच पद्धतीवर योजला आहे. मराठींत विशेषणांस विभक्तिप्रत्यय लावीत नाहींत, पण संस्कृताप्रमाणें पंत ते लावतात. ' रात्रीला नेणतीच सरलीला ' किंवा ' त्वन्मतिला जीवनासि विटलीला ' असे प्रयोग पंत योजतात. ' निद्राभंग करिल जो त्या माझें भस्मसात् करो नयन ' ( हरिवंश अ० २३ ) या आर्यांत ' भस्मसात् कृ ' या संस्कृत क्रियापदाची योजना केली आहे. संस्कृतांतले कर्मणि प्रयोग इंग्रजी Passive voice सारखे आहेत, पण त्यांचा मराठींत फारसा उपयोग करीत नाहींत, तो प्रशस्त दिसत नाहीं. पण पंत असे प्रयोग करितातः—

**जाउनि तो सूत ह्मणे ' कृष्णे ! द्यूतांत तूं स्वयें धर्में ।**
**हारविलीस सुयोधनसदनाप्रति ये करावया कर्में ॥ ( सभापर्व )**
**प्रद्युम्न ह्मणे केलों पूर्वीं ऐसाच मीं हरें काय? ( हरिवंश )**

मराठींत सामान्यतः ' धर्मानें तुला हारविलें ' ' हरानें मला केलें ' या

भावे प्रयोगाचाच उपयोग करण्याचा प्रघात आहे. पंत कधीं चरण, कधीं आर्यार्ध, कधीं सबंद आर्याच संस्कृतांत रचतात.

**अजि ' आत्मानं सततं रक्षेद्दारैर्धनैरपि ' श्लोकीं ।**
**तेंचि करा हो न बुडों द्या हो मज निजमतीसही लोकीं॥**
**—(आदि. ३०**

**'ब्रूयात्क्षमी गभीरोसीति बत युधिष्ठिरं प्रभुं को न' ।**
**निज नीचपण तूं श्वान प्रकटिसि भल्यावरीहि भुंकोन ॥ ८५ ॥**
**—सभापर्व अ. ४**

अशा ठिकाणीं कधीं मूळ संस्कृत अवतरणच कायम असते. लांबलांब समास तर शेंकडों ठिकाणीं सांपडतील:—

**जन्म व्यासापासुनि कथिले धृतराष्ट्रपांडुविदुरांचे ।**
**सर्वाऽसुखदाऽराजकपीडितलोकाधिशैल भिदुरांचे ॥ ३९ ॥**
**—उद्योगपर्व अ. ११**

मंत्ररामायणांत (सुंदरकांड १११–११७) मारुतिला प्रहस्तानें ' तूं कोण ' ह्मणून विचारतांच त्यानें ' मी दूत राघवाचा ' असें सांगितलें; त्या प्रसंगीं पंतांनीं बारा सामासिक शब्दांत सहा आर्या बसविल्या आहेत ! प्रत्येक आर्यार्ध एक समासाचें, अशा बारा समासांत सारी रामकथा आणून हीं सारीं विशेषणें ' राघवा'च्या गळ्यांत अडकाविलीं आहेत !! थोडक्या शब्दांत पुष्कळ अर्थाचा ज्यांत समावेश होतो अशा समासांची योजना कोणत्याही प्रकारें दुष्ट नाहीं, मात्र संस्कृतानभिज्ञ लोकांना पंतांविषयीं कुरकुर करायला येथें जागा सांपडते ! प्राकृत भाषेला हवा तो अर्थ पाहिजे त्या तऱ्हेनें व्यक्त करण्यास पंतांनीं लाविलें, तिच्यांत खरासारखा लवचिकपणा त्यांनीं आणला, व यासाठीं पूर्वकवींनीं न योजिलेले संस्कृत प्रकार त्यांना योजावे लागले. शिवाय असे प्रकार सर्वत्र आहेत असें नाहीं. त्यांच्या बहुतेक आर्या सहज लिहितां लिहितां रचल्या गेल्या आहेत. ज्यांचें संस्कृत ज्ञान अंगदी बेतापुरतें असतें, समासादिकांची मोडणी ज्यांना ठाऊक नसते, काव्याचे अनेक प्रकार व रसालंकारादिकांची ज्यांना माहिती नसते अशा अलीकडच्या कांहीं मृदुलप्रकृतीच्या वाचकांना प्रौढ संस्कृत शब्द व समास जींत आहेत अशी एकादी मोरोपंती आर्या पाहिली कीं, विजेचा धक्का बसल्यासारखें होतें ! पण वास्तविक विचार केला तर हा त्या आर्येचा काय

दोष आहे बरें ? उत्तम वस्त्रें परिधान केलेली, हिऱ्या मोत्यांच्या अलंकारांनीं युक्त अशी एखादी गजगती विलासवती समोरून येतांना पाहून एखादा गांवढळ जर चपापला तर आपण त्या विलासवतीला नांवें ठेवूं कां या गांवढळ अजाण माणसाची कींव करूं ? आपल्या काव्यांत संस्कृत शब्द अधिक आहेत, ह्मणून कांहीं जणांचा त्यावर आक्षेप निघेल हें पंतही ओळखून होते, व या आक्षेपाला त्यांनीं समर्पक उत्तरही दिलें आहे. या विषयाची चर्चा मागें पृ० २५०।२५१ मध्यें झालेली आहे ती वाचकांनीं पुन्हां एकवार पहावी.

**१९ यावनी शब्द:**—पंतांच्या काव्यांत अरबी, फारसी, हिंदुस्थानी शब्दही पुष्कळ आढळतात. ज्ञानेश्वरी ग्रंथांत यावनी शब्द नाहींत, पण नाथांच्या व नाथांच्या पश्चात् जे मराठी कवि झाले त्यांच्या ग्रंथांत असे शब्द पुष्कळ सांपडतात. मराठी भाषेची या परभाषांच्या संगतीपासून पुष्कळच वाढ झाली, व यावनी शब्द आतां तर मराठींत इतके मुरले आहेत कीं ते यापुढें केव्हांही तिच्यांतून काढून टाकतां येणार नाहींत. ते घरीं, दारीं, दरबारांत, पत्रांत, काव्यांत, सर्वत्र सर्वजण यथेच्छ योजतात. यवनांनीं जसा पूर्वी आमच्या देवघरांत व स्वयंपाकघरांत प्रवेश केला होता, तसा त्यांच्या भाषेनेंही केला होता. आमच्यावरचा यवनी अंमल लौकर नाहींसा झाला, पण यावनी भाषांचा अंमल नाहींसा झाला नाहीं ! मराठे व यवन महाराष्ट्रांत एक झाले नाहींत पण मराठी व यावनी भाषा यांचें मात्र अभेद्य ऐक्य झालें आहे ! एकनाथांच्या 'अर्जदास्ता' पासून कोणताही मराठी ग्रंथ घेतला तरी ज्यांत यावनी शब्द नाहींत असा एकही ग्रंथ आढळणार नाहीं. यावनी भाषांची मराठी भाषेला एवढी जबर मगरमिठी बसली कीं, शिवरायांनीं जरी यवनांपासून महाराष्ट्रास सोडविलें तरी त्यांनाही यावनी भाषांच्या कबज्यांतून मराठीस सोडवितां आलें नाहीं ! जोगाईचें आंबे, पैठण, बीड, दौलताबाद, औरंगाबाद या प्रांतांकडे मराठी कवि पुष्कळ झाले, व तिकडे यावनी अंमल आज कित्येक शतकें कायम झाला आहे, त्यामुळें शिवाजीराजांनीं यावनी शब्द मराठींतून काढून टाकण्याचा 'राजव्यवहारकोश ' करवून जो प्रयत्न केला, तो पुढें पेशवाईंत जरी अधिक जारीनें झाला असतां तरी त्याला यश आलें नसतें असें ह्मणायला बिलकूल हरकत दिसत नाहीं.

असो. झालें हेंही एकापरी बरेंच झालें. यावनी भाषांच्या संसर्गानें मराठी भाषेला अधिक मर्दानीपणा येऊन तिची इभ्रत व डौल बराच वाढला. शिवकालीन कवींनीं यावनी शब्दांचें साह्य घेऊन संस्कृत शब्दभांडाराच्या जोरावर मराठी काव्यें केलीं. पंतांचें मराठी ग्रंथावलोकन विस्तृत होतें. तुळसीदासकबीरादि हिंदुस्थानी कवींचे ग्रंथ त्यांनीं वाचले होते. बाबूजी नाईकासारख्या दरबारी राजपुरुषाच्या आश्रयानें त्यांनीं जन्म घालविला, ते स्वतः व्यवहारांत फार दक्ष असत व अनेक ठिकाणच्या अनेक जातींच्या पुरुषांशीं त्यांचा निकट संबंध होता यामुळें त्यांच्याही काव्यांत यावनी शब्दांची रेलचेल सांपडते. 'पकडो लियो हकालो' ही आर्या प्रसिद्धच आहे; दावा, हवाला, सामल, रदबदली वगैरे अरबी शब्द; खासदार, लुब्रा, चाकर, कारभारी, वगैरे हिंदुस्थानी शब्द; कोतवाल, मर्द, बरोबरी वगैरे फारशी शब्द, त्यांनीं अनेकवार वापरले आहेत. यवन, वतन, तोबा, लगाम, कायदे, लांच, वकील, पगडी, मुसलमान, सावकार, खोगीर, तोब्रा, वगैरे शेंकडों परभाषांतले शब्द पंतांच्या काव्यांत सांपडतात. नाथांचीं 'अर्जदास्त' वगैरे प्रकरणें मुद्दाम यावनी शब्द योजून जशी हेतुपुरस्सर केलीं आहेत तशी पंतांची गोष्ट नाहीं, पंतांनीं जे शब्द वापरले आहेत ते त्यांच्या काळीं समाजांत इतके रूढ झाले होते कीं त्यांचें परकीयत्वच नष्ट झालें होतें असें ह्मटलें तरी चालेल.

**२० पात्रानुरूप भाषा**:—भिन्न स्वभावांच्या स्त्रीपुरुषांच्या हृद्गतांचें फार मार्मिक ज्ञान पंतांनीं जागोजाग प्रकट केलें आहे. त्या त्या रसाला त्या त्या पात्राला, त्या त्या प्रसंगाला अत्यंत अनुरूप अशी वाक्यरचना त्यांनीं सर्वत्र केलेली आढळते. पंतांच्या भारतांत हें चातुर्य विशेष दिसतें. क्षमावान् धर्मराज; 'भुजबला'भिमानी व क्रोधवश भीमसेन; गुरुनिष्ठ, कृष्णभक्त व विवेकी अर्जुन; मानी व सुहृत्प्रिय दुर्योधन; कामांध कीचक व जयद्रथ; नीतिज्ञ व स्पष्टवक्ता विदुर; एकांगवीर व दाता कर्ण; मानी सती द्रौपदी वगैरे पात्रांचीं ठिकठिकाणचीं भाषणें नीट पडताळून पाहतां पात्रानुरूप भाषा योजण्यांत पंतांनीं विलक्षण चातुर्य प्रकट केलें आहे असें दिसतें. विविध पात्रांच्या तोंडीं अनुरूप भाषणें घालून मनुष्यस्वभावाचे विविध नमुने प्राकृत जनांपुढें ठेवण्यांत, व विकारशतांचें मार्मिक ज्ञान प्रकट करण्यांत पंतांनीं अगदीं कसूर केली नाहीं. प्रसंगोचित खुबीदार भाषणें त्यांच्या काव्यांतून शेंकडों सांपडतील. कामांध कीचकाच्या तोंडीं:—

(१) शृंगाररसतरंगिणि ! तळमळतो संगमार्थ मत्स्य पहा ॥ ११७ ॥

—विराटपर्व अ. १

हें वाक्य किती तरी शोभतें !

(२) सीतेवरि जातां तो दे लाज पिसाळल्याहि कुत्यातें ।

'मेल्या रांड तुझी हो !' ऐसें शापी हळूच कु त्यातें ॥ ५८ ॥

—वनपर्व अ. १२

(३) कृष्णाहि ह्मणे 'मेल्या अक्षकरांचें समूळ तळपट हो' ॥ ७८ ॥

—विराटपर्व अ. ६

(४) रुक्मिणी आपल्या लग्नाची हकीकत सांगतांना ह्मणतेः—

चिंताज्वरांत माझा रात्रौ नाहींच लागला डोळा ।

जायासाठीं कंठीं शतधार प्राण जाहले गोळा ॥ ३५ ॥

मग बाई ! दादाचे मागधशल्यादिकाहि मेल्यांचे ।

सैनिक मज रक्षाया आले धाकें विरोनि गेल्यांचे ॥ ५६ ॥

—बृहद्दराम. अ. ८३

(५) ती सुमति ह्मणे 'आर्या ! त्वां तिकडेहि असेंचि कळवावें' ।

—वनपर्व अ. ४

प्रसंगविशेषीं उपमाउत्प्रेक्षादि अलंकारही स्त्रीस्वभावाला साजतील असेच त्यांच्या तोंडीं घातलेले आहेत. 'मला निरखितां भवच्चरणकन्यका अपगा' ही १० वी केका स्वभावोक्तीचें उत्कृष्ट उदाहरण प्रसिद्धच आहे, शिवाय 'सतत्प्रेक्षा' पाहिल्या ह्मणजे स्त्रीस्वभावाचें वर्णन पंतांना किती उत्तम साधतें हें समजतें. दुर्वासाच्या शीघ्रकोपाचें वर्णन करितांना 'या मुनिकोपासि तसा लागे न पायाचिया उतावेळ' (वन० ८) याप्रमाणें द्रौपदीसारख्या गृहिणीला सर्वथा साजण्यासारखी घरगुती उपमा पंतांना सुचल्याबद्दल त्यांचे आभार मानावेसे वाटतात. बळरामदादाचें स्वभावचित्र पंतांनीं किती बहारीनें काढलें आहे हें पृ. २६६ मध्यें स्पष्ट दाखविलें आहे.

बोबड्या मुलाला साजेशी मंजुल शब्दरचना करण्याचेंही चातुर्य पंतांत होतें. पंतांच्या पूर्वी कांहीं मराठी कवींनीं बालभाषेंत थोडीं पद्यें रचिलेलीं आहेत. 'कुतना ! थमाल ले थमाल आपुल्या गाई । आह्मीं आपुलाल्या घलास दातों भाई' हें नामदेवाचें पद प्रसिद्ध आहेच. ज्ञानदेव व वामनपंडित यांनींही अशी रचना क्वचित केलेली आहे.

(१) 'काय थांगू तूतें बाई। काय थांगूं तूतें' हें ज्ञानदेवांचें पद पहा.

(२) बोबडी करुनि दाटुनि वाणी। बोलतो परम कौतुकवाणी।
बाळ बोलति तलेच हरी तो। बोलतो गृहिणिचित्त हरी तो ॥ २० ॥
'उचाच नाबदसाकल खोबलें। खजुल देउनि गाय बलें बलें।
बसुनियां मग तूं गलुलावली। मज पुलें उलवी बलि वावली' ॥२१॥
—द्वारकाविजय सर्ग. ३

पंतांच्या काव्यांत अशा आर्या दोनच आहेत.

(१) पांडव एकचक्रानगरींत रहात असतां ज्या ब्राह्मणाचे घरीं ते होते त्याच्या घरांतलें एक मनुष्य बकासुरास अर्पण करायचें होतें. पुरुष, स्त्री व कन्या शोक करीत व कोणीं बळी जावें याची विवंचना करीत बसलीं होतीं तोंचः—

खवळूनि उठे बाळक, बोले हस्तें तृणासि कवळून ॥ ३१ ॥
समजावुनि त्यांसि ह्मणे 'ऐसें ठाल्लिचलासि मालीन।
कां ललतां? आललतां? पलतां मी सांगलांत तालीन!' ॥३२॥
—आदिपर्व अ. ३०

(२) गोपशिशु ह्मणति, 'पलिसा ललतां हलिनेंचि झालिला पाय।
गाला उलोनि पलला, सल्व खलें, नवल कलितसां काय? ॥ ९ ॥
—हरिवंश अ. ९

२१ **लोकोक्तिः**—सामान्य लोकांच्या प्रचारांत असणारा, विशेष रीतीनें झटकन् अर्थव्यक्ति करणारा व अंमळ चित्तवेधक असा एक रचनाप्रकार असतो, त्याला 'लोकोक्ति' (Idiometic or colloquial expressions) असें ह्मणावें. या लोकोक्तींचाही मराठी भाषेंत भरणा पुष्कळ आहे, पण त्या सर्व एकत्र निवडून काढणें, कांहीं विशेष पद्धतीनें त्यांचें वर्गीकरण करून त्यांचा अर्थ उघड करून दाखविणें, त्यांचें मूळ शोधून त्यांच्या अर्थांत कसकसा व कां फरक पडत गेला हें सप्रमाण सिद्ध करून दाखविणें हें काम भाषाभिमान्यांचें आहे. अशा पद्धतीनें भाषेचा अभ्यास करण्याचें आमच्या लोकांस अद्याप बाळकडू मिळालें नाहीं. नाहीं ह्मणायला निबंधमालाकारांनीं थोडासा उपक्रम केला होता. 'भाषापरिज्ञान' या सदराखालीं निबंधमालेंत कधीं कधीं 'हातचा मळ' 'पाण्याचें पितर,' 'त्याचें उखळ पांढरें झालें आहे,' अशा ५।५० लोकोक्तींचें स्पष्टीकरण फार मार्मिकपणानें केलेलें आहे. पण मालकारांच्या पश्चात त्यांचा कित्ता वळविणारा कोणी भाषाभ्यासी निघाला नाहीं. या विषयावरही चांगल्या कळकळेल्या मराठी

भापापंडितानें दहा वीस वर्षे झटून मराठी काव्यसमुद्राचें आलोडन करून व व्यवहारांकडे बारीक लक्ष पुरवून स्वतंत्र ग्रंथ तयार केला पाहिजे. अशा लोकोक्तींचा संग्रह कमजास्त मानानें सर्व कवींनीं आपापल्या ग्रंथांतून केला आहे, पण पंतांच्या काव्यांत यांची संख्या निःसंशय अधिक सांपडेल. कांहीं उदाहरणें पहा:—

(१) उतरी वैराग्यबळें षडरींचा तो दिसादिसां रेंवें[1] ॥ २९५ ॥

—मंत्रभागवत स्कंध ९

(२) कठिन दगडाचीही मीं कोणाहि न निघेल परि साल ॥ २५ ॥

—उद्योगपर्व अ. ५

(३) वाढति सद्गुण तों तों प्रेम करिति लोक पांडवांवरि तें ।
चोरांसि चांदणें[2] तापचि देतें सुयोधना अरितें ॥ ६३७ ॥

—मंत्रभागवत स्कंध १०

(४) हरिच्या पुनःपुन्हां कां काळ्या नाकांतें घालिशी शशका ॥ ८४ ॥

—सभापर्व अ. ४

(५) सोसे कुलजा मृत्यु, न अयशाचा सोसवे चुना नाकीं[3] ॥ ५८ ॥

—द्रोणपर्व अ. २१

(६) ती धर्माऽमर्यादा सोसावी सर्वथा न रामाशीं ।

(७) सात्यकि निघे ह्मणे कुरुभट हो हूं शंख करूनि [4]मुख सुजवा ॥३५॥

—द्रोण. अ.११

जागृदवस्थेंत जशी नासाग्रीं बैसली नरा माशी ॥२॥ गदापर्व अ. ५

१ रेंच उतरणें–गर्व हरण करणें. २ 'चोर व चांदणें या संबंधाची' ही लोकोक्ति बरीच प्राचीन आहे. ' चोरा रुचे निशी । देखोनियां विटे शशी '–तुकाराम. ३ नाकाला चुना लावणें–धिक्कार करणें; काळ्या नाकांत घालणें, चेवविणें, उणें बोलणें; त्याच्या नाकावर माशी बसत नाहीं–तो चिडखोर आहे. नाक हा मनुष्याच्या चेहऱ्याचा प्रमुख भाग आहे, व रागद्वेष, हर्षामर्ष, वगैरे विकार तें नाक फेंदारून, लाल होऊन वगैरेमुळें लौकर व्यक्त होतात; सौंदर्याची मुख्य खूण नाक चांगलें असणें ही समजतात; इत्यादि कारणांमुळें सौंदर्य–मानापमानाविषयीं अतिशय काळजी बाळगणाऱ्या महाराष्ट्रीयांच्या भाषेंत नाकावरच्या ४० तरी लोकोक्ति सांपडतील त्या जिज्ञासूंनीं मोलस्वर्थच्या कोशांत पहाव्यात. ४ ही लोकोक्ति अंमळ रानवट पण जोरदार आहे. हामरीतुमरीवर आलेले लोक हमेष ' शंख करा ' याचाच त्वेषानें प्रयोग करितात.

(८) परि त्वांही आह्मीं त्या प्रेमासि रणांत सोडिलें [1]पाणी ॥ ९२ ॥
—द्रोणपर्व अ. १७

(९) होळी [2]करि लंकेची हरि, कर तो दुष्टश्री चोळी ॥ १२६ ॥
—आर्यारामायण.

(१०) सांग सविस्तर कोणापासुनि अंतर कैसें पडलें ? ॥ १५२ ॥
—पंचशती रामायण.

(११) दीपालय विघ्नवाया दाटुनि घालील कोण [4]तेलांत ? ॥ ९ ॥
—उद्योगपर्व अ. ४

(१२) परि तो न घेचि लेशहि आंत, जसा कलश पालथा[4], नीच ।
अहितकरत्व स्वमतें कल्पी अल्पायु बाल थानींच ॥ ५ ॥
—उद्योगपर्व अ. ९

(१३) न करावा धिक्कारुनि प्रभुनीं पाण्यापरीस पातळ[5] तो ॥ २७ ॥
—शांतिपर्व अ. ५

(१४) दानश्री त्याहुनि बहु, दुग्धासहि [6]हात जोडितो मीन ॥ २१२ ॥
—बृहद्दशम अ. ८

(१५) त्याचें रूप विलोकितांचि घडलें तल्लोचना [7]पारणें ॥ १० ॥
—बृहद्दशम. अ. ५५

(१८) खचशील कौरवा ! तूं कीं बहु चढला तुझा मद सिगेला ।
लंघावया पहासी ? गांवाला काय रे मदसि गेला ? ॥ ३३ ॥
—उद्योगपर्व अ० १३

---

१ कांहीं वस्तु दान करितांना त्यावर पाणी सोडण्याची आपली चाल आहे; या क्रियेनें त्या वस्तूवरचें आपलें स्वामित्व सर्वतोपरी दानकर्ता दुसऱ्यास देतो. २ फाल्गुनी पूर्णिमेचा सण आपल्यांत निदान दोनहजार वर्षांचा जुना आहे. महाराष्ट्रीयभाषेंतील अतिप्राचीन काव्य जें गाथासप्तशती त्यांत या सणाचा उल्लेख आहे. होळी करणें—पटविणें जाळून टाकणें. ३ अंतर पडलें—एक वस्तु किंवा पुरुष दुसऱ्यापासून दूर अंतरावर जातो या साध्या स्थानवाचक गोष्टीपासून उभयतांच्या चित्तांत अंतर पडणें=त्यांच्या मधला प्रेमभाव नाहींसा होणें, उघड वैर होणें चूकपडणें हा अर्थ आलेला दिसतो. ४ हीं 'आगींत तेल ओतणें,' 'पालथ्याघड्यावर पाणी' या लोकोक्तींचीं रूपांतरें होत. ५ पाण्यापरीस पातळ करणें:—खालीं पहावयास लावणें, लाजवणें, तेजोभंग करणें; ६ नकोसा होतो, आर्जवानें चालवून देतो. ७ ज्या इंद्रियास जो विषय अत्यंत प्रिय आहे, पण बहुत दिवस तो त्यास मिळाला नाहीं, त्याविषयींची आतुरता वाढून शेवटीं तो मिळाला कीं या लोकोक्तीचा उपयोग करितात. निराहार उपोषणानंतरच्या प्रथम भोजनास पारणें ह्मणतात हें प्रसिद्धच आहे.

याशिवाय 'तेथें माझें बळ काय मारील ?' 'तो खेळाच्या भरीं भरला,' 'हार खाणें,' 'गुरुचरणावरुनि प्राण ओंवाळून सांडणें,' 'लाळ घोटींत बसणें,' 'श्रीची ज्येष्ठा,' 'पाठ पुरवणें,' 'पित्त उसळणें,' 'दैवानें त्यास गोता दिला,' यावच्चंद्रदिवाकरौ,' वगैरे शतावधि लोकोक्ति पंतांच्या काव्यांगणांत इतस्ततः विखरलेल्या सांपडतील.

**२२ रस**:—साहित्यशास्त्रांत मुख्य रस नऊ वर्णिले आहेत. कोणी कोणी दहावा वत्सलरसही वर्णितात. पंतांच्या कवितासमुद्राकडे पाहिलें कीं एका रसाच्या ऐवजीं तेथें दहाही रस मूर्तिमंत दिसतात. रघुनाथ पंडितांच्या 'नवरसांमाझारि शृंगारसा' हा नवरसांचा अनुक्रम मात्र पंतांनीं मान्य केलेला नाहीं. ज्ञानेश्वरमहाराजांनीं या दहाही रसांना अकराव्या भक्तिरसाचें दास्यत्व करावयास लाविलें आहे, व ते मराठी भाषेचे आद्याचार्य असल्यामुळें सर्व प्रमुख मराठी कवींनीं त्यांची आज्ञा माथां वाहिली आहे. पंतांच्या काव्यांत तीन रस प्रमुखत्वानें नांदत आहेत, त्यांतही भक्तिरसालाच पंतांनीं प्राधान्य देऊन बाकीचे दोन रस ह्मणजे वीररस व वत्सलरस हे त्याचे पोषक केले आहेत. पंतांच्या कवितेंत भक्तिरसाचेंच प्राधान्य आहे हें त्यांच्या अनेक स्फुट प्रकरणांवरून, १०८ रामायणें, मंत्रभागवत, केकावलि, स्तोत्रकलाप या सर्वांवरून समजणारच आहे. पंतांच्या कवितेंतल्या वीररसाचींही उत्कृष्ट उदाहरणें मागें मंत्ररामायण व महाभारत यांचें विवेचन करितांना दिलीं आहेत. वीररस पंतांना चांगलाच साधतो. पंतांचा शृंगाररस सभ्य व कुलीन स्त्रीपुरुषांना आनंद देणारा आहे, मंत्ररायणांत विप्रलंभ शृंगार व हरिवंशांत संभोगशृंगार चांगळे साधले आहेत, पण तें प्रसंग वाचून लाजेनें मान खालीं घालावी लागेल असें त्यांत एकही स्थळ नाहीं. हरिवंशांत थोडा ज्यास्त शृंगार आहे, तथापि एका कुलीन घरण्यांतील लहानथोर स्त्रीपुरुषांनीं एकत्र बसून पंतांचीं शृंगारपर प्रकरणें वाचालीं तरी त्यांत त्यांना मर्यादातिक्रम केल्याचें कोठेंही आढळून येणार नाहीं असें मला वाटतें. पंतांनीं शृंगाररसाला कोठें झिडकारिलेंही नाहीं, व त्यावर कोठें अतिशय मिटक्याही मारल्या नाहींत! पंत गृहस्थाश्रमी, मुलाबाळांच्या परिवारांत नित्य वावरणारे, बाळबोध व सभ्य चालीरीतीचे सद्गृहस्थ होते. अशा परिस्थितीला शोभेल इतकाच शृंगाररसाला त्यांनीं मान दिला आहे. पंतांच्या काव्यांत करुणरसाचा परिपाक चांगला उतरला आहे. अभिमन्यु-

वधानंतर अर्जुनानें केलेला शोक व स्त्रीपर्वांतला हृदयविदारण करून टाकणारा शोक हे प्रसंग पंतांच्या भारतांत फारच नामी वठले आहेत. भागवतांत गोपींनीं श्रीकृष्णासाठीं केलेला शोक करुणरसपर आहे व त्या ठिकाणीं त्याचा परिपाक भक्तिरसांत झाला आहे. पंतांना वत्सलरस तर उत्तम साधतो. 'मोरोपंतांचा गृहस्थाश्रम' या प्रकरणांत जीं अवतरणें घेतलीं आहेत त्यांवरून वत्सलरस पंतांना किती सुरेख साधतो हें वाचकांस कळलेंच असेल. रौद्र व बीभत्सरस केवळ गौण आहेत तथापि त्यांचें उत्तम उदाहरण कर्णपर्वांत भीमसेन दुःशासनाचें रुधिर प्राशन करून 'प्रकट महाभैरवसा नाचत गेला जयाच्युता निकट'–ह्या प्रसंगाचें होय. पंतांचा स्वभाव धीरोदात्त असल्यामुळें त्यांच्या वाणींत गांभीर्य व प्रागल्भ्य हे गुण नियमानें दिसून येतात, तथापि उपहासनिंदापर प्रसंग किंवा मंजुलहास्य उत्पन्न करण्यासारखे प्रसंगही त्यांच्या कवितेंत मधून मधून आहेत. कृष्णविजयाच्या ८३व्या अध्यांत पंतांनीं वर्णिलेल्या सुभद्राख्यानांत हास्यरस व विनोद भरपूर आहेत. याप्रमाणें अनेक रस जरी पंतांच्या कवितेंत चांगल्या प्रकारें साधले आहेत तरी भक्तिरस, वीररस, वत्सलरस व करुणरस हे सर्व रस पंतांना अत्युत्कृष्ट साधले आहेत यांत शंका नाहीं.

**२३ अलंकार**:—पंतांच्या काव्यसमुद्रांतून लक्षावधि अलंकाररत्नें निवडून काढतां येतील, किंबहुना एखाद्यानें मराठींत साहित्यशास्त्रावर ग्रंथ लिहिण्याचें मनांत आणलें तर त्याला केवळ पंतांच्या कवितेंतून प्रत्येक अलंकाराचीं शेंकडों उदाहरणें काढून देतां येतील! लहान असो, मोटा असो–असा अलंकार नाहीं कीं ज्याचीं शेंपन्नास उदाहरणें पंतांच्या काव्यांतून सहजरीत्या निघणार नाहींत! नानाविध अलंकारांनीं कुशलवचरित, मंत्ररामायण व महाभारत हे ग्रंथ पंतांनीं खच्चून भरले आहेत. 'उपमा कालिदासस्य' हें वचन योग्यच आहे, पण 'उपमा श्रीमयूरस्य' असें ह्मटलें तरी चालण्यासारखें आहे. पंतांच्या पुष्कळ उपमा कुटुंबसृष्टींतल्या आहेत. कालिदासाच्या उपमांत उदात्तपण असतें. पंतांच्या उपमांत प्रेमळपणा असतो. पंतांच्या उपमा पुष्कळदां अगदीं घरघुती असतात, पण त्या चित्तप्रसादकर असतात. पंतांच्या साध्या पण हृदयंगम उपमा एके ठिकाणीं कोणास पहावयाच्या असतील तर त्यानें 'सन्मनोरथराजि' एवढें एकच काव्य पहावें ह्मणजे झालें! त्यांत अत्यंत समर्पक अशा उपमांची इतकी गर्दी

उसळून दिलेली आहे कीं बहुधा प्रत्यार्येत तर काय, पण प्रत्येक आर्यांत एक नित्यव्यवहारांतली पण मनोहर उपमा त्यांनीं योजिली आहे. ( पृ. २८८ पहा ). पंतांनीं आपल्या भारतांत, विविध प्रकारच्या उपमा, दृष्टांत, अर्थांतरन्यास यांचीं तर कोठारें फोडलीं आहेत! 'झाला म्लान फिरविला पुष्पांचा जेविं वन्हिवरि हार' ( आदि० ९ ), 'वाहे शृंगाररसीं तन्मानस जेविं पुष्प ओघींचें' ( आदि० १४ ) 'तों दुर्वासा तेथें ये ज्याचे जाच कडु जसे काढे' ( आदि० १६ ) याप्रमाणें पंतांच्या शेंकडों उपमा अति साध्या पण फारच हृदयंगम आहेत. पंतांच्या कांहीं उपमा बाह्य सृष्टींतल्या आहेत. जसें:—

**सेना सर्व मिळाल्या धांवुनि अत्यंत शीघ्र दोघांतें ।**
**जैशा तटिनि गंगायमुनांच्या श्रावणांत ओघांतें[1] ॥**
**॥ द्रोण० १६-६१ ॥**

**सहदेव नकुळ दोघे दों भागीं त्यांत धर्मरथ चाले ।**
**भासति जाणों क्षितिवरी पूर्णेंदुसमेत शुक्र गुरु आले[2] ॥**
**॥ कर्ण० ३८-४७ ॥**

कित्येक उपमा नीतिसृष्टींतल्या आहेत. जसें:—

**गुरुसदनीं वेद[3] जसा, विषयीं तैसा न देह राबेल ।**
**तो दास्यरूप वाहे त्या नित्य, चुको न दे, हरा बेल ॥**
**॥ आदि० २-२५ ॥**

या ग्रंथांत वारंवार उद्धृत केलेल्या पद्यांत अनेक अलंकारांचीं शेंकडों उदाहरणें यथास्थल दिलीं असल्यामुळें जास्त उदाहरणें देऊन आणखी जागा अडवीत नाहीं. पंतांच्या कवितेंत जे हजारों सुंदर अर्थांतरन्यास आहेत, त्यांची कल्पना मागें 'ह्मणींचें महत्व' सिद्ध करण्याकरितां जे मो-

१ गंगा व यमुना या दोन महानद्यांकडे श्रावणांतल्या महावृष्टीनें तुडुंब फुगून खळाळत जाणाऱ्या नदीनाल्यांची उपमा धर्म व द्रोण यांच्या साह्यार्थ चोहोंबाजूंनीं उड्या घेत जाणाऱ्या लहान मोठ्या पथकांना जी दिली आहे ती किती तरी उदात्त आहे! २ नकुलसहदेवपरिवेष्टित धर्मरथाला शुक्रगुरूंच्या मध्यस्थित पूर्णचंद्राची दिलेली उपमा किती तरी गोड आहे! ३ धौम्य मुनीचा शिष्य. देह विषयांत अत्यंत राबतोच, पण वेदनामक शिष्य आपल्या गुरुगृहीं त्याहून अधिक राबला! त्यानें गुरुरूप शंकराला दास्यरूप बेल नित्य वाहिला.

त्यांचे दाणे दाखविले आहेत त्यावरून सहज येणार आहे. आतां फक्त एकच आर्या देतों:—

**समरीं ऐरावतही शोणितपुरीं न हात वाहेल ।**
**परि परम प्रिय अर्जुन त्यावरि याचा न हात वाहेल ॥**
**॥ उद्योग० १२–५४ ॥**

या एका साध्या आर्येंत ४।५ अलंकारांचा संकर झाला आहे. 'शोणितपूरीं ऐरावत वाहेल '–ही **संबंधातिशयोक्ति**; 'ऐरावत वाहेल ' मग इतरांची कथा काय–ही **काव्यार्थापत्ति**; द्रोणपराक्रम उपस्थित असतां त्याचें कार्य अर्जुनपराभव याची अनुपपत्ति–ही **विशेषोक्ति**; परमप्रिय हें विशेषण साभिप्राय असल्यामुळें–**परिकर**; 'हात वाहेल '–ही **लोकोक्ति**. अशाही शेंकडों आर्या आहेत. पंतांच्या काव्यांत लक्षावधि अलंकारनक्षत्रें चमकत आहेत, पण 'हीं कोणाला गणवतील बा सारीं !'

**२४ आर्यावृत्त:**—पंतांनीं जरी विविध वृत्तांत काव्यें केलीं असलीं तरी त्यांची प्रसिद्धी 'आर्यापति ' ह्मणूनच आहे. पंतांपूर्वी आर्यावृत्त मराठी वाचकांना माहीत नव्हतें. नाम सुधाचषकांत पंतांनीं आर्यावृत्तावर दहा आर्या केल्या आहेत. आर्यासुधा ही गीर्वाणभाषानिष्णात अशा बुधांनीं आकंठ प्राशिली होती पण प्राकृतांनीं ती कानांनीं मात्र ऐकिली होती ( ११५). त्यांनीं दया करून मला ती शिकविली ( ११६ ). शंकरांनीं ती प्रथम छंदःशास्त्रांत पिंगलाचार्यांना शिकविली होती व त्यांजपासून मी ती शिकलों ( ११४ ). प्राकृत वांचकांस पूर्वी इतर कांहीं छंद माहीत होते:—

**गद्यें ओव्या सवया दोह्यांतें सर्व जाणती लोक ।**
**श्लोक प्रिय त्यांस जयां प्रसन्न तूं पुण्यपूर्वकश्लोक ॥ ११३ ॥**

ओव्या, दोहे, श्लोक वगैरे लोकमान्य झालेल्या वृत्तांचा उल्लेख करून पंत ह्मणतात:—

**प्रकटी प्रथम भगीरथ नृपलोकीं सुरनदीस ती आर्या ।**
**तसि हे मयूर नाहीं तरि सर्वांना न दीसती आर्या ॥ १११ ॥**

आर्याभागीरथीच्या जनकाचा हा अभिमानोद्गार ऐकून कोणास कौतुक वाटणार नाहीं ! 'मी मोरोपंत जन्मास आलों नसतों तर तुह्मांला आर्या कांहीं दिसली नसती !' असे डौलाचे उद्गार पंतांना शोभतात यांत कांहीं शंका नाहीं. मी जन्मास आलों नसतों तर अमुक कार्य झालें नसतें असें

ज्याला वाटतें त्याचेंच जन्म सफल झालें असें समजावें. पंत शंकरापाशीं मागतात:—

**उचित प्रचार भासो रसिकांस प्राकृतांत आर्यांचा ।**
**युष्मद्वरेंचि होतो सत्कार प्राकृतांत आर्यांचा ॥ ११२ ॥**

रसिकांनीं ओव्या, दोहरे, श्लोक इत्यादि वृत्तांचा जसा सत्कार केला आहे तसा माझ्या आर्येचाही करावा अशी पंतांची प्रार्थना आहे. भारताच्या उपसंहारांत ते विनोदानें ह्मणतात:—

**बहु मानीलचि पूर्व प्रेमातें न त्यजूनि ओव्याही ।**
**आर्यांसि ह्मणेल रसिक अभिनव विहिणीस जेंवि 'ओ व्याही'! ॥**
**—स्वर्गारोहण २–५६**

आर्यावृत्ताचा गौरव पंतांनीं आपल्या काव्यांत जागोजाग केला असून आर्यानिंदकांचा खरपूस समाचारही घेतला आहे. पंतांच्या आर्येला संस्कृतात गीति असें नांव आहे. 'आर्या आर्यांसि रुचे' (भीष्मभक्तिभाग्य १०), 'आर्या–कथाछंदानें आर्याछंदेंचि जन्मलीं सरलें' (मंत्ररामायण, उपसंहार), 'आर्येला मानियलें बहु पाहुनि सज्जनीं चमत्कृतिला' (सभा ४) इत्यादि आर्या सुप्रसिद्धच आहेत.

२५ पंतांच्या अवाढव्य काव्यमंदिरांत कोन्याकोंपन्यांतून बारीकसारीक दोषांचा केर सांचलेला आहे, नाही असें नाहीं. सर्वतोपरी निर्दुष्ट अशी काव्यरचना करणारा कवि भूतलावर आजपर्यंत कोणीही झाला नाहीं. सूर्यावर डाग किंवा चंद्रावर कलंक हे असायचेच! 'प्रायेण सामग्र्यविधौ गुणानां पराङ्मुखी विश्वसृजः प्रवृत्तिः,' असें कालिदासानेंच ह्मटलें आहे. परमात्मा मात्र सर्व दोषरहित केवळ मंगलरूप आहे. तोही भक्तकार्यार्थ अवतार घेऊन येतो ह्मणजे शरीरी होतो, तेव्हां अल्पस्वल्प दोषांचा त्यावरही आरोप करायला जग कमी करीत नाहीं!! साक्षात श्रीरामालाही 'कष्टं जनः कुलधनै रनुरंजनीयः' असा सीतात्यागसमयीं उद्गार काढावा लागला! जगांतला कोणताही कवि सर्वदोषविमुक्त नाहीं! कालिदासाच्या काव्यांतले कित्येक दोष मम्मटानें दाखविले आहेत, व शेक्सपीअरच्या गुणांबरोबर त्याच्या अनेक दोषांचें विवेचन त्याच्या टीकाकारांनीं केलें आहे. मोरोपंतांची कविताही सर्वदोषविनिर्मुक्त आहे असें ह्मणणें केवळ फाजील अभिमानाचें व चुकीचें होणार आहे. स्वतः त्यांनींच सांगितलें आहे:—

**कोठें दूरान्वित पद, कोठें चुकली असेल यतिमात्र ।**
**अतिमात्र दोष ऐसे न वदोत कवी समस्तगुणपात्र ॥ १९ ॥**

**—मंत्ररामायण, उपोद्घात.**

पंतांच्या कवितेंत कित्येक ठिकाणीं दूरान्वय आहेत, कित्येक ठिकाणीं यतिभंग झालेले आहेत, कित्येक ठिकाणीं अप्रशस्त समस्त किंवा अयोग्य उपमा पडल्या आहेत, नाहीं असें नाहीं. पण त्यांच्या गुणसमुच्चयापुढें हे किरकोळ व अत्यल्प दोष जगानें विसरूनच गेले पाहिजेत. दोषाला दोषच ह्मणा, गुण ह्मणूं नका; पण ९६ गुण असून ४ दोष असले तर त्या दोषांचा जगांत डांगोरा पिटून महाकवींची दुष्कीर्ति किंवा स्वतःची अप्रतिष्ठा पसरूं नका. पंत महापंडित होते, व्युत्पन्न होते, रसवेत्ते होते ह्मणून त्यांच्या कवितेंत सर्वांनाच सर्व भाग कळण्याइतका सोपा नाहीं, तो संस्कृतशब्दप्रचुर आहे,—पण याबद्दल कवीला दोष कसा लावतां येतो कोण जाणें! अलीकडे आमच्या इंग्रजी पंडितांच्या ठिकाणीं मोरोपंतांच्या कवितेविषयीं विलक्षण प्रकारची आढी बसलेली दिसते! इंग्रजी भाषेचा अभ्यास वाढला, संस्कृत व मराठी भाषांचा अभ्यास तुटला, मागच्या विचारपरंपरेची ओळख राहिली नाहीं, हिंदुसमाजांतल्या चालीरीतींची किंमत वाटेनाशी झाली, स्वधर्मश्रद्धा पार ढांसळून गेली, आपल्या आचारविचारांविषयीं प्रकट अगर गुप्त तिरस्कार वाटूं लागला,—याप्रमाणें हिंदुत्वाला पारखे होत चाललेले आमचे कित्येक देशबांधव आपल्या राष्ट्रीय महापुरुषांची व राष्ट्रीय कवींची अवहेलना करण्यांत भूषण मानूं लागले आहेत! याप्रमाणें कालचक्र फिरल्यामुळें पूर्वीचे शुद्ध संस्कार नष्ट झाले व ह्मणून मोरोपंतादि कवींचे निंदक अलीकडेच फार बोकाळले आहेत! असो. 'जरि उकिरड्यांत पडला मळला न हिरा तथापि सामान्य' या न्यायानें कितीही दूषक उत्पन्न झाले तरी महाकवीच्या योग्यतेंत अंतर पडत नाहीं. पंतांच्या कवितेंत प्रतिभा आहे, प्रसाद आहे, प्रेम आहे, बहुतेक ठिकाणीं सहजत्व आहे. महाकवींच्या काव्यांत दिसणारे अनेक लोकोत्तर गुण पंतांच्या काव्यांत आहेत. हें पूर्वीच्या प्रकरणांवरून वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. अलीकडच्या लोकांना थोडे तरी दोष दाखविले नाहीं तर सारें विवेचन अपुरें झालें असें वाटतें, ह्मणून त्यांच्या संतोषार्थ चार दोन दोषहि आतां दाखवूं!

मंत्ररामायणांतले कित्येक दोष मागें पृ. २४८–२४९ मध्यें दाखविले आहेतच. भारत, कुशलवचरित व मंत्ररामायण यांत पुष्कळ ठिकाणीं

सबंद आर्यार्धच सामासिकशब्दघटित आहेत. असे लांबलांब समास क्वचित् ओजोगुण उत्कर्षानें दाखवितात, पण कोठें कोठें आर्यार्ध फोडायच्या प्रयत्नांत असतांना अर्थसंदर्भ हातचा निसटून जाऊन रसभंग होतो! अशीं स्थळें फार थोडीं आहेत, पण तीं आहेत! भारतीयुद्धानंतरच्या भयप्रद देखाव्याच्या वर्णनांत पुढीलसारखी उपमा अगदींच अयोग्य दिसतेः—

**हुडकिति शवें पहा! पतिसुत वळखायासि बायका सारीं।**
**या कमळवनविहारा शिरल्या हंसीच काय कासारीं!॥ स्त्री० ४-७**

कोठें कोठें क्रियाबेड्या, निबरवया, गिळितगजाजगरगळा, सद्रसिकमंडळीसुरसा, साहाय्याध्याय इत्यादि अप्रशस्त समास योजले आहेत. यतिभंगाचीं शेंदोनशें स्थळें सहज दाखवितां येतील! 'दरगे' ह्याबद्दल 'दुर्गे,' 'दोघे' ह्याबद्दल 'दाव,' 'होउनि' ह्याबद्दल 'होनि,' 'उचलितां' बद्दल 'ऊचलितां' ह्याप्रमाणें यमकासाठीं शब्दांची ओढाताणही कोठें कोठें झालेली आढळते. आवतणें, इलुशी, चहू आगळे चार, वळखला, वेंघे, वरडला इत्यादि गांवढळ शब्दही क्वचित् योजलेले आढळतात. सोप्या लहान मराठी शब्दाच्या गळ्यांत संस्कृत समासांचें भलें लठ्ठ लोढणें अडकवल्याचें पाहून एखादे वेळीं हंसू येतें! जसें.—'पिहितमुख खळगा,' किंवा—

**ह्मणती 'सद्यःकीर्तिप्रभाग्रस्पर्श तोंडलें' कवि त्या ॥ ५१ ॥**
**—विराटपर्व अ० ३**

'क्रोधोद्धत दंती' ह्या सरळ शब्दांच्या ऐवजीं यमकासाठीं 'क्रोधोद्धत दंपती अपकार' अशी योजना करणें ह्मणजे हाताचा वळसा घेऊन घांस घेण्यासारखेंच हास्यास्पद आहे! पुढील क्लिष्ट रचना पहाः—

**त्या शतसहस्र होत्या सुगुणामृतसिंधु बायका राजा।**
**लिहिति रतिस्तुति पूर्वी मात्रा देऊनि बा यकारा जा! ॥ ६९॥**
**—द्रोणपर्व अ० ५**

प्रथमार्ध सोपा आहे, पण द्वितीयार्ध किती क्लिष्ट झाला आहे! 'य'ला मात्रा देऊन 'ये' करून तो 'रति स्तुति' पूर्वी लिहिला ह्मणजे 'येर ती स्तुति' होते! खालील विचित्र प्रकार कधीं मत साधण्यासाठीं व कधीं यमकप्रासांसाठीं कवीला अवश्य योजावे लागले आहेत! अर्थबोधास विलंब करणारे प्रकार नीरस अतएव दूषणीय आहेत, त्याप्रमाणें हेही दोष ह्मणून गणायला कांहीं प्रत्यवाय नाहीं:—

(१) 'ण' पुढें मागें 'रा' ज्या तो रावे कपीस भेटला वानी ॥ २ ॥
—मंत्ररामायण.

(२) येन्नामीं 'लक्ष्मा'च्या अंतीं 'ण' प्रेमानें द्यावा संतीं ॥ ५ ॥
--सौम्या रामायण.

( ३ ) यन्नामीं[३] आधि 'त्रि' प्रांतीं 'टा' हा जकार त्यामध्यें॥ ८३॥
—दिव्यरामायण

( ४ ) 'रा' मग, ता, ' आद्यीं हें नाम[४] जिचें तीस घे जग नयानें॥११४
—नामांकरामायण.

( ५ ) शूर 'स,कार' 'श 'कारीं व्हावा दे द्विषदुरांत फटकारा ।
भट भीमेतर असता तरि तेव्हां रक्षिताचि न 'ट'कारा[५] ॥ १८ ॥
—गदापर्व अ. ३

( ६ ) आंगीं होतें भटपण त्याचा आला उमाप तिटकारा ।
त्यांताचि मला दुसरिया देता झाला उमापति टकारा[६] ॥ ३२ ॥
—अनुशासन अ. ६

( ७ ) कुंती कर्णास ह्मणे 'वत्सा ! कौंतेय तूं न राधेय !।
'राधे ! ' यथेष्ट ह्मण परि कर्णा कर्णास फार बाधे 'य' ॥ ९ ॥
हे मात्र न ऐकवती, सुखद मला म-नु-दु[७] मिलित रा-धे य ।
कानीन पुत्र माझा, कर्णा ! कौंतेय तूं न राधेय ॥ १० ॥
—उद्योगपर्व अ. ११

निबंधमालेच्या ६३व्या अंकांत मालाकारांनीं पंतांच्या कवितेंतील गुण-दोषांचें विवेचन केलें आहे; व 'अश्लीलत्व ह्मणजे प्रौढ काव्यांत न खप-

---

१रावण. २लक्ष्मण. ३ त्रिजटा. ४तारा. ५ दुर्योधनानें 'शूर' चा 'सूर' (सूर्य) होण्यासाठीं—सूर्याप्रमाणें प्रताप गाजविण्यासाठीं--शत्रु जो भीमसेन त्याच्या वक्षस्थलावर आघात केला. भीमाच्या जागीं अन्य वीर असता तर भट (योद्धा) शब्दांतील 'ट'कार त्याला रक्षितां आला नसता ह्मणजे तो--भ ( नक्षत्र ) त्या नक्षत्रासारखा तेजोहीन झाला असता. ६ विश्वामित्र ह्मणतो:—' हे धर्मा ! आह्मी भट ( योद्धा ) होतों तों शंकरानें मला भट ( ब्राह्मण )' केलें. ७ कुंती कर्णास ह्मणते ' तूं राधेय नाहींस तर कौंतेय आहेस. तूं माझ्या कुमारावस्थेंत झालेला अतएव माझा कानीन पुत्र आहेस. तुला राधेय ह्मटलेलें मला खपणार नाहीं. म-नु-दु-या अक्षरांनीं युक्त अशीं रा-धे-य हीं अक्षरें ह्मणजे राम-धनु-यदु हे शब्द मला सुखद आहेत पण ' राधेय ' शब्द दुःसह होतो. येथें यमकासाठीं निरर्थक शब्द आणलेले आहेत.

ण्यासारख्या ग्राम्य शब्दांचा प्रयोग व व्यावहारिक दाखले ' हा दोष पंतांच्या काव्यांत आढळतो ह्मणून लिहिलें आहे, तें कांहीं अंशीं खरें आहे, पण दिलेलीं सर्वच उदाहरणें दुष्ट नाहींत असें श्री. बापूसाहेब कुरुंदवाडकर व वे. गणेशशास्त्री लेले यांनीं मालेच्याच पुढील कांहीं अंकांत सिद्ध केलें आहे. पंतांच्या कवितेंत नवरसांचीं हवीं तितकीं उदाहरणें आहेत, त्यांतील बीभत्स-रसापैकीं कांहीं वेंचक शब्द घेऊन त्यांच्यावर 'ग्राम्य 'त्वाचा शिक्का मारण्यांत अलीकडे कित्येकांना भूषण वाटतें ! पंतांच्या काव्यांत शृंगाराचा अतिरेक कोठेंही झालेला नाही, तथापि 'प्रियाकुचतटीं जिहीं न बहुवार पत्रावळी ' ( केका ७ ) असे कांहीं चरण घेऊन त्यावर टीका चाललेली पाहण्यांत येते. संस्कृतांतलीं मालतीमाधवासारखीं नाटकें मुलामुलींस कॉलेजांतून शिकवण्यांत येतात, व बायरनसारख्या भ्रष्ट इंग्रजी कवीच्या काव्यांतही गुरु-शिष्य आनंदानें पोहतात, पण बिचाऱ्या मराठी कवीच्या काव्यांत ' कुच, ' व 'रतिमुग्ध ' हे शब्द दृष्टीस पडले कीं कित्येकांस हिंव भरतें ! ज्या सा-तव्या केकेंत 'रतिमुग्ध' 'कुच' हे शब्द आले आहेत त्या केकेंत प्रभु आपलें ऐश्वर्य आणि विलास भक्तकार्यासाठीं तात्काळ सोडतात हेंच मुख्यत्वें सांगितलें आहे. त्या केकेंत शृंगार बिलकूल नाहीं. पंतांस विषयवासनेचा वासही सोसत नव्हता, उलट या 'अनावर पिशाचिकेला' मारण्याबद्दल त्यांनीं भगवंताला पुढेंच विनविलें आहे. दृष्टि विकृत झाल्यामुळें व स्वदेशी संस्कार ढिले झाल्यामुळें आमच्या कवींचे गुण सुद्धां कित्येक विद्वानांस दोषरूप दिसूं लागले आहेत ! असो. पंतांच्या कवितेंत संस्कृत शब्दांचा भरणा अतिशय असल्यामुळें ते पुष्कळांस अपरिचयाचे वाटतात, तथापि हंसांनीं ह्मटल्याप्रमाणें ' ते प्राकृत शब्दांसह प्राकृत भाषासरणीच्या प्रवाहांत सांपडल्यामुळें प्राकृतरूप होऊन गेले आहेत ! ' वर सांगितलेले शब्दरचनें-तले कांहीं दोष पंतांच्या काव्यांत आहेत तथापि अलीकडच्या भिन्न परिस्थि-तींत वाढलेल्या विद्वानांस पंतांच्या विचारसरणींत जे कांहीं दोष आढळतात ते वस्तुतः दोष नसून तो अर्वाचीन विद्वानांच्या विकृत दृष्टीचा दोष आहे असें मला वाटतें ! पंतांच्या कवितेंतले हे दोष इतके क्षुल्लक आहेत कीं हं-सांनीं ह्मटल्याप्रमाणें "त्यांची प्रौढ व झोकदार वाणी, तशाच डौलाचा आर्याछंद, अर्थगांभीर्य, यमकादि शब्दचमत्कृति, निवडक शब्दयोजना, प्रतिभापूरित अवाढव्य ग्रंथरचना इत्यादि काव्यगुणसूर्यरश्मीपुढें ते

गिरिगुहांतील अंधकारासारखे दूरच्या कोपऱ्यांत कोणाच्या दृष्टीसही न येण्यासारखे विरल आहेत !"

**२६ उपसंहार:**—ग्रंथ समाप्तीस आला. ज्या रामप्रभूच्या प्रेरणेनें रामभक्त मयूरकवींच्या चरित्राचा मनोरथ मी दहा वर्षांपूर्वी धरिला होता तो आज सफळ झाला! पंतांचा सहवास दहा वर्षें अहोरात्र घडला. या अवधींत पंतांनीं संतांची थोडीशी ओळख करून दिली व भगवद्भक्तीचें स्वरूप दाखवून प्रेमसुखाचा अनुभव घेण्यास शिकविलें ! पंतांचें चरित्र निर्विघ्नपणानें शेवटास गेल्याचा आनंद तर माझ्या हृदयास अतिशयच होत आहे, तथापि हा व्यवसाय आतां बंद पडणार याबद्दलही चित्तास एक प्रकारची हुरहुर वाटूं लागली आहे ! मी पंतांच्या शें दोनशें आर्या आपल्या मनाशींच हृदयविनोदार्थ गुणगुणलों नाहीं असा एकही दिवस या दहा वर्षांत गेला असेलसें वाटत नाहीं. पंतांनीं मज पामरांवर अनंत उपकार केले आहेत तें मी वाचेनें बोलून काय दाखवूं ? किती प्रहर, किती दिवस, किती रात्री त्यांच्या व त्यांच्या ओळखीमुळें महाराष्ट्र सत्कवींच्या संगतींत मीं आनंदानें घालविल्या आहेत ! एकेक आर्येवर, एकेक चरणावर त्यांनीं रात्रींच्या रात्री मला झुलवावें ! ज्या रामभक्त व सच्छील पंतांनीं आपला नित्य सहवास देऊन माझ्या अंतःस्वरूपांत कांहीं इष्ट फरक केला आहे, त्यांच्या चरणीं वारंवार प्रेमपूर्वक मी नमस्कार करितों ! सत्संगतीनें देहांतच पुनर्जन्म होतो, 'नव्या नव्या सृष्टींतल्या चमत्कृति' दृष्टीस पडतात, भगवंताच्या ठिकाणीं विश्वास व प्रेम वाढतें, आंतबाहेर निरुपाधिक आनंदाचा समुद्र भरला आहे अशी भावना होऊन जडत्व गळूं लागतें, शब्दांशीं खेळतां खेळतां शब्दगर्भाकडे जाण्याचा मार्ग सांपडतो, व इंद्रियांना हा अभ्यास होऊं लागला कीं निरंतर प्रेमाश्रुस्नान होऊन प्राप्त झालेल्या नरदेहाची धन्यता वाटते ! ज्या पांडुरंगानें पंतांचा असा परिचय करून दिला त्यानेंच पुढील ३।४ वर्षांत महाभागवत श्रीएकनाथमहाराज यांच्या अशाच प्रकारच्या सेवेंत मला रंगवावें व आपणांहून अभिन्नतनु अशा संतांच्या लीला गाण्यास प्रोत्साहन देऊन संतचरणरजाची पदवी द्यावी एवढेंच त्यापाशीं भक्तिपूर्वक मागून पंतांच्या शब्दांनींच विनवितों कीं:—

**तुमच्या आशीर्वादें जन्मोजन्मीं घडो अशी सेवा ।**
**हें वाङ्मनःशरीरें करितों विज्ञापना सदा देवा ॥ १ ॥**

## भरतवाक्य.

सुसंगति सदा घडो; सुजनवाक्य कानीं पडो;
कलंक मतिचा झडो; विषय सर्वथा नावडो; ।
सदंघ्रिकमळीं दडो; मुरडितां हटानें अडो;
वियोग घडतां रडो; मन भवच्चरित्रीं जडो. ॥ २ ॥
न निश्चय कधीं ढळो; कुजनविघ्नबाधा टळो;
न चित्त भजनीं चळो; मति सदुक्तमार्गी वळो; ।
स्वतत्व हृदया कळो; दुरभिमान सारा गळो;
पुन्हां न मन हें मळो; दुरित आत्मबोधें जळो. ॥ ३ ॥
मुखीं हरि ! वसो तुझी कुशलधामनामावली,
क्षणांत पुरवील जी सकलकामना मावली; ।
कृपा करिशि तूं जगत्रयनिवास दासावरी,
तशी प्रकट हे निजाश्रितजनां सदा सांवरी ॥ ४ ॥

—केकावलि.

---

